# श्रीमद्भागवत
# कळसरूपी शेवटचा भाग.

---

## सार्थ-सुभाषित-संग्रह

अर्थात्

# भागवतस्वारस्य.

आणि

## भागवतान्तर्गत सूचीसह

# भारतीय-पौराणिक-कोश.

---

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी

ग्रंथसंपादक व ग्रंथप्रकाशक, इंदुप्रकाश छापखाना, ठाकुरद्वार—मुंबई नं. २.

---

सन १९२९, शके १८५१.

---

किंमत ५ रुपये.

श्री

# अर्पणपत्र.

परमपूज्य मातोश्री

## कै. श्री. रंगबाई सांवळाराम यंदे

यांच्या चरणीं

मातृप्रेमाचें द्योतक म्हणून

हा ग्रंथ

कृतज्ञतापूर्वक विनम्रभावें अर्पण करितों.

दा. सां. यंदे.

# या भागांतील विषयांचा अनुक्रम

## भाग १ ला.



## भाग २ रा.



## भाग ३ रा.

# प्रास्ताविक दोन शब्द.

पूर्वसंकल्पानुरूप श्रीमद्भागवताचा कळसरूपी शेवटचा भाग आज आम्ही आमच्या भागवतप्रेमी वाचकांच्या सेवेंत सादर करीत आहोंत. हा भाग दोन महिन्यां-पूर्वीच प्रसिद्ध व्हावयाचा होता; परंतु आयतेवेळीं अनेक हितचिंतक मित्रांकडून कित्येक सूचना आल्यामुळें, त्या सूचनांस अनुसरून नवी मांडणी करावी लागली; व त्यामुळें सांकेतिक क्षेत्रापेक्षां कार्याचें क्षेत्र चौपट वाढलें. अर्थात् त्यामानानें ठरलेल्या वेळापेक्षां अधीक वेळ लागला त्यास उपाय नाहीं. आरंभीं भागवतापुरताच विशेष-नामांचा कोश व सूचि देण्याचें आम्ही निश्चित केलें होतें; परंतु भागवतापुरताच नुसता कोश न देतां वेगवेगळया पुराणांत आलेल्या एकंदर विशेषनामांचा कोश विस्तृत माहितीसह दिल्यास तो पुराण वाचकांस विशेष उपयोगी होईल, अशा सूचना बऱ्याच मित्रांकडन आल्या. शिवाय पुराण–ग्रंथांचें प्रकाशनाचें कार्य आमचें चालूच अस-ल्यामुळें, या कोशाचा उपयोग सर्वसाधारण पुराणवाचकास व्हावा, अशा उद्देशानें अठराहि पुराणांतील विशेषनामांचा संग्रह यांत केला आहे. हा कोश तयार करण्याचे कामीं, गीर्वाण लघुकोश, महाराष्ट्रीय ज्ञानकोश, भारतीय प्राचीन ऐतिहासिक कोश, इत्यादि ग्रंथांचा आम्हास बराच उपयोग झाला आहे. हल्लींच्या कोशास आम्ही ' भागवतांतर्गत सूचीसह भारतीय पौराणिक कोश ' असें नांव दिलें आहे, आणि त्या नांवाप्रमाणेंच जीं नांवें भागवतांत आलीं आहेत, त्या नांवापुढें, स्कंध, अध्याय व श्लोक यांचे आंकडे कंसांत दिले आहेत; आणि ज्या नांवांचा व त्यांच्या कथा-भागाचा संबंध इतर पुराणांशीं आला आहे, त्या पुराणांच्या नांवाचा फक्त उल्लेख त्या नांवाच्या शेवटीं कंसांतून केला आहे; आणि शेवटीं कोशांत आलेल्या मुख्य मुख्य नांवांची यादी जोडली आहे. सारांश, संकल्पित ठरावापेक्षां ह्या कोशाचें काम चौपट मोठें झालें आहे. खर्चाच्या दृष्टीनें हा बोजा जरी थोडा वाढला आहे, तथापि उपयुक्ततेच्या मानानें त्याचें महत्त्व विशेष आहे, हें वाचकांच्या लक्षांत येईल.

कोशाप्रमाणेंच यांत आलेला दुसरा विषय जो सुभाषितांचा संग्रह, त्याचाहि प्रकार असाच झाला आहे. भागवतांतील निवडक सुभाषितें फक्त अर्थासह द्यावयाचीं, असें आरंभीं ठरविलें होतें; परंतु नुसतीं सुभाषितें दिल्यानें भागवतांतील स्वारस्य सर्व-साधारण वाचकांच्या मनावर ठसावें तसें ठसणार नाहीं; करितां कथाभागानुरूप संक्षेपतः विवेचन करून भागवतांतील स्वारस्य थोडक्यांत अबालवृद्ध वाचकांच्या मनावर ठसेल, अशा प्रकारें सुभाषितांची मांडणी करावी, अशा विषयीं कित्येक सूचना आल्या. वास्तविक पहातां प्रत्येक स्कंधाचे प्रसंगीं उपसंहार रूपानें ही कामगिरी आम्ही पूर्वींच केली असून बाराव्या स्कंधाचे शेवटीं भागवत मंजिरीच्या रूपानें एकंदर बाराहि स्कंधाचा गोषवारा दिला आहे. त्यावरून भागवतांतील स्वारस्य समजन येण्यासारखें

आहे. परंतु त्याच्याहि पलीकडे जाऊन भागवतांतील महत्वाच्या प्रसंगाचें स्वारस्य सुभाषितांसह या शेवटच्या भागास जोडावें, असा कांहीं मित्रांचा विशेष आग्रह पडला. शिवाय ह्या भागवत ग्रंथाचें कार्य सर्वांग परिपूर्ण व्हावें, अशी आमची स्वतःचीहि इच्छा असल्यामुळें, खर्चाचा वगैरे विचार बाजूस ठेवून सुभाषितांबरोबरच श्रीमद्भागवतांतील सारस्वारस्यहि यथामति यथाशक्ति आमच्या भागवतप्रेमी वाचकांच्या सेवेंत सादर करण्याचें ठरविलें; व त्याप्रमाणें तयार केलेला हा भाग आज वाचकांच्या सेवेंत सादर करीत आहों. हंसक्षीर न्यायानें ह्या शेवटच्या भागाचा लाभ आमचे प्रेमळ वाचक घेतील व आतांपर्यंत झालेल्या श्रमाचें चीज करतील अशी उमेद आहे.

ह्या भागवतग्रंथप्रकाशनाच्या कामीं, ज्या अनेक मित्रांकडून तसेंच भागवतप्रेमी जिज्ञासु वाचकांकडून आम्हांस अनेक प्रकारचें सहाय झालें, त्यांच्या नांवाचा उल्लेख करून त्यांचे आभार मानण्यापूर्वीं, हे अवजड, जबाबदारीचें व विशेष खर्चाचें काम शिरावर घेण्याची स्फूर्ति आम्हांस का व कशी झाली, त्या संबंधाचा थोडासा इतिहास आमच्या प्रेमळ वाचकांस सांगितल्यास तो अप्रासंगिक होणार नाहीं, असें समजून तो थोडक्यात येथें निवेदन करतों. पाहिली गोष्ट ही कीं, ह्या भागवत ग्रंथासंबंधानें आम्हाला स्वतःलाच विशेष आवड आणि प्रेम आहे. ही आवड उत्पन्न होण्याचें कारण म्हटलें म्हणजे आमच्या वडिलांपासूनच आमच्या कुटुंबांत या ग्रंथासंबंधानें असलेली विशेष भक्ति होय. आमचे वडील परम विष्णुभक्त होते. पंढरीची वारी व एकादशीचें व्रत हा त्याचा नियम मरेपर्यंत अव्याहत चालू होता. श्री एकनाथाचें भागवत, हा त्यांचा नित्यपाठांतला ग्रंथ असे. इतकेंच नव्हे, तर त्यावेळीं हल्लींसारखी मुद्रणकलेची विपुलता नसल्यमुळें, हल्लींसारखे ग्रंथ मिळणें सुलभ नव्हतें. म्हणून त्यांनी स्वत: देशी कागदावर एकनाथीभागवत हा ग्रंथ सुंदर अक्षरांनी लिहून ठेवला होता; व त्याचें पारायण रोज एक अध्याय याप्रमाणें ते नेहमीं करीत असत. त्यांची नोकरी पलटणींत होती. त्यांचे वडील म्हणजे आमचे आजोबा तुकारामबोवा हेहि त्याच पलटणींत सुभेदार मेजर होते. रात्रीं सर्वांचीं जेवणें झालीं म्हणजे आमचे वडील तंबोरा घेऊन भागवतपुराण वाचीत असत, आणि आजोबा अर्थ सांगत असत. हें पुराण ऐकण्याकरितां पलटणींतील बायकांमुलें मिळून पांचशांवर मंडळीचा जमाव जमत असे. एकादशीच्या दिवशीं पुराणानंतर भजनास सुरवात होत असे. त्यावेळीं ते विणा घेऊन उभे रहात, आणि पलटणींतील पांचपन्नास शिपाई मंडळी टाळ घेऊन त्यांजबरोबर भजन करीत असत. तुकारामाचे अभंग तर त्यांच्या जिभेवर थैथै नाचत असत. उठतां बसतां, घरांतदारांत, तुकारामाचे अभंग त्यांच्या तोंडांत सारखे गुणगुणत असत. या त्यांच्या वृत्तीमुळें सर्व मंडळी त्यांस ‘ बुवा ’ या संबोधनानें ‘ सांवळाराम बुवा ’ अशी हाक मारीत असत. रोज मोठ्या पहाटे उठून थंडपाण्यानें स्नान करावयाचें, सूर्याला नमस्कार घालावयाचे, व्यंकटेशस्तोत्राचा पाठ म्हणावयाचा, आणि दोन तास ग्रंथ लिहिण्याचें काम करावयाचें, हा त्यांचा नित्यांतील नियम असे. त्यांचे अक्षर फार सुंदर असे. त्यामुळें कोणाचें कांहीं लिहिण्याचें काम असलें म्हणजे तो सांवळाराम

बुवाकडे येत असे, आणि नोकरी व्यतिरिक्त जो थोडा वेळ राही, त्या वेळांत हीं लोकांच्या लेखनाचीं कामें ते करीत असत.

याचवेळीं त्या पलटणींत रामजी या नांवाचे एक दाक्तर होते. ते मोठे विनोदी व आनंदी असत. त्यांच्या कुटुंबाचें नांव प्रिताई. ते रात्रीं भाजनोत्तर आपल्या कुटुंबास स्त्रियांच्या चरित्रावर अनेक गोष्टी सांगत. एकदां पुराण आटोपल्यानंतर त्यांनीं सांवळारामबुवास गोष्टी ऐकण्यास बोलाविलें, आणि सांगितलेली गोष्ट नीट व्यवस्थित लिहून काढण्याची कामगिरी त्यांस सांगितली. दाक्तर साहेबांच्या आज्ञेप्रमाणें वडिलांनीं दुसरे दिवशीं सर्व गोष्ट व्यवस्थित लिहून रात्रीं वाचून दाखविली, ती ऐकून दाक्तरसाहेब खुष झाले, आणि आपण सांगितलेल्या गोष्टी लिहून काढण्याचें काम त्यांनीं त्यांजवर सोंपलें. रामजी दाक्तरचें स्त्रीचरित्र म्हणून तें पुस्तक पुढें शिळा छापावर छापून प्रसिद्धीस आलें. त्याची शिळेवर छापलेली पहिली आवृत्ति सर्व वडिलांच्या हस्ताक्षराचीच आहे.

त्यावेळीं हल्लींच्यासारख्या शाळा नव्हत्या किं परीक्षा नव्हत्या. तात्यापंतोजीनें मुलांस अक्षर ओळख करून दिली आणि गुणाकार भागाकार शिकविला म्हणजे शिक्षणाची यत्ता पुरी झाली. सांवळारामबुवांचें शिक्षणही याच्यापलीकडे गेलें नव्हतें. तथापि त्यांस वाचनाचा आणि लेखनाचा नाद विशेष असल्यामुळें त्या काळच्या मानानें त्यांत त्यांची प्रगती विशेष झाली होती. कोणीहि हरिदास पुराणिक आल्यास भक्तिभावानें त्याचें पुराण व कीर्तन ऐकावयाचें, आणि कांहीं शंका आल्यास त्यांची भेट घेऊन मनाचें समाधान करून घ्यावयाचें, हा त्यांचा आवडता विषय असे. अशा प्रकारें वडिलांचा नित्य क्रम असल्यामुळें अर्थातच कुटुंबांतील मंडळीसहि त्यांच्या सहवासानें त्यांचेंच अनुकरण करावें लागे. एकादशीचे दिवशीं तर घरांत मुळीं अन्नच शिजत नसे. त्यामुळें अनायासें लहानापासून थोरांपर्यंत सर्वांसच उपोषण घडत असे. सारांश, भागवतावरील आमचें प्रेम नवें नसून वडिलांपासूनच उपजत आलेलें आहे.

आमच्या वडिलांस एकंदर चार मुलें होतीं त्यांत मी सर्वांत धाकटा. सर्वांत वडील बंधूचें नांव नारायण, त्याच्यापेक्षां चार वर्षांनें जो धाकटा होता त्याचें नांव माधव, तिसऱ्याचें नांव विठ्ठल आणि चवथा मी. आम्हां सर्वांत चार चार वर्षांचें अंतर होतें. सर्वांत वडील बंधु नारायण हे बालपणापासूनच फार उनाड व अतीशय स्वच्छंदी असत, त्यामुळें त्यांच्यासंबंधानें वडिलांचें चित्त नेहमीं उद्विग्न असे. असो.

सन १८५७ सालच्या बंडानंतर आमच्या आजोबानें पेन्शन घेतलें आणि त्याबरोबरच वडिलांनीं फलटणीची नोकरी सोडली; व सर्व कुटुंब नगराहून मुंबईस आलें. मुंबईस आल्यानंतर शिळाप्रेसकरितां मराठी कापी तयार करून देण्याचें काम त्यांनीं पत्करलें. त्यांस ज्योतिषाचा नादहि बराच होता. तो बेलगांवास त्यांची पलटण असतांना एका हिंदुस्थानी ज्योतिषाच्या सहवासानें त्यांस लागला होता. त्या ज्योतिष्याकडे कोणाची जन्मपत्रिका करावयास आली म्हणजे ते एक खर्डा तयार करीत, व

त्याची स्वच्छ मराठी प्रत करण्याचें काम वडिलांकडे सोंपीत. त्यामुळें पत्रिकेंतील जन्मकुंडली, लग्नकुंडली, नवमांश, इ. इ. संबंधानें चिकित्सक बुद्धीनें ते त्यांजबरोबर चर्चा करीत असत. अशा परिस्थितींत त्यांस अनायासेंच ग्रहमानाचें ज्ञान थोडेंबहुत आलें होतें; आणि त्यामुळें प्रासंगिकपरिस्थितींतहि ते नेहमीं समाधानवृत्तींत रहात असत. द्रव्य मिळविण्याकरितां अधिक इव्यास करण्याची कल्पना त्यांच्या मनास कधींच शिवली नाहीं. देह क्षणभंगुर आहे, आपणास ह्या जगांतून जावयाचें आहे, हा संसार सर्व मिथ्या आहे, ही भावना भागवतवाचनानें त्यांच्या मनावर तर पूर्णपणें ठसलेली होती.

भागवत ग्रंथाच्या पठणानंतर ते रोज नियमानें रात्रीं शुक्राच्या चांदणीचें दर्शन घेत असत. ज्या दिवशीं शुक्राची चांदणी दृष्टीस पडणार नाहीं, त्या दिवसापासून सहा महिन्यांत मनुष्याचा मृत्यु असतो, ह्या गोष्टीवर त्यांचा भरंवसा होता; व त्याच प्रमाणें घडून आलें सन १८६९ सालची गोष्ट, माझें वय त्या वेळीं सुमारें ८ वर्षांचें होतें. एके दिवशीं आम्ही धाकटे दोघे भाऊ वडिलांबरोबर गच्चीवर गेलों. त्या वेळीं शुक्राची चांदणी आम्हांस दिसली; परंतु वडिलांस दिसेना. त्यांनीं दोनतीन वेळ आम्हांस विचारलें, तुम्हांस रोजच्याच ठिकाणीं शुक्राची चांदणी दिसते कां? आम्ही होय म्हटलें. तेव्हां ते लगेच घरांत आले. त्यांनीं आमच्या मातोश्रीस जवळ बोलावलें, आणि—' येत्या मार्गशीर्षांत विठ्ठलाचें लग्न आपणास उरकून घ्यावयाचें आहे, तो जरी लहान आहे, तरी पण तें कार्य उरकून घ्यावें असें मनांत आलें आहे, मुलगी सांगून आली आहे, तर तें लांबणीवर टाकूं नये, '—असें म्हणाले. मातोश्रींचा स्वभाव नेहमीं पतीच्या इच्छेप्रमाणें वागण्याचा होता. मग त्यांत बरें असो किं वाईट असो, तिकडे पहावयाचें नाहीं. त्या स्वभावास अनुसरून त्यांनीं वडिलांच्या ह्मणण्यास रुकार दिला, व विठ्ठलाचें लग्न उरकून घेतलें. त्यानंतर रोज रात्रींचीं जेवणें उरकलीं ह्मणजे आह्मा सर्वांस जवळ बोलावून एकनाथीभागवतांतील महत्त्वाचे प्रसंग ते वाचून दाखवीत व त्याचें स्पष्टीकरण करून सांगत असत. संसार मिथ्या आहे, नवराबायको, आईबाप, बहीणभाऊ, इत्यादि संबंध क्षणभर विश्रांतीसाठीं जमलेल्या प्रवशासारखे असतात, शरीर नाशिवंत आहे, परंतु आत्मा नेहमींच अमर आहे, करितां आत्म्यानें शरीराचा त्याग केला तरी त्याकरितां दुसऱ्यानें दुःख करूं नये, इत्यादि इत्यादि मुद्दे मनावर ठसविण्याचा प्रयत्न ते सारखा करीत असत. हा क्रम त्यांनीं सारखा सहा महिने चालविला होता.

सन १८७० मधील वैशाख शुद्ध ८ मीचा दिवस, मला चांगला आठवतो. त्या दिवशीं नेहमीप्रमाणें प्रातःस्नान उरकून ते व्यंकटेशस्तोत्राचा पाठ ह्मणूं लागले, तोंच यांच्या पोटांत कळ आली आणि एक सपाटून जुलाब होऊन हातापायास पेटके चढूं लागले. त्याबरोबर त्यांनीं सर्वांस जवळ बोलावलें. आपल्या वडिलांस हाक मारली आणि हात जोडून ह्मणाले, ' बाबा, आह्मी आतां चार घटकांनीं जाणार ! ह्या मुलाकडून अपराध झाले असल्यास क्षमा करा; व ह्या लहान मुलांवर आपली कृपा असं

स्या.' त्याचप्रमाणें आमच्या मातोश्रीस म्हणाले, 'तुला अद्याप या जगांत पुष्कळ दिवस रहावयाचें आहे, व या मुलांपासून सुखदुःखांचा अनुभव घ्यावयाचा आहे. पंडूच्या मृत्यूनंतर कुंतीनें जसें आपल्या पुत्रांचें संगोपन केलें, तसें तूं कर. धीर धर, घाबरूं नको, मी आतां जातो.' बाबा आज असें काय बडबडतात म्हणून आम्ही सर्व रडूं लागलों. आमच्या मातोश्रीस तर त्रिभुवन आठवलें. त्यांनीं धाडकन जमिनी-वर शरीर टाकलें ! कांहीं वेळ तर त्या बेशुद्धच झाल्या ! कोण तो प्रसंग ! त्या प्रसंगाचें स्मरण झालें म्हणजे अद्याप अंतःकरण गहिंवरून येतें.

अशा प्रकारें आमच्या बाबासाहेबांनीं शरीराचा त्याग केल्यानंतर संसाराचा सर्व भार एकट्या मातोश्रीवर येऊन पडला. मरणसमयीं वडिलांचें वय सुमारें पंचावन वर्षांचें होतें, आणि त्या वेळीं मातोश्रीचें वय सुमारें ५० वर्षांचें होतें. वडिलांच्या मृत्यूनंतर एक महिना तर त्या घराच्या बाहेरच पडल्या नाहींत. देवघरांत बसून कांहींतरी विचारांत गढून गेलेल्या त्या दिसत. अशा संधींत आमचे वडील बंधू नारायणराव यांस आयतेंच मोकळें रान सांपडलें ! कोणी विचारतां नाहीं असें पहातांच बाहेरख्यालींत ते आपला सर्वकाळ घालवूं लागले. दुसरे बंधु माधवराव यांचें वय १६ वर्षांचें होतें. त्यांचा मराठी अभ्यास पुरा होऊन नुकतींच इंग्रजी चार पुस्तकें झालीं होतीं. परंतु संसाराचा गाडा चालवि-ण्यास कांहींतरी साधन पाहिजे, म्हणून त्यांनीं एज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यांत कंपाझिटरची नोकरी धरली. छापखान्याचे मुख्य सुपरिंटेंडेंट आमच्या वडिलांवर प्रेम करीत असत, त्यामुळें त्यांनीं सुरुवातीसच त्यांस १६ रुपये पगार मांडला. आजोबाची पेनशन २२ रुपये व बंधूचा पगार १६ रुपये, अशाप्रकारें दरमहा ३८ रुपये येऊं लागले. त्यामुळें मातोश्रीस संसाराचा गाडा हांकण्यास फारशी अडचण भासली नाहीं. परंतु वडील बंधूच्या स्वैर वर्तनामुळें घरांतील एक एक वस्तू रोज कमी होऊन लोकांचें कर्ज डोक्यावर वाढूं लागलें. तशांतच तिसरे बंधु विठ्ठल यांस क्षयानें पछाडलें. त्याच्या दुखण्याकरितां अनेक प्रयत्न केले, परंतु उपयोग झाला नाहीं. शेवटीं एका वर्षांतच तोहि स्वर्गस्थ झाला ! पतिवियोगाचें दुःख खालावलें नाहीं तोंच पुत्रवियोगाचा घाला पडल्यानें संसाराविषयीं तीव्र विरक्ती मातोश्रींच्या ठायीं उत्पन्न झाली. तशांतच वडील बंधूच्या स्वेच्छाचाराची भर पडली. त्यामुळें तर त्या सर्वस्वी उदासीन झाल्या, आणि आपला सर्व काळ साधूसंतांच्या कथाकीर्तनांत घालवूं लागल्या. एकच वेळ अन्नग्रहण करावयाचें, सकाळ संध्याकाळ देवाची पूजा करायची, रोज नेमानें पुराणास व कीर्तनास जावयाचें अशा प्रकारें, केवळ उदासीन वृत्तींत त्या राहूं लागल्या. परंतु अशा परिस्थितींतही त्यांनीं माझ्या शिक्षणाकडे मात्र दुर्लक्ष्य केलें नाहीं. त्या वेळीं मिशनरी शाळांत गरीब व होतकरू मुलांस फार काळजीनें शिक्षण देत असत. त्यापैकीं एका शाळेंत मी जाऊं लागलों. थोड्याच काळांत मास्तरची मेहेरबानी इतकी बसली कीं, कागदशाई व पुस्तकें,

हे मास्तर जातीचे कोंकणस्थ ब्राह्मण असून त्यांचें नांव रामचंद्र सखाराम फाटक असें होतें. मराठी सहा यत्तेपर्यंत ह्या गुरुजींच्या कृपेनें माझें शिक्षण चांगल्याप्रकारें पार पडलें. माझे कच्चे असलेले विषय वेळींअवेळीं मला घरीं बोलावून ते पुरे करून घेत असत. त्यामुळें आरंभापासून शेवटपर्यंत वर्गांत पहिला नंबर ठेवण्यास मला फारशी अडचण पडली नाहीं. मीहि मास्तरच्या अर्ध्या वचनांत वागत असे, व ते सांगतील तें काम व करतील तो हुकूम परमेश्वराच्या हुकुमाप्रमाणें शिरसा मान्य करून त्याप्रमाणें वागत असे. गुरुकृपा हेंच सर्व साधनाचें मूळ आहे, हें तत्व बालपणींच वडिलांच्या सहवासानें माझ्या मनावर ठसलें असल्यामुळें, मला वेडा म्हणा, अथवा भोळा म्हणा, कांहींही म्हणा, परंतु गुरुजींस मी देवाप्रमाणें मानीत असे. रोज शाळेंत जातांच एकादें फळ, निदान सुपारी तरी मास्तर पुढें ठेवून त्यांस नमस्कार करून नंतर वर्गांत बसत असे. असो. सांगावयाचें इतकेंच कीं, ह्या गुरुजींच्या अत्यंत प्रेमामुळें फारच थोड्या अवधींत मला मराठी अभ्यास पुरा करितां आला, आणि त्यांच्याच शिफारशीनें पुढें शंकरशेटच्या इंग्रजी शाळेंत फ्री विद्यार्थी म्हणून माझा प्रवेश होऊन मला कामापुरतें तरी इंग्रजी शिक्षण संपादन करतां आलें.

मातोश्रींची वृत्ति फार उदासीन झाली असल्यामुळें, शाळेंतून आल्यानंतर त्या मला नेहमीं जवळ बसवून कांहींनाकांहीं वाचावयास सांगत, व त्यांच्या इच्छेप्रमाणें मी त्यांस वाचून दाखवीत असे. एकनाथी भागवत, पांडवप्रताप, रामविजय, हरिविजय, तुकारामाचें चरित्र, पंचरत्नी प्राकृत गीता, इत्यादि ग्रंथांवर त्यांची विशेष भक्ति असे. त्यांजबरोबर पुराणास व कीर्तनास जावयाचें, त्यांस रोज वरील ग्रंथांपैकीं एक अध्याय वाचून दाखवावयाचा, असा नित्यक्रम असल्यामुळें शाळेंतील अभ्यासास मला फारच थोडा वेळ राहत असे. हा प्रकार मातोश्रींच्या लक्षांत येतांच त्यांनीं स्वतःच अक्षर ओळख करून घेण्याची सुरुवात केली; आणि सरासरी तीन महिन्यांच्या आंतच त्या स्वतः ग्रंथ वाचूं लागल्या. त्यामुळें संसारांतील फुरसतीचा वेळ ग्रंथवाचनांत घालविण्यास त्यांस आयतेंच साधन झालें, आणि त्यामुळें तशाहि बिकट स्थितींत त्यांची चित्तवृत्ति पूर्वीपेक्षां अधिक आनंदी दिसूं लागली.

अशा प्रकारें आमचा हा संसाराचा गाडा चालू असतांच सन १८७८ त आमच्या आजोबांनींहि इहलोकचा त्याग केला. अर्थात् त्यांचें पेन्शन बंद पडलें, व संसाराचा सर्व भार वडील बंधूस मिळणाऱ्या अल्प वेतनावर येऊन पडला. तशांतच नारायणरावाच्या वाढलेल्या स्वैर वर्तनामुळें घरांत जे दोन डागडागीने होते तेहि नाहींसे झाले, व शिरावर कर्जाचा बोजा वाढला. नगरास असतांना आमच्या आजोबांनीं एक घर बांधलें होतें, व थोडी शेतीवाडीहि केली होती, ती यावेळीं आमच्या मातोश्रीनें विकून टाकून लोकांचें देणें देऊन टाकलें. बंधूसहि यावेळीं ३० रुपये वेतन मिळूं लागलें होतें, पण तेवढ्यानें दोघां बंधूंचें कुटुंब, त्यांचीं मुलें, मातोश्री व मी, इतक्यांचा चरितार्थ चालविणें बरेंच अडचणीचें होतें. अशा वेळीं आपण एकादी नोकरी धरून संसारास हातभार लावावा, असा विचार माझ्या मनांत आला.

परंतु १५ वर्षांच्या मुलास नोकरी कोण देणार, व ती कोठें मिळणार ? दैवयोगानें त्या वेळीं ट्रामकंपनी नवीनच सुरू झाली होती, व थोडेंबहुत शिकलेल्या तरुण मुलांची तेथें भरती होत होती. आपण ह्या कंपनींत नोकरी धरावी, व रात्रीच्या शाळेंत पुढचा अभ्यास करावा, असें मनानें ठरविलें; व एके शनिवारीं सकाळीं शाळेंतून सुटल्यावर परस्पर कुलाब्यास ट्रामकंपनीच्या ऑफिसांत गेलों. तेथें नोकरीकरितां पांचदहा उमेदवार आलेले होते, त्यांत मीहि जाऊन उभा राहिलों. साहेब आले व त्यांनीं प्रत्येकास दोनचार प्रश्न विचारून थोडथोडें इंग्रजी वाचावयास व लिहावयास दिलें; आणि हजर असलेल्या दहा उमेदवारांपैकीं तिघांस पसंत करून त्यांस गाडीवर जाण्याचे पास दिले. या तिघांत अर्थातच मीहि एक होतों. मुलगा शाळेंतून अद्याप घरीं आला नाहीं, म्हणून मातोश्री काळजी करीत बसल्या होत्या. इतक्यांत मी जाऊन पोहोंचलों. 'आज इतका उशीर कोठें होतास' असा त्यांनीं प्रश्न केला. नोकरी मिळविल्याची हकीकत मी त्यांस मोठ्या उमेदीनें सांगितली. मला वाटलें, मी नोकरी मिळविली व पांचपंचवीस रुपये पगार आणणार, हें वर्तमान ऐकून मातोश्रीस आनंद होईल, व त्या मला शाबासकी देतील. परंतु तसें न होतां उलट त्यांस वाईट वाटलें. त्या म्हणाल्या, 'दामु, हें बरें केलें नाहींस. आतां तुझा अभ्यास कसा होणार ? अरे आपण मीठ भाकरी खाऊन दिवस काढले असते, परंतु हें तुझें विद्यासंपादन्याचें वय एकदां निघून गेल्यावर मग का तुझ्याच्यानें अभ्यास होणार आहे ? शिवाय नोकरी म्हणजे गुलामगिरी ! आपलें प्राक्तन दुसऱ्यास विकावयाचें ! एक मुलगा गुलामगिरी करतो तितकी पुरे आहे ! तूं आपल्या वडिलांचें कांहीं तरी नांव करशील अशी मला उमेद होती !' मातोश्रीच्या ह्या उद्गारांचा माझ्या मनावर फारच परिणाम झाला. मी म्हटलें; 'आई, धरूं नये परंतु ही नोकरी धरली खरी, ती आतां एक वर्ष करतों. ह्या वर्षांत जी दोन अडीचशांची प्राप्ती होईल त्यावर मी कांहींतरी उद्योग करून तुझी इच्छा पूर्ण करीन; आणि फावल्या वेळांत अभ्यासही करीन.'

हा प्रसंग म्हणजे भावी उद्योगाचा पायाच झाला. आपण स्वतंत्र असा कोणता उद्योग करावा, कीं जेणेकरून प्रपंच आणि परमार्थ दोन्ही साध्य होतील, हा विचार मनांत सारखा घोळूं लागला. याच वेळीं मागसलेल्या लोकांच्या व गिरणीकामगारांच्या हितार्थ म्हणून दीनबंधुपत्र उदयास आलें होतें, आणि महात्मा जोतीराव फुले व स्वामी दयानंद सरस्वती, यांची चळवळ चालू होती. त्यांचीं भाषणें ऐकण्याचा प्रसंग मला दोन वेळ आला. त्याचा परिणाम मनावर इतका झाला कीं, आपणहि एकादें वर्तमानपत्र काढून कांहीं तरी समाजसेवा करावी, असें मनानें घेतलें. याचवेळीं उमरखाडींत रघुनाथ कृष्णाजी नांवाचे एक वयोवृद्ध, धूर्त, विचारी व मोठे व्यवहारदक्ष गृहस्थ राहत असत. हे घरचे सधन होते, व समाजांत त्यांचा मोठा मान असे. त्यांचा एक लहानसा मोडकळीस आलेला छापखाना होता, व ते 'अरण्यपंडित' या नावाचें एक लहानसें पाक्षिकपत्र केवळ हौसेखातर काढीत असत. 'समाजाची उन्नतावस्था दुसऱ्यास शिव्याशाप देऊन कधीं व्हावयाची नाहीं, तर

सर्वांनीं बंधुभावानें वागून शिक्षणाचा प्रसार मागसलेल्या वर्गांत केला पाहिजे, सारांश समाजांत एकी झाली पाहिजे' अशाप्रकारें त्यांच्या पत्राचें ध्येय होतें. त्यांस छापखाना चालविण्याकरितां व पत्राची व्यवस्था ठेवण्याकरितां कोणातरी तरुणाची जरूर होती. मला हें वर्तमान समजतांच मी त्यांची भेट घेतली, व मनांत घोळत असलेला विचार त्यांस कळविला. तो त्यांस पसंत पडला; आणि आपलें अरण्यपंडित पत्र फुकट छापून द्यावें, ह्या अटीवर त्यांनीं आपला छापखाना मला चालवावयास दिला. छापखान्याचें साधन हातीं येतांच आम्ही 'सुष्टिदर्पण' या नांवाचें एक लहानसें साप्ताहिक पत्र सुरू केलें. ह्याच सुमारास साहेबांच्या कृपेनें वडील बंधूची नेमणूक गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेसमध्यें फोरमनच्या जागीं होऊन त्यांस ६० रुपये पगार मिळूं लागला.

सुष्टिदर्पण पत्राचा जन्म हाच आमचा स्वतंत्र उद्योगाचा पाया झाला. पुढें दीनबंधु पत्राच्या व्यवस्थापक मंडळांत कांहीं मतभेद होऊन कांहीं मंडळी त्यापासून वेगळी पडली आणि शेतकऱ्यांचा कैवारी या नांवानें स्वतंत्र पत्र काढण्याचें ठरलें. या मंडळीस कोणीतरी होतकरू मनुष्य पाहिजे होता. त्यांनीं आम्हास आपणांत घेतलें, आणि कै. रामजी संतुजी आवटे यांच्या नांवानें डेक्लेरेशन करून तें पत्र सुरू झालें. शेतकऱ्यांच्या व कामगारांच्या वाजवी अडचणी सरकारच्या नजरेस आणून त्यांची दाद लावावयाची, व त्यांच्यांत शिक्षणाचा प्रसार करावयाचा, अशाप्रकारें पत्राचें ध्येय आखलें होतें, व त्याचें मुख्य संपादकत्व कै. माधवराव रोकडे यांजकडे सोंपलें होतें. हे कै. रोकडे पायानें अधु होते, परंतु त्यांची मराठी भाषा व वक्तृत्व फारच परिणामकारक असे. शिवाय त्यांस शेतकऱ्यांच्या परिस्थितीचा चांगला अनुभव असल्यामुळें, थोडयाच अवधींत पत्राची भरभराट चांगली झाली. कै. रोकडे हे स्वतः शिक्षक असून शिवाय विद्याव्यासंगी असल्यामुळें यांच्या सहवासानें माझीही मराठी भाषेंत बरीच प्रगति झाली. कारण ते जरी मुख्य लेख लिहीत असत, तथापि दुय्यम संपादक म्हणून सर्व काम मलाच करावें लागत असे. क. आवटे यांच्या नांवानें जरी पत्राचें डिक्लेरेशन होतें, तथापि ते एज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यांत नोकरीस असल्यामुळें, शिवाय त्यांस लेखनाचा व्यासंग नसल्यामुळें, लेखनविषयाकडे ते सहसा पहात नसत.

सन १८८४ सालीं श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या हातीं राज्याचीं सूत्रें आलीं; व त्यांनीं आपल्या राज्यांत एक एक सुधारणा करण्याचा उपक्रम सुरू केला. बडोदें राज्यांत त्यावेळीं एकहि वर्तमानपत्र नव्हतें. ही उणीव भरून काढावी असें महाराजांच्या मनांत आलें. त्यावेळीं डाक्तर शिवापा म्हणून महाराजांचे खासगी डाक्तर होते. त्यांनीं शेतकऱ्यांचे कैवारी पत्राच्या मालकांचें नांव सूचविलें. महाराजांस तें नांव पसंत पडलें. त्यांनीं कै. आवटे यांस बोलावून घेतलें, व बडोदें राज्यांत पत्र सुरू करण्यास सांगितलें. शिवाय सुरुवातीस कांहीं द्रव्यसाह्यही केलें. श्रीमंताच्या आज्ञेप्रमाणें कै. आवटे यांनीं बडोद्यास जाऊन 'बडोदावत्सल' या नांवाचें साप्ताहिक पत्र सुरू केलें. श्रीमंतांच्या मदतीवर एक वर्ष ह्या पत्रानें चांगला टिकाव धरला, परंतु साठवलेलें पाणी जसें फार दिवस पुरत नाहीं, त्याप्रमाणें त्याची स्थिति

झाली. शेवटीं मुंबईंतील छापखाना बंद करून दोघांनीं एकत्र काम करावें असें ठरलें. त्याप्रमाणें सन १८८५ सालांत आमचें उड्डाण मुंबई शहरांतून एकदम श्रीमंत गायकवाड सरकारच्या राजधानींत झालें. त्यावेळीं माझ्या वयास नुकतेंच २२ वें वर्ष लागलें होतें. ज्येष्ठबंधु नारायणराव गोसावी होऊन घरांतून निघून गेले होते. त्यांचें कुटुंबही नुकतेंच स्वर्गस्थ झालें होतें; आणि दुसरे वडील बंधु नोकरी व्यतिरिक्त संसारांतील इतर गोष्टींकडे फारसें लक्ष देत नव्हते. अशा परिस्थितीमुळें संसारांतील लहान मोठया सर्वच गोष्टींकडे मला लक्ष पुरवावें लागत असे. अर्थात् बडोद्यास जाण्याचें ठरतांच, मातोश्री बरोबर बंधूचें कुटुंब, त्यांचीं दोन लहान मुलें आणि स्वतःचे कुटुंब, अशा प्रकारें कुटुंबांतील सर्व मंडळींसह मला जाणें भाग पडलें. म्हणजे ह्यावेळीं उद्योग आणि प्रपंच अशा दोन्ही गोष्टींची जबाबदारी शिरावर आली.

श्रीमंत महाराज सरकारांचें आमच्या नवीन उद्योगाकडे पूर्ण लक्ष होतें. ते हस्तेंपरहस्तें अधिकारी वर्गास सांगून व सरक्युलरें वगैरे काढून शक्य तितकें साह्य करीत असत. परंतु संस्थानांतील भेदाभेदाच्या वातावरणामुळें, त्याचा फारसा उपयोग होत नसे. तशांत गुजराती व दाक्षिणी आणि ब्राह्मण व मराठे, अशा प्रकारें जातीभेदांचें प्राबल्य बरेंच असल्यामुळें, संस्थानी रीतिरिवाजास सर्वस्वी अनभिज्ञ अशा आम्हां मुंबईकरांस ह्या गोष्टी बऱ्याच जाचक होऊं लागल्या. याचा परिणाम असा झाला कीं, थोडयाच अवधींत आमची स्थिति कर्जबाजारी झाली. बडोद्यास राहिल्यानंतर ही परिस्थिति चांगली लक्षांत आली. देशकालवर्तमानास अनुसरून जर आपण येथें वागलों नाहीं, तर येथें निभाव लागणार नाहीं, असें जाणून मुंबईंतील स्वातंत्र्याचे विचार सोडून दिले, व संस्थानी वातावरणास अनुसरून वागण्याचें ठरविलें. अधिकारी मंडळींवर टीका न करितां प्रसंग पाहून त्यांची प्रशंसा करावयाची, त्यांच्या भेटी घ्यावयाच्या, त्यांजबरोबर मिळूनमिसळून वागावयाचें, कांहींनाकांहीं समारंभाच्या निमित्तानें त्यांस पानसुपारीस बोलावून त्यांचा गौरव करावयाचा, असा क्रम सुरू केला. त्याचा परिणाम असा झाला कीं, जे अधिकारी शत्रुत्वाच्या दृष्टीनें पहात असत तेच मित्र बनले. त्यामुळें पत्राचा खप वाढला, सरकारी जाहिराती मिळूं लागल्या आणि छापखान्यास कामही पोटभर मिळूं लागलें. अधिकारी वर्ग सलोख्यानें वागूं लागतांच त्यांजबरोबर सुधारणेसंबंधानें वाटाघाट करण्यास पुष्कळ वाव मिळाली. या वेळीं राज्यास लागणारे नमुने प्रत्येक अधिकारी आपल्या इच्छेप्रमाणें आपल्यापुरतेच स्वतंत्र छापून घेत असत, त्यामुळें खर्च फार होत असे ही गोष्ट आम्ही त्यांच्या लक्षांत आणली, आणि राज्यास लागणारे सर्व नमुने सारखे ठरवून ते एकत्र छापल्यास पुष्कळ बचत राहूं शकेल हें तत्व त्यांस पटविलें. त्यामुळें सरकारचा हजारों रुपयांचा फायदा होऊन छापखान्यासही भरपूर काम मिळालें. अशा प्रकारें वातावरण बदलल्यामुळें थोडेच दिवसांत बिघडलेली घडी नीट व्यवस्थेशीर बसली. ती इतकी कीं, कोणतेंही महत्वाचें अथवा जरूरीचें काम निघालें असतां अधिकारी वर्ग आमचें मत विचारल्यावाचून त्याची विल्हेवाट लावीत नसत. एक वेळ तर असें

झालें कीं, श्रीमंतांची स्वारी विलायतेस गेलेली होती, आणि अकौंटंट जनरल म्हणून बाबू रजनीनाथ यांची नुकतीच योजना झाली होती. बाबूजींनीं अधिकार घेतांच अकौंट खात्याची जुनी हिशोबी पद्धत सर्वस्वी बदलली, आणि नवीन नमुने तयार केले व नवीन सालारंभापासूनच त्यांचा अमल करण्याचा हुकूम सोडला. श्रीमंत गायकवाड सरकारचें हिशेबी साल आगष्टपासून सुरू होतें. बाबूजींचा हुकूम जुलैच्या पहिल्या आठवड्यांत बाहेर पडला, आणि विलायतेहूनहि श्रीमंतांची तार आली कीं, बाबूजींच्या हुकमाप्रमाणें अंमल झाला पाहिजे. परंतु नवीन पद्धतीचे पांचशें नमुन्यांचें काम दोन आठवड्यांत छापून व पुस्तकें बांधून तयार होणें अशक्य होतें. बडोद्यांतील सरकारी छापखान्यानें तर तें काम सहा महिन्यांतहि होणार नाहीं असा शेरा मारला. एवढा मोठा सरकारी छापखाना, त्यानें जर असा शेरा मारला, तर गांवांतील लहान छापखान्यांकडून हें काम होणें सर्वस्वी अशक्यच, असें कौन्सलांत ठरलें; आणि दोन ऑफिसरांनीं ताबडतोब मुंबईस जावें, व मागेल तो भाव देऊन टाईम्स आफ इंडिया छापखान्यांतून काम करवून आणावें, असें ठरलें. परंतु मुंबईस जाण्यापूर्वी एकदां आमचें मत विचारावें म्हणून आम्हांस बोलावून घेतलें, आणि हें सर्व काम १० दिवसांत करूं शकाल कां, म्हणून प्रश्न विचारला. आम्ही सर्व नमुने चाळून बारकाईनें तपासून पाहिलें, तों ३५ नमुने तयार केले असतां त्यावरच किंचित् फेरफार केल्यानें काम भागेल असें दिसून आलें. त्याबरोबर काम करून देण्याचें आम्ही कबूल केलें. जें काम ६ महिन्यांत होणार नाहीं, असा सरकारी छापखान्यानें शेरा दिला, तेंच काम १० दिवसांत करून देण्याचें आम्ही कबूल करतांच सर्वांस आश्चर्य वाटलें. त्यांनीं करार लिहून मागितला, आणि मुदतींत काम न झाल्यास रोज पांचशें रुपयेप्रमाणें नुकसान भरून घेऊं, अशी अट घातली. आम्ही सर्व अटी कबूल केल्या, व करारावर सही करून काम घेऊन घरीं आलों, आणि घडलेली सर्व हकीकत व झालेला करार आमचे भागीदार कै. आवटे यांस दाखविला. कामाचें बंडल, दहा दिवसांची मुदत आणि करारांतील अटी, इत्यादि पहातांच आवटे साहेबांचें मन अस्वस्थ झालें. ते म्हणाले, हें काम मुदतींत होणें शक्य नाहीं. अर्थात् या कामामुळें सर्वस्व जाणार हें निश्चित आहे. मी याचा जबाबदार नाहीं. तुला वाटेल तें तूं कर. असें म्हणून ते त्याच रात्रीच्या गाडीनें मुंबईस निघून आले. धाडस करून घेतलेल्या कामांत प्रत्यक्ष भागदारानेंच अंग काढून घेतल्यामुळें मला फार वाईट वाटलें. पण काय करणार! त्यावेळीं काम मुदतींत पुरें करून देण्याशिवाय अन्य मार्गच नव्हता. संकटसमयीं मनुष्यास दुप्पट धैर्य येतें असें म्हणतात, त्याप्रमाणें यावेळीं मनाची स्थिति झाली. आणि आठ दिवस झोंप किंवा अन्न यांस फारकत देऊन व नुसत्या दूध—कॉफीवर राहून मुदतींत काम पुरें करून दिलें. मुदतींत काम तयार करून दिल्यामुळें त्यावेळचे दिवाण मणीभाई फार खुश झाले. त्यांनीं ५०० रुपये इनाम म्हणून दिले, आणि एक अत्यंत प्रशंसापर असें शिफारसपत्रहि वर दिलें. परंतु या गोष्टीचा परिणाम आमचे भागदार कै. आवटे यांच्या मनावर वेगळ्याच तऱ्हेनें

झाला. आतांपर्यंत बंधुप्रेमानें केलेल्या व्यवहारांत कलीनें प्रवेश केला. यावेळीं सर्व कर्ज फिटून रोकड शिल्लक ७० हजार रुपये होती, व ती सर्व मुंबईच्या पेढीवर कै. आवटे यांच्या नांवानें जमा होती. जोंपर्यंत द्रव्य नव्हतें, तों पर्यंत उभयतांत अत्यंत प्रेम होतें. परंतु लक्ष्मीचा प्रवेश होतांच पदोपदीं मतभेद होऊं लागला. शेवटीं यापुढें भागदारीचा संबंध ठेवून काम करणें असह्य झाल्यामुळें आम्ही आपलें अंग काढून घेतलें. परंतु हिशेब करण्यास व भागाची वाटणी देण्यास कै. आवटे कबूल होईनात. तेव्हां उभयताच्या परिचयाची अशी चार संभावीत मंडळी मध्यें पडली. त्यांनीं सर्व हिशेब तपासले आणि कै. आवटे यांनीं छापखाना व रोख ३५ हजार रुपये घ्यावे, आणि रा यंदे यांस फक्त ३५हजार रुपये रोख द्यावेत, असा निर्णय दिला. परंतु हा निर्णय कै. आवटे कबूल करीनात. तेव्हां त्यांजवर दिवाणींत दावा करावा, असें मंडळीनें आम्हांस सांगितलें. परंतु ही गोष्ट आम्हास पसंत पडली नाहीं. ज्या ठिकाणीं आम्ही बंधूप्रमाणें वागलों, ज्यांस आपले वडील बंधू प्रमाणें मानीत आलों, त्यांज-विरुद्ध कोर्टांत दावा करणें, ही गोष्ट मनास पटेना. झालेल्या सर्व व्यवहारावर आम्ही पाणी सोडलें, आणि जगांत आजच आपण नवे आलों असें मानून चार मित्र-मंडळीच्या सहाय्यानें नवीन छापखान्याची स्थापना केली; व श्रीमंत महाराज सरकारांच्या संमत्तीनें ' श्रीसयाजी विजय ' या नावानें एक साप्ताहिक पत्र सुरू केलें.

निरिच्छ वृत्तीनें राहणाऱ्या माणसास परमेश्वर कधीं कमी पडूं देत नाहीं, असें जें म्हणतात, त्याचा अनुभव यावेळीं आम्हाला प्रत्यक्ष आला. हां हां म्हणतां वर्षातच छापखान्याची व वर्तमानपत्राची भरभराट इतकी झाली कीं, गेलेल्या रकमेच्या द्विगुणीत प्राप्ती आम्हांस झाली. अधिकारी वर्गाचें प्रेम वाढले आणि हा एक गरीब माणूस नागावला गेला असें म्हणून प्रत्येकजण सहानुभूतीनें पाहूं लागला. याच्या उलट बडोदा-वत्सलकडे जो तो तिरस्कार दृष्टीनें पाहूं लागला. त्यामुळे दोन वर्षांतच त्यास आपला संसार आटोपणें भाग झालें ! धंद्याच्या दृष्टीनें जरी परस्परांवर वेगवेगळा प्रसंग होता, तथापि मी त्यांच्या स्नेहांत किंचितही कमीपणा पडूं दिला नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांस वेळोवेळीं जेव्हां जेव्हां अडचणी येत गेल्या, त्यात्यावेळीं बंधुभावानें साह्य केलें. लक्ष्मी ही नेहमी चंचल असते. तिच्या सहवासानें मनुष्यास एक प्रकारचा उन्माद चढतो. आणि मनुष्य उन्मत्त झाला कीं ती चटकन अदृश्य होते. म्हणून सत्पुरुष तिच्या पासून दूरच राहण्याचा नेहमीं प्रयत्न करीत असतात. असो.

'राजा कालस्य कारणं' या वचनाप्रमाणें श्रीमंत सयाजीराव महाराज यांस विद्येची गोडी विशेष असल्यामुळें, बडोदें राज्यांत सर्वत्र शाळा, वचनालयें, सभा, व्याख्यानें यांचा झपाट्यानें प्रसार होऊं लागला. स्वतः श्रीमंतांनीं एक स्वतंत्र खातें काढून त्या द्वारें विविध विषयांवरील ग्रंथांच्या प्रकाशनाचें कार्य सुरू केलें. याचवेळीं बडोद्यांत एकत्र जमलेल्या साक्षर व विद्वान मंडळींनीं सहविचारणी सभेची स्थापना केली; आणि प्रत्येक सभासदानें सवडीप्रमाणें एखाद्या विषयावर लेख, पुस्तक, कविता, जें योग्य वाटेल तें लिहून आणून सभेपुढें वाचावें असें ठरविलें. सभेचे अध्यक्ष श्रीमंत

संपतराव गायकवाड आणि चिटणीस कै. शंकर मोरो रानडे व कै. भानु केशव गांग-नाईक अशी कार्यकारी मंडळीची योजना झाली. सभासदांपैकीं बरीच मंडळी उत्साहि लेखक वर्गापैकीं असल्यामुळें एका वर्षांत वेगवेगळ्या विषयावर दहाबारा ग्रंथ सभेपुढें तयार होऊन आले. ग्रंथ तयार झाले, पण पुढें त्याचें प्रकाशन कसें करावें, हा प्रश्न सभेपुढें उभा राहिला. छापणावळीचा खर्च झेंपण्याइतका फंड मंडळीजवळ नव्हता. तेव्हां ग्रंथप्रकाशनाचें कार्य आम्ही स्वतः शिरावर घ्यावें, व ग्रंथ तपासण्याचें व ग्रंथाची निवड करण्याचें काम मंडळीनें करावें, असें ठरलें. अशाप्रकारें सहविचारिणी सभेच्या विद्यमानें ग्रंथसंपादक व ग्रंथप्रकाशक मंडळीची सुरूवात झाली. प्रथमतः कै नागेश विनायक बापट यांनीं लिहिलेली 'पानिपतची मोहीम' ही ऐतिहासिक कादंबरी, कै. डॉ. धुरंधर यांचें ' आरोग्यशास्त्र ', कै. रामचंद्र आबाजी राजे याचें 'कृषिकर्मविद्या' आणि श्रीयुत गोविंदराव सरदेसाई याचें ' मुसलमानी रियासत ' याप्रमाणें वेगवेगळ्या चार स्वतंत्र विषयांवरील चार ग्रंथांचें प्रकाशन करण्यांत आलें. याच वेळीं मंडळीच्या नियमांस अनुसरून ' वीरमती ' या नांवाची एक ऐतिहासिक कादंबरी हिंदराजस्था-नांतील एका कथानकास अनुसरून घाईंघाईनें लिहून आम्ही मंडळापुढें वाचून दाखविली, आणि श्रीसयाजीविजय पत्राच्या ग्राहकांस भेट म्हणून छापून वाटली. कादंबरी लिहिण्याचा हा प्रथमच प्रसंग होता, व लोकांस ती कितपत पसंत पडेल अशी शंका होती. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्या कादंबरीच्या लागोपाठ चार आवृत्या निघाल्या. इतकेंच नव्हे, तर गुजराथी व हिंदि भाषेंत तिचीं भाषांतरेंहि झालीं. कै० नेवाळकर यांनीं ती नाटकरूपानें संगीतात बसाविली व बेळगांवकर स्त्रीसं-गीत मंडळीनें त्या नाटकाचे अनेक प्रयोग केले. आपण सहज लावलेल्या वृक्षास अशीं गोड फळें आल्याचें पाहून मनास एक प्रकारचें समाधान वाटलें. असो.

अधिकारी वर्गापैकीं दिवाणापासून शिरस्तेदारापर्यंत सर्वांचा सहानुभूति, आणि श्रीमंतांचें प्रोत्साहन, अशा दोन्ही गोष्टी अनुकूल झाल्यामुळें, प्रत्येक उत्साहि अधिकारी सयाजीविजयपत्राकरितां लेख लिहूं लागला, व मुख्य संपादकाचें काम कै. रानडे यांनीं हौसेनें अंगावर घेतलें. अशा परिस्थितिमुळें थोड्याच अवधींत त्याचा खप दहा हजारांवर गेला. प्रथम हें पत्र साप्ताहिक होतें, व इंग्रजी, मराठी आणि गुजराथी, अशा तीन भाषेंत निघत असे, तें द्विसाप्ताहिक केलें व मराठी व गुजराती असे त्याचे वेगवेगळे भाग करण्यांत आले. वर्तमानपत्राची भरभराट आणि छापखान्यांत सरकारी कामाचीहि विपुलता, असा दोहीं बाजूनें जोर झाल्यामुळें दरमहा हजारों रुपयांची प्राप्ति होऊं लागली, व त्यामुळें ग्रंथप्रकाशनाचें काम नेटानें चालविण्यास अधीक उमेद आली. ग्रंथकारास ग्रंथाच्या स्वामित्वाबद्दल योग्य पारितोषक देण्याचा नियम केला, आणि दरसाल दोन, तीन, चार, अशा प्रमाणानें ग्रंथप्रकाशनाचें काम झपाट्यानें सुरू झालें. आणि आज मितीस लहान मोठे मिळून सुमारें १५१ वर ग्रंथ प्रकाशीत झाले.

अशा प्रकारें हें वाङ्मयप्रसाराचें काम जोरानें चालू असतांच बडोद्याहून पुन्हा मुंबईस येण्याचा प्रसंग घडून आला. तो असा कीं, इंदुप्रकाश छापखान्याचे त्यावेळचे

मालक कै. सखारामपंत पंडित दिवंगत झाल्यामुळें, आणि त्यांच्या मुलांत कारखाना व वर्तमानपत्र चालविण्याची कर्तबगारी नसल्यामुळें, थोड्याच अवधींत छापखाना डबघाईस येऊन इंदुप्रकाश पत्र बंद पडलें. ह्या पत्राचे मूळ उत्पादक कै. न्या. रानडे, कै. विष्णु शास्त्री पंडित व कै. बापूसाहेब गाडगीळ हे होते. आपण लावलेलें हें झाड अशा प्रकारें कोमेजून जाणें बरें नाहीं, म्हणून बापूसाहेब गाडगीळ यांनीं कै. सर भालचंद्र व न्यायमूर्ति रानडे यांच्या विचारानें हें इंदुप्रकाशचें काम आमच्याकडे सोंपवावें, असें ठरविलें. बापुसाहेब गाडगीळ हे बडोद्यास नायब दिवाणाच्या हुद्यावर असल्यामुळें त्यांचा व आमचा विशेष संबंध जडला होता. अर्थात् त्यांचा शब्द आम्हांस मोडवेना. इंदुप्रकाशासारखें एक जुनें भारदस्त पत्र पुन्हा चालू व्हावें, अशी इच्छा श्रीमंतांसही होती. शिवाय कै. रानडे व कै. विष्णुपंत भाटवडेकर यांचेंहि आग्रहाचें बोलावणें चालू होतें. अशा परिस्थितीमुळें इदुप्रकाशचें पुनर्जीवन करणें हें काम विशेष महत्वाचें वाटलें, आणि बडोद्यातील छापखान्याची व वर्तमानपत्रांची व्यवस्था लावून आम्हीं मुंबईस आलों. आमचे वडील बंधु माधवराव हे गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेसमध्यें नोकरीस होते, त्यांस पेन्शन घेऊन बोलावून घेतलें, व त्यांजकडे ग्रंथप्रकाशक मंडळीच्या किताबखान्याची व्यवस्था सोंपून दिली. आणि गुजराती सयाजी विजयाची व छापखान्याची व्यवस्था त्यावेळीं गुजराती भागाचे संपादक म्हणून काम करीत असलेले श्रीयुत माणेकलाल अंबाराम दाक्तर यांस सोंपवून दिली. याप्रमाणें बडोद्यांतील कामांची व्यवस्था लावल्यानंतर १८९९ त आम्ही बडोद्याहून मुंबईस आलों, व इंदुप्रकाश छापखाना आणि वर्तमानपत्र यांची जबाबदारी शिरावर घेतली. पुढें दोन वर्षांच्या अवधींतच न्या. रानडे व त्यांच्या मागून बापूसाहेब गाडगीळ व श्रीयुत वासुदेव जगन्नाथ कीर्तीकर असे तीन पुरस्कर्ते नाहींसे झाले. परंतु कै. विष्णुपंत भाटवडेकर यांचा उत्साह दांडगा असल्यामुळें, प्रो. दामोदर गणेश पाध्ये व श्रीयुत बळवंत रामकृष्ण मणेरीकर ह्या दोन उत्साहि विद्वानांस सामील करून, पाध्ये, धंदे, मणेरीकर, अशा तिघांच्या नेतृत्वाखालीं इंदुविजय कंपनीची स्थापना झाली, व इंदुप्रकाश पत्र दैनिक करण्यांत आलें. ह्या दरम्यानच्या काळांत माझ्या प्रिय मातोश्रींनीं इहलोकचा त्याग केला. वडिलाप्रमाणेंच मरतेसमयीं त्यांनीं मला जवळ बोलावून म्हटलें, ' दामू तूं अनेक पुस्तकें छापून प्रसिद्ध केलीस, परंतु तुझ्या वडिलांचा आवडता ग्रंथ भागवत, तो मात्र प्रसिद्ध केला नाहींस.' मी म्हटलें; 'आई, तूं काळजी करूं नको, भागवत ग्रंथाचें प्रकाशन केल्यावांचून मी हा देह पतन होऊं देणार नाहीं.'

याच वेळीं ( सन १९०८ मध्यें ) मुंबई सरकारांनीं हार्निमन साहेबांची उचलबांगडी केल्यामुळें, म. फेरोजशहा मेथा यांनीं स्थापन केलेलें क्रॉनिकल पत्र बंद पडलें होतें. आपल्या मताचें व आपल्या बाजूचें एक तरी पत्र असावें, अशी मर्हुम फेरोजशहा यांची उत्कट इच्छा होती. त्यांनीं प्रो. पाध्ये यांस इंग्रजी दैनिकपत्र काढण्याविषयीं आग्रहाची सूचना केली. त्यावेळची राजकीय परिस्थिति, राष्ट्रीय सभेनें आंखलेले ध्येय, टाईम्स पत्राचें विरुद्ध वर्तन, इत्यादि प्रसंग एकवटलेले असल्यामुळें

प्रागतीक मताचें एकादें इंग्रजी दैनिक असावें, अशाविषयीं अनेकांची मतें अनुकूल पडलीं, आणि ' धी इंदु ऑफ बॉम्बे ' या नांवानें एक इंग्रजी दैनिकपत्र पाध्ये, यंदे, मणेरीकर, याच्या विद्यमानें सुरू करण्यांत आलें. टाईम्स व ॲडव्होकेट हीं दोन्ही इंग्रजी दैनिकपत्रें त्यावेळीं जोरांत होतीं. त्यांच्याशीं प्रतिस्पर्धा करण्यास असावें तितकें पुरेसें भांडवल नसल्यामुळें एक वर्षांतच आम्हांस तें पत्र बंद करणें भाग पडलें. ह्या इंग्रजी दैनिकामुळें कर्जाचा बोजा पुष्कळच वाढला. त्याचा परिणाम असा झाला कीं, शेवटीं सर्व बोजा एकट्यास शिरावर घेऊन बिघडलेली घडी पुन्हा नीट बसविण्याचा प्रसंग आला. ही घडी बसविण्यास पुष्कळच परिश्रम करावे लागले त्यामुळें प्रकृतीवर इतका परिणाम झाला कीं, कांहीं दिवस विश्रांति घेणेंच भाग पडलें. त्यावेळीं नॅशनलडिमॉक्राट कंपनी नुकतीच अस्तित्वांत आलेली होती; तिला छापखाना व दोन वर्तमानपत्रें यांची मालकी सोंपवून मी विश्रांतिकरितां नाशकास जाऊन राहिलों. ही गोष्ट सन १९२१ मध्यें घडून आली. यानंतर दोन वर्षांच्या अवधींतच आमची एक आवडती कन्या व तिच्या मागोमाग कुटुंब अशा प्रकारें कुटुंबांतील दोन माणसें दिवंगत झालीं. पुरस्कर्त्या मंडळीपैकीं श्रीयुत विष्णुपंत भाटवडेकर पूर्वींच ह्या जगास सोडून गेले होते, परंतु डाक्तर साहेबांमुळे त्यांचा वियोग फारसा भासला नव्हता. परंतु त्यानींही इहलोकचा त्याग केल्यामुळें मनास अधिकच उद्विग्नता प्राप्त झाली.

नाशकास जाऊन राहिल्यामुळें प्रकृतींत बराच फरक पडला. परंतु मध्यंतरीचा जो चार वर्षांचा काळ गेला, तेवढ्या अवधींत भयंकर उलटापालट घडून आली. डिमॉक्राट कंपनीचा सर्व मालकीहक्क भांडवलाचे जोरावर श्रीयुत रणछोडदास लोटवाला यांच्या हातांत गेला. ते कम्युनिस्ट मताचे पुरस्कर्ते असल्यामुळें त्यांनीं इंदुप्रकाशचें प्रागतिक ध्येय एकदम बदलून टाकलें; व मेसर्स डांगे, जोगळेकर या तरूण मंडळीस हाताशीं घेऊन सोशालिस्ट नावानें स्वतंत्र वर्तमानपत्र व त्याच विषयावरील पुस्तकें प्रसिद्ध करण्याचा धडाका सुरू केला; आणि छापखान्याची व इंदुप्रकाशची व्यवस्था कांहीं अटीवर रा. शेकदार यांस सोंपली. सोशालिस्ट मताचें पत्र व पुस्तकें निघूं लागल्यामुळें सी. आय. डी. खात्याचीं माणसें वारंवार इंदुप्रकाश छापखान्यांत येऊं लागली. तेव्हां श्रीयुत लोटवाले यांनीं एका लहानशा भागांत कांहीं सामान ठेवून त्याला लेबरप्रेस असें नांव दिलें, व डांगे–जोगळेकर यांच्या नांवानें सर्व व्यवहार चालविला; आणि इंदुप्रकाशपत्र नामशेष करून लोकमान्यपत्रांत समील केलें. शिवाय सयाजीविजय व साप्ताहिक इंदुप्रकाशपत्र बंद करून इंदुप्रकाश छापखाना विकण्याची जाहिरात फडकावली. हा एकंदर प्रकार पहातांच मनास जबरदस्त धक्का बसला. जी संस्था जीवंत ठेवण्याकरितां कै. न्या. रानडे यांनीं आपणास आग्रहानें बोलावलें, व ज्या संस्थेकरितां आपण बडोद्याहून मुंबईस आलों; ती संस्था आपण जीवंत असतां आपल्या डोळ्यांसमोर नष्ट होणें, ही गोष्ट मनास फारच लागली. आणि श्रीयुत लोटवाले यांजबरोबर करार करून इंदुप्रकाश छापखाना व सयाजीविजयासह इंदुप्रकाशची साप्ताहिकआवृत्ती यांची मालकी परत आपणाकडे घेतली. कारण एवढ्या

दोनच संस्था त्यावेळीं शिल्लक राहिल्या होत्या. परंतु यापुढें वर्तमानपत्राचें काम मीं करूंच नये, अशी परमेश्वरीच इच्छा असल्यामुळें, पूर्वापार चालत आलेल्या पद्धतीप्रमाणें 'श्रीसयाजीविजय आणि साप्ताहिक इंदुप्रकाश' असा मथळा देऊन ह्या साप्ताहिक पत्राचा पहिला अंक अर्धामुर्धा छापतो न छापतो तोंच, श्री लोटवाले यांच्याच संमती-पत्रानें लोकमान्य पब्लिशिंग कंपनीनें इंदुप्रकाश नांवास हरकत घेतली, आणि हायकोर्टाकडून इंजक्शन मिळवून पत्र बंद करविलें. ज्याच्याकरितां आपल्या आयुष्यांतील अर्धा अधिक भाग खर्ची पडला, तीं 'सयाजी विजय' आणि 'इंदुप्रकाश' हीं दोन्हीं नांवें, निदान आपल्या हयातींत तरी जिवंत रहावींत, ह्या उत्कट इच्छेनें पुन्हां हा बोजा शिरावर घेतला असतां, 'रणछोड' नांव धारण करणाऱ्या मालकानेंच ऐनवेळीं असा घोटाळा केला, तेव्हां यापुढें आपण वतमानपत्राचा व्यवसाय करूं नये अशी परमेश्वराचीच इच्छा आहे असें समजून मनाचें समाधान करून घेतलें, आणि वडिलांच्या इच्छेप्रमाणें व मातोश्रीस दिलेल्या वचनाप्रमाणें श्रीमद्भागवत ग्रंथाच्या प्रकाशनाचें काम हातीं घेतलें.

श्रीमद्भागवत हा ग्रंथ एकंदर पुराणग्रंथात फार महत्वाचा आहे. आणि खरोखर त्याप्रमाणेंच तो आहे यांत तिलमात्र संशय नाहीं. प्राकृत संसारी जीवास संसारांतील दु:खमय समुद्रांतून पार नेणारी ती एक नौकाच आहे. आजपर्यंत या ग्रंथाचें प्रकाशन, भाषांतर वगैरे रूपानें पूर्वीं झालें होतें, परंतु त्यांतल्यात्यांत पन्नास वर्षांपूर्वीं कै. जानोरीकर यांनीं केलेलें प्रकाशन विशेष महत्वाचें होतें, व तें मला फार आवडलें होतें. तो ग्रंथ गेल्या तीस चाळीस वर्षांत सर्वस्वी दुर्मिळ झाला आहे. तेव्हां आपणास जो प्रयत्न करावयाचा तो विशेष सुधारणेनें, बालापासून वृद्धापर्यंत आणि अज्ञानापासून ज्ञानवंतापर्यंत सर्वांस त्याचा रसास्वाद सुलभतेनें चाखता येईल अशा व्यापक दृष्टीनें करावा, असें मनानें ठरविलें; आणि चार संस्कृतज्ञ शास्त्री मंडळाच्या सहायानें शके १८४७ च्या कार्तिक शुद्ध ११ स कार्यास आरंभ केला. हा प्रयत्न म्हणजे टिटवीनें समुद्राचें शोषण करण्यासारखाच असल्यामुळें, हें काम कसें पार पडणार याबद्दल कांहीं मित्रांनीं साशंक आश्चर्य प्रगट केलें ! आणि खरोखर तें खरें होतें. कारण एकतर हा ग्रंथच इतका कठीण आहे कीं, त्यांतील काहीं श्लोकांचा अर्थ चांगल्या विद्वानासहि लावण्यास जड पडतें ! अशा स्थितींत प्रत्येक श्लोकाचीं अन्वयासह पदें पाडून त्या पदांचा अर्थ विशद करणें, हें काम सोपें नव्हतें. शिवाय अशा सर्वमान्य धर्मग्रंथाचें प्रकाशन एकाच अंधश्रद्धेनें न होतां चिकित्सक दृष्टीनें व्हावें अशी उत्कट इच्छा होती. त्यामुळें भागवतकाराचें व भागवतग्रंथाचें खरें रहस्य विशद करून सांगण्यास तशाच मर्मज्ञ लेखकांच्या सहायाची विशेष जरूर होती.

दुसरी गोष्ट ही कीं, हल्लीच्या काळांत या ग्रंथास लोकाश्रय कसा मिळणार व काम कसें पार पाडणार, याबद्दल पुष्कळांस शंका होती. तीहि कांहीं खोटी नव्हती. परंतु ह्या सर्व अडचणींकडे लक्ष न देतां, किंवा त्यासंबंधानें काडीमात्र विचार न करतां, कताकर-

विता प्रभु समर्थ आहे, असें म्हणून अंतर्यामीं स्फुरण पावलेली इच्छारूपी नौका भागवतकथारूप समुद्रांत लोटून दिली. परंतु त्याबरोबर ह्या संसाररूपी समुद्रांत इतकीं संकटें उत्पन्न झालीं कीं, ही नौका ह्या तुफानांत आतां खास बुडणार असें क्षणोक्षणीं वाटूं लागलें. परंतु कौतुक करण्यासारखी गोष्ट ही कीं, तितक्याहि प्रसंगांतून ही निश्चयरूपी नौका त्या भगवंतानें उचलून धरून पैलतीरास नेऊन पोंचविली! भगवंतावर दृढ निश्चय ठेवला म्हणजे तो सर्वसमर्थ भगवान् आपल्या भक्तास कांहीं कमी पडूं देत नाहीं, असें भागवतांत जें स्थलोस्थलीं सांगितलें आहे, त्याचा अनुभव आम्हांस यावेळीं प्रत्यक्ष आला. आणि त्या दयाघन परमेश्वराच्याच कृपेनें आज श्रीमद्भागवताचा हा शेवटचा कळसरूपी भाग भागवतप्रेमी वाचकांच्या सेवेंत सादर करण्यास आम्ही समर्थ झालों.

श्रीमद्भागवत ग्रंथाच्या प्रकाशनाच्या कामीं ज्या अनेक मित्रांचें सहाय झालें, त्यांच्या नावांचा उल्लेख करणें या ठिकाणीं जरूर आहे. भाषांतर करणें व प्रुफें तपासणें इत्यादि दृष्टीनें लहानमोठ्या अशा विविध शास्त्रीमंडळींचें सहाय्य या कामीं आम्हांस झालें आहे, परंतु त्यांतल्यात्यांत वे. शा. सं. नरहर शास्त्री जोगळेकर आणि श्रीयुत केशव लक्ष्मण ओगले बी. ए, यांचा उपयोग आरंभापासून शेवटपर्यंत चांगलाच झाला, हें कळविण्यास समाधान वाटतें. श्रीमद्भागवत ग्रंथांत एकादशस्कंध तर फारच महत्वाचा आहे. त्यावरील श्रीधर स्वामींची संस्कृत टीका आणि श्री एकनाथ स्वामींची प्राकृत ओवीबद्ध टीका अत्यंत उद्बोधक आहेत. अशा महत्वाच्या स्कंधाचें काम माझे परमप्रिय आणि अत्यंत हितचिंतक मित्र प्रोफेसर चिंतामण गंगाधर भानु यांनीं मोठ्या प्रेमानें आपल्या शिरावर घेऊन ह्या चिंतामणीनें माझी चिंता दूर केली, याबद्दल मी त्यांचा फारफार ऋणी आहे. प्रो. भानु यांनीं याच प्रसंगीं साह्य केलें असें नाहीं, तर उपनिषद प्रकाशनाचें जें कार्य माझ्या हातून झालें, तें यांच्याच कृपेचें फळ आहे. अध्यात्मविषयांत प्रो. भानु यांचा व्यासंग किती दांडगा आहे, हें ज्यांनीं त्यांचा भगवद्गीतेवरील विस्तृत ग्रंथ आणि उपनिषदांवरील विवरणें वाचलीं असतील त्यांस वेगळें सांगण्याची जरूर नाहीं. असो; याचप्रमाणें या ग्रंथप्रकाशनाचे कामीं वे. शा. सं. गोडशे शास्त्री, साधले व निगळे शास्त्री, घघवे शास्त्री, भावे शास्त्री इत्यादि शास्त्री मंडळीकडून आणि विशेषतः दहाव्या स्कंधाचे प्रसंगीं ह. भ. प. नानाबुवा बडोदेकर यांजकडून फारच सहाय्य मिळालें आहे. त्याचप्रमाणें नवाकाळ, ज्ञानप्रकाश, केसरी, महाराष्ट्र, विविधवृत्त, परिक्षक, टणत्कार सुदर्शन इत्यादि मराठी वर्तमानपत्रकारांनीं आणि टाईम्स, क्रॉनिकल, नॅशनलहेरल्ड, डेलिमेल इत्यादि इंग्रजी दैनिक पत्रांनीं वेळोवेळीं ग्रंथाची पोंच देऊन आपल्या सुंदर अभिप्रायांनीं जें प्रोत्साहन दिलें, त्याबद्दल मंडळी त्यांची फार फार आभारी आहे.

याशिवाय सर्वांत विशेष महत्वाची गोष्ट ही कीं, हें भागवत ग्रंथ प्रकाशनाचें काम यशस्वी रीतीनें पार पाडण्याचे कामीं अनेक मित्रांनीं, तसेंच भागवतप्रेमी वाचकांनीं

विविध प्रकारें साह्य देऊन वेळोवेळीं जें प्रोत्साहन दिलें तें अवर्णनीय आहे. त्या उत्साहि हितचिंतक मित्रांपैकीं, श्रीयुत न्हसिंह चिंतामण केळकर, प्रो. चिंतामण गंगाधर भानु, श्रीयुत कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर, भांडारकर रिसर्चइन्स्टिटयूटचे मुख्य संपादक डॉक्टर विष्णु सिताराम सुखटणकर व प्रो. श्रीपाद कृष्ण बेलवलकर, लोकप्रिय डॉ. रामकृष्ण हरि भडकमकर, वे. शा. सं नरहर शास्त्री गोडसे,प्रो. अश्वत्थामाचार्य गजेंद्रगडकर, वे. शा. सं. भवानीशंकर शास्त्री सुखटणकर, ब्यारिस्टर शामराव रघुनाथ तेंडोलकर, प्रो. पांडुरंग वामन काणे, भगवद्गीता व श्रीशिवाजी ग्रंथाचे कर्ते श्रीयुत कृष्णराव अर्जुन केळुसकर, मुंबई सरकारचे दिवाण ना. भास्करराव विठोजीराव जाधव, दिवाण बहादूर गणपत सदाशिव राव, प्रो. श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर, ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपाल सिताराम रामजी तावडे, माजी व्हाईस प्रिन्सिपाल श्री व्यंकटेश त्रिंबक चापेकर, नाशीकचे पेन्शनर डेप्युटी कलेक्टर रा. ब. विनायक नारायण खोपकर, गुलबुर्गा येथील वकील श्रीपाद मार्तंड अनगरकर, जळगांव येथील वकील रामचंद्र विनायक मेहरूणकर, कारवार हायस्कूलचे हेडमास्तर श्री. पुरुषोत्तम शामराव मुजूमदार, श्री.सदाशिव रामचंद्र खोडे नागपूर, श्री. गंगाधर बळवंत तळवलकर हरिगांव, श्री. विष्णुपंत पुराणिक उमरावती, श्री. रामकृष्ण सीताराम भागवत नायगांव, श्री. नरहर रघुनाथ फाटक मुंबई, श्री. अनंत पांडुरंग भाटे मुंबई, श्री. कृष्णराव जगन्नाथ थळी मुंबई, श्री रामराव बाळकृष्ण कीर्तिकर मुंबई, इत्यादि इत्यादि मित्रांच्या नांवांचा उल्लेख करून कृतज्ञता व प्रेम यानीं युक्त असे त्यांचे आभार मानल्यावाचून आमच्यानें रहावत नाहीं. रंगभूमीवरील नाटक उत्तम वठण्यास, गान व आभिनयकुशल उत्तम पात्रें व भरपूर सीनसिनरी यांची जशी आवश्यकता असते, अथवा शरीराकडून कोणतेंही महत्वाचें कार्य होण्यास जशी सर्व इंद्रियांची अनुकूलता हवी असते, त्याप्रमाणें ह्या जगाच्या रंगभूमीवर महत्वाचें कार्य करण्यास कर्तृत्ववान व प्रेमळ अशा मित्रांच्या साह्याची अत्यंत जरूर असते. कोणतेंहि कार्य, मग तें लहान असो किं मोठें असो, एकांगी होऊं शकत नाहीं. प्रत्यक्ष ब्रह्मदेवासहि तें करतां आलें नाहीं, मग मानवी प्राण्यांची कथा काय ! सारांश, आमच्या हातुन श्रीमद्भागवत ग्रंथप्रकाशनाचें जें हें कार्य, बऱ्या वाईट रीतीनें त्या सर्वशक्तिमान प्रभूनें शेवटास नेलें, तें केवळ वरील मित्रांच्या साह्यामुळेंच आम्हांस नेतां आलें. आम्ही ह्या भागवत ग्रंथप्रकाशनाचे कामीं केवळ निमित्तमात्र आहोंत.

हें भागवत ग्रंथप्रकाशनाचें काम स्वेच्छेप्रमाणें जितकें सुंदर व सुबक व्हावयास पाहिजे तितकें झालें नाहीं, याबद्दल आम्ही फार दिलगीर आहोंत. छापखान्यांतील निर्जिव टाईपांच्या चळवळीमुळें बरेच दोष राहिले आहेत. परमेश्वरकृपेनें या ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढण्याचा योग आल्यास हल्लीच्या प्रसंगीं राहिलेल्या उणिवा भरून काढण्याचा प्रयत्न अवश्य करण्यांत येईल. भागवतप्रेमी वाचकवृंद सुदाम्याच्या एकमुष्टी पोह्याप्रमाणें हें आमचें कार्य गोड करून घेतील अशी आम्हास पूर्ण उमेद आहे. तसेंच गेल्या चार

वर्षांत ह्या प्रसंगानिमित्तानें आमच्या प्रेमळ व उदार वाचकांशी पत्रव्यवहार करतांना आमच्या कचेरींतील मंडळीकडून जर कदाचित कांहीं चुका झाल्या असतील तर त्याबद्दल त्यांनी उदार अंतःकरणानें क्षमा करावी अशी आमची विनंति आहे. आम्ही हातीं घेतलेल्या या कार्यास ज्या भागवतप्रेमी मंडळींनीं, पुरस्कर्ते, आश्रयदाते, तहाहयात सभासद व सभासद अशा विविध रूपांनीं साह्य दिलें, त्यांचीं नांवें ह्या भागाचे शेवटीं दिलीं आहेत. त्या सर्व बांधवांनीं प्रोत्साहन दिल्यामुळेंच आम्हांस हें कार्य शेवटास नेतां आलें, याबद्दल आम्ही आमच्या सर्व ग्राहकांचे अत्यंत ऋणी आहोंत.

यापुढें श्रीमन्महाभारत ग्रंथाच्या प्रकाशनाचें कार्य आम्ही हातीं घेण्याचें ठरविलें आहे, व त्याची साधारण रूपरेखा हस्तपत्रकाच्याद्वारा भागवतप्रेमी वाचकांच्या सेवेंत सादर केली आहे. हे महाभारताचें काम श्रीमद्भागवत ग्रंथाच्या मानानें सहापटीनें मोठें आहे. अर्थात् तें शेवटास नेण्यास मनुष्यबल, शरीरबल व द्रव्यबल अशा तीनही गुणांची आवश्यकता आहे. जगाचें कार्यहि तीं गुणांवरच अवलंबून आहे. अर्थात तो जगत्चालक भगवानच हें कार्यहि शेवटास नेणारा समर्थ आहे. आम्ही मानवी जीवांनीं कोणत्याहि गोष्टींत अहंकार बाळगणें व्यर्थ आहे. असो, ह्या महाभारत ग्रंथासंबंधानें कांहीं हितचिंतक मित्रांकडून कित्येक सूचना करण्यांत आल्या आहेत. ह्या सर्व सूचनांचा योग्यवेळीं अवश्य तो विचार जरूर केला जाईल. या सूचनांबद्दल आम्ही त्यांचें फार आभारी आहोंत. भागवत ग्रंथाप्रमाणेंच आमचे प्रेमळ वाचक या महाभारत ग्रंथाच्या कामीं योग्य प्रोत्साहन देऊन हें कार्यही आमच्या हातून गोड करून घेतील, आणि सर्वशक्तिमान प्रभू तें निर्विघ्नपणें शेवटास नेईल अशी आम्हांस उमेद आहे.

या मानवी देहाकडून गेल्या ६८ वर्षांच्या काळांत या जगांत ज्या कांहीं लहान मोठ्या, बऱ्यावाईट गोष्टी घडून आल्या, आणि वगवेळ्या प्रसंगीं वेगवेगळया व्यक्तीशीं कार्यकारण निमित्तानें संबंध होऊन जगाचा जो अनुभव आला, त्यांतील कांहीं प्रसंग फारच मजेचे असून भावी पिढीस उद्बोधक असे आहेत. प्रभु इच्छा झाल्यास ते वाचकांपुढें स्वतंत्र पुस्तक रूपानें कदाचित् येतीलहि. असो; आजच्या प्रसंगीं आमच्या प्रियवाचकांस यापेक्षां विशेष त्रास न देतां, ग्रंथप्रकाशक मंडळीची स्थापना झाल्यापासून गेल्या ३५ वर्षांत ज्या विद्वान व उत्साहि मित्रांनीं ग्रंथ लेखनाच्या द्वारें सहाय्य केलें, आणि मंडळीच्याद्वारें विविध विषयावर जे लहान मोठे ग्रंथ प्रकाशित झाले, त्यांतील कांहीं मुख्य मुख्य ग्रंथाचा व लेखकांचा उल्लेख करून हे लांबलेले दोन शब्द येथें पुरे करतों. प्रेमळ वाचकवृंद, यथामति यथाशक्ति केलेली ही अल्प सेवा सहानुभूतिपूर्वक गोड करून घेतील अशी उमेद आहे.

सर्वांचा कृपाभिलाषि

**दा. सां. यंदे**

# ग्रंथसंपादक मंडळीच्या विद्यमानें प्रसिद्ध झालेले ग्रंथ.

## शास्त्रीय विषयावरील ग्रंथ

१ कृषिकर्म विद्या — श्री. रामचंद्र आबाजी राजे
२ अर्थशास्त्र — प्रो. विठ्ठल लक्ष्मण कवठेकर, बी. ए.
३ आरोग्यशास्त्र — डा. कृष्णराव विश्वनाथ धुरंधर, एल, एम, ॲण्ड एस.
४ शास्त्रीय मराठी व्याकरण — प्रि. मोरो केशव दामले, एम. ए.
५ तर्कशास्त्र — श्री. गोविंद रामचंद्र ओक, बी. ए., एलएल. बी.
६ भारतीय ज्योतिर्गणित — श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए. एलएल. बी.
७ वनस्पति विचार — प्रो. रघुनाथ विष्णु दामले, बी. ए.
८ स्पर्शास्पर्श — श्री. श्रीपाद दामोदर सातवळेकर
९ आर्यांचें मूलस्थान — श्री. केशव लक्ष्मण ओगले, बी ए.

## अध्यात्म व तात्विक विषयावरील ग्रंथ.

१ दशोपनिषदें-उपनिषद प्रकाश — प्रो. चिंतामण गंगाधर भानु
२ सान्वय-सार्थ-पंचदशी, भाग १–२ — वे. शा. सं. विष्णुशास्त्री बापट
३ उपरोक्षानुभूति सान्वय-सविवरण — सदर
४ तत्वानुसंदान — सदर
५ बृहद्योगवाशिष्ट — सदर
६ कर्मयोग — श्री. शंकर विठ्ठल कातरणिकर बी. ए.
७ भक्तियोग — श्री. कृष्णाजी नारायण आठल्ये
८ ज्ञानयोग — श्री. श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर, एम. ए.
९ राजयोग — प्रो. चिंतामण गंगाधर भानु, बी. ए.

## इतिहास विषयावरील ग्रंथ.

हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास. — श्री. गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.
१ सदर मुसलमानी रियासत — सदर
२ सदर मराठी रियासत पूर्वार्ध — सदर
३ सदर मध्यविभाग भाग २ रा — सदर
४ सदर ब्रिटीश रियासत पूर्वार्ध. — सदर
६ माझा प्रवास (१८५७) — श्री. चिंतामण विनायक वैद्य, एम.ए.,एल.एल.बी.
६ युरोपांतील कार्यकारणवादाचा उदय. — श्री. हरि बल्लाळ परचुरे, बी. ए.

## काव्य विषयावरील ग्रंथ

१ अर्वाचीन कविता. — श्री. कवि चंद्रशेखर गोरे.
२ उदासी महाराजांची कविता. — प्रि. मोरो केशव दामले, एम. ए.
३ अनंत महाराजांचे समग्र ग्रंथ. — श्री. जी. कृष्णराव, पे. पोष्ट मास्तर. पैठण

## चरित्र विषयावरील ग्रंथ

| | |
|---|---|
| १ ग्यारी बॉल्डि | श्री. नृसिंह चिंतामण केळकर, बी.ए.एल.एल.बी. |
| २ माझिनी | श्री. रा. वि. घाणेकर, बी. ए. |
| ३ अमीर अबदुल रहिमान | श्री. विनायक कोंडदेव ओक |
| ४ लॉर्ड मेकाले | श्री. विष्णु सिताराम फडके, बी. ए. |
| ५ छत्रपति शिवाजी महाराज (सं.च.) | श्री. कृष्णराव अर्जुन केळूसकर. |

## व्यवहारिक विषयावरील ग्रंथ

| | |
|---|---|
| १ परिचारिका | डा. काशिनाथ नारायण गोखले, एल्. एम् ॲण्ड एस्. |
| २ विषनिदान व चिकित्सा | डा. महादेव भिकाजी विंझे |
| ३ म्युनिसिपालिट्या व त्यांचीं कामें | श्री. महादेव व्यंकटेश लेले; एल. सी ई. |
| ४ विठ्ठल रामजी शिंदे यांचीं व्याख्यानें | एक देशभक्त |

## गोष्टीरूपानें भाषांतर केलेले धर्मग्रंथ,

| | |
|---|---|
| १ अध्यात्म रामायण. | श्री. गोविंद नारायण दातार शास्त्री |
| २ आनंदरामायण. | वे. शा. सं. विष्णु शास्त्री बापट |
| ३ कथाकल्पतरु, भाग १-२ | श्री. दा. सा. यंदे |
| ४ मत्स्यपुराण. | श्री. वासुदेव गोविंद आपटे, बी. ए. |
| ५ पद्मपुराण, भाग १-२ | श्री. गोविंद नारायण दातार शास्त्री |
| ६ गणेश पुराण | सदर |
| ७ स्कंधपुराण, भाग १ ते ४ | वे. शा. सं. नरहरशास्त्री जोगळेकर |

## कादंबऱ्या व गोष्टी

| | |
|---|---|
| १ पानिपतची मोहिम | श्री. नागेश विनायक बापट |
| २ देवी सत्यभामा ( पेशवाईतील अखेर ) | श्री. विष्णु कृष्ण पुराणीक बी. ए. |
| ३ देवी वीरमती ( शूर रजपूत महिला ) | श्री. दा. सा. यंदे |
| ४ सती राणक देवी ( पातिव्रत्य महिमा ) | श्री. वि. धों. कर्वे |
| ५ विषवृक्ष ( बंगालींचें रूपांतर ) | श्री. विष्णु सिताराम देव |
| ६ वाईकर भटजी | श्री. धनुर्धारी |
| ७ तरुण रजपूत सरदार ( ऐतिहासिक ) | श्री. नाथ माधव |
| ८ अधःपात-( चांगल्याचा चांगला परि[illegible] ) | श्री. गोविंद नारायण दातार शास्त्री |
| ९ विलासमंदीर ( दुराग्रही राज्यकर्ते | सदर |
| १० रहस्यभेद ( निस्सीम पतिप्रेम ] | सदर |
| ११ बंधुद्वेष [ अपकाराची फेड उपकारानें ] | सदर |
| १२ कालिकामूर्ति ( शाक्तांचें बंड ) | सदर |
| १३ इंद्रभुवन गुहा [ विलासपुरची राणी लिला ] | सदर |

श्रीमद्भागवतान्तर्गत

# सार्थ-सुभाषितसंग्रह

अर्थात्

# श्रीमद्भागवत-रवारस्य.

## प्रथमस्कंध.

### १—मंगलाचरण-( परमेश्वरस्वरूपवर्णन )

**जन्माद्यस्य यतोऽन्वयादितरतश्चार्थेष्वभिज्ञः स्वराट् ।**
**तेने ब्रह्म हृदा य आदिकवये मुह्यन्ति यत्सूरयः ॥**
**तेजोवारिमृदां यथा विनिमयो यत्र त्रिसर्गोऽमृषा ।**
**धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहकं सत्यं परं धीमहि ॥**

आम्ही त्या परमेश्वराचें ध्यान करतों. तो परमात्मा कसा आहे म्हणाल तर, '**सत्यं**' सत्यस्वरूप असा आहे. भूत, भविष्य, वर्तमान अशा तीनही काळांत निर्विकार असून शाश्वत असा आहे. '**यत्र त्रिसर्गः**' म्हणजे सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणांचीं कार्यें (देवता, इंद्रियें व पंचमहाभूतें हीं तीन) (आणि पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश, हीं पंचमहाभूतें यांचीं कार्यें) वास्तविक असत्य असतांहि ज्याच्या सत्यत्वामुळें सत्य अशीं भासतात. उदाहरण—मृत्तिका, उदक व तेज, हे सत्य नसतांहि केवळ आश्रयभूत पदार्थामुळें ते सत्य भासतात. जसें सूर्यकिरणाच्या सत्यत्वामुळें मृगजळ असत्य असतांहि सत्य भासतें. तसेंच उदकावर कांचेचा किंवा कांचेवर उदकाचा अथवा अग्नीचा भास होतो. वास्तविक पहातां मृगजल, कांच किंवा अग्नि, हा होणारा भास असत्य असतो; परंतु त्याचे आश्रयभूत पदार्थ सूर्यकिरण, उदक व कांच, यांच्या सत्यत्वामुळें ते सत्य असे भासतात. त्याप्रमाणें ही त्रिगुणात्मक सृष्टि असत्य असतांहि केवळ त्या परमात्म्याच्या सत्यत्वामुळें सत्य भासते. '**धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहकं**' म्हणजे तो आपल्या तेजानें मायेचें पटल दूर करतो. तो परमेश्वर कसा आहे तर, जगाची उत्पत्ति, स्थिति व लय ज्याच्या सत्तेने होतात, '**अर्थेषु अन्वयात्**' या जगद्रूपी कार्यांत त्या परमेश्वराची सत्ता दृग्गोचर होते; आणि '**इतरतः च**'

इतर भिन्न भिन्न कार्यांत त्याचीच सत्ता दिसून येते. आणखी तो परमेश्वर कसा आहे? तर 'अभिज्ञः स्वराट्' ज्ञानसंपन्न, सर्वज्ञ व स्वयंप्रकाश आहे. ज्या वेदांचा मोठमोठ्या ज्ञात्यालाहि मोह पडतो, ते वेद, वेदांचा आद्यदाता जो ब्रह्मदेव, त्याच्या अंतःकरणांत प्रेरणा करून ज्यानें त्याला शिकविले, असा हा परमेश्वर सर्व ज्ञात्यांचा आद्यगुरु जो ब्रह्मदेव, त्याचाहि गुरु आहे. अशा त्या 'परं' परमात्म्याचें 'धीमहि' आम्ही ध्यान करतों.

२

(भागवताचें स्वरूपवर्णन) १-१-३

**निगमकल्पतरोर्गलितं फलं शुकमुखादमृतद्रवसंयुतम् ॥**
**पिबत भागवतं रसमालयं मुहुरहो रसिका भुवि भावुकाः ॥**

अहो चतुर रसिकहो, श्रीमद्भागवत हें 'निगमकल्पतरोः फलं' वेदरूपी कल्पवृक्षाचेंच फल आहे. याचें आकंठ सेवन करा. हें फल शुकाच्या (पोपटाच्या म्ह. शुकाचार्यांच्या) मुखांतून 'भुवि' पृथ्वीवर पडलेलें आहे. हें कसें आहे तर अत्यंत रसमय आहे; अमृतमय आहे.

(एकदां नैमिशारण्यामध्यें सर्व ऋषि यज्ञास जमले असतां त्यांनीं सूतांचा स्वीकार करून ज्यांत भगवंताच्या लीला वर्णन केल्या आहेत अशा त्या भगवंताची कथा सांगण्याविषयीं विनंती केली. त्य प्रसंगीं ऋषि सूतास म्हणाले—)

३

(नाममाहात्म्य) १-१-१४

**आपन्नः संसृतिं घोरां यन्नाम विवशो गृणन् ॥**
**ततः सद्यो विमुच्येत यद्बिभेति स्वयं भयम् ॥**

भयंकर अशा संसारांत गुरफटून पराधीन झाल्यामुळें दीन झालेला प्राणी, त्या भगवंताचें नामस्मरण केलें असतां ह्या संसाररूपी भवसागरांतून मुक्त होतो. कारण— 'स्वयं भयं यत् बिभेति'—जें भय तें स्वतःच त्या परमेश्वराच्या नांवाला भीत असतें.

टीप—श्रीमत् व्यासांनीं अनेक ग्रंथ लिहिले तरी त्यांच्या मनाला शांति वाटेना. अशा अशांत स्थितींत ते बसले असतां नारद ऋषि तेथें प्राप्त झाले. श्रीव्यासांची अस्वस्थ मनःस्थिति पाहून त्यांनीं त्यांस, ज्यांत भगवंताच्या लीला ओतप्रोत आहेत असा भक्तिरसपूर्ण ग्रंथ रचण्यास सांगितलें. नारदाच्या उपदेशाप्रमाणें श्रीव्यासांनीं 'श्रीमद्भागवत' ह्या ग्रंथाची रचना केली, व त्यायोगें त्यांच्या मनास शांति प्राप्त झाली. असा हा श्रीमद्भागवत ग्रंथाचा पूर्व इतिहास आहे. यासंबंधानें विस्तृत विवेचन उपसंहारांत आलें आहे.

४

( भक्तांची श्रेष्ठता ) १-१-१५

यत्पादसंश्रयाः सूत मुनयः प्रशमायनाः ॥
सद्यः पुनन्त्युपस्पृष्टाः स्वर्धुन्यापोनुसेवया ॥

ऋषि म्हणतात, हे सूता, शांति हेंच ज्यांचें निवासस्थान असून जे त्या प्रभूच्या-चरणाचा आश्रय करतात, अशा साधूंचा स्पर्श होतांच ' सद्यः ' तत्काल प्राणीमात्र पावन होतात. गंगेच्या उदकानेंहि पवित्रता येते, परंतु गंगेची सेवा बराच काल करावी लागते. परंतु सत्संगतीनें तत्काल उद्धार होतो. (सारांश भगवद्भक्त हे गंगेपेक्षां श्रेष्ठ होत.)

( ऋषींच्या विनंतीस मान देऊन सूत म्हणाले—श्रीशुकाचार्यांनीं सर्व वेदांचें सार ज्यांत वर्णिलें आहे, आणि अज्ञानरूपी संसारांत गढून गेलेल्या प्राणिमात्रांस तरून जाण्यास सुलभ असें ज्ञानाचें जें गूढ तत्त्व सांगितलें आहे, तेंच मी तुम्हाला सांगतों. )

५

( निष्कामभक्तीनेंच मनास शांति ) १-२-६

स वै पुंसां परो धर्मो यतो भक्तिरधोक्षजे ॥
अहैतुक्यप्रतिहता ययात्मा संप्रसीदति ॥

परमेश्वराचे ठिकाणीं भक्ति उत्पन्न होणें, हाच मानवी प्राण्याचा श्रेष्ठ धर्म होय. आणि ती भक्ति ' अहैतुकी ' निष्काम असली म्हणजे त्यासारखा दुसरा कोणताच श्रेष्ठ धर्म नाहीं. अंतःकरणास खरें समाधान होण्याला निष्कामभक्ति हा एकच मार्ग आहे.

६

( निष्काम भक्तीनें ज्ञानाची प्राप्ती ) १-२-७

वासुदेवे भगवति भक्तियोगः प्रयोजितः ॥
जनयत्याशु वैराग्यं ज्ञानं यत्तदहैतुकम् ॥

षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा परमेश्वराचे ठिकाणीं निष्काम भक्ति दृढ झाली असतां वैराग्य उत्पन्न होतें; आणि त्यायोगें शुष्क तर्कांना अगोचर असें जें उपनिषत्प्रतिपादित नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त करून देणारें ज्ञान, तें प्राप्त होतें.

७

( भक्तीवांचून धर्माचरण व्यर्थ होय ) १-२-८

धर्मः स्वनुष्ठितः पुंसां विष्वक्सेनकथासु यः ॥
नोत्पादयेद्यदि रतिं श्रम एव हि केवलम् ॥

ज्या धर्माचरणापासून परमेश्वराच्या कथेविषयीं प्रेम उत्पन्न होत नाहीं, तो धर्म अथवा त्या धर्माची यातायात व्यर्थ होय.

८

( द्रव्य ही उपभोग्य वस्तु नव्हे ) १-२-९

**धर्मस्य ह्यापवर्ग्यस्य नार्थोऽर्थायोपकल्पते ॥**
**नार्थस्य धर्मैकान्तस्य कामो लाभाय हि स्मृतः ॥**

धर्माचरणाचें मुख्य फल म्हणजे मोक्ष होय. परंतु कोणी असें म्हणतात कीं, धर्माचे फल अर्थ, अर्थाचें फल काम आणि कामापासून इंद्रियांचा संतोष, आणि इंद्रियें संतुष्ट होणें हाच काय तो धर्म. ही समजूत अज्ञानमूलक आहे. द्रव्याचा मुख्य उपयोग धर्म घडावा हा आहे. व्य ही उपभोग्य वस्तु नव्हे.

९

( तत्त्वज्ञानजिज्ञासा हाच जन्माचा उपयोग ) १-२-१०

**कामस्य नेन्द्रियप्रीतिर्लाभो जीवेत यावता ॥**
**जीवस्य तत्त्वजिज्ञासा नार्थो यश्चेह कर्मभिः ॥**

उपभोग्य वस्तूप्राप्तीचें फळ केवळ शरीर धारण करणें एवढेंच आहे. इंद्रियाना संतुष्ट करावें हें कांहीं त्याचे फल नाहीं. जन्माचा उपयोग तरी हाच कीं, तत्वज्ञानाची इच्छा करणें. नानाप्रकारचीं कर्मे करून स्वर्ग मिळवावा हाच काय तो धर्मकर्माचा उपयोग, हें म्हणणें अयोग्य आहे. 'च-कर्मभिः सः न' यज्ञादि कर्मे करून स्वर्गाची इच्छा करणें हा कांहीं धर्माचा खरा उपयोग नाहीं.

१०

( अद्वितीय परब्रह्म तोच परमात्मा ) १-२-११

**वदन्ति तत्तत्त्वविदस्तत्त्वं यज्ज्ञानमद्वयम् ॥**
**ब्रह्मेति परमात्मेति भगवानिति शब्द्यते ॥**

अद्वितीय असें जें परब्रह्म, त्यालाच ज्ञाते लोक तत्त्व असें म्हणतात. अपरोक्ष ज्ञान तें हेंच होय. यालाच ब्रह्म, परमात्मा, भगवान् असें म्हणतात.

११

( ज्ञाते अंतःकरणांतच आत्म्याला पाहतात ) १-२-१२

**तच्छ्रद्दधाना मुनयो ज्ञानवैराग्ययुक्तया ॥**
**पश्यन्त्यात्मनि चात्मानं भक्त्या श्रुतगृहीतया ॥ १२ ॥**

वेदांतादि श्रवणानें ज्ञानवैराग्यसंपन्न झालेले 'मुनयः' ज्ञाते पुरुष, निस्सीम श्रद्धा व भक्ति या साधनांनीं आपल्या अंतःकरणांतच आत्म्याला पहातात.

१२

( भजन, पूजन, कीर्तन हेंच भक्तीचें लक्षण ) १-२-१४

तस्मादेकेन मनसा भगवान्सात्वतां पतिः ॥
श्रोतव्यः कीर्तितव्यश्च ध्येयः पूज्यश्च नित्यदा ॥

सात्वतां पतिः भगवान् ' भक्तांचा संरक्षक असा जो सर्वात्मक भगवान् एकाग्र अंतःकरणानें, भजन, पूजन, कीर्तन व ध्यान निरंतर करावें.

१३

( भक्तीनें अहंकाराची गांठ तुटते ) १-२-१५

यदनुध्यासिना युक्ताः कर्म ग्रन्थिनिबन्धनम् ॥
छिन्दन्ति कोविदास्तस्य को न कुर्यात्कथारतिम् ॥

कर्मानें अहंकाराची गांठ घट्ट होते. ती अहंकाराची गांठ ' कोविदः ' विद्वान् लोक ' यदनुध्यासिना ' त्या परमेश्वराच्या ध्यानरूप तरवारीनें तोडून टाकतात. असा जो सर्वसमर्थ परमेश्वर त्याच्या कथांवर कोणता पुरुष प्रेम करणार नाहीं ?

१४-१५

( संतसंगतीनें पातकांचा नाश होतो. ) १-२-१६,१७

शुश्रूषोः श्रद्धानस्य वासुदेवकथारुचिः ॥
स्यान्महत्सेवया विप्राः पुण्यतीर्थनिषेवणात् ॥ १६ ॥
शृण्वतां स्वकथां कृष्णः पुण्यश्रवणकीर्तनः ॥
हृद्यन्तःस्थो ह्यभद्राणि विधुनोति सुहृत्सताम् ॥ १७ ॥

सूत म्हणतात, हे द्विजश्रेष्ठहो, पुण्यकारक तीर्थांच्या व सत्पुरुषांच्या सेवेनें ' वासुदेवकथारुचिः ' परमेश्वराच्या कथांविषयीं आवड उत्पन्न होते. आणि ही आवड उत्पन्न झाली म्हणजे ' हृदि अन्तस्थः कृष्णः ' अंतःकरणांत हृदयस्थ वास करणारा श्रीकृष्ण परमात्मा-' अभद्राणि विधुनोति ' सर्व पातकांचा नाश करतो. असें हें परमेश्वराच्या कथांचें कीर्तन, श्रवण व मनन पुण्यकारक आहे.

१६-१७

( सत्संगतीनें मनाला शांति प्राप्त होते ) १-२-१८,१९

नष्टप्रायेष्वभद्रेषु नित्यं भागवतसेवया ॥
भगवत्युत्तमश्लोके भक्तिर्भवति नैष्ठिकी ॥ १८ ॥

तदा रजस्तमोभावाः कामलोभादयश्च ये ॥
चेत एतैरनाविद्धं स्थितं सत्त्वे प्रसीदति ॥ १९ ॥

भगवद्भक्तांची ( सत्पुरुषांची ) सेवा निरंतर घडली असतां अंतःकरणांतील दुर्वासना नष्ट होतात. आणि दुर्वासना नष्ट झाल्या कीं, ' उत्तमश्लोके ' पुण्यकारक आहे कीर्ति ज्याची अशा भगवंताची एकनिष्ठ भक्ति जागृत होते. ही भक्ति जागृत झाली म्हणजे रजोगुण, तमोगुण आणि त्यापासून उद्भवणारे काम-क्रोध-लोभादि विकार यांपासून चित्ताला विकृति होऊं शकत नाहीं. ते विकार सत्त्वगुणांत स्थिर होतात आणि मनाला शांति प्राप्त होते; अंतःकरण प्रसन्न होतें.

१८-१९

( आत्मदर्शनानें-संशयाची निवृत्ति होते. ) १-२-२०,२१

एवं प्रसन्नमनसो भगवद्भक्तियोगतः ॥
भगवत्तत्त्वविज्ञानं मुक्तसङ्गस्य जायते ॥ २० ॥
भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ॥
क्षीयन्ते चास्य कर्माणि दृष्ट एवात्मनीश्वरे ॥ २१ ॥

अशा प्रकारें ज्याचें अंतःकरण प्रसन्न झालें आहे, ' मुक्तसंगस्य ' ज्याची आसक्ति सुटली आहे, त्याला भगवद्भक्तीच्या प्रभावानें भगवत्स्वरूपाचें खरें खरें ज्ञान प्राप्त होतें. अशाप्रकारें ' आत्मनि ' अंतःकरणामध्यें ईश्वराचें साक्षात् दर्शन झालें म्हणजे ' अस्य हृदयग्रंथिः भिद्यते ' त्याच्या हृदयांतील अहंकाररूपी गांठ उकलते ' सर्वसंशयाः छिद्यन्ते ' सर्व संशय नष्ट होतात, आणि सारीं कर्में लयास जातात.

२०

( त्रिगुणात्मक असा एकच परमेश्वर कर्ता आहे ) १-२-२३

सत्त्वं रजस्तम इति प्रकृतेर्गुणास्तै-
र्युक्तः परः पुरुष एक इहास्य धत्ते ॥
स्थित्यादये हरिविरिञ्चिहरेति संज्ञाः
श्रेयांसि तत्र खलु सत्त्वतनोर्नृणां स्युः ॥ २३ ॥

सत्त्व, रज, तम हे मायेचे-प्रकृतीचे-गुण आहेत. या तीनहि गुणांनीं युक्त असा तो एकच श्रेष्ठ परमात्मा आहे. तोच ' हरिविरिञ्चिहरेति संज्ञाः धत्ते ' विष्णु-ब्रह्मा-शंकर ह्या संज्ञा धारण करून ' इह अस्य स्थित्यादये ' या लोकीं या जगाचीं उत्पत्ति, स्थिति व लय, हीं कार्यें करतो; आणि ' सत्त्वतनोः ' सात्त्विकमूर्ति धारण करणाऱ्या भगवंतापासून ' नृणां ' मानवांचें निश्चयेंकरून कल्याण करतो.

२१

( सत्त्वगुणांतच ब्रह्माचा साक्षात्कार होतो ) १-२-२४

**पार्थिवाद्दारुणो धूमस्तस्मादग्निस्त्रयीमयः ॥**

**तमसस्तु रजस्तस्मात्सत्त्वं यद्ब्रह्मदर्शनम् ॥ २४ ॥**

पृथ्वीच्या गुणांनीं युक्त अशा जड लांकडापेक्षां धूर श्रे होय; धुरापेक्षां तिन्ही वेदांत सांगितलेला, कर्मांचा प्रवर्तक असा जो अग्नि तो श्रेष्ठ होय. त्याचप्रमाणें तमोगुणापेक्षां रजोगुण श्रेष्ठ आणि या दोहोंपेक्षां सत्त्वगुण श्रेष्ठ होय. या सत्वगुणामध्येच परब्रह्माचा साक्षात्कार होतो.

२२

( सत्पुरुष पिशाच्चादि दैवतांचा त्याग करतात. ) १-२-२६

**मुमुक्षवो घोररूपान्हित्वा भूतपतीनथ ॥**

**नारायणकलाः शान्ता भजन्ति ह्यनसूयवः ॥**

मोक्षाची इच्छा करणारे जे सत्पुरुष असतात ते अघोररूपी पिशाच्चें, ( वेताळ, शाकिनी, डाकिनी, यासारखीं दैवतें ) यांचा त्याग करतात पण त्यांची निंदा मात्र करीत नाहींत. आणि ' शान्ताः मारायणकलाः भजन्ति' शांतस्वरूपी अशा नारायणस्वरूपाचीच मात्र सेवा करतात.

२३

( रजोगुणी व तमोगुणी हेच पिशाच्चादिकांची सेवा करतात. ) १-२-२७

**रजस्तमःप्रकृतयः समशीला भजन्ति वै ॥**

**पितृभूतप्रजेशादीञ्छ्रियैश्वर्यप्रजेप्सवः ॥**

द्रव्य, ऐश्वर्य, संतती, यांची इच्छा करणारे, रजोगुण व तमोगुण यांच्या आंकित असणारे असे जे असतात, ते ' समशीलाः ' आपल्या समानशीलेस अनुसरून, पितर, भूत, प्रजापति इत्यादिकांची खरोखर सेवा करतात. कारण द्रव्य, ऐश्वर्य, संतति, एवढ्यांचीच त्यांस इच्छा असते.

२४-२५

( सर्व कर्में ईश्वराप्रीत्यर्थच असतात ) १-२-२८,२९

**वासुदेवपरा वेदा वासुदेवपरा मखाः ॥**

**वासुदेवपरा योगा वासुदेवपराः क्रियाः ॥ २८ ॥**

**वासुदेवपरं ज्ञानं वासुदेवपरं तपः ॥**

**वासुदेवपरो धर्मो वासुदेवपरा गतिः ॥ २९ ॥**

वेद, यज्ञ, योग, कोणतेंहि कर्म असलें तरी तें सर्व ईश्वराप्रीत्यर्थच असते ( २८ ) तसेंच ज्ञान, तप, धर्म, स्वर्गादि उत्तमगति हे सर्व ईश्वराप्रीत्यर्थच असतें. ( २९ )

२६

( आदिकर्ता भगवान् निर्गुण आहे ) १-२-३०

**स एवेदं ससर्जाग्रे भगवानात्ममायया ॥**
**सदसद्रूपया चासौ गुणमय्याऽगुणो विभुः ॥**

वास्तविक पहातां परमेश्वर निर्गुण निराकार आहे. तथापि तो निराकार भगवान् आपल्या त्रिगुणरूपी मायेच्या योगानें हें जग पूर्वीच उत्पन्न करता झाला आहे. आणि म्हणूनच पूर्वोक्त सर्व कर्मे ईश्वरस्वरूप असें म्हटलें आहे.

२७

( भगवान् त्रिगुणाहून निराळा आहे ) १-२-३१

**तया विलसितेष्वेषु गुणेषु गुणवानिव ॥**
**अन्तः प्रविष्ट आभाति विज्ञानेन विजृम्भितः ॥**

मायेच्या योगानें उत्पन्न झालेल्या वस्तुमात्रामध्यें त्याची व्यापकता व गुणांमध्यें त्याचा संचार असल्यामुळें, तो भगवान् त्रिगुणात्मक आहे असा भास होतो, परंतु वास्तविक त्रिगुणांशीं त्याचा संबंध नाहीं तो तीनही गुणांहून निराळा आहे. तो स्वतः अपरोक्ष ज्ञानरूप असतांही 'गुणवान् इव आभाति' त्रिगुणात्मक अभिमानी असा भासतो. परंतु वास्तविक तो निरभिमानी आहे.

२८

( परमेश्वर अग्निप्रमाणें वेगवेगळा भासतो ) १-२-३२

**यथा ह्यवहितो वह्निर्दारुष्वेकः स्वयोनिषु ॥**
**नानेव भाति विश्वात्मा भूतेषु च तथा पुमान् ॥**

ज्याप्रमाणें अग्नि एकच असतांहि लांकडांच्या भिन्नभिन्न आकृतीप्रमाणें वेगवेगळ्या आकृतीचा दिसतो; उदाहरण, लांकूड लांब असलें तर त्याचा निखारा लांब असतो. वर्तुळ, त्रिकोण, चौकोण, जसा लांकडाचा आकार असतो त्या आकाराचा अग्नि दिसतो. त्याप्रमाणेंच ह्या विश्वरूपात जगाला व्यापून राहिलेला परमेश्वर, प्राणिमात्रांचे ठिकाणीं वेगवेगळ्या स्वरूपांत भासतो.

२९

( परमेश्वर स्वतःच उपभोग घेतो ) १-२-३३

**असौ गुणमयैर्भावैर्भूतसूक्ष्मेन्द्रियात्मभिः ॥**
**स्वनिर्मितेषु निर्विष्टो भुङ्क्ते भूतेषु तद्गुणान् ॥**

सूक्ष्म भूतें, इंद्रियें आणि मन, हीं त्रिगुणाचीं कार्यें होत. त्यांच्या योगानें परमेश्वर स्वतःच प्राणिमात्र निर्माण करतो, आणि त्यांच्यामध्यें प्रवेश करून त्या भुतांच्या गुणांचा उपभोग स्वतःच घेतो.

३०

( परमेश्वर विविधरूपानें जगाचें पालन करतो ) १-२-३४

**भावयत्येष सत्त्वेन लोकान्वै लोकभावनः ॥**
**लीलावतारानुरतो देवतिर्यङ्नरादिषु ॥**

जगत्कर्ता जो परमेश्वर तोच देवांमध्यें इंद्र, ब्रह्मा, शंकर या स्वरूपानें; तिर्यग्योनींत मत्स्य, कच्छ, वराह इत्यादि रूपानें; आणि मनुष्ययोनींत राम, कृष्ण इत्यादि अवताररूपानें 'एषः लोकभावनः' हा जगत्कर्ता भगवान् 'सत्त्वेन भावयति वै' निश्चयेंकरून सत्त्वगुणानें तोच सर्वांचें पालन करतो.

३१-३२

( परमेश्वराचें विराट् स्वरूप ) १-३-३,४

**यस्यावयवसंस्थानैः कल्पितो लोकविस्तरः ॥**
**तद्वै भगवतो रूपं विशुद्धं सत्त्वमूर्जितम् ॥**
**पश्यन्त्यदो रूपमदभ्रचक्षुषा सहस्रपादोरुभुजाननाद्भुतम् ॥**
**सहस्रमूर्धश्रवणाक्षिनासिकं सहस्रमौल्यम्बरकुण्डलोल्लसत् ॥**

त्या भगवंताच्या अवयवरचनेवरून ह्या चतुर्दशभुवनात्मक ब्रह्मांडाची कल्पना केलेली आहे. आणि तेंच परमेश्वराचें अत्यंत शुद्ध सत्त्वगुणात्मक स्वरूप होय. हें स्वरूप असें आहे कीं, त्याला हजारों पाय, हजारों मांड्या, हजारों बाहू, हजारों मुखें, हजारों मस्तकें, हजारों कान, हजारों डोळे व हजारों नाकें, असें तें आश्चर्यजनक आहे. त्याच्या मस्तकावर हजारों किरीटकुंडलें असून तें अत्यंत तेजःपुंज आहे. परमेश्वराचें हें स्वरूप 'अदभ्रचक्षुषा पश्यन्ति' ज्यांची ज्ञानदृष्टि विशाल आहे असे योगी मात्र पाहतात.

३३

( विराट्स्वरूप हेंच उत्पत्तीचें आदिस्थान ) १-३-५

**एतन्नानावताराणां निधानं बीजमव्ययम् ।**
**यस्यांशांशेन सृज्यन्ते देवतिर्यङ्नरादयः ॥**

परमेश्वराचे अनेक अवतार याच स्वरूपापासून उत्पन्न होतात आणि याच स्वरूपांत अंतर्धान पावतात. असें हें स्वरूप अव्यय आहे. म्हणजे त्याला केव्हांहि कोणताही विकार होत नाहीं. देव, पशु, पक्षी, मनुष्य इत्यादि सर्वांचें आदि उत्पत्तिस्थान हेंच आहे*

**टीप**—(यापुढें श्लोक ६ पासून श्लोक २६ पर्यंत भगवंतानें घेतलेल्या १ सनत्कुमार, २ वराह, ३ नारद, ४ नरनारायण, ५ कपिल, ६ दत्तात्रेय, ७ यज्ञ, ८ ऋषभ, ९ पृथु

१० मत्स्य, ११ कूर्म, १२ धन्वंतरी १३ मोहिनी, १४ नरसिंह, १५ वामन, १६ परशुराम, १७ व्यास, १८ राम, १९--२० बलराम व कृष्ण, २१ बुद्ध, २२ कल्कि, अशा २२ अवतारांचें वर्णन करून सूत पुढें सांगतातः —

३४

( सर्व विष्णूचेच अंश होत ) १–३–२७

**ऋषयो मनवो देवा मनुपुत्रा महौजसः ॥**
**कलाः सर्वे हरेरेव सप्रजापतयस्तथा ॥**

ऋषि, मनु, देव, प्रतापशाली मनूचे पुत्र, तसेच मरीच्यादि प्रजापति हे सर्व त्या परमेश्वराचेच अंश होत.

३५

( श्रीकृष्ण अवतार साक्षात् परमेश्वर होय. ) १–३–२९

**जन्म गुह्यं भगवतो य एतत्प्रयतो नरः ॥**
**सायं प्रातर्गृणन्भक्त्या दुःखग्रामाद्विमुच्यते ॥**

वरील सर्व अवतार परमेश्वराचे अंशभूत आहेत. इंद्राचे शत्रु जे दैत्य त्यांनीं उपद्रव दिला असतां परमेश्वर अंशरूपानें अवतार घेऊन जगाचें रक्षण करतो. परंतु श्रीकृष्णअवतार म्हणजे साक्षात् परमेश्वर होय. जो पुरुष अंतर्बाह्य शुद्ध होऊन नित्य सकाळ संध्याकाळ ह्या भगवंताचें चरित्र भक्तिपूर्वक पठण करतो, तो या दुःखरूप संसाराच्या दुःखसमूहापासून मुक्त होतो.

३६

( आत्म्यामध्येंच परमेश्वरस्वरूप आहे ) १–३–३०

**एतद्रूपं भगवतो ह्यरूपस्य चिदात्मनः ॥**
**मायागुणैर्विरचितं महदादिभिरात्मनि ॥**

निराकार व चैतन्यरूपी असें हें भगवंताचें स्वरूप, सत्त्व, रज व तम, हे जे मायेचे तीन गुण, त्या गुणांपासून उत्पन्न झालेल्या महत्तत्त्वादि तेवीस तत्त्वांनीं आत्म्यामध्यें धारण केलेलें आहे.

३७

( परमेश्वराविषयीं अज्ञानांची कल्पना ) १–३–३१

**यथा नभसि मेघौघो रेणुर्वा पार्थिवोऽनिले ॥**
**एवं द्रष्टरि दृश्यत्वमारोपितमबुद्धिभिः ॥**

आकाशामधील मेघपंक्ति किंवा वायूमधील पृथ्वीची धूळ, यांचा संबंध आकाशाशीं किंवा वायूशीं नसतो, परंतु अज्ञानी लोक तो त्यांच्याशीं लावतात. त्याप्रमाणें मंदबुद्धि ह्या स्थूल शरीराची परमात्म्याच्या स्वरूपाशीं कल्पना करतात.

३८

( लिंगदेहाला पुनर्जन्म आहे ) १–३–३२

**अतः परं यदव्यक्तमव्यूढगुणव्यूहितम् ॥**
**अदृष्टाश्रुतवस्तुत्वात्स जीवो यत्पुनर्भवः ॥**

याशिवाय एक अदृष्टपूर्व व अश्रुतपूर्व असा लिंगदेह आहे. हा देह त्रिगुणरहित असतांही तो त्रिगुणात्मक आहे असें मानतात; व त्यावर भगवंताच्या स्वरूपाचा आरोप करतात. परंतु त्या जीवाला म्हणजे त्या लिंगदेहाला पुनर्जन्म असलेला अनुभवास येतें.

३९

( ब्रह्मज्ञान आत्मज्ञानानें होतें ) १–३–३३

**यत्रेमे सदसद्रूपे प्रतिषिद्धे स्वसंविदा ॥**
**अविद्ययात्मनि कृते इति तद्ब्रह्मदर्शनम् ॥**

अज्ञानानें कल्पिलेली सत् म्हणजे सूक्ष्म आणि असत् म्हणजे स्थूल अशीं दोन्हींही स्वरूपें जेव्हां आत्मज्ञानानें नाहींशी होतात, तेव्हांच खरें ब्रह्मविषयक ज्ञान होतें.

४०

( माया विराम पावेल तरच आत्मा पूर्णावस्थेस पोंचेल ) १–३–३४

**यद्येषोपरता देवी माया वैशारदी मतिः ॥**
**संपन्न एवेति विदुर्महिम्नि स्वे महीयते ॥**

स्वच्छ व प्रकाशमान झालेली अशी ही त्रिगुणात्मक माया जर ‘ मतिः उपरता ’ बुद्धिपुरःसर विराम पावेल, तरच तो जीव पूर्णावस्थेस पोंचेल, आणि स्वतःच्या माहात्म्यांत श्रेष्ठत्वाला पावेल.

४१

( सर्वकर्ता असून परमेश्वर अभिमान बाळगीत नाहीं ) १–३–३६

**स वा इदं विश्वममोघलीलः सृजत्यवत्यत्ति न सज्जतेऽस्मिन् ॥**
**भूतेषु चान्तर्हित आत्मतन्त्रः षाड्वर्गिकं जिघ्रति षड्गुणेशः ॥**

ज्या ईश्वराच्या अवतारादि सर्व क्रीडा लोकोपकारार्थ असून जो उत्पत्ति, स्थिति व संहार, या तिन्ही गोष्टी करतो, ‘ अस्मिन् न सज्जते ’ त्यांत आसक्ति ठेवीत नाहीं. म्हणजे उत्पत्त्यादि करणारा मी असा अभिमान बाळगीत नाहीं. असा हा परमेश्वर पांच ज्ञानेंद्रियें व मन यांचा चालक असून सर्व प्राण्यांच्या हृदयांत गुप्तरीतीनें वास करतो; आणि शब्दादि पांच विषयांचा ( शब्द, स्पर्श, रूप, रस व गन्ध यांचा ) तसेंच सहाव्या संकल्पादि मनोविषयाचा स्वतंत्रपणें उपभोग घेतो.

४२

( अज्ञान्यास परमेश्वरस्वरूपाचें ज्ञान होत नाहीं ) १-३-३७

**न चास्य कश्चिन्निपुणेन धातुरवैति जन्तुः कुमनीष ऊतीः ॥**
**नामानि रूपाणि मनोवचोभिः संतन्वतो नटचर्यामिवाज्ञः ॥**

अज्ञानी लोकांना प्रभूच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान जसें होत नाहीं, त्याप्रमाणें ' कुमनीषः ' ज्याचें चित्त भ्रष्ट झालें आहे असा मनुष्य-मनानें, वाणीनें, नांवानें व स्वरूपानें अनेक रूपें धारण करून जगाचें धारण व पोषण करणाऱ्या त्या सर्वव्यापी प्रभूच्या लीला-'न अवैति' जाणूं शकत नाहीं.

४३

( परमेश्वरास कोण ओळखूं शकतो ) १-३-३८

**स वेद धातुः पदवीं परस्य दुरन्तवीर्यस्य रथाङ्गपाणेः ॥**
**योऽमायया संततयानुवृत्त्या भजेत तत्पादसरोजगन्धम् ॥**

जो मनुष्य निष्कपट अंतःकरणानें निरंतर सद्वर्तनी राहून त्या सर्वशक्तिमान भगवानाच्या चरणकमलरूपी सुगंधांत लीन होतो, तोच त्या चक्रधारी, सर्व जगाचें धारण पोषण करणाऱ्या अनंत पराक्रमी अशा परमेश्वराला जाणूं शकतो.

( याप्रमाणें प्रस्तावना करून सूत म्हणतात, व्यासमुनींनीं भागवताची रचना केल्यानंतर तें, आपला पुत्र जो शुकाचार्य त्यास पढविलें व शुकाचार्यांनीं परीक्षित् राजास सांगितलें, तेंच मी तुम्हाला सांगतों. यानंतर श्रीशुकाचार्यांचें आगमन परीक्षिताकडे कसें झालें व शुकाचार्यांची दिनचर्या कशी होती याचें वर्णन केलें आहे. सुत सांगतात—)

४४

( स्त्रीपुरुषभेदभावविरहित शुकाचार्य ) १-४-५

**दृष्ट्वाऽनुयान्तमृषिमात्मजमप्यनग्नं**
**देव्यो ह्रिया परिदधुर्न सुतस्य चित्रम् ॥**
**तद्वीक्ष्य पृच्छति मुनौ जगदुस्तवास्ति**
**स्त्रीपुंभिदा न तु सुतस्य विविक्तदृष्टेः ॥**

एकदा देवांगना एका सरोवरांत स्नान करीत असतां, ज्याच्या अंगावर वस्त्रांचा लवलेशही नाहीं, असे दिगंबर व्यासपुत्र शुकाचार्य तेथून निघून गेले; त्या स्त्रियांना त्या नग्न शुकाचार्यांविषयीं कांहीं वाटलें नाहीं. परंतु त्यांच्या मागोमागच ज्यांनीं अंगावर वस्त्र परिधान केलें आहे, असे शुकाचार्यांचे पिता व्यासमहाराज यांस आलेले पहातांच त्या स्त्रियांनीं लाजून वस्त्रें परिधान केलीं. हा प्रकार पाहून व्यासमुनींस आश्चर्य वाटलें.

आणि त्यांनीं त्या स्त्रियांस असें करण्याचें कारण विचारलें. तेव्हां त्या स्त्रिया म्हणाल्या, ' तव स्त्रीपुंभिदा अस्ति ' तुमच्या ठायीं स्त्री व पुरुष हा भेद वास करीत आहे. परंतु 'विविक्तदृष्टेः सुतस्य तु न' ज्याची दृष्टि पवित्र झाली आहे, अशा तुझ्या पुत्राचे ठिकाणीं स्त्री व पुरुष हा भेदभाव नाहीं. त्यामुळें त्याला पाहून आमच्या मनास संकोच वाटला नाहीं. भेदभावरहित होणें हेंच साधुत्वाचें श्रेष्ठ लक्षण असें याठिकाणीं दाखविलें आहे.

( यानंतर शौनकादिऋषि सूतास प्रश्न करतात,—लक्ष्मी, पराक्रम व सर्वप्रकारचें ऐश्वर्य इतक्या सर्व गोष्टी अनुकूल असतां ऐन तारुण्यावस्थेंत परिक्षित् राजानें सर्वस्वाचा त्याग कां केला ? याचे उत्तरांत सूत सांगतात— )

४५

( लोककल्याण हेंच सत्पुरुषलक्षण ) १–४–१२

**शिवाय लोकस्य भवाय भूतये य उत्तमश्लोकपरायणा जनाः ॥**
**जीवन्ति नात्मार्थमसौ पराश्रयं मुमोच निर्विद्य कुतः कलेवरम् ॥**

लोकांचें कल्याण करावें, लोकांच्या उपयोगीं पडावें, देशाची समृद्धि करावी व ऐश्वर्य वाढवावें, हेंच आहे ध्येय ज्याचें, असें हें शरीर 'उत्तमश्लोकपरायणाः' श्रेष्ठ आहे कीर्ति ज्यांची अशा सर्वशक्तिमान् प्रभूच्या चरणीं लीन झालेले पुरुष, ' आत्मार्थं न जीवन्ति ' स्वतःकरितां जिवंत राहत नाहींत, तर विरक्त होऊन दुसऱ्याच्या कल्याणार्थ आपलें शरीर खर्ची घालतात.

( श्रीमद्भागवताची रचना श्रीव्यासांनीं कोणत्या परिस्थितींत केली त्याचें वर्णन करून सूत सांगतात— )

४६–४७

( महाभारत वेदाचेंच अंग होय ) १–४–२४,२५

**त एव वेदा दुर्मेधैर्धार्यन्ते पुरुषैर्यथा ॥**
**एवं चकार भगवान्व्यासः कृपणवत्सलः ॥ २४ ॥**
**स्त्रीशूद्रद्विजबन्धूनां त्रयी न श्रुतिगोचरा ॥**
**कर्मश्रेयसि मूढानां श्रेय एवं भवेदिह ॥**
**इति भारतमाख्यानं कृपया मुनिना कृतम् ॥ २५ ॥**

वेदांतील रहस्य समजून घेण्याचें सामर्थ्य ज्यांच्या बुद्धींत नाहीं अशा लोकांच्या उपयोगार्थ श्रीव्यासांनीं त्या वेदांचें विभाग केले. कारण वेदत्रयी म्हणजे मूळचे तीन वेद 'श्रुति गोचरा' नुसत्या श्रवणानें उद्बोधक होणारे नसल्यामुळें ज्यांची बुद्धि मंद आहे–' स्त्रीशूद्र द्विजबन्धूनां '–स्त्रिया, शूद्र, व द्विजबन्धु यांचें कल्याण जेणेंकरून होईल अशा भूतदयेनें प्रेरित होऊन ' कर्मश्रेयसि' कल्याणप्रद असें 'भारतं आख्यानं कृतं' महाभारत कथानक रचिलें.

( वेद व महाभारत लिहिलें तरी श्रीव्यासांच्या अंःकरणाला शांति प्राप्त झाली नाहीं. ते सचिंत बसले असतां नारद ऋषि तेथें प्राप्त झाले, आणि म्हणाले— )

४८–४९–५०

( ब्रह्मज्ञान झालें तरी मनाची शांति होत नाहीं ) १–५–२,३,४

पाराशर्य महाभाग भवतः कच्चिदात्मना ॥
परितुष्यति शारीर आत्मा मानस एव वा ॥ २ ॥

जिज्ञासितं सुसंपन्नमपि ते महदद्भुतम् ॥
कृतवान्भारतं यस्त्वं सर्वार्थपरिबृंहितम् ॥ ३ ॥

जिज्ञासितमधीतं यत्तद्ब्रह्म सनातनम् ॥
अथापि शोचस्यात्मानमकृतार्थ इव प्रभो ॥ ४ ॥

हे भाग्यवान् पराशरपुत्रा व्यासा, तुझ्या शरीरांत राहणारा शरीराभिमानी अथवा मनांत वास्तव्य करणारा मनाभिमानी तुझा आत्मा ' आत्मना ' स्वतःच्या योगानेंच आनंदित होतो कां ? ( २ ) कारण, जाणण्यास योग्य असें जें कांहीं धर्मतत्त्वज्ञान तें तूं सर्व जाणलें असून सर्व पुरुषार्थांनीं पूर्ण भरलेलें असें महाभारत तूं तयार केलें आहेस. ( ३ ) जें सनातन परब्रह्म तें तूं जाणलें आहेस, त्याचें ज्ञानहि तुला प्राप्त झालें आहे. असें असतांहि–मी अजून कृतकृत्य झालों नाहीं, माझ्यांत कांहींतरी न्यूनत्व आहे, असें तुला कां वाटतें ? (व्यास म्हणाले, याचें कारण आपण त्रिकालज्ञ आहां, आपणच सांगा.)

५१–५२

( भगवंताचें गुण र्णन हीच आत्म्याची खरी शांति )–५–८,९

भवताऽनुदितप्रायं यशो भगवतोऽमलम् ॥
येनैवासौ न तुष्येत मन्ये तद्दर्शनं खिलम् ॥ ८ ॥

यथा धर्मादयश्चार्था मुनिवर्यानुकीर्तिताः ॥
न तथा वासुदेवस्य महिमा ह्यनुवर्णितः ॥ ९ ॥

नारद म्हणाले आपणाकडून भगवंताच्या निर्मळ यशाचें वर्णन झालें नाहीं, त्यामुळें आपल्या मनाला शांति वाटत नाहीं कारण हे मुनिवर्य, आपण धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारहि पुरुषार्थांचें वर्णन केले खरे, परंतु त्या परात्पर भगवंताचें माहात्म्य वर्णिलें नाहीं. भगवंताचें गुणवर्णन अर्थात् भगवद्भजन हेच शांतीचें लक्षण होय )

५३

( सत्पुरुष अलंकारिक भाषणानें संतुष्ट होत नाहींत ) १-५-१०

**न यद्वचश्चित्रपदं हरेर्यशो जगत्पवित्रं प्रगृणीत कर्हिचित् ॥**
**तद्वायसं तीर्थमुशन्ति मानसा न यत्र हंसा निरमन्त्युशिक्क्षयाः ॥**

चित्रविचित्र उत्तम उत्तम पदांनीं युक्त असें जरी भाषण आहे, परंतु त्या भाषणांत जगाला पवित्र करणाऱ्या अशा त्या भगवंताच्या यशाचें जर थोडेंसुद्धां वर्णन नाहीं, तर तें भाषण व्यर्थ होय ! जसें मानससरोवरांत विहार करणारे राजहंसपक्षी काकतीर्थाला सेवीत नाहींत, त्याप्रमाणें भगवद्भजनांत रममाण होणारे साधु पुरुष, त्या अलंकारिक भाषणानें संतुष्ट होत नाहींत.

५४

( ज्या भाषणांत ईश्वराचे गुणानुवाद आहे तें श्रेष्ठ होय ) १-५-११

**तद्वाग्विसर्गो जनताघविप्लवो यस्मिन्प्रतिश्लोकमबद्धवत्यपि ॥**
**नामान्यनन्तस्य यशोऽङ्कितानि यच्छृण्वन्ति गायन्ति गृणन्ति साधवः ॥**

लोकांच्या पातकाचें नाश करणारें जें भाषण ( जो वाणीचा उच्चार ) तेंच खरें भाषण होय. त्या भाषणांत जरी प्रति श्लोकामागें चित्रविचित्रपणा नसला तरी चालेल, परंतु तें भाषण परमेश्वराच्या गुणानुवादानें भरलेलें असेल तरच सत्पुरुष त्याचें श्रवण व गायन करतात.

५५

( ईश्वरार्पण केलेलें कर्मच श्रेष्ठ होय ) १-५-१२

**नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं न शोभते ज्ञानमलं निरञ्जनम् ॥**
**कुतः पुनः शश्वदभद्रमीश्वरे न चार्पितं कर्म यदप्यकारणम् ॥**

नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त करून देणारें असें जें आत्मज्ञान तेंहि जर परमेश्वराच्या भक्तिविरहित असेल तर पूर्णपणें शोभत नाहीं. मग अकल्याणरूपी कर्मविषयक ज्ञान कितीही उत्तम असलें व तें जर भगवंताला अर्पण केलेलें नसलें तर कसें शोभणार ? ( कारण कर्म हें नेहमीं आचरतांना व त्याचें फल भोगतांना दुःखरूपच असतें. )

५६

( बुद्धीच्या अस्थिरतेचें कारण ) १-५-१४

**ततोऽन्यथा किंचन यद्विवक्षतः पृथग्दृशस्तत्कृतरूपनामभिः ॥**
**न कुत्रचित्क्वापि च दुःस्थिता मतिर्लभेत वाताहतनौरिवास्पदम् ॥**

नारद म्हणतात, समुद्रांत वाऱ्यानें हेलकावे खाणाऱ्या नावेला स्थानाभावामुळें जसा अस्थिरपणा येतो, त्याप्रमाणें भगवत्चरित्राव्यतिरिक्त नामरूपादि भेदामुळें आपली बुद्धि अद्याप अस्थिर राहिली आहे.

५७

( कर्ममार्गाचा उपदेश त्याज्य होय ) १-५-१५

**जुगुप्सितं धर्मकृतेऽनुशासतः स्वभावरक्तस्य महान्व्यतिक्रमः ॥**
**न यद्वाक्यतो धर्म इतीतरः स्थितो न मन्यते तस्य निवारणं जनः॥१५॥**

स्वाभाविक रीतीनें ज्यांचें मन विषयाच्या ठिकाणीं आसक्त झालें आहे अशा लोकांना आपल्या मुखांतून निघालेल्या कर्ममार्गाचा उपदेश तोच धर्म असें वाटूं लागलें आहे. आणि त्याच्या मनावर झालेली कर्ममार्गाची कल्पना दूर होणें अशक्य झालें आहे हा आपल्या हातून मोठाच अन्याय झाला आहे.

५८

( निर्गुणभक्ति हेंच मनःशांतीचें साधन ) १-५-१६

**विचक्षणोऽस्यार्हति वेदितुं विभोरनन्तपारस्य निवृत्तितःसुखम्॥**
**प्रवर्तमानस्य गुणैरनात्मनस्ततो भवान्दर्शय चेष्टितं विभोः ॥१६॥**

सर्वशक्तिमान, सर्वव्यापी व अनन्त अशा परमेश्वराच्या स्वरूपाला फक्त ज्ञाते व कुशल पुरुषच निवृत्तिमार्गाच्या सहायाने जाणूं शकतात निर्गुण असूनही त्रिगुणाचे योगें जो जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करतो, अशा त्या निर्गुण निराकार परमेश्वराच्या सत्वगुणाच्या पराक्रमाचें वर्णन करा. म्हणजे आपल्या मनाला शांति प्राप्त होईल. )

( वरील श्लोकांवरून भागवतकारांनीं नारदमुखानें कर्ममार्ग त्याज्य मानला आहे म्हणजे कर्ममार्गानें मनाला शांति मिळत नाहीं असें म्हटलें आहे आणि मनःशांतीचें व खऱ्या सुखाचें साधन म्हणजे निर्गुण निराकार प्रभूच्या सत्वगुणांत तल्लीन होणें व त्या गुणाचाच उपदेश करणें श्रेष्ठ असें दर्शविलें आहे.

५९

( भगवद्भक्ति केव्हांच व्यर्थ जात नाहीं ) १-५-१७

**त्यक्त्वा स्वधर्मं चरणाम्बुजं हरेर्भजन्नपक्वोऽथ पतेत्ततो यदि ॥**
**यत्र क्व वाऽभद्रमभूदमुष्य किं को वार्थ आप्तोऽभजतां स्वधर्मतः ॥१७॥**

' स्वधर्म ' म्हणजे चार वर्णास नेमून दिलेला जो कर्ममार्ग तो ' त्यक्त्वा ' टाकून दिला आणि एकादा मनुष्य भगवंताच्या चरणकमलाच्या सेवेंतच तल्लीन झाला, परंतु पूर्णावस्थेंत पोंचण्यापूर्वीच जर त्याचें पतन झालें ( तो मृत झाला ) तर त्याच्या त्या अर्धवट सेवेमुळे त्याचें यालोकीं अथवा परलोकीं अकल्याण होईल काय ? मुळींच नाहीं. उलट स्वधर्माच्या नांवाखालीं कर्ममार्गांत रत झालेल्या पुरुषास कोणता लाभ होणार आहे ! ( कर्म अर्धवट असल्यास त्यापासून कांहींच लाभ होत नाहीं परंतु भगवंताची भक्ति थोडी जरी घडली तरी ती व्यर्थ जात नाहीं असा भावार्थ )

६०-६१

( आत्मस्वरूपीं लीन झालेल्या प्राण्यास कालाची भीति नसते ) १-५-१८,१९

तस्यैव हेतोः प्रयतेत कोविदो न लभ्यते यद्भ्रमतामुपर्यधः ॥
तल्लभ्यते दुःखवदन्यतः सुखं कालेन सर्वत्र गभीररंहसा ॥
न वै जनो जातु कथंचनाव्रजेन्मुकुन्दसेव्यन्यवदङ्ग संसृतिम् ॥
स्मरन्मुकुन्दाङ्घ्र्युपगूहनं पुनर्विहातुमिच्छेन्न रसग्रहो यतः ॥१९॥

उत्तम योनींत जन्म घेणाऱ्या जीवाला जें सुख मिळत नाहीं, अशा शाश्वत सुखाकरितां ज्ञात्या पुरुषानें नेहमीं प्रयत्न करावा. कारण सर्वत्र संचार करणाऱ्या कालाचा वेग फार गंभीर आहे तो केव्हां दुःखसमुद्रांत जीवास लोटील त्याचा भरंवसा नाहीं. ( १८ ) परंतु जो पुरुष कर्ममार्गाव्यतिरिक्त केवळ भगवंताच्या सेवेत तल्लीन झाला आहे, तो कशाहि स्थितींत असला तरी कर्ममार्गी पुरुषाप्रमाणें संसाररूपी दुःखसमुद्रांत पडूं शकत नाहीं ( म्ह. सर्वभक्षक कालाचा परिणाम त्याच्यावर होऊं शकत नाहीं ) कारण भगवंताच्या चरणसेवेंत त्याचें मन तल्लीन झालें असल्यामुळें तो आत्मस्वरूपी भगवान् त्याचें रक्षण करीत असतो. ( १९ )

( तात्पर्य-निर्गुण परमेश्वराचे ठिकाणीं [ आत्मस्वरूपाचे ठिकाणीं ] जो पुरुष लीन होतो, तोच दुःखरूपीं संसारबंधनापासून मुक्त होतो. त्याच्यावर सर्वभक्षक कालाचा परिणाम होऊं शकत नाहीं; हा भावार्थ. )

६२-६३

( भक्ति म्हणजे स्वतःच्या आत्म्याशीं तादात्म्य होणें ) १-५-२०,२१

इदं हि विश्वं भगवानिवेतरो यतो जगत्स्थाननिरोधसंभवाः ॥
तद्धि स्वयं वेद भवांस्तथापि वै प्रादेशमात्रं भवतः प्रदर्शितम् ॥ २० ॥
त्वमात्मनात्मानमवेह्यमोघदृक्परस्य पुंसः परमात्मनः कलाम् ॥
अजं प्रजातं जगतः शिवाय तन्महानुभावाभ्युदयोऽधिगण्यताम् ॥२१॥

खरोखर हें सर्व जग परमेश्वरस्वरूपच आहे. जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं कार्यें भगवान् स्वतःच करतो आणि इतकें करूनहि तो भगवान् या जगापासून अलिप्त आहे. हें सर्व आपण जाणत आहां. नारद म्हणतात; परंतु थोडक्यांत सांगतों आपण स्वतः त्या भगवंताचे अंशभूत अवतार आहां, हें स्वतः 'आत्मानं' आपल्या आत्म्याशीं तादात्म्य होऊन निश्चित जाणा. आपला आत्मा हा ' अज ' म्ह. जन्ममरणरहित असून केवळ लोकांच्या कल्याणाकरितांच उत्पन्न झाला आहे, हें लक्षांत आणा; आणि जेणेंकरून आबालवृद्धांचें कल्याण होईल अशा त्या सर्वशक्तिमान् भगवंताच्या गुणांचें वर्णन करा.

६४

( परमेश्वराचें गुणवर्णन हेंच ज्ञानदान )–१–५–२२

**इदं हि पुंसस्तपसः श्रुतस्य वा स्विष्टस्य सूक्तस्य च बुद्धिदत्तयोः ॥**
**अविच्युतोऽर्थः कविभिर्निरूपितो यदुत्तमश्लोकगुणानुवर्णनम् ॥ २२ ॥**

उत्तम आहे कीर्ति ज्याची अशा भगवंताच्या गुणांचें वर्णन करणें, हेंच पुरुषाच्या तपाचें, श्रवणाचें, यज्ञादिकाचें, अध्ययनाचें व ज्ञानदानाचें खरें व मुख्य फल होय, असें ज्ञाते पुरुषांचें मत आहे.

( श्लोक २३ पासून ३० पर्यंत नारदमुखानें नारदाचा पूर्वजन्माचा वृत्तांत वर्णन केला आहे. नारद सांगतात; पूर्वजन्मीं योगवादविशारद अशा योग्याच्या एका दासीच्या पोटीं माझें जन्म झालें. बालपणापासून योग्यांची सेवा त्यांच्या उच्छिष्ट अन्नाचें सेवन, नित्य भगवंताच्या कथांचें श्रवण इत्यादि कारणांनीं माझेठायीं भगवद्भक्ति उत्पन्न झाली, आणि योगनिष्ठ ऋषींच्या प्रसादानें सर्वव्यापी अशा परमेश्वराच्या प्रभावाचें ज्ञान माझेठायीं जागृत झालें, आणि

**' ईश्वरे भावितं कर्म तापत्रयचिकित्सितम् '**

परमेश्वराचे ठिकाणीं अर्पण केलेलें कर्म हेंच तीनहि तापांना ( म्हणजे आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक अशा तीनहि तापांना ) नाहींसें करणारें आहे असें जाणलें. नारद म्हणतात—

६५ ६६

( ईश्वरार्पण केलेलीं कर्में मोक्षास साधन होतात ) १–५–३२,३५

**एतत्संसूचितं ब्रह्मंस्तापत्रयचिकित्सितम् ॥**
**यदीश्वरे भगवति कर्म ब्रह्मणि भावितम् ॥ ३२ ॥**
**यदत्र क्रियते कर्म भगवत्परितोषणम् ॥**
**ज्ञानं यत्तदधीनं हि भक्तियोगसमन्वितम् ॥ ३५ ॥**

षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा सर्वशक्तिमान् ब्रह्माचे ठिकाणीं अर्पण केलेलें जें कर्म, तेंच तापांचा नाश करण्यास समर्थ आहे हें मीं आपणास सांगितलें. उदाहरण, एखाद्या पदार्थापासून प्राणिमात्रास रोग उत्पन्न होत असतो, परंतु तोच पदार्थ चिकित्सापूर्ण तयार करून त्याचें सेवन केलें असतां रोगाचा नाश करण्यास समर्थ होतो. त्याचप्रमाणें सर्वप्रकारचीं कर्में जरीं मनुष्यास संसारबंधनास कारणभूत असतात, तरी तींच कर्में परमेश्वरार्पण केलीं असतां जन्ममरणस्वरूपी संसारबंधनाचा नाश करण्यास समर्थ होतात. भक्तियोगानें परिपूर्ण असें जें कर्म केलें जातें तच खरें ज्ञान होय. तेंच परमेश्वराला संतुष्ट करूं शकतें आणि तें ज्ञान कर्माधीन असतें.

६७

( निर्गुण स्वरूपाची भक्ति हेंच श्रेष्ठ ज्ञान ) १–५–३८

**इति मूर्त्यभिधानेन मन्त्रमूर्तिममूर्तिकम् ॥**
**यजते यज्ञपुरुषं स सम्यग्दर्शनः पुमान् ॥ ३८ ॥**

वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध या चार मूर्तींच्या नांवानें, परंतु मूर्तिरहित मंत्र हीच ज्याची मूर्ति, अशा निर्गुण निराकार यज्ञस्वरूपी परमेश्वराला जो पूजितो, त्यालाच श्रेष्ठ ज्ञान प्राप्त होतें.

( संसारदुःखानें पीडित झालेल्या जनांचें ज्या योगानें कल्याण होईल अशा निर्गुणस्वरूप परमेश्वराच्या गुणांचें वर्णन करण्याविषयीं श्रीनारदऋषींनीं श्रीव्यास-महाराजांस सुचविलें. येथें प्रथमस्कंधाचा पांचवा अध्याय पूर्ण झाला. व्यासमुनींनीं नारदऋषींस आपलें पूर्वजन्मचरित्र सांगण्याविषयीं विनंती केली असतां नारदांनीं तें त्यांस कथन केलें. त्यांतील निवडक सुभाषितें खालीं दिलीं आहेत. बालपणीं सर्पदंशानें आपली माता मृत झाली असतां नारदांनीं पुढील उद्गार काढले. )

६८

( भक्तांवर अनुग्रह करण्याकरतांच संकटाची उत्पत्ति ) १–६–१०

**तदा तदहमीशस्य भक्तानां शमभीप्सतः ॥**
**अनुग्रहं मन्यमानः प्रातिष्ठं दिशमुत्तराम् ॥ १० ॥**

ईश्वर जें जें करतो तें ' भक्तानां शं अभीप्सतः ' भक्तांचें कल्याण करण्याकरितांच करतो. तेव्हां भक्तांचें कल्याण इच्छिणाऱ्या परमेश्वरानें हा मजवर मोठा अनुग्रहच केला आहे, असें मी मनांत आणलें, व उत्तर दिशेला प्रयाण केलें.

( नारद म्हणतात; रानोमाळ भटकत असतां तृषेनें व क्षुधेनें प्राण व्याकूळ झाले. शेवटीं एका वृक्षाच्या छायेस बसलों आणि आत्मस्वरूपीं परमेश्वराचें ध्यान करूं लागलों.)

६९, ७०

( मनाची एकतानता हेंच परमेश्वरस्वरूप ) १–६–१७,१८

**ध्यायतश्चरणाम्भोजं भावनिर्जितचेतसा ॥**
**औत्कण्ठ्याश्रुकलाक्षस्य हृद्यासीन्मे शनैर्हरिः ॥ १७ ॥**
**प्रेमातिभरनिर्भिन्नपुलकाङ्गोऽतिनिर्वृतः ॥**
**आनन्दसंप्लवे लीनो नापश्यमुभयं मुने ॥ १८ ॥**

अंतःकरण परमेश्वरभक्तीनें वश झालें, भगवंताच्या चरणकमलीं तन्मय झालें, उत्कंठेनें डोळ्यांतून अश्रु गळूं लागले आणि माझ्या हृदयाकाशांत तो भगवान् हळू हळू

प्रगट झाला. परमेश्वराचें स्वरूप हृदयात प्रकट होतांच माझ्या अंगांवर रोमांच उभे राहिले, चित्तवृत्ति स्तब्ध झाली, माझा भेदभाव नष्ट झाला आणि त्या आनंदाच्या पुरांत मी इतका तन्मय झालों की मी स्वतः परमेश्वरस्वरूप बनलों. ( नारद सांगतात: ही स्थिति क्षणमात्र प्राप्त झाली नाहीं तोंच तें दर्शन नष्ट झालें. मनास तळमळ लागली तेव्हां आकाशवाणीनें सूचित केलें कीं— )

७१

( पातकी मनुष्यास प्रभुदर्शन दुर्लभ होय )–१–६–२२

**अविपक्वकषायाणां दुर्दर्शोऽहं कुयोगिनाम् ॥ २२ ॥**

७२

( ईश्वरभक्तीनें कामवासनेचा नाश होतो ) १–६–२३

**मत्कामः शनकैः साधुः सर्वान्मुञ्चति हृच्छयान् ॥ २३ ॥**

ज्याचीं पापें समूळ नाहींशी झालीं नाहींत अशा अपूर्ण योग्यांना माझें दर्शन दुर्लभ आहे. (२२) परंतु ज्याला माझ्या दर्शनाची गोडी लागते तो मनुष्य हळू हळू संपूर्ण कामवासनेचा त्याग करतो आणि माझेठायीं रममाण होतो (२३)

( नारद सांगतात; परमेश्वरभक्तीनें तल्लीन झालेला मी सर्वसंगपरित्याग करून भ्रमण करीत असतां माझा पंचभूतात्मक देह पतन पावला आणि एक हजार वर्षांचा काळ लोटल्यावर भगवंताच्या इंद्रियापासून मरीच्यादि ऋषींसह मी पुन्हां अवतीर्ण झालों. नादब्रह्मानें मंडित अशी ही वीणा वाजवीत ईश्वराचे गुणानुवाद वर्णन करीत ब्रह्मचर्यव्रतानें या त्रैलोक्यांत मी भ्रमण करीत असतों. )

७३-७४

( भगवद्भक्तीनें मनाला शांति येते ) १–६–३५,३६

**एतद्ध्यातुरचित्तानां मात्रास्पर्शेच्छया मुहुः ॥**
**भवसिन्धुप्लवो दृष्टो हरिचर्यानुवर्णनम् ॥ ३५ ॥**
**यमादिभिर्योगपथैः कामलोभहतो मुहुः ॥**
**मुकुन्दसेवया यद्वत्तथाऽऽत्माऽद्धा न शाम्यति ॥ ३६ ॥**

विषयवासनेच्या इच्छेनें जे प्राणी या संसारांत वारंवार दुःखी होतात अशा लोकांस तरून जाण्यास, या संसाररूपी समुद्रांत, भगवंताच्या चरित्राचें गुणवर्णन ही एक नौकाच होय (३५) कामक्रोधादि षड्विकारांनीं त्रस्त झालेलें मन भगवंताच्या सेवेनें जसें शांत होतें, तसें प्रत्यक्ष योग्याच्या यमनियमादि मार्गांनेहि शांत होत नाहीं. (३६)

( याप्रमाणें उपदेश करून नारद निघून गेल्यानंतर व्यासमहाराज एकाग्रचित्तानें विचार करूं लागले, तों त्यांस स्फूर्ति झाली आणि एक भगवद्भक्तीच सर्व अनर्थांचा नाश करण्यास समर्थ आहे असें त्यांनीं जाणलें; आणि ही भागवतसंहिता निर्माण केली. )

७५

( त्रिगुणाच्या अभिमानामुळेंच अनर्थ होतो ) १-७-५

**यया संमोहितो जीव आत्मानं त्रिगुणात्मकम् ॥**
**परोऽपि मनुतेऽनर्थं तत्कृतं चाभिपद्यते ॥**

हा जीव परमेश्वररूपी असून सत्त्व, रज व तम या तीन गुणांहून निराळा असतांहि, मायेच्या मोहांत गुंतून आपण त्रिगुणात्मक आहों असें मानतो, व त्याचाच अभिमान बाळगतो; यामुळें मोठा अनर्थ होतो. (या अनर्थापासून जीवाची सुटका होणें कठीण आहे.)

७६-७७

( भागवतश्रवणानें भगवच्चरणीं भक्ति जडते ) १-७-६, ७

**अनर्थोपशमं साक्षाद्भक्तियोगमधोक्षजे ॥**
**लोकस्याजानतो विद्वांश्चक्रे सात्वतसंहिताम् ॥ ६ ॥**
**यस्यां वै श्रूयमाणायां कृष्णे परमपूरुषे ॥**
**भक्तिरुत्पद्यते पुंसः शोकमोहजरापहा ॥ ७ ॥**

साक्षात् परमेश्वराच्या खऱ्या भक्तीला जे जाणूं शकत नाहींत अशा अज्ञानी जनसमूहाला ह्या भवसमुद्रांतून तरून जाण्यास सुलभ पडावें म्हणून श्रीमद्व्यासांनीं ही भागवत-संहिता केली आहे. (६) ह्या भागवताच्या श्रवणानें सर्वशक्तिमान् भगवान् श्रीकृष्णाचे ठिकाणीं भक्ति जडते आणि मग शोक व मोह यांची भीति जीवास राहत नाहीं. (७)

( याप्रमाणें भागवताची रचना केल्यावर श्रीव्यासांनीं तें आपला पुत्र जो शुकाचार्य त्यांस पढविलें. स्वस्वरूपांत रममाण होणारे शुकाचार्य त्यांनीं या एवढ्या मोठ्या ग्रंथाचें अध्ययन कां केलें? असा प्रश्न ऋषींनीं केला असता सूत सांगतात:– )

७८

( मुनिसुद्धां भगवंताची निष्काम भक्ति करतात ) १-७-१०

**आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे ॥**
**कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥ १० ॥**

जे मुनि आत्मस्वरूपांतच रममाण असतात त्यांचा आनंद स्वभावसिद्धच असतो, कारण कामक्रोधादि विकारांच्या त्यांच्या ग्रंथी तुटलेल्या असतात. तथापि ते सुद्धां ज्या भगवंताचा अगाध पराक्रम आहे, जो सर्व गुणांनीं व्याप्त आहे त्याची निष्काम भक्ति करितात.

( यानंतर राजा परीक्षिताचा वृत्तांत सांगण्याविषयीं ऋषींनीं विनंती केली असतां सूत म्हणाले; कौरवपांडवांचें युद्ध चाललें असतां उभयपक्षांतील सर्व योद्धे मरण पावले आणि दुर्योधन भीमसेनाच्या गदाघातानें मांडी मोडून तळमळत पडला असतां, आपल्या

अन्नदात्याची मर्जी प्रसन्न करावी म्हणून द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें, निजलेल्या द्रौपदी-पुत्राचीं शिरें कापून त्यापुढें आणलीं. परंतु त्याप्रसंगीं अश्वत्थाम्याचें तें कृत्य दुर्योधना-सहि आवडलें नाहीं. ( लांगूलचालन करणारीं कित्येक स्वार्थसाधु माणसें आपल्या धन्याला प्रसन्न करण्याकरितां करूं नये अशीं नीच कृत्यें करितात, परंतु तीं निंद्यच होत.) पुत्रांचा वध झालेला पहातांच द्रौपदी शोकाकुल झाली. तेव्हां तिचें सांत्वन करून शत्रूचा सूड उगविण्यास्तव अर्जुन रथारूढ होऊन श्रीकृष्णासह त्याचे मागें धांवला. त्यांस पहातांच गर्भगळीत झालेल्या अश्वत्थाम्यानें निर्वाणीचें असें ब्रह्मास्त्र त्यांजवर फेंकलें. त्या-बरोबर त्याचें तेज सर्व दिशांस फाकलें व अर्जुनाची धांदल उडाली. संकट येतांच ईश्वराची आठवण होते, या सिद्धांताप्रमाणें अर्जुनानें देवाची स्तुति आरंभिली. अर्जुन म्हणतो-)

७९-८०-८१

( सर्वांचें कल्याण करणारा परमेश्वरच आहे ) १-७-२२,२३,२४

त्वमेको दह्यमानानामपवर्गोऽसि संसृतेः ॥२२ ॥
त्वमाद्यः पुरुषः साक्षादीश्वरः प्रकृतेः परः ॥
मायां व्युदस्य चिच्छक्त्या कैवल्ये स्थित आत्मनि ॥ २३ ॥
स एव जीवलोकस्य मायामोहितचेतसः ॥
विधत्से स्वेन वीर्येण श्रेयो धर्मादिलक्षणम् ॥ २४ ॥

संसारतापानें दग्ध झालेल्या जीवास मोक्षरूप असा, हे देवा, तूं एकच आहेस. (२२) तूंच सर्वांचा आदि आहेस. मायेला दूर सारून चित्स्वरूपानें कैवल्य स्वस्वरूपी आत्म्याचे ठिकाणीं वास करणारा तूंच आहेस. ( २३ ) मायेनें ज्यांचीं अंतःकरणें मोहीत झालीं आहेत अशा जीवांचें-धर्म, अर्थ, काम व मोक्ष, या चार पुरुषार्थांच्या द्वारें, स्वतःच्या पराक्रमानें कल्याण करणारा तूंच आहेस ( २४ )

( परमेश्वराला अनन्यभावें शरण गेलें असतां भगवान् आपल्या भक्तांस संकट-निवारणाचे उपाय सुचवितो. त्याप्रमाणें भगवंतानें ' शठे शाठ्यं ' या न्यायास अनुसरून ब्रह्मास्त्रावर ब्रह्मास्त्र सोडण्याविषयीं सुचविलें. अर्जुनानें ब्रह्मास्त्र सोडतांच दोन्ही अस्त्रें एकत्र झालीं आणि सर्वत्र हाहाःकार उडाला. तेव्हां कृष्णाज्ञेनें पार्थानें त्या अस्त्रांचा उपसं-हार केला आणि अश्वत्थाम्यास बांधून द्रौपदीपुढें आणलें. याप्रसंगीं देव सांगतात— )

८२-८३

( दुष्टांचा वध करणें पुण्यकारकच आहे ) १-७-३६,३७

मत्तं प्रमत्तमुन्मत्तं सुप्तं बालं स्त्रियं जडम् ॥
प्रपन्नं विरथं भीतं न रिपुं हन्ति धर्मवित् ॥ ३६ ॥

स्वप्राणान्यः परप्राणैः प्रपुष्णात्यघृणः खलः ॥
तद्वधस्तस्य हि श्रेयो यद्दोषाद्यात्यधः पुमान् ॥ ३७ ॥

मद्य प्यालेला, बेसावध असलेला, वेडा, निद्रित, मूर्ख, स्त्री, शरण आलेला, विरथ झालेला अथवा भेदरलेला असा मनुष्य, तो जरी शत्रू असला तरी, धर्मज्ञ लोक त्यास मारीत नाहीत. ( ३६ ) परंतु ( आततायी ) दुष्ट लोक जे दुसऱ्याच्या प्राणावर आपला प्राण पुष्ट करीत असतात अशांचा वध करणें हें त्यांच्याच कल्याणाचें असतें. तसें न केल्यास तो प्राणी अधोगतीला जातो ( ३७ )

( देवानें अर्जुनास असा उपदेश केला तरी, गुरुपुत्राचा वध करणें अर्जुनास आवडलें नाहीं. अश्वत्थाम्यास घेऊन तो धर्मराजाकडे आला. बळी देण्यासाठीं उभा केलेल्या अजापुत्राप्रमाणें ज्याचे हात बांधले आहेत, लज्जेनें ज्यानें आपली मान खालीं वांकविली आहे, अशा त्या गुरुपुत्राला पहातांच सरळ मनाच्या द्रौपदीचें अंतःकरण सद्गदित झालें. आपल्या पुत्रांच्या वधाचा सूड ती विसरून गेली; त्या गुरुपुत्रास तिनें साष्टांग नमस्कार केला, आणि ती म्हणाली—

सोडा, सोडा, ह्याला सोडून द्या; कसेंहि झालें तरी हा ब्राह्मण असून आपला गुरुपुत्र आहे. हा गुरुपुत्र म्हणजे महासमर्थ द्रोणाचार्यच पुत्ररूपानें राहिले आहेत. आपण ज्याला नित्य वंदन करावें असें जें हें गुरूचें कूळ त्यांना दुःख देणें इष्ट नव्हे. माझीं मुलें मृत झाल्यामुळें मी जशी दुःखानें होरपळलें आहे, तशी या वीराची माता महापतिव्रता गौतमी याचा वध केल्यास दुःखानें होरपळून जाईल. ( याठिकाणीं भागवतकारांनीं सत्वगुणी माणसें किती थोर मनाची असतात हें दर्शविलें आहे. )

८४

( ब्रह्मकुलोत्पन्न पुरुषाचा वध करूं नये ) १-७-४८

यैः कोपितं ब्रह्मकुलं राजन्यैरकृतात्मभिः ॥
तत्कुलं प्रदहत्याशु सानुबन्धं शुचार्पितम् ॥ ४८ ॥

इंद्रियनिग्रह न करितां जे राजेलोक ब्रह्मकुलाला शोकग्रस्त करतात, त्याच्या कुलाचा समूळ नाश होतो ( ४८ ) ( द्रौपदीचें हें भाषण धर्मास मानवलें; परंतु भीमास मात्र मानवलें नाहीं. तेव्हां कृष्ण म्हणतात—ब्राह्मणाला मारूं नये असें मींच सांगितलें. परंतु एखादा ब्राह्मण महाविद्वान् आहे, पण तो जर आततायी आहे, तर त्याचा वध करणेंच इष्ट आहे. अशा वधानें ब्रह्महत्येचें पातक होत नाहीं, हेंहि मींच सांगितलें आहे. तेव्हां माझ्या ह्या दोन्ही आज्ञा पाळल्या जातील, ह्या सर्व गोष्टींचा विचार करून याला योग्य ती शिक्षा तूंच कर ! भगवंताच्या भाषणाचा भावार्थ त्या चतुर पार्थाच्या लक्षांत तेव्हांच आला. त्यानें अश्वत्थाम्याचा वध न करितां त्याच्या मस्तकांत असलेला प्रभावशाली मणी काढून घेतला आणि बंधमुक्त करून त्यास सोडून दिलें. भागवतकार म्हणतातः

## ८५

( हद्दपार करणें म्हणजे ब्राह्मणास देहान्त शिक्षाच होय ) १-७-५७

**वपनं द्रविणादानं स्थानान्निर्यापणं तथा ॥**
**एष हि ब्रह्मबन्धूनां वधो नान्योऽस्ति दैहिकः ॥ ५७ ॥**

क्षौर करणें-( पांच पाट काढणें, ) दंड करणें, हद्दपार करणें, हा ब्राह्मणाधमाचा वधच होय. त्याला दुसऱ्या देहान्त शिक्षेची गरजच नाहीं ( ५७ )

( सूत सांगतातः—याप्रमाणें अश्वत्थाम्यास घालवून दिल्यावर श्रीकृष्णानें धर्माकडून सर्व मृतात्म्यांची उत्तरक्रिया करविली आणि कृष्ण द्वारकेस जावयास निघाला. इतक्यांत भयभीत झालेली अभिमन्यूची पत्नी उत्तरा धांवत आली, आणि आपलें रक्षण करा, असें म्हणूं लागली. तोंच तेजःपुंज पांच बाण पांडवांवर चालून येत आहेत असें दृष्टीस पडलें. पांडवांचा कुलक्षय करण्याच्या दुष्टबुद्धीनें हें कृत्य अश्वत्थाम्याचें आहे हें कृष्णानें जाणलें, आणि याचा प्रतिकार पांडवांकडून होणार नाहीं, हें लक्षांत घेऊन त्या भक्तवत्सल भगवंतानें आपल्या सुदर्शनानें त्या बाणांचा नाश केला, आणि गर्भावस्थितींत असलेल्या उत्तरेच्या गर्भास अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून पीडा होऊं नये म्हणून मायेच्या प्रभावानें तिच्या उदरांत प्रवेश करून गर्भास वेढून टाकलें. भागवतकार म्हणतात—

भगवंतानें ह्या ज्या गोष्टी केल्या त्यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं. कारण जो भगवान् सर्वत्र व्यापून राहिला आहे, जो मायेच्या योगानें सर्व जगाची उत्पत्ति, रक्षण व नाशहि करतो, ज्याला जन्म किंवा मरण नाहीं; ज्याच्या कृतींत अनेक आश्चर्यें भरून राहिलीं आहेत, तो काय करणार नाहीं ? )

( याप्रमाणें पांडवांवर आलेल्या संकटाचें निवारण करून तो भगवान् जावयास निघाला असतां, कुंतीनें त्यास नमस्कार करून त्याची स्तुति केली. कुंती म्हणते— )

## ८६-८७

( अकिंचनत्व हेंच परमेश्वराच्या भक्तीचें लक्षण ) १-८-२५,२६,२७

**विपदः सन्तु नः शश्वत्तत्रतत्र जगद्गुरो ॥**
**भवतो दर्शनं यत्स्यादपुनर्भवदर्शनम् ॥ २५ ॥**
**जन्मैश्वर्यश्रुतश्रीभिरेधमानमदः पुमान् ॥**
**नैवार्हत्यभिधातुं वै त्वामकिंचनगोचरम् ॥ २६ ॥**
**नमोऽकिंचनवित्ताय निवृत्तगुणवृत्तये ॥**
**आत्मारामाय शान्ताय कैवल्यपतये नमः ॥ २७ ॥**

देवा, आम्हांवर नेहमीं आपत्ति असो, आम्हांवर नेहमीं संकटें येवोत, कारण संकट आलें म्हणजे तुझी आठवण होते आणि तुझें दर्शन घडतें; व पुनर्जन्मादि यातायाती

नष्ट होतात ( २५ ) देवा, श्रीमंतीत जन्मलेल्या, ज्ञानाच्या व संपत्तीच्या मदानें धुंद झालेल्या, ऐषआरामांत लोळणाऱ्या अशा लोकांस अहंकारानें वेढलेलें असतें, त्यामुळें तुझें दर्शन त्यांस दुर्मिळ होतें. परंतु दरिद्री जीव नेहमीं तुझी आठवण करून तुला स्मरतात म्हणून त्यासच तुझें दर्शन घडतें ( २६ ) अकिंचन हेंच ज्याचें ऐश्वर्य आहे, जो निर्गुण गुणातीत आहे, जो आत्म्याचे ठायीं रममाण झाला आहे, ज्याची चित्तवृत्ती शांत झाली आहे, जो मोक्ष देण्यास समर्थ आहे, अशा तुला नमस्कार असो. ( २७ )

८८

( योनीला अनुरूप अशींच देवाचीं अवतारकर्में. ) १-८-३०

**जन्म कर्म च विश्वात्मन्नजस्याकर्तुरात्मनः ॥**
**तिर्यङ्नृषिषु यादस्सु तदत्यन्तविडम्बनम् ॥ ३० ॥**

भगवंता, तुला जन्म नाहीं, कर्तृत्वाचा अभिमान नाहीं, पण तूं सर्व जगांत आत्मस्वरूपानें वास करणारा असून पशुयोनींत वराहादिरूपानें, ऋषियोनींत व्यासादिरूपानें, मनुष्ययोनींत रामादिरूपानें व जलचरयोनींत मत्स्यादि अवतार घेऊन त्या त्या योनीला अनुरूप अनुकरणीय अशीं कर्में करतोस.

( याप्रमाणें कुंतीनें भगवंताची स्तुति केल्यानंतर धर्मराज म्हणाले,—देवा, माझ्या हातून राज्याच्या लोभानें आप्त, गुरु, सज्जन, स्नेही यांचा जो नाश झाला, त्या पापाचें क्षालन अश्वमेधादि यज्ञानें होणें शक्य नाहीं. कारण- )

८९

( पापानें पाप धुतलें जात नाहीं ) १-८-५२

**यथा पङ्केन पङ्काम्भः सुरया वा सुराकृतम् ॥**
**भूतहत्यां तथैवैकां न यज्ञैर्मार्ष्टुमर्हति ॥ ५२ ॥**

जसें गढूळपाणी चिखल टाकल्यानें स्वच्छ होत नाहीं, किंवा जास्त दारु प्याल्यानें दारु पिण्याचें पातक नष्ट होत नाहीं, तसें ज्या यज्ञकर्मांत प्राणिहत्या सांगितली आहे, अशा यज्ञानें अनेक हत्या केल्याचें पातक कसें नष्ट होणार ?

( सूत सांगतात,-धर्माच्या मनास लागलेली जाचणी दूर व्हावी म्हणून श्रीकृष्णासह पांडव कुरुक्षेत्रीं जेथें भीष्म शरपंजरीं पडले होते तेथें गेले आणि त्यांनीं त्यांस नमस्कार केला. त्या वेळीं सर्व देव, ऋषि, यक्ष, गंधर्व भीष्माच्या दर्शनार्थ तेथें प्राप्त झाले. सर्वांचें स्वागत केल्यावर ज्याचे नेत्र पाण्यानें भरून आले आहेत असे ते भीष्माचार्य म्हणाले; पांडव हो, आपण पूर्ण धर्मनिष्ठ, पूर्ण बलाढ्य आणि प्रत्यक्ष परमात्मा श्रीकृष्ण आपला साह्यकर्ता असें असतांहि बालपणापासून आपणांस अनेक संकटें व दुःखें सहन करावीं लागलीं, तेव्हां ही सर्व कालगति म्हटलें पाहिजे. याकरितां-)

९०-९१

( कर्ताकरविता ईश्वर आहे. ) १-९-१७,२३

**तस्मादिदं दैवतन्त्रं व्यवस्य भरतर्षभ ॥**
**तस्यानुविहितोऽनाथा नाथ पाहि प्रजाः प्रभो ॥ १७ ॥**
**भक्त्यावेश्य मनो यस्मिन्वाचा यन्नाम कीर्तयन् ॥**
**त्यजन्कलेवरं योगी मुच्यते कामकर्मभिः ॥ २३ ॥**

हे भरतश्रेष्ठा, सर्व कांहीं दैवाधीन असतें हें लक्षांत घे; आणि श्रीभगवंताच्या इच्छेस अनुसरून जे अनाथ व दुर्बल असतील त्यांचें रक्षण कर ( १७ ) परमेश्वराचे ठिकाणीं अन्तःकरण ठेवून भक्तिपूर्ण वाणीनें जो त्याच्या गुणवर्णनांत तन्मय झालेला असतो, असा योगी पुरुष काम्यकर्मांपासून मुक्त होऊन ह्या शरीराचा त्याग करतो व मोक्षपदास जातो ( २३ ) ( याप्रमाणें भीष्माचार्यांनीं युधिष्ठिराला दानधर्म, राजधर्म, वैष्णवधर्म इत्यादि धर्मांचा उपदेश केला; नंतर उत्तरायणास आरंभ होतांच अंतःकरण प्रभुचरणीं स्थिर करून भगवंताची स्तुति केली ( ही स्तुति अध्याय ९ मध्यें श्लोक २४ ते ४२ पर्यंत आहे. ) भीष्माचार्यांनीं आत्मस्वरूपीं आत्मा लीन केल्यानंतर युधिष्ठिरांनीं कर्ममार्गास अनुसरून त्यांची उत्तरक्रिया केली, नंतर सर्वांचा निरोप घेऊन श्रीकृष्ण द्वारकेस परत गेले. त्या वेळीं द्वारकेंतील स्त्रीपुरुषांनीं श्रीकृष्णाचें अपूर्व स्वागत केलें आणि पुढीलप्रमाणें उद्गार काढले.)

९२-९३

( मायाबंधनापासून परमेश्वर अलिप्त आहे ) १-११-३७,३८

**तमयं मन्यते लोको ह्यसङ्गमपि सङ्गिनम् ॥**
**आत्मौपम्येन मनुजं व्यापृण्वानं यतोऽबुधः ॥ ३७ ॥**
**एतदीशनमीशस्य प्रकृतिस्थोऽपि तद्गुणैः ॥**
**न युज्यतेऽसदात्मस्थैर्यथा बुद्धिस्तदाश्रया ॥ ३८ ॥**

हा भगवान् श्रीकृष्ण सर्वसंगापासून अलिप्त असा आहे, परंतु मायामोहानें बद्ध झालेले अज्ञ लोक, हा भगवान् आमच्याप्रमाणेंच एक विषयलोलुप संसारी मनुष्य आहे असें समजतात. परंतु खरोखर हें त्यांचें अज्ञान होय. ( ३७ ) आत्म्याच्या आश्रयानें एकवट झालेली बुद्धि संसारांतील सुखदुःखादि प्रसंगानें जशी आनंदित किंवा दुःखी होत नाहीं, त्याप्रमाणें हा भगवान् मायेच्या ठिकाणीं राहूनहि मायाजन्य प्रपंचरूप गुणांनीं बद्ध होत नाहीं ( ३८ )

( यापुढें युधिष्ठिराचा राज्यकाभार, परीक्षिताचें जन्म, युधिष्ठिरानें केलेला अश्वमेध इत्यादि संसारांतील ऐश्वर्याचे प्रसंग आणि श्रीकृष्णाचें निर्याण, कालवेगानें भराभर

निघून गेले, आणि भारतीय युद्धप्रसंगीं तीर्थयात्रेस निघून गेलेला विदूर हस्तिनापुरास परत आला; त्या वेळीं त्यानें त्या काळाची एकंदर परिस्थिति पाहून धृतराष्ट्रास पुढील प्रमाणें उपदेश केला. विदुर म्हणतात-)

९४-९५

( संसारावरील आसक्ति खोटी आहे ) १-१३-२०,२१

येन चैवाभिपन्नोऽयं प्राणैः प्रियतमैरपि ॥
जनः सद्यो वियुज्येत किमुतान्यैर्धनादिभिः ॥ २० ॥
पितृभ्रातृसुहृत्पुत्रा हतास्ते विगतं वयः ॥
आत्मा च जरया ग्रस्तः परगेहमुपाससे ॥ २१ ॥

प्राणिमात्रांस आपल्या स्वतःच्या प्राणाइतका प्रिय असा दुसरा कोणताहि पदार्थ नाहीं. परंतु काळाच्या तडाक्यांत सांपडताच त्या प्राणाला अत्यंत प्रिय अशा शरीराला सोडून जावें लागतें. तर मग द्रव्यादि पदार्थ नाश पावतील हें काय सांगितलें पाहिजे? भीष्मादिकांसारखे पितर, दुर्योधनादि पुत्र, आप्त इष्टमित्र इत्यादि सर्व या जगास सोडून गेले! तुझें तारुण्य नष्ट होऊन म्हातारपण आलें व तुझे शरीरहि जरेनें ग्रस्त झालें. इतकें झालें असतांहि तुझी संसारावरील आसक्ति अद्याप सुटत नाहीं; आणि पाण्डवांनीं दिलेल्या अन्नावर तूं शरीराचें रक्षण करीत पडला आहेस! ही अत्यंत वाईट गोष्ट होय. ( अशाप्रकारें विदुरानें धृतराष्ट्राच्या जीविताचा धिक्कार केला व तो म्हणाला-)

९६-९७

( संसारबंधनें तोडतो तोच श्रेष्ठ पुरुष ) १-१३-२५,२६

गतस्वार्थमिमं देहं विरक्तो मुक्तबन्धनः ॥
अविज्ञातगतिर्जह्यात्स वै धीर उदाहृतः ॥ २५ ॥
यः स्वकात्परतो वेह जातनिर्वेद आत्मवान् ॥
हृदि कृत्वा हरिं गेहात्प्रव्रजेत्स नरोत्तमः ॥ २६ ॥

जो विषयांचा त्याग करून ज्याची गती जीवमात्राला ज्ञात होत नाहीं अशा कामक्रोधादिकापासून उत्पन्न होणाऱ्या संसारबंधनापासून मुक्त होतो आणि जो स्वार्थाचा त्याग करून शरीराला सोडतो, तोच पुरुष शहाणा असें मानलें आहे. ( २५ ) ह्या जगांत जो मनुष्यप्राणी स्वतः अथवा दुसऱ्याच्या उपदेशावरून वैराग्य संपादून आत्मज्ञानी होतो, घरदारादि संसारबंधनाचा त्याग करून हृदयस्थ परमेश्वराशीं एकमय होतो, तोच श्रेष्ठ पुरुष होय. ( अशा पुरुषानेंच आपल्या देहाचें सार्थक केलें हा आशय. )

( याप्रमाणें विदुरानें उपदेश करतांच धृतराष्ट्र गांधारीसह विदुराबरोबर हिमालयाकडे निघून गेला आणि तेथें ऋषिसान्निध्यानें रजतमादि त्रिगुणांचा रोध करून ब्रह्म-

स्वरूपीं लीन होतसाता त्यानें शरीराचा त्याग केला. धृतराष्ट्र निघून गेल्यामुळें त्यांच्या विरहानें धर्मराजा व्याकूळ झाला असता तेथें नारद ऋषि प्राप्त झाले आणि त्यांनीं त्यांस सुंदर उपदेश केला. तो पुढील श्लोकांत वर्णिला आहे. नारद म्हणतात—)

९८–१०२,

( सर्व जग परमेश्वराच्या आधीन आहे ) १–१३–४०,४२,४५,४६,४७

लोकाः सपाला यस्येमे वहन्ति बलिमीशितुः ॥
स संयुनक्ति भूतानि स एव वियुनक्ति च ॥ ४० ॥
यथा क्रीडोपस्कराणां संयोगविगमाविह ॥
इच्छया क्रीडितुः स्यातां तथैवेशेच्छया नृणाम् ॥ ४२ ॥
कालकर्मगुणाधीनो देहोऽयं पाञ्चभौतिकः ॥
कथमन्यांस्तु गोपायेत्सर्पग्रस्तो यथा परम् ॥ ४५ ॥
अहस्तानि सहस्तानामपदानि चतुष्पदाम् ॥
फल्गूनि तत्र महतां जीवो जीवस्य जीवनम् ॥ ४६ ॥
तदिदं भगवान्राजन्नेक आत्मात्मनां स्वदृक् ॥
अन्तरोऽनन्तरो भाति पश्य तं माययोरुधा ॥ ४७ ॥

लोकपालासह सर्व लोक, बलिदानादि विविधरूपानें ज्या परमेश्वराची पूजा करतात तो परमेश्वर सर्व प्राण्यांना उत्पन्न करतो, त्यांचा संयोग करतो व पुन्हां वियोगहि तोच करतो ( ४० ) एखादा खेळ खेळणारा मनुष्य खेळास लागणारें साहित्य आपल्या इच्छेप्रमाणें मांडतो, आणि खेळ संपतांच तें सर्व सामान पुन्हां आवरून ठेवतो, त्याप्रमाणेंच परमेश्वर ह्या जगांत ह्या संसारांत विविधरूपानें मनुष्यांचा संयोग करतो व कार्य संपतांच पुन्हा वियोग करतो ( ४२ ) पंचमहाभूतांपासून बनलेला हा देह, काल, कर्म आणि गुण यांच्या आधीन आहे. सर्पानें गिळलेला मनुष्य जसा दुसऱ्याचें रक्षण करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें कर्मांच्या आधीन झालेला मनुष्य दुसऱ्याचें रक्षण कसा करूं शकेल ? ( ४५ ) ज्यांना हात नाहींत असे प्राणी, ज्यांना हात आहेत अशांचे उपजिवीकासाधन होत. तसेंच ज्यांना पाय नाहींत असे जीव म्हणजे गवत वगैरे, ज्यांस चार पाय आहेत अशांची उपजीविका होत; म्हणजे तात्पर्य असें कीं, जीवांच्या उपजीविकेचें साधन जीवच होत. ( ४६ ) हें सर्व जग त्या परमेश्वराचेंच रूप आहे. तोच सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं व्यापून राहिला आहे. तो सर्वैश्वर्यसंपन्न परमेश्वर आंतबाहेर सर्वत्र एकरूपानें भरलेला असून मायेच्या योगानें अनेक रूपें धारण केल्यासारखा भासतो. ज्ञानदृष्टीनें त्याजकडे पहा ( ४७ )

( याप्रमाणें धर्माचें सांत्वन करून नारद निघून गेल्यानंतर धर्मराजास अनेक दुश्चिन्हें होऊं लागलीं आणि त्याचें मन चिंतेनें व्याकुळ झालें. इतक्यांत द्वारकेस समाचारार्थ गेलेला अर्जुन परत आला. त्याचें म्लान वदन पाहून धर्मराजानें त्यास अनेक प्रश्न विचारले; परंतु त्याच्याच्यानें उत्तर देववेना. शेवटीं शोकावेग आवरून पार्थ म्हणाला:-

१०३-१०६

( आत्म्यावांचून शरीर निरुपयोगी होय. ) १-१५-२१,२४,२५,२६

तद्वै धनुस्त इषवः स रथो हयास्ते
सोऽहं रथी नृपतयो यत आनमन्ति ॥
सर्वं क्षणेन तदभूदसदीशरिक्तं
भस्मन्हुतं कुहकराद्धमिवोप्तमूष्याम् ॥ २१ ॥
प्रायेणैतद्भगवत ईश्वरस्य विचेष्टितम् ॥
मिथो निघ्नन्ति भूतानि भावयन्ति च यन्मिथः ॥ २४ ॥
जलौकसां जले यद्वन्महान्तोऽदन्त्यणीयसः ॥
दुर्बलान्बलिनो राजन्महान्तो बलिनो मिथः ॥ २५ ॥
एवं बलिष्ठैर्यदुभिर्महद्भिरितरान्विभुः ॥
यदून्यदुभिरन्योन्यं भूभारान्संजहार ह ॥ २६ ॥

ज्याच्यामुळें सर्व रथी महारथी मला नम्र होत असत, तेच हें धनुष्य, तेच हे बाण, तोच हा रथ, तेच हे घोडे आणि त्या रथांत बसणारा तोच मी अर्जुन, असें असतांहि, तो माझा पराक्रम, तें माझें बल, श्रीकृष्ण अंतर्धान पावतांच, कपटानें मिळविलेल्या धनाप्रमाणें, अथवा राखेंत हवन केलेल्या हविर्भागाप्रमाणें, किंवा क्षारभूमींत पेरलेल्या धान्याप्रमाणें एका क्षणांत व्यर्थ झालें. ( २१ ) प्राणिमात्र जे एकमेकांचा संहार करतात अथवा एकमेकांचें पालनपोषण व रक्षण करितात, ही सर्व त्या परमेश्वराची लीला आहे. ( २४ ) जलचर प्राण्यांत मोठे मासे लहान माशांस खातात, बलिष्ठ दुर्बलांना मारतात, आणि समबलवान् असतात ते आपसांत मारामारी करून मरतात. त्याप्रमाणें त्या जगच्चालक भगवंतानें प्रथम बलाढ्य अशा यादवांकडून बलवान् झालेल्या दुष्टांचा नाश करविला, आणि नंतर यादवांकडूनच यादवांचा नाश करवून पृथ्वीस झालेला भार दूर केला. ( २५-२६ )

( सारांश, शरीरांत जोंपर्यंत आत्मा सतेजरूपानें वास करीत असतो तोंपर्यंत त्या शरीराकडून मोठमोठीं कार्यें होतात. परंतु तोच आत्मा निस्तेज झाला कीं, तेंच शरीर निर्माल्यवत् होतें. तसेंच जगाची उत्पत्ति आणि संहार हीं दोन्हीं कालानुरोधानेंच

चढून येत असतात. हे दोन मुद्दे याठिकाणी भागवतकारांनीं मार्मिक रीतीनें दाखविले आहेत. आत्म्यास चढती व उतरती आहे म्हणून जोंपर्यंत शरीर आहे, आत्मा सतेज आहे, म्हणजे तुमचें तारुण्य मुसमुसत आहे, तोंपर्यंत परोपकारासारख्या सत्कार्याकडे तुमच्या शरीराचा उपयोग करा. आत्मा निस्तेज झाल्यावर शरीराच्या हातून कांहींएक होणार नाहीं, हा भावार्थ. असो श्रीकृष्ण परमात्मा निजधामास गेला, सर्व यादवांचा नाश झाला इत्यादि वर्तमान अर्जुनमुखानें ऐकतांच धर्मराजानें सर्व ऐश्वर्याचा त्याग केला. आणि स्वर्गारोहणाचा मार्ग धरला भीम, अर्जुन, नकुल, सहदेव व द्रौपदी यांनींहि धर्मराजाचें अनुकरण केलें. येथें प्रथम स्कंधाचा १५ वा अध्याय पूर्ण झाला असून १६ पासून परीक्षिताची कथा सुरू झाली आहे. परीक्षित् राजा दिग्विजयार्थ निघाला असतां धर्मरूपी वृषभ व गायरूपी पृथ्वी एका पायावर चालत आहे आणि त्यास एक राजपुरुष ताडण करीत आहे, अशा शूद्ररूपधारी कलीची भेट झाली. याप्रसंगीं राजाच्या तोंडी भागवतकारांनीं पुढील श्लोक घातले आहेत.)

१०७-११०

(राजाचें कर्तव्य कर्म) १-१७-११,१४,१५,१६

एष राज्ञां परो धर्मो ह्यार्तानामार्तिनिग्रहः ॥
अत एनं वधिष्यामि भूतद्रुहमसत्तमम् ॥ ११ ॥
जनेऽनागस्यघं युञ्जन्सर्वतोऽस्य च मद्भयम् ॥
साधूनां भद्रमेव स्यादसाधुदमने कृते ॥ १४ ॥
अनागस्स्विह भूतेषु य आगस्कृन्निरंकुशः ॥
आहर्तास्मि भुजं साक्षादमर्त्यस्यापि साङ्गदम् ॥ १५ ॥
राज्ञो हि परमो धर्मः स्वधर्मस्थानुपालनम् ॥
शासतोन्यान्यथाशास्त्रमनापद्युत्पथानिह ॥ १६ ॥

गांजलेल्या प्राण्याचें रक्षण करणें हाच खरोखर राजाचा श्रेष्ठ धर्म होय. त्या धर्मास अनुसरून अनाथास पीडा देणाऱ्या त्या शूद्राचा मी नाश करतों (११) निरपराधी लोकां-बरोबर दुष्टाचरण करून त्यांस छळणाऱ्या दुष्टांचा नाश झालाच पाहिजे. कारण दुष्टांचा नाश झाल्यावांचून सज्जनाचें कल्याण होणार नाहीं (१४) जो कोणत्याहि प्रकारचें नियंत्रण मानीत नाहीं, जो निरपराधी प्राण्याला पीडा देतो, तो जरी ऐश्वर्य व अधिकारानें अलंकृत असला, फार काय पण प्रत्यक्ष देव जरी असला, तरी त्याचे बाहू तोडून टाकीन. (१५) कारण कोणत्याहि प्रकारची आपत्ति आली नसतांना, कारणावांचून सरळ मार्ग सोडून वाकड्या मार्गानें जातात अशा लोकांना शासन करणें हा राजाचा धर्मच होय. कारण

असें न केलें, तर स्वधर्मानें चालणाऱ्या लोकांचें रक्षण होऊं शकणार नाहीं. ( १६ )
( याप्रमाणें राजानें आश्वासन दिलें असतां वृषभरूपी धर्म बोलूं लागला— )

१११-११२

( सुखदुःखाचीं कारणें स्वकल्पनेनेंच ठरविलीं पाहिजेत ) १-१७-१९,२०

केचिद्विकल्पवसना आहुरात्मानमात्मनः ॥
दैवमन्ये परे कर्म स्वभावमपरे प्रभुम् ॥ १९ ॥
अप्रतर्क्यादनिर्देश्यादिति केष्वपि निश्चयः ॥
अत्रानुरूपं राजर्षे विमृशस्व मनीषया ॥ २० ॥

नानाप्रकारच्या विरोधी कल्पनांत गुरफटलेले कित्येक लोक आपल्या सुखदुःखाला आपणच कारण आहोंत असें म्हणतात; तर कित्येक लोक दैव हेंच सुखदुःखाचें कारण समजतात. आणि कोणी कर्म हें सुखदुःखाचें कारण मानितात. तसेंच कोणी निसर्गाला तर कोणी परमेश्वरालाच सुखदुःखाचें कारण मानितात. ( १९ ) परंतु कल्पनेनें जाणतां येणार नाहींत किंवा बोटांनीं दाखवितां येणार नाहींत, अशा अगम्य कारणां-पासूनच सुखदुःखें उत्पन्न होतात. म्हणून आपल्या कल्पनेनेंच माझ्या दुःखाचा निर्णय कर ( २० ) ( याप्रमाणें वृषभरूपी धर्माचें भाषण ऐकून धर्माच्या खऱ्या दुःखाचें कारण जाणलें, व राजा त्या शूद्ररूपी कलीस मारावयास सिद्ध झाला असतां कली राजास शरण आला. तेव्हां राजानें त्यास धर्मज्ञ अशा लोकांच्या वस्तींतून निघून जाण्याची आज्ञा केली. तेव्हां मीं कोठें रहावें अशी कलीनें विनंती केली असतां राजा म्हणाला—)

११३-११५

( व्यवहारांत निंद्य मानलेलीं स्थानें ) १-१७-३८,३९,४१

द्यूतं पानं स्त्रियः सूना यत्राधर्मश्चतुर्विधः ॥ ३८ ॥
ततोऽनृतं मदं कामं रजो वैरं च पञ्चमम् ॥ ३९ ॥
अथैतानि न सेवेत बुभूषुः पुरुषः क्वचित् ॥
विशेषतो धर्मशीलो राजा लोकपतिर्गुरुः ॥ ४१ ॥

जेथें जुगार, मद्यपान आणि व्यभिचार अशा तीन गोष्टी चालतात त्या ठिकाणीं तूं रहा ( ३८ ) त्याचप्रमाणें ज्याठिकाणीं सुवर्णाचा व्यवहार होत असेल, खोटें बोलत असतील, व उन्माद, इच्छा, हिंसादि कृत्यें आणि शत्रुत्व इत्यादि गोष्टी होत असतील अशीं पांच स्थानें कलीस नेमून दिलीं. ( ३९ ) याकरितां ज्या पुरुषास स्वतःचा उत्कर्ष व्हावा अशी इच्छा असेल त्यानें–जुगार, मद्यपान, वेश्या; तसेंच मनांत मोह उत्पन्न करणारे सुवर्णाचे ( द्रव्याचे ) व्यवहार, अनृतभाषण, उन्माद, इच्छा, हिंसा

व शत्रुत्व इत्यादि गोष्टींचा प्रादुर्भाव होईल अशा स्थानांपासून राजानें तसेंच लोकहित-कारी पुरुषांनीं कधींहि संबंध ठेवूं नये ( ४१ )

(भागवतकार म्हणतात,—कलीचा गुण असा आहे कीं, पूर्वयुगांत तपश्चर्या, यज्ञ-यागादि कृत्यें यांनीं सुद्धां मोक्ष मिळणें कठीण असे, परंतु कलियुगांत एका भगवंताच्या भक्तीनें जीवास मोक्षप्राप्ति होऊ शकते. शिवाय ह्या कलीचा प्रभाव अज्ञानी प्राण्यावर चालतो. ज्ञानी माणसाशीं गांठ पडतांच तो पळ काढतो. सारांश ज्ञानीपुरुषावर कलीचा पगडा बसूं शकत नाहीं. हा भावार्थ. असो. यापुढील अध्यायांत परीक्षित राजा शिकारीस गेला असतां तृषेनें व्याकूळ झाला व एका ऋषीच्या आश्रमांत गेला. परंतु ऋषि ध्यानस्थ असल्या-मुळें त्याजकडून राजाचें स्वागत झालें नाहीं. तेव्हां रागाच्या भरांत तेथें पडलेला एक मृत सर्प धनुष्यानें उचलून त्यानें ऋषीच्या गळ्यांत अडकविला व आपण निघून गेला. थोड्या वेळानें ऋषिपुत्र तेथें आला, व आपल्या पित्याचा असा अपमान केलेला पाहून तो क्रोधाविष्ट झाला, आणि त्या रागाच्या आवेशांत सारासार विचार न करितां-' ज्यानें माझ्या बापाचा अपमान केला तो सात दिवसांचे आंत सर्पदंशानें मरण पावो '- असा शाप दिला ! या कथाभागांत मानापमानाच्या भावनेनें परीक्षितासारख्या चतुर व ज्ञात्या राजाकडूनहि एका सत्पुरूषाची अवहेलना झाली व त्याच्या परिणामांत त्यास देहांतशिक्षा भोगावी लागली ! सारांश, अहंमन्यतेनें केव्हांहि थट्टा करणें वर्ज्य ठरविलें आहे. तसेंच रागाच्या आवेशांत कोणतेंहि कृत्य करणे किती अहितावह होतें, हें ऋषिपुत्रानें उतावळेपणानें दिलेल्या शापावरून दाखविलें आहे. या ठिकाणीं भागवतकारांनीं ऋषीच्या मुखानें पुढील श्लोक वदविले आहेत. )

११६-११७

( उतावळेपणानें कोणतेंहि कृत्य करूं नये ) १-१८-४१,४३

निशम्य शप्तमतदर्हं नरेन्द्रं स ब्राह्मणो नात्मजमभ्यनन्दत् ॥
अहो बतांहो महदद्य ते कृतमल्पीयसि द्रोह उरुर्दमो धृतः ॥४१॥
अलक्ष्यमाणे नरदेवनाम्नि रथाङ्गपाणावयमङ्ग लोकः ।
तदा हि चोरप्रचुरो विनंक्ष्यत्यरक्ष्यमाणोऽविवरूथवत्क्षणात् ॥४३॥

शापाला सर्वस्वी अयोग्य अशा त्या राजाला आपल्या मुलानें शाप दिल्याचें ऐकून त्या महामुनीस अत्यंत वाईट वाटलें. ते त्या पुत्रास म्हणाले-' मुला, तूं किती अज्ञानी ( मूर्ख ) आहेस ! तुझ्या हातून हें केवढें मोठें पातक झालें ! एवढ्याशा अपराधाबद्दल तूं केवढा हा मोठा दंड केलास ! ( ४१ ) अरे मुला, राजा म्हणजे विष्णूचा अवतार होय. तो जर पृथ्वीवरून नाहींसा होईल, तर चोरांचा सुळसुळाट होईल, लोकरक्षणाचें कार्य बंद पडेल, आणि रक्षक नसलेल्या मेंढयांच्या कळपाप्रमाणें सर्व समाज नाश पावेल. ( ४३ ) ( आवेशाच्या भरांत कोणतेंहि कर्म करूं नये हा भावार्थ. )

( सारांश, आपल्या पुत्रानें उतावळेपणांत केलेल्या कृत्याबद्दल त्या महामुनीस अत्यंत वाईट वाटलें. याठिकाणीं थोरांच्या कृतीस उद्देशून भागवतकार म्हणतात— )

११८–११९

( थोर पुरुष केव्हांहि प्रतिकार करीत नाहींत ) १–१८–४८,५०

तिरस्कृता विप्रलब्धाः शप्ता क्षिप्ता हतापि वा ॥
नास्य तत्प्रतिकुर्वन्ति तद्भक्ताः प्रभवोपि हि ॥ ४८ ॥
प्रायशः साधवो लोके परैर्द्वन्द्वेषु योजिताः ॥
न व्यथन्ति न हृष्यन्ति यत आत्माऽगुणाश्रयः ॥ ५० ॥

जे भगवद्भक्त असतात त्यांचा कोणी तिरस्कार करो, कोणी त्यांना फसवो, कोणी निंदा करो, शाप देवो, किं ताडन करो, त्यांच्या ठायीं प्रतिकार करण्याचें सामर्थ्य असतांहि ते त्याचा प्रतिकार करीत नाहींत (४८) कारण त्यांचा आत्मा त्रिगुणांपासून अलिप्त असतो. त्यामुळें कोणी त्यास दुःख दिल्यास त्यांस दुःख होत नाहीं. तसेंच कोणी सुख दिल्यास त्यापासून त्याच्या मनाला आनंद होत नाहीं ( ५० )

( शमीक ऋषीच्या पुत्रानें दिलेलें शापवचन त्या ज्ञानी परीक्षित राजास ऋषीकडून समजल्यावर त्यास जरी आपल्या हातून घडलेल्या अपराधाबद्दल पूर्वीच पश्चात्ताप झाला होता, तरी त्यानें विचारपूर्वक सर्वसंगपरित्याग करून प्रायोपवेशनाचा निश्चय केला आणि श्रीशुकाचार्यांच्या मुखानें ज्यांत भगवंताच्या गुणांचें वर्णन केलें आहे अशी जी भागवतसंहिता तिच्या श्रवणास आरंभ केला. याप्रमाणें प्रथमस्कंध येथें पूर्ण झाला. )

# द्वितीय स्कंन्ध.

या स्कंधाचे दहा अध्याय आणि ३९१ श्लोक आहेत. यांत शुकाचार्यांनें परीक्षिताला भागवत सांगण्यास सुरुवात केली आहे. योगधारणेच्या योगानें योग्यांना मिळणारी ऊर्ध्वगति, ब्रह्मदेव-नारद-संवाद, भगवंताचे अवतार आणि विराट् पुरुषाचें वर्णन इत्यादि विषय यांत आहेत. नवव्या अध्यायांत श्लोक ३२ ते ३५ अत्यंत गुह्य असें चतुःश्लोकी भागवत आहे. आपला मरणकाळ जवळ आला असतां आत्मोद्धारार्थ मनुष्यानें काय केलें पाहिजे, असा राजानें प्रश्न केला असतां शुकाचार्य परीक्षिताला सांगतातः—

१२०

( मनुष्याचें आयुष्य निद्रा व विषयसेवनांत खर्च होतें. ) २–१–३

निद्रया ह्रियते नक्तं व्यवायेन च वा वयः ॥
दिवा चार्थेहया राजन्कुटुम्बभरणेन वा ॥ ३ ॥

मनुष्याचें रात्रींतील आयुष्य निद्रा घेण्यांत अथवा विषयसेवनांत निघून जातें, आणि दिवसाचा भाग द्रव्य मिळवून आपल्या कुटुंबाचें पालन-पोषण करण्यांत खर्च होतो ( ३ )

१२१

( नश्वर पदार्थ दिसत असूनहि उमज पडत नाहीं ) २–१–४

**देहापत्यकलत्रादिष्वात्मसैन्येष्वसत्स्वपि ॥**
**तेषां प्रमत्तो निधनं पश्यन्नपि न पश्यति ॥ ४ ॥**

आपला देह, आपलीं मुले, आपली स्त्री इत्यादि सर्व परिवार वस्तुतः मिथ्या आहे व तो केव्हां तरी नष्ट होणारच, हें दिसत असतांहि अज्ञानामुळें त्याचा उमज मनुष्याला पडत नाहीं ( ४ )

१२२

( मोक्षेच्छूनें भगवंताची भक्ति करावी ) २–१–५

**तस्माद्भारत सर्वात्मा भगवान्हरिरीश्वरः ॥**
**श्रोतव्यः कीर्तितव्यश्च स्मर्तव्यश्चेच्छताऽभयम् ॥ ५ ॥**

याकरितां, राजा, मोक्षपद मिळविण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें, संसारबंधनें नष्ट करणारा, आणि स्थावरजंगम-जगतामध्यें भरून राहिलेला असा जो षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वर, त्याच्या गुणानुवादाचें वारंवार श्रवण करावें, त्याचें कीर्तन करावें आणि यांचेंच स्मरण करावें ( ५ )

१२३

( धर्माचरणपूर्वक ईश्वरस्मरण हेंच जन्माचें सार्थक ) २–१–६

**एतावान्सांख्ययोगाभ्यां स्वधर्मपरिनिष्ठया ॥**
**जन्मलाभः परः पुंसामन्ते नारायणस्मृतिः ॥ ६ ॥**

आपल्या धर्मावर पूर्ण निष्ठा ठेवून, आत्मानात्मविचार आणि अष्टांगयोगाचें साधन, यांच्या योगानें मरणसमयीं भगवान् नारायणाचें स्मरण राहील असें करणें, हेंच पुरुषाचें जन्मास आल्याचें खरें सार्थक होय ( ६ )

१२४

( निर्गुणोपासकहि भगवंताच्या लीला गातात ) २–१–७

**प्रायेण मुनयो राजन्निवृत्ता विधिषेधतः ॥**
**नैर्गुण्यस्था रमन्ते स्म गुणानुकथने हरेः ॥ ७ ॥**

श्रुति-स्मृति-पुराणांमध्यें अवश्य करण्यास सांगितलेलीं, तसेंच निषिद्ध म्हणून मानिलेलीं, अशीं दोन्हीं कर्मे सोडून देऊन, केवळ निर्गुण परब्रह्माच्या ठिकाणीं निमग्न झालेले, असे मोठे मननशील ऋषिजन सुद्धां बहुशः श्रीहरीचे गुणानुवाद वर्णन करण्यांत रमून जातात. ( सारांश, भगवद्भजन हेंच मोक्षाचें साधन म्हटलें आहे )

१२५

( नामस्मरण सर्व इच्छा पूर्ण करणारें आहे. ) २-१-११

एतन्निर्विद्यमानानामिच्छतामकुतोभयम् ॥

योगिनां नृप निर्णीतं हरेर्नामानुकीर्तनम् ॥ ११ ॥

हे राजा, ईश्वराचें नामसंकीर्तन, हें कामी पुरुषांच्या सर्व कामना पूर्ण करणारें, ज्ञानेच्छूंना ज्ञानोत्पत्ति करून देणारें आणि मोक्षेच्छूंना मोक्षप्राप्ति करून देणारें निर्भय साधन आहे, असा शास्त्रांचा सिद्धान्त आहे.

१२६

( पुष्कळ कर्म करण्यापेक्षां ज्ञानपूर्वक झालेलें थोडें कर्म श्रेयस्कर होय ) २-१-१२

किं प्रमत्तस्य बहुभिः परोक्षैर्हायनैरिह ॥

वरं मुहूर्तं विदितं घटेत श्रेयसे यतः ॥ १२ ॥

या मृत्युलोकांत एखादा मूर्ख मनुष्य परिणामाकडे दृष्टि न देतां, पुष्कळ वर्षेपर्यंत कांहीं निष्फळ खटाटोप करीत बसला, तर त्याचा काय उपयोग ? त्यापेक्षां दोन घटका कां होईना, ज्ञानपूर्वक जर त्यानें कोणतेंहि काम केलें तर तेंच चांगलें. कारण त्यापासूनच कल्याण होतें. ( सारांश, व्यर्थ खटाटोपापेक्षां दोन घटकाच कां होईना एकाग्रचित्त करून भगवंताचें नामस्मरण करणेंच श्रेयस्कर होय हा भावार्थ )

१२७

( अंतकाळीं ममता सोडावी ) २-१-१५

अन्तकाले तु पुरुष आगते गतसाध्वसः ॥

छिन्द्यादसङ्गशस्त्रेण स्पृहां देहेऽनु ये च तम् ॥ १५ ॥

आपला अंतकाल समीप आला असें समजलें म्हणजे पुरुषानें प्रथमतः मरणाचें भय सोडावें. नंतर वैराग्यरूप शस्त्रानें आपल्या देहाची आणि तत्संबंधानें स्त्रीपुत्रादिकांची ममता तोडून टाकावी.

१२८-१२९

( वैराग्यपूर्वक ॐकाराचा जप करावा ) २-१-१६,१७

गृहात्प्रव्रजितो धीरः पुण्यतीर्थजलाप्लुतः ॥

शुचौ विविक्त आसीनो विधिवत्कल्पितासने ॥ १६ ॥

अभ्यसेन्मनसा शुद्धं त्रिवृद्ब्रह्माक्षरं परम् ॥

मनो यच्छेज्जितश्वासो ब्रह्मबीजमविस्मरन् ॥ १७ ॥

नंतर मोठें धैर्य धरून, वैराग्यपूर्वक घरादाराचा त्याग करावा, व पवित्र तीर्थांत स्नान करावें. मग पवित्र अशा एकांत स्थळीं शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें सिद्ध केलेल्या

आसनावर बसावें (१६)आणि मनानें शुद्ध म्हणजे संकल्प विकल्पादि उपाधिरहित व अकार-उकार-मकारांनीं युक्त अशा सर्वोत्तम ॐकाराचा जप करावा. नंतर त्या ॐकाराला न विसरतां जप करीत श्वासोच्छ्वासाचें नियमन करून मनाला स्वाधीन करून घ्यावें.(१७)

१३०

( मनाला बुद्धीच्या साहाय्यानें ईशचिंतनास लावावें ) २–१–१८

**नियच्छेद्विषयेभ्योऽक्षान्मनसा बुद्धिसारथिः ॥**
**मनः कर्मभिराक्षिप्तं शुभार्थे धारयेद्धिया ॥१८॥**

नंतर सदसद्विवेकबुद्धीला पुढें करून, पुरुषानें विषयोन्मुख इंद्रियांना त्या वशीकृत मनाच्या योगानें त्या त्या विषयापासून पराङ्मुख करावें, आणि अनेकप्रकारच्या वासनानां व्यग्र झालेल्या मनाला, बुद्धीच्याच साहाय्यान भगवद्रूपाचें ध्यान करण्यास लावावें.

१३१

( मनाची प्रसन्नता तेंच भगवंताचें स्थान ) २–१–१९

**तत्रैकावयवं ध्यायेदव्युच्छिन्नेन चेतसा ॥**
**मनो निर्विषयं युङ्क्त्वा ततः किंचन न स्मरेत् ॥**
**पदं तत्परमं विष्णोर्मनो यत्र प्रसीदति ॥ १९ ॥**

याप्रमाणें भगवंताच्या स्वरूपांत चित्त अढळ केल्यावर, पायांपासून मस्तकापर्यंतच्या त्याच्या एकएका अवयवाचें क्रमाक्रमानें ध्यान करावें. याप्रमाणें मनाला विषयपराङ्मुख करून भगवंताच्या रूपावर स्थिर केल्यावर दुसऱ्या कशाचेंहि स्मरण करूं नये. अशा रीतीनें ज्या ठिकाणीं मन प्रसन्न होतें, तेंच श्रीविष्णूचें श्रेष्ठ स्थान होय (१९)

१३२

( धारणेनें मन आवरावें ) २–१–२०

**रजस्तमोभ्यामाक्षिप्तं विमूढं मन आत्मनः ॥**
**यच्छेद्धारणया धीरो हन्ति या तत्कृतं मलम् ॥ २० ॥**

रजोगुणी व तमोगुणी विषयांनीं मनाला आपल्याकडे वळवून घेतल्यामुळें तें बहकून जातें; करितां धैर्यवान् पुरुषानें धारणायोगानें त्याला आवरून धरावें. कारण धारणाच्या योगानें रज आणि तम यांनीं उत्पन्न केलेले दोष नष्ट होतात ( २० )

( सारांश, सर्व वस्तूंची ममता सोडून मन एकाग्र करून आत्मस्वरूपीं लीन व्हावें हा भावार्थ. यापुढे श्लोक तेवीसपासून अडतीस पर्यंत भगवंताच्या विराट्स्वरूपाचें वर्णन दिलें असून मन, आत्मा व परमात्मा याचें विवरण केलें आहे. त्यांतील निवडक श्लोक.)

१३३

( सच्चिदानंदस्वरूपींच आसक्ति ठेवावी ) २–१–३९

**स सर्वधीवृत्त्यनुभूतसर्व आत्मा यथा स्वप्नजनेक्षितैकः ॥**
**तं सत्यमानन्दनिधिं भजेत नान्यत्र सज्जेद्यत आत्मपातः ॥**

जसा एखादा पुरुष झोंपीं गेला असतां स्वप्नांत त्याचा जीवात्मा स्वतःच अनेक व्यक्ति होऊन त्या त्या अनेक सुखदुःखांचे अनुभव घेतो, त्याप्रमाणेंच हा परमात्माहि सर्वांच्या अंतर्यामीं साक्षिरूपानें राहून त्यांच्या बुद्धिवृत्तीस प्रेरणा करून सर्वप्रकारचा अनुभव घेत असतो, पण तो स्वतः मात्र ज्ञानबलाच्या योगानें त्यांत बद्ध होत नाहीं. म्हणून त्या सच्चिदानंदस्वरूपी परमेश्वराचीच सदा उपासना करावी. दुसऱ्या कसल्याहि विषयावर आसक्ति ठेवूं नये; कारण त्यापासून आपला अधःपात होण्याचा संभव आहे.

१३४

( मायामय कर्मांत आसक्त होऊं नये ) २–२–२

**शाब्दस्य हि ब्रह्मण एष पन्था यन्नामभिर्ध्यायति धीरपार्थैः ॥**
**परिभ्रमंस्तत्र न विन्दतेऽर्थान्मायामये वासनया शयानः ॥**

एकदां झोंपीं गेलेला मनुष्य जागृतावस्थेंत पाहिलेल्या अथवा ऐकिलेल्या अशा विषयावर लुब्ध झाल्यामुळें स्वप्नांत सुद्धां ज्याप्रमाणें तेच ते विषय पाहून त्याकडे धांव घेतो, व शेवटीं जागा झाल्यावर निराश होतो, त्याप्रमाणें कांहींतरी कर्म करीत असतां, ' मी करितों हें वेदमार्गाला अनुकूलच आहे, ' असें समजून साधक पुरुषाचें मन अर्थशून्य अशा स्वर्गादि नांवाना भुलून मनोरथतरंगांत गटंगळ्या खात असतें, पण त्या मायामय मार्गानें, आशेनें भटकतां भटकतां त्याचा कोणताहि मनोरथ साध्य मात्र होत नाहीं ( २ ) ( सारांश, मायामय खटाटोपी ह्या व्यर्थ होत. )

१३५

( अधिक संग्रह करूं नये ) २–२–३

**अतः कविर्नामसु यावदर्थः स्यादप्रमत्तो व्यवसायबुद्धिः ॥**
**सिद्धेऽन्यथाऽर्थे न यतेत तत्र परिश्रमं तत्र समीक्षमाणः ॥३॥**

हे राजा, भोग्य पदार्थ मिळविण्यांत परिश्रम किती होतात हें विचारी पुरुषानें नीट लक्षांत घ्यावें, आणि मनाचा दृढ निश्चय करून सावधानपणें आपल्या निर्वाहापुरतें मात्र ते भोग्य पदार्थ मिळविण्याचे श्रम करावे. पण निर्वाह झाला असतां अधिक मिळविण्याचा आग्रह कधीं धरूं नये. (३)

१३६

( परमेश्वरानें शरीररक्षणासाठीं सर्व कांहीं योजना आयती तयार करून ठेविली आहे, तिच्यासाठीं श्रमांची गरजच नाहीं. ) २–२–४.

**सत्यां क्षितौ किं कशिपोः प्रयासैर्बाहौ स्वसिद्धे ह्युपबर्हणैः किम् ॥**
**सत्यञ्जलौ किं पुरुधान्नपात्र्या दिग्वल्कलादौ सति किं दुकूलैः ॥**

निजण्यासाठीं पृथ्वी मोकळी असतां गाद्यांची खटपट कशाला ? स्वतःचे बाहु उशाला घ्यावयाला असल्यावर उशांची काय गरज आहे ? पाणी पिण्यासाठीं व अन्न खाण्यासाठीं ओंजळी सिद्ध असतां अनेक-प्रकारचीं भांडीं तरी कशाला पाहिजेत ? तसेंच अंग झांकावयास दिशारूप वस्त्रें आणि वल्कलें सिद्ध असतां उंची रेशमीं वस्त्रें मिळविण्याची खटपट कां करावी ? (४)

१३७

( आत्मस्वरूपीं लीन झाल्यानें मायेचा नाश होतो ) २–२–६

**एवं स्वचित्ते स्वत एव सिद्ध आत्मा प्रियोऽर्थो भगवाननन्तः ॥**
**तं निर्वृतोऽनियतार्थो भजेत संसारहेतूपरमश्च यत्र ॥ ६ ॥**

यास्तव आपल्याच अंतःकरणांत निवास करणारा स्वतःसिद्ध जो सर्वप्रिय, सत्य-स्वरूप व अविनाशी असा भगवान् आत्मा आहे, त्याचें निश्चित मनानें आणि आनंदानें भजन करीत रहावें. कारण तसें केल्यानेंच संसाराला कारणीभूत आशा मायेचा नाश होतो.

( यानंतर योग्याच्या गतीच्या मार्गाचें वर्णन, व जी इच्छा असेल त्या देवतेची सकाम भक्तांनीं उपासना करावी, पण मोक्षमार्गाला सहाय्यक भक्तियोगच होय. त्यावांचून सर्व खटपटी व्यर्थ होत. भगवद्भक्तीशिवाय जगणें म्हणजे पशुसारखेंच होय; कारण–)

१३८

( भगवद्भक्तीवांचून जगणें पशुप्रमाणें होय ) २–३–१८

**तरवः किं न जीवन्ति भस्त्राः किं न श्वसन्त्युत ॥**
**न खादन्ति न मेहन्ति किं ग्रामपशवोऽपरे ॥ १८ ॥**

जगण्याचेंच काम असेल तर वृक्ष देखील तें करीत नाहींत काय ? जगणें म्हणजे केवळ श्वासोच्छ्वास करणें असेल तर लोहारादिकांचे भातेहि तेवढें काम करतात, आणि खाणें पिणें व मलमूत्राचा उत्सर्ग करणें हेंच जर जगण्याचें चिन्ह असेल तर, ती गोष्ट इतर गुरांढोरांसारख्या पशुकडून सुद्धां घडत असते.

१३९

( अभक्ताची इंद्रियेंहि निरर्थक होत ) २-३-२०

**बिले बतोरुक्रमविक्रमान्ये न शृण्वतः कर्णपुटे नरस्य ॥**
**जिह्वासती दार्दुरिकेव सूत न चोपगायत्युरुगायगाथाः ॥**

जो मनुष्य त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराचे पराक्रम श्रवण करीत नाहीं, त्याचे कान म्हणजे केवळ दोन छिद्रें होत. तसेंच जी जीभ त्या अतुलकीर्ति परमात्म्याच्या चरित्रांचें गायन करीत नाहीं, ती दुष्ट असून निरर्थक बडबड करणाऱ्या बेडकाच्या जिभेसारखीच होय. ( २० )

१४०

( भक्तिव्यतिरिक्त शरीरावरील अलंकार भारभूत होत ) २-३-२१

**भारः परं पट्टकिरीटजुष्टमप्युत्तमांगं न नमेन्मुकुन्दम् ॥**
**शावौ करौ नो कुरुतः सपर्यां हरेर्लसत्काञ्चनकंकणौ वा ॥**

फेटा, मुकुट इत्यादिकांनीं सुशोभित झालेलें असूनहि मनुष्याचें मस्तक जर श्रीकृष्णापुढें नम्रतापूर्वक लवणार नाहीं, तर तें केवळ भारभूत होय. तसेंच तेजस्वी सुवर्णाच्या कंकणादिकांनीं मंडित असे दोन हात जर भगवंताची पूजा करणार नाहींत, तर तेहि प्रेताच्या हाताप्रमाणेंच समजावे. ( २१ )

१४१

( मनुष्यांचीं इंद्रियें ईश्वर भक्तिकरितांच आहेत ) २-३-२२

**बर्हायिते ते नयने नराणां लिंगानि विष्णोर्न निरीक्षतो ये ॥**
**पादौ नृणां तौ द्रुमजन्मभाजौ क्षेत्राणि नानुव्रजतो हरेर्यौ ॥**

श्रीविष्णूच्या मूर्तीचें दर्शन न घेणारे मनुष्याचे डोळे म्हणजे मोराच्या पिसाऱ्यावरील डोळ्याच्या आकृतीच केवळ होत. तसेंच जे मनुष्यांचे पाय भगवंताच्या पवित्र तीर्थांना गमन करीत नाहींत, ते पाय वृक्षाप्रमाणें जड समजावे. ( २२ )

१४२

( सर्व नारायणस्वरूपच आहे ) २-५-१५

**नारायणपरा वेदा देवा नारायणाङ्गजाः ॥**
**नारायणपरा लोका नारायणपरा मखाः ॥**

सारे वेद नारायणस्वरूपीच होत, तसेच देवहि नारायणाच्या शरीरापासूनच उत्पन्न झाले. हें त्रैलोक्य त्याच्यावरच अवलंबून आहे आणि यज्ञ देखील नारायणाच्या प्रीतीसाठींच होत. ( सर्व नारायणस्वरूपी मानणें हा भावार्थ )

१४३

( कर्म नारायणाकरितांच करावयाचें ) २-५-१६

**नारायणपरो योगो नारायणपरं तपः ॥**
**नारायणपरं ज्ञानं नारायणपरा गतिः ॥**

अष्टांगादि योग नारायणाकरितांच करावयाचे आणि तपश्चर्याहि नारायणप्राप्तीसाठींच आहे. ज्ञानाला सर्वस्वी आधार नारायणाचाच आहे आणि प्राणिमात्रांचें अंतिम आश्रय-स्थान नारायणच होय. (यानंतर विराट्स्वरूपाचें सविस्तर वर्णन करून ब्रह्मदेव म्हणाला-)

१४४-१४५

( शांत चित्तानें योगी आदिपुरुषाच्या स्वरूपाला पाहतात ) २-६-३९,४०.

**विशुद्धं केवलं ज्ञानं प्रत्यक्सम्यगवस्थितम् ॥**
**सत्यं पूर्णमनाद्यन्तं निर्गुणं नित्यमद्वयम् ॥ ३९ ॥**
**ऋषे विदन्ति मुनयः प्रशान्तात्मेन्द्रियाशयाः ॥**
**यदा तदेवासत्तर्कैस्तिरोधीयेत विप्लुतम् ॥ ४० ॥**

त्या आदिपुरुषाचें स्वरूप अत्यंत शुद्ध, निर्विकार, ज्ञानस्वरूप, सर्वान्तर्यामी, सर्वत्र स्थिर असलेलें, सत्यस्वरूप, आदि-अंतरहित, पूर्णस्वरूपाचें, गुणापासून अलिप्त, सनातन आणि एकटें एकच आहे. ( ३९ ) बुद्धि, इंद्रियें आणि अंतःकरण हीं शांत करून जेव्हां मननशील ऋषी त्याचें ध्यान करितात, तेव्हांच त्याचें ज्ञान त्यांना होतें. पण दुष्ट तर्कांनीं मन व्याप्त झालेलें असतां तें स्वरूप गुप्त होतें ( ४० ) ( यानंतर भगवंतानीं अनेक कारणाकरितां घेतलेल्या अवतारांची माहिती सांगून ब्रह्मदेव सांगतात— )

१४६

( जे सर्वस्वाचा त्याग करतात त्यावरच भगवान् कृपा करतो ) २-७-४२

**येषां स एव भगवान्दययेदनन्तः**
**सर्वात्मनाश्रितपदो यदि निर्व्यलीकम् ॥**
**ते दुस्तरामतितरन्ति च देवमायां**
**नैषां ममाहमिति धीः श्वशृगालभक्ष्ये ॥ ४२ ॥**

जेथें निष्कपटपणा असेल तेथें भगवंताची कृपा होते. जे कोणी सर्वस्व अर्पण करून याच्या पदाचा आश्रय करतात, त्यांच्यावर तो परमेश्वर कृपा करतो आणि मग ते तरून जाण्यास कठीण अशा ईश्वरी मायेला तरून जातात. मग त्यांची ममत्वबुद्धि कुत्र्या-कोल्ह्यांच्या भक्ष्यस्थानीं पडण्यासच योग्य अशा या शरीरावर रहातच नाहीं.

( सारांश, निष्कपटभक्ति श्रेष्ठ होय. यापुढें आठव्या अध्यायांत परीक्षितानें अनेक प्रश्न केले आहेत व त्यांच्या उत्तरांत परमेश्वराचें स्वरूप व ब्रह्मदेवकृत सृष्टीची उत्पत्ती याचें विवरण श्रीशुकाचार्यांनीं केलें आहे. त्यांतील निवडक श्लोक )

१४७

( स्वानंदाचा अनुभव हेंच परमात्मस्वरूप. ) २-९-१

**आत्ममायामृते राजन्परस्यानुभवात्मनः ॥**
**न घटेतार्थसंबन्धः स्वप्नद्रष्टुरिवाञ्जसा ॥ १ ॥**

आनंदानुभव हेंच परमात्म्याचें स्वरूप होय. पण स्वप्नांत विविध पदार्थ पहाणारा पुरुष जसा त्याच्याशीं आपला संबंध मानितो, त्याप्रमाणें मायेचा आश्रय करावा तेव्हांच आत्मा आणि जड वस्तु यांचा संबंध भासूं लागतो. खरोखर पाहिलें तर तो संबंध कधींच घडत नाहीं. ( सारांश, जडवस्तु ह्या स्वप्नवत् मिथ्या होत )

१४८

( मायेमुळें अहंकार उत्पन्न होतो ) २-९-२

**बहुरूप इवाभाति मायया बहुरूपया ॥**
**रममाणो गुणेष्वस्यां ममाहमिति मन्यते ॥**

माया हीच स्वतः अनेक रूपें धारण करते, व त्यामुळें आत्माहि तशींच नाना रूपें घेतो असें भासतें. सत्व, रज आणि तम हे जे मायेचे गुण, त्या गुणांत आत्मा रममाण झाला म्हणजेच तो, मी हा असा, आणि हे माझें, असें मानूं लागतो. (वस्तुतः तो गुणांपासून अगदीं अलिप्त आहे. )

१४९

( ईश्वरमहिमा अगाध आहे. ) २-९-३

**यर्हि वाव महिम्नि स्वे परस्मिन्कालमाययोः ॥**
**रमेत गतसंमोहस्त्यक्त्वोदास्ते तदोभयम् ॥**

ईश्वराचा महिमा काळ आणि माया यांच्या पलीकडे आहे. तो महिमा समजून आत्मा जेव्हां आपल्या निर्मळ स्वरूपांत रंगूं लागतो, तेव्हां त्याचा सर्व भ्रम नाहींसा होतो. प्रकृतीच्या कार्याशीं संबंध असणारा असा मी आहें, आणि हीं कार्यें माझींच होत, अशाप्रकारची त्याची भावना तेव्हां नष्ट होते; आणि तो आपल्या खऱ्या तटस्थ अशा केवळ साक्षिरूपानें राहूं लागतो.

१५०

( तप हें वैराग्यशाली पुरुषाची ठेवच होय. ) २-९-६

**स चिन्तयन्द्व्यक्षरमेकदाम्भस्युपाशृणोद्द्विर्गदितं वचो विभुः ॥**
**स्पर्शेषु यत्षोडशमेकविंशं निष्किञ्चनानां नृप यद्धनं विदुः ॥**

सर्वव्यापी ब्रह्मदेव, सृष्टि कशी उत्पन्न करावी याविषयीं विचार करीत बसला असतां पाण्यांतून उच्चारिलेला ‘ तप ’ असा ध्वनि त्याला दोन वेळ ऐकूं आला.

'तप' शब्द स्पर्श नामक जीं 'क' पासून 'म' पर्यंतचीं पंचवीस अक्षरें, त्यांतील सोळावें 'त' आणि एकविसावें 'प' या दोन अक्षरांमिळून झालेला आहे. हा तप शब्द म्हणजे सर्व धनाचा ज्यांनीं त्याग केलेला आहे, त्या वैराग्यशाली पुरुषांचा ठेवाच होय असें ज्ञाते समजतात (६)

(सारांश, तपावाचून कोणतीहि कार्यसिद्धि होत नाहीं, असें याठिकाणीं दर्शित केलें आहे. ब्रह्मदेवानें कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें स्वाधीन करून सहस्र वर्षें तप केल्यानंतर तो सृष्टिरचनेच्या कार्यास योग्य झाला. तेव्हां भगवान् प्रगट होऊन म्हणतात--)

१५१

(तप हेंच परमात्म्याचें हृदय होय) २-९-२२

**प्रत्यादिष्टं मया तत्र त्वयि कर्मविमोहिते ॥**
**तपो मे हृदयं साक्षादात्माऽहं तपसोऽनघ ॥ २२ ॥**

हे निष्पाप ब्रह्मदेवा, तुला सृष्टि कशी निर्माण करावी हें जेव्हां समजेना, तेव्हां मीच तुला तप करण्याचा उपदेश केला. हें तप म्हणजे माझें प्रत्यक्ष हृदय होय, आणि मीहि तपाचें हृदय आहें. (तप आणि मी हीं एकरूपच आहों)

१५२

(तप हेंच सर्वसमर्थ आहे) २-९-२३

**सृजामि तपसैवेदं ग्रसामि तपसा पुनः ॥**
**बिभर्मि तपसा विश्वं वीर्यं मे दुश्चरं तपः ॥ २३ ॥**

मीं हें सारें विश्व तपाच्या योगेंच उत्पन्न करितों व पुनः तपानेंच आपल्या स्वरूपांत लीन करून घेतों. विश्वाचें पोषणहि मीं तपाच्या योगेंच करतों. माझें सारें दुर्घट सामर्थ्य म्हणजे तपच होय.

१५३

(त्रिकालाबाधित मी एकच परमात्मा आहे) २-९-३२

**अहमेवासमेवाग्रे नान्यद्यत्सदसत्परम् ॥**
**पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम् ॥**

सर्वांच्या आरंभीं केवळ मीच होतों, अव्यक्त किंवा व्यक्त यांच्या पलीकडे माझ्याशिवाय दुसरें कांहींच नव्हतें, व सृष्टि उत्पन्न झाल्यावर पाहिलें तरी जें हें सर्व कांहीं आहे तें मीच आहे. तसेंच सृष्टीचा लय झाला म्हणजे जें अवशिष्ट राहील तेंहि मीच असावयाचें. अशा रीतीनें मी अनादि व अनंत असून, माझ्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं.

१५४

( वस्तुस्थिति आहे त्याहून निराळी दिसणें ही माया होय ) २-९-३३

**ऋतेऽर्थं यत्प्रतीयेत न प्रतीयेत चात्मनि ॥**
**तद्विद्यादात्मनो मायां यथा भासो यथा तमः ॥**

वस्तुस्थिति असेल त्याहून निराळी भासणें हा प्रकार, (एका चंद्राचे दोन चंद्र दिसणें यासारखा) भ्रमांत अनुभवाला येतो. किंवा राहु आकाशांत असूनहि त्याचें दर्शन होऊं शकत नाहीं. त्याप्रमाणें आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं नसलेल्या गोष्टींचा प्रत्यय येतो, आणि असलेल्या गोष्टींचा प्रत्यय येत नाहीं. ह्या प्रकाराला आत्म्याची माया असें म्हटलें आहे

१५५

( परमात्मा सर्वत्र नेहमीं भरलेला आहे. ) २-९-३४

**यथा महान्ति भूतानि भूतेषूच्चावचेष्वनु ॥**
**प्रविष्टान्यप्रविष्टानि तथा तेषु न तेष्वहम् ॥**

पृथ्वी आदिकरून महाभूतें लहानमोठ्या प्राण्यांच्या ठिकाणीं प्रविष्ट झालेलीं दिसलीं, तरी वस्तुतः तीं ( मूळापासूनच कारणरूपानें त्यांत असल्यामुळें ) तशीं प्रविष्ट झालेलीं नव्हत. त्याप्रमाणें मींहि सर्व प्राण्यांमध्यें ओतप्रोत भरलेला दिसलों, तरी त्यांत मी मागाहून प्रवेश केला असें होत नाहीं. ( कारण मी तर विश्वाचें मूळकारणच आहें, तेव्हां माझा प्रवेश विश्वांत झाला असें म्हणण्यांत स्वारस्य काय ? )

( याप्रमाणें अत्यंत गुह्य असें ज्ञान सांगून भगवान् म्हणाले; ब्रह्मदेवा, एकाग्रचित्त करून तूं कर्तव्य कर, म्हणजे तुला अहंकाराची बाधा होणार नाहीं. भगवंताच्या आज्ञेनुरूप ब्रह्मदेवानें यम व नियम यांचें अनुष्ठान करून सृष्टि उत्पन्न केली; व आपला आवडता पुत्र जो नारद त्यानें प्रभूची लीला जाणण्याची इच्छा दर्शविली असतां दहा लक्षणांनीं युक्त असें हें भागवतपुराण त्यास कथन केलें. शुकाचार्य परीक्षिती राजास सांगतात, तेंच भागवत नारदानें श्रीव्यासास सांगितलें, आणि तेंच माझ्या पित्याकडून मला प्राप्त झालेलें भागवत मी तुला सांगतों. या भागवतांत सामान्यसृष्टि, विशेषसृष्टि, संरक्षण, सृष्टिपोषण, कर्मांची वासना, मन्वंतरांतील आचारधर्म, परमेश्वरी लीला, सृष्टिसंहार, मोक्ष आणि ईश्वरस्वरूप अशा दहा विषयांचें विवेचन आहे. हीं दहा लक्षणें आणि विराट्स्वरूप, यांचें वर्णन करून शुकाचार्य म्हणाले; सर्वांचा आश्रय असलेला हा विराट्-पुरुष जेव्हां ब्रह्मांड फोडून बाहेर पडला, तेव्हां आपणाला कांहीं स्थान असावें म्हणून त्यानें प्रथम उदक उत्पन्न केलें व तेथेंच त्यानें वास केला. त्यामुळें उदकांत राहणाऱ्या विराट्-पुरुषास नारायण असें नाम प्राप्त झालें ( नारा=उदक+अयन=स्थान ).

ारायणाची कृपा असेल तरच द्रव्य, कर्म, काळ, स्वभाव आणि जीव यांचें अस्तित्व ाहतें. यानंतर भगवंतानें आपल्या तेजोमय वीर्याचे अध्यात्म, अधिदैव व अधिभूत से तीन भाग करून त्यापासून सर्वांच्या अस्तित्वाला अवश्य असा प्राण निर्माण केला, ंद्रियें त्याच्या अनुरोधानें वागूं लागलीं. भागवतकार म्हणतात– )

१५६

( प्राण हा इंद्रियांचा चालक होय ) २–१०–१६

**अनुप्राणन्ति यं प्राणाः प्राणन्तं सर्वजन्तुषु ॥**
**अपानन्तमपानन्ति नरदेवमिवानुगाः ॥ १६ ॥**

राजाचे सेवक जसे ( तो जागयावर असला म्हणजे ) त्याला अनुसरून वागतात, याप्रमाणें सर्व प्राण्यांच्या शरीरांत तो प्राण संचार करतो. प्राण आहे तोंपर्यंत इंद्रियें याला अनुलक्षून हालचाल करतात आणि त्या प्राणानें आपला संचार बंद केला म्हणजे द्रियांचीहि हालचाल बंद होते. ( सारांश, इंद्रियें प्राणाधीन आहेत )

( यानंतर भगवंतानें मनुष्यशरीराची आणि एकएका इंद्रियाची उत्पत्ति कशी केली ाचें सविस्तर वर्णन करून शुकाचार्य सांगतात– )

१५७

( मायेच्या आश्रयानें ईश्वरच सर्व करितो. ) २–१०–३६

**स वाच्यवाचकतया भगवान्ब्रह्मरूपधृक् ॥**
**नामरूपक्रिया धत्ते सकर्माकर्मकः परः ॥**

परमेश्वर हा वस्तुतः कांहींच न करणारा आहे, पण मायेच्या योगानें तो ब्रह्मदेवाचें ्प धारण करून सर्वप्रकारचीं कर्मे करितो. तो मनुष्य, देव इत्यादिकांचा ज्यांच्यापासून ोध होईल अशीं राम, शंकर, इत्यादि नांवें, आणि त्यांना अनुरूप अशीं स्वरूपें घेतो तशा तशा क्रियाहि करतो. ( सारांश, लोकानुकरणार्थ परमेश्वराची क्रिया असते.)

( तात्पर्य परमेश्वर एकंदर सृष्टीची रचना आपल्या इच्छेप्रमाणें करतो; आणि ायु ज्याप्रमाणें आपणच रक्षण केलेल्या मेघपंक्तीचा नाश करतो, त्याप्रमाणें हा भगवान् ाल, अग्नि आणि रुद्र, अशीं रूपें धारण करून स्वतः उत्पन्न केलेल्या ह्या सृष्टीचा ्वतःच्या ठायीं लय करतो. तात्पर्य, परमेश्वर विराटस्वरूपानें सर्व कार्यें करतो. याप्रमाणें वेराट्स्वरूपाचें आणि ब्रह्मदेवाकडून सृष्टीच्या उत्पत्तीचें विवेचन ऐकल्यानंतर विदूरानें भाऊबंदांचा त्याग करण्याचें कारण काय, तें सांगण्याविषयीं ऋषींनीं सूतास प्रश्न केला, असतां ती कथा सूत सांगूं लागले. या ठिकाणीं द्वितीयस्कंध पूर्ण झाला. )

# तृतीय स्कंध.

( या स्कंधाचे तेहतीस अध्याय आणि १४११ श्लोक आहेत. या स्कंधांत सर्ग, विसर्ग यांचें विवेचन, वराह अवताराचें वर्णन व कपिलाख्यान इत्यादि विषय आले आहेत.)

( या स्कंधाचे आरंभीं कौरवपांडवाची मूळ कथा देऊन कौरवांकडून पांडवांचा छळ कसा झाला, कपटद्युतांत त्यांचें सर्वस्व दुर्योधनानें हरण करून त्यांस वनवासास कसें पाठविलें, आणि वनवासानंतर श्रीकृष्ण शिष्टाईकरितां धृतराष्ट्राकडे आले असतां त्या प्रसंगीं विदूरानें धृतराष्ट्रास नीतीचा उपदेश केला असतां दूर्योधनानें त्याचा अपमान कसा केला, आणि त्यामुळें सर्वांचा त्याग करून विदूर तीर्थयात्रेस कसे निघून गेले, त्यांनीं कोणतीं तीर्थें केलीं, आणि उद्धवाची व विदुराची भेट झाली असतां विदूर उद्धवाला श्रीकृष्णाचें कुशल विचारूं लागला, असा कथाभाग आहे. या ठिकाणीं भागवतकारांनीं विदुराकडून कृष्णपरमात्म्याविषयीं पुढील श्लोक वदविले आहेत. विदूर म्हणतो—)

१५८

( भगवंताचा अवतार लोकसंग्रहास्तव होतो.) ३–१–४४

**अजस्य जन्मोत्पथनाशनाय कर्माण्यकर्तुर्ग्रहणाय पुंसाम् ॥**
**नन्वन्यथा कोऽर्हति देहयोगं परो गुणानामुत कर्मतन्त्रम् ॥**

परमात्मा वस्तुतः जन्मरहित असतां जन्माला येतोसा जो दिसतो, तो दुराचरणीं लोकांचा नाश करण्याकरितांच, तसाच तो सर्वथा अकर्ता असतांहि कर्में करतोसें वाटतें, तेंहि लोकसंग्रह करण्यासाठींच होय. तसें नसेल तर सत्त्वरजादि गुणांहून निराळा असलेला कोणता पुरुष देह धारण करण्याची आणि कर्मविस्ताराची इच्छा करून त्यांच्या मागें लागेल? (४४)

१५९

( परमेश्वरच सगुणरूपानें कार्यकर्ता होतो ) ३-२–१५

**स्वशान्तरूपेष्वितरैः स्वरूपैरभ्यर्द्यमानेष्वनुकम्पितात्मा ॥**
**परावरेशो महदंशयुक्तो ह्यजोऽपि जातो भगवान्यथाग्निः ॥१५॥**

साधु इत्यादि शांत, आणि दैत्य इत्यादि अशांत, अशीं परमेश्वराचींच रूपें आहेत. त्यांत शांत रूपांना दुसऱ्या अशांत रुपांकडून पीडा झाली म्हणजे त्याच्या अंतःकरणांत दया उत्पन्न होते, आणि मग निर्गुण आणि सगुण अशा दोन्ही स्वरूपांचा तो स्वामी परमेश्वर महत्तत्त्व हें जीचा केवळ अंश आहे, अशा आपल्या प्रकृतीनें युक्त होऊन अग्नीप्रमाणें जन्मास येतो ( वस्तुतः अग्नि जसा काष्ठांना व्यापून असतो, पण घर्षणानें मात्र व्यक्त होतो, त्याप्रमाणें परमेश्वर सर्वस्वरूपांना व्यापणारा असून शांत व अशांत रूपांच्या घर्षणानें केवळ व्यक्तरूपास येतो.)

( भगवान् जन्मरहित आहे, परंतु पृथ्वीचा भार हलका करण्याकरितां तो पूर्ण अंश रूपानें वसुदेवाचे घरीं देवकीच्या उदरीं जन्म घेता झाला. तसाच तो सर्वसमर्थ असतांहि मनुष्याप्रमाणें कालयवनास भिऊन पळाला. भागवतकार म्हणतात–)

१६०

( श्रीकृष्णाची नम्रता ) ३–२–२२

**तत्तस्य कैङ्कर्यमलं भृतान्नो विग्लापयत्यङ्ग यदुग्रसेनम् ॥**
**तिष्ठन्निषण्णं परमेष्ठिधिष्ण्ये न्यबोधयद्देव निधारयेति ॥**

श्रीकृष्ण एवढा ऐश्वर्यशाली असतांहि उच्च सिंहासनावर बसलेल्या उग्रसेनापुढ उभा राहून ' महाराज, इकडे लक्ष ठेवा ' अशी ललकारी देऊन राजसभेंत जागृति ठेवीत असे; हें त्याचें सेवकपण माझ्यासारख्या त्याच्या भक्तांना फारच कष्टप्रद होतें.

( यापुढे भगवान् श्रीकृष्णानें गोकुळांत व मथुरेंत तसेंच भारतीय युद्धप्रसंगीं कसकसे पराक्रम करून दाखविले आणि शेवटीं उन्मत्त झालेल्या यादवांचा आपसांत कलह उत्पन्न करून कसा संहार केला, इत्यादि कथाभाग सांगून उद्धव म्हणतात; भगवान् निजधामाला जातांना मला ज्ञानोपदेश केला आणि याप्रसंगींच भगवंतानें मैत्रेयाला ज्ञानोपदेश करून त्याचा अनुग्रह तुला देण्याविषयीं त्यांनीं सांगितलें आहे. करितां तूं त्यांनाच शरण जा. त्याप्रमाणें विदूर मैत्रेयऋषींकडे गेला. या ठिकाणीं परिक्षित् राजानें शुकाचार्यास प्रश्न केला कीं, सर्व यादव नष्ट झाले व श्रीकृष्णानें सुद्धां देहाचा त्याग केला; असें असतां उद्धव मात्र जिवंत कसा राहिला? याचें उत्तर देतांना शुकाचार्य म्हणाले–आत्म स्वरूपाचें ज्ञान जगांत प्रगट करण्यास उद्धव हा एकच भक्तश्रेष्ठ आहे, हें लक्षांत घेऊन लोककल्याणाच्या इच्छेनें भगवंतानें उद्धवास मागें ठेविलें. असो, उद्धवाच्या सूचनेप्रमाणें विदूर हरिद्वारीं मैत्रेय ऋषीकडे गेला आणि त्यांची भेट घेऊन तो म्हणाला–या संसारांत प्राणिमात्रांस सुखप्राप्ति कोणत्या मार्गानें होईल ते सांगा. विदुरानें याप्रमाणें प्रश्न केला असतां मैत्रेय ऋषीनें विदुराची प्रशंसा करून भगवंताचे स्वरूप, व मायेच्या आधारानें जगाची उत्पत्ति तो कशी करतो इत्यादि वर्णन केलें. मैत्रेय ऋषि विदुरास सांगतात—

१६१–१६२

( ईश्वर सर्वाला कारण आहे ) ३–५–२३,२४

**भगवानेक आसेदमग्र आत्मात्मना विभुः ॥**
**आत्मेच्छानुगतावात्माऽनानामत्युपलक्षणः ॥ २३ ॥**
**स वा एष तदा द्रष्टा नापश्यद्दृश्यमेकराट् ॥**
**मेनेऽसन्तमिवात्मानं सुप्तशक्तिरसुप्तदृक् ॥ २४ ॥**

भगवान् परमात्मा हा सर्व जीवांचें स्वरूप असून त्यांचा स्वामी आहे. सृष्टीपूर्वी तो विविधरूपांनीं व्यक्त झालेला नसतो. त्या वेळीं इच्छारूपी त्याच्या मायेचा लय अस-

त्यामुळें तो एकटाच असतो ( २३ ) तेव्हां तो एकटाच प्रकाशमान असून दुसरें दृश्य कांहींच पहात नाहीं. त्याच्या इतर सर्व शक्ति सुप्त असून चिच्छक्ति मात्र जागृत असल्यामुळें त्यावेळीं तो स्वतः असूनहि नसल्यासारखाच त्याला वाटतो. ( २४ )

( मैत्रेयऋषि सांगतात, परमेश्वरांनीं आपल्या कलेपासून महत्तत्त्वादि देवता उत्पन्न केल्या त्या वेळीं त्या देवाला प्रार्थनापूर्वक म्हणूं लागल्या– )

१६३

( अहंकार नाशाला कारण होतो. ) ३–५-४३

यत्सानुबन्धेऽसति देहगेहे ममाहमित्यूढदुराग्रहाणाम् ॥
पुंसां सुदूरं वसतोऽपि पुर्यां भजेम तत्ते भगवन्पदाब्जम् ॥ ४३॥

देवता म्हणतात—हें देहरूपी घर सर्व परिवारासह नाशिवंत आहे; असें असतांहि 'हें माझें आहे, व मीं असा आहें' असा दुराग्रह त्या गृहादिकांच्या ठिकाणीं जे धारण करतात, ते लोक शरीर धारण करून राहणाऱ्या तुझ्या चरणकमलापासून फार दूर असतात. हे भगवन्, त्या तुझ्या चरणकमलाचें आम्हीं भजन करतो. ( ४३ )

१६४-१६५

( नामामृताचा सुलभ मार्ग ) ३–५-४५,४६

पानेन ते देव कथासुधायाः प्रवृद्धभक्त्या विशदाशया ये ॥
वैराग्यसारं प्रतिलभ्य बोधं यथाञ्जसान्वीयुरकुण्ठधिष्ण्यम् ॥ ४५ ॥
तथापरे चात्मसमाधियोगबलेन जित्वा प्रकृतिं बलिष्ठाम् ॥
त्वामेव धीराः पुरुषं विशन्ति तेषां श्रमः स्यान्न तु सेवया ते ॥४६॥

हे परमेश्वरा, अमृतासारख्या मधुर अशा तुझ्या कथा श्रवण करून जे आपली तुझ्याविषयींची भक्ति दृढ करतात, त्यांचीं अंतःकरणें शुद्ध होऊन वैराग्याचें रहस्य असें जें ज्ञान तें त्यांना प्राप्त होतें, व ते तत्काल तुझ्या वैकुंठस्थानाला प्राप्त होतात ( ४५ ) तसेच दुसरे जे योगी आहेत, तेहि परमात्म्याच्या ठिकाणीं चित्ताची एकाग्रता करून त्या सामर्थ्यानें बलिष्ठ अशा मायेवर विजय मिळवितात आणि शेवटीं तुझ्याच स्थानाला प्राप्त होतात. पण त्या योग्यांना असें करण्यांत फार श्रम होतात, आणि जे तुझी सेवा करतात त्यांना तसे श्रम पडत नाहींत. ( असा त्या दोन मार्गांमध्यें विशेष आहे. )

( देवतांची प्रार्थना ऐकून प्रसन्न झालेल्या भगवंतानें काल नामक शक्तीला धारण करून त्यांत प्रवेश केला; व तत्त्वांत क्रियाशक्ति उत्पन्न केली. त्यांचेंच परिणत रूप म्हणजे विराट्पुरुष होय. मैत्रेय ऋषी म्हणतात;–ब्रह्मदेवानें हजार वर्षे तपश्चर्या केली, पण त्याला सुद्धां भगवंताच्या लीलेचा अंत लागला नाहीं. )

मैत्रेयऋषीनें कथन केलेलें परमेश्वरलीलेचें वर्णन ऐकून विदूर म्हणाला; हे ब्रह्मनिष्ठ मुने, परमात्मा ज्ञानस्वरूप असून निर्गुण आहे. तेव्हां लीलेनें कां होईना, पण सत्वा-

दिगुणांचा संबन्ध त्याला कसा घडतो ? आणि तो स्वतः निर्विकल्प असल्यामुळें त्यांच्या हातून सृष्टीची उत्पत्ति, लय इत्यादि क्रिया तरी कशा घडतात ? )

१६६

( भगवान् क्रीडा तरी कां करितो ) ३–७–३

**क्रीडायामुद्यमोऽर्भस्य कामश्चिक्रीडिषान्यतः ॥**
**स्वतस्तृप्तस्य च कथं निवृत्तस्य सदान्यतः ॥ ३ ॥**

लहान बालकाची खेळण्याविषयीं जी प्रवृत्ति होते, तिचें कारण त्याची इच्छा हेंच होय. ही खेळ खेळण्याची इच्छा त्याला दुसऱ्या वस्तूमुळें अथवा दुसऱ्या मुलांच्या संगतीनें होत असते; परंतु परमेश्वर हा तर आत्मज्ञानानेंच तृप्त झालेला व दुसऱ्यापासून नेहमीं निवृत्त असा आहे. तेव्हां त्याच्या ठिकाणीं क्रीडा करण्याची इच्छा तरी उत्पन्न कशी होते ?

( विदुराचा प्रश्न ऐकून मैत्रेय म्हणाला;— विदुरा, जीव वस्तुतः सर्वस्वी मुक्त असतांना त्याला बंधन किंवा दुःख होते असें म्हणणें हें तर्काशीं विरुद्ध आहे खरें; पण तसा प्रत्यय जिच्या योगानें येतो तिलाच षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराची माया म्हणतात.)

१६७–१६८

( जीवाला होणारा भास हीच परमेश्वराची माया होय ) ३–७–१०,११

**यदर्थेन विनामुष्य पुंस आत्मविपर्ययः ॥**
**प्रतीयत उपद्रष्टुः स्वशिरश्छेदनादिकः ॥ १० ॥**
**यथा जले चन्द्रमसः कम्पादिस्तत्कृतो गुणः ॥**
**दृश्यतेऽसन्नपि द्रष्टुरात्मनो नात्मनो गुणः ॥ ११ ॥**

एकादा पुरुष स्वप्नांत आपलें शिर तुटलें, हात तुटलें, पाय तुटले असें पहातो; पण जसें वस्तुतः तसें कांहीं देखील झालेलें नसतें. तसा जीवाला बन्ध किंवा क्लेश होतो ही गोष्ट सुद्धां केवळ आभास होय ( १० ) ज्याप्रमाणें पाण्यांत चन्द्रबिंब पडलें म्हणजे पाणी हालतांच तेंहि हालल्याप्रमाणें वाटतें. पण खरा चंद्र कांहीं हालत नसतो. त्याप्रमाणें देह, इंद्रियें इत्यादि अनात्मवस्तूंचे धर्म त्यांचा अभिमानी झालेला जो साक्षीभूत जीव त्याचेच जणूं काय आहेत असें भासतें. वस्तुतः ते त्याचे नसतात. ( ११ )

१६९

( परमेश्वर साक्षीरूपानें हृदयांत राहतो ) ३–७–१३

**यदेन्द्रियोपरामोऽथ द्रष्ट्रात्मनि परे हरौ ॥**
**विलीयन्ते तदा क्लेशाः संसुप्तस्येव कृत्स्नशः ॥ १३ ॥**

विदुरा, परमात्मा साक्षीरूपानें हृदयांत राहून सर्व दुःखें हरण करणारा आहे. त्याच्या ठिकाणीं सर्व इन्द्रियें आपापल्या बाह्य विषयांना सोडून विराम पावलीं म्हणजे

निजलेल्या मनुष्याला जसा दुःखाचा अनुभव येत नाहींसा होतो, तसा त्या स्थितीतहि दुःखाचा लय होतो ( १३ ) ( सारांश आत्मस्वरूपीं इंद्रियाचा लय करणें हाच मोक्ष )

(मैत्रेय ऋषि म्हणाले; विदुरा, परमेश्वराला सृष्टि उत्पन्न करावी अशी इच्छा झाली, व त्यानें आपल्या शरीरांत बीजरूपानें लीन असलेल्या शब्द, स्पर्श इत्यादि सूक्ष्म भूतांना पाहिलें. तेव्हां सृष्टि उत्पन्न करण्यास अनुकूल असा काल व त्याला अनुकूल असा रजोगुण या दोघांनीं त्या सूक्ष्म भूतांमध्यें चलन उत्पन्न केलें व त्यामुळे तीं सूक्ष्म भूतें परमेश्वराच्या नाभिप्रदेशांतून कमळाच्या कळ्याच्या रूपानें उत्पन्न झालीं कमळांत स्वतः विष्णूनें अन्तर्यामिरूपानें प्रवेश केला तेव्हां त्यांतून, ज्याला स्वयंभु असें म्हणतात, तो प्रत्यक्ष वेदमूर्ति असा ब्रह्मदेव उत्पन्न झाला. तो ब्रह्मदेव डोळे फिरवून चार दिशांकडे पाहूं लागला असतां त्याला चार मुखें प्राप्त झालीं; पण आपण स्वतः कोण याची कल्पना त्याला होईना. तो मनांत विचार करून म्हणाला; जो हा मी कमळपृष्ठावर बसलों आहे तो कोण? हें एकटेंच कमल येथें आलें कोठून ? हें कमळ ज्याच्यावर राहिलें आहे, ती खरोखर कांहीं तरी खरी वस्तु आधारभूत असली पाहिजे. असा विचार करून तो ब्रह्मदेव त्या कमळाच्या देंठाच्या छिद्रांतून आंत शिरला आणि त्याच्या भक्कम देंठाला आधार काय आहे, याचा शोध करीत खालीं गेला. परंतु त्याला त्याचा शोध लागला नाहीं. बराच काळ निघून गेला, पण शोध लागला नाहीं. काळ हा ईश्वराचें एक शस्त्रच आहे. कारण त्याच्या योगानें जीवांस भय उत्पन्न होऊन त्यांचें आयुष्य क्षण होत जातें. इतक्या काळानंतर देखील आपल्या जनकाचा शोध ब्रह्मदेवाला न लागल्यामुळें तो तेथून परत फिरून आपल्या कमलासनावर येऊन बसला. तेथे त्याने हळू हळू प्राणांचा निरोध करून आपलें चित्तच अन्तर्मुख केलें आणि समाधि लावून तो तप करीत बसला. अशा स्थितींत शंभर वर्षे निघून गेलीं आणि त्याचा समाधियोग पूर्ण होऊन त्यास ज्ञान उत्पन्न झाले. तेव्हा पूर्वी शोध करून सुद्धां जे दिसलें नव्हतें, तें आतां आपोआप स्वतःच्या हृदयांतच प्रकाशित झालेलें असें भगवंताचे स्वरूप त्याला दिसूं लागलें.

( ह्या सृष्ट्युत्पत्तीच्या वर्णनांत परमेश्वराचें दर्शन समाधियोगाने आपल्या आत्म्याच्या ठिकाणीं होतें, इतर खटाटोप व्यर्थ होत, असें भागवतकारांनीं दर्शित केलें आहे.) असो, भगवान् म्हणाले-ब्रह्मदेवा; तूं पुनः तपश्चर्या कर आणि माझ्या आधाराने म्हणजे समाधियोगरूप विद्याहि संपादन कर, म्हणजे या दोहोंच्या योगानें तुझ्या हृदयांत सर्व लोक प्रगट झालेले तुला दिसतील. सामान्य प्राण्यांना माझे स्वरूप कळत नाहीं ; पण पंचभूतें, इंद्रियें, सत्वादि गुण, अहंकार यांशीं माझा संबंध नाहीं, हें तू जाणल्यामुळें तुला मात्र माझ्या स्वरूपाची खरी ओळख पटली असे दिसते. कमळाच्या देंठांत प्रवेश करून तूं मला शोधूं लागला असतां तुला माझ्याविषयीं संशय उत्पन्न झाला; तेव्हां तुझ्या हृदयांतच मी आपलें स्वरूप प्रकट करून तुला दाखविलें. भगवान् म्हणतात —

## १७०–१७१

( यज्ञयागादि कर्मे परमेश्वराच्या संतोषाकरतांच होत ) ३-९-४१,४२

**पूर्तेन तपसा यज्ञैर्दानैर्योगसमाधिना ॥**
**राद्धं निःश्रेयसं पुंसां मत्प्रीतिस्तत्त्वविन्मतम् ॥ ४१ ॥**
**अहमात्माऽऽत्मनां धातः प्रेष्ठः संप्रेयसामपि ॥**
**अतो मयि रतिं कुर्याद्देहादिर्यत्कृते प्रियः ॥ ४२ ॥**

तलाव, विहीर इत्यादि लोकोपयोगी कृत्यें, व तपश्चर्या, यज्ञयाग, दानधर्म, योगाभ्यास यांच्या योगानें पुरुषांना जे सर्वोत्तम फळ मिळते, तें म्हणजे माझा संतोष हें होय, असें तत्त्ववेत्यांचें मत आहे ( ४१ ) ब्रह्मदेवा, मीं सर्व जीवांचा अंतर्यामी असून त्यांना सर्व आवडत्या वस्तूंत अत्यंत आवडता आहे. म्हणून प्रेम करावयाचें तर तें माझ्यावर करावें कारण देहादि पदार्थांवर जें प्रेम असतें, तें तरी माझ्यामुळेंच होय. (४२)

( भगवंतानें याप्रमाणें आज्ञा केल्यानंतर ब्रह्मदेवानें सृष्टीची उत्पत्ति कशी केली, स्थावरजंगमादि कसे उत्पन्न केले, त्यांच्यांत कोणकोणते गुणधर्म योजिले, कालाचें स्वरूप कसें आहे इत्यादि दहा सर्गांच्या उत्पत्तींचें वर्णन मैत्रेय ऋषीनें विदुरास विशद करून सांगितलें. यानंतर कालाची गणना, त्याच प्रकार, पितर, देव, मनुष्य, यांची आयुष्यरचना कृत, त्रेता, द्वापार, कलि या चार युगांतील कालमानाची व आयुष्यमानाची रचना, इत्यादि माहिती भागवतकारांनी मैत्रेयऋषिकडून वदविली आहे. ती फारच हृदयंगम आहे. असो मैत्रेयऋषि पुढें सांगतात—सर्वव्यापी परमेश्वराचें स्वरूप प्रकृत्यादि सर्व कारणांचेंहि कारण आहे व त्यालाच परमश्रेष्ठ अक्षरब्रह्म म्हणतात. )

## १७२

( कालाचें व्यापक स्वरूप ) ३-११-३

**एवं कालोऽप्यनुमितः सौक्ष्म्ये स्थौल्ये च सत्तम ॥**
**संस्थानभुक्त्या भगवानव्यक्तो व्यक्तभुग्विभुः ॥ ३ ॥**

काळ हा एक परमेश्वराचीच शक्ति असून उत्पत्ति, पालन व संहार हीं करण्यांत तो नित्य दक्ष असतो. तो स्वतः प्रत्यक्ष दिसत नसूनहि यच्चयावत् पदार्थांना व्यापून राहतो. इतर पदार्थांचीं जशीं सूक्ष्म, मध्यम व स्थूल स्वरूपें आहेत, तशी कालाचींहि असलीं पाहिजेत असें त्याच्या व्यापकपणावरून सहज अनुमान होतें ( ३ )

(मैत्रेय ऋषि पुढें म्हणाले; ब्रह्मदेवानें तम, मोह, महामोह, तामिस्र व अंधतामिस्र अशी पांच अज्ञानवृत्तीची सृष्टि उत्पन्न केली, परंतु त्यास समाधान झालें नाहीं. पुढें सनकसनंदनांस उत्पन्न केलें, पण प्रजा उत्पन्न करण्याचें काम त्यांनी नाकारलें. तेव्हां

ब्रह्मदेवाला राग आला व त्यानें रुद्रास उत्पन्न केलें. संतापाच्या आवेशांत रुद्राचा उत्पत्ति झाली असल्यामुळें, त्यापासून उग्र प्रजा उत्पन्न झाली, व त्यामुळें सर्वांस पीडा होऊं लागली. अर्थात् ब्रह्मदेवानें रुद्रास प्रजा उत्पन्न करण्याचें काम बंद करून तपश्चर्या करण्यास सांगितलें. कारण ज्ञान होण्यास तप हें एकच साधन आहे. मैत्रेय म्हणतात:-)

१७३

( परमेश्वराचें ज्ञान तपानेंच होतें ) ३-१२-१९

**तपसैव परं ज्योतिर्भगवन्तमधोक्षजम् ॥**
**सर्वभूतगुहावासमञ्जसा विन्दते पुमान् ॥ १९ ॥**

विदुरा, भगवान परमात्मा तेजोरूप असून सर्व प्राण्यांच्या हृदयांत वास करीत असतो. त्याच्या स्वरूपाचें ज्ञान इंन्द्रियांना होत नाहीं; पण तपश्चर्येच्या योगानें मात्र पुरुषाला त्याची सहज प्राप्ति करून घेतां येते. (१९)

( नंतर ब्रह्मदेवानें आपल्या शरीराच्या वेगवेगळ्या भागापासून ऋषि, देव यांची उत्पत्ति कशी केली तें सांगून मैत्रेय म्हणाले; विदुरा, ब्रह्मदेवाची कन्य सरस्वती रूपसंपन्न असल्यामुळें स्वकन्येविषयीं त्यास कामेच्छा उत्पन्न झाली. आपल्या पित्याची बुद्धि भ्रष्ट झाली असें पाहून मरीचिप्रभृति ऋषींनीं उपदेश करून त्याची कानउघाडणी केला. शेवटीं ब्रह्मदेवाला लाज वाटली व त्या निंद्य देहाचा त्यानें त्याग केला. कन्याभिलाष हें महापातक होय, आणि अशा पातकाचें प्रायश्चित म्हणजे देहत्याग, हें ब्रह्मदेवाच्या कथानुरोधानें या ठिकाणीं दाखविलें आहे. असो ब्रह्मदेवानें तो निंद्य देह टाकल्यानंतर दुसरा देह धारण करून पुन्हा ध्यानस्थ बसला असतां त्याच्या चार मुखापासून चार वेद उत्पन्न झाले. हे वेद ब्रह्मदेवाच्या कोणकोणत्या मुखपासून कसे झाले व त्याच्या शाखा व उपशाखा कशा झाल्या, त्याचें सविस्तर वर्णन भागवतकारांनीं केलें आहे. तें मुळांतच वाचण्यासारखें आहे. असो, याप्रमाणें ब्रह्मदेव सृष्टीची उत्पत्ति करीत असतां त्याच्या शरीराचे दोन विभाग झाले व त्यापासून स्त्री व पुरुष अशी जोडी उत्पन्न झाली. )

१७४

( जगांतील पहिलें मिथुन ) ३-१२-५२

**ताभ्यां रूपविभागाभ्यां मिथुनं समपद्यत ॥**
**यस्तु तत्र पुमान् सोऽभून्मनुः स्वायंभुवः स्वराट् ॥**
**स्त्री याऽऽसीच्छतरूपाख्या महिष्यस्य महात्मनः ॥ ५२ ॥**

ब्रह्मदेवाच्या शरीराच्या दोन विभागापासून स्त्रीपुरुषांची जोडी उत्पन्न झाली. त्या दोहोंमध्यें जो पुरुष होता, तो स्वयंभू अशा ब्रह्मदेवाचा पुत्र म्हणून स्वायंभुव मनु-नामक राजा झाला व जी स्त्री होती ती शतरूपा नांवानें त्याची पट्टराणी झाली. (५२)

( जगांतील हा पहिला विवाह असून यांजपासूनच मैथुनानें प्रजोत्पत्तीचें कार्य सुरू झालें. तात्पर्य, स्त्रीपुरुष हे एकाच परमेश्वराच्या शरीराचे भाग होत, आणि समाजांत उभयतांची योग्यता सारखी होय, असें या ठिकाणीं भागवतकारांनीं दर्शित केलं आहे. )

या उभयतांपासून प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन पुत्र, आणि आकूति, देवहूति व प्रसूति अशा तीन कन्या झाल्या त्या तीन कन्या अनुक्रमें रुचि ऋषि, कर्दम ऋषि व दक्षप्रजापति यांना दिल्या; त्यांनीं प्रजोपत्तीचें कार्य सुरू केलें. यानंतर सृष्टीचा पहिलाच राजा जो स्वायंभुव मनु त्यानें राज्य कसें केलें तें सांगा, असा विदुरानें मैत्रेय ऋषीस प्रश्न केला असतां मैत्रेय म्हणाले; मनूनें उत्पन्न झाल्यानंतर ब्रह्मदेवाची स्तुति करून आपण कोणतें कार्य करावें अशी आज्ञा विचारली. तेव्हां ब्रह्मदेवानें त्यास प्रजोत्पत्ति करून त्यांचें संगोपन कर आणि पृथ्वीचें पालन धर्मानें कर, असे सांगितलें. पण या वेळीं पृथ्वी पाण्यांत बुडाली होती, तिला वर कशी काढावी, असा विचार करीत ब्रह्मदेव ध्यानस्थ बसला असतां त्याच्या नाकपुडींतून एक अंगुष्ठप्रमाण वराहाचें पिलूं बाहेर आलें. पहातां पाहतां तें अजस्र झालें; आणि पर्वताकार देह धारण करून त्या वराहानें पाण्यांत प्रवेश केला, व पृथ्वीस बाहेर आणलें. आणि उन्मत्त झालेल्या हिरण्याक्षाचा वध केला. हे हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु यांची उत्पत्ति कश्यप ऋषी व त्याची पत्नी दिती यांचे ठायीं झालेली होती. हीं उभयतां पतिपत्नी अत्यंत भगवद्भक्त होतीं, परंतु अयोग्य काळीं झालेल्या गर्भसंभवनेपासून वरील संतती झाली असल्यामुळें ते राक्षसवृत्तीचे झाले होते. ही कथा अशी आहे की, एकदां संध्यासमयींच दितीस कामेच्छा उत्पन्न झाली व ती पूर्ण करण्याविषयीं ती पतीची विनवणी करूं लागली. अशा विपरीत वेळीं स्त्रीसंग व गर्भसंभव होऊं नये म्हणून कश्यप मुनीनें परोपरीनें उपदेश केला. ते म्हणालेः—

१७५

( गृहस्थाश्रमांत स्त्रीची योग्यता ) ३–१४–१७

**सर्वाश्रमानुपादाय स्वाश्रमेण कलत्रवान् ॥**
**व्यसनार्णवमत्येति जलयानैर्यथार्णवम् ॥ १७ ॥**

नौकेच्या साह्यानें जसें समुद्र तरून जातां येतें त्याप्रमाणे गृहस्थाश्रमीं पुरुष स्त्रीच्या साहाय्यानें आपलीं कर्तव्यें नीट करतो आणि इतर आश्रितांनाहि आपल्या बरोबर घेऊन तो दुःखसागरांतून पलीकडे जातो. ॥ १७॥ ( सारांश, स्त्री ही संसारांत नौकारूप होय )

१७६

( स्त्रीच्या आश्रयानें इंद्रियावर विजय मिळवितां येतो ) ३-१४-१९

**यामाश्रित्येन्द्रियारातीन्दुर्जयानितराश्रमैः ॥**
**वयं जयेम हेलाभिर्दस्यून्दुर्गपतिर्यथा ॥ १९ ॥**

गृहस्थाश्रमाशिवाय इतर आश्रमांत इंद्रियरूपी शत्रूंचा पराभव करणें कठीण असतें, परंतु सेनापति किल्ल्याचा आश्रय करून ज्याप्रमाणें शत्रूंचा पराभव करतो, त्याप्रमाणें आम्ही पुरुष स्त्रीचा आश्रय करून त्या इंद्रियरूपी शत्रूंवर सहज विजय मिळवितों (१९)

याप्रमाणें संसारांत स्त्रियांचें महत्व व योग्यता यांचें वर्णन करून कश्यप मुनीनें दितीला उपदेश केला; परंतु कामाधीन झालेल्या त्या दितीला पतीचा उपदेश रुचला नाहीं. तेव्हां निरुपाय होऊन मुनींनीं तिची इच्छा तृप्त केली. कामाचा अंमल उतरतांच दितीला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला; परंतु काय उपयोग ? तिला त्या गर्भापासून राक्षस वृत्तीचे दोन पुत्र झाले. ' वाईटांत चांगले ' या वचनाप्रमाणें निदान ह्या पुत्रांना विष्णूच्या हस्तें तरी मृत्यु यावा अशी तिनें पतीस विनंती केली. तिच्या इच्छेस अनुसरून मुनि म्हणाले, तुझे दोन्ही पुत्र जरी राक्षस होतील तथापि तुझा नातु परमभक्त निपजेल व परमेश्वर त्यास प्रसन्न होईल. तोच प्रल्हाद होय. असो, पुढें योग्य कालीं दिती प्रसूत होऊन तिचे ठायीं हिरण्याक्ष व हिरण्यशिकपु असे जन्मास आले. हे दोघे मूळचे विष्णूचे द्वारपाळ होत. त्यांनीं सनकादिब्रह्मपुत्रांचा अपमान केल्यामुळें त्याच्या शापानें ते राक्षसयोनीस प्राप्त झाले होते, अशी पूर्व कथा आहे. त्याप्रसंगीं द्वारपालांस शाप दिल्यानंतर सनकादिकांनीं भगवंताची प्रार्थना केली असतां त्यास उद्देशून भगवान् म्हणाले—

१७७

( भगवंताचीं निवासस्थानें ) ३-१६-१०

ये मे तनूर्द्विजवरान्दुहतीर्मदीया
भूतान्यलब्धशरणानि च भेदबुद्ध्या ॥
द्रक्ष्यन्त्यघक्षतदृशो ह्यहिमन्यवस्ता-
न्गृध्रा रुषा मम कुषन्त्यधिदण्डनेतुः ॥ १० ॥

अहो मुनिहो, माझीं राहण्याचीं तीन स्थानें आहेत. एक उत्तम ब्राह्मण, दुसरें गाई व तिसरें निराश्रित प्राणी. ह्या तिन्हीविषयीं जे भेदभाव ठेवतात, त्यांच्या दृष्टि पापामुळें अगदीं नाहींशा झाल्या, असेंच म्हटलें पाहिजे. अशा लोकांना शिक्षा देण्याकरितांच यमराजाची योजना मी केलेली आहे. जे सत्पुरुषाचा अपमान करतात त्यांच्या अंगाचे लचके सर्पासारखे क्रोधिष्ठ असे गृध्ररूपी यमाचे दूत क्रोधानें तोडतात. ( १० )

ते ब्रह्मकुमार द्वारपाळांच्या अपमानानें कोपयुक्त झालेले होते, तथापि भगवंताचें तें उदात्तविचारपरिप्लुत असें भाषण ऐकतांच शांत झाले. परंतु परमेश्वराच्या भाषणानें त्यांच्या मनाचा गोंधळ उडाला. कर्तुंअकर्तुं सामर्थ्य ज्याचे ठायीं आहे, अशा सर्वैश्वर्यसंपन्न प्रभूनें सेवकानें केलेल्या अपराधांबद्दल इतका विनय दाखवावा याबद्दल त्यांस चमत्कारिक वाटलें. ते अत्यंत ओशाळगत झाले आणि त्यांनीं त्या प्रभूची स्तुति केली. ( या ठिकाणीं प्रेमळ भाषणानें कोपाची शांतता कशी होते हें भागवतकारांनीं विष्णु व सनकादिब्रह्मपुत्र यांच्या भेटींत उत्तम प्रकारें दर्शविलें आहे. ही स्तुती व देवाचें भाषण जिज्ञासूंनीं मूळ ग्रंथांत अवश्य वाचावी )

## वराह अवताररूपी भगवान्.

यापुढें वराहरूपी भगवंताची कथा वर्णन केली आहे. हिरण्यकशिपु व हिरण्याक्ष यांचा जन्म होतांच त्यांनीं ब्रह्मदेवास प्रसन्न करून वर मिळविले व इंद्रपद हस्तगत केलें. त्यांस पहातांच सर्व देव पळाले तेव्हां हिरण्याक्षानें समुद्रांत प्रवेश केला, आणि वरुणाला युद्धाचें आव्हान केलें. परंतु त्यानें त्यास पुराणपुरुषाकडे जावयास सांगितलें. तेव्हां त्याचा शोध करण्याकरितां तो दैत्य रसातळांत शिरला असतां तेथें वराहरूपी भगवान् पृथ्वीला दाढेवर धरून वर येत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. या ठिकाणीं वराहरूपी भगवंताबरोबर हिरण्याक्षाचें जे भाषण झालें तें फारच मार्मिक आहे. त्या भाषणाचा अर्थ दोन प्रकारचा होतो. एका अर्थानें वराहरूपी भगवंताची त्यानें निंदा केली असें दिसून येते, परंतु दुसऱ्या अर्थानें त्यानें भगवंताची स्तुति केली आहे असें वाटतें ( पहा स्कंध ३ अध्याय १८ ) असो. हिरण्याक्षानें वराहरूपी भगवंतास युद्धास आव्हान करतांच भगवंतानें त्याची युद्धेच्छा तृप्त करून त्यास मोक्ष दिला व इंद्रादि देवांनीं त्या भगवंताची स्तुति केली. (या कथेंत महाबलाढ्य असा जरी मनुष्य असला, व तो जर अहंकारानें मत्त झाला, तर परमेश्वर अनेकरूपानें त्याचें वैभव नष्ट करतो, हें दर्शित केलें आहे.) असो, यानंतर ब्रह्मदेवानें सृष्टीची उत्पत्ति कशी केली, असा विदुरानें प्रश्न केला असतां मैत्रेय ऋषीनें ब्रह्मदेवाच्या सृष्ट्युत्पत्तीचें वर्णन केलें आहे. ह्या वर्णनांत ब्रह्मदेवानें आपल्या कमरेच्या भागापासून दैत्य उत्पन्न केले असतां ते कामपीडित होऊन ब्रह्मदेवाच्या माग लागले तेव्हां ब्रह्मदेव विष्णूस शरण गले. त्या वेळीं भगवान् श्रीविष्णूनें ब्रह्मदेवास सांगितलें; ही कामविकारानें बिघडलेली तुझी तनु तूं सोडून दे. त्याप्रमाणें ब्रह्मदेवानें त्या तनूचा त्याग केला. ती तनु म्हणजे रात्र होय. या ठिकाणीं तनु म्हणजे अहंकार असा अर्थ केलेला आहे. अहंकाराचा त्याग करणें म्हणजेच संकटांतून मुक्त होणें, असें दर्शविलें आहे. असो. ह्या तनूपासून उत्पन्न झालेल्या रात्रीनें दैत्यांस मोह पाडून ब्रह्मदेवाची सुटका केली. यानंतर ब्रह्मदेवानें विशाल देह धारण करून त्या शरीरापासून सृष्टीच्या उत्पत्तीचें कार्य सुरू केलें. तथापि मनासारखी सृष्टीची उत्पत्ति होईना. तेव्हां ब्रह्मदेवानें त्या विशाल देहाचाहि त्याग केला आणि समाधि स्थितींत पुन्हां तप केलें. तेव्हां मनू आणि ऋषि आदि उत्पन्न झाले. ( सारांश, इच्छित कार्य शेवटास नेण्याकरितां ब्रह्मदेवास अनेक वेळ पुन्हां पुन्हां शरीर त्याग करून तप करावें लागलें, तेव्हांच त्याच्या प्रयत्नास यश आलें. म्हणजे कोणतेंहि कार्य यशस्वी करण्याकरितां अहंकाराचा त्याग करून शेवटपर्यंत प्रयत्न केला पाहिजे, असें ह्या ब्रह्मदेवाच्या सृष्टीच्या उत्पत्तीच्या कथेंत भागवतकारांनीं मोठ्या मार्मिकतेनें दाखविलें आहे.) असो. याप्रमाणें ही वराह अवताराची व विराटस्वरूपापासून झालेल्या ब्रह्मदेवकृत सृष्टीच्या उत्पत्तीची कथा सांगितल्यानंतर मनूनें पुढें प्रजेची उत्पत्ति कशी केली व पृथ्वीचा कारभार कसा चालविला, याचें वर्णन केलें आहे. स्वायंभू मनूची कन्या देवहूति, ती त्यानें कर्दम ऋषीला दिली होती. हा-

कर्दमऋषि मोठा योगी होता. त्यानें प्रजोत्पत्तीच्या इच्छेनें तप करून परमेश्वराची जी स्तुति केली, ती फारच उद्बोधक आहे. कर्दम ऋषि प्रजोत्पत्तीच्या इच्छेनें म्हणतात- )

१७८

( ईश्वराचा खेळ ) ३-२१-१९

**एकः स्वयं सञ्जगतः सिसृक्षया द्वितीययाऽऽत्मन्नधियोगमायया ॥**
**सृजस्यदः पासि पुनर्ग्रसिष्यसे यथोर्णनाभिर्भगवन्स्वशक्तिभिः ॥ १९ ॥**

हे भगवन्, तूं स्वतः एकच आहेस, पण तुला सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा झाली म्हणजे तूं दुसऱ्या एका योगमायेचा स्वस्वरूपीं स्वीकार करतोस. व जसा भिंतीवर जाळें घालणारा कोळी तंतुरूपीं आपल्या शक्तीनें जाळें उत्पन्न करितो, त्यांत कांहीं वेळ खेळतो व कांहीं वेळानें मोडून टाकतो, त्याप्रमाणे तूंहि हें जग आपल्या सत्त्वादि शक्तींनीं निर्माण करितोस, त्याचें रक्षण करितोस, व पुनः प्रलयहि करतोस ( १९ )

ह्या स्तुतीनें भगवान् प्रसन्न झाले व त्यांनीं त्यास तुझ्या इच्छेप्रमाणें स्वायंभुव मनु आपल्या पत्नीसह येथें येऊन आपली उपवर झालेली देवहूती कन्या तुला अर्पण करील, असा वर दिला. त्याप्रमाणें मनूनें आपली देवहूती कन्या त्यास अर्पण केली. संस्कारपद्धतीनें हा जगांतील पहिला विवाह होय. ह्या विवाहप्रसंगीं कन्याविरहाचें तसेंच मनूच्या राज्यव्यवस्थेचें वर्णन भागवतकारांनीं उद्बोधक असें केलें आहे विशेषतः कर्दम-मुनि व देवहूति यांच्या संसारांचें वर्णन प्रत्येक गृहिणीनें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. संसारांतील सर्व सुखोपभोगाची तृप्ति ही विनाशी होय, हें ज्ञान होऊन पतीच्या आज्ञेनें देवहूतीनें तपश्चर्या केली व त्यायोगें तिच्या ठिकाणीं परमेश्वर कपिलमुनीच्या रूपानें अवतीर्ण झाले, इ. कथाभाग आहे. या अध्यायांतील सुंदर सुभाषितें पुढें दिलीं आहेत.

१७९

( स्त्रियांचा उदात्त आचार ) ३-२३-२,३

**विश्रम्भेणात्मशौचेन गौरवेण दमेन च ॥**
**शुश्रूषया सौहृदेन वाचा मधुरया च भोः ॥ २ ॥**
**विसृज्य कामं दम्भं च द्वेषं लोभमघं मदम् ॥**
**अप्रमत्तोद्यता नित्यं तेजीयांसमतोषयन् ॥ ३ ॥**

ती देवहूती कधींहि निष्काळजी न रहातां पतिसेवा करण्यांत दक्ष असे. केवळ भोगेच्छा, कपट, द्वेष, लोभ, निषिद्धाचरण आणि उन्मत्तपणा, यांचा तिनें त्याग केला होता; व विश्वास, शारीरिक आणि मानसिक शुद्धता, आदर, इंद्रियनिग्रह, प्रेम व मधुरवाणी, यांच्या योगानें आपल्या अतितेजस्वी अशा पतीला ती संतुष्ट ठेवीत असे ( २,३ )

( या देवहूतीच्या उदरीं भगवान् कपिलमुनीच्या रूपानें अवतीर्ण झाले, व त्यांनीं सांख्यज्ञानाचा उपदेश आपल्या मातेला करून तिचा संदेह दूर केला. कपिलमुनींनें

कथन केलेलें सांख्यज्ञान कपिलगीता म्हणून प्रसिद्ध आहे. या ज्ञानाचें विवरण भागवतकारांनीं तिसऱ्या स्कंधांत अध्याय २३ पासून ३३ पर्यंत केलें आहे. त्यांतील निवडक सुभाषितें खालीं दिलीं आहेत. कपिलमुनि आपल्या मातेस सांगतात–)

१८०

( सत्संगतीचा परिणाम ) ३–२३–५५

सङ्गो यः संसृतेर्हेतुरसत्सु विहितोऽधिया ॥
स एव साधुषु कृतो निःसङ्गत्वाय कल्पते ॥ ५५ ॥

जर अज्ञानानें दुर्जनाशीं संगति घडली, तर तिच्यापासून संसारांतील दुःखें भोगावीं लागतात, पण ती संगति अज्ञानानें कां होईना जर सज्जनाशीं घडली, तर तिच्यापासून विषयांवरील आसक्ति सुटून वैराग्य प्राप्त होतें. (५५)

१८१

( धर्मावांचून आयुष्य व्यर्थ ) ३–२३–५६

नेह यत्कर्म धर्माय न विरागाय कल्पते ॥
न तीर्थपदसेवायै जीवन्नपि मृतो हि सः ॥ ५६ ॥

ह्या सृष्टीमध्यें ज्या प्राण्याचें कर्म धर्माच्या उपयोगीं पडत नाहीं, वैराग्याचें साधन होत नाहीं, किंवा श्रीहरीच्या सेवेकडे लागत नाहीं, तो मनुष्य जिवंत असून मेल्यासारखा होय(५६)

१८२

( मन हेंच मोक्षाला कारण ) ३–२५–१५

चेतः खल्वस्य बन्धाय मुक्तये चात्मनो मतम् ॥
गुणेषु सक्तं बंधाय रतं वा पुंसि मुक्तये ॥ १५ ॥

आत्म्याला बंधन किंवा मुक्ति प्राप्त होण्याला कारण म्हणजे एक अंतःकरणच होय. तें विषयांवर आसक्त झालें म्हणजे बंधनाला कारण होतें, आणि श्रीहरीच्या स्वरूपीं रममाण झालें तर, तेंच मोक्षप्राप्ति करून देतें (१५)

१८३

( सर्वान्तर्यामी ईश्वराची भक्ति हाच मोक्षाचा मार्ग. ) ३–२५–१८,१९

ज्ञानवैराग्ययुक्तेन भक्तियुक्तेन चात्मना ॥
परिपश्यत्युदासीनं प्रकृतिं च हतौजसम् ॥ १८ ॥
न युज्यमानया भक्त्या भगवत्यखिलात्मनि ॥
सदृशोऽस्ति शिवः पन्था योगिनां ब्रह्मसिद्धये ॥ १९ ॥

योगाभ्यासी पुरुषांना ब्रह्मप्राप्तीचा उत्तम मार्ग म्हटला म्हणजे जो सर्वान्तर्यामी वास करणारा षड्गुणैश्वर्यसंपन्न ईश्वर, अशा त्या श्रीहरीची भक्ति करणें हाच होय. ह्याच्यासारखा दुसरा अन्य मार्ग नाहीं. ( सारांश, सर्वांभूतीं परमेश्वर पहाणें. ) ( १८,१९ )

१८४

( सत्पुरुषाचें लक्षण. ) ३-२५-२१

तितिक्षवः कारुणिकाः सुहृदः सर्वदेहिनाम् ॥
अजातशत्रवः शान्ताः साधवः साधुभूषणाः ॥ २१ ॥

सत्पुरुष हे सहनशील असून दयाळू असतात. त्यांना शत्रु कोणीच नसतो. ते सर्व प्राण्यांशीं मित्रभावानें वागतात, त्यांची प्रकृति गंभीर असते व सुशीलता हेंच त्यांचें व्रत असतें. ( सारांश, सहनशलिता व प्राणिमात्रांवर दया हें सत्पुरुष लक्षण होय )

१८५

( जे आसक्ति सोडतात ते संसारदुःखापासून मुक्त होतात. ) ३-२५-३९

इमं लोकं तथैवामुमात्मानमुभयायिनम् ॥
आत्मानमनु ये चेह ये रायः पशवो गृहाः ॥ ३९ ॥

हा लोक, तसाच परलोक, या दोन्ही लोकांत फिरणारा लिङ्गदेहविशिष्ट जीव, तसेंच देहासंबन्धीं असणारीं जगांतील सर्व ऐश्वर्यें, पशु, गृह इत्यादिकांवरील आणि इतरहि सर्व विषयांवरील आसक्ति सोडून, अनन्यभावानें सर्वतोमुख अशा माझेंच जे कोणी भजन करितात, त्यांना मी या जन्ममरणरूप संसाराच्या पलीकडे नेऊन ठेवितों.

१८६

( आत्मा हाच पुरुष होय. ) ३-२६-३

अनादिरात्मा पुरुषो निर्गुणः प्रकृतेः परः ॥
प्रत्यग्धामा स्वयंज्योतिर्विश्वं येन समन्विम् ॥ ३ ॥

गुणांपासून अलिप्त आणि प्रकृतीच्याहि पलीकडचा असा जो अंतर्ज्ञानस्वरूपी व स्वयंप्रकाश आत्मा, तोच पुरुष होय. त्यानें हें सारें विश्व व्यापिलें आहे ( ३ )

१८७

( प्रकृतीचें लक्षण ) ३-२६-१०

यत्तत्त्रिगुणमव्यक्तं नित्यं सदसदात्मकम् ॥
प्रधानं प्रकृतिं प्राहुरविशेषं विशेषवत् ॥ १० ॥

ज्यांमध्यें कोणतेहि विशेष धर्म नाहींत, पण जे विशेष धर्मांचे आधार मात्र आहेत, ज्याच्या ठिकाणीं सत्व, रज व तम, असे तीन गुण आहेत, व जें कोणाचेंहि कार्य नाहीं, किंवा जें इन्द्रियांना समजतहि नाहीं कार्य व कारण हीं ज्याचीं रूपें असून कधींहि नष्ट होत नाहींत, असें जें प्रधाननामक तत्व त्यालाच प्रकृति असें म्हणतात.

१८८

( चित्ताचें लक्षण ) ३-२६-२२

**स्वच्छत्वमविकारित्वं शान्तत्वमिति चेतसः ॥**
**वृत्तिभिर्लक्षणं प्रोक्तं यथाऽपां प्रकृतिः परा ॥**

जसें उदकाचें स्वरूप पृथ्वीचा संपर्क होण्याच्या पूर्वी मधुर, स्वच्छ व शांत असतें त्याप्रमाणें चित्ताचेंहि त्याच्या मूळ वृत्तींवरून स्वच्छत्व, निर्विकारित्व व गांभीर्य असें लक्षण केलेलें आहे. ( सारांश, चित्त पाण्याप्रमाण निर्विकार असतें )

१८९ ते १९१

( पुरुष स्वतः निर्विकार आहे ) ३-२७-१,४,५

**प्रकृतिस्थोऽपि पुरुषो नाज्यते प्राकृतैर्गुणैः ॥**
**अविकारादकर्तृत्वान्निर्गुणत्वाज्जलार्कवत् ॥ १ ॥**
**अर्थे ह्यविद्यमानेऽपि संसृतिर्न निवर्तते ॥**
**ध्यायतो विषयानस्य स्वप्नेऽनर्थागमो यथा ॥ ४ ॥**
**अत एव शनैश्चित्तं प्रसक्तमसतां पथि ॥**
**भक्तियोगेन तीव्रेण विरक्त्या च नयेद्वशम् ॥ ५ ॥**

सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें असतां पाणी हाललें ह्मणजे सूर्य हालल्याचा भास होतो, पण खरोखर ज्याप्रमाणें सूर्य हालत नाहीं, त्याप्रमाणें देहांत असणारा जीव देहावर होणाऱ्या प्रकृतीच्या सुखदुःखादिक गुणांनीं लिप्त होत नाहीं. कारण तो स्वतः निर्गुण व निर्विकार असून कोणतीहि क्रिया करीत नाहीं (१)

ज्याप्रमाणें स्वप्नांत दिसणारे पदार्थ खोटे असले, तरी त्यांपासून भय, शोक, मूर्च्छा इत्यादि अनर्थ उत्पन्न होतात, त्याप्रमाणें संसार जरी खोटा आहे, तरी प्राण्यांना विषयांचा ध्यास लागल्यामुळें त्यांची त्यापासून सुटका होत नाहीं ( ४ )

यांकरितां दुष्ट इंद्रियांच्या विषयस्वरूपी मार्गामध्यें गुंतललें अन्तःकरण मनुष्यानें दृढभक्तीनें आणि कडकडीत वैराग्यानें हळूहळू आपल्या स्वाधीन करून घेतलें पाहिजे (५)

१९२ ते १९६

( प्रतिबिंब हेंच ज्ञानाला कारण होय. ) ३-२७,१२ ते १६

**यथा जलस्थ आभासः स्थलस्थेनावदृश्यते ।**
**स्वाभासेन तथा सूर्यो जलस्थेन दिवि स्थितः ॥ १२ ॥**
**एवं त्रिवृदहंकारो भूतेन्द्रियमनोमयैः ॥**
**स्वाभासैर्लक्षितोऽनेन सदाभासेन सत्यदृक् ॥ १३ ॥**

भूतसूक्ष्मेन्द्रियमनोबुद्ध्यादिष्विह निद्रया ॥
लीनेष्वसति यस्तत्र विनिद्रो निरहंक्रियः ॥ १४ ॥
मन्यमानस्तदात्मानमनष्टो नष्टवन्मृषा ॥
नष्टेऽहंकरणे द्रष्टा नष्टवित्त इवातुरः ॥ १५ ॥
एवं प्रत्यवमृश्यासावात्मानं प्रतिपद्यते ॥
साहंकारस्य द्रव्यस्य योऽवस्थानमनुग्रहः ॥ १६ ॥

सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडून त्याचा कवडसा भिन्तीवर पडतो व त्या कवडशाकडे पाहून पाण्यांतील सूर्यप्रतिबिम्बाकडे आपलें लक्ष जातें, आणि मग त्या पाण्यांतील सूर्यबिंबावरून आकाशांतलें खऱ्या सूर्यबिम्बाचें ज्ञान होतें (१२)

त्याप्रमाणेंच भूतें, इंद्रियें आणि मन, यांमध्यें अहंकाराचें प्रतिबिंब पडलें असून, त्या अहंकारामध्यें आत्म्याचें प्रतिबिंब पडलेलें असल्यामुळें भूतादिकांतील प्रतिबिंबाच्या योगानें, ज्यांत ब्रह्मवस्तूचें प्रतिबिंब पडलें आहे, असा त्रिगुणात्मक अहंकार प्रथम लक्ष्यांत घेतला जातो; आणि नतर त्या ब्रह्मप्रतिबिंबयुक्त अहंकाराच्या योगानें सत्यज्ञानस्वरूप अशा आत्म्याचें ज्ञान होतें (१३)

आकाशादि पंचमहाभूतें, शब्दादि पंच सूक्ष्मभूतें, इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार, या सर्वांचा निद्रावस्थेंत अव्यक्त प्रकृतीच्या ठिकाणीं लय होतो; परंतु त्या वेळीं तो जागृत असून निराहंकार असतो (१४)

निद्रावस्थेंत असतांहि अहंकार नष्ट झाला असतां, एकाद्या द्रव्यलोभी पुरुषास आपलें द्रव्य नष्ट झालें असतां जणूं काय आपणच नष्ट झालों असें वाटतें, त्याप्रमाणेंच स्वतः अविनाशी असतांहि आपणच नष्ट झालों असें जो निष्कारण मानितो, तोच साक्षीभूत आत्मा होय. विवेकी पुरुष याप्रमाणें विचार करितो आणि अहंकारानें युक्त अशा कार्यकारणात्मक द्रव्यसमूहाचा प्रकाशक व सर्वांना साक्षीभूत असा जो आत्मा त्याची प्राप्ति करून घेतो (१५–१६)

( यापुढें योगाभ्यासी पुरुषानें कोणते नियम पाळावे त्या संबंधानें कपिल मुनींनीं निरूपण केलें आहे. ( पहा अ. २८ श्लो. २ ते ९ ) त्यानंतर प्राणायामाचे नियम सांगितले आहेत ते असेः– योगाभ्यासी पुरुषानें स्वस्तिकासन घालून मन एकाग्र करावें, आणि—

### १९७ ते १९९

( प्राणायामाचें महत्त्व ) ३–२८–१० ते १२

मनोऽचिरात्स्याद्विरजं जितश्वासस्य योगिनः ॥
वाय्वग्निभ्यां यथा लोहं ध्मातं त्यजति वै मलम् ॥ १०

प्राणायामैर्दहेद्दोषान्धारणाभिश्च किल्बिषान् ॥
प्रत्याहारेण संसर्गान्ध्यानेनानीश्वरान्गुणान् ॥ ११ ॥
यदा मनः स्वं विरजं योगेन सुसमाहितम् ॥
काष्ठां भगवतो ध्यायेत्स्वनासाग्रावलोकनः ॥ १२ ॥

वायूच्या सहाय्यानें अग्नींत तापविलेलें लोखंड जसें निर्मळ होतें, तसें योग्यानें प्राणायामाच्या योगानें आपला प्राणवायु स्वाधीन करावा. म्हणजे त्याचें मन शुद्ध होतें (१०)

योग्यानें प्राणायामानें आपले वातपित्तादि दोष नाहींसे करावे, धारणेच्या योगानें पापें जाळून टाकावीं, प्रत्याहाराच्या योगानें विषयसंबन्ध तोडून टाकावे; आणि ध्यानाच्या योगानें रागलोभादि दुर्गुण नाहींसे करावे. ( ११ )

योगाभ्यासानें मन जेव्हां शुद्ध व निर्मळ होईल, तेव्हां योग्यानें नासिकेच्या अग्राकडे आपली दृष्टि ठेवून श्रीहरीच्या मूर्तीचें ध्यान करावें. ( १२ )

( हें ध्यान कसें करावयाचें याचें सविस्तर वर्णन श्लोक १३ ते ४४ पर्यंत केलें आहे. यानंतर मुनीनें भक्तियोगाचें वर्णन केलें आहे. या भक्तियोगांत निर्गुणस्वरूपाची भक्ति श्रेष्ठ मानिली आहे. मुनि सांगतात;—)

२००-२०१

( निर्गुण भक्तीचें फळ ) ३-२९-१३,१४

सालोक्यसार्ष्टिसामीप्यसारूप्यैकत्वमप्युत ॥
दीयमानं न गृह्णन्ति विना मत्सेवनं जनाः ॥ १३ ॥
स एव भक्तियोगाख्य आत्यन्तिक उदाहृतः ॥
येनातिव्रज्य त्रिगुणं मद्भावायोपपद्यते ॥ १४ ॥

निर्गुण भक्ति करणारे माझे भक्त माझ्या सेवेवांचून दुसऱ्या कशाची सुद्धां इच्छा करीत नाहींत. त्यांना मी सालोक्य, सार्ष्टि, सामीप्य व सारूप्य, अशा ह्या चार प्रकारच्या मुक्ति दिल्या तरी त्यांचा ते स्वीकार करीत नाहींत ( १३ ) हा भक्तियोग नांवाचा अत्यन्त श्रेष्ठ योग आहे असें म्हणतात. ह्याच्या साह्यानें मनुष्य सत्त्व, रज व तम, ह्या गुणांचें कार्य जो संसार त्याचें उल्लंघन करून माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो ( १४ )

(यानंतर उपासनेचे प्रकार सांगितले आहेत त्यांतलि निवडक श्लोकः—)

२०२-२०३

( उपासना कशी करावी ) ३-२९-१७,१८

महतां बहुमानेन दीनानामनुकम्पया ॥
मैत्र्या चैवात्मतुल्येषु यमेन नियमेन च ॥ १७ ॥

आध्यात्मिकानुश्रवणान्नामसंकीर्तनाच्च मे ॥
आर्जवेनार्यसंगेन निरहंक्रियया तथा ॥ १८ ॥

सत्पुरुषांचा चांगल्या रीतानें आदर करावा, अनाथांवर दया करावी, आपल्याशीं समानशील असणाऱ्या लोकांशीं मैत्री ठेवावी, आणि अहिंसा सत्य इत्यादि यम व जपादि नियम यांचें पालन करावें ( १७ ) आत्मस्वरूपाचें प्रतिपादन करणाऱ्या अशा शास्त्रांचें नित्य श्रवण करावें, माझ्या नामांचें उत्तमप्रकारें सदोदित कीर्तन करावें, कुटिलपणा करूं नये, सत्पुरुषाची संगति धरावी आणि मनांतील सर्व अहंकार सोडून द्यावा.

## २०४ ते २०९

( भेदबुद्धि ठेवणें म्हणजे परमेश्वराचाच द्वेष करणें होय ) ३-२९-२२ ते २७

यो मां सर्वेषु भूतेषु सन्तमात्मानमीश्वरम् ॥
हित्वार्चां भजते मौढ्याद्भस्मन्येव जुहोति सः ॥ २२ ॥
द्विषतः परकाये मां मानिनो भिन्नदर्शिनः ॥
भूतेषु बद्धवैरस्य न मनः शान्तिमृच्छति ॥ २३ ॥
अहमुच्चावचैर्द्रव्यैः क्रिययोत्पन्नयानघे ॥
नैव तुष्येऽर्चितोऽर्चायां भूतग्रामावमानिनः ॥ २४ ॥
अर्चादावर्चयेत्तावदीश्वरं मां स्वकर्मकृत् ॥
यावन्न वेद स्वहृदि सर्वभूतेष्ववस्थितम् ॥ २५ ॥
आत्मनश्च परस्यापि यः करोत्यन्तरोदरम् ॥
तस्य भिन्नदृशो मृत्युर्विदधे भयमुल्बणम् ॥ २६ ॥
अथ मां सर्वभूतेषु भूतात्मानं कृतालयम् ॥
अर्हयेद्दानमानाभ्यां मैत्र्याभिन्नेन चक्षुषा ॥ २७ ॥

सर्वसमर्थ असा मी सर्व भूतांमध्यें आत्मरूपानें वास करीत असतांना जो मनुष्य माझा अपमान करून मूर्खपणानें मूर्तीची पूजा करितो, तो भस्मामध्येंच होम करितो असें म्हटलें पाहिजे ( २२ ) जो मानी पुरुष प्राण्यांशीं वैरभाव ठेऊन आपला आत्मा निराळा व दुसऱ्याचा आत्मा निराळा, अशी भेददृष्टि ठेवितो, ( दुसऱ्याच्या शरीरांत तरी मींच राहणारा असल्यामुळें दुसऱ्याचा द्वेष करतांना माझ्याशींच द्वेष करितो) त्याचें मन कधींहि शांति पावत नाहीं ( २३ ) हे निष्पाप माते, मनुष्यानें लहानमोठीं पुष्कळ द्रव्यें जमवून त्या सामग्रीच्या योगानें माझ्या प्रतिमेची पूजा केली, तरी, तो जर इतर प्राण्यांची

अवहेलना करीत असेल तर त्या पूजेच्या योगानें मला मुळींच संतोष होत नाहीं (२४) मी ईश्वर सर्व प्राण्यांच्या अन्तरामध्यें वास करणारा आहें, ह्या गोष्टीचें मनुष्याला जोंपर्यंत हृदयांत ज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंत त्यानें स्वतःचीं वर्णाश्रमाविहीत अशीं कर्में करून मूर्ति इत्यादिकांच्या ठिकाणीं माझी पूजा करावी ( २५ ) परंतु जो मनुष्य आपल्यामध्यें आणि दुसऱ्यामध्यें स्वल्पसें तरी अन्तर मानितो, त्या भेददृष्टि मनुष्याला मी मृत्युस्वरूपी असें मोठें भय उत्पन्न करितों. म्हणून मनुष्यानें सर्व प्राणिमात्राचे ठायीं माझें वास्तव्य आहे अशी भावना ठेवून दान, सत्कार, मैत्री व समदृष्टि, ह्या साधनांच्या योगानें माझी आराधना करावी ( २६–२७ ) ( सारांश, भेदाभेददृष्टि कधींहि ठेवूं नये हा भावार्थ. )

२१०

( स्त्री म्हणजे प्रत्यक्ष मृत्यु होय ) ३-३१-४०

**योपयाति शनैर्माया योषिद्देवविनिर्मिता ।**
**तामीक्षेतात्मनो मृत्युं तृणैः कूपमिवावृतम् ॥ ४० ॥**

देवानें निर्माण केलेली प्रत्यक्ष माया म्हणजे स्त्री होय. ही हळूहळू पुरुषाजवळ येत असते, पण तोंडावर गवत पसरलेल्या विहिरीवर पाय दिला असतां जशीं प्राणाशीं गांठ पडते, त्याप्रमाणें स्त्री म्हणजे आपला मृत्यूच आहे असें समजावें. ( ४० )

२११

( गृहपुत्रादि वस्तु जीवास घातक होतात ) ३-३१-४२

**तामात्मनो विजानीयात्पत्यपत्यगृहात्मकम् ॥**
**दैवोपसादितं मृत्युं मृगयोर्गायनं यथा ॥ ४२ ॥**

जसें पारधी अरण्यांत हरणाला मोह घालण्याकरितां मधुर गायन करितो, त्याप्रमाणें आपल्याला भुरळ पाडण्याकरितांच दैवानें पति, अपत्यें, गृह, आदिकरून वस्तु प्राप्त करून दिल्या आहेत, त्या केवळ जीवाचा घात करण्यासाठींच होत असें समजावें (४२)

२१२

( मरणाची चिंता न करतां कर्तव्य करावें ) ३-३१-४७

**तस्मान्न कार्यः संत्रासो न कार्पण्यं न संभ्रमः ॥**
**बुध्द्वा जीवगतिं धीरो मुक्तसंगश्चरेदिह ॥ ४७ ॥**

मनुष्यानें मरणाची चिंता कधींहि करूं नये, तसेंच जीवन कसें चालेल याबद्दल दैन्य करूं नये; व जीवनासाठीं व्याकुळहि होऊं नये. तर धैर्यानें जीवाच्या गतीचें ज्ञान करून घेऊन सर्वसंगपरित्यागपूर्वक पृथ्वीवर संचार करावा ( ४७ )

२१३

( श्रद्धावानासच ज्ञान सांगावें ) ३-३२-४१

**श्रद्दधानाय भक्ताय विनीतायानसूयवे ॥**
**भूतेषु कृतमैत्राय शुश्रूषाभिरताय च ॥**

श्रद्धा ठेवणारा, नम्र, निर्मत्सरी, सर्वांशीं स्नेहानें वागणारा, गुरुजनादिकांची सेवा करण्यांत आनंद मानणारा, अंतर्बाह्य वैराग्यशील, शांत अंतःकरणाचा, कोणाचा हेवा न करणारा व शुद्ध मन असलेला असा जो कोणी माझा भक्त असेल, आणि ज्याला मी सर्व प्रियवस्तूंमध्यें अत्यंत प्रिय वाटतो, त्याला मात्र हें तत्वज्ञान अवश्य सांगावें (४१)

(याप्रमाणें कपिल मुनीनें सांख्यज्ञान निवेदन केलें. तें ऐकून देवहूती ईश्वरस्वरूपी लीन झाली. ज्याठिकाणीं देवहूतीनें सिद्धि मिळविली तें सिद्धपद नामक क्षेत्र झालें, व जगदुद्धारार्थ देवहूति नदीरूपानें वाहूं लागली अशा प्रकारें येथें तृतीयस्कंध पूर्ण झाला. )

---

# चतुर्थ स्कंध.

( या स्कंधाचे एकतीस अध्याय आणि श्लोकसंख्या १४४५ आहे. यांत स्वायंभुव मनूचा वंश, दक्षयज्ञविध्वंसन, ध्रुवचरित्र, पृथुचरित्र, प्रचेत्यांना नारदाचा उपदेश, पुरंजन राजाचें रूपक, वैराग्यवृत्तीमुळें मोक्षप्राप्ति इत्यादि कथाभाग आहेत. )

## दक्षाची कथा.

या स्कंधांत पहिल्या सात अध्यायांत दक्षकन्यांचा वृत्तांत व दक्षयज्ञाचें वर्णन दिलें आहे. दक्षानें यज्ञास आरंभ केला असतां शंकरास आमंत्रण केलें नाहीं; तेव्हां पार्वतीनें अशा यज्ञप्रसंगाच्या समारंभास पित्याच्या घरीं आमंत्रणावाचून जाण्यास हरकत नाहीं, असा हट्ट धरला. या प्रसंगास अनुसरून पुढील श्लोक आहेत. पार्वती म्हणतेः—

२१४

( आमंत्रणावाचून जाण्याचीं योग्य स्थानें. ) ४-३-१३

**कथं सुतायाः पितृगेहकौतुकं निशम्य देहः सुरवर्य नेङ्गते ॥**
**अनाहुता अप्यभियन्ति सौहृदं भर्तुर्गुरोर्देहकृतश्च केतनम् ॥१३॥**

हे देवश्रेष्ठा, पित्याच्या घरीं चाललेल्या उत्सवाचा वृत्तांत ऐकून मुलीच्या मनाला कसें बरें चैन पडेल ? बोलावणें नसलें तरी देखील सज्जन लोक स्वामीच्या, आईबापांच्या आणि गुरूच्या घरीं जाण्यास अनमान करीत नाहींत.

पार्वतीचें भाषण ऐकून भगवान शंकर म्हणालेः —

२१५ ते २१७

( आमंत्रणावांचून केव्हां जावें ) ४-३-१६ ते १८

त्वयोदितं शोभनमेव शोभने अनाहुता अप्यभियन्ति बन्धुषु ॥
ते यद्यनुत्पादितदोषदृष्टयो बलीयसाऽनात्म्यमदेन मन्युना ॥ १६ ॥
विद्यातपोवित्तवपुर्वयःकुलैः सतां गुणैः षड्भिरसत्तमेतरैः ॥
स्मृतौ हतायां भृतमानदुर्दृशः स्तब्धा न पश्यन्ति हि धाम भूयसाम् १७
नैतादृशानां स्वजनव्यपेक्षया गृहान्प्रतीयादनवस्थितात्मनाम् ॥
येऽभ्यागतान्वक्रधियाऽभिचक्षते आरोपितभ्रूभिरमर्षणाक्षिभिः ॥ १८ ॥

प्रिये, बोलाविल्यावांचून सुद्धां सज्जन आपल्या आप्तांच्या घरीं जातात, असें जें तूं म्हटलेंस तें अगदीं बरोबर आहे. पण तें केव्हां ? तर जेव्हां देहादिकांवरील मीपणाच्या मोठ्या अभिमानानें किंवा क्रोधाच्या ताठ्यानें त्या आप्तांची दृष्टि दोषयुक्त झाली नसेल तेव्हां ! ( १६ ) ज्ञान, तपश्चर्या, द्रव्य, सुदृढ शरीर, तारुण्य आणि उत्तम कुल, हे सहा सज्जनांचे गुण आहेत खरे, पण ते दुष्ट शिरोमणींना प्राप्त झाले तर तेच दोषास्पद होत असतात. त्यामुळें दुष्टांचें विवेकज्ञान अगदीं नाहींसें होतें, गर्व वाढत जाऊन दृष्टि दुष्ट होते व सत्पुरुषांचें तेज खरोखर त्यांना दिसेनासें होतें. (१७) त्यांच्या घरीं कोणी गेले म्हणजे त्यांची बुद्धि त्या पाहुण्याविषयीं वाईट होते, ते भुंवया चढवून सक्रोध दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागतात. यास्तव अशा चंचलमनाच्या पुरुषांच्या घरीं, ते जरी आपले बंधु असले तरी, आप्तपणाची बुद्धि ठेवून कधींहि जाऊं नये ( १८ )

२१८

( वाक्शल्य असह्य असतें ) ४-३-१९

तथाऽरिभिर्न व्यथते शिलीमुखैः शेतेऽर्दिताङ्गो हृदयेन दूयता ॥
स्वानां यथा वक्रधियां दुरुक्तिभिर्दिवानिशं तप्यति मर्मताडितः॥१९॥

कुटिल बुद्धीच्या बंधुजनांनीं दुर्वाक्यें बोलून मर्मस्थानीं प्रहार केले म्हणजे काळजाला इतके झोंबतात कीं, त्या दुःखामुळें तो रात्रंदिवस सारखा तळमळत असतो. शत्रूंनीं बाण मारून अंगाचे तुकडे केले तरीहि तो तितका तळमळत नाहीं, तर सुखानें झोंप घेत असतो(१९)

२१९

( सज्जनाचें लक्षण ) ४-३-२२

प्रत्युद्गमप्रश्रयणाभिवादनं विधीयते साधु मिथः सुमध्यमे ॥
प्राज्ञैः परस्मै पुरुषाय चेतसा गुहाशयायैव न देहमानिने ॥ २२ ॥

सामोरें जाणें, नम्रता दाखविणें, नमस्कार करणें, इत्यादि जे परस्परांच्या सत्काराचे प्रकार लोकांमध्यें चालू आहेत, त्यांची खरी योग्यता विद्वानांना कळत असते; म्हणूनच

ते त्यांचा उपयोग सर्वांच्या अन्तर्यामी जो श्रेष्ठ श्रीहरि त्याच्याच संबंधानें अन्तःकरणपूर्वक करीत असतात. देहादिकांकर अभिमान ठेवणाऱ्या मूर्खांच्या सत्काराकडे अर्थात् त्याचा उपयोग ते करीत नाहींत ( २२ )

( याप्रमाणें शंकरानें उपदेश केला; परंतु तो सतीला पटला नाहीं. पति नको नको म्हणत असतांहि पित्याचा यज्ञसमारंभ पहाण्याच्या उत्कंठेनें सती पित्याच्या यज्ञमंडपांत गेली. परंतु द्वेष आणि अहंकार यांनीं मत्त झालेल्या दक्षप्रजापतीस पार्वतीसारख्या थोर कन्येचें महत्त्व वाटलें नाहीं. त्यानें तिजकडे मुळींच पाहिलें नाहीं. हा अपमान त्या मानी शंकरपत्नीस सहन झाला नाहीं. वडिलांच्या अपमानापेक्षांहि आपण पतीची अवज्ञा करून येथें आलों, ही गोष्ट तिच्या मनास विशेष लागली; आणि तिनें तत्काळ त्या यज्ञकुंडातच उडी घेतली. शंकरास हें वर्तमान समजतांच त्यांनीं आपल्या जटेपासून वीरभद्राला उत्पन्न केलें व त्याजकडून दक्षाचें पारिपत्य केलें. पुढें सर्व देवांनीं शंकराची स्तुति करून त्यांस प्रसन्न केलें आणि दक्षाचें व सतीचें पुनर्जीवन करविलें. इत्यादि कथाभाग आला आहे. या कथाभागांत पार्वतीसारख्या महादेवाच्या पत्नीसहि पतीच्या आज्ञेचें उल्लंघन केल्यामुळें कसा अनिष्ट प्रसंग भोगावा लागला; तसेंच दक्षप्रजापतीसारख्या सर्वाधिकारी पुरुषासहि केवळ अहंकाराच्या स्वाधीन झाल्यामुळें कसें प्राणास मुकावें लागलें, याचें चित्र भागवतकारांनीं कथाप्रसंगानें फारच गोड वठविलें आहे. याप्रसंगीं देवांनीं केलेल्या शंकराच्या स्तुतींतील पुढील दोन श्लोक मनन करण्यासारखे आहेत. देव म्हणतात— )

२२०

( दुसऱ्यांस तुच्छ मानणारांचा दैवानेंच नाश होतो ) ४–६–४७

**पृथग्धियः कर्मदृशो दुराशयाः परोदयेनार्पितहृद्रुजोऽनिशम् ॥**
**परान्दुरुक्तैर्वितुदन्त्यरुन्तुदास्तान्मा वधीर्दैववधान्भवद्विधः ॥ ४७ ॥**

हे शंकरा, ज्यांच्या अंतःकरणांत द्वैतभाव दृढ झालेला असतो, ज्याची दृष्टि कर्मामांत गढून गेलेली असते आणि ज्यांचीं अंतःकरणें दुष्ट उद्देशांनीं भरलेलीं असतात, त्यांना दुसऱ्याचा उत्कर्ष पाहिला कीं मोठा हृद्रोग लागतो, व मर्मभेदक दुर्भाषणें बोलून ते दुसऱ्याच्या मनावर प्रहार करितात. पण अशा पुरुषांचा दैवानेंच नाश केलेला असल्यामुळें आपल्यासारख्यांनीं त्यांच्या नाशास प्रवृत्त होणें इष्ट नाहीं

२२१

( सज्जन हे नेहमीं कृपाळूच असतात ) ४-६-४८

**यस्मिन्यदा पुष्करनाभमायया दुरन्तया स्पृष्टधियः पृथग्दृशः ॥**
**कुर्वन्ति तत्र ह्यनुकम्पया कृपां न साधवो दैवबलात्कृते क्रमम् ॥**

दुर्धर परिणामाच्या अशा परमेश्वरी मायेनें ज्यांच्या चित्ताला मोह घातला आहे, त्याच्या दृष्टीमध्यें मी व दुसरा असा द्वैतभाव उत्पन्न होतो, अशा पुरुषांच्या हातून एखादा

ठिकाणीं एखादे वेळीं अपराध घडला तरी सत्पुरुष आपल्या स्वभावाला अनुलक्षून त्यांच्यावर कृपाच करितात; त्यांच्यावर आपला पराक्रम चालवून त्यांचा नाश करीत नाहींत. ( सारांश, सज्जन पुरुष दुसऱ्याचा नाश कधीं करीत नाहीत )

## ध्रुवचरित्र.

( यानंतर अध्याय ८ पासून १२ पर्यंत ध्रुवाचें चरित्र वर्णिलें आहे. या कथानकांत केवळ सापत्न मातेनें केलेल्या अपमानामुळें पांच वर्षाच्या अल्पवयीं ध्रुवबालकाचे ठायीं स्वाभिमान जागृत होऊन त्यानें अढळपद कसें संपादन केलें, हें कथानक, आपला स्वतःचा, आपल्या समाजाचा, आपल्या देशाचा, आपल्या राष्ट्राचा, पदोपदीं होणारा अपमान लक्षांत घेऊन त्याच्या उद्धारार्थ झटणाऱ्या तरुणांनीं लक्षांत घेण्यासारखें आहे. नारदांनीं जरी त्याचा निश्चय ढळविण्याकरितां तपश्चर्येच्या कार्यांत अनेक अडचणी दाखविल्या, तरी त्या अल्पवयी बालकानें आपला निश्चय ढळूं दिला नाहीं. ' निश्चयाचें बळ तुका म्हणे तेंचि फळ ' या संतवचनाप्रमाणें त्यानें शेवटपर्यंत आपला निश्चय कायम ठेवला. अर्थात् परमेश्वरास त्यास न मागतांहि अढळपद द्यावें लागलें. सारांश, केवळ निश्चयाच्या बळावर ध्रुवानें संसारसुख भोगलें, माता-पिता-बंधु-स्त्री सर्वांस सुख दिलें, आणि दुर्मिळ असें अढळपदहि मिळविलें. या चरित्रांत नारदाच्या तोंडी घातलेली दोन उद्बोधक सुभाषितें याखालीं दिलीं आहेत. नारद ध्रुवास सांगतात.—)

### २२२-२२३

( सुखदुःखें हीं कर्माधीन असतात ) ४-८-२८, २९

**पुंसो मोहमृते भिन्ना यल्लोके निजकर्मभिः ॥ २८ ॥**
**परितुष्येत्ततस्तात तावन्मात्रेण पूरुषः ॥**
**दैवोपसादितं यावद्वीक्ष्येश्वरगतिं बुधः ॥ २९ ॥**

जगांत मनुष्याला सुख किंवा दुःख प्राप्त होणें हें ज्याच्या त्याच्या कर्मावरच अवलंबून आहे ( २८ ) यास्तव, हे बाळा शहाण्या मनुष्यानें सर्व गोष्टी ईश्वराच्या आधीन आहेत असें समजून दैवयोगानें जितकें आपल्याला मिळालेलें असेल तेवढ्यांतच नेहमी संतोष मानावा (२९) ( प्राप्त वस्तूंपेक्षां अधिकाचा अभिलाष करूं नये हा भावार्थ )

### २२४

( जगांत वागावें कसें ? ) ४-८-३४

**गुणाधिकान्मुदं लिप्सेदनुक्रोशं गुणाधमात् ॥**
**मैत्रीं समानादन्विच्छेन्न तापैरभिभूयते ॥ ३४ ॥**

आपल्यापेक्षां अधिक गुणांचा मनुष्य जर आपणाला लाभला तर त्याला पाहून आनंद मानावा; कमी गुणांचा प्राप्त झाला तर त्यावर कृपा करावी, आणि आपल्या बरो-

बरीचा असला तर त्याच्याशीं मैत्री करावी. अशा रीतीनें वागल्यास प्राण्याला दुःखें कधींहि भोगावीं लागत नाहींत. (३४)

( सर्व कर्माधीन आहे हें लक्षांत घेऊन सापत्न मातेनें केलेल्या अपमानाबद्दल विशाद म ं नको, व तपश्चर्येसारखें दुस्तर व्रत स्वीकारूं नको, असा नारदानें जरी उपदेश कला, तरी ध्रुवानें आपला निश्चय कायम ठेवून उग्र तप केलें. शरीराची पर्वा केली नाहीं. त्याचें फळ परमेश्वरास द्यावें लागलें, आणि परमेश्वराच्या आज्ञेनुसार त्यानें राज्याचा व संसाराचाहि उपभोग घेतला. संसारी मनुष्याप्रमाणें राज्यकारभार हाकीत असतांना ध्रुवाचा सावत्र भाऊ उत्तम याचा अरण्यांत वध झाला. त्या वेळीं बंधूच्या वधाचा सूड उगविण्याकरितां ध्रुवानें अनेक गुह्यकांचा वध केला; परंतु त्याचा राग शांत होईना. तेव्हां स्वायंभुव मनूनीं तेथें येऊन त्यास उपदेश केला तो फारच सुंदर आहे, त्यांतील उद्बोधक सुभाषितें खालीं दिलीं आहेत. ) स्वायंभुव मनु म्हणतात —

२२५–११८

( मृत्यूचें कारण दैव होय ! ) ४–११–२३ ते २६

अव्यक्तस्याप्रमेयस्य नानाशक्त्युदयस्य च ॥
न वै चिकीर्षितं तात को वेदाथ स्वसंभवम् ॥ २३ ॥
न चैते पुत्रक भ्रातुर्हन्तारो धनदानुगाः ॥
विसर्गादानयोस्तात पुंसो दैवं हि कारणम् ॥ २४ ॥
स एव विश्वं सृजति स एवावति हन्ति च ॥
अथापि ह्यनहंकारान्नाज्यते गुणकर्मभिः ॥ २५ ॥
एष भूतानि भूतात्मा भूतेशो भूतभावनः ॥
स्वशक्त्या मायया युक्तः सृजत्यत्ति च पाति च ॥ २६ ॥

बा ध्रुवा, अदृश्य, अतर्क्य आणि नानाशक्तींचें उत्पत्तिस्थान असलेल्या त्या परमात्म्याचा उद्दिष्ट हेतू कोणासहि कळत नाहीं; मग आपण कोणापासून उत्पन्न झालों, त्याचें खरें स्वरूप कोण जाणूं शकेल बरें ? ( २३ ) हे बाळा ध्रुवा, ह्या कुबेरसेवक यक्षांनीं तुझ्या भावाला मारिलें नाहीं, कारण अरे बाळा पुरुषांच्या जन्ममृत्यूचें खरें कारण दैव हेंच होय ( २४ ) तोच परमेश्वर विश्वाची उत्पत्ति, संरक्षण व संहार करीत असतो; तथापि त्याच्या ठायीं अहंकाराचा लेशहि नसल्यामुळें तो गुणकर्मांनीं लिप्त होत नाहीं. ( २५ ) सर्व भूतांचा अंतर्यामी, त्यांचा स्वामी व त्यांची उत्पत्ति करणारा असा हा परमेश्वर आपल्या त्रिगुणात्मक मायेनें युक्त होऊन विश्वाची उत्पत्ति, संरक्षण व संहार करीत असतो ( २६ )

२२९-२३२

( क्रोधाचा जय करणें अवश्य ) ४-११-२९ ते ३२

**तमेनमङ्गात्मनि मुक्तविग्रहे व्यपाश्रितं निर्गुणमेकमक्षरम् ॥**
**आत्मानमन्विच्छ विमुक्तमात्मदृग्यस्मिन्निदं भेदमसत्प्रतीयते ॥ २९ ॥**

**त्वं प्रत्यगात्मनि तदा भगवत्यनन्त**
**आनन्दमात्र उपपन्नसमस्तशक्तौ ॥**
**भक्तिं विधाय परमां शनकैरविद्या-**
**ग्रन्थिं विभेत्स्यसि ममाहमिति प्ररूढम् ॥ ३० ॥**

**संयच्छ रोषं भद्रं ते प्रतीपं श्रेयसां परम् ॥**
**श्रुतेन भूयसा राजन्नगदेन यथामयम् ॥ ३१ ॥**
**येनोपसृष्टात्पुरुषाल्लोक उद्विजते भृशम् ॥**
**न बुधस्तद्वशं गच्छेदिच्छन्नभयमात्मनः ॥ ३२ ॥**

हे ध्रुवा, आतां तूं शत्रुमित्रादि भेदभाव मिथ्या आहे असें समजून तो टाकून दे; व अभेदबुद्धि मनांत बाळगून निर्गुण, अविनाशी, अद्वितीय व नित्यमुक्त अशा परमात्म्याचा स्वतःच्या अंतःकरणांत शोध कर ( २९ )

अशा रीतीनें तूं परमात्म्याचा आत्म्याच्या ठिकाणीं शोध करूं लागलास म्हणजे प्रत्यगात्मा, अनंत, आनंदस्वरूप व षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा भगवंताच्या ठिकाणीं तुझी उत्तम भक्ति हळूहळू दृढ होईल, आणि मी व माझें, अशा रीतीनें वाढलेली तुझी अज्ञानाची गांठ समूळ तुटून जाईल ( ३० )

औषधानें ज्याप्रमाणें रोगाचा विध्वंस करितात त्याप्रमाणें कल्याणाचा कट्टा शत्रु असा जो क्रोध, तो आपल्या ज्ञानाच्या योगानें तूं समूळ नाहींसा कर. तुझें कल्याण असो (३१)

क्रोधानें पछाडलेल्या पुरुषापासून लोकांना अतिशय भय प्राप्त होतें. यास्तव स्वतः निर्भय होऊं इच्छिणाऱ्या समंजस पुरुषानें क्रोधाला मुळींच थारा देऊं नये (३२)

## वेनराजाची कथा.

अध्याय १३, १४ मध्यें वेनराजाची कथा आहे. वेन हा ध्रुवाच्या वंशांतील ९ वा पुरुष होय. याचा मातृवंश चांगला नसल्यामुळें हा अत्यंत दुष्ट राजा निपजला. तो प्रजेला गुलामाप्रमाणें वागवूं लागला. त्यामुळें राज्यांत चोर लुटारू यांचा प्रलय झाला व सर्वत्र अव्यवस्था उत्पन्न झाली. त्याचा परिणाम असा झाला कीं राज्यांतील पुढाऱ्यांनीं त्याचा वध केला. त्याला संतति नव्हती म्हणून लोकांनीं त्याच्या बाहूंचें मंथन केलें त्यापासून पृथूची उत्पत्ति झाली. या वेनराजाच्या कथेंत भागवतकारांनी दोन गोष्टी दाखविल्या आहेत.

पहिली गोष्ट ही कीं, मातृवंश चांगला नसला तर संतती दुर्गुणी निपजते; आणि दुसरी गोष्ट ही कीं, राजा प्रजेचें कल्याण इच्छिणारा नीतिमान नसला, तर त्याचा नाश होतो. या कथानकांत वेन राजाचा पिता अंगराजा वाईट संततीमुळें हताश झाला असतां त्याच्या तोंडीं भागवतकारांनीं पुढील उद्‌बोधक श्लोक घातले आहेत. )

२३३-२३५

( वाईट संततीपासून होणारे परिणाम. ) ४-१३-४४ ते ४६

यतः पापीयसी कीर्तिरधर्मश्च महान्नृणाम् ॥
यतो विरोधः सर्वेषां यत आधिरनन्तकः ॥ ४४ ॥
कस्तं प्रजापदेशं वै मोहबन्धनमात्मनः ॥
पण्डितो बहु मन्येत यदर्थाः क्लेशदा गृहाः ॥ ४५ ॥
कदपत्यं वरं मन्ये सदपत्याच्छुचां पदात् ।
निर्विद्येत गृहान्मर्त्यो यत्क्लेशनिवहा गृहाः ॥ ४६ ॥

दुष्ट संततीमुळें पुरुषाची दुष्कीर्ति होते, व त्याच्या हातून मोठा अधर्म घडतो. त्याला सर्वजण निरोध करूं लागतात आणि त्यामुळें त्याच्या दुःखाला पारच रहात नाहीं (४४) असें असल्यामुळें आपल्याला मोह घालून बंधन उत्पन्न करणारें हें संततिरूप संकट कोणता सुज्ञ पुरुष चांगलें मानील ? अशा संततीमुळें घर म्हणजे क्लेशांचें स्थान होऊन बसतें ( ४५ ) पण दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर चांगल्या संततीपेक्षां दुःखाचें मूळ अशी दुष्ट संततीच श्रेष्ठ समजली पाहिजे. कारण क्लेशांचें आगर असलेलें घरदार अशा संततीमुळें सोडून देऊन मनुष्य वैराग्यशील होतो. (४६)

( वेनराजाच्या दुष्कृतीमुळें हताश झालेल्या प्रजेच्या तोंडीं पुढील श्लोक घातले आहेत )

२३६-२३८

( दोहोंकडूनहि संकट ) ४-१४-८ ते १०

अहो उभयतः प्राप्तं लोकस्य व्यसनं महत् ॥
दारुण्युभयतो दीप्त इव तस्करपालयोः ॥ ८ ॥
अराजकभयादेष कृतो राजाऽतदर्हणः ॥
ततोऽप्यासीद्भयं त्वद्य कथं स्यात्स्वस्ति देहिनाम् ॥ ९ ॥
अहेरिव पयः पोषः पोषकस्याप्यनर्थभृत् ॥
वेनः प्रकृत्यैव खलः सुनीथागर्भसंभवः ॥ १० ॥

लोक म्हणाले, " प्रजेवर दोहोंकडून मोठें संकट ओढवलें आहे. लांकूड दोन्हीं टोंकाकडून पेटूं लागलें असतां मध्यें सांपडलेल्या कीडी मुंग्यांची जी अवस्था होते, तशी

एकीकडून दुष्ट चोर आणि दुसरीकडून स्वतः राजा, यांच्यामध्यें सांपडून लोकांची स्थिति बिकट झाली आहे. ( ८ ) कोणी राजा नसला म्हणजे राष्ट्राला भय उत्पन्न होतें, हें जाणून आम्ही या वेनाला तो अयोग्य असतांहि राजा केलें; आणि तोच तर आतां भय दाखवूं लागला. तेव्हां या लोकांना सुख कसें मिळावें ? ( ९ ) अहो दूध पाजून सर्पाचें पोषण करणें जसें पोषकाला घातक होतें, त्याप्रमाणें स्वभावतःच दुष्ट असलेला हा सुनीथा राणीचा पुत्र वेन आम्हांला घातक झाला आहे. ( १० )

( लोकनायकांनीं वेनराजास केलेल्या उपदेशापैकीं पुढील दोन श्लोक पहा )

२३९-२४०

( प्रजेचें कल्याण करणें हा राजाचा धर्म. ) ४-१४-१६-१७

**स ते मा विनशेद्वीर प्रजानां क्षेमलक्षणः ।।**
**यस्मिन्विनष्टे नृपतिरैश्वर्यादवरोहति ।। १६ ।।**
**राजन्नसाध्वमात्येभ्यश्चोरादिभ्यः प्रजा नृपः ।।**
**रक्षन्यथा बलिं गृण्हन्निह प्रेत्य च मोदते ।। १७ ।।**

हे शूर राजा, प्रजेचें कल्याण करणें हा जो तुझा धर्म, तो तूं नष्ट होऊं देऊं नकोस. कारण, तो नष्ट झाला असतां राजा आपल्या ऐश्वर्यापासून च्युत होतो. ( १६ )

जो राजा, दुष्ट अधिकाऱ्यांपासून तसेंच चोरादिकांपासून प्रजेचें रक्षण करितो, आणि लोकांच्या शक्तीप्रमाणेंच त्यांच्यापासून करभार घेतो, त्या राजाला या लोकीं तशीच परलोकींहि सुखाची प्राप्ति होते. ( १७ )

## पृथुराजाची कथा.

वेन राजानंतर पृथु राजा झाला. हा मोठा नीतिमान् व्यवहारदक्ष व कर्तव्यतत्पर होता. यानें आपल्या कारकीर्दींत सर्व प्रकारची सुधारणा केली व शेवटीं वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करून मनुष्यदेहाचें सार्थक्य केलें. याच्या कथानकांत लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं, या राजास गादीवर बसविते वेळीं लोकांनीं त्यास मानपत्र देण्याचा प्रसंग आणला. त्या वेळीं यानें त्या मानपत्राचा लोकाग्रहास्तव स्वीकार करण्यापूर्वी जे उद्गार काढले ते लक्षांत घेण्यासारखे आहेत. पृथुराजा म्हणतो–

२४१–२४२

( श्रेष्ठ पुरुष स्तुतीला भाळत नाहींत ) ४–१५–२४,२५

**महद्गुणानात्मनि कर्तुमीशः कः स्तावकैः स्तावयतेऽसतोऽपि ।।**
**तेऽस्याभविष्यन्निति विप्रलब्धो जनावहासं कुमतिर्न वेद ।। २४ ।।**

प्रभवो ह्यात्मनः स्तोत्रं जुगुप्सन्त्यपि विश्रुताः ॥
ह्रीमन्तः परमोदाराः पौरुषं वा विगर्हितम् ॥ २५ ॥

आपल्या ठायीं मोठे गुण आणण्यांची ज्याला शक्ति आहे, असा कोणता पुरुष ते गुण नसतांनाच स्तुतिपाठकांकडून स्तुति करुन घेईल बरें ? आतां गुण नसतील व पुढें ते गुण येतील, अशा खोट्या स्तुतीनें फसलेला जो अल्पबुद्धि मनुष्य असेल तो मात्र अशी स्तुति करुन घेईल. कारण त्यामुळें लोक आपला उपहास करितात हेंहि त्याला कळत नसतें ( २४ ) जे समर्थ असतात, ते प्रसिद्ध असले तरी, त्यांना नम्रपणामुळें लोकांनीं केलेली स्वतःची स्तुती आवडत नाहीं. आणि त्यांच्या अत्यंत उदार स्वभावामुळें निंदेस पात्र होईल असला पराक्रम ते कधीं करीत नाहींत. ( २५

पृथ्वी सारखी करतांना पृथुराजा पृथ्वीस उद्देशून बोलला—

२४३

( वधाचादि दोष लागत नाहीं ) ४–१७–२६

पुमान्योषिदुत क्लीब आत्मसंभावनोऽधमः ॥
भतेषु निरनुक्रोशो नृपाणां तद्वधोऽवधः ॥ २६ ॥

पुरुष असो, स्त्री असो, कीं नपुंसक असो, जो कोणी आपलेः प्रशंसा करुन नीचपणें प्राण्यांशीं निर्दयपणानें वागेल त्याचा राजानें वध केला, तर तो वधाच्या दोषास पात्र होत नाहीं ( २६ ) ( दुसऱ्यास पीडा देणारा वधास पात्र होय हा भावार्थ )

पृथ्वीनें केलेला पृथूला उपदेश—

२४४

( प्रजापालन करणें हाच राजाचा धर्म. ) ४–२०–१४

श्रेयः प्रजापालनमेव राज्ञो यत्साम्पराये सुकृतात्षष्ठमंशम् ॥
हर्तान्यथा हृतपुण्यः प्रजानामरक्षिता करहारोऽघमत्ति ॥ १४ ॥

हे राजा, प्रजापालन करणें हेंच राजाला कल्याणकारक आहे. कारण, प्रजेचें रक्षण करणाऱ्या राजाला परलोकच्या ठिकाणीं प्रजांनीं केलेल्या पुण्याचा सहावा भाग प्राप्त होतो. परंतु विरुद्ध वागून जर तो प्रजेचें रक्षण न करितां तिच्यापासून कर मात्र घेऊं लागला, तर, प्रजा त्याचें पुण्य हरण करतात व प्रजांनीं केलेल्या पापांचीं फळें त्याला भागावीं लागतात. ( सारांश, पुत्रवत् प्रजेचें पालन करणें हेंच राजाचें पुण्यकृत्य होय )

( पृथु व सनत्कुमार यांच्या भेटीत सनत्कुमारांनीं राजास केलेला ज्ञानोपदेश प्रत्येक

संसारी जीवानें मनन करण्यासारखा आहे हा उपदेश बाविसाव्या अध्यायांत दिला आहे त्यांतील उद्बोधक कांहीं श्लोक याखालीं दिले आहेत सनत्कुमार म्हणतात—)

२४५ ते २५१

( सनत्कुमाराचा पृथूला उपदेश ) ४–२२–२१ वगैरे.

**शास्त्रेष्वियानेव सुनिश्चितो नृणां क्षेमस्य सध्र्यग्विमृशेषु हेतुः ॥**
**असङ्ग आत्मव्यतिरिक्त आत्मनि दृढा रतिर्ब्रह्मणि निर्गुणे च या ॥२१॥**
**अहिंसया पारमहंस्यचर्यया स्मृत्या मुकुन्दाचरिताग्र्यसीधुना ॥**
**यमैरकामैर्नियमैश्चाप्यनिन्दया निरीहया द्वन्द्वतितिक्षया च ॥२४॥**
**हरेर्मुहुस्तत्परकर्णपूरगुणाभिधानेन विजृम्भमाणया ॥**
**भक्त्या ह्यसङ्गः सदसत्यनात्मनि स्यान्निर्गुणे ब्रह्मणि चाञ्जसा रतिः ॥**

**इन्द्रियैर्विषयाकृष्टैराक्षिप्तं ध्यायतां मनः ॥**
**चेतनां हरते बुद्धेः स्तम्बस्तोयमिव ह्रदात् ॥ ३० ॥**
**भ्रश्यत्यनुस्मृतिश्चित्तं ज्ञानभ्रंशः स्मृतिक्षये ॥**
**तद्रोधं कवयः प्राहुरात्मापह्नवमात्मनः ॥ ३१ ॥**
**अर्थेन्द्रियार्थाभिध्यानं सर्वार्थापह्नवो नृणाम् ॥**
**भ्रंशितो ज्ञानविज्ञानाद्येनाविशति मुख्यताम् ॥ ३३ ॥**
**न कुर्यात्कर्हिचित्सङ्गं तमस्तीव्रं तितीरिषुः ॥**
**धर्मार्थकाममोक्षाणां यदत्यन्तविघातकम् ॥ ३४ ॥**

हे राजा, आत्मव्यतिरिक्त अशा देहादिकांविषयीं विरक्ति ठेवून निर्गुण ब्रह्मरूप आत्म्याच्या ठिकाणीं दृढ प्रीति जडविणें, हेंच उत्तम विचारांनीं ओतप्रोत भरलेल्या शास्त्रांमध्यें मनुष्यांच्या मोक्षरूप कल्याणाचें साधन ठरविलें आहे ( २१ )

हिंसा न करणें, अनायासानें प्राप्त झालेल्या अन्नादिकांच्या योगानें वृत्ति चालविणें, आपल्या हिताचें अनुसंधान राखणें, मोक्षदात्या हरीच्या लीलारूपी उतम अमृतांचें स्मरण करणें, कोणतीहि इच्छा न धरितां अहिंसा, सत्य, स्नान, संध्या इत्यादि यमनियमांचें सेवन करणें, दुसऱ्या पंथांची किंवा दुसऱ्या देवतांची निंदा न करणें, शरीरनिर्वाहाकरितांच कोणतेहि व्यापार करणें, शीत, उष्ण, क्षुधा, तृष्णा इत्यादि गोष्टी सहन करणें आणि भगवद्भक्तांच्या कर्णांना शोभविणाऱ्या अलंकारभूत अशा श्रीहरीच्या गुणानुवादांचा उच्चार करणें, यांच्या योगानें वृद्धिंगत झालेल्या भक्तीनें स्थूलसूक्ष्मरूपी अशा

आत्मव्यतिरिक्त प्रपंचाच्या ठिकाणीं विरक्ति होते, आणि निर्गुण ब्रह्मरूप आत्म्याच्या ठिकाणीं दृढ प्रीति अनायसानें प्राप्त होते. ( २४,२५ )

जसें डोहाच्या तीरावरून असणारे लव्हाळे, कोणाला न समजतां आपल्या मुळांनीं डोहांतील उदक हळूहळू ओढून घेतात, त्याप्रमाणें ऐकिलेल्या किंवा अनुभविलेल्या विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषांचें मन विषयासक्त झालेल्या इंद्रियांनीं विषयांकडे आकर्षण केलें असतां, तें त्याच्या बुद्धीच्या विचारसामर्थ्याला न समजतांच हरण करितें. विचारसामर्थ्य नाहींसें झालें म्हणजे पूर्वापरानुसंधानरूप स्मृति नाहींशी होत्ये आणि स्मृतीचा नाश होतांच स्वरूपज्ञानाचा नाश होतो. अशाप्रकारें ज्ञानाचा प्रतिबंध होणें ह्यालाच विद्वान् लोक, स्वतःच्या आत्म्याचा नाश करून घेणें असें म्हणतात. ( ३०,३१ ).

धनांचें व इंद्रियतृप्तीचें निरंतर चिंतन करणें, हाच मनुष्याच्या सर्व पुरुषार्थांचा नाश होय. कारण, त्या चिंतनानें शाब्दिक व आनुभविक अशा दोन्हीं प्रकारच्याहि ज्ञानापासून भ्रष्ट होऊन पुरुष स्वकर्मापासून च्युत होतो व वृक्षादियोनींत जन्मास जातो (३३) म्हणून भयंकर संसारांतून तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें, धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांस घातक अशी जी वस्तु तिजवर कधींहि आसक्ति ठेवूं नये. ( ३४ )

( प्रचेतसनामक दहा पुत्रांनीं केलेली शंकराची स्तुति—)

२५२

( विषय लंपटाचा अचानक नाश होतो ) ४-२४-६६

**प्रमत्तमुच्चैरितिकृत्यचिन्तया प्रवृद्धलोभं विषयेषु लालसम् ॥**
**त्वमप्रमत्तः सहसाभिपद्यसे क्षुल्लेलिहानोऽहिरिवाखुमन्तकः ॥**

क्षुधेच्या योगानें जिभल्या चाटीत असलेला सर्प, जसा उंदराला गिळून टाकितो, त्याप्रमाणें विषयाविषयीं लंपट आणि विषय प्राप्त झाले तरीसुद्धां अत्यंत लोभी, व ' असेंच हें करावयाचें ' अशा चिंतेनें असावध असलेल्या या लोकांना सावध करणारा असा कालरूपी तूं कालस्वरूपीं एकाएकीं गट्ट करून टाकितोस ( ६६ )

## प्राचीनबर्हि राजाची कथा.

( अध्याय २५ पासून ३१ पर्यंत पृथूचा पुत्र विजिताश्व व त्यानंतर त्याचा पुत्र हविर्धान हा गादीवर बसला. हविर्धानाच्या पुत्रांत बर्हिषद मोठा पुण्यशील होता. त्यानें अनेक यज्ञ करून प्राचीनबर्हि असें नांव मिळविलें. ह्या हविर्धानाला दहा पुत्र होते. त्यांनीं तप करून रुद्राला प्रसन्न केलें आणि रुद्रानें त्यांस नारायणस्तोत्राचा उपदेश केला. हें नारायणस्तोत्र अत्यंत पुण्यकारक मानलें आहे. हें स्तोत्र २४ व्या अध्यायांत दिलें आहे. असो, प्राचीनबर्हिच्या मुलांनीं इकडे तपश्चर्या चालविली होती, परंतु कर्मावर आसक्त होऊन अध्यात्मज्ञानाला पारखा झाला होता. तेव्हां नारदानें त्याची भेट घेऊन कर्मकाण्डाचा फोलपणा त्याच्या नजरेला आणला व अध्यात्मज्ञानाचा उपदेश

केला. या ठिकाणीं नारदानें रूपकाच्या रूपानें पुरंजन राजाची गोष्ट राजास सांगितली, ती प्रत्येक मुमुक्षूनें हृदयांत ठसविण्यासारखी आहे. संसार व संसारांतील स्त्री-पुत्रादि मायेचा पसारा कसा अशाश्वत व दुःखमय आहे हें या कथानकांत मार्मिक रीतीनें दर्शविलें आहे. नारदाचा उपदेश राजाच्या मनावर ठसला व तो सर्वस्वाचा त्याग करून तप करण्यास नि न गेला. या कथेंतील निवडक सुभाषितें याखालीं दिलीं आहेत. )

२५३

( अज्ञान्याला मोक्ष नाहीं ) ४-२५-६

**गृहेषु कूटधर्मेषु पुत्रदारधनार्थधीः ॥**
**न परं विन्दते मूढो भ्राम्यन्संसारवर्त्मसु ॥ ६ ॥**

कपटधर्मानें युक्त व जन्ममरणरूप संसाराला मार्गभूत अशा गृहांत भ्रमण पावणारा, आणि पुत्र, स्त्री व धन यांच्याठिकाणीं, हाच परम पुरुषार्थ आहे, अशी बुद्धि धारण करणारा जो मूढ पुरुष त्याला मोक्ष कधींहि मिळत नाहीं ( ६ )

२५४

( संसाराचें सार ) ४-२६-१५

**न तथैतर्हि रोचन्ते गृहेषु गृहसंपदः ॥**
**यदि न स्याद्गृहे माता पत्नी वा पतिदेवता ॥**
**व्यङ्ग रथ इव प्राज्ञः को नामासीत दीनवत् ॥ १५ ॥**

घरामध्यें संपत्ति पुष्कळ असली तरी त्यांत जर माता किंवा पतिव्रता पत्नी नसेल तर ‘ चाकें वगैरे अवयव मोडून गेलेल्या रथाप्रमाणें ’ दुःखकारक झालेल्या त्या घरामध्यें कोणता बरें चतुर पुरुष दीनासारखा वास करील ! (१५)

२५५ ते २६२

( जीवाची स्थिति ) ४-२९-२९ ते ३६

**क्वचित्पुमान्क्वचिच्च स्त्री क्वचिन्नोभयमन्दधीः ॥**
**देवो मनुष्यस्तिर्यग्वा यथाकर्मगुणं भवः ॥ २९ ॥**
**क्षुत्परीतो यथा दीनः सारमेयो गृहंगृहम् ॥**
**चरन्विन्दति यद्दिष्टं दण्डमोदनमेव वा ॥ ३० ॥**
**तव कामाशयो जीव उच्चावचपथा भ्रमन् ॥**
**उपर्यधो वा मध्ये वा याति दिष्टं प्रियाप्रियम् ॥ ३१ ॥**
**दुःखेष्वेकतरेणापि दैवभूतात्महेतुषु ॥**
**जीवस्य न व्यवच्छेदः स्याच्चेत्तत्तत्प्रतिक्रिया ॥ ३२ ॥**

यथा हि पुरुषो भारं शिरसा गुरुमुद्वहन् ॥
तं स्कन्धेन स आधत्ते तथा सर्वाः प्रतिक्रियाः ॥ ३३ ॥
नैकान्ततः प्रतीकारः कर्मणां कर्म केवलम् ॥
द्वयं ह्यविद्योपसृतं स्वप्ने स्वप्न इवानघ ॥ ३४ ॥
अर्थे ह्यविद्यमानेऽपि संसृतिर्न निवर्तते ॥
मनसा लिङ्गरूपेण स्वप्ने विचरतो यथा ॥ ३५ ॥
अथात्मनोऽर्थ भूतस्य यतोऽनर्थपरंपरा ।
संसृति स्तद्व्यवच्छेदो भक्त्या परमया गुरौ ॥ ३६ ॥

ज्याची ज्ञानशक्ति अज्ञानानें नष्ट झाली आहे असा हा जीव, कधीं पुरुष, कधीं स्त्री, कधीं नपुंसक, कधीं देव, कधीं मनुष्य, अथवा पशुपक्ष्यादि यांत उत्पन्न होतो. एकंदरीत त्यानें जीं कर्मे व गुण संपादन केले असतील त्याप्रमाणें त्याला जन्म मिळतो ( २९ )

जसा भुकेनें व्याकुळ झालेला दीन कुत्रा, घरोघर फिरत असतां, त्याचें प्राक्तन असेल त्याप्रमाणें त्याला कोठें काठीचा मार मिळतो, तर कोठें अन्नहि मिळतें, त्याप्रमाणें अंतःकरण विषयवासनांनीं भरून गेले असतां जीव विधिनिषेधरूप मार्गानें देवलोक, नरकलोक अथवा मनुष्यलोक यांत भ्रमण करीत दैवीं असेल त्याप्रमाणें सुख किंवा दुःख यांचा अनुभव घेतो. ( ३०,३१ ) एकेका दुःखाचा प्रतिकार केला असतां सुखप्राप्ति होईल असेंहि नाहीं. कारण आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक, अशा दुःखांपैकीं एकाद्याचा तरी जीवाशीं संयोग नाहीं असें कधींच घडत नाहीं ( ३२ )

जसा डोक्यावरून मोठें ओझें नेणारा माणूस डोक्याला पीडा होऊं लागली म्हणजे तें ओझें फारतर खांद्यावर घेतो त्याप्रमाणेंच सुखाच्या आशेनें दुःखाच्या निवृत्तीकरितां जे जे उपाय करावे त्यांचा प्रतिकार होतो, ते सर्वहि दुःखकारकच असतात (३३)

हे राजा, जसा स्वप्नामध्यें प्राप्त झालेल्या दुःखाच्या निवृत्तींचा स्वप्नामध्यें योजिलेला उपाय जागृदवस्थेवांचून खरा परिणामकारक होत नाहीं, त्याप्रमाणें संसाराला कारणभूत जें भक्तिज्ञानरहित कर्म तें दुःखांना कारणभूत असलेल्या पापकर्मांचें निवर्तक होत नाहीं. कारण, दुःखाला कारणभूत जें पापकर्म व त्याचें निवर्तक जें पुण्यकर्म, तीं दोन्हींहि अज्ञानापासून उद्भवलेलीं असल्यामुळें त्यांची निवृत्ति होत नाहीं ( ३४ )

उपाधिरूप अशा मनासह संचार करणाऱ्या जीवाला स्वप्नामध्यें दृष्टि पडलेल्या, परंतु वस्तुतः मुळींच नसणाऱ्या व्याघ्र-सर्प-चोरादिकांपासून प्राप्त झालेलें भय, तो जागा झाल्याखेरीज दुसऱ्या कोणत्याहि उपायानें जसें निवृत्त होत नाहीं, तसें जागृदावस्थेमध्येंहि हा प्रपंचरूप अर्थ आत्म्याच्या दृष्टीनें वस्तुतः मुळींच नसतांहि, जो-

पर्यंत ज्ञानाच्या योगानें या जीवाचें अज्ञान निवृत्त होत नाहीं, तोंपर्यंत दुसऱ्या कोणत्याहि उपायानें याचा जन्ममरणरूप संसार निवृत्त होत नाहीं ( ३५ )

म्हणून सर्व पुरुषार्थरूपी अशा या जीवात्म्याला, ज्या अज्ञानामुळें जन्ममरणादि दुःखपरंपरारूप संसार प्राप्त होतो, त्या अज्ञानाचा नाश ज्ञानप्रकाशक गुरु जो भगवान् त्याच्या ठिकाणीं केलेल्या उत्तम भक्तीच्या योगानेंच होतो ( ३६ )

२६३

( फलश्रुति प्रवृत्तीकरितां असतात. ) ४-२९-४७

तस्मात्कर्मसु बर्हिष्मन्नज्ञानादर्थकाशिषु ॥
मार्थदृष्टिं कथाः श्रोत्रस्पर्शिष्वस्पृष्टवस्तुषु ॥ ४७ ॥

यास्तव हे प्राचीनबर्हि राजा, फलश्रुति श्रवण करतांना कानाला मात्र प्रिय लागणारीं, परंतु वस्तुतः परमात्म्याला स्पर्शसुद्धां न करणारीं, आणि अज्ञानाच्या योगेंकरून परमार्थरूप भासणारीं अशीं जीं कर्में, त्यांच्या ठिकाणीं आसक्ति धरूं नको; आणि याच्या योगानेंच मला मोक्ष प्राप्त होईल असें तूं मनामध्यें मुळींच आणूं नकोस ( ४७ )

२६४

( फलदायी कर्म कोणतें. ) ४-२९-४९

आस्तिर्य दर्भैः प्रागग्रैः कार्त्स्न्येन क्षितिमण्डलम् ॥
स्तब्धो बृहद्वधान्मानी कर्म नावैषि यत्परम् ॥
तत्कर्म हरितोषं यत्सा विद्या तन्मतिर्यया ॥ ४९ ॥

हे राजा; पूर्वेकडे अग्रें केलेल्या दर्भांनीं सर्व भूमंडळाला आच्छादून अनेक पशूंच्या वधानें मीच मोठा यज्ञ करणारा असा अभिमान व गर्व तुला झाला आहे. परंतु वास्तविक तूं फारच अज्ञानी आहेस. कर्माचें खरें तत्त्व काय आहे, हें तुला मुळींच समजलें नाहीं. ज्याच्या योगानें हरीचा संतोष होतो तेंच खरें कर्म होय, आणि ज्याच्या योगानें श्रीहरीकडे बुद्धि लागत्ये तीच खरी विद्या होय.

२६५-२६६

( ईश्वर कशानें संतुष्ट होतो ) ४-३१-१९-२०

दयया सर्वभूतेषु संतुष्ट्या येन केन वा ॥
सर्वेन्द्रियोपशान्त्या च तुष्यत्याशु जनार्दनः ॥ १९ ॥
अपहतसकलैषणामलात्मन्यविरतमेधितभावनोपहूतः ॥
निजजयवशगत्वमात्मनोऽयन्न सरति छिद्रवदक्षरः सतां हि ॥

सर्व भूतांवर दया करणें, प्रारब्धयोगानें जें प्राप्त होईल त्याच्या योगानें संतोष मानणें आणि सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवणें; यांच्या योगेंकरून संसारनिवर्तक भगवान् शीघ्र प्रसन्न

होतो ( १९ ) ज्यापासून सर्व कामना निरास पावल्या आहेत, अशा शुद्ध झालेल्या साधूंच्या मनामध्यें निरंतर वृद्धिंगत होणाऱ्या भक्तीनें स्थिर झालेला अविनाशी भगवान् 'मी भक्तजनांच्या स्वाधीन आहे' असें म्हणतो, आणि हृदयाकाश जसें आकाशापासून दूर होत नाहीं, तसा तो या साधूंच्या हृदयांतून केव्हांहि निघून जात नाहीं ( २० )

( या कथानकांत भागवतकारांनीं कर्मकांडाचा तीव्र निषेध केला आहे. आणि सर्वां-भूतीं परमेश्वरस्वरूप मानून भूतदया ठेवणें आणि इंद्रियें स्वाधीन ठेवून प्राप्तस्थितींत संतुष्ट राहणें हेंच मानवी देहाचें कर्तव्य होय असें दर्शविलें आहे. )

---

# पंचम स्कंध.

या स्कधाचे २६ अध्याय आहेत. हा पांचवा स्कंध बहुतेक गद्यमय आहे. याची गद्य-पद्य मिळून संख्या ६६६ आहे. याच्या पहिल्या पंधरा अध्यायांत मनुपुत्र जो प्रियव्रत त्याचा वंशविस्तार सांगितला आहे; व पुढे विश्वाच्या स्वरूपाचें वर्णन आहे.

## प्रियव्रत व ऋषभदेव.

मनुपुत्र प्रियव्रत नारदाच्या उपदेशाप्रमाणें ब्रह्मज्ञानाची दीक्षा घ्यावयास सिद्ध झाला होता, व मनु त्याला घरीं चलण्याविषयीं आग्रह करीत होता, अशा स्थितींत हंसवाहन ब्रह्मदेव तेथें आले व त्यांनीं प्रियव्रताला जो उपदेश केला तो प्रापंचिक जीवास फारच महत्वाचा आहे. त्यांतील निवडक श्लोक खालीं दिले आहेत.

२६७ ते २७३

( सर्व लोक पराधीन आहेत. ) ५–१–१२ ते १८

न तस्य कश्चित्तपसा विद्यया वा न योगवीर्येण मनीषया वा ॥
नैवार्थधर्मैः परतः स्वतो वा कृतं विहन्तुं तनुभृद्विभूयात् ॥ १२ ॥
भवाय नाशाय च कर्म कर्तुं शोकाय मोहाय सदाभयाय ॥
सुखाय दुःखाय च देहयोगमव्यक्तदिष्टं जनताऽङ्ग धत्ते ॥ १३ ॥
यद्वाचि तन्त्यां गुणकर्मदामभिः सुदुस्तरैर्वत्स वयं सुयोजिताः ॥
सर्वे वहामो बलिमीश्वराय प्रोता नसीव द्विपदे चतुष्पदः ॥ १४ ॥
ईशाभिसृष्टं ह्यवरुन्ध्महेऽङ्ग दुःखं सुखं वा गुणकर्मसङ्गात् ॥
आस्थाय तत्तद्यदयुङ्क्त नाथश्चक्षुष्मताऽन्धा इव नीयमानाः ॥१५॥
मुक्तोऽपि तावद्बिभृयात्स्वदेहमारब्धमश्नन्नभिमानशून्यः ॥
यथानुभूतं प्रतियातनिद्रः किं त्वन्यदेहाय गुणान्न वृङ्क्ते ॥ १६ ॥

भयं प्रमत्तस्य वनेष्वपि स्याद्यतः स आस्ते सहषट्सपत्नः ॥
जितेन्द्रियस्यात्मरतेर्बुधस्य गृहाश्रमः किं नु करोत्यवद्यम् ॥ १७ ॥
यः षटसपत्नान्विजिगीषमाणो गृहेषु निर्विश्य यतेत पूर्वम् ॥
अत्येति दुर्गाश्रित ऊर्जितारीन्क्षीणेषु कामं विचरेद्विपश्चित् ॥१८॥

परमेश्वरानें केलेली गोष्ट, तपश्चर्येच्या योगानें म्हणा, विद्येनें म्हणा, योगबलानें म्हणा बुद्धिसामर्थ्यानें म्हणा, द्रव्यबळानें म्हणा, धर्मानें म्हणा, कीं दुसऱ्या कोणत्याहि साधनानें म्हणा, खोटी पाडांऊ असा एकसुद्धां प्राणी नाहीं ( १२ )

उत्पत्तीसाठीं, नाशासाठीं, कर्मे करण्यासाठीं, किंवा शोक, मोह व सुखदुःखें भोगण्यासाठीं परमेश्वरानें जो देह लावून दिला असेल तो प्राणि धारण करीत असतो (१३)

त्याची वाणी म्हणजे वेद ही एक दावण असून त्या दावणीला आपण सारे गुणकर्मबंधनानें जखडलेले आहोंत. हीं दावीं तुटणें महत्कर्म कठीण आहे, त्यामुळें नाकांत वेसण घातलेलीं जनावरें ज्याप्रमाणें मनुष्याची इर्वा तो सेवा करितात, त्याप्रमाणें आम्हींहि त्या ईश्वराला पूजा अर्पण करतों ( १४ )

परमेश्वर आम्हांला जो जो कांहीं सुखाचा किंवा दुःखाचा वांटा आमच्या गुणकर्माला अनुसरून देईल, तो घेऊन आम्ही मुकाट्यानें स्वस्थ बसतों, आणि आंधळा जसा डोळस नेईल तिकडे जातो, त्याप्रमाणें परमेश्वर आम्हांला गुणांच्या आणि कर्मांच्या धोरणानें देव, मनुष्य; पशु, पक्षी इत्यादि ज्या ज्या योनींत घालील त्या त्या योनि स्वीकारून आम्हालाहि रहावें लागतें ( १५ )

ह्या गोष्टी केवळ अज्ञानी जीवालाच लागू आहेत असें नाहीं, तर ज्ञानी पुरुषालासुद्धां लागू आहेत. पण झोपेंतून उठलेल्या मनुष्याला स्वप्नांत पाहिलेल्या सुखदुःखांच्या गोष्टी जरी आठवल्या तरी त्याचा त्याला अभिमान असत नाहीं, तशी स्थिति मुक्ताची असते. तोहि आपल्या शरीराचा अभिमान न धरितां प्रारब्धकर्माचें फळ भोगून त्याचा क्षय करीत असतो. पुनर्जन्माला साधनीभूत अशा गुणांचा तो मुळींच स्वीकार करीत नाहीं (१६)

जो मनुष्य मूळचाच अविचारी आहे, तो जरी सारा संसर्ग सोडून अरण्यांत जाऊन राहिला, तरी त्याच्या मागच्या यातना म्हणून मुळीं सुटतच नाहींत. कारण तो एकटा म्हणून जरी अरण्यांत जातो, तरी कामक्रोधादि षड्रिपु हे त्याच्याबरोबर असतात, परंतु ज्याचीं इंद्रियें स्वाधीन आहेत, व जो आत्मस्वरूपांतच निरंतर रममाण असतो, असा ज्ञानी पुरुष गृहस्थाश्रमांत असला तरी त्याचें कांहींच वांकडे होत नाहीं ( १७ )

खरोखर षड्रिपु ज्याला जिंकावयाचे असतील त्यानें प्रथम गृहस्थाश्रमाचाच स्वीकार करावा, आणि तेथेंच आपलें इच्छित कार्य साधण्याचा हळू हळू यत्न करावा. कारण, किल्ल्याच्या आधारानें बलवान् शत्रू जेरीस आणितां येतात. शत्रूंची एकदां पांगापांग झाली म्हणजे किल्ल्यांतील लोकांना पाहिजे तिकडे वावरतां येतें ( १८ )

( प्रियव्रताच्या वंशांतील ऋषभदेव ब्रह्मावर्ती गेला असतां, त्या प्रसंगीं ऋषींच्या सभेमध्यें त्यांनीं आपल्या पुत्रांना उद्देशून केलेल्या उपदेशांतील कांहीं श्लोक ).

२७४ ते २७७

( विषय सर्वांनांच मिळतात. ) ५-५-१,२,७,८

**नायं देहो देहभाजां नृलोके कष्टान्कामानर्हते विड्भुजां ये ॥**
**तपो दिव्यं पुत्रका येन सत्त्वं शुद्ध्येद्यस्माद्ब्रह्मसौख्यं त्वनन्तम् ॥ १ ॥**
**महत्सेवां द्वारमाहुर्विमुक्तेस्तमोद्वारं योषितां सङ्गिसङ्गम् ॥**
**महान्तस्ते समचित्ताः प्रशान्ता विमन्यवः सुहृदः साधवो ये ॥२॥**
**यदा न पश्यत्ययथा गुणेहां स्वार्थे प्रमत्तः सहसा विपश्चित् ॥**
**गतस्मृतिर्विन्दति तत्र तापानासाद्य मैथुन्यमगारमज्ञः ॥ ७ ॥**
**पुंसः स्त्रियो मिथुनीभावमेतं तयोर्मिथो हृदयग्रन्थिमाहुः ॥**
**अतो गृहक्षेत्रसुताप्तवित्तैर्जनस्य मोहोऽयमहंममेति ॥ ८ ॥**

ऋषभ म्हणाला,—मुलांनो, ह्या जगामध्यें यातायात केली म्हणजे विष्ठा भक्षण करणाऱ्या कृमिकीटकांना सुद्धां विषयभोग भोगावयास मिळतात. हे विषयसुख प्रारंभीं जरी सुखदायक असें वाटतें, तरी परिणामीं तें दुःखदायकच होतें. ह्याकरितां मनुष्यानें त्या कृमिकीटकाप्रमाणें विषयोपभोगांतच लोळत रहाणें उक्त नव्हे. म्हणून तुम्हीं तपाचरण करा; म्हणजे तुमच्या अंतःकरणाची शुद्धि होईल, आणि अंतःकरण शुद्ध झालें म्हणजे अखंड ब्रह्मानंदाचा लाभ होईल ( १ ) साधूंची सेवा हें मोक्षाचें द्वार असून स्त्रैणपुरुषांचा सहवास हें नरकाचें साधन होय, असें म्हणतात. ज्यांची दृष्टि सम, अंतःकरणवृत्ति अत्यंत शांत, क्रोध ज्याला माहितच नाहीं, सर्वांशीं ज्याची मैत्री, आणि ज्याचें आचरण पवित्र तोच साधु असें समजावें ( २ )

इंद्रियजन्य सुख हें मिथ्या आहे, हें जर मनुष्यानें जाणलें नाहीं, आणि स्वार्थानेंच तो धुंद झाला, तर त्या मूढाला आत्मस्वरूपाचा विसर पडतो आणि तो मैथुनसुखप्रधान गृहांतच गुरफटून जाऊन नाहीं नाहीं ते ताप भोगीत असतो ( ७ )

कोणत्याहि मनुष्याच्या हृदयामध्यें अहंकाररूपी मनाची गांठ ही असतेच. त्यामुळें ' हा मी आणि हीं माझीं इंद्रियें ' असा अभिमान त्याला वाटत असतो. परंतु सुखोपभोगार्थ स्त्रीचा अंगीकार केला कीं, त्याच्यायोगें तेथें दोन अभिमान उत्पन्न होतात. कारण विवाहित स्थितीमध्यें पतीची आणि पत्नीची अशा दोन ग्रंथी एकत्र होतात. त्यामुळें त्या पुरुषाला घरदार, शेतवाडी, मुलेंबाळें, आप्तइष्ट, हा विषय भिन्न असूनहि त्याच्याविषयीं अहंममता उत्पन्न होते, आणि त्याच्याबद्दल प्रबल मोह उत्पन्न होऊन त्याच्या दुःखाला तो कारण होतो ( ८ )

१७८

( दुःखाचें मूळ कशांत आहे ) ५-५-१६

**लोकः स्वयं श्रेयसि नष्टदृष्टिर्योऽर्थान्समीहेत निकामकामः ॥**
**अन्योन्यवैरः सुखलेशहेतोरनन्तदुःखं च न वेद मूढः ॥ १६ ॥**

**आपलें कल्याण कशांत आहे हेंच आधीं लोकांना समजत नाहीं. भोगेच्छा अनिवार झाली कीं ते कर्मे करूं लागतात. त्यासाठीं त्यांना परस्परांशी वैर करणें भाग पडतें; आणि राईयेवढ्या सुखासाठीं त्यास डोंगरायेवढीं दुःखें भोगावीं लागतात हेंहि कळत नाहीं.**

## जडभरत.

ऋषभदेवाचा पुत्र भरत यानें संसारांतील ऐश्वर्याचा उपभोग घेतल्यानंतर आपल्या पुत्रास राज्याधिकार दिला, व वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करून वनांत राहिला असतां त्याचें प्रेम एका हरिणबालकावर बसलें. तें इतकें किं, तें बालक मृत्यु पावलें असतां त्याचा निजध्यास त्यास सारखा लागला; व तशा स्थितींतच त्याचें देहावसान झालें. मरण समयीं जीवाची ओढ ज्या ठिकाणीं असते तेथेंच त्याचा प्रवेश होतो. या तत्वानुसार भरतास हरिणाचा जन्म प्राप्त झाला. परंतु पूर्वजन्माच्या पुण्यसंचयामुळें त्यास पूर्व-जन्माचे ज्ञान राहिलें, व प्रेमासक्तीमुळें आपणांस ही मृगयोनी प्राप्त झाली हें लक्षात घेऊन तो निरिच्छ वागूं लागला. ह्यानंतर त्याचा जन्म ब्राह्मणकुळांत झाला. परंतु पूर्व जन्माचें ज्ञान जागृत असल्यामुळें ह्या जन्मीं कशावरही आसक्ति न ठेवतां तो जड पदार्थाप्रमाणें निरिच्छ वृत्तीनें राहूं लागला व लोक त्यास ‘ जडभरत ’ असें संबोधूं लागले, आणि त्याची परोपरीनें अवहेलना करूं लागले. एकदां तर चोरांनीं यास उचलून देवीस बळी देण्याकरितां नेलें, परंतु देवी चैतन्यरूपानें प्रगट होऊन तिनें चोरांचा नाश केला. तसेंच एके प्रसंगीं रहूगण राजानें यास आपली पालखी उचलण्यास लावलें. परंतु याचें पाऊल इतर भोयांबरोबर सारखें पडेना. तेव्हां राजानें उपरोधिक भाषणानें त्याची अवहे-लना केली. त्या प्रसंगीं रहुगण राजास जडभरतानें जो उपदेश केला तो प्रापंची जीवास लक्षांत ठेवण्यासारखा आहे, त्यांतील निवडक श्लोक खालीं दिले आहेत, जडभरत म्हणतो—

२७९ ते २८१

( जडभरताचा रहूगणाला उपदेश ) ५-१०-१० ते १२

**स्थौल्यं कार्श्यं व्याधय आधयश्च**
**क्षुत्तृड्भयं कलिरिच्छा जरा च ॥**
**निद्रा रतिर्मन्युरहंमदः शुचो**
**देहेन जातस्य हि मे न सन्ति ॥ १० ॥**

जीवन्मृतत्वं नियमेन राज-
न्नाद्यन्तवद्यद्विकृतस्य दृष्टम् ॥
स्वस्वाम्यभावो ध्रुव ईड्य यत्र
तर्ह्युच्यतेऽसौ विधिकृत्ययोगः ॥ ११ ॥
विशेषबुद्धेर्विवरं मनाक् च
पश्याम यन्न व्यवहारतोऽन्यत् ॥
क ईश्वरस्तत्र किमीशितव्यं
तथापि राजन्करवाम किं ते ॥ १२ ॥
उन्मत्तमत्तजडवत्स्वसंस्थां
गतस्य मे वीर चिकित्सितेन ॥
अर्थः कियान्भवता शिक्षितेन
स्तब्धप्रमत्तस्य च पिष्टपेशः ॥ १३ ॥

स्थूलपणा, कृशपणा, व्याधि, क्षुधा, तृषा, भीति, कलह, इच्छा, वार्धक्य, निद्रा, रति, क्रोध, अहंकार व शोक, हे सारे प्रकार देहावर अभिमान ठेवून जे जन्मास येतात, त्यांना असतात. मी तर देहाभिमानरहित आहे, म्हणून मला त्यांचा संपर्क नाहीं (१०)

राजा, तूं मला 'जिवंत असून मेल्यासारखा आहेस' असें म्हटलेंस. पण जन्म व मरण हे जितके म्हणून विकारी पदार्थ आहेत, ते सर्वांनाच नियमानें आहेत. हे स्तुत्य पुरुषा, ' धन्याची आज्ञा मानीत नाहींस ' असा तूं मला एक दोष दिला आहेस. ' मी आणि माझा धनी ' हा भाव असल्याच जर ठाम मत ठरेल तर मग, ' आज्ञा ' आणि ती ' मान्य करणें,' हा शब्द शक्य होईल ( ११ )

तूं राजा आणि मी चाकर, असा भेद वाटण्याला जागा म्हटली तर व्यवहारावांचून दुसरी कांहींच दिसत नाहीं. वास्तविक पाहिलें तर धनी तरी कोण ? आणि त्यानें आज्ञा तरी काय द्यावयाची ? पण तुला अभिमान वाटत असेल तर हे राजा ! मी तुझी कोणती सेवा करूं तें सांग ( १२ ) हे वीरा, तूं मला शिक्षा करीन म्हणतोस; पण बाबा, मी आत्मस्वरूपांत तल्लीन होऊन पिशाचानें घेरलेल्या, दांडग्या किंवा मूर्ख मनुष्या-सारखा वागत आलों. दांडगा व ताठेखोर समजून जर शिक्षा करण्याचा यत्न करशील, तर तें पिष्ठपेषणासारखें निरर्थकच होणार आहे ( १३ )

२८३–२८४

( संसर्गहि बाधक होतो. ) ५–१०–२२,२३

**स्थाल्यग्नितापात्पयसोऽभितापस्तत्तापतस्तण्डुलगर्भरन्धिः ॥**
**देहेन्द्रियास्वाशयसन्निकर्षात्तत्संसृतिः पुरुषस्यानुरोधात् ॥ २२ ॥**
**शास्ताभिगोप्ता नृपतिः प्रजानां यः किंकरो वै न पिनष्टि पिष्टम् ॥**
**स्वधर्ममाराधनमच्युतस्य यदीहमानो विजहात्यघौघम् ॥ २३ ॥**

भाताच्या थाळीला खालून अग्नीची उष्णता लागली म्हणजे आंतील पाणी तापतें, व पाणी तापलें म्हणजे तांदुळाच्या अंतर्भागाला उष्णता लागून तो शिजतो. त्याप्रमाणें देह, इंद्रियें, प्राण व मन, यांच्या संपर्कामुळें त्यांचे विकार पुरुषालाहि होतात. कारण उपाधींचे धर्म उपाधेयाला लागतात असें दिसून येतें (२२)

ज्या वेळीं जो राजा असेल, तो त्या वेळीं प्रजेचें शासन व रक्षण करतोच; ( राजा व प्रजा हा संबंध नित्य नसला तरी त्या त्या वेळेपुरता तो सत्य असतोच ) त्यामुळें परमेश्वराचा सेवक म्हणून जो अपराध्याला शासन करतो, तो पिष्टपेषण करतो असें म्हणतां येत नाहीं; कारण स्वधर्माचरणरूपानें परमेश्वराची आराधना करीत असल्यामुळें तो पापांपासून मुक्त होतो (२३)

२८५

( शेवटीं शुद्ध स्वरूपच एक राहतें ) ५–११–८

**यथा प्रदीपो घृतवर्तिमश्नन् शिखाः सधूमा भजति ह्यन्यदा स्वम् ॥**
**पदं तथा गुणकर्मानुबद्धं वृत्तीर्मनः श्रयतेऽन्यत्र तत्त्वम् ॥ ८ ॥**

मन विषयासक्त असलें म्हणजे तें जीवाच्या संसाराला कारण होतें, आणि तेंच मन निर्गुण झालें म्हणजे जीवाच्या मोक्षाला कारण होतें. तुपानें भिजलेली वात भक्षण करणारा ढळढळीत दिवा, जसा तूप आहे तोंपर्यंतच काजळानें युक्त अशा ज्वाळा धारण करितो; आणि तुपाचा क्षय होतांच तो आपल्या शुद्ध तेजस्वी स्वरूपाला जाऊन मिळतो. तसें मन, विषयांमध्यें आणि त्याच्या प्राप्तीस अनुकूल असलेल्या कर्मांमध्यें आसक्त झालें म्हणजेच तें अनेकप्रकारच्या वृत्तींचा आश्रय करितें. आणि तेंच निर्गुण झालें म्हणजे तें आपल्या मूळ तत्त्वाला जाऊन मिळतें ( ८ )

२८६–२८८

( संसाराचा ताप ज्ञानोत्पत्तीपर्यंतच होय. ) ५–११–१४ ते १६

**यथानिलः स्थावरजङ्गमानामात्मस्वरूपेण निविष्ट ईशेत् ॥**
**एवं परो भगवान्वासुदेवः क्षेत्रज्ञ आत्मेदमनुप्रविष्टः ॥ १४ ॥**

**न यावदेतां मनुभृन्नरेन्द्र विधूय मायां वयुनोदयेन ॥**
**विमुक्तसङ्गो जितषट्सपत्नो वेदात्मतत्त्वं भ्रमतीह तावत् ॥ १५॥**
**न यावदेतन्मन आत्मलिङ्गं संसारतापावपनं जनस्य ॥**
**यच्छोकमोहामयरागलोभवैरानुबन्धं ममतां विधत्ते ॥ १६ ॥**

जसा वायु, बाहेर असूनहि यच्चयावत् स्थावरजंगमात्मक प्राण्यांच्या शरीरांत प्राणरूपानें प्रवेश करून त्यांचें नियमन करितो, त्याप्रमाणें प्रपंचातीत व सर्वांचा अन्तर्यामी असा परमात्मा भगवान् वासुदेव, ह्या जगामध्यें प्रविष्ट होऊन त्यांचें नियमन करितो ( १४ )

हे राजा, देहधारी प्राणी जोंपर्यंत ज्ञानोत्पत्तीच्या योगानें ह्या मायेला दूर झुगारून देऊन सर्वसंगपरित्याग करून व कामादि षड्रिपूंना जिंकून आत्मतत्त्व जाणत नाहीं, तोंपर्यंत तो या संसारांत भ्रमण पावतो ( १५ ) तसेंच जोंपर्यंत या जीवानें आपल्या उपाधिभूत मनाला, ' हें संसारताप पिकण्याचें शेत आहे ' असें जाणिलें नाहीं, तोंपर्यंत तो या संसारामध्यें भ्रमण पावतो. कारण तें मन तोंपर्यंत त्याच्यामध्यें शोक, मोह, राग, प्रीति, लोभ आणि वैर यांचे संबंध आणि अहंकार उत्पन्न करीत असतें ( १६ )

२८९

( देहाचें स्वरूप ) ५–१२–५

**अयं जनो नाम चलन्पृथिव्यां यः पार्थिवः पार्थिव कस्य हेतोः ॥**
**तस्यापि चाङ्घ्र्योरधिगुल्फजङ्घाजानूरुमध्योरशिरोधरांसाः ॥ ५ ॥**

हे राजा, पृथ्वीचाच एक विकार कोणत्यातरी कारणामुळें तो पृथ्वीवर हिंडू लागला म्हणजे, त्यालाच हा ओझें वगैरे वहाणारा मनुष्य, असें नांव प्राप्त होतें. आणि जो हिंडत नाहीं त्याला दगड-इत्यादि नांव मिळतें. इतकाच काय तो भेद आहे. परंतु देह जड असल्यामुळें त्याला भार किंवा श्रम हे मुळींच होत नाहींत. त्या पृथ्वीविकाररूप देहाच्याहि पायांवर घोटे, पोटऱ्या, गुडघे, मांड्या, कमर, वक्षःस्थळ, मान व खांदे हे अवयव रचिलेले आहेत ( ५ )

२९०

( गृहस्थाश्रम हें कर्मक्षेत्र आहे. ) ५–१४–४

**यथा ह्यनुवत्सरं कृष्यमाणमप्यदग्धबीजं क्षेत्रं पुनरेवावपनकाले गुल्मतृणवीरुद्भिर्गह्वरमिव भवत्येवमेव गृहाश्रमः कर्मक्षेत्रं यस्मिन्न हि कर्माण्युत्सीदन्ति यदयं कामकरण्ड एव आवसथः ॥ ४ ॥**

राजा, प्रतिवर्षी शेताची नांगरणी होत असतांहि, त्यांतील गवतांचीं बीजें जळलीं नसल्यामुळें पुनः पेरणीच्या वेळीं त्यांत जाळ्या, गवत व वेली हीं उगवून पर्वताच्या

गुहेसारखें तें दुर्गम होतें. गृहस्थाश्रम हें देखील तसें कर्मक्षेत्रच असून त्यांतील कर्मांचा सर्वस्वी नाश कधींहि होत नाहीं. हा गृहस्थाश्रम म्हणजे विषयवासनेचा करंडाच आहे.

( यापुढें पंधराव्या अध्यायांत प्रियव्रताचा पुढील वंश सांगितला असून सोळाव्या अध्यायापासून सृष्टिवणनाला सुरवात झाली आहे. त्यांत पर्वत, नद्या, यांची रचना व त्या भागावरील, अधिपति व लोक यांचें उपास्यदैवत व उपासना मंत्र, इत्यादि वर्णन आहे. भद्राश्व खंडांतील लोक भागवताची उपासना करतांना म्हणतात—)

२९१

( भगवंताची लीला अगाध आहे. ) ५-१८-३

**अहो विचित्रं भगवद्विचेष्टितं घ्नन्तं जयोऽयं हि मिषन्न पश्यति ॥**
**ध्यायन्नसद्यर्हि विकर्म सेवितुं निर्हृत्य पुत्रं पितरं जिजीविषति ॥ ३ ॥**

अहो ! तुच्छ अशा विषयसुखांचा उपभोग घेण्याकरितां पापांचें चिंतन करणारे लोक मेलेल्या पुत्राला किंवा पित्याला जाळून त्यांच्या द्रव्यानें आपला निर्वाह करून जिवंत राहण्याची इच्छा करितात, परंतु आपणालाहि मारणारा काळ अकस्मात् प्राप्त होईल असें पहात असतांनाहि न पाहिल्यासारखें करितात, तेव्हां ही भगवंताची लीला मोठी आश्चर्यकारक नव्हे काय ? ( ३ )

२९२

( मनुष्य जन्माचें कर्तव्य. ) ५-१०-२५

**प्राप्ता नृजातिं त्विह ये च जन्तवो ज्ञानक्रियाद्रव्यकलापसंभृताम् ॥**
**न वै यतेरन्नपुनर्भवाय ते भूयो वनौका इव यान्ति बन्धनम् ॥ २५ ॥**

ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, पंचमहाभूतें, यांच्या कौशल्यानें पूर्ण अशा मनुष्यजन्माला ह्या लोकीं प्राप्त झालेले जे प्राणी आहेत त्यांनीं, पुन. मृत्यु न यावा यासाठीं जर प्रयत्न केला नाहीं तर, वनांत रहाणारे पक्षी, पारध्याच्या हातून एक वेळ सुटले असतांहि, फळांच्या लोभानें त्याच वृक्षावर बेसावधपणें बसतात व पुनः बंधन पावतात. त्याचप्रमाणें मनुष्यप्राणी संसारलोभानें पुन्हपुन्हा बंधन पावतात ( २५ )

---

# षष्ठ स्कंध.

या स्कंधाचे एकोणीस अध्याय असून ८७१ श्लोक आहेत. यांत स्वायंभुव मनूच्या-वंशाचें वर्णन, अजामिळाची कथा, इंद्रवृत्रासुराचें युद्ध, विश्वरूपाची कथा, मरुतांचें जन्म, पुंसवनव्रत इत्यादि विषय आले आहेत. मनुष्याचे हातून एखादे प्रसंगीं पापाचरण जरी घडलें, तरीपण त्यास जर त्या कृतकर्माचा पश्चात्ताप झाला व अंतकाळीं त्यानें नारायण-

स्वरूपीं लक्ष लावून नारायण नांवाचा उच्चार केला, तरी त्याचा उद्धार होतो, असें भगवंताचें नाममहात्म्य अजामिळाच्या कथेंत दाखविलें आहे. या कथेंत विष्णुदूत आणि यमदूत यामध्यें झालेला संवाद फारच उद्बोधक आहे त्यांतील कांहीं निवडक श्लोक येथें दिले आहेत. विष्णूदूत सांगतात—

२९३–२९५

( प्रायश्चित्ताचा अधिकारी अज्ञानी पुरुष. ) ६–१–११,१३,१४

**कर्मणा कर्मनिर्हारो न ह्यात्यन्तिक इष्यते ।**
**अविद्वदधिकारित्वात्प्रायश्चित्तं विमर्शनम् ॥ ११ ॥**
**तपसा ब्रह्मचर्येण शमेन च दमेन च ।**
**त्यागेन सत्यशौचाभ्यां यमेन नियमेन च ॥ १३ ॥**
**देहवाग्बुद्धिजं धीरा धर्मज्ञाः श्रद्धयान्विताः ।**
**क्षिपन्त्यघं महदपि वेणुगुल्ममिवानलः ॥ १४ ॥**

कृच्छ्रादि प्रायश्चित्तरूपानें पातकांचा समूळ नाश होत नाहीं; कारण, प्रायश्चित्ताचा अधिकारी अज्ञानी पुरुष आहे, ह्याकरितां अज्ञान नाहींसें होत नसल्यामुळें केलेल्या प्रायश्चितांनीं जरी जुनें पातक नष्ट झालें, तरी त्या पूर्वपातकाच्या संस्कारानें फिरून फिरून दुसऱ्या पातकाची उत्पत्ति होतेच; म्हणून ज्ञानप्राप्ति होणें हेंच खरोखर पापाचें मुख्य प्रायश्चित्त होय ( ११ )

ज्याप्रमाणें वेळूच्या घर्षणानें उत्पन्न झालेला अग्नि त्याचें सर्व बेट दग्ध करितो, त्याचप्रमाणें तप, ब्रह्मचर्य, मनःसंयमन, बाह्येन्द्रियदमन, दान, सत्य, शौच, अहिंसादि यम व जपादि नियम, ह्यांच्या योगानें श्रद्धायुक्त असलेले धर्मज्ञ विवेकी पुरुष, कायावाचामनेंकरून घडलेल्या मोठ्याहि पातकांचा नाश करितात ( १३,१४ )

२९६

( प्रायश्चित्तापेक्षां नामस्मरणच श्रेष्ठ. ) ६–२–१२

**नैकान्तिकं तद्धि कृतेऽपि निष्कृते मनः पुनर्धावति चेदसत्पथे ॥**
**तत्कर्मनिर्हारमभीप्सतां हरेर्गुणानुवादः खलु सत्त्वभावनः ॥ १२ ॥**

जें केलें असतां मन फिरून पापमार्गाकडे धावूं लागतें, तें प्रायश्चित्त खरोखर पापांची शुद्धि करणारें नव्हेंच. ह्याकरितां पापांचा समूळ नाश करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषांनीं वारंवार हरीचें गुणवर्णन करणें, हेंच खरें प्रायश्चित होय. कारण भगवंताचे गुणानुवादच खरोखर चित्ताची शुद्धि करणारे आहेत. (भगवद्भजनांत एकरूप होणें हेंच खरें प्रायश्चित्त.)

२९७–२९८

( नामस्मरण चित्त शुद्ध करतें. ) ६–२–१७,१८

**तैस्तान्यघानि पूयन्ते तपोदानजपादिभिः ॥**
**नाधर्मजं तद्धृदयं तदपीशाङ्घ्रिसेवया ॥ १७ ॥**
**अज्ञानादथवा ज्ञानादुत्तमश्लोकनाम यत् ॥**
**संकीर्तितमघं पुंसो दहेदेधो यथानलः ॥ १८ ॥**

तप, दान व जप इत्यादि त्या त्या प्रायश्चित्तांनीं तीं तीं पातकें मात्र नष्ट होतात; पण अधर्माचरणानें मलिन झालेलें अंतःकरण प्रायश्चित्तांनीं शुद्ध होतें असें नाहीं. पण ईश्वराच्या चरणसेवेनें मात्र तें शुद्ध होतें ( १७ ) यमदूतहो, ज्याप्रमाणें समजून अथवा न समजूनहि टाकिलेला अग्नि काष्ठांना दग्ध करितो, त्याप्रमाणें अज्ञानानें उच्चारिलेलें जें पवित्रकीर्ति परमेश्वराचें नांव तें पुरुषांचीं पातकें दग्ध करितें ( १८ )

२९९

( नामस्मरणानें मन विषयांवर आसक्त होत नाहीं. ) ६–२–४६

**नातः परं कर्मनिबन्धकृन्तनं मुमुक्षतां तीर्थपदानुकीर्तनात् ॥**
**न यत्पुनः कर्मसु सज्जते मनो रजस्तमोभ्यां कलिलं ततोऽन्यथा ॥४६॥**

ज्या भगवंताच्या चरणाच्या ठिकाणीं तीर्थे आहेत, त्या भगवंताच्या कीर्तनाहून मुमुक्षु जनांना पापवासनांचा उच्छेद करणारें असें दुसरें कोणतेहि श्रेष्ठ प्रायश्चित्त नाहीं. कारण, इतर प्रायश्चित्तें केलीं असतांहि, मन, रज व तम यांच्या योगानें मलिनच रहातें. पण भगवन्नामसंकीर्तनानें मात्र तें मन कर्मावर फिरून कधींहि आसक्त होत नाहीं ( ४६ )

**वृत्रासुराची कथा.**

सहाव्या अध्यायापासून वृत्रासुराची कथा आहे. या कथेंत इंद्राकडून गुरूचा अपमान झाल्यामुळें गुरु देवेंद्रास सोडून गेला व त्यामुळें इंद्राचें वैभव नष्ट झालें; आणि दैत्यांनीं आपले गुरु जे शुक्राचार्य यांची मनोभावें सेवा केली म्हणून ते वैभवास चढले असा कथाभाग असून, ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें देवांनीं विश्वरूपाची गुरुस्थानीं योजना केली आहे. परंतु त्याचा ओढा दैत्याकडे असल्यामुळें यज्ञामध्यें तो गुप्तरूपानें दैत्यासहि हविर्भाग देऊं लागला. ही लबाडी लक्षांत येतांच इंद्रानें विश्वरूपाचा वध केला. ह्या विश्वरूपानें एकदां इंद्रास नारायणकवच देऊन दैत्यांवर जय मिळवून दिला होता, परंतु त्याचें स्मरण इंद्रानें ठेवलें नाहीं. या वधामुळें त्यास ब्रह्महत्येचें पातक लागलें इकडे आपल्या पुत्राचा वध इंद्रानें केल्यामुळें त्वष्ट्यानें यज्ञ करून इंद्राला मारणारा पुत्र मागून घेतला. तो वृत्रासुर नांवानें प्रगट झाला. त्यानें सर्वत्र प्रलय करून सोडला, व देवांची त्रेधा उडविली. तेव्हां इंद्र विष्णूस शरण गेला व तरणोपायाचा मार्ग

विचारूं लागला. विष्णूनें दधीचि ऋषीच्या अस्थींचें वज्र करून वृत्रासुरावर टाकण्यास सांगितलें. विष्णूच्या आज्ञेप्रमाणें देवेंद्र दधीचि ऋषीकडे गेला व त्यांच्या अस्थींची मागणी केली. राष्ट्रकार्याचें महत्त्व लक्षांत घेऊन दधीचि ऋषींनीं आपल्या अस्थि इंद्रास दिल्या, व इंद्रानें त्याचें वज्र करून वृत्रासुराचा वध केला. अशाप्रकारें देवांवर आलेलें संकट दूर झालें. या कथेंत गुरूची योग्यता व गुरुकृपेचें महत्त्व भागवतकारांनीं मार्मिक-रीतीनें दाखविलें आहे. तसेंच कोणताहि पक्ष एकदा स्वीकारल्यावर दुसऱ्या पक्षास खुष करण्याचा प्रयत्न करणें कसें अहितावह आहे, हें विश्वरूपाच्या उदाहरणानें स्पष्ट केलें आहे. आणि सर्वांत विशेष महत्त्वाचा प्रसंग म्हणजे दधीचि ऋषींनीं राष्ट्रकार्याकरितां अर्पण केलेला आपला प्राण होय. सारांश, राष्ट्रकार्याचे प्रसंगीं जीवाचीहि पर्वा ठेवतां कामा नये, असें दधीचि ऋषीच्या या प्रसंगानें भागवतकारांनीं दर्शविलें आहे. या कथेंतील दुसरा एक प्रसंगहि असाच महत्त्वाचा आहे. वृत्र हा ब्राह्मण असल्यामुळें, ही दुसरी ब्रह्महत्या आपल्या हातून होऊं नये म्हणून वृत्राचा वध करण्यास इंद्र भिऊं लागला असतां ऋषींनीं त्याला धीर दिला, आणि असलीं अनेक पातकें असलीं तरी अश्वमेध यज्ञ करून तीं नाहींशीं करूं, असें त्यांनीं त्यास सांगितलें व त्याजकडून वृत्राचा वध करविला कर्मकांडाच्या अनुरोधानें संसारी जीवास कर्मकांडाभिमानी कशी भुरळ पाडतात, आणि त्यामुळें अज्ञानी जीवाची कशी फसवणूक होते ही गोष्ट भागवतकारांनीं ह्या ठिकाणीं मोठ्या मार्मिकतेनें दाखविली आहे, असो हा एकंदर कथाभाग फारच उद्बोधक आहे. त्यांतील कांहीं निवडक श्लोक या खालीं दिले आहेत.

(इंद्रानें दधीची ऋषीजवळ अस्थींची मागणी केली असतां दधीचि ऋषींनीं काढलेले उद्गार.)

३००-३०२

( प्राणिमात्रावर दया करणें हेंच मनुष्याचें कर्तव्य. ) ६-१०-८ते१०

**यो ध्रुवेणात्मना नाथा न धर्मं न यशः पुमान् ॥**
**ईहते भूतदयया स शोच्यः स्थावरैरपि ॥ ८ ॥**
**एतावानव्ययो धर्मः पुण्यश्लोकैरुपासितः ॥**
**यो भूतशोकहर्षाभ्यामात्मा शोचति हृष्यति ॥ ९ ॥**
**अहो दैन्यमहो कष्टं पारक्यैः क्षणभङ्गुरैः ॥**
**यन्नोपकुर्यादस्वार्थैर्मर्त्यः स्वज्ञातिविग्रहैः ॥ १० ॥**

जो पुरुष भूतांवर दया करण्यासाठीं आपल्या अनित्य देहाच्या योगानें धर्म किंवा कीर्ति ह्यांपैकीं कांहींच संपादन करण्यास इच्छित नाहीं, त्याचा जन्म व्यर्थ होय. वृक्षादि स्थावर वस्तुहि त्याच्या कृतीबद्दल खेद करीत असतात ( ८ )

प्राण्यांना दुःख झालें असतां ज्याला दुःख होतें, आणि दुसऱ्याला हर्ष झाला असतां ज्याला हर्ष होतो, अशा पुरुषाचा जो धर्म तोच अक्षय धर्म होय. कारण, सत्कीर्तिमान् लोकांनीं त्याच धर्माचें सेवन केलें आहे. ( ९ )

ज्यांचा आपल्या स्वतःकरितां तिळमात्रहि उपयोग होत नाहीं, ज्यांना कोल्हीकुत्रीं खाऊन टाकणार व ज्याचा एक क्षणभरहि भरंवसा नाहीं, अशा, द्रव्य, पुत्रादिक बांधव, आणि देह, यांच्या योगानें मनुष्यानें कोणावरहि उपकार न करावा, ही किती तरी दैन्याची व दुःखाची गोष्ट आहे ! ( १० )

( युद्धप्रसंगीं वृत्रासुरानें दैत्यसैन्यास उद्देशून काढलेले उद्गार. )

३०३-३०

( मृत्यूला प्रतिकारच नाहीं ) ६-१०-३२-३३

**जातस्य मृत्युर्ध्रुव एष सर्वतः प्रतिक्रिया यस्य न चेह क्लृप्ता ॥**
**लोको यशश्चाथ ततो यदि ह्यमु को नाम मृत्युं न वृणीत युक्तम् ॥**
**द्वौ संमताविह मृत्यू दुरापौ यद्ब्रह्मसंधारणया जितासुः ॥**
**कलेवरं योगरतो विजह्याद्यदग्रणीर्वीरशयेऽनिवृत्तः ॥ ३३ ॥**

जो प्राणी उत्पन्न झाला आहे त्याला मृत्यु हा निःसंशय येणारच आहे. कारण, या संसारामध्यें मृत्यूच्या निवृत्तीचा उपाय ईश्वरानें निर्माण केलाच नाहीं. तेव्हां त्याच्यापासून अनायासानें इहलोकीं यश आणि परलोकीं स्वर्ग हे जर प्राप्त होत असतील, तर अशा योग्य मृत्यूचा कोण बरें स्वीकार करणार नाहीं ? ( ३२ )

योगमार्गामध्यें प्रवृत्त होऊन व इंद्रियदमन करून ब्रह्मचिंतनानें देहाचा त्याग करणें आणि रणभूमीवर अग्रेसर होऊन माघारा न फिरतां देहत्याग करणें, असे हे दोनप्रकारचे मृत्यूच या लोकीं शास्त्रसंमत असून खरोखर दुर्लभ आहेत. ( ३३ )

( युद्धप्रसंगीं इंद्रास उद्देशून वृत्रासुराचें भाषण. )

३०५

( सर्व ईश्वराधीन आहे. ) ६-१२-१०

**यथा दारुमयी नारी यथा यन्त्रमयो मृगः ॥**
**एवं भूतानि मघवन्नीशतन्त्राणि विद्धि भोः ॥ १० ॥**

हे इंद्रा, ज्याप्रमाणें लांकडाची बाहुली आणि यांत्रिक मृग हे पराधीन असतात, त्याप्रमाणें या जगांतील सर्व भूतमात्र ईश्वराधीन आहेत असें समज. ( १० )

३०६

( सुखदुःखाचा हर्षविषाद मानूं नये. ) ६-१२-१४

**तस्मादकीर्तियशसोर्जयापजययोरपि ॥**

**समः स्यात्सुखदुःखाभ्यां मृत्युजीवितयोस्तथा ॥ १४ ॥**

ज्याअर्थी सर्व ईश्वराधीन आहे, त्याअर्थी पुरुषानें अपकीर्ति अथवा यश, जय अथवा सुख अथवा दुःख आणि त्याचप्रमाणें मृत्यु अथवा जीवित ह्याविषयीं हर्ष किंवा विषाद न मानितां समदृष्टीनें रहावें. ( १४ )

३०७

( युद्ध म्हणजे द्यूतच आहे. ) ६-१२-१७

**प्राणग्लहोऽयं समर इष्वक्षो वाहनासनः ॥**

**अत्र न ज्ञायतेऽमुष्य जयोऽमुष्य पराजयः ॥ १७ ॥**

हें युद्ध म्हणजे द्यूत असून त्यामध्यें प्राण हीच पणाला लावण्याची वस्तु होय, बाण हेच फांसे आणि वाहनें ह्याच इकडेतिकडे फिरविण्याच्या सोंगट्या होत. तसेंच ह्या रणद्यूता-मध्यें बाणरूप फांसा पडण्याचे पूर्वी अमक्याचा पराजय होईल हें समजत नाहीं (१७)

**चित्रकेतूची पूर्वकथा.**

( ह्या वृत्रासुर पूर्वजन्मींचा चित्रकेतू राजा होता. तो मोठा भगवद्भक्त होता; परंतु पार्वतीच्या शापानें तो असुरयोनीस प्राप्त झाला होता. त्या चित्रकेतूची कथा सांगतांना त्याच्या पुत्राच्या अकाली मृत्यूमुळें झालेल्या पुत्रवियोगाचा दुःखप्रसंग भागवतकारांनीं पंधराव्या अध्यायांत वर्णन केला आहे; त्या दुःखप्रसंगीं नारद व आंगिराऋषि यांजकडून चित्रकेतू राजास केलेला उपदेशाचा प्रसंग फारच बहारीचा आहे. त्यांतील कांहीं श्लोक याखालीं दिले आहेत. )

( नारद ऋषि चित्रकेतूस सांगतात, हे राजा—)

३०८-३१२

( संसारांतील सर्व विषय दुःखदच होत. ) ६-१५, २१ ते २५

**अधुना पुत्रिणां तापो भवतैवानुभूयते ॥**

**एवं दारा गृहा रायो विविधैश्वर्यसंपदः ॥ २१ ॥**

**शब्दादयश्च विषयाश्चला राज्यविभूतयः ॥**

**मही राज्यं बलं कोशो भृत्यामात्याः सुहृज्जनाः ॥ २२ ॥**

**सर्वेऽपि शूरसेनेमे शोकमोहभयार्तिदाः ॥**

**गन्धर्वनगरप्रख्याः स्वप्नमायामनोरथाः ॥ २३ ॥**

दृश्यमानां विनार्थेन न दृश्यन्ते मनोभवः ॥
कर्मभिर्ध्यायतो नानाकर्माणि मनसोऽभवन् ॥ २४ ॥
अयं हि देहिनो देहो द्रव्यज्ञानक्रियात्मकः ॥
देहिनो विविधक्लेशसंतापकृदुदाहृतः ॥ २५ ॥

पुत्रवान् लोकांना काय दुःख होतें, ह्याचा अनुभव तुला येतच आहे. पुत्रच केवळ दुःखाला कारण आहे असें नाहीं. तर हे राजा, स्त्री, गृह, द्रव्य, अनेकप्रकारचें ऐश्वर्य व संपत्ति तसेंच शब्दादि विषय, राज्यसंबंधीं ऐश्वर्य, भूमि, राज्य, सैन्य, जामदारखाना, सेवक, अमात्य व मित्र हे सर्वहि शोक, मोह, भय आणि पीडा देणारे असून अनित्य आहेत. ते गंधर्वनगराप्रमाणें क्षणभर भासमान होऊन लय पावत असल्यामुळें, स्वप्न, माया व मनोरथ ह्यांप्रमाणें मिथ्या आहेत. ( २१-२३ )

धर्मवासनांच्या योगानें अहर्निश विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषाच्या मनापासून कर्में उत्पन्न झालीं आहेत. यास्तव पापपुण्यरूप कर्मच जर मनापासून उत्पन्न होतें, तर त्या कर्माच्या योगानें साध्य होणारे अर्थहि मनःकल्पितच होत ( २४ ) पंचमहाभूतरूप द्रव्यें, ज्ञानेन्द्रियें व कर्मेन्द्रियें ह्यांच्या समुदायानें बनलेला हा देहच देहाभिमानी जीवाला नानाप्रकारचे क्लेश व संताप उत्पन्न करितो असें सांगितलें आहे ( २५ )

याप्रमाणें उपदेश केल्यानंतर नारदानें आपल्या योगसामर्थ्यानें त्या मृत राजपुत्राला सजीव केलें, तेव्हां जीव बोलूं लागला. तो प्रसंग फार बहारीचा आहे. )

३१३-३१७

( जीवात्मा स्वतंत्र आहे. ) ६-१६-४ ते ६,१०,११

कस्मिञ्जन्मन्यमी मह्यं पितरो मातरोऽभवन् ॥
कर्मभिर्भ्राम्यमाणस्य देवतिर्यङ्नृयोनिषु ॥ ४ ॥
बन्धुज्ञात्यरिमध्यस्थमित्रोदासीनविद्विषः ॥
सर्व एव हि सर्वेषां भवन्ति क्रमशो मिथः ॥ ५ ॥
यथा वस्तूनि पण्यानि हेमादीनि ततस्ततः ॥
पर्यटन्ति नरेष्वेवं जीवो योनिषु कर्तृषु ॥ ६ ॥
न ह्यस्यातिप्रियः कश्चिन्नाप्रियः स्वः परोऽपि वा ॥
एकः सर्वधियां द्रष्टा कर्तृणां गुणदोषयोः ॥ १० ॥
नादत्त आत्मा हि गुणं न दोषं न क्रियाफलम् ॥
उदासीनवदासीनः परावरदृगीश्वरः ॥ ११ ॥

जीव म्हणाला; हे नारदा, कर्माच्या योगानें देव, पशु, पक्षि व मनुष्य या योनींमध्यें मी भ्रमण करीत असतां हे लोक माझे कोणत्या जन्मामध्यें मातापितर झाले बरें ?

आतां मी मरण पावल्यामुळें पुत्रबुद्धीनें जर हे मजकरितां शोक करीत असताल, तर शत्रुबुद्धीनें माझ्या मरणाबद्दल ह्यांना हर्ष तरी कां होऊं नये ? (४) कारण, सर्वच प्राणी क्रमाक्रमानें सर्वांचे परस्पर बंधु, सपिंड, शत्रु, मध्यस्थ, मित्र, उदासीन आणि द्वेषी होत असतात ( ५ ) अहो, ज्याप्रमाणें क्रयविक्रयास योग्य अशा सुवर्णादि वस्तु व्यवहार करणाऱ्या पुरुषांमध्यें इकडेतिकडे हिंडत असतात, त्याचप्रमाणें जीवहि आईबापांच्या ठिकाणीं हिंडत असतो ( ६ )

ह्या जिवाला अतिप्रिय अथवा अप्रिय, किंवा स्वकीय अथवा परकीय, असें कोणीच नाहीं. कारण, हित आणि अहित करणाऱ्या पित्रादिकांच्या सर्व विचित्र बुद्धींचा हा साक्षी असल्यामुळें तो स्वतः असंग आहे ( १० ) हा जीवात्मा, स्वतंत्र, कारण व कार्य ह्यांचा साक्षी, आणि सर्वत्र तटस्थ असल्यामुळें, सुख, दुःख व राज्यादिक कर्मफळ ह्यांचा तो स्वीकारच करीत नाहीं ( ११ )

( यापुढील अठराव्या अध्यायांत मरुद्गणांची उत्पत्ति सांगून हा सहावा स्कंध पुरा केला आहे. या कथाभागांत इंद्रानें प्रसंगावधानानें संकटाचें निवारण कसें केलें हें दाखविलें आहे. हा कथाभाग असा आहे कीं, कश्यपाला दिति व आदिति अशा दोन स्त्रिया होत्या, त्यांत आदितीला पुष्कळ पुत्र होते, परंतु दितीला पुत्र नव्हता. इंद्राचा नाश करील असा शूर पुत्र आपणास व्हावा म्हणून तिनें पतीची प्रार्थना केली असतां कश्यप ऋषीनें तिला पुंसवनव्रत करण्यास सांगितलें, व कांहीं नियम घालून दिले. दितीला पुत्र झाल्यास अर्थात् तो अपणास शत्रु होणार, हें जाणून इंद्रानें मायावी रूपानें दितीच्या उदरांत प्रवेश करून त्या गर्भाचे ४९ तुकडे केले, ते पुढें मरुद्गण जन्मास आले. हे दैत्य असतांहि इंद्रानें त्यांच्याशीं सख्य केलें व त्यांस यज्ञांतील हविर्भागहि दिला. सारांश भावी प्रसंगावर दृष्टि ठेवून वागणाऱ्या पुरुषास संकटें टाळतां येतात, हें या कथेंत दर्शविलें आहे. येथें सहावा स्कंध पूर्ण झाला आहे.

---

# सप्तम स्कंध.

या स्कंधाचे १५ अध्याय व ७४८ श्लोक आहेत. यांत प्रल्हादचरित्र व वर्णाश्रमधर्म यांचें विवेचन केलें आहे. या स्कंधांतील विषयास पुराणाच्या दश लक्षणांपैकीं ऊति हें एका लक्षणाचें नांव आहे. ऊति म्हणजे कर्मानुसार होणारी वासना. ती शुभ व अशुभ अशा दोनहि प्रकारची असूं शकते.

## हिरण्यकशिपु.

या स्कंधांत मुख्य कथा हिरण्यकशिपूची आहे. हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु हे विष्णूचे द्वारपाळ असतां शापानें राक्षसयोनीस प्राप्त झाले होते, हें मागें सांगितलेंच

आहे. हा हिरण्यकशिपु जरी राक्षसयोनींत गेला होता तरी मोठा ज्ञानी होता. याचा बंधु हिरण्याक्ष, त्याचा वध वराहरूपी भगवंतानें केला असतां त्याची माता, स्त्री, आदि सर्व शोकाकुल झाली त्या प्रसंगीं यानें त्यांस जो उपदेश केला तो फारच उद्बोधक असा आहे. त्यांतील निवडक श्लोक खालीं दिले आहेत. हिरण्यकशिपु आपल्या मातेस उद्देशून म्हणतो–

### ३१८–३२३

( देहाचा अभिमान युक्त नव्हे. ) ७–२–२१ ते २६

भूतानामिह संवासः प्रपायामिव सुव्रते ॥
दैवेनैकत्र नीतानामुन्नीतानां स्वकर्मभिः ॥ २१ ॥
नित्य आत्माऽव्ययः शुद्धः सर्वगः सर्ववित्परः ॥
धत्तेऽसावात्मनो लिङ्गं मायया विसृजन्गुणान् ॥ २२ ॥
यथाम्भसा प्रचलता तरवोऽपि चला इव ॥
चक्षुषा भ्राम्यमाणेन दृश्यते चलतीव भूः ॥ २३ ॥
एवं गुणैर्भ्राम्यमाणे मनस्यविकलः पुमान् ॥
याति तत्साम्यतां भद्रे ह्यलिङ्गो लिङ्गवानिव ॥ २४ ॥
एष आत्मविपर्यासो ह्यलिङ्गे लिङ्गभावना ॥
एष प्रियाप्रियैर्योगो वियोगः कर्मसंसृतिः ॥ २५ ॥
संभवश्च विनाशश्च शोकश्च विविधः स्मृतः ॥
अविवेकश्च चिन्ता च विवेकास्मृतिरेव च ॥ २६ ॥

हे सुव्रते माते, पाणपोईमध्यें ज्याप्रमाणें प्राण्यांचा सहवास क्षणिक असतो, त्याचप्रमाणें ह्या मृत्यलोकीं माता व पुत्र इत्यादिकांचा सहवास क्षणिक असतो. कारण, दैवयोगानें प्राणी एकत्र संयुक्त होतात, व पुनरपि आपआपल्या कर्मामुळें वियुक्त होतात(२१)

आत्मा हा मृत्युरहित, अक्षय, निर्मळ, सर्वव्यापी आणि सर्वज्ञ असा आहे. कारण, तो देहादिकांहून भिन्न आहे; म्हणून मृत, कृश, मलिन, वियुक्त, अज्ञ असें समजून त्याबद्दल शोक करणें योग्य नाहीं. हे माते, हा आत्मा आपल्या अविद्येमुळें मोहित होऊन सुखदुःखादिकांचा विशेषेंकरून स्वीकार करीत असल्यामुळें शरीर धारण करितो. सारांश, त्याला लिंगशरीररूप जो उपाधी प्राप्त झाला आहे तोच संसार होय ( २२ )

जसे उपाधीचे धर्म उपाधियुक्त वस्तूवर भासमान होतात, म्हणजे ज्याप्रमाणें उदक हालत असल्यामुळें त्यामध्यें प्रतिबिंबित झालेले वृक्षहि हालत आहेत असें दिसतें; अथवा ज्याप्रमाणें नेत्रांना भ्रमण झाल्यामुळें पृथ्वी हालल्यासारखी दिसते, त्याप्रमाणें, हे माते,

गुणांच्या योगानें मनाचें भ्रमण झालें म्हणजे आत्मा वस्तुतः परिपूर्ण असूनहि त्या मनासारखाच आणि वस्तुतः देहादिसंबंधरहित असतांहि तो देहधारी असल्यासारखा दिसतो ( २३ , २४ )

वस्तुतः देहादिसंबंध नसतांहि त्याविषयीं देहाभिमान असणें, प्रिय वस्तूशीं वियोग, अप्रिय वस्तूशीं संयोग, कर्म, अनेक योनींमध्यें प्रवेश, नंतर उत्पत्ति, विनाश, नानाप्रकारचा शोक, अविवेक, चिंता आणि विवेकाची विस्मृति इत्यादि हे सर्व धर्म, आत्मस्वरूपाहून अगदीं निराळे असल्यामुळें त्यांचा आत्मस्वरूपाशीं मुळींच संबंध नाहीं (२५,२६)

३२४-३२६

( आत्मा अमर आहे. ) ७-२-४३,४७,४८

**यथानलो दारुषु भिन्न ईयते यथानिलो देहगतः पृथक्स्थितः ॥**
**यथा नभः सर्वगतं न सज्जते तथा पुमान्सर्वगुणाश्रयः परः ॥ ४३ ॥**

**यावल्लिङ्गान्वितो ह्यात्मा तावत्कर्मनिबन्धनम् ॥**
**ततो विपर्ययः क्लेशो मायायोगोऽनुवर्तते ॥ ४७ ॥**
**वितथाभिनिवेशोऽयं यद्गुणेष्वर्थदृग्वचः ॥**
**यथा मनोरथः स्वप्नः सर्वमैन्द्रियकं मृषा ॥ ४८ ॥**

जसा अग्नि काष्ठामध्यें असतांहि प्रकाशरूपानें व दाहकरूपानें निराळाच अनुभवास येतो, आणि जसा देहांत असलेला वायु, मुख व नासिक इत्यादि स्थानामध्यें निराळाच प्रतीतीला येतो, तसा आत्मा देहामध्यें असूनहि त्याहून भिन्न आहे. कारण, आत्मा देहामध्यें असतांनाहि त्याच्या ठिकाणीं देहधर्म मुळींच नसतात; जसें आकाश सर्वत्रठिकाणीं असूनहि ते कोठें लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा देहेंद्रियादि सर्व गुणांच्या आश्रयानें असतांहि त्याहून निराळाच आहे ( ४३ )

जोंपर्यंत आत्म्याला लिंगशरीराचा अभिमान असतो, तोंपर्यंत त्याचें तें कर्म, बंधनाला कारण होतें व त्यापासून देहधर्माचें भोक्तृत्व त्याला प्राप्त होऊन क्लेश होतात; पण लिंगशरीराविषयींचा अभिमान निवृत्त झाल्यानंतर असा प्रकार घडत नाहीं. कारण, हा देहधर्मभोक्तृत्वरूप विपर्यय मायेनें होत असतो, तो वस्तुतः खरा नाहीं ( ४७ )

सुखदुःखादि गुणकार्यें खरीं आहेत असें मानणे व म्हणणें हा अगदीं व्यर्थ अभिमान होय. कारण, जाग्रदावस्थेमध्यें मनोरथानें प्राप्त होणारें राज्यादि सुख अथवा स्वप्नावस्थेमध्यें प्राप्त होणारें स्त्रीसंभोगादि सुख जसें वस्तुतः खरें नाहीं, तसेंच सर्व इंद्रियजन्य सुखहि वस्तुतः खरें नाहीं ( ४८ ).

( आपल्या मातेस उपदेश केल्यानंतर बंधूच्या सुडाची भावना धरून हिरण्यकशिपु तपार्थ अरण्यांत गेला, आणि तेथें त्यानें उग्र तपश्चर्या करून ब्रह्मदेवाकडून असा वर

मिळविला कीं आपणास दिवसा रात्रीं घरांत रणांत कोठेंहि मृत्यु येऊं नये. त्या अपूर्व वरानें तो अनिवार झाला. याचा पुत्र प्रल्हाद महान् भगवद्भक्त होता. व तो पूर्ण विष्णुभक्त होता. आपल्या मुलानें विष्णूची भक्ति करूं नये म्हणून हिरण्यकशिपूनें अनेक प्रयत्न केले. शेवटीं त्याच्या नाशाकरितां विष दिलें; परंतु ' परमेश्वर तारी त्याला कोण मारी ' या वचनाप्रमाणें हिरण्यकशिपूचे सर्व उपाय हरले. शेवटीं रागाच्या आवेशांत ' तुझा ईश्वर ह्या खांबांत आहे काय ? असा त्यानें प्रल्हादास प्रश्न केला प्रल्हाद म्हणाला, होय, परमेश्वर सर्व ठिकाणीं भरलेला आहे. मुलाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच हिरण्यकशिपूनें आवेशानें त्या खांबावर लत्ताप्रहार केला. त्याबरोबर तो निर्जिव खांब दुभंग झाला. आणि त्यांतून स्त्री नाहीं, पुरुष नाहीं, पशु नाही, असें भयंकर नारसिंह स्वरूप प्रगट झालें; आणि त्या नृसिंहानें घराचे उंबरठ्यांत हिरण्यकशिपूस मांडीवर घेऊन त्याचें उदर विदारण केलें. अशाप्रकारें ही कथा आहे. या कथेंत परमेश्वर आपल्या भक्तां करितां अनेक रूपें घेऊन त्याचें कसें संरक्षण करतो, हें मार्मिकतेनें दाखविलें आहे. यांतील भक्तश्रेष्ठ प्रल्हाद व हिरण्यकशिपु यांच्यामध्ये परमेश्वरस्वरूपाविषयीं झालेलीं प्रश्नोत्तरें जिज्ञासु वाचकांनीं पठण करण्यासारखीं आहेत. त्यांतील निवडक श्लोक खालीं दिले आहेत. प्रल्हाद म्हणतो हे तात–

३१७

( अंधळ्यामागून अंधळे जातात. ) ७–५–३१

**न ते विदुः स्वार्थगतिं हि विष्णुं दुराशया ये बहिरर्थमानिनः ॥**
**अन्धा यथान्धैरुपनीयमाना वाचीशतन्त्यामुरुदाम्नि बद्धाः ॥ ३१ ॥**

ज्यांच्या अंतःकरणांत विषयवासना भरल्या आहेत, व जे बाह्य विषयांनाच पुरुषार्थ मानतात, त्यांस स्वस्वरूपांतच पुरुषार्थ आहे असें मानणाऱ्याचें उद्दिष्ट स्थान जो विष्णु, त्याला ते जाणत नाहींत. बाह्य विषयांच्या ठिकाणीं परमार्थबुद्धि धारण करणाऱ्यांनाच गुरु असें समजण्याचा त्यांचा स्वभाव असल्यामुळें, जसे आंधळ्यांच्या मागून जाणारे आंधळे, मार्ग न जाणतां खाड्यामध्यें पडतात, त्याप्रमाणें ईश्वराच्या वेदवाणीरूप दावणींत काम्यकर्मांच्या योगानें बद्ध होतात ( ३१ )

( प्रल्हादाचें भाषण ऐकून संतापलेला हिरण्यकशिपु म्हणतो– )

३१८

( स्वकीयहि त्याज्य होतात. ) ७–५–३७

**परोऽप्यपत्यं हितकृद्यथौषधं स्वदेहजोऽप्यामयवत्सुतोऽहितः ॥**
**छिन्द्यात्तदङ्गं यदुतात्मनोऽहितं शेषं सुखं जीवति यद्विवर्जनात् ॥ ३७ ॥**

जसें औषध परिणामीं हितकारक असतें; त्याप्रमाणें एकादा परकीसुद्धां जर आपला हितकारक असेल तर तो आपलें अपत्यच समजला पाहिजे; आणि औरसपुत्र जर आपलें

अहित करणारा असेल, तर त्याला रोगाप्रमाणें आपला शत्रु समजलें पाहिजे. फार काय, आपल्या शरीराचा एकादा अवयव जर आपलें हित करणारा नसेल तर तो तोडून टाकावा; कारण, तेवढ्याचा त्याग केला असतां बाकीचें शरीर सुखानें वांचतें ( ३७ )

( गुरुगृहीं असतां प्रल्हादानें आपल्या साहाध्यायी मित्रांस अध्यात्मज्ञानाचा उपदेश केला त्या संबंधाचा कथा भाग सहाव्या अध्यायांत भागवतकारांनीं दिला आहे, तो फारच उद्बोधक आहे, त्यांतील कांहीं निवडक श्लोक खालीं दिले आहेत.

३२९ ते ३३५

( प्रल्हादाचा विद्यार्थ्यांस उपदेश ) ७-७-१८ ते २४

जन्माद्याः षडिमे भावा दृष्टा देहस्य नात्मनः ॥
फलानामिव वृक्षस्य कालेनेश्वरमूर्तिना ॥ १८ ॥
आत्मा नित्योऽव्ययः शुद्ध एकः क्षेत्रज्ञ आश्रयः ॥
अविक्रियः स्वदृग्धेतुर्व्यापकोऽसङ्ग्यनावृतः ॥ १९ ॥
एतैर्द्वादशभिर्विद्वानात्मनो लक्षणैः परैः ॥
अहं ममेत्यसद्भावं देहादौ मोहजं त्यजेत् ॥ २० ॥
स्वर्णं यथा ग्रावसु हेमकारः क्षेत्रेषु योगैस्तदभिज्ञ आप्नुयात् ॥
क्षेत्रेषु देहेषु तथात्मयोगैरध्यात्मविद्ब्रह्मगतिं लभेत ॥ २१ ॥
अष्टौ प्रकृतयः प्रोक्तास्त्रय एव हि तद्गुणाः ॥
विकाराः षोडशाचार्यैः पुमानेकः समन्वयात् ॥ २२ ॥
देहस्तु सर्वसंघातो जगत्तस्थुरिति द्विधा ॥
अत्रैव मृग्यः पुरुषो नेति नेतीत्यतत्त्यजन् ॥ २३ ॥
अन्वयव्यतिरेकेण विवेकेनोशतात्मना ॥
सर्वस्थानसमाम्नायैर्विमृशद्भिरसत्वरैः ॥ २४ ॥

" हे मित्रहो, नानाप्रकारें विकार उत्पन्न करण्यास समर्थ अशा कालाच्या योगानें वृक्षाच्या फळांत जसें, उत्पन्न होणें, असणें, वाढणें, परिणाम पावणें, संकोचित होणें व नाश पावणें, हे सहा विकार घडून येतात; पण ते त्या वृक्षाला घडत नाहींत (१८) त्याप्रमाणे हे दैत्यपुत्रहो, आत्मा तर नित्य, अक्षय, शून्य, शुद्ध, अद्वितीय, शरीरादिकांचा ज्ञाता, सर्वांना आश्रयभूत, क्रियाशून्य, स्वयंप्रकाश, सर्वांचा उत्पादक, सर्वव्यापक, अलिप्त व आवरणरहित असा आहे ( १९ ) ह्यास्तव आत्मानात्मविवेक उत्पन्न करण्यास समर्थ अशा ह्या आत्म्याच्या बारा लक्षाणांनीं, तो देहाहून भिन्न आहे असें जाणणाऱ्या

पुरुषानें, देहादिकांविषयीं 'मी व माझे' अशाप्रकारच्या असलेल्या मोहजन्य मिथ्याबुद्धीचा त्याग करावा ( २० ) हे असुरबालकहो, सुवर्णाच्या खाणीमध्यें चकचकणाऱ्या सुवर्णांनीं युक्त असलेल्या पाषाणांतून सुवर्ण काढण्याचे उपाय जाणणारा सोनार, भट्टी लावून जसें सुवर्ण काढून घेतो, त्याप्रमाणें देहरूप क्षेत्रांतून अध्यात्मज्ञानी पुरुष आत्मप्राप्तीच्या उपायांनीं ब्रह्मत्व प्राप्त करून घेतो ( २१ ) मूलप्रकृति, महतत्त्व, अहंकार, शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ह्या आठ प्रकृति आहेत. सत्त्व, रज आणि तम हे तीन प्रकृतीचे गुण आहेत श्रोत्र त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका, गुद, उपस्थ, हात, पाद, वाणी आणि मन हीं अकरा इंद्रियें व पृथ्वी, आप, तेज वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें मिळून सोळा विकार आहेत. ह्या सर्वांच्या ठिकाणी साक्षिरूपानें व्यापून असणारा एक आत्मा आहे, असें कपिलप्रभृतींनीं सांगितले आहे (२२) आत्मा हा देह व प्रकृत्यादि सर्व असा दोनप्रकारचा आहे. ह्या देहामध्येंच अमुक द्रव्य आत्मा नव्हे, अशी परीक्षा करीत आत्मव्यतिरिक्त जें असेल त्याचा निरास करून, त्यांहून निराळा असा जो अन्तर्यामी आत्मा, त्याचें शोधन करून घ्यावें ( २३ ) जसें मण्यांच्या माळेमध्यें सूत्र, सर्व मण्यांना व्यापून असतें, तसा आत्माहि सर्वांना व्यापून आहे. आणि तें एकच सूत्र जसें प्रत्येक मण्याहून निराळें असते, तसा आत्माहि सर्व वस्तूंत असून निराळा आहे; असा हा अन्वयव्यतिरेक लक्षांत घेऊन शुद्ध झालेल्या मनाच्या योगाने जगाच्या उत्पत्तिस्थितिसंहारांच्या अनुसंधानानें एकाप्रमाणें विचार करणाऱ्या पुरुषांनीं, त्या परमात्म्याचा शोध केला असतां त्यांना त्याचें ज्ञान होतें ( २४ )

( यानंतर सातव्या अध्यायांत नारदमुखानें वर्णाश्रम धर्माचे विवेचन भागवतकारानें केलेलें आहे. तें प्रत्येक संसारी मनुष्यानें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यांतील महत्त्वाचे श्लोक खालीं दिले आहेत )

३३६-३३८

( उपजीविकेचीं साधनें. ) ७-११- ८ ते २०

ऋतामृताभ्यां जीवेत मृतेन प्रमृतेन वा ॥
सत्यानृताभ्यां जीवेत न श्ववृत्त्या कथंचन ॥ १८ ॥
ऋतमुञ्छशिलं प्रोक्तममृतं यदयाचितम् ॥
मृतं तु नित्ययाच्ञा स्यात्प्रमृतं कर्षणं स्मृतम् ॥ १९ ॥
सत्यानृतं तु वाणिज्यं श्ववृत्तिर्नीचसेवनम् ॥
वर्जयेत्तां सदा विप्रो राजन्यश्च जुगुप्सिताम् ॥
सर्ववेदमयो विप्रः सर्वदेवमयो नृपः ॥ २० ॥

मनुष्यानें ऋत, अमृत, मृत, प्रमृत, आणि सत्यानृत ह्यांतील कोणत्याहि वृत्तीनें उपजीविका करावी; परंतु कसाहि प्रसंग आला तरी श्ववृत्तीनें कधींहि निर्वाह करूं नये (१८)

ऋत म्हणजे शेतांतील व बाजारांतील दाणें टिपणें, अमृत म्हणजे अयाचित दानांचा स्वीकार, मृत म्हणजे नित्य याचना, प्रमृत म्हणजे कृषिकर्म, सत्यानृत म्हणजे व्यापार व श्ववृत्ति म्हणजे नीचाची चाकरी असें सांगितलें आहे. असो. ती श्ववृत्ति निंद्य असल्यामुळें ब्राह्मण व क्षत्रिय यांनीं वर्ज्य करावी; कारण ब्राह्मण हा सर्व वेदमय आहे, व राजा हा सर्व देवमय आहे ( १९,२० )

३३९

( स्त्रियांचा धर्म. ) ७-११-२५

स्त्रीणां च पतिदेवानां तच्छुश्रूषानुकूलता ॥
तद्बन्धुष्वनुवृत्तिश्च नित्यं तद्व्रतधारणम् ॥ २५ ॥

पतिशुश्रूषा करणें, त्याला अनुकूल असें वागणें, त्यांच्या बंधूंच्या हिताचें संरक्षण करणें आणि पतीचा जो नियम असेल त्याचेंच आचरण करणें, हें पतिव्रता स्त्रियांचें लक्षण असून तेंच त्यांचा धर्महि आहे ( २५ )

३४०-३४२

( स्त्रियांचीं कर्तव्यें ) ७-११-२६ ते २८

संमार्जनोपलेपाभ्यां गृहमण्डलवर्तनैः ॥
स्वयं च मण्डिता नित्यं परिमृष्टपरिच्छदा ॥ २६ ॥
कामैरुच्चावचैः साध्वी प्रश्रयेण दमेन च ॥
वाक्यैः सत्यैः प्रियैः प्रेम्णा काले काले भजेत्पतिम् ॥ २७ ॥
संतुष्टालोलुपा दक्षा धर्मज्ञा प्रियसत्यवाक् ॥
अप्रमत्ता शुचिः स्निग्धा पतिं त्वपतितं भजेत् ॥ २८ ॥

पतिव्रता स्त्रीनें घराची झाडसारव करावी, त्यामध्यें रांगोळ्या घालून तें सुशोभित करावें, स्वतः सौभाग्यादिक अलंकारांनीं भूषित असावें, घरांतील भांडींकुंडीं आणि लहानमोठे पदार्थ स्वच्छ ठेवावे. विनय, इंद्रियनिग्रह, सत्य व प्रिय शब्द आणि प्रेम यांच्या योगानें योग्यकाळीं पतीची सेवा करावी (२६,२७) त्याचप्रमाणें दैवानें झालेल्या लाभानें संतुष्ट असावें आणि विषयभोगाविषयीं अनासक्त असावें; संसारांत दक्ष, धर्मप्रिय, सत्य भाषण करणारी, सर्वत्र सावध, शुद्ध आणि प्रेमळ राहून महापातकरहित अशा आपल्या पतीची सेवा नियमानें करावी ( २८ )

३४३

( पतिव्रतेची गति. ) ७-११-२९

या पतिं हरिभावेन भजेच्छ्रीरिव तत्परा ॥
हर्यात्मना हरेर्लोके पत्या श्रीरिव मोदते ॥ २९ ॥

पति हेंच मुख्य दैवत आहे असें मानून जी स्त्री श्रीहरीच्या सेवेविषयीं तत्पर अस-

केल्या लक्ष्मीप्रमाणें हरिभावनेनें पतीची सेवा करिते, ती वैकुंठामध्यें लक्ष्मीप्रमाणें आपल्या पतीसह आनंदाचा उपभोग घेते ( २९ )

### ३४४–३४५

( तरुणांनीं पाळावयाचे नियम. ) ७-१२-८,९

केशप्रसाधनोन्मर्दस्नपनाभ्यञ्जनादिकम् ॥
गुरुस्त्रीभिर्युवतिभिः कारयेन्नात्मनो युवा ॥ ८ ॥
नन्वग्निः प्रमदा नाम घृतकुम्भसमः पुमान् ॥
सुतामपि रहो जह्यादन्यदा यावदर्थकृत् ॥ ९ ॥

तरुण पुरुषानें आपले केश विंचरणें, शरीराचें मर्दन करणें व अभ्यंगस्नान करणें, हीं कधींहि तरुण स्त्रियांकडून करवूं नयेत ( ८ ) कारण स्त्री ही खरोखर अग्निरूप असून पुरुष घृतकुंभ आहे. यास्तव एकांतामध्यें प्रत्यक्ष कन्येशींहि संभाषणादि व्यवहार करूं नये, व इतर प्रसंगींहि कारणापुरतेंच त्यांच्याशीं भाषण करावें ( ९ )

( अजगरमुनीचा प्रल्हादास उपदेश. )

### ३४६–३४८

( सर्व दुःखमय आहे. ) ७–१३–३१ ते ३३

पश्यामि धनिनां क्लेशं लुब्धानामजितात्मनाम् ॥
भयादलब्धनिद्राणां सर्वतोभिविशङ्किनाम् ॥ ३१ ॥
राजतश्चोरतः शत्रोः स्वजनात्पशुपक्षितः ॥
अर्थिभ्यः कालतः स्वस्मान्नित्यं प्राणार्थवद्भयम् ॥ ३२ ॥
शोकमोहभयक्रोधरागक्लैब्यश्रमादयः ॥
यन्मूलाः स्युर्नृणां जह्यात्स्पृहां प्राणार्थयोर्बुधः ॥ ३३ ॥

दुःखावांचून जरी द्रव्य प्राप्त झालें, तरी त्या द्रव्यामुळेंच दुःख होत असतें. कारण, अजितेन्द्रिय व द्रव्यलोभी मनुष्य सर्वांविषयीं शंकायुक्त असतो आणि त्यामुळें त्याला गाढ निद्रा लागत नाहीं. धनाढ्य पुरुषांनाहि भयादिक दुःखें नेहमीं प्राप्त होतात, (३१)

वांचण्याची व धनाची इच्छा करणाऱ्या पुरुषांना, राजा, चोर, शत्रु, स्वजन, पशु, पक्षी, याचक व काल यांपासून व स्वतःपासूनहि नित्य भय प्राप्त होत असतें ( ३२ )

शोक, मोह, भय, क्रोध, प्रीति, धैर्य, हानि आणि श्रम इत्यादि दुःखें ज्यांच्यामुळें पुरुषांना होतात, त्या प्राणाची व त्या द्रव्याची इच्छा विवेकी पुरुषानें सोडून द्यावी(३३)

३४९

( अधीक द्रव्याची आसक्ति धरूं नये. ) ७-१४-८

यावद्भ्रियेत जठरं तावत्स्वत्वं हि देहिनाम् ॥
अधिकं योऽभिमन्येत स स्तेनो दण्डमर्हति ॥ ८ ॥

कदाचित् दैवयोगानें पुष्कळ द्रव्य मिळालें, तथापि त्याचा अभिमान धरूं नये. आपलें पोट भरण्यास जितकें अन्न लागेल तितक्यावरच देहधारी पुरुषांचें स्वामित्व आहे. त्यापेक्षां जो अधिक आसक्ति ठेवितो तो चोर होय, तो दंडास पात्र होतो ( ८ )

३५०

( स्त्रीचा अभिमान कधीं धरूं नये ) ७-१४-१२

जह्याद्यदर्थे स्वप्राणान्हन्याद्वा पितरं गुरुम् ॥
तस्यां स्वत्वं स्त्रियां जह्याद्यस्तेन ह्यजितो जितः ॥ १२ ॥

जिच्याकरितां लोक आपले प्राण देतात व पित्याचा अथवा गुरुचा घात करण्यासहि मागेंपुढें पहात नाहींत, त्या स्त्रीच्या ठिकाणीं असलेला आपलेपणाचा अभिमान ज्यानें टाकिला, त्या पुरुषानें इतरांना अजिंक्य असा परमेश्वरहि निःसंशय जिंकला, असें म्हणण्यास हरकत नाहीं ( १२ )

( पूर्वी कृतयुगांत सर्वत्र समभावना असल्यामुळें पूज्यपूजक भेद उत्पन्न झाला नव्हता तर सर्व लोक निर्गुण, निराकार परमेश्वराचीच उपसना करीत. पुढें त्रेतायुगांत मानापमानाच्या भावना जागृत झाल्यावर प्रतिमेच्या पूजनाचा प्रकार रूढ झाला ही मूर्तिपूजा द्वेषभावरहित असलेल्या पुरुषाना मात्र पुरुषार्थ प्राप्त करून देण्यास साह्य होते. पंधराव्या अध्यायांत सदाचाराचें उत्कृष्ट निरूपण असून तें सर्वांनीं मुळांतूनच एकवार तरी अवश्य वाचावें. ) भागवतकार म्हणतात—

३५१-३५२

( श्राद्धादि कर्म करतांना दांभिकपणाचा विस्तार करूं नये. ) ७-१५-३,४

द्वौ दैवे पितृकार्ये त्रीनेकैकमुभयत्र वा ॥
भोजयेत्सुसमृद्धोऽपि श्राद्धे कुर्यान्न विस्तरम् ॥ ३ ॥
देशकालोचितश्रद्धाद्रव्यपात्रार्हणानि च ॥
सम्यग्भवन्ति नैतानि विस्तरात्स्वजनार्पणात् ॥ ४ ॥

श्राद्धप्रसंगीं देवस्थानीं दोन ब्राह्मण आणि पितृस्थानीं तीन ब्राह्मण अथवा दोहों ठिकाणींहि एकेक ब्राह्मण बसवून त्यांस भोजन घालावें. यजमान जरी समर्थ असला तथापि त्यानें श्राद्धप्रसंगीं अधिक ब्राह्मण सांगूं नये ( ३ )

तसेंच कारणाव्यातिरिक्त आप्तेष्टांनांहि निमंत्रण करून पसारा वाढवूं नये, कारण तसें केल्यानें देश, काल, तदनुकूल श्राद्धाद्यादि द्रव्यपात्रें आणि पूजनसाहित्य हीं योग्यरीतीनें पुरवल्यास येत नाहींत ( ४ )

३५३-३५४

( संतोषवृत्ति हेंच सुखाचें साधन होय. ) ७-१५-१६, १७

संतुष्टस्य निरीहस्य स्वात्मारामस्य यत्सुखम् ॥
कुतस्तत्कामलोभेन धावतोऽर्थेहया दिशः ॥ १६ ॥
सदा संतुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः ॥
शर्कराकण्टकादिभ्यो यथोपानत्पदः शिवम् ॥ १७ ॥

संतुष्ट, निरिच्छ व स्वस्वरूपीं रममाण होणाऱ्या पुरुषाला जें सुख मिळतें तें विषयलोभामुळें द्रव्यप्राप्तीसाठीं दशदिशा भटकणाऱ्या पुरुषाला मिळत नाहीं. (१६) पायांमध्यें जोडा असलेल्या पुरुषाला जसें खडे, कांटे इत्यादिकांपासून दुःख होत नाहीं, त्याप्रमाणें सर्वदा संतुष्टचित्त असलेल्या पुरुषाला सर्व दिशा सुखमय होतात ( १७ )

---

# अष्टम स्कंध.

या स्कंधाचे चोवीस अध्याय आणि ९३१ श्लोक आहेत. या स्कंधांत पुराणाच्या दश लक्षणांपैकीं जें मन्वंतर त्याचें स्पष्टीकरण केलें आहे. आणि गजेंद्रमोक्ष, समुद्रमंथन. बलीचा यज्ञ, मत्स्यावताराची कथा इत्यादि विषय आले आहेत. पहिल्या अध्यायात श्लोक ९ ते १६ पर्यंत असलेल्या भागास मंत्रोपनिषत् अशी संज्ञा आहे. आणि त्याचे संपूर्ण श्लोक खालीं दिले आहेत

३५५-३६२

( मंत्रोपनिषद् ) ८-१-९ ते १६

येन चेतयते विश्वं विश्वं चेतयते न यम् ॥
यो जागर्ति शयानेऽस्मिन्नायं तं वेद वेद सः ॥ ९ ॥
आत्मावास्यमिदं विश्वं यत्किंचिज्जगत्यां जगत् ॥
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यास्विद्धनम् ॥ १० ॥
यं न पश्यति पश्यन्तं चक्षुर्यस्य न रिष्यति ॥
तं भूतनिलयं देवं सुपर्णमुपधावत ॥ ११ ॥

न यस्याद्यन्तौ मध्यं च स्वः परो नान्तरं बहिः ॥
विश्वस्यामूनि यद्यस्माद्विश्वं च तदृतं महत् ॥ १२ ॥
स विश्वकायः पुरुहूत ईशः सत्यः स्वयंज्योतिरजः पुराणः ॥
धत्तेऽस्य जन्माद्यजयात्मशक्त्या तां विद्ययोदस्य निरीह आस्ते ॥ १३ ॥
अथाग्रे ऋषयः कर्माणीहन्तेऽकर्महेतवे ॥
ईहमानो हि पुरुषः प्रायोऽपीहां प्रपद्यते ॥ १४ ॥
ईहते भगवानीशो नहि तत्र विषज्जते ॥
आत्मलाभेन पूर्णार्थो नावसीदन्ति येऽनु तम् ॥ १५ ॥
तमीहमानं निरहंकृतं बुधं निराशिषं पूर्णमनन्यचोदितम् ॥
नृन् शिक्षयन्तं निजवर्त्मसंस्थितं प्रभुं प्रपद्येऽखिलधर्मभावनम् ॥ १६ ॥

मनु म्हणाला,-ज्याच्या योगानें हें विश्व सचेतन होतें; परंतु ज्याला हें विश्व सचेतन करीत नाहीं, व हें विश्व सुषुप्ति अवस्थेमध्यें निजलें असतां साक्षीरूपानें जो जागृत असतो, त्याला हा लोक जाणत नाहीं; परंतु तो मात्र ह्या लोकाला जाणतो ( ९ )

ब्रह्मांडामध्यें म्हणून जें कांहीं सचेतन किंवा अचेतन असें आहे, तें सर्व ईश्वरानें व्यापिलें आहे; ह्याकरितां त्या ईश्वरानेच जें कांहीं दिलें असेल त्याच्याच योगानें तूं भोगांचा उपभोग घे; दुसऱ्या कोणाच्याहि धनाची आकांक्षा धरूं नकोस ( १० )

लोकहो, जो स्वतः पहात असून कोणाच्याहि डोळयाला दिसत नाहीं, ज्याचें ज्ञान कधींहि नष्ट होत नाहीं; त्या सर्वांतर्यामी व निःसंग अशा परमेश्वराला तुम्ही भजा (११)

उत्पत्ति, स्थिति, नाश, स्वकीय व परकीय हीं ज्याच्यापासून होतात व विश्व हें ज्याचें स्वरूप आहे. तेंच सत्यस्वरूप व परिपूर्ण असें ब्रह्म होय. ( १२ )

तो ईश्वर जन्मादि विकाररहित, कालत्रयाबाधित, स्वयंप्रकाश व अनादि असून हें विश्व त्याचें स्वरूप आहे, आणि त्याला अनंत नांवें आहेत. तो ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व संहार आपल्या मायेच्या योगानें करीत असतो. आणि स्वतः निरिच्छ असल्यामुळें विद्येच्या योगानें मायेचा त्याग करून तो वस्तुतः कर्मरहितच असतो. ( १३ )

म्हणून ऋषीसुद्धां प्रथमतः मोक्षाकरितां कर्मे करितात, कारण निष्काम कर्मे करणाराच पुरुष प्रायशः निरिच्छ होतो ( १४ )

आत्मलाभानेंच सर्व इच्छा पूर्ण झाल्यामुळें ईश्वर कर्मे करीत असला तरी त्यांच्या ठिकाणीं तो आसक्त होत नाहीं. ईश्वराला अनुसरून वागणार लोकहि त्याच्या प्रमाणेंच कर्मांच्या ठिकाणीं आसक्त झाल्यामुळें त्यांना दुःख होत नाहीं ( १५ )

यास्तव जो सर्वधर्मप्रवर्तक असल्यामुळें स्वतःच्या आचरणानें मनुष्यांना शिक्षण देण्याकरितां मनुष्यावताररूप मार्गाचें योग्यप्रकारें अवलंबन करून कर्मे करितो, जो ज्ञानी असल्यामुळें निष्काम आणि स्वतंत्र आहे, त्या परमात्म्याला मी शरण जातों ( १६ )

( स्वायंभुव मनूनंतर स्वारोचिष आणि उत्तम असे मनु झाले. उत्तमाचा भाऊ तामस हा चवथा मनु होय. याच्या मन्वंतरांत भगवंतानें हरिनामक अवतार घेऊन गजेंद्राचा उद्धार केला. गजेंद्रमोक्षाचें आख्यान फारच सुरस असून तें स्कंध ८ अ.२-३ यांत आलें आहे. जिज्ञासु वाचकांनीं तें मूळांतूनच वाचावें. त्रिकुट पर्वतावर एका सुंदर सरोवरांत एक हत्ती आपल्या हत्तिणींबरोबर क्रीडा करीत असतां एका मगरानें त्याचा पाय धरिला व त्यांतून सुटण्याकरितां एकहजार वर्षें त्यानें धडपड केली, परंतु सुटका होईना. शेवटीं निराश होऊन गजेंद्र म्हणतो—)

३६३-३६४

( संकटकाळीं कोणी उपयोगी पडत नाहीं ) ८-२-३२,३३

**न मामिमे ज्ञातय आतुरं गजाः कुतः करिण्यः प्रभवन्ति मोचितुम् ॥**
**ग्रहेण पाशेन विधातुरावृतोऽप्यहं च तं यामि परं परायणम् ॥ ३२ ॥**
**यः कश्चनेशो बलिनोऽन्तकोरगात्प्रचण्डवेगादभिधावतो भृशम् ॥**
**भीतं प्रपन्नं परिपाति यद्भयान्मृत्युः प्रधावत्यरणं तमीमहि ॥ ३३ ॥**

दैवाचा पाशच जणूं काय अशा या नक्रानें मला धरिलें आहे, आणि मज आतुराला या पाशांतून सोडविण्यास माझे जातभाई हत्ती समर्थ नाहींत व मीहि समर्थ नाहीं, मग या हत्तिणी कोठून असणार ! तरि आतां मी ब्रह्मादिकांनाहि आश्रयभूत अशा त्या परमेश्वरालाच शरण जातों ( ३२ )

असह्य वेगानें चोहोंकडून चाल करून येत असलेल्या बलिष्ठ मृत्युरूप महाभुजंगाला अत्यंत भ्याल्यामुळें, शरण आलेल्या लोकांचें जो रक्षण करितो, व प्राण्यांना मारणारा मृत्युसुद्धां ज्याच्या भयामुळें पळत सुटतो, त्या सर्वशक्तिमान् परमेश्वरालाच आम्ही आतां शरण जातों ( ३३ )

( सारांश, संकटसमयीं परमेश्वरावाचून अन्य कोणाचा उपयोग नाहीं, असा विचार करून गजेंद्र भगवंताची स्तुति करूं लागला. ही स्तुति अध्याय ३ श्लोक २ पासून २९ पर्यंत आहे. निर्गुण, निराकार व चराचर वस्तूंच्या ठिकाणीं भरलेल्या भगवंताचें स्तवन करितां करितां गजेंद्र अगदीं गहिंवरून गेला आणि म्हणाला, हे देवा—

३६५

( देवाजवळ शेवटची मागणी. ) ८-३-२५

**जिजीविषे नाहमिहामुया किमन्तर्बहिश्चावृतयेभयोन्या ॥**
**इच्छामि कालेन न यस्य विप्लवस्तस्यात्मलोकावरणस्य मोक्षम् ॥२५॥**

नक्रापासून देहाची मुक्तता होऊन वांचण्याचीहि मी इच्छा करीत नाहीं, कारण आंत व बाहेर अविवेकानें व्याप्त असलेल्या हत्तीच्या योनीशीं मला येथें काय प्रयोजन

आहे ! तर कालेंकरूनहि ज्याचा नाश होत नाहीं, त्या आत्मप्रकाशाला आच्छादित करणाऱ्या अज्ञानाची निवृत्ति व्हावी एवढीच मी इच्छा करितों ( २५ )

( अशा निःसंग स्थितींत शरण आलेल्या त्या गजेंद्राला पाहून भक्तवत्सल प्रभु गरुडावर आरूढ होऊन तेथें प्राप्त झाले आणि नक्रासह गजेंद्रास बाहेर काढून, त्यांनीं त्यांचा उद्धार केला. गजेंद्र हा पूर्वजन्मींचा इंद्रद्युम्ननामक राजा असून अगस्त्य ऋषीच्या शापानें त्यास गजयोनि प्राप्त झाली होती वगैरे कथा पूर्वीं आलीच आहे. या कथेंत पूर्वजन्मार्जित कर्माप्रमाणें जीवास बरेवाईट प्रसंग सोसावे लागतात, परंतु संकटकाळीं निष्ठापूर्वक अनन्य भावें भगवंतास शरण गेलें असतां तो भगवान् त्याची संकटापासून मुक्तता करतो इ. गोष्टी मार्मिकतेनें दाखविल्या आहेत. )

यानंतर पांचव्या अध्यायांत पांचव्या रैवत मनूचें व सहाव्या चाक्षुष मनूचें वृत्त सांगितलें आहे. ह्या चाक्षुष मन्वंतरांत अमृताच्या प्राप्तीकरितां देव व दैत्य यांनीं एकत्र होऊन समुद्राचें मंथन केल्याचा कथाभाग आला आहे.हा कथाभाग फारच उद्बोधक आहे. दैत्यांकडून पराजित झालेले देव, भगवंतास शरण गेले व तरुणोपायाचा मार्ग विचारूं लागले, तेव्हां भगवंत म्हणाले, देवहो, तुम्हांवर आलेलें संकट दूर करण्यासाठीं समुद्राचें मंथन करून त्यांतून अमृत काढलें पाहिजे, परंतु हें कार्य तुमच्या एकट्याच्यानें होणें शक्य नाहीं. त्या कार्याकरितां तुम्ही व दैत्य एक झालें पाहिजे. भगवान् म्हणतात —

३६६–३६७

( भगवंताचा देवांस उपदेश. ) ८–६–१९,२०,२४

**यात दानवदैतेयैस्तावत्सन्धिर्विधीयताम् ॥**
**कालेनानुगृहीतैस्तैर्यावद्वो भव आत्मनः ॥ १९ ॥**
**अरयोऽपि हि सन्धेयाः सति कार्यार्थगौरवे ॥**
**अहिमूषकवद्देवा ह्यर्थस्य पदवीं गतैः ॥ २० ॥**
**न संरम्भेण सिद्ध्यन्ति सर्वेऽर्थाः सान्त्वया यथा ॥ २४ ॥**

हे देवहो, तुम्ही आधीं दैत्यदानवांकडे जा, आणि तुमचा स्वतःचा उत्कर्षकाळ येईपर्यंत, सध्यां काळानें ज्यांच्यावर अनुग्रह केला आहे अशा त्या दैत्यदानवांबरोबर सख्य करा. ( १९ ) कारण, हे देवहो, एकादें मोठें कार्य करावयाचें असलें म्हणजे तें सिद्ध होण्याकरितां शत्रूंबरोबरसुद्धां मैत्री केली पाहिजे; ती तुम्हीं करा; आणि तुमचा कार्यभाग झाला म्हणजे नंतर तुम्ही सर्पमूषकाप्रमाणें वध्यघातकभावानें वागा. ( २० ) कारण साममार्गानें जशीं कार्यें सिद्ध होतात, तशीं क्रोधावेशानें होत नाहींत (२४)

( राष्ट्रकार्याच्या प्रसंगीं भेदभाव टाकून देऊन प्रसंगीं शत्रूंशींहि सख्य करावें, असें या ठिकाणीं भागवतकारांनीं भगवंताच्या भाषणाच्याद्वारें दर्शविलें आहे. भागवतांतील हा प्रसंग आमच्या होतकरू तरुण पुढाऱ्यांनीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. )

असो. भगवंताच्या सूचनेप्रमाणें देवांनीं दैत्यांस मोठेपणा देऊन त्यांस आपलेसें केलें आणि उभयतांनीं मिळून समुद्राचें मंथन केलें आणि त्यांतून अनेक रत्नें काढलीं. परंतु आरंभींच निघालेल्या हालाहल विषाचा कोणीच स्वीकार करीना, त्या विषयानें सर्वत्र हलकल्लोळ उडविला. तेव्हां सर्व देव महादेवास शरण गेले, आणि देवावरील संकट लक्षांत आणून तें हालाहल विष शंकरानें प्राशन करून जगावर ओढवलेलें संकट दूर केलें. या प्रसंगीं भागवतकारांनीं पार्वतीस उद्देशून शंकराच्या तोंडीं पुढील श्लोक घातले आहेत.

३६८-३६९

( दीनांचें परिपालन हेंच साधूंचें कर्तव्य ) ८-७-,३९,४०

प्राणैः स्वैः प्राणिनः पान्ति साधवः क्षणभङ्गुरैः ॥
बद्धवैरेषु भूतेषु मोहितेष्वात्ममायया ॥ ३९ ॥
पुंसः कृपयतो भद्रे सर्वात्मा प्रीयते हरिः ॥
प्रीते हरौ भगवति प्रीयेऽहं सचराचरः ॥
तस्मादिदं गरं भुञ्जे प्रजानां स्वस्तिरस्तु मे ॥ ४० ॥

साधु लोक क्षणभंगुर असे आपले प्राण खर्चूनहि, प्राण्यांचें रक्षण करितात. हे भद्रे; परमात्म्या भगवंताच्या मायेनें मोहित होऊन एकमेकांशीं वैर धारण करून परस्परांचा घात करूं पहाणाऱ्या प्राण्यांवर जो पुरुष कृपा करतो, त्यावर सर्वात्मा हरि प्रसन्न होतो; आणि भगवान् श्रीहरि प्रसन्न झाला असतां, ह्या चराचर विश्वासह मीहि संतुष्ट होतों. यास्तव आतां मीं हें विष भक्षण करितों. माझ्या प्रजा सुखी होवोत. ( ३९-४० )

( 'ज्याचे अंगीं मोठेपण तयां यातना कठीण ' हें तत्व या ठिकाणीं विशद करून दाखविलें आहे. मोठेपण नुसतें नांवानें येत नाहीं. राष्ट्रावर ओढवलेल्या आपत्कालीं संकटास तोंड देण्यास जो पुढें होतो, देशकार्याकरितां जो स्वतःच्या जीवाचीहि परवा करीत नाहीं, तोच मोठा होय, हें तत्त्व महादेवाच्या विषप्राशनाच्या प्रसंगानें भागवतकारांनीं मोठ्या मार्मिकतेनें दाखविलें आहे. असो, देव, दैत्य व स्वतः विष्णु असें सर्वांनीं मिळून ज्या अमृताकरितां इतका दीर्घ प्रयत्न केला, तें अमृत शेवटीं निघालें. परंतु 'बळि तो कान पिळी' या म्हणीप्रमाणें दैत्यांनीं तें धन्वंतरीजवळून हरण केलें, आणि देव तोंडाकडेच पहात राहिले ! दैत्य जरी शरीरानें बलवान् होते, तरी स्वभावानें भोळे होते. आणि देव जरी शरीरानें निर्बळ होते, तरी त्यांची बुद्धि अधिक तीव्र होती, त्यामुळें असें झालें कीं, विष्णूनें मोहनीरूप धारण करून दैत्यांस आपल्या मोहपाशांत गुंतविलें आणि देवांस अमृत पाजलें, व दैत्य त्या मोहनीच्या तोंडाकडेसच पहात राहिले ! मोठमोठे शूर पुरुषहि सुंदर वारांगनेच्या दर्शनानें मोहित होऊन सर्वस्वास कसे मुकतात, हें येथें मोहिनीच्या प्रसंगानें भागवतकारांनीं दर्शित केलें आहे. या प्रसंगीं मोहनीचें व

दैत्यांचें जें भाषण झालें तें संसारांतील प्रेमासक्तांनीं विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे. त्यांतील मोहनीच्या तोंडी घातलेले दोनच निवडक श्लोक खालीं दिले आहेत.

### ३७०-३७१

( व्यभिचारिणी स्त्रियांचें सख्य शाश्वत नसतें ) ८-९-९,१०

**कथं कश्यपदायादाः पुंश्चल्यां मयि सङ्गताः ॥**
**विश्वासं पण्डितो जातु कामिनीषु न याति हि ॥ ९ ॥**
**सालावृकाणां स्त्रीणां च स्वैरिणीनां सुरद्विषः ॥**
**सख्यान्याहुरनित्यानि नूत्नं नूत्नं विचिन्वताम् ॥ १० ॥**

मोहनी म्हणते, हे कश्यपपुत्रहो, मजसारख्या व्यभिचारिणी स्त्रीवर तुम्हीं आसक्त कसें झालां ? कारण जो ज्ञानी आहे असा पुरुष स्त्रियांवर कधींहि विश्वास ठेवीत नाहीं ( ९ ) हे दैत्यहो, नित्य नव्या नव्या वस्तूंचा शोध करीत असणाऱ्या अशा कोल्ह्या-लांडग्यांप्रमाणेंच व्यभिचारिणी स्त्रियांचेंहि सख्य टिकाऊ नसतें असें ज्ञाते पुरुष म्हणतात ( १० ) ( सारांश, व्यभिचारिणी स्त्रियांचें प्रेम अनिश्चित असतें. त्यांच्या भाषणावर ज्ञाते पुरुषांनीं कधींहि विश्वास ठेवूं नये. )

( मोहनीच्या या मायावी भाषणानें त्या कामांध दैत्यांस बोध होण्याऐवजीं उलट तिच्याभाषणावर अधिकच विश्वास बसला आणि त्यानं तो अमृताचा घट तिच्या स्वाधीन केला. अमृतपात्र हातीं येतांच मोहिनीरूपधारी विष्णूनें विचार केला कीं- )

### ३७२

( सर्पांना दुध पाजणें वाईटच. ) ८-९-१९

**असुराणां सुधादानं सर्पाणामिव दुर्नयम् ॥**
**मत्वा जातिनृशंसानां न तां व्यभजदच्युतः ॥ १९ ॥**

स्वभावतःच क्रूर असलेल्या अशा ह्या असुरांना अमृत देणें हें सर्पांना दूध पाजण्या-सारखें अन्यायाचें आहे, असें जाणून अच्युतानें त्यांना तें अमृत दिलें नाहीं ( १९ ) ( सारांश, असुरांना शेवटीं अमृताचा लाभ झाला नाहीं. ) भागवतकार म्हणतात-

### ३७३-७४

( ऐकप्रानेंच फलसिद्धि होते. ) ८-९-२८,२९

**एवं सुरासुरगणाः समदेशकालहेत्वर्थकर्ममतयोऽपि फलेऽविकल्पाः ॥**
**तत्रामृतं सुरगणाः फलमञ्जसापुर्यत्पादपंकजरजःश्रयणान्न दैत्याः ॥ २८ ॥**

**यद्युज्यतेऽसुवसुकर्ममनोवचोभिर्देहात्मजादिषु नृभिस्तदसत्पृथक्त्वात् ।**
**तैरेव सद्भवति यत्क्रियतेऽपृथक्त्वात्सर्वस्य तद्भवति मूलनिषेचनं यत् २९**

अमृताचे प्राप्तीकरितां देश, काल, हेतु, अर्थ, प्रयत्न व बुद्धि, हें सर्व देवगणांचें व दैत्यगणांचें एकसारखेंच होतें, तथापि त्यांना फलप्राप्ती मात्र वेगवेगळी झाली. श्रीविष्णूच्या चरणकमलांच्या रजःकणांचा आश्रय केल्यामुळें देवगणांना अनायासानें अमृतरूप फल प्राप्त झालें, व त्यांच्यापासून विमुख असल्यामुळे दैत्यांना तें प्राप्त झालें नाहीं ( २८ )

प्राण, द्रव्य, कर्म, वाणी व मन, ह्यांच्या योगानें देह व पुत्र इत्यादिकांकरितां लोक जें कर्म करितात तें भेदबुद्धीनें केलेलें असल्यास व्यर्थ होतें, पण त्याच प्राणादिकांच्या योगानें ऐक्यबुद्धीनें जें कर्म करावें, तें वृक्षांच्या मुळाशी पाणी घातलें असतां जसें खांद्यांना त्यांची पुष्टि करितें, त्याचप्रमाणें सर्वांना पोंचून महाफलदायक होतें ( २९ )

( तात्पर्य–जगामध्यें तमोगुणाचा किंवा रजोगुणाचाच प्रभाव ज्यास्त असून तेच सद्यः फलदायी दिसतात, पण शाश्वत फलाच्या दृष्टीनें धीर व गंभीर असा सत्त्वगुणच प्रभावी होतो. या आख्यानांत आणखी एक महत्त्वाची गोष्ट दिसून येते, ती ही कीं, कार्यारंभीं असलेली जूट फलविभागाच्या वेळीं टिकत नाहीं, आणि शेवटीं ' दोघांच्या भांडणांत तिसऱ्याचा लाभ ' या म्हणीप्रमाणेंच घडून येतें. सारांश, राष्ट्रकार्याचे कामीं स्वार्थाचा सर्वस्वीं त्यागच केला पाहिजे. ) असो.

यापुढें अमृतप्राप्तीच्या कामीं फसगत झाल्यामुळें रागवलेल्या दैत्यांनीं देवांबरोबर युद्ध करून त्यांस पराजित केलें इत्यादि वर्णन आहे. त्यांत बलीची कथा विस्तारानें वर्णन केली आहे. मध्यंतरीं बाराव्या अध्यायांत शंकर व विष्णु यांच्या भेटीचा प्रसंग आणून शंकरास विष्णूनें गतलेलें मोहनीरूप पाहण्याचा इच्छा झाली आणि विष्णूनें शंकरास तें दाखविलें, असा भाग आला आहे. या कथाभागांत तरुण सुंदरीच्या दर्शनानें प्रत्यक्ष शंकराची कशी अवस्था झाली याचें रसभरीत वर्णन आहे, व त्यावरून स्त्री ही वस्तु किती आकर्षक आहे, तिच्यापासून चतुर पुरुषाचीहि कशी फजिती होते हें दर्शविलें आहे. यानंतर तेराव्या व चौदाव्या अध्यायांत चालू वैवस्वत मनु. व सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, धर्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि आणि इंद्रसावर्णि, या मन्वंतरांची हकीगत आली आहे. पंधराव्या अध्यायापासून ते विसाव्या अध्यायापर्यंत अत्यन्त लोकोत्तर असें बलीचें चरित्र आलें आहे. या बलीच्या कथाभागांत, थोर पुरुष आपलें वचन सत्य करण्याकरितां सर्वस्वावरहि पाणी सोडण्यास कसे तत्पर असतात, आणि अशा सत्यवचनी पुरुषापुढें परमेश्वरासहि कसें लीन व्हावें लागतें, याचें उद्बोधक चित्र दाखविलें आहे.

बळीचें एकंदर चरित्र फारच मनोवेधक आहे. निस्सीम गुरुभक्ति, अत्यंत उदारत्व, श्रेष्ठ शौर्य आणि सत्यवचनपालन, इत्यादि गुण या चरित्रांत पहावयास मिळतात. समुद्रमंथनाच्या प्रसंगानंतर बळीनें सर्व देवांस पराजित करून इंद्रपद हस्तगत केलें आणि

अश्वमेध नामक ९९ यज्ञ पुरे करून शंभराव्या यज्ञास आरंभ केला. हा लोकोत्तर पराक्रम पहातांच प्रत्यक्ष भगवंतास अदितीच्या उदरीं वामन नांवानें अवतरून त्यास आळा घालावा लागला. या यज्ञप्रसंगीं बटुरूपधारी वामनानें बळीस तीन पावलें भूमीची याचना केली असतां, बळीनें त्याच्या इच्छेप्रमाणें त्याच्या हातावर पाणी सोडलें, परंतु हा कपटरूपधारी विष्णुच बळीचें सर्वस्व हरण करण्याकरितां वामनरूपानें आला आहे, हें दैत्यगुरु शुक्राचार्यांनें जाणलें, व त्यानें बळीस दिलेल्या वचनापासून पराङ्मुख करण्याचा प्रयत्नहि केला. त्याप्रसंगीं शुक्राचार्य म्हणाले )–

३७५

( उपजीविका विनाश होईल असें दान करूं नये. ) ८–१९–३६

**न तद्दानं प्रशंसन्ति येन वृत्तिर्विपद्यते ॥ ३६ ॥**

ज्या दानानें निर्वाहाचें साधनच नष्ट होतें असें दान श्रेष्ठ नव्हे. प्रसंग आला असतां अनृतानेंहि स्वतःचें संरक्षण करावें असें सांगितलें आहे.

३७६

( सत्य म्हणजे काय ? व असत्य म्हणजे काय. ) ८–१९–३८

**सत्यमोमिति यत्प्रोक्तं यन्नेत्याहानृतं हि तत् ॥ ३८ ॥**

तेव्हां सांप्रत तूं असत्याचा जरी आश्रय केलास तरी निंद्य होणार नाहीं कारण–

३७७

( असत्याचें आचरण केव्हां दोषार्ह नाहीं ) ८-१९-४३

**स्त्रीषु नर्मविवाहे च वृत्त्यर्थे प्राणसंकटे ।**
**गोब्राह्मणार्थे हिंसायां नानृतं स्याज्जुगुप्सितम् ॥ ४३ ॥**

स्त्रियांना वश करतांना, विनोदामध्यें, विवाहासाठीं कन्या मिळविण्याकरितां, स्तुति करतांना, उपजीविकेचें साधन मिळवितांना, प्राणांवर संकट आलें असतां, गोब्राह्मणांचें हित करतांना व एकाद्याची हिंसा टाळण्यासाठीं अनृत भाषण केलें, तर तें निंद्य होत नाहीं.

दैत्यगुरू शुक्राचार्य यांनीं जरी बलीला असा उपदेश केला, तरी तो बलि राजा आपल्या वचनापासून यत्किंचितहि ढळला नाहीं. उलट तो आपल्या गुरूस म्हणाला–

३७८–३७९

( असत्य हाच मोठा अधर्म )८–२०–४–५

**न ह्यसत्यात्परोऽधर्म इति होवाच भूरियम् ॥**
**सर्वं सोढुमलं मन्ये ऋतेऽलीकपरं नरम् ॥ ४ ॥**

नाहं बिभेमि निरयान्नाधन्यादसुखार्णवात् ॥
न स्थानच्यवनान्मृत्योर्यथा विप्रप्रलम्भनात् ॥ ५ ॥

असत्याहून मोठा अधर्म नाहीं. खोटें बोलणाऱ्या मनुष्याखेरीज इतर कांहींहि सहन करणें मला शक्य आहे; परंतु असत्य केव्हांहि सहन होणार नाहीं. पृथ्वीनेंहि हेंच सांगितलें आहे (४) असत्य न बोलल्यास विपत्ति येईल असें आपण सांगितलें, परंतु हे आचार्या याचकाला फसविणें या गोष्टीला जसा मी भितों, तसा नरकाला, दुःखाचा सागर अशा दारिद्र्याला, स्थानभ्रंशाला व मृत्युलाहि मी भीत नाहीं (५)

(सारांश, थोर पुरुष लौकिकाकरितां प्राणाचीहि परवा करीत नाहींत हें बलीच्या उदाहरणानें येथें दाखविलें आहे. असो, दिलेल्या वचनाप्रमाणें शेवटीं बलीनें वामनरूपी भगवंताची इच्छा तृप्त केली आणि त्याबरोबरच त्या भगवंतास आपल्या द्वारपालाचे जागीं उभें केलें ! ! कोण हें सामर्थ्य ! ही बलीची कथा भागवतकारांनीं फारच चित्त-वेधक ग्रथित केली आहे. त्यांत बलीचा पराक्रम, त्याची सत्यनिष्ठा, त्यानें केलेला दिग्विजय, देवांची उडविलेली दैना, आदितीनें केलेली आपल्या पतींस प्रार्थना आणि भक्तजनांच्या अडचणी दूर करण्याकरितां वामनरूपानें देवानें घेतलेला अवतार ह्या एकंदर गोष्टी संसारी जीवास बऱ्याच आल्हादकारक अशा आहेत. असो. यापुढील अध्यायांत मत्स्यावताराची कथा सांगण्यांत आली आहे; आणि याठिकाणीं आठवा स्कंध पूर्ण केला आहे.

# नवम स्कंध

(या स्कंधाचे चोवीस अध्याय असून ९६४ श्लोक आहेत. या स्कंधांत वैवस्वत मनूपासून झालेल्या सूर्य आणि चंद्र वंशांचें वर्णन आहे.)

## सुद्युम्नाची कथा.

पहिल्या तेरा अध्यायांत विवस्वानापासून सूर्यवंशाला कसा आरंभ झाला त्याचें निरूपण असून सुद्युम्न, पृषध्र, च्यवनऋषि, नाभाग, अम्बरीष, सौभरी, निमि यांच्या कथा प्रामुख्यानें दिल्या आहेत. त्यांत सुद्युम्नाची कथा बरीच चित्तवेधक आहे. मनूला पुत्र नव्हता म्हणून त्यानें वसिष्ठाच्या संमतीनें प्रजाकामयज्ञास आरंभ केला. त्या वेळीं मनूची पत्नी श्रद्धा हिनें आपणास कन्या व्हावी अशी इच्छा होत्यास सांगितली. त्यामुळें असें झालें कीं, कन्येच्या उद्देशानें मंत्र म्हटला जाऊन हविर्भाग अर्पीत पडला. आणि त्यायोगें पुत्राऐवजीं कन्या अपत्य झालें. तिचें नांव इला ठेविलें, परंतु मनूला पुत्राचीच इच्छा होती म्हणून त्यानें वसिष्ठाकडून विष्णूची प्रार्थना करवून त्या इला कन्येला पुरुषत्व मागून घेतलें व त्याचें नांव सुद्युम्न ठेवलें. हा सुद्युम्न मोठा होऊन एकदां मृगयेस गेला असतां पुन्हां दुर्दैव आडवें आलें, व तो शंकराच्य

विहारोद्यानांत शिरला. या उद्यानास शंकरानें शाप दिला होता, म्हणून तेथें जातांच त्यास स्त्रीत्व प्राप्त झालें व तशा स्थितींतच तो वनांत हिंडत असतां तेथें चंद्राचा मुलगा बुध त्याच्या दृष्टीस पडला व दोघांचें प्रेम एकमेकांवर बसलें, व गांधर्वविवाह करून तीं पतिपत्नीप्रमाणें कालक्रमणा करूं लागली. सुद्युम्नाला पुन्हां स्त्रीत्व प्राप्त झालें याबद्दल वसिष्ठाला वाईट वाटलें. त्यानें शंकराची प्रार्थना केली; व शंकरानें वसिष्ठाच्या विनंतीस मान देऊन सुद्युम्नानें एक महिना पुरुषत्व व एक महिना स्त्रीत्व भोगावें अशी सवड करून दिली. बुधाची स्त्री या नात्यानें त्यास जो पुत्र झाला तो पुरूरवा होय. हा चंद्रवंशाचा संस्थापक झाला. आणि पुरुष या नात्यानें त्याला जे तीन पुत्र झाले ते दक्षिण दिशेकडील राजे झाले. म्हणजे एकाच शरीरास एकाच जन्मांत स्त्री व पुरुष अशा दोन अवस्था प्राप्त होऊन त्यापासून सूर्य व चंद्र असे दोन वंश प्रचारांत आले, असें या कथेंत दर्शित केलें आहे.

## पृषध्राची कथा

सुद्युम्नाची अशी व्यवस्था लागल्यामुळें मनूनें पुन्हां पुत्रकामेष्टि यज्ञ केला, त्यायोगें त्यास दहा पुत्र झाले. त्यांत इक्ष्वाकु श्रेष्ठ होता; व तोच पुढें सूर्यवंशाचा प्रस्थापक झाला. पृषध्र हा मनूच्या दहा पुत्रांतील एक होता. हा मंदबुद्धि असल्यामुळें त्यास गाई राखण्याचें काम दिलें होतें. एके रात्रीं एका वाघानें गाईवर झडप घातली असतां हा वाघास मारावयास गेला, तो अंधारांत याच्या हातून गाय मारली गेली, व याचे माथीं गोहत्येचें पातक बसलें त्यामुळें वसिष्ठ गुरुनें त्यास शूद्र होण्याची शिक्षा दिली; परंतु पृषध्रानें तपश्चर्येनें ती चुकविली व शेवटीं ब्रह्मपदाची प्राप्ति करून घेतली.

## सुकन्येची कथा.

शर्याति म्हणून मनूचा दुसरा पुत्र होता, त्यास सुकन्या नांवाची कन्या होती. एके प्रसंगीं ती बापाबरोबर वनांत गेली असतां एका वारुळाच्या छिद्रांत कांहीं चकाकणारा पदार्थ तिला दिसला व बाललीलेस अनुसरून तिनें काडीनें त्या पदार्थास टोंचिलें तों त्यांतून रक्त वाहुं लागलें. हा पदार्थ म्हणजे च्यवनभार्गव ऋषींचे डोळे होते. हे ऋषी समाधी लावून बसले असतां त्यांच्या अंगावर वारुळ वाढलें होतें, व त्यांचे डोळे मात्र त्या वारुळाच्या छिद्रांतून चकाकत होते. असो, हा प्रमाद घडतांच राजाच्या सैन्यांतील लोकांचे मलमूत्रविसर्जन बंद झालें. तेव्हां या अपराधाबद्दल राजानें ऋषींची प्रार्थना करून त्यास आपली ती आवडती सुकन्या अर्पण केली. सुकन्या मोठी शहाणी होती. बापावरील संकट लक्षांत घेऊन तिनें त्या वृद्ध ऋषीचें पत्नीत्व स्वीकारलें, आणि पातिव्रत्य धर्मास अनुसरून तिनें आपल्या वृद्ध पतीची इतकी उत्तम सेवा केली कीं, पुढें च्यवन ऋषीस तारुण्य प्राप्त होऊन संसारांतील सर्व सुखांचा अनुभव तिला मिळाला. सारांश 'सुकन्या' या नांवाप्रमाणें तिनें माहेर व सासर या दोन्ही कुलांचा लौकिक वाढविला. सुकन्येचें चारित्र प्रत्येक कुमारिकेनें लक्षांत घेण्यासारखें आहे.

## राजा अंबरीषाची कथा.

यापुढें शर्यातीच्या वंशांतील कुकुद्मी आणि नाभागाची कथा दिली आहे. कुकुद्मीच्या कथेंत काल किती झपाट्यानें निघून जातो हें दर्शविलें आहे आणि नाभागाच्या कथेंत निरिच्छ माणसाला परमेश्वर न मागतांहि द्रव्यादि देऊन कसा प्रसन्न होतो हें दाखविलें आहे. त्यानंतर भगवद्भक्त अशा अंबरीष राजाची कथा सांगितली आहे. अंबरीष हा नाभागाचा पुत्र असून परम भगवद्भक्त होता. एकादशीचें व्रत तो अत्यंत नियमानें करीत असे. एकदां साधनद्वादशीचे प्रसंगीं तो पारणा करण्यास सिद्ध झाला असतां दुर्वास ऋषि त्याजकडे आले. राजानें त्याची पूजा करून भोजनाची विनंती केली. राजाची विनंती मान्य करून ऋषी स्नानास गेले. इकडे पारणा करण्याची वेळ झाली म्हणून शास्त्रनियमास अनुसरून राजानें देवाचें तीर्थ घेऊन पारणा केली. कांहीं वेळानें संध्यादि आह्निक आटोपून दुर्वास आले, तीर्थच घेऊन कां होईना परंतु आपण येण्यापूर्वी राजानें पारणा केली याबद्दल ऋषीस राग आला व त्यानें आपल्या जटेपासून एक कृत्या उत्पन्न करून ती राजावर सोडली. परंतु हा अन्याय भगवंतास सहन झाला नाहीं. त्यानें लगेच सुदर्शन सोडलें. त्या सुदर्शनानें कृत्येचा नाश केला, व तें ऋषींच्या मागें लागलें. तेव्हां ऋषि जीव घेऊन पळूं लागला. ब्रह्मदेव, शंकर, विष्णू यांपैकीं कोणीहि आश्रय देईना. तेव्हां तो परत अंबरीष राजास शरण गेला. अशाप्रकारचा हा कथाभाग आहे. दुर्वास ऋषि महातपस्वी खरे, परंतु भगवद्भक्तीपुढें त्याचें तेज पडलें नाहीं. याठिकाणी निस्सीम भगवद्भक्ताचें श्रेष्ठत्व उत्तम दाखविलें आहे. या प्रसंगीं दुर्वासऋषी विष्णूस शरण गेला असतां विष्णूनें काढलेले उद्गार महत्त्वाचे आहेत.

### ३८०-३८१

( भगवंताचें हृदय म्हणजे साधु ) ९-४-६३,६८

**अहं भक्तपराधीनो ह्यस्वतन्त्र इव द्विज ॥**
**साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्तजनप्रियः ॥ ६३ ॥**
**साधवो हृदयं मह्यं साधूनां हृदयं त्वहम् ॥**
**मदन्यत्ते न जानन्ति नाहं तेभ्यो मनागपि ॥ ६८ ॥**

भगवान् म्हणतात, हे मुने, भक्तांच्या कामामध्यें माझें चित्त गढून गेल्यामुळें, व मला भगवद्भक्तच फार प्रिय असल्यामुळें मी निरंतर भक्तांच्या आधीन असतों. यास्तव आपल्या दुःखाचा परिहार करण्यास मीहि परतंत्रच आहे (६३) हे साधु माझें हृदय, व मी साधूंचें हृदय. माझ्याहून दुसरें कांहीं ते जाणत नाहींत आणि मीहि त्यांच्याहून इतर कशाचीहि क्षिति बाळगीत नाहीं (६८)

## विकुक्षीची कथा

यानंतर इक्ष्वाकूपासून पुढें वंशविस्तार कसा झाला तो कथाभाग वर्णन केला आहे. ह्या इक्ष्वाकूची उत्पत्ति मनूच्या नाकापासून झाली होती. ह्या इक्ष्वाकूला एकंदर शंभर पुत्र झाले. त्यांत विकुक्षि नांवाचा एक पुत्र होता. एकदां इक्ष्वाकूनें श्राद्धाकरितां या विकुक्षीस मांस आणण्याकरितां पाठविलें असतां यानें अरण्यांत जाऊन बरेच ससे मारले, आणि परत येत असतांना भूक लागल्यामुळें त्यांतील एक ससा खाऊन टाकला. ब्राह्मणाला अर्पण करण्यापूर्वी ससा खल्ला म्हणून तें मांस निषिद्ध ठरलें व याला 'शशाद' म्हणजे ससा खाणारा असें नांव पडलें. या अपराधाबद्दल बापानें यास राज्याबाहेर घालवून दिलें. परंतु बापाच्या मरणानंतर हाच राजा झाला.

## पुरंजयाची कथा

शशादानंतर त्याचा पुत्र पुरंजय राज्यारूढ झाला. हा मोठा शूर पराक्रमी होता, परंतु अतिशय महत्वाकांक्षी होता. एकदा देवदानवांमध्यें युद्ध झालें. त्या प्रसंगीं देवांनीं यास साह्यास बोलावलें असतां इंद्र वाहन झाल्यास आपण तुमच्या सहायास येऊं अशी यानें अट घातली. देवांनीं ती मान्य केली, व इंद्राच पाठीवर बसून देवांच्या सहायास हा गेला त्यामुळं याला इंद्रवाह व कुकुत्स्थ अशीं नांवें पडलीं. याच पुरंजयाच्या कुळांत पुढें युवनाश्व म्हणून एक राजा झाला तो निपुत्रिक असल्यामुळें ऋषींनीं याजकडून पुत्रकामेष्टी करविली त्या वेळीं याच्या स्त्रीस देण्याकरितां अभिमंत्रित पाणी तयार करून ठेवलें होतें, तें रात्रीच्या प्रसंगीं तहान लागल्यामुळें नकळत यानें पिऊन टाकलें. त्यामुळें याच्या उदरांत गर्भ धारणा झाली व योग्य प्रसंग होतांच तो गर्भ त्याची कूस फोडून बाहेर आला. अशाप्रकारें उत्पन्न झालेल्या बालकास कोणी पाजावें असा प्रश्न उत्पन्न झाला. तेव्हां यज्ञभोक्ता इंद्र पुढें आला, आणि 'मां धाता' म्हणजे मला पिईल, असें म्हणून त्यानें आपलें बोट त्या मुलाच्या तोंडांत दिलें व त्याचें नांव मांधाता असें ठेवलें. अशा प्रकारें ही इक्ष्वाकुवंशाची कथा भागवतकारांनीं सांगितलेली आहे. त्यावरून त्या कालाच्या समाजरचनेचा बराच बोध होणार आहे.

## सौभरीची कथा

यापुढें सौभरी ऋषीची कथा सांगितली आहे. हा सौभरी ऋषि अत्यंत वृद्ध होता. तो आपला काळ नेहमीं तपश्चर्येत घालवीत असे. परंतु एकदां नदीवर स्नानास गेला असतां तेथें मत्स्यांची क्रीडा यानें पाहिली आणि तशी क्रीडा करण्याची यास इच्छा झाली व कन्या मागण्याकरितां हा मांधाता राजाकडे गेला. मांधात्यास पन्नास कन्या होत्या. हा म्हातारा ब्राह्मण लग्न करण्याची इच्छा करतो हें पाहून राजास आश्चर्य वाटलें. त्यानें थट्टेनें म्हटलें-'ऋषे, तुम्ही अंतःपुरांत जा, आणि जी कन्या तुह्मांला वरील ती तुम्ही घेऊन जा.' राजाच्या भाषणाचा भावार्थ लक्षांत येतांच ऋषीनें तपःसामर्थ्यानें असें सुंदर व तरूण रूप धारण केलें कीं त्या पन्नासहि कन्यांनीं त्यास माळ घातली. पुढें त्या पन्नास स्त्रियांसह

दीर्घकाळ विलासोपभोग घेतल्यानंतर ऋषीनें संसाराचा त्याग केला, व वानप्रस्थाश्रम स्वीकारून अग्नींत देह अर्पण केला. त्याच्या स्त्रियांनींहि त्याजबरोबर सहगमन केलें. या प्रसंगीं या ऋषीच्या तोंडीं भागवतकारांनीं पुढील श्लोक घातला आहे.

३८२

( मोक्षाची इच्छा करणारांनीं गृहस्थाश्रमाचा त्याग करावा. ) ९-६-५१

**संगं त्यजेत मिथुनव्रतिनां मुमुक्षुः सर्वात्मना न विसृजेद्बहिरिन्द्रियाणि॥**
**एकश्चरन्रहसि चित्तमनन्त ईशे युञ्जीत तद्व्रतिषु साधुषु चेत्प्रसंगः॥५१॥**

ज्याला खरोखर मोक्षाची इच्छा असेल त्यानें गृहस्थाश्रमी विषयी पुरुषांचा संसर्ग सर्वस्वी टाळणेंच अवश्य आहे. इंद्रियांना बाहेर सोडणें उचित नाहीं. एकटें राहून नित्य भगवान् परमेश्वरावर मन लावावें आणि करावयाचा असेल तर केवळ साधु लोकांचाच समागम करावा ( ५१ )

## सगरपुत्राची कथा

सातव्या अध्यायांत त्रिशंकु व हरिश्चंद्र यांच्या कथा आहेत. आठव्या अध्यायांत सगराचा अश्वमेध यज्ञ, त्याच्या साठ हजार पुत्रांचा कपिलाकडून नाश, अंशुमानाचा थोरपणा इत्यादि कथाभाग आहे. नववा अध्याय फारच महत्त्वाचा आहे. कोणत्याहि महत्कार्याची सिद्धि एकाच्याच प्रयत्नानें होत नाहीं, त्यास अनेकांचे अनेक प्रकारचे प्रयत्न किंबहुना देहत्यागाचीहि आवश्यकता लागते हें या कथेंत दाखविलें आहे. कपिलाच्या कोपानें दग्ध झालेल्या सगरपुत्रांच्या उद्धाराकरितां अंशुमान, त्याचा पुत्र दिलीप व दिलीपाचा पुत्र भगीरथ या तिघांनीं स्वर्गंगेस भूलोकीं आणण्याचे कामीं आमरण प्रयत्न केले, तेव्हां शेवटीं तिसऱ्या पिढीला-भगीरथाला-यश आलें. म्हणून 'भगीरथ प्रयत्न' अशी म्हण व्यवहारांत रूढ झाली. असो. यानंतर कल्माषपाद राजाचें चरित्रहि उद्बोधक आहे. दहा आणि अकरा या दोन अध्यायांत संक्षेपानें रामचरित्र आलें असून बाराव्या अध्यायांत पुढील सूर्यवंश सांगितला आहे.

## निमीची कथा.

तेराव्या अध्यायांत सूर्यवंशांतूनच जनकवंश कसा निघाला हें सांगितलें आहे. इक्ष्वाकूचा पुत्र निमि, यानें एकदां यज्ञाकरितां वसिष्ठाला बोलाविलें होतें. परंतु त्याच वेळीं वसिष्ठ इंद्राकडे यज्ञार्थ जावयाचा असल्यानें, त्यानें आपण परत येईपर्यंत थांबण्यास सांगितलें. परंतु कालाचा भरंवसा नाहीं असें जाणून निमीनें दुसऱ्या ऋषीकडून यज्ञास प्रारंभ केला. परंतु हें वसिष्ठास सहन झालें नाहीं, त्यानें 'देह पतन पावो' असा निमीला शाप दिला. उलट निमीनेंहि वसिष्ठाला तसाच शाप दिला. त्या शापाप्रमाणें निमीचा देह पतन पावला असतां ऋषींनीं यज्ञाकरितां जमलेल्या देवांना निमि सजीव होवो अशी प्रार्थना केली. परंतु त्या वेळीं निमि म्हणाला—

### ३८३ ते ३८५

( देह बंधनकारक आहे. ) ९–१३–८,९,१०

तथेत्युक्ते निमिः प्राह मा भून्मे देहबन्धनम् ॥ ८ ॥
यस्य योगं न वाञ्छन्ति वियोगभयकातराः ॥
भजन्ति चरणाम्भोजं मुनयो हरिमेधसः ॥ ९ ॥
देहं नावरुरुत्सेऽहं दुःखशोकभयावहम् ॥
सर्वत्रास्य यतो मृत्युर्मत्स्यानामुदके यथा ॥ १० ॥

ऋषींनीं ' ठीक ' आहे असें म्हटलें असतां निमि म्हणतो मला आतां हें देहाचें बंधन न होईल तर बरें ( ८ ) या देहाचा केव्हां वियोग होईल हें ठाऊक नाहीं; या करितां देहाची इच्छा न करतां, मुनि भगवान् विष्णूच्या चरणकमलाचा आश्रय करितात ( ९ ) देहापासून दुःख, संकटें आणि अनर्थ, यांचीच प्राप्ति होत असल्यामुळें आतां तो धारण करण्याची माझी इच्छा नाहीं. माशांना ज्याप्रमाणें पाण्यांत सर्वत्र मृत्यु असतो, त्याप्रमाणेंच देहालाहि सर्वत्र मृत्यूची भीति असते ( १० )

अशाप्रकारें निमीनें पुन्हां देह धारण करण्याचें नाकारलें, तेव्हा देवांनीं त्याची स्थापना प्राणिमात्राच्या नेत्रांत केली; आणि पुढें वंशविस्तारास्तव त्याच्या देहाचें मंथन केलें. त्या मंथनापासून जो पुत्र उत्पन्न झाला तो जनक. त्याचा वंश पुढें त्याच नांवानें प्रसिद्ध झाला. अशाप्रकारें हें सूर्यवंशाचें वर्णन येथें पूर्ण झालें आहे.

### सोमवंशाचें वर्णन.

चवदाव्या अध्यायांत सोमवंशाला सुरवात झाली आहे. या वंशाचा मूळ पुरुष इलापुत्र पुरूरवा. या पुरूरव्याचें विस्तृत चरित्र चौदाव्या अध्यायांत दिलें आहे. याच राजापासून अग्न्युपासना, तीन वेद इत्यादि प्रचलित झालीं.

### ३८६–३८७

( कृतयुगांतील वेदाचें स्वरूप ) ९ १४-४८-४९

एक एव पुरा वेदः प्रणवः सर्ववाङ्मयः ॥
देवो नारायणो नान्य एकोऽग्निर्वर्ण एव च ॥ ४८ ॥
पुरूरवस एवासीत्त्रयी त्रेतामुखे नृप ॥
अग्निना प्रजया राजा लोकं गान्धर्वमेयिवान् ॥ ४९ ॥

पूर्वी कृतयुगामध्यें सर्व वाणींचें बीज असा जो ॐकार तोच काय तो एक वेद होता. तसाच नारायण हा एकच देव असून अग्नि एकच होता व वर्ण सुद्धां एकच होता ( ४८ )

पण त्रेतायुगाचा आरंभ झाल्यावर पुरूरव्यापासून एका अग्नीचे तीन अग्नि झाले. हा जो पुरूरव्याचा अग्निरूप पुत्र त्याच्या साह्यानें त्या राजाला गंधर्वलोकाची प्राप्ति झाली ( ४९ )

पंधराव्या अध्यायांत हैहयकुलांतील सहस्रार्जुनाची कथा आली आहे. हा फारच पराक्रमी होता. यानें रावणाला आपल्या स्त्रियांसमक्ष एकाद्या वानरासारखे धरून आपल्या माहिष्मती नगरींत नेलें होतें.

गृहीतो लीलया स्त्रीणां समक्षं कृतकिल्बिषः ।
माहिष्मत्यां संनिरुद्धो मुक्तो येन कपिर्यथा ॥ ९-१५-२२.

पराक्रमाच्या अहंकारामुळें याच्या हातून बरेच अत्याचार होऊं लागले. एकदां हा वनांत शिकारीस गेला असतां जमदग्नीनें याचा व याच्या सैन्याचा मोठा सत्कार केला. त्या उपकाराबद्दल ऋषीचे आभार मानण्याऐवजीं यानें त्याची कामधेनूच बलात्कारानें हरण केली ! ह्या अमानुष अपराधाबद्दल जमदग्निपुत्र परशराम यानें त्याचा वध केला. परंतु अशा प्रसंगींहि जमदग्नि पुत्रास म्हणाला—

वयं हि ब्राह्मणास्तात क्षमयार्हणतां गताः ॥ ९-१५-३९

अम्हीं ब्राह्मण क्षमेनेंच श्रेष्ठ झालों आहों. राजाचा वध केलास हें मोठें पाप केलेंस. तेव्हां पित्याच्या सांगण्यावरून परशुरामानें पापनिष्कृतीकरितां तीर्थयात्रा केली; पण त्या अवधींत सहस्रार्जुनाच्या पुत्रांनीं जमदग्नीचा वध केल्यामुळें परशुरामानें सर्व क्षत्रियकुलांचा एकवीस वेळां संहार केला.

यानंतर पुढील अध्यायांत 'तपसा क्षात्रमुत्सृज्य यो लेभे ब्रह्मवर्चसम्' तपानें आपलें क्षत्रियत्व टाकून ब्रह्मत्व मिळविलेल्या विश्वामित्राची कथा आहे. अठराव्या अध्यायांत ययातिराजाची कथा आली आहे. त्यांत वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा हिचें चरित्र फारच उद्‌बोधक आहे. सर्वांच्या नाशापेक्षां आपलें व्यक्तिगत माहात्म्य कमी झालें तरी चालेल असें समजून राजकन्या शर्मिष्ठेनें देवयानीचें दासीपण स्वीकारलें होतें. राष्ट्रकार्याकरितां दधीचो ऋषीनें आपला देह अर्पण केला, परंतु राजकन्या शर्मिष्ठेनें राष्ट्रकार्याकरितां आमरण गुलामगिरी पतकरली, आणि महिलावर्गांत आपलें नांव अजरामर केलें. ज्या राष्ट्रांत अशा उदार स्त्रिया निपजतात तें राष्ट्र धन्य होय. ही शर्मिष्ठेची कथा भाग्येच्छू महिलावाचकांनीं मूळांतून अवश्य वाचण्यासारखी आहे. असो. या कथेंत ययातिराजाचें प्रेम शर्मिष्ठेवर बसल्यामुळें शुक्राचार्यानें त्यास 'जरा प्राप्त होवो' असा शाप दिला. त्या वेळीं राजानें आपल्या पुत्रांकडे जरा घेऊन आपलें तारुण्य देण्याविषयीं याचना केली, परंतु कोणीहि पुत्र बापाची जरा घेण्यास कबूल होईना. परंतु शर्मिष्ठेचा पूरु नांवाचा पुत्र होता त्यानें बापाचें म्हणणें मान्य करून त्याची जरा घेतली, व त्यास आपलें तारुण्य दिलें. ह्या वेळीं भागवतकारांनीं पुत्रधर्मास अनुसरून पुढील श्लोक पूरूच्या मुखांत घातले आहेत.

३८८–३८९

( पित्याची आज्ञा पालन करणें हाच पुत्राचा धर्म. ) ९-१८-४३,४४

को नु लोके मनुष्येन्द्र पितुरात्मकृतः पुमान् ॥
प्रतिकर्तुं क्षमो यस्य प्रसादाद्विन्दते परम् ॥ ४३ ॥
उत्तमश्चिन्तितं कुर्यात्प्रोक्तकारी तु मध्यमः ॥
अधमोऽश्रद्धया कुर्यादकर्तोच्चरितं पितुः ॥४४ ॥

पिता हा जन्म देणारा असून त्याच्याच कृपेनें श्रेष्ठ पुरुषार्थाची प्राप्ति होते. यास्तव त्याच्या उपकाराची फेड करणें कोणत्या तरी माणसाला शक्य आहे काय ? ( ४३ )

पित्याच्या मनांतील गोष्ट जाणून ती करील तो श्रेष्ठ पुत्र होय. पित्यानें स्पष्ट सांगितलें असतां त्याची आज्ञा मानील तो मध्यम होय. अश्रद्धेनें कां होईना, पण पिता सांगतो म्हणून करावयाचें असें करणारा पुत्र कनिष्ठ होय. पण यापलीकडे जाऊन कांहीं झालें तरी पित्याची आज्ञा न मानणारा जो असेल तो पुत्र नसून केवळ पित्याच्या शरीरांतून निघालेला मळच समजावा ' ( ४४ )

पुत्राचें तारुण्य घेतल्यावर ययातीनें अनेक वर्षे सुखोपभोग घेतला; आणि शेवटी त्यानें पूरूस त्याचें तारुण्य परत देऊन त्यासच सर्व राज्याधिकार सोंपून दिला, आणि स्वतः वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार केला. विषयसुखांचा अतिरेक झाल्यावर मनुष्यास त्याचा वीट येतो. या संबंधानें भागवतकारांनीं ययातिराजाच्या तोंडीं पुढील उद्गार घातले आहेत. राजा ययाति आपल्या स्त्रीस उद्देशून बोलतो--

३९०

( विषयवासना ही वाढतच असते ) ९-१९-१४

न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ॥
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ १४ ॥

विषयवासना ही विषयांच्या उपभोगानें कधींहि तृप्त होत नाहीं; तर उलट असें होतें कीं, जसा अग्नि तुपाच्या योगानें न विझतां आधकच पेट घेतो, तशी विषयवासना ही विषयांच्या उपभोगानें कमी न होतां अधिकाधिक वाढतच जाते ( १४ )

अध्याय वीसमध्यें दुष्यन्ताची कथा आली आहे. आणि त्यानंतर

रन्तिदेवाची कथा

सांगितलेली आहे. पूरुकुलांतील रंतिदेव हा फारच प्रसिद्ध राजा होऊन गेला. हा मोठा उदार असे. याचकांना सर्वस्व दिल्यामुळें हा निष्कांचन बनला होता. त्यामुळें त्याच्या कुटुंबास अठ्ठेचाळीस दिवस अन्नपाण्यावांचून रहाण्याचा प्रसंग

आला होता. एके दिवशीं त्यास थोडें अन्न व पाणी मिळालें, इतक्यांत तेथें एक ब्राह्मण अतिथि आला, त्यास राजानें त्यांतील अर्धे अन्न देऊन तृप्त केलें. त्यानंतर एक शूद्र आला, व त्यांसहि अवशेष अन्नांपैकीं कांहीं भाग रंतिदेवानें दिला. इतक्यांत कुत्रे वगैरे बरोबर घेतलेला असा एक अतिथि आला, व त्यानें अन्नाची याचना केली. त्या वेळीं सर्वांभूतीं परमेश्वर मानणाऱ्या रन्तिदेवानें अवशिष्ट सर्व अन्न त्या कुत्र्यासहित अतिथीस खाऊं घातलें. आतां फक्त एका मनुष्याला पुरेल इतकें पाणीच काय तें रन्तिदेवाजवळ शिल्लक राहिलें होतें तें तो कुटुंबांतील मंडळीस समावभागानें वांटून देण्यास सिद्ध झाला होता, इतक्यांत तेथें एक तृषित चांडाल आला, व त्यानें पाण्याची याचना केली. तेव्हां तें जलहि त्यानें त्या चाण्डालास देऊन टाकलें. व समाधानानें तो रन्तिदेव म्हणाला—

३९१–३९२

( सर्व जग सुखी असो. ) ९–२१–१२,१३

**न कामयेऽहं गतिमीश्वरात्परामष्टर्द्धियुक्तामपुनर्भवं वा ।।**
**आर्तिं प्रपद्येऽखिलदेहभाजामन्तः स्थितो येन भवन्त्यदुःखाः ।।१२।।**
**क्षुत्तृट्श्रमो गात्रपरिश्रमश्च दैन्यं क्लमः शोकविषादमोहाः ।।**
**सर्वे निवृत्ताः कृपणस्य जन्तोर्जिजीविषोर्जीवजलार्पणान्मे ।। १३ ।।**

‘ अष्टसिद्धि ज्यांत राबत आहेत असें श्रेष्ठ स्थान परमेश्वरापासून मिळवावें अशी माझी महत्त्वाकांक्षा नाहीं. मला मोक्षाचीहि गरज नाहीं. तर सर्व प्राण्यांच्या अंतःकरणांत राहून त्यांचें दुःख मी भोगावें व तेणेंकरून ते दुःखमुक्त व्हावेत, अशी माझी इच्छा आहे ( १२ ) जगावयाची इच्छा असल्यामुळें दीनवाणीनें अन्नपाणी मागणाऱ्या प्राण्याला अन्नदान व जलदान केल्यामुळें माझी भूक व तहान सर्व नाहींशी झाली. माझें शरीरहि स्वस्थ झालें. माझें दैन्य, माझे श्रम, माझा शोक, माझा उद्वेग व माझा मोह ही सर्व दूर झालीं आहेत ’ ( १३ )

तात्पर्य—सर्व जग जेथें दुःखानें भरलें आहे, तेथें केवळ आपल्या क्षणिक सुखाची काळजी वाहण्यापेक्षां त्याच संपादित सामग्रीनें यथाशक्ति दुसऱ्यांचें दुःख हरण केल्यास तेंच आपल्या सात्त्विक समाधानास कारण होतें. ही वृत्ति प्रत्येक प्राणिमात्रानें ठेवावी. यांतच सुखाची गुरुकिल्ली आहे, असें या कथेंत दर्शित केलें आहे.

यानंतर चोविसाव्या अध्यायापर्यंत, कौरव पांडव यादव, पांचाल, वृष्णि, अंधक, इत्यादि कुलांतील राजांची संक्षेपतः माहिती देऊन हा नववा स्कंध समाप्त केला आहे.

---

# दशम स्कंध.

या स्कंधाचे नव्वद अध्याय असून त्यांचें पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. त्यांत पूर्वार्धाचे एकोणपन्नास अध्याय व उत्तरार्धाचे एकेचाळीस अध्याय आहेत. या स्कंधांत भागवतकारांनीं भगवान् गोपालकृष्णाचें चरित्र विस्तृत रीतीनें वर्णन केलें आहे; आणि तें एकंदर चरित्र प्रेम, भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि रसांनीं ओथंबलें आहे. भगवान् श्रीकृष्णानें गोकुळांत केलल्या बाललीला वाचूं लागलें म्हणजे अंतःकरण प्रेमानें उचंबळून येतें, त्याच्या पराक्रमाच्या कथा वांचू लागलें म्हणजे बाहु स्फुरण पाऊं लागतात, संकटकाळीं भक्तांच्या कार्यार्थ तो धावूं लागला म्हणजे भक्तिरसानें मन तन्मय होते, आपल्या भक्तांस तो उपदेश करूं लागला म्हणजे अंतःकरणांतील ज्ञानज्योति प्रदीप्त होते आणि पृथ्वीस झालेला भार दूर करून त्याच्या निर्वाणाचा प्रसंग वाचला म्हणजे वैराग्याचा प्रादुर्भाव होऊन वाचकाच्या शरीरांत वास करणारा जीवात्मा निश्चल होतो असें हें भगवान् श्रीकृष्णाचें चरित्र असून भागवतकारांनीं ९० अध्यायांत अत्यंत भक्तिरसपूर्ण अशा रसाळवाणीनें वर्णन केलें आहे.

सात्त्विक गुणांचा उपशम व रजोगुणाची वृद्धि झाली, म्हणजे पृथ्वीवर स्वार्थबुद्धि बळावते, आणि तिच्या जोरावर सर्व निरुपद्रवी प्राणि त्रस्त होतात. अशा वेळीं त्या सत्त्वगुणविशिष्ट प्राण्यांच्या संरक्षणाकरितां म्हणजे त्रिगुणापैकीं सत्त्वगुणाचाच उत्कर्ष करण्याकरितां जी शक्ति-विभूति कारण होते, तिला अवतार असें म्हणतात. राष्ट्रकार्याकरितां आतांपर्यंत भगवंताचे अनेक अवतार झाले व पुढेंहि आणखी होतील, पण त्या सर्वांत 'कृष्णस्तु भगवान्स्वयम्' पूर्णांशानें अवतरलेला असा भगवान् गोपालकृष्ण हा एकच अवतार होय. भगवंताचे इतर अवतार स्वकार्यापुरतेच होते, पण भगवान् श्रीकृष्णाचा अवतार तसा नाहीं. अर्जुनाला केलेल्या गीतोपदेशानें, आणि उद्धवाला केलेल्या दिव्य उपदेशानें श्रीकृष्णानें आपलें अवतारकार्य 'यावच्चंद्रदिवाकरौ' मार्गदर्शक करून ठेविलें आहे. अशा प्रेमळ कथानकांत सर्वच श्लोक महत्त्वाचे असल्यानें जिज्ञासु वाचकांनीं ते मुळांतच वाचण्यांत विशेष महत्त्व आहे. तथापि त्यांतील कांहीं महत्वाचे प्रसंग येथे देतों—

( आकाशवाणी ऐकून देवकीस मारण्याकरितां सिद्ध झालेल्या कंसास वसुदेवानें केलेला सर्वच उपदेश महत्त्वाचा आहे. त्यांतील पुढील श्लोक पहा. )

३९३

( देहाबरोबर मृत्यु हा आहेच. ) १०-१-३८

**मृत्युर्जन्मवतां वीर देहेन सह जायते ॥**
**अद्य वाऽब्दशतान्ते वा मृत्युर्वै प्राणिनां ध्रुवः ॥३८॥**

प्राण्याच्या जन्माबरोबर मृत्युहि जन्मलेला असतो. आज नाहीं तर शंभर वर्षांनीं तरी जन्मास आलेल्या प्राण्याला मरण हें निश्चयानें येणारच ( ३८ )

( महामाया हातून निसटल्यामुळें झालेल्या पश्चात्तापानंतर कंसानें काढलेले उद्गार ).

३९४

( माननीयांचा केलेला अपमान नाशाला कारण होतो. ) १०-४-४६

**आयुः श्रियं यशो धर्मं लोकानाशिष एव च ॥**
**हन्ति श्रेयांसि सर्वाणि पुंसो महदतिक्रमः ॥ ४६ ॥**

जो कोणी थोरांची अवज्ञा करितो, त्या पुरुषाचें आयुष्य, संपत्ति, कीर्ति, धर्म, उत्तम लोक, उपभोगाचे विषय आणि सर्वप्रकारच्या हितकारक गोष्टी यांचा निश्चयानें नाश होतो ( ४६ ) तात्पर्य-वाडिलांची अवज्ञा करणाराचा उत्कर्ष कधीं होत नाहीं )

अध्याय सहामध्यें पूतनाप्राणहरणाचा मनोहर प्रसंग वर्णिला आहे. सातव्या अध्यायांत शकटासुर, तृणावर्त यांचा वध व यशोदेला विश्वरूपदर्शन हा भाग आला आहे. आठव्या अध्यायांत गर्गाचार्याकडून नामकरण, कृष्णाच्या बाललीला व कृष्णावर मृद्भक्षणाचा आरोप, इत्यादि सुंदर कथाभाग आहे. या वेळचा श्रीकृष्णयशोदेचा संवाद फारच गोड असून यशोदेला श्रीकृष्णानें आपल्या मुखांत विश्वरूप दाखविल्याचा प्रसंग श्लोक ३३ ते ४३ पर्यंत फारच बहारीचा आहे, नवव्या अध्यायांत उलूखबलंधनाचा प्रसंग आला आहे. त्यांत मनुष्याची प्रवृत्ति शाश्वत कल्याणापेक्षांहि दृष्ट पण नश्वर वस्तूकडे कशी असते, प्राणिमात्र निरतिशयसुखाचें अगदीं जवळ आहे, असें समजून त्याच्या मागें लागला असतां, आकाशाप्रमाणें त्याची फसगत कशी होते, तेंच निरहंकार बुद्धीनें राहिल्यास भगवानच इच्छित गोष्ट सिद्ध करण्यास कशी मदत करता, हें सर्व यशोदेच्या रूपानें फारच उत्कृष्ट दाखविलें आहे. बुद्धिमान् मनुष्य आलेल्या प्रत्येक संधीचा सदुपयोग करून घेतो, हें श्रीकृष्णानें अर्जुनवृक्षांच्या उद्धाराविषयीं केलेल्या निश्चयावरून दिसून येतें. दहाव्या अध्यायांत नलकूबर-आणि मणिग्रीव यांचा पूर्ववृत्तांत सांगितला आहे. तो फारच बोधप्रद आहे. हे नलकूबर व मणिग्रीव ऐश्वर्य-मदानें इतके धुंद झाले होते कीं, एकदां हे स्त्रियांसह जलक्रीडा करीत असतां नारदमुनि त्या मार्गानें जाऊं लागले; परंतु ह्या कामांधांनीं त्यांची पर्वा मुळींच ठेविली नाहीं. त्या-वेळीं नारदांनीं काढलेले उद्गार फारच विचारणीय आहेत. नारद म्हणतात,—

३९५ ते ३९९

( दारिद्र्य हें सर्व सुखाचें साधन होय. ) १०-१०-१३ ते १७

**असतः श्रीमदान्धस्य दारिद्र्यं परमाञ्जनम् ॥**
**आत्मौपम्येन भूतानि दरिद्रः परमीक्षते ॥ १३ ॥**
**यथा कण्टकविद्धाङ्गो जन्तोर्नेच्छति तां व्यथाम् ॥**
**जीवसाम्यं गतो लिङ्गैर्न तथाऽविद्धकण्टकः ॥ १४ ॥**

दरिद्रो निरहंस्तम्भो मुक्तः सर्वमदैरिह ॥
कृच्छ्रं यदृच्छयाप्नोति तद्धि तस्य परं तपः ॥ १५ ॥
नित्यं क्षुत्क्षामदेहस्य दरिद्रस्यान्नकांक्षिणः ॥
इन्द्रियाण्यनुशुष्यन्ति हिंसापि विनिवर्तते ॥ १६ ॥
दरिद्रस्यैव युज्यन्ते साधवः समदर्शिनः ॥
सद्भिः क्षिणोति तं तर्षं तत आराद्विशुध्यति ॥ १७ ॥

संपत्तीच्या मदानें धुंद झालेल्या पुरुषाला ताळ्यावर आणण्यास दारिद्र्य हेंच उत्तम अंजन आहे; कारण दरिद्री पुरुषच सर्व प्राण्यांकडे स्वानुभवावरून प्रेमानें पहातो. (१३)

पायांत कांटा मोडलेला मनुष्य आपल्याला होत असलेल्या वेदनांप्रमाणेंच दुसऱ्याहि वेदना होत असतील असें स्वानुभवानें जाणून कोणासहि कांटा मोडूं नये असें म्हणत असतो. परंतु कधींच पायांत कांटा न मोडलेल्या मनुष्याला दुसऱ्याच्या पायांत कांटा मोडल्यामुळें होणाऱ्या दुःखाची कल्पनाच होत नाहीं. ( १४ )

दरिद्री पुरुषाला अहंकाराचा ताठा नसतो, त्यामुळें त्याला कोणत्याच गर्वाची बाधा होत नाहीं. यदृच्छेनें भोगावें लागणारें दुःख हेंच त्याचें श्रेष्ठ तप होय ( १५ )

नेहमीं अन्नान्न करीत असल्यानें दरिद्री मनुष्याचीं इंद्रियें अगदीं क्षीण होतात, अर्थात हिंसादि पातकेंहि त्याच्या हातून घडत नाहींत ( १६ )

समदर्शी साधु पुरुष आपण होऊनच दरिद्र्याला भेटत असतात व अशा सज्जनांच्या सहवासानें दरिद्री पुरुषाच्या वासनेचा क्षय होऊन तो शुद्ध होतो ( १७ )

( कात्यायनव्रतप्रसंगीं गोपींस उद्देशून श्रीकृष्णानें काढलेले उद्गार. )

४००

( वासनाक्षयाचा उत्तम उपाय ) १०-२२-२६

न मय्यावेशितधियां कामः कामाय कल्पते ॥
भर्जिता क्वथिता धाना प्रायो बीजाय नेष्यते ॥ २६ ॥

मुलींनो, तुमचें अंतःकरण माझेठायीं आसक्त झालें, हें एकप्रकारें फारच चांगलें झालें; कारण माझ्याशिवाय अन्य विषयांची कामना करणारे व केवळ माझीच कामना करणारे यांमध्यें मोठा ठळक भेद असा आहे कीं, अन्यविषयाच्या कामनांनीं वासना अधिकाधिक वाढत जाऊन संसारबंध बळकट होत जातो; पण माझ्याठिकाणीं लावलेल्या कामनेनें वासनांचें बीजच क्षीण होत जाऊन संसाराचाच मोक्ष बनतो. एकदां भाजलेलें किंवा शिजविलेलें धान्य जसें पुनः उगवत नाहीं, तसें मला अर्पण केलेलें मन फिरून मोहपाशांत सांपडत नाहीं. ( तात्पर्य-वासनांचा क्षय, हेंच मोक्षाचें साधन.) ( ऋषिपत्न्यांनीं श्रीकृष्णास संतुष्ट केल्यानंतर ऋषींनीं आपल्या पत्न्यांस उद्देशून काढलेले उद्गार. )

### ४०१ ते ४०३

( भक्ति हीच कल्याण करिते. ) १०–२३–४१ ते ४३

**अहो पश्यत नारीणामपि कृष्णे जगद्गुरौ ॥**
**दुरन्तभावं योऽविध्यन्मृत्युपाशान्गृहाभिधान् ॥ ४१ ॥**
**नासां द्विजातिसंस्कारो न निवासो गुरावपि ॥**
**न तपो नात्ममीमांसा न शौचं न क्रियाः शुभाः ॥ ४२ ॥**
**अथापि ह्युत्तमश्लोके कृष्णे योगेश्वरेश्वरे ॥**
**भक्तिर्दृढा न चास्माकं संस्कारादिमतामपि ॥ ४३ ॥**

ह्या स्त्रिया असूनहि यांची कृष्णभक्ति किती एकनिष्ठ आहे पहा ! भक्तिबळानें त्यांनीं संसाररूपी मृत्यूचे पाशहि तोडून टाकिले ( ४१ ) वास्तविक ह्या स्त्रियांना आमच्या सारखे उपनयनादिक संस्कार नाहींत, गुरुगृहीं राहून वेदाध्ययन करण्याचा प्रसंग नाहीं, ह्यांनीं तपश्चर्या केलेली नाहीं, अध्यात्मशास्त्राची माहिती नाहीं, शुचिर्भूतपणा नाहीं, किंवा नित्यनैमित्तिक कर्मांच्या योगानें यांनीं पुण्यसंचयहि केलेला नाहीं ! तथापि भक्तकामकल्पद्रुम भगवान् श्रीकृष्णाविषयीं ह्यांची दृढ भक्ति असून उपनयनादि संस्कारांनीं युक्त अशा आमच्या ठिकाणीं मात्र ती नाहीं ! ( ४२, ४३ )

### ४०४

( गोपींनां उद्देशून भगवंताचें भाषण ) १०–३२–१७.

**मिथो भजन्ति ये सख्यः स्वार्थैकान्तोद्यमा हि ते ॥**
**न तत्र सौहृदं धर्मः स्वार्थार्थं तद्धि नान्यथा ॥ १७ ॥**

श्रीकृष्ण म्हणतात,–" गोपींनो, जे लोक परस्परांच्या उपकारांचें ओझें उतरण्याकरितांच एकमेकांवर उपकार करीत असतात, ते केवळ स्वार्थसाधूच होत. कारण त्यांचीं सर्व कृत्यें स्वार्थमूलकच असल्यामुळें त्यांपासून त्यांस खरें सुख किंवा धर्म यांची मुळींच प्राप्ति होत नाहीं ( १७ ) ( तात्पर्य ज्यांत स्वार्थ आहे तो उपकारच नव्हे. )

श्रीकृष्णाच्या बाललीलेंत गोवर्धनोद्धाराचा प्रसंग विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. या प्रसंगीं गतानुगतिक अंधश्रद्धेवर विश्वास न ठेवण्याविषयीं श्रीकृष्णानें नंदास उपदेश केला असून इंद्राच्या पूजेच्या ऐवजीं ज्यापासून आपली सर्व उपजीविका होते अशा पर्वताची पूजा करण्यास नंदास प्रवृत्त केलें आहे. व अंधश्रद्धेचा निषेध केला आहे.

एकोणपन्नास अध्यायानंतर उत्तरार्धाला सुरुवात झाली आहे. कंसाच्या वधाचें वर्तमान समजतांच त्याचा श्वशुर जरासंध यानें श्रीकृष्णाचा सूड उगविण्याकरितां मथुरेवर एकंदर १७ वेळ चढाव केला, परंतु तितक्याहि वेळां त्यास अपयश घेऊन परत फिरावें लागलें शेवटीं जरासंधानें भारतभूबाहेरील एका यवनाधिपतीचें साह्य घेऊन दोघांनीं एकाच

वेळीं चाल केली. हा प्रसंग पहातांच कृष्णानें आपली राजधानी मथुरेंतून उचलली आणि दूर समुद्रामध्यें द्वारका नगरीं स्थापून तेथें राजधानीची स्थापना केली, व आपण एकटाच दक्षिणेकडे पळत सुटला. तेव्हां कालयवन त्याच्या मागें लागला. त्याला चकवीत श्रीकृष्ण एका गुहेंत शिरला. त्याच्यामागोमाग कालयवनहि गुहेंत शिरला आणि तेथें निजलेल्या मुचुकुंदास कृष्ण समजून त्यानें लत्ताप्रहर केला. त्याबरोबर मुचुकुंदाच्या नेत्रावाटे अग्नि उत्पन्न होऊन कालयवनाचा नाश झाला. असा हा कथाभाग आहे. या कथानुसंधानांत प्रबल शत्रू आला असतां पडती बाजू घेऊन शत्रू बरोबर डावपेंच कसे करावे याचा बोध चांगलाच होतो.

यानंतर रुक्मिणी, जांबवती, सत्यभामा, कालिंदी, मित्रविन्दा, सत्या, भद्रा, लक्ष्मणा अशा आठ स्त्रियांबरोबर श्रीकृष्णाचा विवाह झाल्याचें वर्णन दिलें आहे. ह्या प्रत्येक विवाहाच्या प्रसंगीं श्रीकृष्णाचा पराक्रम, चातुर्य, प्रसंगावधान इत्यादि गुणांचें चित्र मानवी जीवास लक्षांत घेण्यासारखें आहे. या आठ विवाहानंतर भौमासुराच्या बंदींत पडलेल्या सोळा हजार राजकन्यांची मुक्तता करून त्यांजबरोबर विवाह केल्याचा वृत्तांत आहे.

त्यानंतरच्या कथेंत पारिजातकाचें हरण, अनिरुद्ध व उषा यांचा विवाहप्रसंग, सांब व लक्ष्मणा यांचा विवाहप्रसंग. असे पुत्रपौत्रादिकांचे विवाहप्रसंगाचें वर्णन आलें आहे. सांबलक्ष्मणेच्या विवाहांत मानापमानाचा मोठा प्रश्न होता, यादव क्षत्रिय नाहींत म्हणून आपली कन्या सांबास द्यावयाची नाहीं, असा दुर्योधनाचा हट्ट होता, परंतु क्षत्रियत्व हें नुसतें बडबडण्यांत अथवा संपत्तीच्या ऐश्वर्यांत नसतें, तर मनुष्याच्या पराक्रमांत असतें असें बलरामानें दाखवितांच दुर्योधन त्यास शरण गेला आणि त्यानें यादवांचें श्रेष्ठत्व कबूल करून आपल्या कन्येचें सांबास सालंकृत कन्यादान केलें. यानंतरच्या कथेंत श्रीकृष्ण सर्वमय आहे याची प्रतीति दाखवून नारदाचा संशय कृष्णानें दूर केल्याचा प्रसंग मोठ्या बहारीचा आहे. यांत भेदभावाचें निरसन व भगवंताचें व्यापकत्व दाखविलें आहे.

चौसष्टाव्या अध्यायांत नृगराजाची कथा आली आहे. हा नृग राजा सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजाचा मुलगा मोठा दानशूर होता. त्यानें कोट्यावधि गायींचीं दानें केलीं होतीं. पण त्यांत चुकून एका गाईचें दोनदां दान झाल्यानें त्यास सरड्याच्या जन्मास जावें लागलें होतें. वगैरे कथाभाग असून त्याचा उद्धार श्रीकृष्णाच्या हातून झाला आहे.

या कथेंत मनुष्याच्या हातून झालेलें किंवा होणारें कर्म थोडें आहे कां पुष्कळ आहे, लहान आहे कां मोठें आहे, हें कोणी पहात नसून झालेलें कर्म सदोष आहे का निर्दोष आहे, हेंच पाहिलें जातें, म्हणून करावयाचें कर्म पुष्कळ करण्याकडे ओढा ठेवण्यापेक्षां तें कर्म निर्दोष करण्याकडे लक्ष ठेवणेंच हितकर होय, असें ध्वनित केलें आहे. याच कथेंत ब्राह्मणांच्या दुराग्रही स्वभावाचें वर्णन भागवतकारांनीं मोठें मजेदार केलें आहे. तें दुराग्रही वृत्तीच्या ब्राह्मणांनीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

बहात्तराव्या अध्यायांत जरासंधाची कथा सांगितली आहे. या कथेंत व्यवहारी पुरुषांनीं जरूरीच्या प्रसंगीं मानापमानाचा प्रश्न बाजूस ठेवून आपला कार्यभाग कसा करून घ्यावा, याचें चित्र नमुनेदार दाखविलें आहे. रणयुद्धांत जरासंध हार जाण्यासारखा नसल्यामुळें अर्जुन व भीम यांसह कृष्ण ब्राह्मणवेष घेऊन जरासंधाकडे गेले, आणि त्यांनीं त्याजवळ मल्लयुध्दाची याचना केली. हे ब्राह्मण नसून क्षत्रिय आहेत असें जरी जरासंधानें ओळखलें, तथापि उदार अंतःकरणानें त्यानें त्यांस इच्छित दान देण्याचें वचन दिलें. या प्रसंगीं भीम व जरासंध यांचें मल्लयुद्ध सत्तावीस दिवस चाललें होतें. शेवटीं कृष्णानें भीमास युक्ति सुचविली आणि युक्तीप्रमाणें उपयोग करतांच जरासंधाचा नाश झाला.

चौऱ्याहत्तराव्या अध्यायांत युधिष्ठिराच्या राजसूययज्ञाचें वर्णन असून त्यांत श्रीकृष्णास मिळालेला अग्रपूजेचा मान आणि शिशुपालाचा वध ह्या दोन गोष्टी प्रामुख्यानें वर्णन केलेल्या आहेत. या सभेंत मोठमोठे विद्वान् ब्राह्मण व ऋषि असतांहि कृष्णास अग्रपूजेचा मान देऊन जातीच्या श्रेष्ठत्वापेक्षां कर्तृत्वाची श्रेष्ठता दाखविली आहे. असो, यानंतर शाल्वयुद्धाचें वर्णन व शाल्वाचा वध हा कथाभाग आहे. आणि त्यानंतर कृष्णाचा गुरुबंधु सुदामा याच्या भेटीच्या प्रसंगाचा कथाभाग भागवतकारांनीं वर्णन केला आहे. त्यांत श्रीकृष्णाचें बंधुप्रेम व भक्तवात्सल्य फारच प्रेमपूर्ण दाखविलें आहे. या कथेंत निष्कपटभक्ति करणारावर परमेश्वर ऐश्वर्याची वृष्टि कशी अचानक करतो हें दाखविलें आहे. यानंतर सर्व यादवांसह श्रीकृष्णाचें स्यमंतपंचकीं गमन, तेथें सर्वांच्या भेटी, देवकीला मृतपुत्रांचें दर्शन, ब्राह्मणास मृतपुत्रांची प्राप्ती, इत्यादि कथांचें वर्णन दिलें आहे. एकोणनव्वदाव्या अध्यायांत ब्रह्मा, शंकर व महेश या तीन देवांत सत्वगुणानें श्रेष्ठ कोण, याची परीक्षा भृगुऋषीकडून घेतल्याचें वर्णन आहे. ह्या परीक्षेंत सर्व देवांपेक्षां सत्त्वगुणांत विष्णु श्रेष्ठ असें ठरविलें आहे. असो, अशाप्रकारें विविधरसांनीं ओथंबलेला हा दशमस्कंध येथें पूर्ण झाला आहे.

---

# एकादश स्कंध.

या स्कंधाचे ३१ अध्याय असून श्लोकसंख्या १३६७ आहे. हा सर्व स्कंध अध्यात्मपर असून त्यांत नारदाचे द्वारें वसुदेवाला आणि श्रीकृष्णाचे द्वारें उद्धवाला तात्त्विक, नैतिक, व्यावहारिक व आध्यात्मिक असा उपदेश करविला असून शेवटीं भूभारहरण आणि श्रीकृष्णाचें निजधामीं प्रयाण याचें रसभरीत वर्णन केलें आहे. श्रीमद्भागवतांत हा स्कंध अत्यंत महत्त्वाचा आहे. श्रीएकनाथस्वामींनीं ह्या एका स्कंधावर विस्तृत प्राकृत ओवीबद्ध टीका लिहिली असून ती आज सर्वमान्य अशी आहे. जिज्ञासु वाचकांनीं हा स्कंध मूळांतून वाचणें विशेष महत्त्वाचें आहे. तथापि या स्कंधांतील स्वारस्य म्हणून कांहीं महत्त्वाचे प्रसंग या खालीं देत आहोतः—

या स्कंधांत अध्याय ( २ ) पासून अध्यायें ( ५ ) पर्यंत नारदऋषीनें वसुदेवास भागवतधर्माचें रहस्य निमि व नवयोगेश्वर यांच्यांत झालेल्या संवादरूपानें कथन केलें आहे. त्यांतील प्राकृत रहस्य याखालीं थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहेः—

## ऋषभपुत्रांचा जनकास उपदेश.

( अध्याय दुसरा )

(१) कवि म्हणालेः— राजा ! हा सर्व संसार असत् होय असें समजून ज्यानें विषय-विरक्त होऊन अच्युताच्या चरणकमलाची ह्या लोकीं उपासना केली, त्याला मृत्युलोकींच्या भीतिचें कांहींच कारण उरत नाहीं. सर्व प्रकारच्या भीतीपासून मुक्त होण्याचें उत्कृष्ट साधन म्हणजे परमेश्वराची अखंड भक्ति होय ( ३३ )

(२) अज्ञानी जीवांना सुलभतेनें मुक्त होतां यावें व आत्मस्वरूपाची प्राप्ति व्हावी, म्हणून भगवंतानें जे उपाय सांगितले आहेत, तेच भागवतधर्म होत ( ३४ )

(३) राजा ! या उपायांचा अवलंब भक्तिपूर्वक करणारा जीव केव्हांहि मार्गभ्रष्ट होण्याची भीति नसते. तो धांवत असला तरी तो ठेंचाळेल किंवा पडेल, अशी मुळींच भीति बाळगावयास नको ( ३५ )

(४) राजा ! जी जीं कर्मे शरीर, वाणी, मन, इंद्रियें, बुद्धि व अहंकार यांच्या द्वारा जीव जाणूनबुजून करतो, किंवा प्रारब्धयोगानें जीं कर्मे त्याच्या हातून होतात, तीं सर्व कर्मे ( व त्यांची फळें ) परमेश्वर जो नारायण त्याला अर्पण करावी, हा परम भागवतधर्म होय ( ३६ )

( ५ ) परमेश्वराला जो विमुख होतो, त्याला परमेश्वराच्या मायास्वरूपाचें विस्मरण पडतें व त्याच्या मनांत भलतेच ग्रह उत्पन्न होतो. अर्थात् तो अनात्म्याच्या भीतीनें ग्रस्त होतो. ही भीति व तिची उत्पादक माया, यांचा नाश करण्यासाठीं शहाण्या मनुष्यानें गुरु हाच आपला देव, असें मानून तत्प्रणीत भगवद्भक्ति एकनिष्ठेनें करावी (३७)

( ६ ) राजा ! हें विश्वप्रभृति द्वैत वस्तुतः नसून भासित होतें, याचें कारण जीवांचें मन होय. स्वप्नांतील विषय किंवा मनोराज्यांतील विषय जसें आपलें मन कल्पितें तद्वतच हे ऐंद्रिय विषय मनःकल्पित होत; म्हणून कर्मांचे संकल्प-विकल्प करणारें मन ज्ञानी पुरुषानें आपल्या स्वाधीन ठेवावें. त्याला भटकूं देऊं नये. असें मन आवरलें म्हणजे जीवाला अभय प्राप्त झालेंच पाहिजे ( ३८ )

( ७ ) सुदर्शनचक्र हातांत धरणाऱ्या चक्रपाणीचीं सुमंगल कर्में व त्याचे कल्याणकारी अवतार जे झाले त्या लीलांच्या व अवतारांच्या गोड कथा मुमुक्षूनें ऐकाव्या. परमेश्वराचीं जीं सार्थ नामें भक्त गातात, तीं नामें आपण लाजलज्जा गुंडाळून ठेवून गावीं आणि या प्रकारें वैराग्यपूर्ण निःसंगवृत्तीनें जगांत वागावें ( ३९ )

( ८ ) आपल्याला अत्यंत प्रिय असणाऱ्या परमेश्वराची चरित्रें गाण्याऐकण्यामध्येंच ज्यानें आपलें भक्तिपूर्वक कर्म परमेश्वरार्पण केलें, त्या एकनिष्ठ भक्ताच्या हृदयांतील प्रेमांकुर पराकाष्ठेचा जोरावतो, त्याचें मन आर्द्र होतें. अर्थात परमेश्वरलीला आठविली म्हणजे तो मोठमोठ्यांदा रडतो काय, खदखद हंसतो काय, ओरडतो काय, गातो नाचतो काय ! हें सर्व त्याचें विलक्षण कार्य असतें. तो जगांतील संसारांत नसतोच मुळीं ! ( ४० )

( ९ ) काय सांगावें ? आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी, सूर्यचंद्रादि तेजोगोल दशदिशा, वृक्षपाषाणादि, नद्या, समुद्र, फार काय, हें सर्व दृश्य विश्व हरीचें शरीर होय अशी भावना करून तो या सर्वांस अनन्यभावानें प्रणाम करतो (४१ )

( १० ) प्रत्येक घास घेऊन तो गिळांत असतां जसें जेवणाराला तोषण, पोषण आणि क्षुधाशोषण, हीं प्रतिक्षणीं होतात, त्याप्रमाणेंच प्रत्येक भक्ताला परमेश्वराचे आराधन करतानां भक्तिसुखाचा, परमेश्वरसाक्षात्काराचा आणि विषयवैराग्याचा, तात्पर्य या तीन गोष्टींचा एककालींच अनुभव येतो ( ४२ )

( ११ ) अशा प्रकारच्या एकनिष्ठ सेवापरंपरेनें परमेश्वराच्या चरणाची उपासना करणाऱ्या भक्ताला, पराभक्ति, विषयवैराग्य आणि भगवत्साक्षात्कार प्राप्त होतात. राजा ! नंतर त्या भागवताला अखंड शांति मिळते; आणि तो कृतार्थ ह्मणजे मुक्त होतो ॥४३॥

## भागवत कोणाला म्हणावें.

( १ ) हरि मुनि म्हणाले, यच्चयावत् भूतांमध्यें परमेश्वररूप आपलाच आत्मा आहे, असें जो पाहतो व आपल्या हरिस्वरूपी आत्म्यामध्यें सर्व भूतें आहेत असे जो पाहतो, तोच खरा भगवद्भक्त, तोच खरा भागवतोत्तम होय ( ४५ )

( २ ) परमेश्वरावर प्रेम, तद्भक्तांशीं मैत्री, बालिशांवर कृपा करणारा व शत्रूंची उपेक्षा करणारा जो भक्त तो मध्यमकोटीचा होय ॥ ४६ ॥

( ३ ) आणि पूजेच्या मूर्तीत मात्र हरि आहे, असें समजून जो तिची श्रद्धेनें पूजा करतो, पण हरिभक्तांत व इतर लोकांत हरीचें वास्तव्य नाहीं, असें समजून जो त्यांच्यावर प्रेम करीत नाहीं, तो प्राकृत ( कनिष्ठ प्रतीचा ) भक्त समजावा ( ४७ )

( ४ ) हें विश्व ह्मणजे परमेश्वरी माया आहे असें ज्ञान झाल्यामुळें त्याचीं इंद्रियें विषयांचें ग्रहण करीत असतांहि त्याला त्या विषयसेवनापासून हर्षविषाद होत नाहीं हाच खरा उत्तम भागवत होय ( ४८ )

( ५ ) देह, इंद्रियें, प्राण, मन व बुद्धि यांचे विशिष्ट धर्म जे जन्म-मृत्यू, क्षुधा-तृषा भय, भोगेच्छा व कर्म, ते संसारांत प्रतिक्षणीं उत्पन्न होत असतांहि ज्या हरिभक्ताच्या हरिस्मरणामुळें ते धर्म बाधक होत नाहींत, तो प्रधान ( उत्तम ) भागवत होय ( ४९ )

( ६ ) वासुदेव हेंच ज्याच्या निष्ठेचें निर्भय स्थान असल्यामुळें ज्या भक्तांच्या अंतःकरणांत वासनेचा व कर्माचा अंकुर फुटण्याचा संभवच नसते., तो भागवतोत्तम होय(५०)

( ७ ) आपला जन्म, आपलें कर्म, आपला वर्ण, आपला आश्रम किंवा आपली जाति यांमुळें ज्याची देहाचे ठिकाणीं अहंबुद्धि ( देहच मी अशी बुद्धि ) उत्पन्नच होत नाहीं, तात्पर्य जो देहासक्त होत नाहीं, तोच भक्त हरीला प्रिय होतो ( ५१ )

( ८ ) ही गृहादि संपत्ति माझी, ही दुसऱ्याची, हा देह माझा, तो दुसऱ्याचा, अशी भेदबुद्धि मावळून जो सर्वांशीं समत्वबुद्धीनें वागतो, व जो सर्वदा शांत असतो, तो खरा भागवतोत्तम होय ( ५२ )

( ९ ) त्रिभुवनाचें राज्य मिळत असलें तरी तिकडे लक्ष न जातां ज्याचें प्रभुस्मरण अखंड असतें आणि प्रत्यक्ष भोगलोलुप इंद्रादि ऐश्वर्यवंतांसहि जें भगवत्पदकमल शोधण्याचे श्रम करावे लागतात, त्या भगवंताच्या चरणारविंदापासून जो एक क्षणार्धहि दूर होत नाहीं, तो पहिल्या प्रतीचा विष्णुभक्त होय ( ५३ )

## जीवाच्या तरणोपायाचा मार्ग

( अध्याय तिसरा )

( १ ) प्रबुद्ध म्हणालाः—राजा, दुःखाचा नाश व्हावा व सुख प्राप्त व्हावें म्हणून संसारी लोक कर्म करतात, पण त्या कर्माचें फल मात्र सुखनाश आणि दुःखोत्पत्ति करणारें होतें. ( १८ )

( २ ) नित्य दुःख देणारी, दुर्लभ आणि जीवाला मृत्यु आणणारी ही संपत्ति किंवा अनित्य असणारीं गृह, दारा, सुत, आप्त, पशु हीं प्राप्त झालीं तरी तीं सर्व अनित्यच असणार. म्हणून संपत्ति अथवा देहगेहादि यांपासून खरें सुख होत नाहीं. ( १९

( ३ ) आपलें परमकल्याण व्हावें अशी सोय जाणण्याची इच्छा करणाऱ्यानें वेदांतज्ञ, साक्षात्कारी आणि शांतीचें निधान असणाऱ्या सद्गुरूला शरण जावें ( २१ )

( ४ ) सद्गुरु हाच आपला आत्मा व आपलें इष्ट दैवत, असें एकनिष्ठेनें मानणाऱ्या शिष्यानें भागवतधर्माचें श्रवण करून ते अंतःकरणपूर्वक अभ्यासून आचरावें. अशी सेवा मुमुक्षूनें भक्तिपूर्वक केली असतां आत्मस्वरूपाचा दाता श्रीहरि प्रसन्न होतो ( २२ )

( ५ ) भागवतधर्माचें अनुष्ठान करणाऱ्यानें विषयवैराग्य, संतसमागम आणि अनाथावर दया, बरोबरीच्यांशीं मैत्री आणि श्रेष्ठ पुरुषांसंबंधें पूज्यबुद्धि यांचा स्वीकार अवश्य केला पाहिजे ( २३ )

( ६ ) शौच, तप, सहनशीलता; मितभाषण, स्वाध्याय, सरळपणा, ब्रह्मचर्य, अहिंसा, सुखदुःखें याविषयीं नेहमीं समबुद्धि ठेविली पाहिजे ( २४ )

( ७ ) सर्व ठिकाणीं आपण व ईश्वर ओतप्रोत भरलेले पाहणें, एकांतसेवन, गेहादिकांविषयीं अनासक्ति, कौपीनधारण, व मिळेल त्यांत संतोष मानला पाहिजे ( २५ );

## वेदविहित कर्मे म्हणजे काय ?

( १ ) आविर्होत्र म्हणालेः–विहित, निषिद्ध आणि विकर्म ( विहित न करणें ) हें कर्मांचें वर्गीकरण श्रुतीनें केलें आहे कर्मांचें वर्गीकरण करणें हा मनुष्यांचा भाग नव्हे. वेदानें तरी हें कार्य केलें तें केवळ ते वेद म्हणजे ईश्वरात्मकच होत म्हणून होय. मोठमोठ्या विद्वान् देवांसहि हें कर्माकर्मांचें कोडें सुटत नाहीं. अर्थात् जें पंडितांला अगम्य तें तुला बाळपणीं समजलेंच नसतें म्हणून ब्रह्मपुत्र त्या वेळीं स्तब्ध राहिले. (४३)

( २ ) वेद परोक्षवादी आहे, मुलांस ' औषध घेतलें तर खाऊ मिळेल, शिकलें तर बक्षीस मिळेल ' असें सांगतात, ' बरा होशील ' ' पंडित होशील ' असें सांगत नाहींत हा परोक्षवाद होय. कर्मचक्रांतून सुटण्यासाठीं वेद, कर्म करावयास लागतो; परंतु सांगतो मात्र कीं 'कर्म केल्यास सुख मिळेल !' सुखाचें आमिष हा परोक्षवाद होय.(४४)

( ३ ) वेदविहित कर्म करून तें ईश्वरार्पण करितो, व स्वतः जो अनासक्त असतो, त्याला नैष्कर्म्याची सिद्धि प्राप्त होते. वेदोक्त कर्म केलें तर स्वर्गादि मिळतात, इत्यादि श्रुतिवाक्यें केवळ रोचक व कर्मप्रेरक मात्र होत. ( ४६ )

( ४ ) ज्यास लवकर अंतःकरणांतील अहंकारग्रंथि तोडावयाची आहे, त्यांनीं परमेश्वराची तंत्रविधिपूर्वक उपासना करावी. वेदमंत्र व आगमोक्त तंत्र या मंत्रतंत्रांचा विनियोग केवळ केशवपूजेंत करावा. ( ४७ )

( ५ ) शुचिर्भूत होऊन त्यानें प्राणायामपूर्वक देवमूर्तिसन्मुख बसावें. शुद्धीसाठीं देह प्रोक्षून शास्त्रोक्त न्यास करावे आणि मग हरिपूजेस आरंभ करावा (४९)

( ६ ) गंधाक्षत-फल-पुष्पादि जीं उपचारद्रव्यें यथाकाल मिळालीं असतील तीं व भूमि, आसन, स्वदेह आणि पूजामूर्ति हीं निर्मळ करून मग हरिमूर्तीची व स्वहृदयांतील हरीची यथासांग पूजा करावी (५०)

( ७ ) पाद्य, अर्घ्य, इत्यादि पूजापात्रें सान्निध ठेवून निर्विकार होत्साता न्यास केलेल्या पूजकानें मूलमंत्रांचा उच्चार करून पूजा करावी ( ५१ )

( ८ ) हरीची मूर्ति पूजित असतां आपण हरिमय आहोंत असें अखंड ध्यान असावें; पूजा झाल्यानंतर निर्माल्य मस्तकीं धारण करून देवाला स्वहृदयांत सांठवावें व मूर्तीला आदरपूर्वक डब्यांत ठेवावें ( ५४ )

## भगवंताचा उद्धवास उपदेश

( अध्याय सातवा )

( १ ) इंद्रियांनीं व मनानें तूं ग्रहण करतोस, तें तें विश्वगत सर्व विषयात्मक म्हणजे जड असल्याकारणानें मनोत्पादित आहे, मायामय आहे, नश्वर आहे, असें जाण. येथील वैषम्य मनोनिर्मित आहे, सांसारिक आहे. तूं समदृष्टि झालास म्हणजे ही मनोमय माया नाहींशी होईल ( ७ )

( २ ) उद्धवा ! आत्म्याचे ठिकाणीं ज्या पुरुषानें आपलें मन युक्त केलें नाहीं त्यालाच अनेकत्वाचा भ्रम होतो. विहित कर्म कोणतें, अकर्म म्हणजे विहिताकरण कोणतें आणि विकर्म म्हणजे निषिद्धाचरण कोणतें, असा गुणदोषदृष्टि होऊन, हें चांगलें, हें वाईट, अशी भेदबुद्धि तो धारण करतो ( ८ )

( ३ ) म्हणून उद्धवा ! इंद्रियांस व चित्तास माझ्या ठिकाणीं युक्त कर. म्हणजे हें सर्व विस्तीर्ण ब्रह्मांड तुझ्या जीवात्म्यामध्यें आहे व तुझा आत्मा माझ्यामध्यें आहे, असें अद्वितीय एकत्वाचें सम्यक्ज्ञान तुला होईल ( ९ )

( ४ ) जो प्राणी जीवन्मुक्त आहे. तो गुणदोषांच्या फार पलीकडे गेला असल्यामुळें त्याला विधि किंवा निषेध नसतात. लहान बालकाला तरी विधिनिषेधांची बाधा असते काय ? नाहीं. त्याला दोषाची भीति नसते व गुणाची मातब्बरी नसते. ' निषिद्ध आहे ' म्हणूनच योगी चोरी करीत नाहीं असें नाहीं, किंवा विहित आहे म्हणूनच तो दया करतो असेंहि नाहीं ( ११ )

( ५ ) उद्धवा ! जीवन्मुक्त जगताचा मित्र, शांतीचा सागर, ज्ञानविज्ञानांत निपूण म्हणून निःसंदेह असतो. ' हें सर्व ब्रह्मांड एकरस ब्रह्मच आहे ' हें ज्ञानविज्ञान त्याला असतें म्हणून त्याला जन्ममरणाचा प्रसंग केव्हांहि येत नाहीं ( १२ )

( ६ ) श्रीभगवान् म्हणाले; उद्धवा ! आपण कोण, हें विश्व काय, धरावें काय, टाकावें काय, आपला परम पुरुषार्थ कोणता, इत्यादि प्रश्नांचा उलगडा करण्यामध्यें प्रवीण असलेले लोक बहुधा विषयवासनांचा त्याग करून स्वतःच स्वोद्धार करण्याला बुद्धिद्वारें समर्थ असतात ( १९ )

( ७ ) सर्व जीवास, पण विशेषतः मनुष्यांस उत्कृष्ट गुरु म्हणजे स्वतःचा आत्माच होय. प्रत्यक्ष आणि अनुमान या प्रमाणांनीं विचिकित्सा करणाऱ्या विवेकी मनुष्याला मोक्षमार्ग ठरावेतां येतो ( २० )

( ८ ) मनुष्ययोनींत जन्मून पुरुषार्थसिद्धीचा संकल्प करणारे सांख्य पंडित प्रत्यक्षच पाहातात कीं, सर्वशक्तिसंपन्न मी परमेश्वर सर्व विश्वरूप व्यापून उरलों आहें या विश्वांत एक, दोन, तीन, चार पाय असणाऱ्या, अनेक पाय असणाऱ्या मुळींच पाय नसणाऱ्या अनेक योनि आहेत. त्यांत मनुष्ययोनि मला अत्यंत प्रिय आहे. कारण या योनींतच जीवाला स्वोद्धार करून मत्स्वरूप होतां येतें ( २१, २२ )

( ९ ) या मानव योनींत रहाणारे स्थिर मनाचे एकनिष्ठ विद्वान् पुरुष अनुमानप्रमाणाच्या साह्यानें ईश्वराचें म्हणजे माझें म्हणजे आत्म्याचें स्वरूप निश्चित करूं शकतात. गुण व लिंग ( चिन्ह ) हीं अनुमान प्रमाण ठरविणारीं जीं साधनें त्या साधनांच्या द्वारें मला शोधून काढण्याचा प्रयत्न करतात ( २३ )

## अवधूताचा यदूला उपदेश.

( १ ) मायेच्या अथवा निसर्गाच्या नियमानुसार वागणाऱ्या पंचमहाभूतांनीं सतावून सोडलें तरी क्षमावृत्ति धारण करून आपला ठरलेला मार्ग योगी सोडीत नाहीं. स्वमार्ग न सोडणें हा नियम मी पृथ्वीपासून शिकलों. भूतांचें वर्तन बुद्धिपुरःसर नसून तीं माया नेईल तिकडे जातात हें ज्याला समजतें, तोहि पृथ्वीप्रमाणेंच आपला ठरलेला मार्ग सोडीत नाहीं ( ३७ )

( २ ) आणखी, पृथ्वीचाच भाग असणारे पर्वत व वृक्ष हे सर्वदा परकार्यासाठीं जगतात व कर्म करतात हें पाहून मी परोपकारी व क्षमाशील पृथ्वीला गुरु केलें (३८)

( ३ ) वायु दोन प्रकारचा; एक प्राणवायु आणि दुसरा बाहेर वावरणारा वायु- प्राणाचें संरक्षण मात्र होईल इतकेच आहारविहारादि उपभोग प्राण स्वीकारतो. इंद्रियांची आवडनिवड तो बघत नाहीं. इंद्रियांची, मनाची आवड बघितली, त्यांच्या आवडी- प्रमाणें आहारादि सेवन केलें असतां ज्ञाननाश व मनोविक्षेप होतो. म्हणून प्राण इंद्रि- यांची प्रियाप्रियता बघत नाहीं. प्राणरक्षक आहार मात्र प्राणवायु घेतो. तसेंच मीहि करतों. बाह्यवायूपासून मी शिकलों कीं नाना धर्म असणाऱ्या विषयांमध्यें शिरूनहि विषयांच्या गुणदोषांनीं वायु जसा लिप्त होत नाहीं, तसेंच आपण देहामध्यें राहूनही देहगुणांपासून अलिप्त राहावें. वायु पुष्पगंधाला आश्रय देतो स्वतः लिप्त होत नाहीं. हा निर्लेपपणाचा गुण वायूपासून आत्मवेत्ता घेतो व विश्रांत संचार करतो ( ३९,४०,४१ )

( ४ ) सर्व चराचराचे आंत व बाहेर व्यापून असणारें अनंत नभ म्हणजे आकाश असंग असतें. याचप्रमाणें सर्वांतर्यामी असून सर्व विश्व व्यापणारा परमात्मा आपणच आहों अशी समन्वयानें ब्रह्मात्मैक्यभावना करून नभाप्रमाणें निःसंग राहावयास मी शिकलों. उदाहरणार्थ, वायूनें प्रेरिलेले मेघ आकाशाला स्पर्श करीत नाहींत, त्याप्रमाणें कालोदरांत उत्पन्न झालेले तेज-जल पृथ्वीमय पदार्थ ज्ञानी पुरुषाला-आत्म्याला स्पर्श करूं शकत नाहींत. तात्पर्य, आत्मा असंग आहे हें मी आकाशापासून शिकलों ( ४२,४३ ) जल हें स्वरूपतः स्वच्छ, अकठोर, मधुर आणि तीर्थ म्हणून शुद्ध करणारें आहे. मुनीनें निर्मळ, दयाशाक्ति, मधुर आणि पवित्र असावें, हें मीं जलापासून शिकलों (४४)

( ५ ) अग्नि हा तेजस्वी, शीतनिवारक, अजित, उदरच ज्याचें भक्षणपात्र असतें असा तो अग्नि वाटेल तें खातो, तरी निर्मळ असतो. तो केव्हां गुप्त व केव्हां प्रकट असतो. कल्याणेच्छु त्याची उपासना करतात. आपले भक्त जें काय देतील तें भक्षून तो भक्तांचीं पातकें जाळून भस्म करतो. भक्त जें अर्पण करतील तत्स्वरूप अग्नि होतो. ज्ञानी मुमुक्षूनें हें अग्निव्रत धारण करावें. म्हणजे तेजस्विता, परपीडानिवारकता, निमूढता परिग्रहशून्यता, निर्मलता, लोकसंग्राहकता, पावकता, सर्वांतर्यामिता हे गुण जीवन्मुक्ताचे ठिकाणीं असतात. मुमुक्षूनें हे गुण अग्नीपासून घ्यावे. मी घेतले आहेत ( ४५,४६,४७ )

( ६ ) चंद्रकला वाढतात, कमी होतात. ही वृद्धिक्षयाची अवस्था कलांची आहे, चंद्राची नव्हे. जन्म, अस्तित्व, वृद्धि, तारुण्य वार्धक्य, मरण हे सहा विकार देहाचे आहेत, आत्म्याचे नव्हेत. हें चंद्र स्वतःच्या उदाहरणानें मला शिकवीता झाला ( ४८ )

(७) अग्नीच्या ज्वाळांचा किंवा दीपशिखेचा क्षणोक्षणीं उत्पत्तिविनाश होत असतांहि रूपांतरें दिसत नाहींत, ज्वाळा नित्य वाटतात; त्याप्रमाणें पंचमहाभूतांचा व तद्रचित जगाचा क्षणोक्षणीं उत्पत्तिविनाश नित्य होत असतांहि तो दिसत नाहीं. तात्पर्य, काळाच्या ओघांत इकडे तिकडे भटकणारें हें सर्व विश्व क्षणभंगुर असतांहि नित्य वाटतें. हा भ्रम आहे, हें मी अग्नीपासून शिकलों ( ४९ )

( ८ ) गो म्हणजे किरण त्यांचा पति ( गोपति ) तो सूर्य. हा सूर्य किरणांनी आणलेल्या 'गां' चा म्हणजे जलांचा स्वीकार यथाकालीं करून त्यांस योग्य वेळीं टाकून देतो; जलांनीं संपृक्त होत नाहीं. योगी मुमुक्षूनें असेंच करावें. इंद्रियांस भोग मिळाले म्हणून आनंदूं नये व गेले म्हणून खिन्न होऊं नये ( ५० )

( ९ ) आणखी, सूर्यावर ढग येऊन त्यांत तो प्रतिबिंबित झाला असतां निरनिराळ्या आकारांचा दिसतो. सूर्य अनेक आकारांचा आहे, ते आकार नित्य आहेत, असें मंदमतींना वाटतें. पण स्वरूपतः सूर्य एकच असतो. उपाधींमुळें निरानिराळा वाटतो, उपाधींचे गुण त्यांत आहेत असें दिसतें, हा भ्रम होय. तात्पर्य, सूर्य जसा निर्विकार, असंग आहे, तसा आत्मा आहे, हेंच मुमुक्षूनें शिकावें. मी हें शिकलों ( ५१ ) कोणावर अतिस्नेह करूं नये फाजील प्रेम करणारे मंदमति कपोताप्रमाणें संतापास प्राप्त होतात ( ५२ )

( अध्याय आठवा. )

( १० ) राजा ! स्वर्गामध्यें काय किंवा नरकलोकीं काय, कोणतेंहि इंद्रियजन्य सुखदुःखप्रदच असतें. शिवाय, दुःखाप्रमाणेंच सुखहि न बोलावतां येत असतें. म्हणून शाहण्य पुरुषानें इंद्रियजन्य सुखाची इच्छा करूं नये व तदर्थंच प्रयत्नहि करूं नये ( १ )

( ११ ) यदृच्छेनें हाताशीं आलेले भक्ष्य गोड असो वा नसो, थोडें असो, बहुत असे स्वस्थ पडलेला अजगर समाधानानें त्याचा स्वीकार करतो, नाहींच कांहीं मिळालें तर तो स्वस्थ पडून राहतो. उपाशीं असतो, पण अजगर स्वतः उठून कधीं भक्ष्य मिळवीत नाहीं. दैव देवो, दैव न देवो, अजगर स्वस्थ. भोगासंबंधानें ही निरलस असतो ही उदासीनता मी अजगरापासून शिकलों. ( २, ३ )

( १२ ) इंद्रियें सतेज असून, मनःशक्ति व शारीरिकशक्ति खंबीर असूनहि मुमुक्षु इंद्रियशांतीसाठीं कांहींएक न करतां अजगरासारखा स्वस्थ पडून राहतो, पण झोंप घेत नाहीं. असार हा मुनि आत्मध्यानांत निमग्न असतो ( ४ )

( १३ ) समुद्र सर्वदा प्रसन्न, गंभीर, इंद्रियांस अगोचर, दुस्तर, अनंत, अपार, निर्विकार व शांत असतो. नद्यांच्या पुरांनीं समुद्रांत कितीहि पाणी ओतलें म्हणून तो आपली

सीमा ओलांडित नाहीं. उन्हाळ्यांत नद्या शुष्क झाल्यामुळें समुद्रांत पाणी आलें नाहीं, तरी तो रोडावत नाहीं. राजा! नारायणभक्त असणारा मुनि समुद्राचे गुण घेऊन शांत, गंभीर, प्रसन्न, निर्विकार, मोहाला बळी न पडणारा, संपत्तीनें न फुगणारा, विपत्तीनें न खंगणारा असा असतो. सारांश, समुद्रानें मला हे गुण शिकविले ( ५, ६ )

( १४ ) दीप–प्रकाशाचें सौंदर्य पाहून पतंग दिव्यावर झडप घालतो व मरतो. स्त्रियांचे सौंदर्य व त्यांचे हावभाव पाहून लुब्ध होणारा कामवश कामुक भुलतो व फसतो. पतंगाचा नाश पाहून मी प्रमोहक स्त्रीसौंदर्य, त्यांचे अलंकार, हावभाव इत्यादि अवलोकनांचा त्याग केला. सुंदरतेला भुलूं नये, ही शिक्षा मी पतंगापासून घेतली ( ७, ८ )

( १५ ) मधुकर फुलांतील मधाचा एक एक (कण) थेंब मात्र घेतो. पण तो कोणत्याही फुलाला दुखवीत नाहीं. हा अल्पसंतुष्टपणाचा गुण मी मधुकरापासून घेतला. देह आहे तोंवर मी अल्पसंतुष्टच राहणार ( ९ ) त्याचप्रमाणें पुष्प लहान असो, मोठें असो, मधुकर त्यांतून सार तेवढें काढून घेतो. मुनीनिंहि असेंच करावें. शास्त्र लहान असो, मोठें असो, त्यांतून सार जें असेल तेवढेंच घ्यावें; फल्गूकडे दुर्लक्ष करावें ( १० )

( १६ ) भविष्यकाळासाठीं मधुमाक्षिका मधाचा संग्रह करते, पण अखेरीला फसते. कोणी तरी तिच्या संग्रहावर हल्ला करतो आणि तिला ठार करून तिचा संग्रह घेऊन जातो! मुनीनें दुसऱ्या दिवसासाठीं फार तर काय, पण संध्याकाळासाठीं सुद्धां कांहीं शिल्लक ठेवूं नये. त्याजवळ भांडें सुद्धां असूं नये. करतलभिक्षा ( तळहातावर राहील इतकीच भिक्षा ) त्यानें घ्यावी. कांहीं मुनि तर उदर ( पोट ) हेंच भांडें करतात. म्हणजे एका भुकेपुरती भिक्षा मागतात; तात्पर्य, संग्रह करीत नाहींत. मधमाशीच्या उदाहरणावरून मी संग्रह न करण्याचें व्रत घेतलें ( ११,१२ )

( १७ ) लांकडाच्या हत्तीणीला फसून वनहत्ती तिच्याशीं अंगसंग करतो आणि बंदींत सांपडतो. प्राज्ञ मुनीनें लांकडाची बाहुली सुद्धां हातांत घेऊं नये. किंवा पायानें स्पर्शूं नये. स्त्री म्हणजे प्रत्यक्ष मृत्यु होय. स्त्रीसंगति केली कीं, संगति करणाराला दुसरे कामुक ठारच करतात! गजाचें उदाहरण प्रत्यक्ष आहे. सारांश स्त्रीसंग घातकी, हें मी हत्तीपासून शिकलों ( १३,१४ )

( १८ ) कृपण कष्ट सोसून धनसंग्रह करतो. तो कोणाला कांहीं देत नाहीं; स्वतःहि उपभोग घेत नाहीं! पण परिणाम काय? दुसराच कोणी चोर अथवा राजा तें धन घेऊन जातो. मधाचीं पोळीं धुंडणारा भिल्ल, मधमाशांनीं न खातां व न देतां जमविलेलीं मधाचीं पोळीं लुटून नेतो हें मी पाहिलें; आणि आपल्यास मिळालें असेल, त्यांतील कांहीं भाग दुसऱ्या अनाथाला द्यावा असें ठरविलें. तसेंच कोणी गृहस्थ कष्टार्जित द्रव्य खर्चून मोठ्या आसोशीनें आवडीचा पाक सिद्ध करतात; पण अतिथि येतो आणि कल्याणेच्छु गृहपति तो पाक त्या आगंतुकाला अर्पितो. सारांश, कांहीं खटपट न करितां

अतिथीला अन्न मिळतें. जसा अतिथि तसाच मध हरण करणारा भिल्ल. एवंच दैवीं असेल तर श्रमावीण योगक्षेम चालतो, हा दुसरा धडा मला भिल्लानें शिकविला ( १५,१६ )

( १९ ) पारध्यांचें गीत ऐकून नादलुब्ध हरिण बंदींत पडतो. मृगीचा मुलगा ऋष्यशृंग ऋषि वेश्यांचीं मोहक गाणीं व सुस्वर वाद्यें ऐकून व त्यांचें हावभावयुक्त नृत्य पाहून त्यांचा बंदा गुलाम झाला. तात्पर्य, विकारोत्तेजक गाणें बजावणें वनांत राहणाऱ्या यतीनें केव्हांहि ऐकूं नये. हा धडा मी हरिणापासून शिकलों ( १७,१८ )

( २० ) आमिष लावलेला गळ आमिषाच्या आशेनें मासा पकडतो व गळांत सांपडून पुढें मरतो. राजा ! रसनेंद्रिय मोठें अनावर आहे. जिव्हालौल्याच्या स्वाधीन जीव झाला कीं मेलाच समज. रसनेशिवाय बाकीचीं सर्व इंद्रियें वश होतात, पण जीभ वश होणें कठिण. इतर इंद्रियांस त्यांचे विषय दिलेच नाहींत, तर तीं क्षीण होतात, पण जिभेचें सर्व उलट ! निराहार करणाऱ्याची जीभ फारच खवळते ! म्हणून रसना जावत्काल हातीं आली नाहीं तावत्काल जितेंद्रियत्व मिळत नाहीं. रसना जिंकिली कीं सर्व इंद्रियें वश होतात. रसना ताब्यांत ठेवली नाहीं तर मरण येतें, हे मी जळांतील माशापासून शिकलों ( १९,२१ )

( अध्याय नववा. )

( २१ ) साधनेच्छु पुरुषानें आपलें आसन स्थिर करून पूरकादि प्राणायामाच्या साह्यानें प्राणवायु स्वाधीन करून मन एकाग्र करावें आणि निरलसपणें योगाभ्यासाच्या सहाय्यानें आपलें मन लक्ष्यावर म्हणजे परमपदावर ठेवावें ( ११ ) नंतर त्या परमपदावर एकाग्र झालेलें हें मन हळू हळू कर्मरेणूंचा म्हणजे वासनाधूलीचा त्याग करण्यास समर्थ होतें. आणि असें झालें म्हणजे सत्त्वगुणाची वृद्धि होऊन रज व तम या गुणांचा लय होतो. आणि तें मन विषयशून्य होऊन उन्मनी अवस्थेला प्राप्त होतें ( १२ )

( २२ ) साप एकटा असतो. त्याला स्वतःचें घर नसतें तो नेहमीं गुप्त ठिकाणीं असतो. विषारी किंवा निर्विष हें आकृतीवरून दाखविणारा आणि मुळींच आवाज न करणारा साप मुंग्यांनीं केलेल्या वारुळांत स्वस्थ असतो. समाधान हवें असेल तर सापाप्रमाणें जगसंगाचा त्याग, निष्परिग्रहता, गुप्त वास, खोल मन, मौन इत्यादिकांचा स्वीकार मुनीनें करावा. हा देह क्षणभंगुर, म्हणून गृहादिक करूंच नये, ही गोष्ट सापानें मला शिकविली ( १४,१५ )

( २३ ) आपल्या नाभींतून लोंकरीच तंतु तोंडानें बाहेर काढून त्यांचें स्वतः जाळें विणणारा ऊर्णनाभि, त्या जाळ्यांत कांहीं वेळ असतो व तें जाळें आपण स्वतःच गिळून टाकतो. हें ऊर्णनाभीचें कृत्य पाहून मी अनुमान काढलें कीं, एकच एक परमेश्वर असला पाहिजे. त्या ऊर्णनाभीप्रमाणेंच तो परमेश्वर आपल्या स्वतःच्याच संकल्पानें स्वतः मधूनच त्रिगुणात्मक माया निर्माण करतो, तिचे सत्त्वादि गुणांचा क्षोभ करून स्वतःच्याच कालसामर्थ्यानें तो ईश्वर त्याचे द्वारा ( सूत्रात्मा म्हणजे क्रियाशक्तिमान् ) महत्तत्त्व निर्माण

करतो, म्हणजे होतो; आणि महत्तत्त्वाच्या गुणव्यापारांनीं हें ब्रह्मांड निर्माण होतें; आणि या ब्रह्मांडांत पूर्वसंचितानुसार जीव संसारांत म्हणजे जन्ममरणाच्या चक्रांत सांपडून सुखदुःख अनुभवितात. पुढें नियमित काल लोटल्यावर त्या परमेश्वराला ऊर्णनाभीप्रमाणेंच सर्व संहार करण्याची इच्छा होते. तेव्हां तो स्वतःच्या कालसामर्थ्यानें आपणच उत्पन्न केलेल्या ब्रह्मांडाचा संहार करतो म्हणजे आपल्या स्वरूपांत सर्व ब्रह्मांड मायेसह घेतो. यालाच प्रलयकाल म्हणतात. संहारकालीं व प्रलय झाल्यानंतर त्रिगुणात्मक माया संक्षुब्ध झाल्याकारणानें तिचें विषम स्थितींत असणारे जे गुण ते प्रलयकाळीं शांत होतात, समता पावतात आणि ईश्वरसंकल्पासह माया नाहींशी होते. ऊर्णनाभीनें आपलें जाळें गिळल्यावर तो एकटाच राहतो, तसा परमेश्वर श्रीनारायण एकटा, सच्चिदानंदस्वरूप असतो. तो एकच एक अद्वितीय असून विश्वकालीं सर्व जीवांचा आश्रय व आधार असतो व्यवहारकालीं दिसणाऱ्या जडांचा ( प्रकृतीचा, सांख्योक्त प्रधानाचा ) व पुरुषांचा म्हणजे जीवांचा नियंता व सर्वश्रेष्ठ पुरुषोत्तम हाच नारायण होय. यालाच केवल व मोक्षाचें ( कैवल्याचें ) निधान म्हणतात. ऊर्णनाभि निरुपाधिक, तसाच परमेश्वर निरुपाधिक असून शुद्ध अनुभवानंदाचा गड्डा आहे. हें सर्व अनुमान मीं ऊर्णनाभीपासून काढलें. एकाकी ईश्वर जगत् कसें निर्माण करतो व संहार करतो, याला ऊर्णनाभीचें उत्तम उदाहरण आहे ( १६–२१ )

( २४ ) भिंगुरट्यानें धरलेला व स्वतःच्या घरट्यांत नेलेला कीटक भयानें त्या भिंगुरट्याचें अखंड ध्यान करतो आणि शेवटीं आपला देह न सोडतांहि भिंगुरट्याचें स्वरूप ध्यानामुळें प्राप्त करून घेतो. या कीटकानें मला शिकविलें कीं, अखंड ध्यान केलें असतां मग तें–स्नेहानें, द्वेषानें किंवा भयानें, कोणत्याही मनोवृत्तीनें करा–ज्याचें आपण ध्यान करतों त्याचें रूप याच लोकीं व याच देहीं आपल्यास प्राप्त होतें. ध्यानाचें हे सामर्थ्य कीटकाच्या उदाहरणावरून मला समजलें ( २२, २३ )

राजा ! याप्रमाणें माझ्या चोवीस गुरूंपासून अनेकप्रकारचें शिक्षण मीं शिकलों. आतां, माझ्या स्वतःच्याच देहादिकांकडून मीं काय शिकलों तें ऐक ( २४ )

( २५ ) या देहानेंच मला विवेक ( सत् कोणतें, असत् कोणतें यांची निवड ) व वैराग्य ( विषयाविषयीं तिटकारा ) ही शिकविलीं पहा कीं, या देहाला जन्म आहे, मरण आहे, हीं दोन्हीं दुःखदायक. आणि देह आहे तोंपर्यंत ही सर्वदा दुःखाचीच माळ जीवाच्या गळ्यांत असते. हें पाहून वैराग्य उत्पन्न होतें, व शेवटीं हा देह अग्नीचें, मातीचें किंवा काकशृगालप्रभृति वनपशूंचें भक्ष्य होणार म्हणून तो देह माझा नव्हे, दुसऱ्याचा आहे, हें पाहून तें पूर्वींचें वैराग्य दृढतर होते. तसेंच देह माझा नव्हे हा विवेक, आणि या विश्वांत जीं जीं भूतें म्हणजे पृथ्वीप्रमुख तत्त्वें आहेत तींहि देहाप्रमाणेंच अनित्य, असत् आहेत असा यथार्थ विवेक होतो. तसेंच, भार्या, पुत्र, धन, पशु, दास, गृह, आप्त, इष्टमित्र वगैरे परिवार स्वतःच्याच सुखासाठीं मोठे कष्ट सोसून वाढवून पालनपोषण केला असतांहि अंतकालीं त्यांचा वियोग अति दुःखद होतो. शिवाय ज्याच्या कल्याणासाठीं धनसंचय

केला त्याचाहि विरह होतो, हें परमावधीचें दुःख होय. राजा! ज्या देहाला दुःख सोसून मीं न्हाणिलें, खाऊं पिऊं घातलें, प्रेमानें नटविलें, तो देह तरी काय करतो? तर वृक्ष जसा दुसऱ्या वृक्षाचें बीज उत्पन्न करून नष्ट होतो, त्याप्रमाणेंच हा देहहि दुसऱ्या आणि दुःखद जन्मांची पेरणी करून निघून जातो! कोण दुःखदायी कृतघ्नता ही देहाची. या देहावर चिकटून बसविलेलीं इंद्रियें तरी सुधेपणानें वागतात काय? नाहीं. आपली जिव्हा म्हणजे भूक, आपली तहान, आपलें शिश्न, आपली त्वचा, उदर, श्रवण (कान) नाक, दृष्टि, प्राण हीं सर्व आपआपल्या परीनें जीवांना सतावून सोडतातच. प्रत्येक इंद्रियाचा हट्ट निराळा! यामुळें गृहपति (देहपती) जो जीव याला अत्यंत यातना होतात. तेव्हां हा देह व हे विषयोपभोग नकोत असें वैराग्य माझा देहच मला शिकवितो, आणि हें जें सर्व देह, इंद्रियें, कुटुंब, समाज, स्थावर जगत् आहे, तें नश्वर आहे, जीवाला उपयोगी व जीवाला कल्याणकर असें यांत कांहीं नाहीं, असा विवेक हा माझा देहच मला शिकवितो (२५, २६, २७)

(२६) असो; पण राजा! ह्या मानवी देहाची महती फारच मोठी आहे. परमेश्वरानें आपलें अगाध सामर्थ्य उपयोगात आणून वृक्ष, सर्प, पशु, पक्षी, दंश (डांस) जलचरादि मत्स्यप्रभृति अनेक पुरें म्हणजे देह उत्पन्न केले; तथापि त्याचें समाधान कांहीं होईना. तेव्हां शेवटीं त्यानें एक अपूर्व असा देह उत्पन्न केला. तो देह म्हणजे मानव हा होय. या मानव देहांत रहाणाऱ्या जीवाला देहसामर्थ्यानेंच सर्वविवेचक बुद्धि उत्पन्न होते व तद्द्वारा ब्रम्हाचें अपरोक्ष दर्शन घेण्याची अमोघशक्ति या मानवशरीरस्थ जीवाला मिळते. अशा महिम्याचा देह हा उत्पन्न केला, तेव्हां देवाला अमूप आनंद झाला. इतर देहांत आहार विहार मात्र; पण या देहांत पुरुषोत्तमाची भेट होण्याचा प्रसंग. म्हणून हा दुर्लभ मानव देह अपूर्व महत्वाचा होय (२८)

(२७) अनेक जन्म घेतल्यानंतर पूर्वसुकृतानें प्राप्त होणारा हा देह दुर्लभ व विनाशी असतांहि अत्युत्तम पुरुषार्थ साधून देणारा आहे. करितां हा प्राप्त झाला असतां विवेकी बुद्धिमंतानें लवकर म्हणजे मृत्यु येण्याच्या आधीं, असा प्रयत्न करावा कीं, ज्यायोगें निःश्रेयस अथवा अत्यंत सुखाची प्राप्ति करून देणारा मोक्ष मिळेल. इतर देह विषयाच्या उपभोगासाठीं मात्र असतात; तेथें मोक्ष मिळत नाहीं. परंतु मनुष्य देह मोक्ष देण्याला समर्थ आहे. म्हणून मोक्षाची संधि आणून देणारा हा दुर्लभ मानव देह विषयोपभोगांच्या खर्चीं न घालतां मोक्षाप्रीत्यर्थच उपयोजावा (२९)

## भगवंताचा उपदेश.

### (अध्याय दहावा.)

(१) विषयलोलुप जीव, विषयोपभोगच परम पुरुषार्थ आहे, विषय सत्य आहेत असें मानतात, म्हणून त्यांच्या सर्व उद्योगांचें फल विपरीत होतें, म्हणजे ते उद्योग

व तीं कर्मे दुःख देणारीं होतात. ज्याचा आत्मा शुद्ध झाला आहे त्या माझ्या भक्तानें हें संसारी पुरुषाचें चित्र लक्ष लावून पाहावें व त्यापासून बोध घ्यावा ( २ )

( २ ) स्वप्नसृष्टींत अथवा मनोराज्याच्या सृष्टींत उत्पन्नविनष्ट होणारे विषय त्यांचे दर्शन एकात्मक नसल्यामुळें जसें फलशून्य, त्याचप्रमाणें जागृतकालींहि विषयवैचित्र्य व इंद्रियवैचित्र्यामुळें उत्पन्न होणारी भेदात्मक बुद्धिहि विफल अथवा मिथ्या असते ( ३ )

( ३ ) माझ्या भक्तानें विषयत्याग सांगणारें विहित कर्म वैराग्यवृत्तीनें करावें, आणि सकाम कर्मांचा त्यागच करावा. आत्मविचार एकनिष्ठेनें करणाऱ्या पुरुषानें श्रुतिकथित सकाम कर्मसंबंधाच्या आज्ञा आदरूं नयेत ( ४ )

( ४ ) अहिंसा-सत्यप्रभृति यम आदरानें पाळावे, नियमांचेंहि पालन करूं नये असें नाहीं. परंतु शांत, मत्पर, ब्रह्मवेत्त्या गुरूला शरण जाऊन त्याची सेवा भक्तिपूर्वक तच्छिष्यानें करावी. हा शिष्य निरभिमानी, निर्मत्सर, दक्ष, परिग्रहशून्य, दृढप्रेमी, सावध, तत्त्वजिज्ञासु, असूयारहित, सत्यवक्ता, भार्या–पुत्र–घर–जमीन–आप्त–धन इत्यादी-विषयीं उदासीन म्हणजे काळजी न करणारा, समवृत्तीनें सर्वत्र आत्मस्वरूप पाहणारा असा असावा. शिष्यवृत्तीला हे गुण अत्यंत आवश्यक आहेत ( ५,६,७ )

( ५ ) अग्नि हा दाह्यांहून ( लांकडें, गोंवऱ्या वगैरेहून ) विलक्षण असून त्या दाह्यांचा प्रकाशक असतो. त्याप्रमाणें जीवाच्या स्थूल आणि सूक्ष्म अशा दोन्ही देहांहून विलक्षण असा त्यांचा नियामक आत्मा असतो तो स्वतः द्रष्टा आणि देह दृश्य असतात. आत्मा स्वयंप्रकाश आणि देह परप्रकाश्य असतात, म्हणून आत्मा सर्वविलक्षण आहे (८)

( ६ ) अग्नि हा लांकडामध्यें अंतःप्रविष्ट असतो आणि अग्नीनेंच लांकडामध्यें उत्पन्न केलेले नाश, उत्पत्ति, लहानमोठेपणा, अनेकत्व इत्यादि गुण अग्नि ग्रहण करतोसें दिसतें. त्याप्रमाणें देहाच्या आंत प्रविष्ट होऊनहि नित्य, निर्गुण, मुक्त, देहातपर असणारा आत्मा स्वतः देहादिकांमध्यें उत्पन्न केलेले जन्ममरणादि गुण घेतो, असा भास होतो ( ९ )

( ७ ) पुरुषोत्तमाच्या मायाविलासानें, सूक्ष्म व स्थूल असे जे देह निर्माण केले आहेत ते, व हा सारा संसार, हीं जीवाच्या अध्यासानें ( अज्ञानानें ) उत्पन्न झालीं आहेत. हा जीवाचा अध्यास छेदून नाहींसा करण्याला एक आत्मविद्या मात्र समर्थ आहे ( १० ) म्हणून जिज्ञासूनें आपल्या ठिकाणींच स्थित असणाऱ्या अशा केवल ( निर्गुण ) व सर्वश्रेष्ठ आत्म्याची मात्र संगति दृढ धरावी आणि 'विषय सत्य नित्य आहेत ' हा बुद्धिभ्रम क्रमाक्रमानें नाहींसा करावा ( ११ )

( ८ ) यज्ञाचा अग्नि, दोन काष्ठें एकावर एक ठेवून घासल्यानंतर प्रकट होतो, हा दृष्टांत घेऊन भगवान् म्हणतो, गुरु ही अरणीला आधार देणारी म्हणजे खालचें लांकूड आणि शिष्य हा वरची अरणी होय. खालच्या अरणीला अधरारणि व वरचीला उत्तरारणि म्हणतात. गुरुजींचें प्रवचन म्हणजे उपदेश हें दोन अरणीमधील मध्यम काष्ठ होय. हें

काष्ठ अधरोत्तर अरणींत सांधतें म्हणून तें संधान. या प्रवचनरूपी संधानापासून स्वयंप्रकाशक विद्या प्रगट होते. हाच संधि होय. ही विद्या सुख देणारी असते ( १२ )

( ९ ) निपुण गुरुजी आणि तत्पर शिष्य यांच्या संधीनें उत्पन्न झालेली स्वयंप्रकाशी शुद्ध विद्या प्राप्त झाली म्हणजे अर्थात्‌च गुणप्रसूत अविद्या, तद्गुण आणि तिचे गुणांनीं उत्पन्न केलेला हा संसार दग्धच होतो. कुंडांतील सर्व समिधा जळून खाक झाल्या म्हणजे त्यांचा दाहक जो अग्नि तोहि शांत होतो, त्याप्रमाणें संसार हा दाह्य पदार्थ संपला म्हणजे तद्दाहक विद्याहि अदृश्य होते ( १३ )

( अध्याय अकरा )

( १० ) शोकमोहांची जोडी, सुख, दुःख, देहाची उत्पत्ति आणि मरण, हीं सर्व मायेनें उत्पन्न होतात. स्वप्नांतील शोक-मोहादि जसे मायिक, मिथ्या, तसेंच जागृतींतीलहि होत. हा सर्व संसार आत्म्यावर आरोपित आहे. हा संसार वास्तविक पाहतां सत्य नाहीं. 'आत्मा संसारी' हे शब्द मात्र आहेत. केवळ वाचारंभण आहे. संसारच वास्तविक नाहीं, मग आत्मा संसारी कसा होणार ? ( २ )

( ११ ) उद्धवा, माझ्याच मायेनें निर्माण केलेली विद्या व अविद्या ही जोडी म्हणजे माझ्या आविर्भावाच्या दोन शक्ति होत. या संसारी दृष्टीनें आद्य, परंतु आत्मदृष्टीनें अनिर्वचनीय म्हणून अनादि आहेत. अविद्या व विद्या यांची जोडी बंधमोक्ष उत्पन्न करिते व अज्ञानी व ज्ञानी देहधारी जीव बद्ध व मुक्त होतात ( ३ )

( अध्याय तेरावा )

( १२ ) सत्त्व, रज आणि तम हे गुण बुद्धीचे आहेत, आत्म्याचे नव्हत. हे गुण बुद्धीमध्यें असतात, आत्म्यांत मुळीं सुद्धां नसतात. म्हणून आत्म्यानें सत्त्वगुणाचें साह्य घेऊन रजोगुण आणि तमोगुण यांचा नाश करावा आणि आत्मज्ञानानें सत्त्वगुण शांत करावा. तात्पर्य, वैराग्यानें सत्त्वगुणहि नाहींसा करावा ( १ ) रजोगुण व तमोगुण नष्ट होऊन सत्त्वगुणाची वाढ झाली असतां जीवाला माझी अनन्यभक्ति प्राप्त होते व मद्भक्ति हाच त्याचा धर्म होतो. विप्रहो ! सात्त्विक पदार्थांची सेवा केली असतां सत्त्वगुण पुष्ट होतो व सद्धर्माची उदयपूर्वक प्रवृत्ति होते ( २ ) अतिश्रेष्ठ धर्म म्हणजेच सत्त्वाचा परमोत्कर्ष. हा परम श्रेष्ठ धर्म रजतमांस बहिष्कार घालतो आणि अधर्माचा प्रसार करणारे हे उभयता नष्ट झाले म्हणजे तज्जन्य अधर्महि नाहींसा होतो ( ३ ) शास्त्रें, तीर्थें, पुत्रादि समाज, देश, काल, कर्म, जन्म, ध्यान, मंत्र आणि जातकादि संस्कार, हे दहा पदार्थ गुणोत्पादक आहेत. तिन्ही गुणांचे कारक हे पदार्थ–विषय–होत ( ४ )

( १३ ) हा देह जो जिवंत राहतो, तो प्रारब्ध कर्माचा उपभोग पुरा होईपर्यंतच. दैव म्हणज पूर्वसंचित पुण्यपापसंचय. यांपैकीं जें कर्म फलोन्मुख होतें, त्यालाच प्रारब्ध म्हणतात. हा देह सायुध आणि सशक्तिक असला तरी तो ' स्वप्नांतील अज्ञानविलास मात्र आहे ' असें आत्मसाक्षात्कार झालेल्या पुरुषास ठाऊक असतें; म्हणून तो या मृगजळतुल्य मिथ्या गोष्टींच्या मागें पुनः कधीं जातच नाहीं ( ३७ )

## ध्यानपद्धतीचा प्रकार

( अध्याय चौदावा )

( १ ) श्रीकृष्ण म्हणतात, उद्धवा, आतां तुला ध्यानपद्धतीचा प्रकार सांगतों, तों ऐक. एकाच पातळीच्या सुखासनावर बसून, शिर, नेत्र व छाती एका रेषेंत आणावीं. हात मांडीवर ठेवावे, व दृष्टि नासिकाग्रीं लावावी ( ३२ ) नंतर पूरक, कुंभक, रेचक करून अथवा रेचक, कुंभक व पूरक करून प्राणाच्या गमनाचा मार्ग शुद्ध करावा; जितेंद्रिय असावे ( ३३ ) नंतर हृदयामध्यें ॐकाराचा–घंटेच्या नादाप्रमाणें–जो अखंड नाद होत असतो, त्याला शुद्ध मार्गानें वर चढणाऱ्या प्राणानें प्रकट करावें, ॐकारध्वनि स्पष्ट करावा, आणि वर आज्ञाचक्रापर्यंत प्राण नेऊन ( कमलनालाप्रमाणें तेथें ॐकाराला स्वरयुक्त करावें ( ३४ ) अशा प्रकारें प्रणव म्हणजे ओंकारसंयुक्त प्राणायामाचा चांगला अभ्यास करावा. चांगला म्हणजे प्रत्येक संधिकाळीं ( प्रातःकाल, मध्याह्न आणि सायंकाळीं ) दहा वेळ ॐसह प्राणायाम ( पूरक, कुंभक आण रेचक आणि फिरून रेचक, कुंभक आणि पूरक मिळून एक प्राणायाम होतो ) करावा, एक महिन्याच्या आंतच ह्या दृढ प्राणायामानें प्राण आपल्या ताब्यांत येईल ( ३५ )

( २ ) याप्रमाणें प्राण ताब्यांत आल्यावर आपल्या देहांत जें हृत्कमल आहे, त्याचा नाल म्हणजे दांडा ऊर्ध्वगामी आहे आणि तें कमल अधोमुख आहे, अथवा नाळ अधोगामी आहे व कमळ ऊर्ध्वमुख असून तें पूर्ण उमललेलें आठ दळांचे आणि सकर्णिक आहे असें पीठाचें ध्यान ठरवून ( ३६ ) त्या कमलाच्या कर्णिकेंत सूर्य, सोम, अग्नि, यांची क्रमशः स्थापना करावी. नंतर तेथें माझ्या मंगलस्वरूपाचें ध्यान करावें. वन्हींच्या मध्यस्थानीं असलेल्या प्रकाशाप्रमाणें जें स्वरूप देदीप्यमान आहे, व जें समप्रमाण अवयवी, प्रशांत प्रसन्नमुख असून ज्यास चार हात आहेत, ज्याची ग्रीवा रम्य असून ज्याच्या दोन्हीं कानांत सुंदर मकरकुंडलें स्वतेजानें तळपत आहेत, ज्यानें सुवर्णासारखा पिंवळा पीतांबर धारण केला असून ज्याचा वर्ण मेघाप्रमाणें श्याम आहे, आणि ज्याची छाती श्रीवत्सचिन्हानें शोभत असून रमा ज्याच्या मांडीवर बसली आहे. शंखचक्रगदापद्म इत्यादि आयुधें ज्यानें आपल्या चार हातांत धारण केलीं आहेत, ज्याच्या चरणामध्यें नूपुरें रुणझुणत आहेत, ज्याचे कंठांत कौस्तुभमणी विलसत असून तेजस्वी मुकुट, कडी, कटिसूत्र, पोंची इत्यादि भूषणांनीं ज्याचें सर्वांग भूषित झालें आहे, ज्याचे मुखावर हास्य विलसत असून ज्याची दृष्टि प्रसन्न आहे अशा प्रकारचें तें ध्यानस्वरूप असावें (३७,४१) उद्धवा ! अशा या कोमल, सुकुमार, बालवयस्क स्वरूपांतील प्रत्येक अवयवावर मनःस्थापना करावी पण प्रथम इंद्रियांच्या विषयांपासून इंद्रियें निवृत्त करून घ्यावीं. नंतर बुद्धीला सारथी करून तिच्या साह्यानें हें आपलें मन योगी भक्तानें सर्वथा माझ्या स्वरूपाचे ध्यानांत स्थिर करावें ( ४२ ) नंतर तें सर्वव्यापक चित्त त्या त्या अंगापासून निवृत्त करून

म्हणजे त्यांचें चिंतन न करतां एकाच अवयवाचे-विशेषतः सुहास्यवदनाचे-ठिकाणीं स्थापन करावें ( ४३ ) हें मुख ध्यानांत ठीक ठसलें म्हणजे त्यावरून चित्त काढावें आणि शून्याकाशाचें ध्यान करावें. नंतर सर्वकारण जें आकाश तेंही टाकून द्यावें आणि मी जो शुद्धस्वरूपी निर्गुण केवळ परमात्मा, त्याठिकाणीं आरूढ झालेल्या ज्ञानपूर्ण भक्तियोगाचें कांहीं सुद्धां चिंतूं नये. हीच समाधी होय ( ४४ )

## इच्छामरणसिद्धि.

( अध्याय पंधरा )

( १ ) 'इच्छामरण सिद्धि' अशी-टाचेनें मलद्वार दाबून बंद करावें म्हणजे अपानवायु ऊर्ध्वगति होतो. तेथें त्याची व प्राणाची गांठ पडून ते एकस्वरूप होतात. मग त्या प्राण-वायूस हृदय, वक्ष, कंठ, शिर, यामधून ऊर्ध्वगतीनें ब्रह्मरंध्रापर्यंत न्यावें. हे प्राण म्हणजे जीवाच्या उपाधि. या उपाधींसह जीव ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन यथारुचि ब्रह्म होऊं इच्छील किंवा इतर कांहीं स्वरूप इच्छील याला 'इच्छामरण सिद्धि' म्हणतात ( २४ )

## कृष्णाचा उपदेश.

( अध्याय सतरा )

( १ ) पूर्वी कृतयुगांत सर्व मनुष्यें एकच वर्गाचीं होतीं. त्या वर्गाचें नाव हंस. उद्धवा ! त्या वेळीं विद्यमान असणारा प्रत्येक पुरुष कृतकृत्य असे. त्याला आशा, ईहा कांहीं नसत. म्हणून त्या युगाला 'कृतयुग' असें नांव मिळालें. जीव समाधानी होते, कर्तव्य नव्हतें, म्हणून 'कृतयुग' हें नाव त्या युगाला मिळालें ( १० ) त्या वेळीं वेद केवळ ॐकारस्वरूप मात्र होते वृषस्वरूप ( गोस्वरूप वृष-वृषभ ) धारण करणारा जो मीं धर्म, तो त्या वेळीं चतुष्पाद म्हणजे सत्यादि चारी अंगांनीं परिपूर्ण असा होतों. त्या काळीं एकाग्र तपश्चर्येनें परिशुद्ध झालेले ऋषि माझी सत्य, दया, प्रमृति सर्व अंगांनीं उपासना करीत ( ११ ) महाभागउद्धवा ! पुढें त्रेतायुगामध्यें माझ्या हृदयांतूनच प्राण म्हणजे निःश्वास, या रूपानें कर्मविहित करणारी वेदत्रयी ( ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद ही त्रयी ) प्रकट झाली. तेव्हां तीन भाग आहेत ज्याचे असें यज्ञरूपी कर्म सुरू झालें. होत्र म्हणजे ऋग्वेदांतर्गत होत्याचें कर्म, यजुर्वेदांतील अध्वर्यूचें कर्म आणि सामवेदप्रणीत उद्गात्याचें कर्म, अशा तीन मुखांनीं मीच प्रगट झालों. तीन कर्मस्वरूपी मी म्हणून त्रेतायुग हें नांव ( १२ )

( २ ) ब्रह्मचाऱ्यानें ( प्रथमाश्रमस्थानें ) स्त्रियांचें दर्शन, त्यांचा स्पर्श, त्यांच्यांशीं भाषण, अथवा इतर प्रकारचा विनोद करूं नये; आणि एकत्र झालेल्या नरमाद्यांचे विलास पाहण्याचें तर पहिल्याप्रथम टाकून द्यावें.. इतर ब्रह्मचाऱ्यांप्रमाणें ह्या नैष्ठिकानें नियमतः मलविसर्जन, आचमन, स्नान, संध्योपासन, ऋजुता, तीर्थाटन आणि गायत्रीजप, हीं कर्मे नियमित करावीं. आणि अस्पृश्यांस स्पर्श करूं नये, अभक्ष्यभक्षण करूं नये, अथवा गप्पा-गोष्टी, चकाट्या पिटीत बसूं नये ( ३८ )

( ३ ) सर्व भूतांचे ठायीं मी परमेश्वर नांदत आहें, अशी भावना ठेवून, मन, वाणी आणि शरीर हीं सर्व स्वाधीन ठेवावीं. हा नियम सर्व आश्रमांस विहित आहे. हे कुळदीपक उद्धवा! हें तूं विसरूं नको. अर्थात् हा नियम नैष्ठिकानेहि पाळला पाहिजे (३५) असें हें कडकडीत व्रत नैष्ठिकानें मद्भक्तिपूर्वक एकाग्र मनानें चालविलें म्हणजे त्याच्या तीव्र तपःप्रभावानें त्याचा कर्मवासनाजन्य व कर्मवासनाजनक सूक्ष्म देह शुद्धतम होतो. तो निर्मळ एकनिष्ठ वेदाध्ययनानें अग्नीसारखा तेजस्वी होतो. तात्पर्य, तो मुक्त होण्याच्या मार्गाला लागून पुढें मुक्त होतो ( ३६ )

( ४ ) कुटुंबांतलि मंडळींवर केव्हांहि आसक्त नसावें. कुटुंबी असूनहि माझें ध्यान, भजन हा मुख्य धर्म सोडूं नये. हें दृष्ट जसें नश्वर, नाशवंत आहे, असेंच अदृष्टहि ( कर्मकलापाचा परिणाम फळ असल्यामुळें ) नाशवंत आहे, असा शहाण्या पुरुषानें निश्चय ठेवावा ( ५२ ) पुत्र, कलत्र, मित्र, आप्त, बंधुबांधव यांचा समागम आणि वाटेंतील वाटसरूंचा संबंध एकसारखाच. उभयतांहि शालुसोबती! निद्रा संपली म्हणजे निद्राकालांतील स्वप्न जागरांत नाहींसें होतें, तसेच या देहांतील ओळखीचे दारा, पुत्र, स्नेही दुसऱ्या लोकांत नसावयाचेच ( ५३ ) असा विचार करून तो जीवन्मुक्त पाहुण्यासारखा वागतो; म्हणून तें गृह त्याला बद्धक होत नाहीं. सारांश, तो निर्मळ आणि निरहंकार असतो. 'मी' व 'माझें' हे बंध त्यानें तोडून टाकलेले असतात ( ५४ )

( अध्याय अठरा )

( ५ ) भगवान् श्रीकृष्ण म्हणतात, वानप्रस्थ आश्रम घेऊं इच्छिणाऱ्या पुरुषानें आपल्या पत्नीसह वनांत जावें अथवा तिच्या संरक्षणाची जबाबदारी पुत्राकडे देऊन नंतर वानप्रस्थाश्रम घ्यावा; आणि तेथें शांत वृत्तीनें आपल्या आयुष्याचा तिसरा भाग म्हणजे ५० ते ७५ वर्षे वनांतच घालवावीं ( १ ) तेथें वनांत मिळणारीं पवित्र फळें किंवा मुळ्या आणि कंद यांवरच आपला उदरनिर्वाह करावा. आच्छादनासाठीं झाडाच्या साली म्हणजे वल्कलें, तृण म्हणजे गवताचीं तागाचीं वस्त्रें, अगर झाडाचीं पानें अथवा मृगांचीं कातडीं, यांचा वस्त्रांप्रमाणें उपयोग करावा ( २ ) अंगावरील मळ, गुह्य भागांवरील रोम, तोंडावरील मिशा अगर दाढी, तात्पर्य हे सर्व केश व नखेंहि काढूं नयेत; दांत घासूं नयेत, तिन्ही काळीं पाण्यांत डुंबावें, पण अंग घासूं नये. भूमीचें अंथरूण करावें ( ३ ) उन्हाळ्यांत पंचाग्निसाधन करावें, पावसाळीं धो धो पाऊस पडत असतां पाण्यांत बिनतक्रार उभें रहावें आणि थंडीच्या दिवसांत गळ्याइतक्या पाण्यांत असावें. याचेंच नांव शारीरिक तप होय ( ४ )

( अध्याय वीस )

( ६ ) उद्धवा! ही नरदेहनौका म्हणजे एक सर्वश्रेष्ठ, यदृच्छेनें प्राप्त झालेली, दीर्घ प्रयत्न केला तरी न मिळणारी, तारणाऱ्या सर्व अवजारांनीं सज्ज असलेली, सद्गुरुरूपी उत्तम नाखव्यानें वल्हविलेली आणि परमेश्वरानुग्रहरूपी अनुकूल वारा साह्य करीत

असलेली उत्तमोत्तम नौका होय. ही प्राप्त झाली असतांही जो पुरुष भवसागर तरून जाण्याची दृढ इच्छा करीत नाहीं, तो खरोखर स्वयंघात करणारा आत्मवैरी होय.(१७)

( अध्याय एकवीस )

( ७ ) एकदां जीव विषयासक्त झाला म्हणजे त्याला आपलें हिताहित समजेनासें होतें. आत्मा व अनात्मा, जीव व ईश यांची जाणीव नष्ट होते. वृक्षासारखा बुद्धिहीन होऊन तो पुरुष व्यर्थ जातो. त्याचें जगणें म्हणजे लोहाराच्या भात्याप्रमाणें नुसतें श्वसन श्वास, आंत बाहेर जाणें इतक्याच किंमतीचें असतें ( २२ ) रोग्यानें औषध घ्यावें म्हणून औषधाबरोबर वैद्य कांहीं मध, साखर वगैरे रोचक देतो, त्याप्रमाणें मोक्ष मात्र उद्दिष्ट ठेवणारी श्रुति विहित केलें असतां स्वर्गादि फलें मिळतात अशी रोचक फलश्रुति सांगते. स्वर्ग जीवाचें प्राप्तव्य नव्हे. केवळ जीवांस विहित कर्माची आवड उत्पन्न व्हावी म्हणून स्वर्गादिसुखाचें आमिष श्रुति सांगते ( २३ ) कारण जन्मतःच जीवांस विषयांची प्राणांची, पुत्रदारादिकांची लालसा उत्पन्न झालेली असते, ही लालसा आत्मघात करणारी आहे हें खरें; तथापि ती दृढ असते. ही कमी कमी होत शेवटीं समूळ नष्ट व्हावी म्हणून श्रुति स्वर्गसुखाची आशा दाखवून जीवाकडून विहित कर्म करविते. तिची इच्छा ही कीं, कर्तव्याच्या मार्गे जीवानें मोक्षास जावें ( २४ ) विषयवश झाल्यामुळें आपला पुरुषार्थ कोणता हेंच ज्यांस समजत नाहीं, जे कामाच्याच वाटेनें भ्रमण करतात त्यांची जर वेदवाक्यांवर निष्ठा बसली, तर हा आपला सर्वज्ञ व सर्वकल्याणकारी वेद त्या आपल्या भक्तांस स्वर्गादिसुखांचें आमिष दाखवितो, तें रुच्युत्पादक आहे, इतकेंच समजावें. वेदाचें ध्येय मोक्ष आहे. तेव्हां हाच वेद स्वभक्तांस वृक्षादि योनींत घालविणारें कर्म करण्यास सांगेल हें संभवनयि नाहींच नाहीं ( २५ )

( ८ ) वेदाचें मनोगत माहीत नसतें म्हणून कित्येक दुर्बुद्ध लोक फलश्रुति सांगणाऱ्या वेदाची फलप्रद मनोहर वेदवाक्यें मात्र मान्य करतात. अर्थात व्यासादि श्रेष्ठ मुनींस मान्य झालेलें वेदाचें मनोगत त्यांस समजत नाहीं. आंब्याच्या फळाची वाट न पाहतां ते आंब्याचा मोहरच खुटतात आणि मुख्य व नित्य सुख देणाऱ्या आम्रफलाचा नाश करतात ( २६ )

( ९ ) हे विषयासक्त वैदिक कामुक, मंदमति म्हणून कंजूष फुलांसच फळ मानणारे, यज्ञयागांत उत्पन्न होणाऱ्या धुरावरच प्रसन्न होणारे. धूममार्गानें जाऊन पितृलोकांत पडणारे असतात म्हणून त्यांस स्वर्लोक–सत्यलोक ठाऊकच असत नाहीं. ( २७ ) उद्धवा ! त्यांच्या अतिसंनिध असणारा त्यांच्या हृदयांत राहणारा जो मी, त्या माझी त्यास ओळख नसते. हें दृश्य विश्व मीच परमेश्वर आहें, हें म्यांच उत्पन्न केलें आहे, याची वार्ताही त्यांस नसते. कर्म हेंच स्वर्ग देणारें त्यांचें शस्त्र किंवा मंत्रस्थान ! प्राणसंतोष हाच त्यांचा पुरुषार्थ ! खरेंच आहे. ज्यांचे डोळे म्हणजे बुद्धि स्वर्गसुखात्मक धूमानें अंध झाली, त्यांस त्या धुरापलीकडे काय आहे, हें कसें समजावें ( २८ )

[ १० ] त्या विषयलोलुप लोकांस वेदामध्यें अप्रत्यक्ष रीतीनें सांगितलेला ईश्वराचा अभिप्राय समजतच नाहीं. ज्या पुरुषाला हिंसेची आवड जन्मतःच असेल त्यानें यज्ञ-मध्यें मात्र पशुवध करावा ' ही जी मी वेदद्वारा केवळ हिंसानियामक परवानगी दिली, तिलाच कुबुद्धि लोक ' हिंसा करावी, अशी वेदाज्ञा आहे ' म्हणतात ॥ २९ ॥ अशा अज्ञानामुळें स्वसुखासाठीं मात्र हे हिंसाप्रिय लोक यज्ञ करतात, आणि पशुहिंसा करून पितर, उग्रदेवता यांस बली देतात. पण त्यांचें हे यज्ञ वस्तुतः मांसाशनासाठींच असतात ( ३० )

( ११ ) उद्धवा ! श्रवणमनोहर असा जो स्वर्गलोक तो केवळ स्वप्नांतील सृष्टीप्रमाणें अवास्तव असताही त्याचीच प्राप्ति व्हावी असा संकल्प करून हे अज्ञ लोक प्राप्त झालेले विषयही टाकून देतात. पुढें भाव येईल या आशेवर सट्टे करणारा मूर्ख वैश्य जसा गांठचा पैसाही घालवितो, तसाच या विषयासक्ताचा कर्मव्यवहार असतो ( ३ ) रजोगुणादि मायाविकारांची सेवा करणारे हे लोक त्या गुणत्रयावर निष्ठा ठेऊन त्रिगुणात्मक इंद्रादि देवतांची उपासना करतात; पण निर्गुण जो मी त्या माझी आराधना निष्काम एकनिष्ठ भक्तीनें [ त्याच इंद्रनिष्ठ भक्तीनें ] करीत नाहींत (३२) 'आम्ही यज्ञद्वारा इंद्रादि देवतांस प्रसन्न करूं, स्वर्गांत जाऊन उत्तमोत्तम भोग भोगूं, नंतर पुनः भूलोकीं येऊन कुलीन व श्रीमंत होऊं' अशा रीतीच्या यांच्या वेदोक्त कल्पना असतात ( ३३ )

[ १२ ] अशा परोक्षवादी वेदाच्या आलंकारिक वाणीनें ज्यांचीं मनें भ्रष्ट होऊन विक्षिप्त झालीं, जे मोठे मानी म्हणजे परोपदेश न घेणारे व हट्टी म्हणजे सदुपदेश न स्वीकारणारे असतात, त्या विक्षिप्त मानी व हट्टी लोकांस माझ्या-परमेश्वराच्या वार्ता-सुद्धां सहन होत नाहींत, मग उपासना तर लांबच ! (३४) उद्धवा ! कर्म, भक्ति आणि ज्ञान हेंच ज्यांचे विषय आहेत, ते वेद केवळ ब्रह्मात्मपर, ' ब्रह्म व आत्मा एकच होत असें सांगणारे आहेत. वेदमंत्रांचे द्रष्टे म्हणजे ऋषि परोक्ष ह्मणजे अप्रत्यक्ष रीतीनें उपदेश करणारे आहेत. कारण परोक्षपद्धतीच मला प्रिय आहे ( ३५ )

( १३ ) शब्दब्रह्म म्हणजे सर्व वेदांची राशि. तो यथार्थ समजण्यास अति कठीण आहे. प्राण, इंद्रियें व मन यांचे तो अधिष्ठान आहे. तो अनंत, अपार व गूढ असून तरून जाण्यास महासमुद्रासारखा अत्यंत दुःसाध्य आहे ( ३६ ) अनंत व अचिंत्यशक्ति असा जो मी सर्वव्यापक निर्विकार अंतर्यामी परमात्मा, त्या मींच ही स्फुरद्रूप वाणी प्रकट केली आहे. उद्धवा ! कमलाच्या देठांमध्यें जसे मऊ मऊ लोकरीवजा तंतू असतात, त्यांप्रमाणें प्रत्येक भूताच्या अंतर्यामीं राहून जो अखंड अनाहत ध्वनि घुमत असतो, त्यावरूनच ही वेदवाणी ज्ञात्याला लक्षित होत असते ( ३७ ) ज्याप्रमाणें ऊर्णनाभि आपल्या हृदयांत असणारे ऊर्णातंतू आपल्या मुखांतून बाहेर काढतो, त्याचप्रमाणें नित्य घोष करणारा माझा अंश जो हिरण्यगर्भ तो, शब्दच गुण आहे ज्याचा अशा ॐस्वरूपी

आकाशाचा, त्या आकशांतील अस्पष्ट वर्णांस मनोमार्गानें स्पर्शरूपी वर्णांचें [ कपासून म पर्यंतचे २५ वर्णांचें ] स्वरूप देऊन त्यांस प्रकट करतो. वेदवाणी ती हीच ( ३८ )

( अध्याय बावीस )

( १४ ) इंद्रियांस आश्रय देणाऱ्या मनोवस्थेनुसार जडाजड पदार्थांमध्यें तीन अवस्था प्रकट होतात. 'आंत बाहेर' हा भेद मनच करतें. स्वप्नस्थ पुरुष आपणच मिथ्यारूपी होऊन आपणास निरनिराळ्या तऱ्हेनें पाहतो, तसें हें इंद्रियसाह्य घेणारें मन स्मरणास्मरणामुळें हें विश्व व आपला देह यांस तीन प्रकारें ( जन्म आहे, स्थिति आहे मृत्यु आहे असें ) पाहतें ( ४१ )

( १५ ) उदाहरणार्थ दिव्याची ज्योत, नदीच्या प्रवाहांतील पाणी किंवा वृक्षफलें यांचें वय, त्यांची स्थिति, हीं जशीं क्षणोक्षणीं बदलतात, त्याप्रमाणेंच सर्व जडाजडांची जन्म, वय, स्थिति, मृत्यु हीं प्रतिक्षणीं बदलत असतात ( ४३ ) दिव्याच्या ज्योतींतील तैलपरमाणु प्रतिक्षणीं बदलतात, प्रवाहांतील पाणी प्रतिक्षणीं बदलतें, तरी तोच हा दिवा तोच हा नदीप्रवाह, असें अज्ञानी लोक बोलतात त्याप्रमाणें पुरुषाच्या शरीरांतील घटक प्रत्येक क्षणीं बदलत असतांही तोच हा पुरुष असे अज्ञानी माणसाचे बोल असतात. ते बोल अर्थशून्य, म्हणून असत्य होत. त्यांची बुद्धि अगर ज्ञानही असत्य होय ( ४४ )

( १६ ) आपल्या वडिलांच्या देहाला मृत्यु आला, आपल्या पुत्राच्या देहाचा जन्म झाला, यावरूनही आपल्या देहाच्या जन्ममरणांचें अनुमान होतें. वस्तू उत्पन्नविनष्ट होतात, पण त्यांचा ज्ञाता एकच अद्वितीय व नित्य असतो ( ४८ ) तरुबीज तरूला जन्म देतें व फल शेवटीं त्याला मारतें; हें जाणणारा विद्वान् जसा तरूहून निराळा, त्याप्रमाणें देहाचें जन्ममरण पाहणारा देहाहून विलक्षण म्हणजे देहधर्म नसणारा विद्वान असतो. तात्पर्य जीवात्मा नित्य, सर्वज्ञाता म्हणून जन्ममरणादि अवस्थावंत नसतो ( ४९ )

( १७ ) नदीचा प्रवाह चालत असतां आपण नावेंत बसलों म्हणजे नदीकाठचीं झाडें चालतातसे वाटतें आणि मनाबरोबर डोळे गरगर फिरविले म्हणजे सर्व पृथ्वी हालत आहे असा भ्रम होतो. तद्वत् गुणसंगतीनें भ्रमिष्ठ झालेल्या अज व अमर जीवाला आपण जन्मतों—मरतों अशी भ्रांति होते ( ५३ ) उद्धवा ! मनोरथ जसे खोटे, स्वप्नांतील अनुभव जसा खोटा, त्याप्रमाणचें आत्म्याला संसार भासविणारा अनुभव खोटा आहे ( ५४ )

( १८ ) उद्धवा ! मोक्षेच्छु पुरुषाचा कोणी दुष्टांनीं तिरस्कार केला, त्याचा अपमान केला, त्याला फसविलें, त्याचा मत्सर केला, त्याला मारलें, किंवा बांधून टाकलें, त्याची वृत्ति काढून घेतली, अथवा त्याच्या शरीरावर थुंकले, मुतले, सारांश त्याला अनेक अनेक प्रकारें जरीं गांजलें, तरी अशा संकटप्रसंगीं सुद्धां मोक्षेच्छूनें स्वतः मोक्षसाधनांनीं आपला उद्धार करावा ( ५७, ५८ )

( अध्याय तेवीस )

( १६ ) द्रव्य मिळविण्याच्या कामीं श्रम लागतात, ते वाढविण्याच्या कामीं व्याज-बट्टा करतांना त्रास होतो, तें सुरक्षित रहावें म्हणून सारखी चिंता करावी लागते आणि त्याचा व्यय झाला, किंवा कांहीं कारणांनीं नाश झाला, तात्पर्य द्रव्य नष्ट झालें, तर तो मनुष्य वेडा होतो ! ( १७ ) चोऱ्या, घातपात, खोटें बोलणें, दंभ, काम, क्रोध, आश्चर्यानें वेडेपणा, उन्मत्तपणा, तू मी हा भेद, वैर, बेभरंवसा, मत्सर, परदाराभिलाष, जुगार मद्यप्राशन, हे पंधरा अनर्थ एका म्हणजे द्रव्याच्या पायीं उत्पन्न होतात. म्हणून ज्याला स्वकल्याण साधावयाचें आहे त्यानें द्रव्यापासून होईल तितके लांब रहावें ( १८,१९ ) ह्या दव्यामुळें बंधु, बायको, आईबाप, स्नेही दुरावतात आणि शेवटीं खांद्याशीं खांदा भिडवून ज्यांशीं सहकार्ये केलीं ते, ह्या द्रव्यामुळेच शत्रु होतात ! ( २० ) हे द्रव्यलोभी एका पैशासाठीं रागावतात, क्रुद्ध होतात, आणि दरिद्र्याच्या वाऱ्यालाही उभे रहात नाहींत. इतकेंच नव्हे तर मत्सरानें त्यांचे हृदय पेटतें आणि त्यांत त्यांचें मित्रप्रेम जळून त्याची राख होते ( २१ )

( २० ) सर्वभक्षक मृत्यु आपला जबडा पसरून प्रत्यक्ष आपल्यापुढें उभा असतां, धनाचा, धनोत्पत्तीचा, वासना पूर्ण करणारे विषयांचा, व जन्मृत्यूंत लोटणारे कर्मांचा, स्वीकार करण्यांत लाभ कोणता ? हीं काय मृत्यूला टाळूं शकतील ? ( २७ )

( २४ ) उद्धवा, पुरुषाच्या जीवाला सुखदुःखादि देणारा त्याच्या मनाशिवाय दुसरा कोणी नसतो. अ पले स्नेही, शत्रु वगैरे मिळून होणारा समाज म्हणजे संसार, हा अज्ञानानें विक्षिप्त झालेल्या मनाचा प्राण घेणारा खेळ होय ( ६० ) म्हणून उद्धवा, सर्व बुद्धि व श्रद्धा माझ्या ठिकाणीं ठेऊन उत्पन्न होणाऱ्या एकनिष्ठ ज्ञानानें मनाला आवरून धर, स्वाधीन करून घे. माझ्यावर श्रद्धा, माझ्या ठिकाणीं भक्ति आणि विवेकपूर्वक मनोनिग्रह हाच ब्रह्मज्ञानविज्ञान संपादन करूं इच्छिणाऱ्या मुमुक्षूला तारक योगसंग्रह होय ( ६१ )

---

# द्वादश स्कंध

---

या स्कंधाचे १३ अध्याय व ५६६ श्लोक आहेत. श्रीकृष्णानंतरचा भरत खण्डांतील राजांचा संक्षिप्त वृत्तांत आणि सनातन वैदिक धर्माच्या आचारादिकांचें उरलेलें परिस्थितिनुरूप वर्णन इत्यादि भाग या स्कंधांत आला आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पाहिले दोन स्कंध श्रीमद्भागवताची प्रस्तावना असून हा बारावा स्कंध म्हणजे उपसंहार होय. पहिल्या अध्यायांत कलियुगांतील कांहीं राजवंशांचें वर्णन आहे. दुसऱ्या अध्यायांत कलियुगांतील आचारांचे वर्णन असून कलियुगाच्या शेवटीं कल्कि अवतार होऊन कृत-

युगाला सुरवात होईल असें सांगितलें आहे. नंतर युगांची लक्षणें, भक्तीचा महिमा, प्रल-याचें विवेचन, शुकाचार्यांचा परीक्षिताला उपदेश व गमन, तक्षकाकडून राजाचा मृत्यु. जनमेजयाचें सर्पसत्र,व्यास व त्यांचे शिष्य यांनीं मूळ एका वेदाच्या अनेक शाखा व उप-शाखा कशा केल्या त्याचें वर्णन आहे. यांत वैशंपायनाचा शिष्य याज्ञवल्क्याची कथा मोठी मजेची आहे; याज्ञवल्क्यानें वैशंपायनाच्या सांगण्यावरून त्याचे वेद परत दिले व आपण सूर्याच्या उपासनेनें स्वतंत्र वेदाचा आचार्य झाला. त्यास शुक्लयजुर्वेद असें नांव प्रसिद्ध आहे. यावरून तेजस्वी पुरुष आपलें वैशिष्ट्य प्रसंग पडल्यास कसें दाखवितात, हे चांगलें दिसून येतें. त्यानंतर मार्कंडेयाची कथा आली आहे. अकराव्या अध्यायांत देवपूजेच्या तंत्रोक्त पद्धतींचें विवेचन असून बारा महिन्यांतील सूर्याच्या बारा स्वरूपांची माहिती त्यांच्या गणांसह दिली आहे. बाराव्या अध्यायांत सर्व भागवताचा सारांश दिला आहे, व इतर पुराणांहून भागवताचें वैशिष्ट्य दाखविलें आहे. त्यांत भागवतकार म्हणतात—

४०५

( कल्याणकारक काय ? ) १२-१२-४८

तदेव सत्यं तदुहैव मंगलं तदेव पुण्यं भगवद्गुणोदयम् ॥

ज्यांत भगवंताच्या गुणांचा उत्कर्ष वर्णिला, तेंच वर्णन खरें, तेंच पवित्र व तेंच पुण्यकारक होय. तेराव्या अध्यायांत अठरा पुराणांची श्लोकसंख्या दिली व भागवताची परंपरा त्याचें माहात्म्य वर्णिलें आहे. शेवटीं भागवतकार म्हणतात—

४०६

( भगवंताची प्रार्थना ) १२-१३-२२.२३

भवे भवे यथाभक्तिः पादयो स्तव जायते
तथा कुरुष्व देवेश नाथ स्त्वंनो यतः प्रभो ॥
नामसंकीर्तनं यस्य सर्वपापप्रणाशनम्
प्रणामो दुःखशमनस्तं नमामि हरिं परम् ॥

हे परमेश्वरा, तूं आमचा संरक्षक आहेस; तरी जन्मोजन्मीं तुझ्या पायांची आम्हांस भक्ति जडेल, असें कर. ज्याच्या नामस्मरणानें सर्व पापांचा नाश होतो, व ज्याला नमस्कार केल्यानें सर्व दुःखांचा परिहार होतो, त्या परमश्रेष्ठ श्रीहरीला मी नमस्कार करितों.

# मुखोद्गत करण्यासारखीं निवडक सुभाषितें.

१ एते चांशकलाः पुंसः कृष्णस्तु भगवान्स्वयम् ॥ १-३-२८
( अन्य सर्व अवतार परमेश्वराचे अंशभूत असून श्रीकृष्ण मात्र साक्षात् परब्रह्मस्वरूपच होय. )

२ अविपक्वकषायाणां दुर्दर्शोऽहं कुयोगिनाम् ॥ ( १-६-२२ )
( योगभ्रष्ट मनुष्यांना माझे दर्शन होत नाहीं. )

३ विपदः सन्तु नः शश्वत्तत्रतत्र जगद्गुरो ॥ ( १-८-२५ )
( आम्हांला नेहमी विपत्तीच असोत. )

४ यथा पंकेन पंकांभः सुरया वा सुराकृतम् ।
भूतहत्यां तथैवैकां न यज्ञैर्मार्ष्टुमर्हति ॥ १-८-५२
( जसें गढूळ पाणी चिखल टाकिल्यानें स्वच्छ होत नाहीं, किंवा अधिक दारू प्यायल्यानें दारू पिण्याचें पाप नाहींसे होत नाहीं, त्याप्रमाणें प्राणिहत्येचें पातक ज्यांत अन्य प्राण्यांची हत्या आहे अशा यज्ञांनीं कसें नाहींसें होणार ? )

५ सत्सङ्गान्मुक्तदुःसंगो हातुं नोत्सहते बुधः ॥ १-१०-११
( सत्संगतीमुळें दुष्ट संगति सुटलेला समंजस मनुष्य झालेला सत्संग सोडण्यास केव्हांहि तयार होत नाहीं. )

६ किं नु बालेषु शूरेण कालिना धीरभीरुणा ॥ १-१८-८
( मूर्ख मनुष्यांशीं प्रतिष्ठा मिरविणारा व ज्ञानी मनुष्य पाहतांच पळून जाणाऱ्या कलीची भीति ती कसली ? )

७ यस्मिन्नहिंसोपशमः स्वधर्मः ॥ १-१८-२२
( जेथे अहिंसा आणि शांति हाच स्वधर्म मानला जातो, तें योग्यांचें स्थान. )

८ नभः पतन्त्यात्मसमं पतत्रिणः ॥ १-१८-२३
( पक्षी आपल्या शक्तीप्रमाणेंच अनंत असलेल्या आकाशांत उडत असतात. )

९ स्वयं हि तीर्थानि पुनन्ति सन्तः ॥ १-१९-८
( साधुलोक स्वतःच तीर्थांना पवित्र करितात. )

१० वरं मुहूर्तं विदितं घटेत श्रेयसे यतः ॥ २-१-१२
( लक्ष्य लावून केलेलें काम थोडा वेळ जरी केलें तरी तें फायदेशीर होतें. )

११ पदं तत्परमं विष्णोर्मनो यत्र प्रसीदति २-१-१९
( ज्याठिकाणीं मन प्रसन्न होतें तें भगवंताचें स्थान. )

१२ नह्यतोऽन्यः शिवः पंथा विशतः संसृताविह । २-२-३३

( संसारांत पडणाराला भक्तीवांचून दुसरा कल्याणकारक मार्गच नाहीं. )

१३ विमोहिता विकत्थन्ते ममाहमितिदुर्धियः ॥ २-५-१२

( मायेनें मोहित झालेले पुरुष ' हें माझें ' अशी वल्गना करीत असतात. )

१४ मा वेदगर्भ गास्तन्द्रीं सर्ग उद्यममावह ॥ ३-९-२९

( आळस करूं नको. कार्यास सुरवात कर. )

१५ क यामो बलिनोत्पाद्य वैरम् ॥ ३-१८-११

( समर्थाशीं वैर करून जाणार तरी कोठें ? )

१६ रसज्ञः को नु तृप्येत हरेर्लीलामृतं पिबन् ॥ ३-२०-६

( भगवंताच्या चरित्राची गोडी लागल्यावर त्या ऐकत असतां कोणता पुरुष तृप्त होणार नाहीं ? )

१७ न वै जातु मृषैव स्यात् प्रजाध्यक्ष मदर्हणम् ॥ ३-२१-२४

( भगवंताची सेवा कधींहि व्यर्थ जात नाहीं. )

१८ अर्थे ह्यविद्यमानेऽपि संसृतिर्न निवर्तते ॥ ३-२७-४

( खोट्या असलेल्या पदार्थांपासूनहि भीति उत्पन्न होतेच. )

१९ दैवादुपेतमथ दैववशादपेतं ॥ ३-२८-३७

( सिद्ध पुरुष दैवानें प्राप्त झालेल्या किंवा नाहींशा झालेल्या वस्तूंची पर्वा करीत नाहींत. )

२० अनाहुता अप्यभियन्ति सौहृदं भर्तुर्गुरोर्देहकृतश्च केतनम् ॥४-३-१३

(पतीच्या, गुरूच्या, आईबापांच्या घरीं बोलावण्यावांचूनहि श्रेष्ठ लोक जातात.)

२१ संभावितस्य स्वजनात्पराभवो यदास सद्यो मरणाय कल्पते॥४-३-२५

( आप्तजनांकडून झालेला अपमान संभावित मनुष्याला मरणापेक्षांहि दुःखदायी होतो. )

२२ काल एव हि भूतानां प्रभुरप्ययभावयोः ॥ ४-१२-३

( प्राणिमात्रांच्या जन्ममृत्यूला वास्तविक कारण असा काळच होय. )

२३ अपत्ये द्रविणे वापि कः कुर्यान्ममतां बुधः ॥ ४-२०-६

( कोणता शहाणा मनुष्य पुत्र, द्रव्य, इत्यादिकांवर ममता करील ? )

२४ श्रेयः प्रजापालनमेव राज्ञः ॥ ४-२०-१४

( प्रजेचें पालन करणें हेंच राजाला कल्याणकारक आहे. )

२५ न कुर्यात्कस्यचित्संगं तमस्तीव्रं तितीरिषुः ॥ ४–२२–३४
(संसारांतून तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें कोणाचाहि संग करूं नये.)

२६ यदि न स्याद्गृहेमाता पत्नी वा पतिदेवता ।
व्यंगेरथइव प्राज्ञः कोनामासीत दीनवत् ॥ ४–२६–१५
( घरांत जर प्रेमळ माता किंवा पतिव्रता पत्नी नसेल, तर मोडलेल्या रथा-प्रमाणें असलेल्या त्या घरांत कोण बरें दीनासारखा राहील ? )

२७ क्षणार्धमिव राजेंद्र व्यतिक्रांतं नवं वयः ॥ ४-२७-५
( तारुण्य एका क्षणाधाप्रमाणें निघून गेलें )

२८ तत्पादमूलं शरणं यतः क्षेमो नृणामिह ॥ ४-२९-५०
( भगवंताच्या चरणाचा आश्रय हाच मनुष्यांचें कल्याण करणारा आहे. )

२९ कर्म यत्क्रियते प्रोक्तं परोक्षं न प्रकाशते ॥ ४-२९-५९
( या लोकीं केलेले यज्ञादिक कर्म उत्तरक्षणीं नाश पावत असल्यामुळें पर-लोकीं उपयोगीं पडत नाहीं. )

३० मन एव मनुष्येंद्र भूतानां भवभावनम् ॥ ४-२९-७७
( मन हेंच मनुष्यांच्या जन्ममरणाला कारण आहे. )

३१ दयया सर्वभूतेषु संतुष्ट्या येन केन वा ॥
सर्वेंद्रियोपशान्त्या च तुष्यत्याशु जनार्दनः ॥ ४-३१-१९
( प्राणिमात्रांवर दया करणें, यदृच्छालाभांत संतुष्ट असणें, व इंद्रियनिग्रह करणें यांच्या योगानें भगवान् लवकर प्रसन्न होतो. )

३२ जितेंद्रियस्यात्मरतेर्बुधस्य गृहाश्रमः किं न करोत्यवद्यम् ॥ ५–१–१७
( ज्याचीं इंद्रियें स्वाधीन आहेत व जो आत्मस्वरूपांत रममाण असतो, अशा ज्ञानी पुरुष गृहस्थाश्रमांत असला, तरी त्याला काय अपाय होणार ? )

३३ भुंक्ष्वेह भोगान् पुरुषातिदिष्टान् विमुक्तसंगःप्रकृतिं भजस्व ॥ ५–१–१९
( उत्तम संसार केल्यानंतर आत्मस्वरूपीं रममाण हो ).

३४ न साधु मन्ये यत आत्मनोऽयमसन्नपि क्लेशद आस देहः ॥ ५–५–४
( मिथ्या असूनहि दुःखदायक असा देह ज्या पातकामुळें आत्म्याला प्राप्त होतो, तेंच पातक पुनरपि करणें युक्त नव्हे. )

३५ न कुर्यात्कर्हिचित्सख्यं मनसि ह्यनवस्थिते ॥ ५–६–३
( मनावर विश्वास ठेवून कोठेंहि मैत्री करूं नये. )

**३६ मुक्तिं ददाति कर्हिचित्स्म न भक्तियोगम् ॥** ५–६–१८

( भगवान एकाद्यावर प्रसन्न झाले तर त्याला मुक्ति देतील, पण भक्तियोग मात्र कधीं देणार नाहींत. )

**३७ प्रायश्चित्तमतोऽपार्थं मन्ये कुंजरशौचवत् ॥** ६–१–१०

( हत्तीचें आंग पाण्यानें स्वच्छ धुतल्यावरहि पुनः तो मातीनें मळवितो, त्याप्रमाणें प्रायश्चित्त घेतल्यानंतरहि मनुष्याचें मन पापानें मलीन होतें )

**३८ नाश्नतः पथ्यमेवान्नं व्याधयोऽभिभवन्ति हि ॥** ६–१–१२

( पथ्य सांभाळणाऱ्या मनुष्यास रोग होतच नाहींत. )

**३९ वेदप्रणिहितो धर्मो ह्यधर्मस्तद्विपर्ययः ॥** ६–१–३८

( वेदविहित असेल तो धर्म, व वेदानें निषिद्ध असेल तो अधर्म. )

**४० पुत्राणां हि परो धर्मः पितृशुश्रूषणं सताम् ॥** ६–७–२८

( मातापित्याची सेवा करणें हा पुत्रांचा खरा धर्म. )

**४१ किं दुरापं मयि प्रीते ॥** ६–९–४८

( मी संतुष्ट झालों असतां काय अशक्य आहे ? )

**४२ जातस्य मृत्युर्ध्रुव एष सर्वतः प्रतिक्रिया यस्य न चेह क्लृप्ता ॥** ६-१०-३२

( जो जन्माला आला त्याला मृत्यु येणारच, कारण मृत्यु चुकविण्याचा उपाय जगांत उत्पन्नच झाला नाहीं. )

**४३ यथा प्रयान्ति संयान्ति स्रोतो वेगेन वालुकाः ॥**
**संयुज्यन्ते वियुज्यन्ते तथा कालेन देहिनः ॥** ६–१५–३

( नदीच्या प्रवाहानें वाळूचे कण जसे एकत्र होतात, किंवा वेगळे होतात, त्याचप्रमाणें जीवहि कालवेगानें संयुक्त व वियुक्त होतात. )

**४४ इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्त्यपि यतेर्मनः ॥** ७–१२–७

( इंद्रियें हीं इतकीं बलवत्तर आहेत का तीं जितेंद्रिय पुरुषाचेंहि मन हरण करितात. )

**४५ नन्वग्निः प्रमदा नाम घृतकुम्भसमः पुमान् ॥** ७–१२–९

( स्त्री ही खरोखर अग्नीप्रमाणें असून पुरुष घृतकुंभाप्रमाणें आहे. )

**४६ राजतश्चोरतः शत्रोः स्वजनात्पशुपक्षितः ।**
**अर्थिभ्यः कालतः स्वस्मान्नित्यं प्राणार्थवद्भयम् ॥** ७–१३–३२

( जगण्याची व द्रव्याची इच्छा करणाऱ्या पुरुषास, राजा, चोर, शत्रु, स्वजन, पशु, पक्षी, याचक व काल यांपासून आणि स्वतःपासूनहि भय असतें. )

**४७ सदा संतुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः ॥ ७–१५–१७**

( संतुष्ट चित्त असलेल्या पुरुषाला सर्व आनंदमयच असतें. )

**४८ अरयोऽपि हि संधेयाः सति कार्यार्थगौरवे ॥ ८–६–२०**

( आपलें कार्य साधण्याकरितां शत्रुशींहि मैत्री करावी )

**४९ एतावान् हि प्रभोरर्थो यद्दीनपरिपालनम् ॥ ८–७–३८**

( दीनांचें पालन करणें हेंच प्रभूचें कर्तव्य. )

**५० तप्यन्ते लोकतापेन साधवः प्रायशो जनाः ॥ ८–७–४४**

( दुसऱ्याचें दुःख पाहून मोठे लोक दुःखी होतात. )

**५१ यदृच्छालाभतुष्टस्य तेजो विप्रस्य वर्धते ॥ ८–१९–२६**

( दैवानें प्राप्त होणाऱ्या वस्तूनें संतुष्ट होणाऱ्या ब्राह्मणाचें तेज वाढतें. )

**५२ नह्यसत्यात् परोऽधर्मः ॥ ८–२०–४**

( असत्याहून मोठा अधर्म नाहीं. )

**५३ साधुषु प्रहितं तेजः प्रहर्तुः कुरुतेऽशिवम् ॥ ९-४-६९**

( साधुपुरुषावर केलेला प्रहार, तो करणाऱ्याचेंच अकल्याण करितो. )

**५४ एक एव पुरा वेदः प्रणवः सर्ववाङ्मयः ।**

**देवो नारायणो नान्य एकोऽग्निर्वर्ण एव च ॥ ९-१४-४८**

( पूर्वी कृतयुगामध्यें वाणीचें बीज असा जो ॐकार तोच काय तो एक वेद होता, तसाच नारायण हा एकच देव असून अग्नि एकच होता व वर्णसुद्ध एकच होता. )

**५५ सर्वेषामपि भूतानां नृप स्वात्मैव वल्लभः ॥ १०–१४–५०**

( प्रत्येक प्राणिमात्राला आपला आत्माच अतिशय प्रिय असतो. )

**५६ भगवद्रूपमखिलं नान्यद्वस्त्विह किंचन ॥ १०–१४–५७**

( हें सर्व जग भगवत्स्वरूपच आहे, त्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. )

**५७ भर्जिता क्वथिता धाना प्रायो बीजाय नेष्यते ॥ १०–२२–२६**

( एकदां भाजलेलें किंवा शिजविलेलें धान्य पुन्हां उगवत नाहीं. )

**५८ कर्मणा जायते जंतुः कर्मणैव विलीयते ॥ १०–२४–१३**

( कोणताही प्राणि आपल्या कर्मानें जन्मास येतो, व आपल्या कर्मानेंच नाश पावतो. )

५९ अंजसा येन वर्तेत तद्देवास्य हि जीवनम् ॥ १०–२४–१८
( ज्यापासून आपला योगक्षेम सुखानें चालतो तेंच आपलें दैवत )

६० लिप्सयोलिप्सयोः समं कुर्याद्दैवं हि फलसाधनम् ॥ १०–३६–३८
( प्रयत्नांत यश मिळणें न मिळणं हें दैवाचें स्वाधीन आहे. पण मनुष्यानें प्रयत्न करण्यास चूकूं नये. )

६१ यत्राधर्मः समुत्तिष्ठेन्न स्थेयं तत्र कर्हिचित् ॥ १०–४४-९
( जेथें अधर्म होत असेल तेथें क्षणभरहि राहू नये )

६२ परं सौख्यं हि नैराश्यं ॥ १०,४७,४७
( कोणत्याहि वस्तूविषयीं आशा न ठेवणे हें खरें सुख )

६३ एकः प्रसूयते जन्तुरेक एव प्रलीयते ॥ १०–४९–२१
( प्राणि एकटाच जन्मास येतो व एकटाच मृत्युवश होतो )

६४ ईशो दुरत्ययः कालः ॥ १० ७४-३१
( कालाचें उल्लंघन करणें कठिण आहे. )

६५ भावोहि भवकारणम् ॥ १० ८४-४६
( श्रद्धा हीच सर्वाला कारण आहे. )

६६ अयं हि परमोलाभ उत्तमश्लोकदर्शनम् ॥ १०-८०-१२
( ...दर्शन हाच मोठा लाभ· )

६७ साधुः पुनाति सद्धर्मो देवविश्वद्रुहोपि सः ॥ ११-२-१२
( धर्म हा पतितांना सुध्दा पवित्र करितो, )

६८ नातिस्नेहः प्रसंगो वा कर्तव्यः क्वापि केनचित् ॥ ११-७-५२
( केव्हांही कोणाशीं अतिस्नेह करूं नये· )

६९ आशाहि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम् ॥ ११-८-४४
( आशा हें परम दुःख आहे, व संतोष हें मोठें सुख आहें. )

७० परिग्रहोहि दुःखाय ॥ ११–९–१
( वस्तूंचा स्वीकार दुःखकरच होतो. )

७१ गृहारंभोऽतिदुःखाय ॥ ११–९–१५
( घर हीः घरघर आहे. )

७२ **क्वचिद्गुणोऽपि दोषःस्याद्दोषोऽपि विधिना गुणः ॥ ११–२१–१६**

( दैवयोगानें केव्हां केव्हां गुणहि दोष होतात किंवा दोष गुण होतात. )

७३ **प्रायेणार्थाः कदर्याणां न सुखाय कदा च न ॥ ११–२३–१५**

( कृपण पुरुषानां द्रव्य केव्हांही सुखकारक होत नाहीं. )

७४ **अन्नंहि प्राणिनां प्राणः ॥ ११–२६–३२**

( अन्न हें प्राण्यांचा प्राण होय. )

७५ **अयं हि परमो लाभो नृणां साधुसमागमः ( १२–१०–७ )**

( संतांची संगति हाच सर्वश्रेष्ठ लाभ. )

७६ **सर्ववेदांतसारंहि श्रीभागवतमिष्यते ॥ १२–१३–१५**

( हें भागवत म्हणजे सर्व वेदांताच सार आहे. )



# या भागांत आलेल्या सुभाषितांची सूचि

# श्रीमद्भागवतान्तर्गत सूचीसह

# भारतीय पौराणिक कोश.

## अ

**अकपि**–तामसमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं.

**अकल्मष**–तामस मनूच्या पुत्रांपैकीं एक.

**अकूपार**–इंद्रद्युम्न सरोवरांतील प्रसिद्ध कांसव.

( २ ) ( कच्छरूपी भगवंताचें नांव. ) हिरण्मय खंडांतील लोकांची उपास्य देवता [ ५,१८,३० ].

( ३ ) कच्छरूपी भगवंताची अक्रूरानें केलेली स्तुति [ १०,४०,१८ ].

**अकृतव्रण**–( ब्रह्मर्षि ) परशुरामाचा मित्र. हा युधिष्ठिराच्या यज्ञांत उपद्रष्टा नांवाचा ऋत्विज होता [ १०, ७४,९ ]. यानें रोमहर्षणापासून सर्व पुराणांचें अध्ययन केलें [ १२,७,५ ].

**अकोप**–दशरथ राजाच्या अष्ट प्रधानांपैकीं एक. ह्याला अशोक असेंहि म्हणतात.

**अक्रिय**–सोमवंशीय आयूचा चौथा मुलगा जो रंभ त्याच्या नातवाचा–गंभीराचा–पुत्र. ह्याची संतति तपानें ब्राह्मण झाली [ ९,१७, १०–११ ].

**अक्रूर**–विष्णूचा एक पार्षद.

( २ ) चंद्रवंशीय वृष्णिपुत्र श्वफल्कापासून गांदिनी स्त्रीला झाला. ह्याला आसंग इत्यादि अकरा भाऊ व सुचिरा नांवाची बहीण असून देववान व उपदेव असे दोन मुलगे होते [ ९,२४,१५–१८ ]. कंस गोकुळांत पाठवितो [ १०,३६, २७ ]. श्रीकृष्णाचें अक्रूराशीं भाषण [ १०,३९,४ ]. यमुनेंत रामकृष्णांचें दर्शन [ १०,३९,४१ ]. कुंती आणि धृतराष्ट्राची भेट [ १०,४९,१७ ]. स्यमंतक मणि घेण्याबद्दल शतधन्व्याला उपदेश [ १०,५७,३ ]. अक्रूराचें स्यमंतकमण्यासह द्वारकेंतून प्रयाण व आगमन [ १०,५७,२९--३४ ]. शाल्वयुद्धांत अक्रूर सामील होतो [ १०,७६,१४ ]. सूर्यग्रहणानिमित्त स्यमंतपंचक क्षेत्राला गमन [ १०, ८२,५ ]. यादव–संहार प्रसंगीं भोजाशीं युद्ध व मृत्यु [ ११,३०,१६ ].

**अक्ष**–( फांसे )

( २ ) रावण व मंदोदरी यांचा पुत्र. अशोकवनिकेंत रावणाचे पांच सेनापति मारुतीचे ह तून मृत्यु पावल्यावर हा आठ घोड्यांच्या रथांत बसून तेथें गेला, व मारुतीशीं युद्ध करून मृत्यु पावला.

**अक्षमाला**-द्वितीयार्थक वसिष्ठाची पत्नी.

**अक्षमालिका**–ऋग्वेदोपनिषत्.

**अक्षसूत्र**–( रुद्राक्षमाळा )

**अक्षौहिणी**–२१८७० रथ, इतकेच हत्ती, ६५६१० घोडे, १०९३५० पायदळ मिळून एका अक्षौहिणींत २१८७०० इतकें सैन्य असतें.

**अगस्ति**–आकाशांत असणाऱ्या शिशुमार-चक्राच्या वरच्या हनुवटीवरील एक तारका [ ५,२३,७ ].

**अगस्ति**—अगस्त्यकुलोत्पन्न ऋषि.

**अगस्त्य**—ब्रह्मदेवाचा पुत्र पुलस्त्य, त्याला हविर्भूचे ठिकाणीं झालेला पुत्र. हाच दुसरे जन्मीं जठराग्नि झाला [ ४,१,३६ ]. ह्याचा मलयध्वजाची कन्या कृष्णेक्षणेबरोबर विवाह होऊन त्यास दृढच्युत मुलगा झाला [४,२८,३२].

(२) मित्र व वरुण यांचें वीर्य उर्वशीदर्शनानें स्खलन झालें, तें त्यांनीं कुंभांत सांठविलें, त्यापासून अगस्त्य व वसिष्ठ झाले, ह्मणून त्यांना मैत्रावरुणी व कुंभयोनि असेंहि ह्मणतात [६,१८,५]. हा विरक्त होता, पण वडिलांच्या इच्छेकरितां यानें विदर्भदेशाधिपतीची कन्या लोपामुद्रा हिच्याबरोबर विवाह केला. तिला ऐश्वर्याची इच्छा आहे, असें पाहून हा द्रव्य याचनेसाठीं श्रुतर्वा राजाकडे गेला, परंतु तेथें अपेक्षित द्रव्य न मिळाल्यानें तो श्रुतर्व्याला बरोबर घेऊन ब्रध्नश्व राजाकडे गेला. तेथेंहि निराशा झाल्यामुळें त्यांच्यासह त्रसद्दस्यु राजाकडे गेला. परंतु तेथेंहि त्यांस द्रव्य मिळालें नाहीं, म्हणून त्या तिघांसहि बरोबर घेऊन तो इल्वल दैत्याकडे गेला, व त्याचा पराभव करून अगणित द्रव्य घेतलें व कांहीं राजांस देऊन हा आश्रमाला आला. याला लोपामुद्रेच्या ठिकाणीं दृढस्यु व दृढास्य असे दोन पुत्र झाले. दृढस्यु हा इध्मवाह या नांवानें प्रसिद्ध होता. ऋषींच्या प्रार्थनेवरून यानें समुद्रप्राशन करून कालकेय दैत्यांचा नाश केला. हा धनुर्वेदांत अद्वितीय असून तत्ववेत्ताहि होता. यानेंच देवांच्या प्रार्थनेवरून विंध्यपर्वतापासून प्राणिमात्रांस झालेलें दुःख निवारण करून दक्षिणेंत आर्यांची वसाहत केली. रामचंद्र दण्डकारण्यांत आले असतां याच्या दर्शनास आले होते. इंद्रद्युम्नाला अगस्त्याचा शाप [ ८,४,११ ]. बलराम व अगस्त्य यांची भेट [ १०, ७९,१७ ]. स्यमंतपंचक क्षेत्रीं गमन [ १०,८४,५ ].

**अगस्त्यतीर्थ**—दक्षिण समुद्राकडील एक तीर्थ. ( नारीतीर्थ शब्द पहा. )

**अगस्त्यवट**—हिमालयावरील एक पवित्रस्थळ

**अग्नि**—सरस्वतीच्या कांठीं असणारें एक क्षेत्र. येथें विदुर तीर्थयात्रेला गेला होता. [ ३,१,२२ ]

( २ ) पंचमहाभूतांपैकीं तेजाची देवता.

( ३ ) अग्नीची स्वाहा नांवाची जी पत्नी तिला पावक, पवमान व शुचि, असे तीन पुत्र होऊन त्यांच्यापासून पंचेचाळीस अग्नि झाले [४,१,६०–६१]. शिवाय याला स्वारोचिष पुत्र व सुच्छाया कन्या असून ती ध्रुवपुत्र शिष्टाला दिली होती [ ८,१,१९ ].

( ४ ) दक्षकन्या व धर्मपत्नी जी वसु तिला अष्टवसूंमध्यें पांचवा पुत्र अग्नि झाला. त्याला वसोर्धारा पत्नी असून द्रविणक वगैरे पुत्र झाले [ ६,६,११].

( ५ ) वरुणानें केलेल्या यज्ञांत तीन ऋषि उत्पन्न झाले, त्यांतील अंगिराऋषीस ह्यानें पुत्रत्वानें ग्रहण केलें. आग्नेयी दिशेचा अधिपति. श्वेतकी राजानें

केलेल्या अपरिमित यज्ञानें अजीर्ण झाल्यामुळें ह्यानें कृष्णार्जुनाकडे ब्राह्मण वेषानें येऊन खाण्डव वन मागितलें व तें भक्षण केल्यानें तो अजीर्णापासून मुक्त झाला. [ महाभारत ]

( ६ ) इंद्रसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक [ ८,१३,३४ ].

(७) अवधूताचा एक गुरू [ ११,७,३३ ].

(८) भगवंताचें एक स्वरूप [११,१६,२३].

**अग्निदुर्ग**–भौमासुराच्या प्राग्ज्योतिष नगरी-भोंवती जे अनेक किल्ले होते, त्यांपैकीं एक. ह्याचा नाश श्रीकृष्णानें सुदर्श-नानें केला [ १०,५९,३-४ ].

**अग्निमित्र**–शुंगराजांतील पहिला राजा. हा मौर्यराजांतील शेवटच्या बृहद्रथानंतर राज्यावर आला [ १२,१,१६ ].

**अग्निवर्ण**–सूर्यवंशीय कुशाच्या वंशांतील सुदर्शनाचा पुत्र [ ९,१२,५ ].

**अग्निवेश्य**–देवदत्ताला साक्षात् पुत्ररूपानें झालेला अग्नि. जतुकर्णीच्या उदरीं याचा जन्म झाला ह्मणून याला जातूकर्ण्य असेंहि ह्मणतात. याच्या संततीस अग्निवेश्यायन असें म्हणतात

( २ ) अगस्त्य ऋषीचा एक शिष्य यापासून द्रोणानें धनुर्वेदाची शिक्षा संपादन केली होती [ ९,२,२१ ].

**अग्निवेश्यायन**–अग्निवेश्याच्या कुळांतील ब्राह्मण [ ९,२,२२ ].

**अग्निशर्मायण**–एक ब्रह्मर्षि.

**अग्निशिर**–काम्यक वनाचे उत्तरेकडे असणारें एक तीर्थ. येथें संजय राजानें शम्याक्षेप नांवाचा यज्ञ केला होता. व भरत राजानें एकशें अठ्ठेचाळीस यज्ञ केले होते. [ महाभारत ]

**अग्निष्टोम**–चक्षु व नड्वला ह्यांच्या अकरा पुत्रांतलि सातवा पुत्र. यास अग्निष्टुत असेंहि म्हटलें आहे [ ४,१३,१६ ].

( २ ) एक यज्ञ.

**अग्निष्वात्त**–पितरांतील एकभेद. हे कश्यपाचे पुत्र. ह्यांची पत्नी स्वधा. [४,१,६३]

**अग्निहोत्र**–साविता व पृश्नी ह्यांचा पुत्र. [ ६,१८,१ ].

**अघ**–कृष्णाला मारण्याकरितां कंसानें पाठ-विलेला राक्षस. हा बकासुर व पूतना यांचा भाऊ होता. हा गोकुलांत गेल्यावर तेथें चार योजनें लांबीचा सर्पदेह धारण करून गोपांच्या व गाईंच्या वनांत जाण्याच्या मार्गांत पडला. त्याला पाहून ही एक प्रशस्त गुहा आहे, अशा भ्रमानें गायींसुद्धां गोप आंत शिरले. तें पाहून श्रीकृष्णानें तत्काल त्याच्या देहांत प्रवेश केला व आपला देह वाढवून त्याचा नाश केला [ १०,१२,१३ ].

**अघमर्षण**–विंध्यपर्वतावरील एक तीर्थ. येथें दक्षप्रजापतीनें तप केलें [ ६,४,२१ ].

( २ ) एका ऋषीचें नांव.

( ३ ) मधुच्छंदाचा पुत्र व त्याचें कुळ.

( ४ ) एक सूक्त. ' ऋतंचसत्यं ' ऋ. मं. १० सूक्त १९०. अघमर्षण ह्मणजे पापक्षालन. ह्या सूक्तानें जल अभिमं-त्रित करून तें हुंगून डाव्या बाजूला आपटतात. याचा अर्थ शरीरांतील पापपुरुषाचा नाश करणें होय.

**अङ्ग**–चाक्षुषमनूच्या वंशांतील उल्मुक राजाच्या पुष्करिणी स्त्रीचा मुलगा. ह्याची पत्नी सुनीथा व मुलगा वेन [ ४,१३,१७–१८ ]

**अङ्ग**–एका देशाचें नांव. हा देश सरयू व गंगा यांच्या मध्यें आहे. येथें अनंगत्व पावलेल्या मदनाला शंकराच्या कृपेनें अंगप्राप्ती झाली. या देशाचा राजा अंग असून तो ययातिपुत्र अनूच्या वंशांतील बली नामक राजाच्या स्त्रीला दीर्घतमा ऋषीपासून झाला होता [ ९,२३,५ ]. या देशाला कामाश्रम असें नामांतर असून तेथें पांडवांच्या वेळीं कर्ण राजा होता.

( २ ) दुर्योधन पक्षीय म्लेंछ राजा. हा कर्णाचा माण्डलीक असून भीमसेनाकडून मारला गेला.

( ३ ) शिक्षादि षडंगांनां अंग ह्मणतात.

**अङ्गद**–वालीचा मुलगा. हा बृहस्पतीचा अवतार होता. त्याला रामानें किष्किंधेचें यौवराज्य दिलें [ ९,१०,१९ ].

( २ ) लक्ष्मणाचा मुलगा. ह्यानें अंगदी नांवाची नगरी स्थापन केली [ ९,११,१२ ].

( ३ ) भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. हा त्याच युद्धांत मरण पावला.

**अंगदीया**–लक्ष्मण पुत्र अंगदाची नगरी. ही कारुपथ देशाची राजधानी असून ह्रिला अश्वनगर असेंहि नांव होतें.

**अंगना**–भारतवर्षीय महानदी.

**अंगलेपा**–एक नदी.

**अंगार**–चालु मन्वंतरांतील एक राजा. याचें मांधाता राजाशीं युद्ध झालें होतें.

**अंगारक**–ग्रहमालेंत बुधाचेवर दोन लक्ष योजनें असलेला ग्रह. हा प्रायः अशुभ असतो [ ५,२२,१४ ].

( २ ) सौवीरदेशीय राजपुत्र.

**अंगारका**–एक राक्षसी.

**अंगारपर्ण**–एक गंधर्व पांडव लाक्षागृहांतून मुक्त झाल्यावर गुप्तपणानें रात्रीचा प्रवास करीत असतां हा कुंभीनसी इत्यादि स्त्रियांसहवर्तमान त्यांस मार्गांत भेटला. तेथें परस्परांची बोलाचाली होऊन अर्जुनाचें व याचें युद्ध झालें. त्यांत अर्जुन अजिंक्य आहे, असें पाहून यानें अर्जुनास सूक्ष्म पदार्थ दर्शक चाक्षुषी विद्या दिली; व अर्जुनाजवळून अग्निशिरास्त्र विद्या आपण घेतली नंतर पुरोहितावांचून तुम्हीं हिण्डूं नका, व धौम्यऋषीस पुरोहित करा, असे सांगून तो निघून गेला

( २ ) एक वन.

**अंगारवाहिका**–एक नदी.

**अंगिरा**–ब्रह्मदेवाच्या मुखापासून झालेल्या एका मुलाचें नांव. ह्याची पत्नी श्रद्धा. [ ३,१२,२४ व ३,२४,२२ ] ह्याला बृहस्पति, उतथ्य, संवर्त, असे तीन पुत्र व सिनीवाली, राका, कुहु व अनुमति, अशा चार कन्या होत्या. महादेवाच्या शापानें हा मरण पावला. ( महर्षि शब्द पहा. )

( २ ) हाच पुन्हा चालू मन्वंतरांत वरुणाच्या यज्ञांत जे तीन ऋषी उत्पन्न झाले, त्यांत वारुणि अंगिरा ह्या नांवानें झाला. ह्याला अग्नीनें पुत्रत्वानें ग्रहण केलें होतें. त्यामुळें मुख्य अग्नि कांहीं

दिवस गुप्त झाला असतां हा स्वतः अग्नि होऊन त्याचा अधिकार चालविला. याला मरीचिकन्या सुरूपा ही पत्नी असून बृहस्पति, उतथ्य, पयस्य शांति, घोर, विरूप, संवर्त आणि सुधन्वा असे आठ पुत्र होते. शिवाय आत्मा, आयु, दम, दक्ष, सद, प्राण, हविष्मान्, गविष्ठ, ऋत आणि सत्य, असे दहा मुलगे आंगिरस नांवानें देव उत्पन्न झाले होते.

( ३ ) चाक्षुषमनूच्या वंशांतील उल्मुक राजा व पुष्करिणी यांचा एक पुत्र [४, १३,१७]. ह्याला उतथ्य व संवर्त असे दोन पुत्र होते [ ९,२,२६ ]. सुदर्शन विद्याधराला अंगिराचा शाप [ १०, ३४,३३ ]. स्यमंतपंचक क्षेत्रीं श्रीकृष्णाची भेट [ १०,८४,५ ].

( ४ ) श्रावणमहिन्यांत इंद्रनांवाच्या सूर्याबरोबर असणारा ऋषि [१२,११,३७].

**अचल**–शकुनीचा भाऊ. हा भारतीयुद्धांत आपल्या पन्नास भावांसह अर्जुनाकडून मरण पावला.

**अचला**-महेंद्र पर्वतापासून निघालेली नदी.

**अच्युत**–भगवंताचें नांव.

**अच्युतायु**-दुर्योधनपक्षीय राजा ह्याचा पुत्र दीर्घायु. ह्याला अर्जुनानें मारिलें.

**अच्छोद**-हिमालयावरील सरोवर.

**अच्छोदका**-एक नदी.

**अच्छोदा**-पितरांची मानस कन्या. (आमावसु शब्द पहा )

( २ ) एक नदी.

**अज**–भरतवंशांत प्रतिहर्त्यापासून स्तुतीचे ठिकाणीं झाला [ ५,१५,५ ].

( २ ) रघुवंशीय रघुचा पुत्र. ह्याचा पुत्र दशरथ [ ९,१०,१ ].

( ३ ) एक ऋषि.

( ४ ) विदेहवंशीय ऊर्ध्वकेतूचा पुत्र व पुरुजिताचा पिता [ ९,१३,२२ ].

( ५ ) सोमवंशीय जन्हु राजाच्या पुरु नामक पुत्राचें नामांतर.

( ६ ) भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा.

( ७ ) भगवंताचें नांव.

**अजक**–पुरूरव्याच्या वंशांतील बलाकाचा पुत्र. ह्याचा पुत्र कुश [९,१५,३ ].

( २ ) दनु पुत्र. एक दानव.

**अजगर**–( एक सापाची जात ) अघासुरानें कृष्णनाशाकरितां घेतलेलें कपटरूप [ १०,१२,१६ ]. हा प्रचंड सर्प अमेरिकेंतील न्यूगिनी वगैरे उष्ण देशांत, हिंदुस्थानांत, हिंदी बेटांत व आफ्रिकेच्या दलदलीच्या जागी आढळतो. अजगराच्या सुमारें ४० जाती असून त्या बहुतेक अमेरिकेंत आहेत. ब्रेझिलपर्यंतच्या प्रदेशांत एक जात आहे, तिचा रंग फिका तपकिरी असून त्यावर सुमारें १५।१८ पट्टे असतात.

( २ ) अवधूतानें केलेला एक गुरू [ ११,७,३३ ].

**अजगव**–शंकराचे धनुष्य. याशिवाय मांधाता, पृथु या राजांच्याही धनुष्यांस हें नांव आहे. महादेवाच्या धनुष्यास पिनाक अशी विशेष संज्ञा आहे.

**अजन**–तेरा सैंहिकेयांतील एक असुर. ( सैंहिकेय शब्द पहा. )

**अंजन**—अष्टदिग्गजांतील पश्चिम दिग्गज. आणि भारतवर्षीय पर्वत. यावर असित ऋषीचा आश्रम होता.

**अंजनपर्वा**—भीमसेनाचा नातु व घटोत्कचाचा पुत्र. हा रात्रियुद्धांत अश्वत्थाम्याकडून मारला गेला.

**अंजना**—कुंजर वानराची कन्या व केसरी वानराची पत्नी. पुंजकस्थली नांवाची अप्सरा शापानें पृथ्वीवर अंजना रूपान आली होती. हा एकदां पर्वतावर उभी असतां वाऱ्यानें हिचें वस्त्र किंचित उडालें, त्यामुळें तिला पाहून वायु कामपीडित झाला, व तिच्या पुढें येऊन उभा राहिला. तेव्हां तिनें पातिव्रत्य भंग न करण्याविषयीं विनाविलें असतां, त्यानें ठीक आहे असें म्हणून माझ्या संकल्पापासून तुला पराक्रमी मुलगा होईल, असा वर देऊन तो निघून गेला. तिला जो पुत्र झाला, तो मारुताचे प्रसादानें झाल्यामुळें मारुति असें नांव पावला.

**अजनाभः**—भारतवर्षाचें प्राचीन नांव. येथें ऋषभराजा राज्य करीत असे. त्याचा पुत्र जो भरत त्यावरून ह्यास भारत असें म्हणतात [५,४,३ व ५,७,३].

( २ ) जंबूद्वीपांतील एक पर्वत.

**अजमीढ**—सोमवंशीय हस्तिराजाचा पुत्र. ह्याला प्रिमेधादि ब्राह्मण व बृहदिषु हे क्षात्रिय पुत्र असून शिवाय नलिनी नामक स्त्रीचे ठिकाणीं नीलपुत्र झाला [ ९,२१,२२-३० ]. ह्याला एकंदर चार स्त्रिया होत्या. त्याच्या संततीस अजमीढ हीच संज्ञा आहे. ह्याचे प्रिमेध, ऋक्ष, बृहदिषु व नील, असे चार मुख्य पुत्र होते. त्यांतील पहिल्याची संतति तपानें ब्राह्मण झाली. दुसऱ्याच्या वंशांत जरासंधादि राजे व कौरव पांडव झाले. तिसऱ्या वंशजांस बार्हदिषव राजे अशी संज्ञा होती, व चौथ्याच्या वंशांत द्रुपदादि पांचाल राजे आणि मुद्गल संज्ञक ब्राह्मण झाले.

( २ ) एक ब्रह्मऋषि.

( ३ ) सोमवंशीय जन्हुपुत्र.

( ४ ) पूरुचें नामांतर.

( ५ ) पुरुवंशीय सुहोत्रास ऐक्ष्वाकी पासून तीन पुत्र झाले, त्यांतील ज्येष्ठ पुत्र अजमीढ. यास तीन स्त्रियांपासून ४ पुत्र झाले, धूमिनीला ऋक्ष, नीलीला दुष्यंत व परमेष्ठी, केशीनीचा पुत्र जन्हु. यानेंच गंगा प्राशन केली.

( ६ ) हस्तिनापुर वसविणारा सोमवंशीय हस्तीचा नातु व विकुंठनाचा पुत्र. यांस ४ भार्या. कैकयी, गांधारी, विशाला व ऋक्षी. यापासून एकंदर २४ पुत्र झाले. ऋक्षेचा पुत्र संवरण हा वंशस्थापक होय.

( ७ ) अजमीढ, द्विमीढ, पुरुमीढ हे हस्तिनराचे पुत्र. अजमीढाचा पुत्र कण्व व त्याचा मेधाथि. अजमीढाचा दुसरा पुत्र बृहद्दिषु, ऋक्षनांवाच्या पुत्रापासून संवरण व संवरणाचा कुरु. यानेंच कुरुक्षेत्र हें धर्मक्षेत्र केलें.

**अजःपाति**—एक ब्रह्मऋषि व त्याचें कुल. ( कृष्णपराशर शब्द पहा. )

**अजय**–शिशुनागसंज्ञक दहा राजांपैकीं सातवा राजा. ह्याचा पिता दर्भक व पुत्र नंदिवर्धन [ १२,१,६ ].

**अजस्य**—एक ऋषि.

**अजातशत्रुः**–धर्मराजाचें नांव [ १,८,५ ].

(२) कलियुगांतील शिशुनागवंशीय विधिसाराचा पुत्र. [ १२,१,६ ]

**अजामीळ**–कान्यकुब्ज देशांतील धर्मभ्रष्ट ब्राह्मण. शेवटीं त्याचा उद्धार झाला [ ६,१,२१ व ६,२,२४ ].

**अजामुखी**--अशोकवनिकेंत सीतासंरक्षणार्थ असलेली एक राक्षसी.

**अजित**–चाक्षुषमन्वंतरांत वैराग्य व संभूति ह्यापासून झालेला अवतार [८,५,९ ].

( २ ) जित न होणारा ( परमात्मा. )

**अजिव्हिका**--लंकेच्या अशोकवनिकेंतील एक राक्षसी.

**अजीगर्तः**–भृगुकुलोत्पन्न ऋषि. ह्याला शुनःपुच्छ, शुनःशेप, शुनोलांगुल, असे तीन पुत्र होते. त्यापैकीं शुनःशेपास वरुणाच्या यज्ञासाठीं हरिश्चंद्रराजास विकलें होतें.

**अजैकपात्**–भूतऋषीच्या घोरा नांवाच्या स्त्रीपासून झाला. अकरा रुद्रांपैकीं एक. [ ६,६,१८ ]

**अजैकपाद्**—यज्ञसंबंधीं एक अग्नि.

**अटवीपुरी**--पाण्डवांच्या वेळेस कलिंग देशाच्या दक्षिणेकडील एक नगरी.

**अट्टहास**--भारतवर्षीय एक तीर्थ.

**अठिद्**--एकदेश.

**अटमान**–आंध्रराजानंतर जे तीस राजे झाले त्यांपैकीं एक. ह्याचा पिता मेघस्वाति व पुत्र अनिष्टकर्मा [ १२,१,२४ ].

**अणिमा**–आठ सिद्धींपैकीं एक. हिच्या योगानें अणूपर्यंत लहान होतां येतें. [ ११,१५,४ ]

**अणिमाण्डव्य**-- माण्डव्य ऋषीचें नाम तर.

**अणुह**—नीप राजाचें नामांतर.

( नीप शब्द पहा. )

**अतल**–सप्तपातालांपैकीं एक. हें पृथ्वीच्याखालीं चार हजार कोस असून तेथें स्वर्गासारखीं सुखें आहेत [५,२४,७].

**अतिकाय**-रावणाचा मुलगा [९,१० १८]. हा रावणाला धान्यमालिनी नामक स्त्रीपासून झाला असून तो फार स्थूल होता. ब्रह्मदेवाला प्रसन्न करून ह्यानें अनेक शस्त्रास्त्रें व सुरासुरांपासून अवध्यत्व मिळविलें होतें. यानें इंद्राचा पराभव केला, व वरुणापासून पाश आणिला. ह्याचें रावणाला मोठें सहाय्य होतें. हा रामरावण युद्धांत लक्ष्मणाचे हातून मरण पावला.

**अतिथि** रामपुत्र कुशाचा मुलगा. याचा मुलगा निषध [ ९,१२,१ ].

( २ ) अत्रिकुलांतील एक ऋषि.

**अतिनामा**–चाक्षुष मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

**अतिबाहु**–प्राधेपासून झालेला एक गंधर्व.

**अतिभानु**-श्रीकृष्ण–सत्यभामा यांचा पुत्र. [ १०,६१,१० ]

**अतिरात्र**-एका यज्ञाचें नांव. हा यज्ञ ब्रह्मदेवाच्या मुखापासून उत्पन्न झाला. [ ३,१२,४० ].

( २ ) चक्षूपासून नड्वलेला झालेला पुत्र [ ४,१३,१६ ].

**अतीताध्यात्म**--यजुर्वेदोपनिषत्.

**अत्यग्निष्टोम**--यज्ञविशेष.

**अत्युष्ण**--भारतवर्षीय एक तीर्थ.

**अत्रि**-ब्रह्मदेवाचा मुलगा व सप्तर्षींपैकीं एक. ह्यानें ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून प्रजावृद्धीकरितां ऋक्षपर्वतावर तपश्चर्या केली व तेथें तीन देव प्राप्त होऊन त्यांनीं याला वर दिला [ ४,१,१७-३३ ]. ह्याच्या पत्नीचें नांव अनसूया असून तिला अयोनिसंभव चंद्र, दत्त, दुर्वास हे तीन पुत्र होते. ते ब्रह्मा, विष्णु, महेश यांच्या अंशापासून झाले. हा चंद्रवंशीय राजांचा पूर्वज व गोत्रप्रवर्तक ऋषि. ह्यानें पृथुपुत्र विजिताश्वाला इंद्राला मारण्याची आज्ञा दिली [ ४,१९,१३ ]. सर्व ब्रह्म मानसपुत्र महादेवाच्या शापानें मरण पावले त्यांत हाही मरण पावला.

( २ ) वैवस्वत मन्वंतरांत ब्रह्मदेवानें यज्ञ केला, त्यांत हा अग्नीच्या आर्च नामक ज्वालेपासून उत्पन्न झाला. येथेंहि त्याप अनसूया पत्नी असून दत्त, दुर्वास, सोम व अर्यमा असे चार पुत्र आणि अमला नांवाची मद्दा ब्रह्मनिष्ठ कन्या, अशीं अपत्यें होतीं. रामचंद्र दंडकारण्यांत आले असतां ह्यांच्या दर्शनास आले होते. ह्यानें त्यांचें स्वागत केलें, व अनसूयेनें सीतेला अंगरागादिक उत्तम वस्तु दिल्या.

( ३ ) ज्येष्ठमहिन्यांत मित्रनांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा ऋषी[१२,११,३५].

**अथर्व**-व्यासानें विभागलेल्या चौथ्या वेदाचें नांव. हा वेद सुमंतूला शिकविला [ १२,६,५० ]. ह्याची उत्पत्ति ब्रह्मदेवाच्या उत्तर मुखापासून झाली [ ३,१२,३७ ].

**अथर्व**-स्वायंभुव मन्वंतरांतील एक ऋषि. हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असून त्याला कर्दमाची कन्या शांति आणि चित्ति अशा दोन स्त्रिया, व धृतव्रत, दध्यंच आणि अथर्वशिरा असे तीन पुत्र होते. ह्यांना अथर्वण असें म्हणतात. हा युधिष्ठिराच्या यज्ञांत ऋत्विज होता. [ १०,७४,९ ]

**अथर्वशिखा**--अथर्व वेदोपनिषत्

**अथर्वशीर**- ,,

**अथर्वशीरा**--अथर्वऋषीचा तिसरा पुत्र.

**अथर्वा**--एक ऋषि. नहुष इंद्रपदापासून भ्रष्ट होऊन इंद्र स्वस्थानापन्न झाल्यावर या ऋषीनें त्याचें उत्तम प्रकारें यश गायिलें असतां संतुष्ट होऊन इंद्रानें ह्या ऋषीस हें नांव, अथर्ववेदाचें आचार्यत्व व यज्ञांत हविर्भाग दिला.

**अथर्वांगिरस**-अथर्व वेदाची एक शाखा. हिचें अध्ययन सुमन्तु ऋषीनें केलें [ १,४,२२]. ह्या वेदाला अंगिरापत्नी सतान आपला पुत्र मानिलें [ ६,६, १९ ] आणि [ १२,६,५३ ].

**अथौजाः**--वैशाख महिन्यांत अर्यमा सूर्याबरोबर असणारा यक्ष [१२,११,३४].

**अदिति**-दक्षकन्या व कश्यप पत्नी. हिच्यापासून आदित्य नांवाचे देव झाले [ ६,६,२५-३९ ]. अदितीच्या ठायीं वामन (अवतार) झाला [८,१७,२१]. हिला विवस्वान् नांवाचा पुत्र झाला. त्याचा पुत्र श्राद्धदेव-वैवस्वत-मनु. [ ९,१,१० ].

**अदृश्यंति**–मैत्रावरुणी वसिष्ठपुत्र शक्ती याची स्त्री व पराशर ऋषीची माता.

**अद्भुत**–नवव्या दक्षसावर्णि मन्वंतरांतील इंद्र [ ८,१३,१९ ].

**अद्भुतसिंह**–नरसिंहाचें नांव [१०,४०,९].

**अद्रिका**–एक अप्सरा. ही शापानें मत्स्य झाली असतां हिला मत्स्यराज पुत्र व मत्स्यगंधिनी कन्या असें जुळें झालें. ( उपरिचर वसु शब्द पहा )

**अधर्म**–ब्रह्मदेवाच्या पृष्ठ भागापासून ह्याची उत्पत्ति झाली असून त्याला मृषा स्त्री व दंभ आणि माया हीं दोन मुलें होतीं. [ ३,१२,२५ ] आणि [ ४,८,२ ]

**अधिपुरुष**–स्वायंभु मनूस संज्ञा.

**अधिरथ**–अनुवंशीय धृतव्रताचा नातु व सत्कर्म्याचा मुलगा. ह्याची पत्नी राधा. ह्याला गंगातीरावर पेटींतून वहात येणारा मुलगा ( कर्ण ) सांपडला [ ९,२३,१२ ].

**अधिराज्य**–एक देश. येथें पांडवांच्या वेळीं दंतवक्र नावांचा राजा होता.

**अधिवंग**–गौतम वनासमीपचें एक तीर्थ.

**अधृष्या**–भारतवर्षीय एक नदी.

**अध्वर्युः**–यज्ञांतील यजुर्वेद शाखेचा मुख्य ऋत्विज [ ४,४,३३ ].

**अनग्निः**–पितरांतील एक भेद. ह्यांची पत्नी दक्षकन्या स्वधा [ ४,१,६३ ].

**अनघ**–एक गंधर्व, एक राजर्षि.

**अनघा**–शाकद्वीपांतील नदी [ ५,२०,२६ ].

**अनंग**–महादेवानें भस्म केल्यावर मदनास प्राप्त झालेलें नांव.

( २ ) रामसेनेंतील एक वानर.

**अनंगा**–भारतवर्षीय एक नदी.

**अनंत**–भगवंताचें एक नांव

( २ ) कश्यप व कद्रू यांपासून झालेल्या नागांतील एक नाग.

( ३ ) शेष नामक नागाची एक संज्ञा.

**अनंतविजय**–युधिष्ठिराचा शंख.

**अनंतशयन** त्रावणकोर येथें १४ हात लांबीची विष्णूची मूर्ति शेषावर निजलेली अशी आहे येथें शंकराचार्य यांनीं सह्य व्रात्य वैष्णवांस बोध करून आपल्या धर्मांत घेतलें.

**अनन्ती**–शतरूपेचें नामांतर.

**अनमित्र**–चंद्रवंशीय शिनिराजाचा मुलगा. हा मोठा पराक्रमी होता [९,२४,१२].

( २ ) सूर्यवंशीय इक्ष्वाकु कुलोत्पन्न निघ्न राजाचा मुलगा.

( ३ ) यदुकुलोत्पन्न वृष्णीच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याला निघ्न, शिनि, आणि वृष्णि असे तीन पुत्र होते.

**अनरण्य**–सूर्यवंशीय त्रसद्दस्यूचा मुलगा. ह्याला हर्यश्व व वृहदश्व असे दोन मुलगे होते [ ९,७,४ ]. हा राजा अयोध्येंत राज्य करीत असतां रावण दिग्विजय करीत यथ आला, तेव्हां याचा पराजय होऊन हा रणभूमीवर पडला असतां ह्यानें रावणांस शाप दिला कीं, माझें तप, दान, सत्य, हीं जर यथार्थ असतील तर माझा वंशज तुझा नाश करील.

( २ ) इक्ष्वाकु कुलांतील सर्व काम अथवा सर्वकर्मा याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ पुत्र. याचा पुत्र निघ्न.

( ३ ) कार्तिक महिन्यांत मांसाशन वर्ज्य केलेल्या राजांपैकीं एक राजा.

**अनर्वा**:–वृत्रासुराच्या सैन्यांतील एक प्रमुख दैत्य [ ६,१०,१९ ].

**अनल**–अष्टवसु पैकीं एक, याला कुमार, शाख, विशाख आणि नैगमेय असे चार पुत्र होते. हा प्रस्तुत मन्वंतरांतील आग्नेयी दिशेचा स्वामी आहे.

( २ ) बिभिषणाच्या आमात्यांपैकीं एक.

( ३ ) गरुडाचा मुलगा.

( ४ ) यमसभेंतील एक राजा.

**अनला**–सुरभीकन्या रोहिणीच्या दोन कन्यांतील दुसरी. हिची कन्या शुकी.

( २ ) माल्यवान् राक्षस व सुंदरी याची कन्या व विश्वासु राक्षसाची पत्नी. हीची कन्या कुंभीनसी.

**अनवद्या**–कश्यप व प्राधा यांच्या पासून झालेल्या अप्सरांतील एक.

**अनसूय**–एक ब्रह्मऋषी.

**अनसूया**–कर्दमकन्या व अत्रीची पत्नी [ ३,२४ २२ ]. ( अत्रिशब्द पहा.)

( २ ) वैवस्तव मन्वंतरांतील अत्रि ऋषिची पत्नी. ही महापतीव्रता होती. एकदां दहा वर्षे अनावृष्टि झाली असतां हिनें आपल्या योगसामर्थ्यानें फल फुलें उत्पन्न करून प्राणिमात्रांस वाचविलें. मांडव्य ऋषीस शूलावर चढविलें असतां, त्या शूलास अंधारामुळें एका ऋषिपत्नीचा धक्का लागला त्यावरून मांडव्यानें शाप दिला कीं सुर्योदय होतांच विधवा होशील. हे ऐकून त्या स्त्रीनें सूर्योदयच होऊं दिला नाहीं. त्यामुळें सर्व प्राणीमात्रांचे व्यवहार बंद पडले; तेव्हां त्या स्त्रीची मैत्रीण महापतिव्रता अनुसूया आहे, असें जाणून सर्व देव तिच्याकडे आले, व देवांच्या प्रार्थनेवरून अनुसूयेनें आपल्या तपाच्या सामर्थानें त्या स्त्रीला वैधव्य येऊं न देतां सूर्योदय करवून सर्व जगास सुखी केलें.

**अनाधृष्य**- धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांतील एक

**अनिर्देश्य** यज्ञसंबंधीं एका अग्नीचें नांव.

**अनिमिषक्षेत्र**–विष्णूच्या विजयानें पवित्र झालेला प्रदेश. येथें सूतानें पुराणें सांगितलीं [ १,१,४ ].

**अनिरुद्ध**–प्रद्युम्न व रुक्मवती ह्यांचा मुलगा. ह्याला दहा हजार हत्तींचें बळ असून तो महारथी होता. ह्याला रुक्मीची नात रोचना व बाणाची मुलगी उषा ह्या दिल्या होत्या. रोचनेचा मुलगा वज्र [ १०,६१,१८-२५ ].

( २ ) हें एक परमेश्वराचें स्वरूप आहे [ १२,११,२१ ].

**अनिल**–कृष्णपत्नी मित्रविंदेचा पुत्र [ १०, ६१,१६ ].

**अनिष्टकर्मा**–कलियुगांत काण्वराजानंतर कृष्णशातकर्णादि जे तीस राजे झाले, त्यापैकीं सहावा राजा. ह्याचा पुत्र हालेय [ १२,१,२५ ].

**अनीह** रामचंद्राच्या वंशांतील देवानीकाचा पुत्र. याला अहीनर असें दुसरें नांव आहे. ह्याचे पुत्र पारियात्र व सहस्राश्व [ ९,१२,२ ].

**अनु**–ययातीचा मोठा मुलगा. ह्यानें बापाची जरा घेतली नाहीं, ह्मणून पितृशापामुळें राज्य मिळालें नाहीं. त्याला उत्तरेकडील म्लेंच्छाधिपत्य मिळालें होतें. याला सभानर, चक्षु व परोक्ष

असे तीन पुत्र होते [ ९,१८,३३ ] आणि [९,२३,१].

**अनु**–विदर्भवंशीय कुरुवश राजाचा पुत्र. ह्याचा मुलगा पुरुहोत्र [ ९,२४,६ ].

**अनु**–सात्वतवंशीय कपोतरोमा यादवाचा मुलगा. ह्याला तुंबुरु नामक मित्र व अन्धक नांवाचा पुत्र होता [ ९, २४,२०].

**अनुतापन**–दक्षकन्या व कश्यपपत्नी दनु हिच्या अठरा मुख्य मुलांपैकीं चौदावा पुत्र [ ६,६,३१ ].

**अनुपावृत्त**-भारतवर्षीय देश

**अनुमति**-शाल्मली द्वीपांतील एक नदी [ ५,२०,१० ].

( २ ) अंगिरा ऋषी व श्रद्धा यांची कन्या आणि धाता नांवाच्या सातव्या आदित्याची पत्नी. हिचा पुत्र पूर्णमास. [ ४,१,३४ आणि ६,१८,३ ]

**अनुम्लोचा**–एक अप्सरा. ही भाद्रपदांत विवस्वान नांवाच्या सूर्याबरोबर असते. [ १२,११,३८ ]

**अनुयायी**-धतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**अनुराधा**-एक नक्षत्र, व चंद्र पत्नी.

**अनुवत्सरः**—संवत्सरांतलि एक भेद. [५,२२,७ ]

**अनुविंद**-अवंतिदेशाचा राजा. हा कौरवपक्षीय होता. ह्याचा पराजय करून श्रीकृष्णानें ह्याची बहीण जी मित्रविंदा तिच्याशीं विवाह लाविला [१०,५८, ३०-३१ ].

( २ ) केकय राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. विंदाचा भ्राता. हा भारतीय युद्धांत पांडवाकडे होता.

( ३ ) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**अनुव्रत**-शाकद्वीपांतील एक जात. ही वायु-उपासक आहे [ ५,२०,२७ ].

**अनुशाल्व**-सौभपति शाल्वाचा भ्राता. शाल्वाला कृष्णानें मारल्यामुळें, त्याचा सूड उगविण्याकरितां पाण्डवांच्या अश्वमेधाच्या वेळीं श्रीकृष्ण स्त्रीपुत्रांसह पांडवाकडे आला असतां हा आपल्या सुतारनामक अमात्याकडून सेना सिद्ध करून गुप्तपणें हस्तिनापुरास आला. तेथें परत आलेला यज्ञियश्याम्यकर्ण अश्व, श्रीकृष्ण, धर्मराज इत्यादि पहात असतां यांनें एकाएकी तो अश्व हरण केला, व पळून गला. तेव्हं भीमसेन त्याच्या माग लागला. प्रद्युम्न, वृषकेतु वगैरे वीरांनीं त्याला धरून आणण्याचे विडे उचलले. पुढें परस्परांचे युद्ध चालू असतां प्रद्युम्नाचा पराभव झाला, पण वृषकेतुनें त्यास धरून कृष्णापुढें आणलें. तेथें कृष्ण आपणास मारील ह्या भीतीनें त्यानें श्रीकृष्णाशा सख्य करून यज्ञास मदत देण्याचें आभिवचन दिलें.

**अनुष्णा**-भारतवर्षीय नदी.

**अनुष्टुपः**—बत्तीस अक्षरांचा एक छंद. हा ब्रम्हदेवाच्या स्नायूपासून उत्पन्न झाल [३,१२,४५ ].

**अनुह्लादः**—हिरण्यकशिपु व कयाधु यांचा दुसरा पुत्र व प्रल्हादाचा भाऊ. याला सुर्म्या नांवाची पत्नी व बाष्कल व माहिष असे दोन पुत्र होते. [ ६,१८,१३ ]

**अनूचाना** कश्यप व प्राधा यांपासून झालेल्या अप्सरेंतील एक.

**अनूदय**-धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांतील एक

**अनूप**-गुजराथेंतील एक देश. यांत सहस्रार्जुनाची माहिष्मती नगरी नर्मदाकाठीं होती.

**अनूपक**-एक देश.

**अनेना**-सूर्यवंशीय पुरंजयाचा पुत्र. ह्याचा पुत्र पृथु [ ९,६,२० ].

( २ ) चंद्रवंशांतील पुरूरव्याचा पुत्र जो आयु त्याचा मुलगा. ह्याचा पुत्र शुद्ध [ ९,१७,२-११ ].

**अनौपम्या**-बाणासुराची स्त्री.

**अंतक**-संहारकर्त्री देवता. ही संज्ञा यमधर्मासही आहे.

**अतचार**-भारतवर्षीय देश.

**अंतर्धान**-पृथुराजाच्या पांच मुलांपैकीं ज्येष्ठ जो विजिताश्व त्याचें नामांतर हें नांव यांस अंतर्हित होण्याच्या शक्तीमुळ पडलें होतें.

**अंतरिक्ष**-प्रियव्रतवंशांतील ऋषभाचा पुत्र. हा महायोगी होता. यानें विदेह राजाच्या यज्ञांत जनकाला उपदेश करून भगवन्मायेचें स्वरूप सांगितलें. [ ५,४,११ आणि ११,२,२१ व ११,३,३ ].

( २ ) रामचंद्राच्या वंशांतील पुष्कराचा मुलगा.ह्याचा पुत्र सुतपा[९,१२,१२].

( ३ ) मुर दैत्याचा पुत्र. हा श्रीकृष्णाकडून मृत्यु पावला [ १०,५९,१२ ].

**अंतरिक्ष**-वैवस्वत मन्वंतरांतील तेराव्या चौकडींतील व्यास.

**अन्ध**-एका नदाचें नांव [ ५,१९,१८ ].

**अन्धक**-यादवांतील एक भेद [ ३,३,२५ ].

( २ ) सात्वतवंशीय एक राजा. ह्याचा मुलगा दुन्दुभि [ ९,२४,६-२० ].

( ३ ) एक असुर. एकदां शंकर पार्वती क्रीडा करीत असतां हा पार्वतीचें हरण करण्यास उद्युक्त झाला, म्हणून शंकराचें व ह्याचें अवंती देशांतील महाकाल वनांत मोठें युद्ध झालें. त्यावेळीं त्याच्या रक्तापासून अनेक अंधक उत्पन्न होऊं लागले, त्यांच्या नाशास्तव शंकरानें मातृगण उत्पन्न केला, पण नाश होईना, तेव्हां विष्णूनें शुष्करेवती नामक देवता उत्पन्न करून तें रक्त निःशेष करविलें तेव्हां इतर अंधकांचा नाश होऊन एकच अवशेष राहिला. त्याचा नाश करणार इतक्यांत त्यानें शंकराचें अतिशय करुणास्वरानें स्तवन केलें. म्हणून त्यास न मारतां शंकरानें आपलें गणत्व दिलें.

**अंतर्वेदि**-गंगा व यमुना यांमधील प्रदेश.

**अंधकूप** नरकाचें नांव [ ५,२६,१७ ].

**अंधतामिस्र**-नरकाचें नांव [ ३,१२,२ आणि ५,२६,९ ].

**अन्ध्र**-क्षत्रियराजे.दुष्यन्तपुत्र भरतानें दिग्विजयप्रसंगीं यांना जिंकलें [९,२०,३०].

( २ ) राजघराण्याचें नांव. हे आन्ध्रराजे कण्वराजांना मारून कलियुगांत राजे होतील [ १२,१,२२ ].

**अन्नाद**-विश्वरूपाच्या एका मस्तकाचें नांव [ ६,९,१].

(२) कृष्णपत्नी जी मित्रविंदा तिचा पुत्र. [ १०,६१,१६ ]

**अन्ह**–अष्टवसूंपैकीं एक.

**अपर्णा** महादेवाची पत्नी सती, दक्ष यज्ञांत मरण पावल्यावर हिमालयाच्या उदरीं जन्मली. तेथें तिनें पूर्वपतीचीच प्राप्ति व्हावी म्हणून वृक्षाचीं पानें खाऊन तप आरम्भिलें, पण त्याची प्राप्ति होईना, तेव्हां तिनें पानेंहि खाणें सोडिलें, म्हणून तिला हें नांव पडलें.

**अपर्णि**–एक ब्रह्मर्षि.

**अपर उत्तरउलूक**–मोदापुराच्या उत्तरेकडील भारतवर्षीय देश. उत्तरेकडे उलूक देश दोन असल्यामुळें, दुसऱ्यास हें नांव आहे. दिशाक्रम इंद्रप्रस्थ नगर मध्य मानून या ग्रंथांत धरला आहे.

**अपरउत्तरकुलिंद** उत्तरेकडे दोन कुलिंद देशांतील दुसऱ्याचें हें नांव होय. हा देश, कालकूट व सुमंडल यांच्यामध्यें असून दिशाक्रम वरप्रमाणेंच आहे.

**अपरतंगण**–एकाच दिशेकडे असणाऱ्या दोन तंगण देशांतील दुसऱ्याचें नांव.

**अपरताल**–वरप्रमाणेंच दुसरा ताल देश. हा अयोध्येकडे केकय देशांतून यावयास निघाले असतां प्रथम लागतो.

**अपरदक्षिण कुंतिराष्ट्र**–इंद्रप्रस्थाच्या दाक्षिणेकडील दुसरा कुंतिराष्ट्र देश.

**अपरदक्षिणनिषाद**–पांडवांच्या वेळेस दक्षिणेकडील जे म्लेंछ राजे होते, त्यांच्या देशाच्या दक्षिणेस, व पुरुषाद लोकांच्या देशाच्या उत्तरेस हा देश होता.

**अपरदक्षिणपाण्डय**–इंद्रप्रस्थाच्या दाक्षिणेकडील दुसरा पाण्डय देश. हा पांडवांच्या वेळेस द्राविड देशाच्या दक्षिणेस असल्याचें भारतांत लिहिलें आहे.

**अपरदक्षिणमत्स्य**-इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील दुसरा मत्स्य देश.

**अपरदक्षिणसेक**-इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील दुसरा सेक देश.

**अपरमंदा**–हिमालयावरील भारतवर्षीय तीर्थ

**अपरपूर्वविदेह**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील दुसरा विदेह देश. याची राजधानी मिथिलानगरी असून पाण्डवांच्या वेळेस तींत जनकवंशांतील बहुलाश्व नांवाचा जनक राज्य करीत होता. विदेहवंशी यांचा हाच देश होय.

**अपरपूर्वसुह्म**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील दुसरा सुह्म देश.

**अपरबल्लव**–एकाच दिशेकडील दोन बल्लव देशांतील दुसरा.

**अपराजित**–उत्तरेकडील एक दिग्गज. [५,२०,३९].

( २ ) एकादश रुद्रांपैकीं एक.

( ३ ) कृष्णपत्नी लक्ष्मणेचा पुत्र. [ १०,६१,१५ ].

( ४ ) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**अपराजिता**–शाकद्वीपांतील एक नदी. [ ५,२०,२६ ].

**अपरांत**- पश्चिमेकडील प्रदेश. उत्तरकोंकण.

**अपस्यौष**-एक ब्रह्मर्षि.

**अपाण्डु**-एक ब्रह्मर्षि.

**अपान्तरतम**-एक ऋषि [ ९,४,५७ ].

**अपान्हद**–भारतवर्षीय तीर्थ.

**अपोहय**–एक ब्रह्मर्षि.

**अप्रतिरथ**–चंद्रवंशीय रंतिभार राजाचा पुत्र. ह्याचा मुलगा कण्व [ ९,२०,६].

**अप्सरा**–चौदा रत्नांपैकीं एक रत्न [८,८,७].

( २ ) कश्यप व मुनि ह्यांची संतति. [ ६,६,२७ ].

**अप्सरोयुग**–भारतवर्षीय तीर्थ.

**अभय**–लक्षद्वीपांतील एक पोटखंड. येथें प्रियव्रतपुत्र इध्माजिव्ह अधिपति होता [ ५,२०,२ ].

( २ ) स्वायंभू मन्वंतरांतील धर्मऋषि व दया यांचा पुत्र.

( ३ ) एक ब्रह्मर्षि.

( ४ ) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**अभया**-क्रौंचद्वीपांतील एक नदी [ ५, २०,२१ ].

**अभिजित्**—एक शुभमुहूर्त. या मुहूर्तावर वराह अवतारी भगवंतानें हिरण्याक्षाचा वध केला [३,१८,२७ ].

( २ ) एक नक्षत्र [ ५,२३,६ ]. हें सर्व नक्षत्रांत श्रेष्ठ असून कृष्णाचें स्वरूप आहे. [ ११,१६,२७ ]

**अभिभू**-काशीराजाचा पुत्र. हा भारतीयुद्धांत पाण्डवांकडे होता.

**अभिमती**–द्रोण नांवाच्या वसूची पत्नी. [ ६,६,११ ]

**अभिमन्यु**–अर्जुन व सुभद्रा यांचा पुत्र. हा महारथी असून ह्याचा पुत्र परीक्षित्. हा अष्टवसूंतील सोम नामक वसूचा पुत्र वर्चस त्याच्या अंशापासून झाला होता. हा जन्मला त्याचवेळीं दीर्घबाहु वीर आणि महाक्रोधी दिसला, म्हणून त्याचें नांव अभिमन्यु ठेवलें. ह्यानें अर्जुनापासून दशविध धनुर्वेद, मानुष आणि दिव्य अस्त्रविद्या संपादन केली. त्यांत तो इतका प्रवीण होता कीं, त्याचें हस्तचापल्य पाहून बलराम संतुष्ट झाले, व त्यानें याला एक रौद्र नांवाचें अतिउत्तम धनुष्य दिलें. याचा रथ भव्य असून त्याला कपिल वर्णाचे अश्व असत. याचा ध्वज शार्ङ पक्षाचा असून याचा सुमित्र नांवाचा कुशल सारथि असे. हा अर्जुनाप्रमाणेंच पराक्रमी होता. भारती युद्धांत द्रोणाचार्य सेनापति असतां त्यांनी चक्रव्यूह रचून युद्धास सुरवात केली. त्यावेळीं अर्जुन दुसरीकडे युद्धांत गुंतला असल्यानें धर्मराजाच्या आज्ञेनें हा चक्रव्यूहांत शिरला, व तेथें अनेक योध्यांशीं निकरानें लढून आपलें शौर्य गाजविलें. पण त्यावेळीं याला एकटा पाहून द्रोण कर्ण, कृप, अश्वत्थामा, दुर्योधनपुत्र लक्ष्मण, जयद्रथ, दुःशासन इत्यादि वीर याच्यावर एकदम जाऊन याला बेशुद्धावस्थेंत खालीं पाडला; हा पुन्हां उठणार तोंच दुःशासनपुत्रानें याच्या मस्तकांत गदाप्रहार केला, त्यामुळ मस्तक बिदीर्ण होऊन हा मृत झाला. अभिमन्यु आपला मामा जो श्रीकृष्ण त्याप्रमाणेंच रूप–गुणानें होता. हा बलरामाला प्रिय असे. याला बलरामाची कन्या वत्सला व विराटाची कन्या उत्तरा अशा दोन स्त्रिया होत्या हा मृत झाला त्या वेळीं उत्तरा गर्भवती असून तिला झालेला पुत्र तोच परीक्षित राजा [ ९,२२,३३ ]

( २ ) सहावा चक्षुमनूचा पुत्र.

**अभिमान**–स्वायंभु मन्वंतरांतील धर्मऋषि व उन्नति यांचा पुत्र.

**अभिसार**–भातवर्षीय देश.

**अभिसारीपुरी**-अभिसार देशाची राजधानी. येथील राजा चित्रसेन.

**अभियुक्त**—कुशद्वीपांतील लोक. हे अग्नीची उपासना करितात [ ५,२०,१६ ].

**अभूतरजस्**—रैवत मन्वंतरांतील देव विशेष.

**अंभोरुह**—विश्वामित्राचा एक पुत्र.

**अमरकंटक**—एक पर्वत. हा कलिंग देशांत असून एक योजन चौरस आहे. यापासून नर्मदा नदी निघाली आहे.

**अमरण**—एक ब्रह्मऋषि.

**अमरन्हृद्**—एक तीर्थ.

**अमर्क**—उशना ऋषीचा मुलगा. हा प्रल्हादाचा शिक्षक होता [ ७,५,१ ].

**अमर्षण**—सूर्यवंशीय संधिराजाचा पुत्र. ह्याचा मुलगा महस्वान् [ ९,१२,७ ].

**अमरावती**—इंद्राची स्वर्गांतील नगरी.

**अमल**—चंद्रहास राजाच्या धृष्टबुद्धि प्रधानाचा कनिष्ठ पुत्र.

**अमला**—वैवस्वत मन्वंतरांतील अत्रि ऋषीची कन्या ही ब्रह्मनिष्ठ होती.

**अमितः**—पुरूरव्याचा पुत्र व जयाचा मुलगा [ ९,१५,२ ].

**अमितौजा**—केतुमान नांवाच्या असुरांशाने जन्मलेला दुर्योधनपक्षीय राजा.

**अमित्राजित्**—सूर्यवंशीय सुतपाचा पुत्र. ह्याचा मुलगा बृहद्राज [९,१२,१२].

**अमूर्तरजा**—सोमवंशीय कुश अथवा कुशिक राजाचा पुत्र. ह्याला क्वचित मूर्तय असेंहि म्हटलें आहे.

**अमूर्तरय**—चंद्रवंशीय राजा. हा मोठा भगवद्भक्त होता [ २,७,४४].

**अमूर्तरया**—सूर्यवंशीय इलकुलोत्पन्न मय राजाचा वंशज.

**अमृत**—प्लक्ष द्वीपांतील एक खंड [५,२०,३].

( २ ) प्रियव्रतपुत्र इध्मजिव्हाच्या सात मुलांपैकीं एक [ ५,२०,२ ].

( ३ ) समुद्रमंथन प्रसंगीं निघालेल्या चौदा रत्नांपैकीं एक रत्न [ ८,८,३४ ].

( ४ ) परमेश्वराचें नांव [१२,१३,१९].

**अमृतनाद**—मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**अमृतप्रभ**—आठव्या सावर्णि मन्वंतरांतील देव [ ८,१३,१२ ].

**अमृतबिंदु**—मुख्य यजुर्वेदोपनिषत.

**अमृतवृत्ति**—याचना न करितां रहाणें अशी जी वृत्ति ती [ ७,११,१८].

**अमृतौघा**—क्रौंचद्वीपांतील एक नदी. [ ५,२०,२१].

**अमोघ**—बृहस्पति व तारा यांची कन्या जी स्वाहा, तिच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

**अम्बर**—वृत्रासुराच्या सैन्यांतील एक दैत्य. [६,१०,१९ ].

**अम्बरीष**—सूर्यवंशीय नाभागाचा पुत्र. हा मोठा भगवद्भक्त होता. तसाच परमदानशूर आणि पराक्रमीही होता. यानें सात दिवसांत सर्व पृथ्वी जिंकली याला विरूप, केतुमान् आणि शम्भु, असे तीन पुत्र होते. एकदां मास नित्याप्रमाणें कार्तिकमासांतील त्रिदिनात्मक एकादशीचें व्रत असतां, द्वादशीचे दिवशीं दुर्वासऋषि याचे घरीं आला. त्याचें पूजन केल्यावर भोजनाची विनंती केली. ऋषीनें ‘ठीक आहे’ म्हणून सांगून तो नदीवर गेला. इकडे द्वादशी तिथि संपत आल्यानें व्रताचें अतिक्रमण होऊं नये म्हणून राजानें ब्राह्मणांच्या संमतीनें तीर्थ प्राशन करून पारणें केलें हें दुर्वासास आवडलें नाहीं. तो संतापला, व त्यानें आपल्या जटेंतील

एक बट काढून आपटली. तिच्यापासून एक कृत्या उत्पन्न झाली, ती त्यानें राजाच्या अंगावर सोडली. राजा भगवद्भक्त असल्यानें विष्णूनें त्याच्या संरक्षणार्थ सुदर्शनचक्र सोडलें.

विष्णूच्या सुदर्शनचक्रानें कृत्येचा नाश करून तें चक्र दुर्वास ऋषीच्या मागें लागलें त्यामुळें त्रस्त झालेला तो ऋषि प्राणसंरक्षणार्थ पळत सुटला. तो ब्रह्मदेव, शंकर, विष्णु यांजकडे गेला. शेवटीं विष्णूच्या सांगण्यावरून तो परत अम्बरीषाकडे आला. ऋषीला पाहून प्रसन्न झालेल्या राजानें त्या चक्राची स्तुति केली, व त्यास शांत केलें. नंतर दुर्वासाला भोजन घालून आपण भोजन केलें. ह्याप्रमाणें परमश्रेष्ठ असा तो राजा आपल्या सच्छील पुत्रांच्या ठिकाणीं राज्यभार सोंपवून तपश्चर्येसाठीं अरण्यांत निघून गेला [ २,७,४४ आणि ९,४,१३ ].

( २ ) सूर्यवंशीय मांधाता राजाचा शशबिंदुकन्या बिंदुमतीचे ठिकाणीं झालेला पुत्र [ ९,६,३८ ]. ह्याला त्याच्या आजोबानें-युवनाश्वानें-पुत्र म्हणून घेतलें याचा पुत्र यौवनाश्व [ ९,७,१ ]

( ३ ) सूर्यवंशीय इक्ष्वाकु कुलांतील त्रिशंकूचा दुसरा पुत्र. यास श्रीमती ना. कन्या असून ती नारद पर्वतांच्या वादांत द्वादशादित्यांतील विष्णूस मिळाली.

( ४ ) एक ब्रह्मर्षि.

**अंबष्ठ**—कंसाच्या कुवलयापीड हत्तीचा महात. [ १०,४३,२-४-५ ]

( २ ) भारतवर्षीय देश. ब्राह्मणापासून वैश्य स्त्रीचे ठिकाणीं झालेली संतति, तिला अंबष्ठ म्हणतात. त्यांचा हा देश असावा. त्यावरून ह्या देशास हें नांव पडलें असावें.

( ३ ) भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. अर्जुनाचे हातून मरण पावला.

**अंबा**—पार्वतीचें नांव.

( २ ) सत्य लोकांतील श्रेष्ठ अप्सरा.

( ३ ) काशी राजाची ज्येष्ठ कन्या व अंबिका आणि अंबालिकेची भगिनी. ह्या तिघींचेंहि स्वयंवर सुरु असतां भीष्मानें इतर अनेक राजांना जिंकून त्यांचें हरण केलें; व त्यांचा विवाह भीष्माचा सावत्र भाऊ जो विचित्रवीर्य याच्याशीं ठरविला. पण हिनें सांगितलें कीं, मी मनानें शाल्व राजास वरिलें आहे. तेव्हां तिला शाल्वाकडे पाठविली. परंतु त्यानें तिचा स्वीकार केला नाहीं, म्हणून ती परत हस्तिनापुरास आली, आणि भीष्मास म्हणाली आपण माझें हरण केलें आहे, ह्मणून आतां आपण माझा स्वीकार करा. भीष्मानें ती गोष्ट नाकरली, तेव्हां ती खिन्न झाली व तपश्चर्या करून आयुष्य व्यतीत करण्याचा तिनें निश्चय केला, आणि शैखावत्य ऋषीच्या आश्रमांत गेली व तेथें राहिली. कांहीं दिवसांनीं तिचा आजोबा होत्रवाहन नामक राजा शिकारीसाठीं तेथें आला असतां त्याला हिचें सर्व वृत्त कळलें, तेव्हां तो परशुमाकडे गेला व भीष्माचें मन वळविण्याविषयीं त्यानें त्यास सांगितलें.

परशुराम होत्रवाहनास व अंबेस बरोबर घेऊन हस्तिनापुरास आला; व अंबेचें ग्रहण कर, नाहीं तर युद्ध कर असें त्यानें भीष्मास सांगितलें. भीष्मानें आपली प्रतिज्ञा विदित करून नाईलाजानें युद्धाचा स्वीकार केला. त्यांत कोणालाच जय मिळेना. शेवटीं ही बातमी ऐकून भीष्ममाता गंगा व परशुरामपिता जमदग्नि इत्यादि येऊन त्यांनीं आपापल्या पुत्रांचें निवारण केलें त्यानंतर परशुराम आतां माझा इलाज सरला, असें अंबेस सांगून व पितरांस वंदन करून आश्रमास गेला. भीष्मानें अनादर केला म्हणून अंबा फारच खवळली व तिनें भीष्मनाशाकरितां तप करण्यास आरम्भ केला. शेवटीं रुद्र प्रसन्न होऊन त्यानें, पुढच्या जन्मीं तूं द्रुपदकन्या शिखंडिनी होशील व कांहीं प्रसंगानें पुरुषत्व पावशील आणि या जन्मांतील सूडाचें स्मरण ठेवून भीष्मास मारशील! असा तिला वर दिला. तीच पुढें शिखंडिनी नांवानें जन्मास येऊन हिलाच पुढें शिखंडी असें नांव मिळालें; व भारती युद्धांत ही भीष्मवधास कारण झाली.

**अंबाजन्म**—भारतवर्षीयतीर्थ.

**अंबायवीया**—सत्यलोकांतील एक अप्सरा.

**अंबालिका**—काशीराजाची कन्या. विचित्रवीर्याची पत्नि. हिला भीष्मानें बलात्कारानें विचित्रवीर्याकरितां आणिलें होतें. हिचा पुत्र पांडु [ ९,२२,२४ ].

**अंबिका**—काशीराजाची कन्या. हिला भीष्मानें बलात्कारानें विचित्रवीर्याकरितां आणिलें होतें. विचित्रवर्याची पत्नि हिचा पुत्र धृतराष्ट्र [ ९,२२,२४ ].

( २ ) यशोदेच्या पोटीं आलेल्या मायेचें नांव. [ १०,२,१२ आणि १०,४,१३ ]

( ३ ) वनाचें नांव. गोपांनीं या वनांत जाऊन देवीची स्तुति केली. [ १०,३४,२ ]

( ४ ) देवीचें नांव–विवाहापूर्वी रुक्मिणी अंबिकेच्या दर्शनास गेली होती. [ १०,५३,४४ ]

**अम्बुधारा**—दक्षसावर्णि मन्वंतरांतील ऋषभाच्या आईचें नांव [ ८,१३,२० ].

**अंबुमति**—भारतवर्षीय तीर्थ.

**अम्बुवाहिनी**—भारत वर्षीय नदी.

**अय**—दुसऱ्या स्वारोचिष मन्वंतरांतील प्रजापति. वसिष्ठाचा पुत्र.

**अयन**—देवविशेष.

**अयःपान**—नरकाचें नांव; शास्त्रविरुद्ध सोमप्राशन करणाऱ्यांना हा प्राप्त होतो. [ ५,२६,२९ ]

**अयःशिरा**—कश्यप व दनु यांपासून झालेल्या दानवापैकीं एक

**अयास्य**—अंगिरसगोत्रोत्पन्न एक ऋषि. याच्या वंशजास आयास्य म्हटलें आहे. हरिश्चंद्र राजाच्या यज्ञांत हा उद्गाता होता.

**अयुत**—पुरुवंशीय राधिकाचा मुलगा. ह्याचा पुत्र क्रोधन [ ९,२१ १० ].

**अयुताजित्**—यदुवंशीय सात्वतपुत्र भजमानाच्या तीन पुत्रांपैकीं कनिष्ठ पुत्र. [ ९,२४,८ ]

**अयुतायु**—सूर्यवंशीय सिंधुद्वीपांचा मुलगा. ह्याचा पुत्र ऋतुपर्ण [ ९ ९,१६ ].

( २ ) चंद्रवंशीय श्रुतश्रव्याचा मुलगा. ह्याचा पुत्र निरामित्र [ ९,२२,४६ ].

**अयोध्या**--वैवस्वत मनूनें आपणांस राहण्यासाठीं स्थापिलेली नगरी. ही इंद्रप्रस्थाच्या पूर्वेस दिशाभेदानें दोन कोसल आहेत, त्यांतील आग्नेय कोसलची राजधानी. दशरथाच्या वेळीं ही नगरी बारा योजनें लांब व तीन योजनें रुंद होती. दाशरथी रामानें ११००० वर्षे येथें राज्य केल्यावर त्यांतील सर्व प्राणिमात्रासह वैकुंठास गमन केलें, म्हणून ती पुष्कळ वर्षे शून्य होती त्यानंतर सूर्यवंशीय ऋषभ राजानें हींत पुन्हां वसती केली. ( वा. रा. )

**अयोबाहु**--धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**अयोमुख**-कश्यप व दनु यांपासून झालेला दानव [ ६,६,३० ].

**अयोमुखी**-एक राक्षसी. सीताहरणानंतर तिच्या शोधार्थ रामलक्ष्मण मांतगाश्रमाकडे गेले असतां, तेथें ही लक्ष्मणास वरण्याची इच्छा करूं लागली. तेव्हां त्यानें शूर्पनखेप्रमाणेंच हिची अवस्था केली असत ही पळून गेली.

**अरजा**-भृगुवंशांतील भार्गव कन्या. हिचें कौमार्य दंडकराजानें नष्ट केलें होतें. ( दण्डक शब्द पहा )

**अरट्ट**-भारतवर्षीय देश. येथील अश्वांची उत्तम म्हणून प्रसिद्धि आहे.

**अरंतुक**-एक दव्ह.

**अरालि**-विश्वामित्रपुत्रापैकीं एक.

**अरि**-एक ब्रह्मऋषि.

**अरिघ्न**-रावणपक्षीय राक्षस.

**अरिजित्**-कृष्णपत्नी भद्रेचा पुत्र. [ १०,६१,१७ ]

**अमेरिजय**-एक यादव.

**अरिमर्दन**-सात्वतकुळांतील वृष्णिपुत्र श्वफल्काचा मुलगा. [९,२४,१६ ]

**अरिष्ट**-कश्यप व दनूपासून झालेला दानव [ २,७,३४ व ६,६,३० ].

( २ ) मित्र नांवाच्या आदित्याचा पुत्र. [ ६,१८,६ ]

( ३ ) कंसाचा सेवक. हा वृषभरूप धरून कृष्णनाशाकरितां गोकुळांत गेला असतां ह्याला कृष्णानें मारिलें [१०, ३६,१६ ].

( ४ ) कश्यप ऋषींचें नामांतर.

( ५ ) कश्यप व विनता यांचा पुत्र. याला तार्क्ष्य नामांतर आहे. बहुधा हें गरुडाचें नांव असावें.

( ६ ) प्राचेतस दक्षाच्या चार कन्यांचा पति.

( ७ ) अज्ञातवासांत असतां तंतिपाल या नांवाप्रमाणेंच सहदेवानें हें नांव धारण केलें होतें.

**अरिष्टसेन**-भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय एक राजा.

**अरिष्टनेमि**-बलीच्या सैन्यांतील एक दैत्य [ ८,६,३१ ].

( २ ) विदेहवंशांतील पुरुजिताचा पुत्र. ह्याचा पुत्र श्रुतायु [ ९,१३,२३ ].

( ३ ) पौष महिन्यांत भग नांवाच्या सूर्याबरोबर हिंडणारा दैत्य. [ १२,११,४२ ].

**अरिष्टा**-दक्षाची कन्या व कश्यपाची पत्नी. [ ६,६,२५ ].

**अरुज**-रावण पक्षीय राक्षस.

**अरुण**–अकराव्या धर्मसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक [ ८,१३,२५ ].

( २ ) तार्क्ष्य नांवाच्या कश्यपाला विनतेचे ठिकाणीं झालेला पुत्र. हा गरुडाचा ज्येष्ठ भाऊ होय [ ६,६,२२ ]. सूर्याचा सारथि [ ५,२१,१५ ]. विनतेनें याचें अंडें अपूर्ण काळीं फोडल्यामुळें हा चरणहीन जन्मला होता. यास अनूरु, विपाद अशीं नांवें आहेत यानें आपल्या आईस शाप दिला होता कीं मला तूं पंगू जन्मविलेंस म्हणून तुला सवतीचें दास्य करावें लागेल. परंतु पुनः तिच्या प्रार्थनेवरून उःशाप दिला कीं तुझा दुसरा पुत्र मुक्तता करील. याला श्येनी स्त्री आणि संपाति व जटायु असे पुत्र होते. ( भ. आदि० अ. २४ )

( ३ ) कश्यप व दनु यांपासून झालेला दानव [ ६,६,३० ].

( ४ ) मांधात्याच्या वंशांतील हर्यश्वाचा पुत्र. ह्याचा मुलगा त्रिबंधन [९,७,४].

( ५ ) मुर दैत्याचा पुत्र. ह्याला कृष्णानें मारिलें [ १०,५९,१२ ].

( ६ ) श्रीकृष्णाचा प्रपौत्र. हा मोठा योद्धा होता [ १०,९८,३३ ].

( ७ ) पांचव्या रैवतमनूच्या दशपुत्रांपैकीं एक.

( ८ ) गौतम गोत्रोत्पन्न ऋषि. यास क्वचित अरुणि असेंहि म्हटलें आहे. याचा पुत्र जो आरुणि तो उद्दालक या नांवानें प्रसिद्ध आहे.

( ९ ) विप्रचित्ति ना. दानव वंशांत जन्मलेला दानव. यानें गायत्रीजपानें तीस हजार वर्षे ब्रह्मदेवाचें आराधन केलें. ब्रह्मदेव प्रसन्न झाल्यावर यानें अमरत्व मागितलें; पण मिळालें नाहीं. तेव्हां स्त्री, पुरुष, द्विपाद, चतुष्पाद, यांच्यातून कोणापासूनहि मृत्यु नसावा असें मागितलें. तें देऊन ब्रह्मदेव सत्यलोकीं गेले. नंतर यानें सर्व असुर, दैत्य, जमवून त्रैलोक्याला पीडा दिली. तो त्रास असह्य होऊन त्यांतून सुटण्याकरितां सर्व देव एकत्र जमून विचार करीत असतां आकाशवाणी झाली कीं ' या दैत्यानें गायत्रीचा त्याग केल्याखेरीज याचा नाश व्हावयाचा नाहीं. ' हें ऐकून देवांनीं बृहस्पतीवर हें कार्य सोपविलें. तेव्हां बृहस्पति अरुणाकडे आले. त्यांना पाहतांच आश्चर्यानें ' आपण इकडे कसें ? ' असे अरुण ह्मणाला. तेव्हां बृहस्पति ह्मणाले, अरुणा, आम्ही ज्या गायत्रीची उपासना करितो, तिचाच तूं उपासक आहेस म्हणून आपण एकच आहों. तें ऐकून मोहानें यानें गायत्रीचा त्याग केला, व त्यामुळें तो नाश पावला. ( भा. )

( १० ) हिमालयाचें एक शिखर. हें कैलासाच्या पश्चिमेस आहे.

**अरुणा**–प्लक्षद्वीपांतील एक नदी [५,२०,४].

( २ ) कुरुक्षेत्रांतील हिमप्रस्थ स्थानाजवळ असणारी नदी. हिच्या जवळ सरस्वतीच्या सप्तप्रवाहांतील ओघवती नामक प्रवाह आहे.

( ३ ) प्राधापासून झालेली एक अप्सरा.

**अरुणायनि**–एक ब्रह्मर्षि.

**अरुणि**–ब्रह्ममानस पुत्र. हा विरक्त होता [ ४,८,१ ].

**अरुणोदा**–जंबुद्वीपांतील नदी. ही मंदर-पर्वतावरील आम्रफळांच्या रसापासून निघून पूर्व दिशेनें इलाखंडांतून वहाते. [ ५,१६,१७ ]

**अरुंधती**–कर्दमऋषीची कन्या व वसिष्ठाची पत्नी [ ३,२४,२३ ].
( २ ) वैवस्वत मन्वंतरांतील मैत्रावरुणि वासिष्ठ त्याची पत्नी व नारदाची भगिनी. हिचा पुत्र शक्ति.

**अरूपा**–कश्यप व प्राधा यांजपासून झालेली एक अप्सरा.

**अर्क**–आठ वसूंपैकीं एक [ ६,६,११ ].
( २ ) चंद्रवंशीय पुरुराजाचा पुत्र. [ ९,२१,३१ ].
(३) सूर्याचें एक नांव, ह्याची याज्ञवल्क्यानें उपासना केली [ १२,६,६६ ].
( ४ ) रामसेनेंतील एक वानर.

**अर्कपर्ण**–कश्यप व मुनि यापासून झालेला गंधर्व. यास तृणप असें म्हणतात.

**अर्चि**–कृशाश्वाची पत्नी [ ६,६,२० ].
(२ ) पृथुराजाची पत्नी. ही वेनराजाच्या देहापासून मंथनांतून निघाली. ही लक्ष्मीचा अवतार होय [ ४,१५,५ ].

**अर्चिमाली**–सीताशुद्धीसाठीं पश्चिमेकडे गेलेल्या वानरांतील एक.

**अर्चिष्मती**–बृहस्पतीची दुसरी स्त्री शुभा तिच्या सात कन्यांतील चौथी.

**अर्चिष्मान्**–राम सेनेंतलि वानर.

**अर्जुन**–कुरुवंशांतील पंडूची पत्नी जी कुंती तिला इंद्रांशापासून झालेला तिसरा मुलगा. हा मोठा धनुर्धारी होता. त्याला सुभद्रा, द्रौपदी, आदि स्त्रिया व अभिमन्यु, बभ्रूवाहन, इत्यादि पुत्र होते. हा श्रीकृष्णाचा भक्त व मित्र होता. त्यानें अग्नीला खांडववन दिलें [१०,५८,२५–२६]. श्रीकृष्णाची इंद्र-प्रस्थांत भेट [१०,७,२८]. जरासंधा-कडे गमन [१०,७२,१६]. तीर्थयात्रा करीत असतां प्रभासक्षेत्रीं गमन, व सुभद्राहरण [ १०,६,८ ]. ब्राह्मणपुत्र रक्षण करण्याची प्रतिज्ञा [ १० ८९, ४५] श्रीकृष्ण निजधामाला गेल्यानंतर अनिरुद्धपुत्र वज्राला इंद्रप्रस्थांत यानें अभिषेक केला [ ११,३१,२१ ].
( २ ) रैवत नामक पांचव्या मनूचा पुत्र. [ ८,५,२ ]
( ३ ) यदुवंशीय कृतवीर्याचा मुलगा. हा दत्तउपासक असून याला हजार हात होते, म्हणून याला 'सहस्रार्जुन' व कृतवीर्याचा मुलगा म्हणून 'कार्त-वीर्य' असेंहि म्हणतात [९,२३,२४].
( ४ ) एका गोपाचें नांव. [१०,२२,३१]
( ५ ) भगवंताचें स्वरूप. [११,१६,३५]

**अर्जुनक**–एक लुब्धक. गौतमी नामक एका वृद्ध ब्राह्मणीचा पुत्र सर्पदंशान मरण पावला असतां याने त्या सर्पास धरून आणिलें, व याला मारूं कां ? म्हणून त्या शोकग्रस्त ब्राह्मणीस विचारलें. माझा पुत्र आपल्या कर्मानें मेला, सर्पास सोडून दे, असें तिनें सांगितलें. ( भा० अनु० अ० १ )

**अर्जुनपाल**–वसुदेवाचा धाकटा भाऊ जो शमीक त्याचा मुलगा [ ९,२४,४४ ].

**अर्ण**–एक देश [ १०,८६,२० ].

**अर्थः**–स्वायंभू मन्वंतरांतील धर्म व बुद्धि यांचा पुत्र [ ४,१,५१ ].

**अर्थसाधक**-दशरथाच्या अष्टप्रधानांपैकीं.

**अर्थसिद्धिः** –धर्म व साध्य यांजपासून झालेल्या साध्य नामक गणाचा पुत्र. [ ६,६ ७ ]

**अर्द्धकील**–एक सरोवर. (दर्भि शब्द पहा)

**अर्बुद**–यादवकुळांतील हा एक भेद आहे. [ ११,३०,१८ ]

( २ ) एक देश. [ १२,१,३८ ]

**अर्यमा**–पितरांची देवता व परमेश्वराचें एक स्वरूप. [ ११,१६,१५ ] कल्पारंभीं यमाच्यापूर्वी हा दक्षिण दिक्पाल होता.

( २ ) बारा सूर्यांपैकीं एक. हा वैशाख महिन्यांत असतो. [ ६,६,३९ आणि १२,११,३४ ] कधीं कधीं यम नसल्यास त्याचा अधिकार या मन्वंतरांत हा चालवितो.

**अर्वावसु** रैभ्यऋषीच्या दोन पुत्रांपैकीं दुसरा. हा फार गुणवान होता. ( यवक्रीत शब्द पहा )

**अर्षि**–श्रवाऋषीच्या दोन पुत्रांतील ज्येष्ट.

**अर्ष्टिषेण**–भृगुकुलोत्पन्न ऋषि. ह्याचा युधिष्ठिराशीं संवाद झाला होता. याचे वंशज आर्ष्टिषेण. (भा. वन० अ.१४)

**अर्हन्**–कोंकवेंक देशांचा राजा ऋषभदेव अंतर्निष्ट होऊन उन्मत्ताप्रमाणें फिरत असतां त्याचें शरीर दावाग्नींत भस्म झालें, ती त्याची दीक्षा ऐकून ह्या राजानें अंतर्निष्ट न होतां बाह्य कर्मांचा त्याग केला. [ ५-६-९ ].

**अलकनंदा**–एक नदी. ही कुबेराच्या अलका नगरीच्या बाह्यप्रदेशांत वहाते. [ ४,६,२४ आणि ५,१७,५ ]

**अलका**–कुबेराची नगरी. [ ४,६,२३

**अलब्ध**–एक ब्रह्मर्षि.

**अलबुष**–बकासुराचा बंधु दुर्योधन पक्षीय राक्षस. भारती युद्धांत घटोत्कचानें याला मारिलें.

( २ ) जटासुराचा पुत्र. पितृवधाबद्दल भीमाचा सूड घेण्याकरितां दुर्योधन पक्षाकडून लढत असतां मारला गेला.

( ३ ) दुर्योधनपक्षीय राजा. ह्यास सात्यकीनें मारिलें.

**अलम्बुषा**–एक अप्सरा. हिचा विवाह तृणबिंदूशी होऊन हिला कन्या झाली तिचें नांव इडाविडा. [ ९,२,३१ ]

**अलर्क**–पुरूरव्याच्या वंशांतील कुवलयाश्वाचा पुत्र. ह्यानें महासष्ट हजार वर्षे राज्य केलें. ह्याचा पुत्र संतति. [ ९,१७,६–७ ]

( २ ) एक राजा. हा आपलें मन ताब्यांत ठेवण्यासाठीं बाण सोडीत असतां मन त्यास म्हणालें, ह्या बाह्य बाणांनीं तूं मरशील. ह्याकरितां मी मरेन असे बाण पहा.

( ३ ) एक राजर्षि. यानें एका अंध ब्राह्मणास आपले नेत्र दिले होते.

**अलायुध**–एक राक्षस. भारतीयुद्धांत रात्रीं कर्ण व घटोत्कच यांचा घोर संग्राम चालला असतां कर्ण वांचत नाहीं असें पाहून हा दुर्योधनाज्ञेनें युद्धांत शिरला व भीमाशीं युद्ध करून त्यास जर्जर केलें. इतक्यांत कृष्णाज्ञेन घटोत्कच

पुढें झाला, व युद्ध करून त्यानें यास ठार मारिलें. याचा रथ घटोत्कचाप्रमाणेंच शंभर अश्वांचा होता. (भा.)

**अलोलुप**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**अवगाह**–वृष्णिकुलोत्पन्न यादव.

**अवटनिरोधनः**–प्राणिमात्रांना कोंडून ठेवून हाल करणाऱ्या लोकांना प्राप्त होणारा नरक. [ ५,२६,७-३४ ]

**अवटोदा**–नदीचें नांव. [ ५,१९,१८ ]

**अवत्सार**–( वत्सार शब्द पहा. )

**अवधूत**–अत्रिपुत्र दत्तात्रेयाचें दुसरें नांव. याचे चोवीस गुरू असून यानें यदुराजाला उपदेश केला. [ ११,७,२४-३३ आणि ११,९,३३ ]

**अवन्ति**–देशाचें नांव. ( उज्जयिनी प्रांत [ १०,४५,३१ ]

**अवन्तिका**–( उज्जयिनी ) अवन्ति देशाची राजधानी. [ १०,४५,३१ ]

**अवरोधन**–गय व गयंती यांचा पुत्र. [ ५,१५,१४ ]

**अविकंपन**–ज्येष्ठ ऋषीचा शिष्य.

**अविज्ञात**–शाल्मलीद्वीपांतील एक खंड व त्याचा अधिपति जो यज्ञबाहु त्याचा मुलगा. [ ५-२०-९ ]

( २ ) पुरंजनाचा मित्र. [ ४,२५,१० आणि ४,२९,३ ]

**अविन्ध्य**–लंकेंतील सदाचरणी राक्षस. त्यानें सीता रामचंद्रास द्यावी म्हणून रावणाला उपदेश केला होता. रामाचें कुशल वृत्त त्रिजटेकडून हा वेळोवेळीं सीतेस कळवीत असे.

**अविमुक्त**–काशीक्षेत्र व कुरुक्षेत्राचें नांव.

**अवीचि**–एक नरक. हा फार खोल असून त्यांत पाषाणभूमि असूनहि मोठमोठ्या लाटा असतात. खोटी साक्ष देणाऱ्यांना ह्याची प्राप्ति होते. [ ५,२६,२८ ]

**अव्यक्त**–सामवेदोपनिषत्.

**अव्यय**–बारा भार्गव देवांतील एक.

**अशना**–बलीची स्त्री. [ ६,१८,१७ ]

**अशनिप्रभ**–रावणपक्षीय राक्षस. ह्यास द्विविदानें मारिलें.

**अंशु**–एक गोप. [ १०,२२,३१ ]

( २ ) मार्गशीर्ष महिन्यांत असणाऱ्या सूर्याचें नांव. [ १२,११,४१ ]

**अंशुधानपुर**–गंगातीरावरील एक शहर.

**अंशुमती**–यमुनानदीचें नांव.

**अंशुमान्**–सगराचा पौत्र व असमंजसाचा पुत्र. सगरानंतर हा गादीवर बसला. [ ९,८,३, ] [ ९,८,१५ ] ह्यानें पृथ्वीवर गंगा आणण्याकरितां प्रथम तपश्चर्येला प्रारम्भ केला, पण यश आलें नाहीं. ह्याची स्त्री पितरांची कन्या यशोदा असून ह्याचाच पुत्र दिलीप होय [ ९,९,१ ].

**अशोक**–( अकोप शब्द पहा )

( २ ) दुर्योधनपक्षीय राजा.

( ३ ) काम्यकवनाच्या दक्षिणेकडील तीर्थ.

**अशोकवनिका**–लंकेंतील उद्यान. येथें रावणानें सीतेला ठेविलें होतें. मारुतीनें ह्याचा विध्वंस केला [ ९,१०,३० ].

( २ ) विहार करण्याचें स्थळ. ययातिराजा देवयानीसह ह्यांत रहात असे.

( ३ ) रामचंद्राचें विहार स्थळ.

**अशोकवर्धनः**–मौर्यवंशीय चंद्रगुप्ताचा पौत्र व वारिसाराचा पुत्र. ह्याचा पुत्र सुयश [ १२,१,१३ ].

**अश्मक**–सूर्यवंशीय मित्रसहाचा मुलगा. (मदयन्ती शब्द पहा.) [ ९,९,३९ ]

( २ ) दुर्योधनपक्षीय राजा. ह्यास अभिमन्यूनें मारिलें.

( ३ ) एक देश.

( ४ ) एक ब्राह्मण. याचा जनकाशीं संवाद झाला होता.

**अश्मनगर**–कालकेय असुरांचें पुर.

**अश्मरथ्य**–एकऋषि. याचे वंशजआश्मरथ्य.

**अश्व**–दनुपुत्र दानव.

**अश्वकेतु**–मगधदेशीय दुर्योधनपक्षीय राजा.

**अश्वग्रीव**–दनुपुत्र दानव.

**अश्वचक्र**–कृष्णपुत्र सांबानें मारलेला राजा.

**अश्वतर**–कश्यप व कद्रू ह्या पासून झालेला एक सर्प. [ ५,२४,३१ ]

**अश्वतीर्थ**–नैमिषारण्यांतील एक तीर्थ.

**अश्वत्थामा**–द्रोणाचार्यांचा पुत्र. हा चिरंजीव व पराक्रमी असून सावर्णिमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक होय. [ ८,३,१५ ] पांडवांच्या शिबिरावर रात्रौ अचानक चाल करुन यानें त्यांच्या मुलांचा वध केला, त्यामुळें याच्या मस्तकावरील मणि काढून घेऊन अर्जुनानें याचें पारिपत्य केलें. [ १,७,५५ ]

( २ ) अक्रूराचा एक पुत्र.

( ३ ) मालवदेशाधिपति इंद्रवर्मा राजाचा नामांकित हत्ती. हाच भारतीयुद्धांत मृत झाल्यावर भ्रमानें द्रोणाचार्यांनीं आपला पुत्र मरण पावला असें समजून शस्त्रें खालीं ठेविलीं. ( भा. द्रो.)

**अश्वनगर**–अंगदीया नगरीचें नांव.

**अश्वनदी**–कुंतीनें ह्या नदींत कर्णास सोडलें होतें.

**अश्वपती**–दनुपुत्र एक दानव.

( २ ) मद्रदेशचा राजा, व सावित्रीचा पिता. ( सावित्री शब्द पहा. )

( ३ ) केकय देशाचा राजा. यास युधाजित पुत्र व कैकयी कन्या होती. ही दशरथाची पत्नी. या राजाची स्त्री कैकेयीची माता ही साहसी होती. या राजास सर्व पक्ष्यांची भाषा कळत असे. एकदां जृंभ पक्षाच्या कांहीं चमत्कारिक भाषणानें राजा हंसला. तेव्हां हंसण्याचें कारण त्याच्या स्त्रीनें विचारलें. राजा म्हणाला, हें सांगतांच मी मरेन. परंतु तिनें सांगण्याचा हट्टच घेतला, म्हणून राजानें तिला घालवून दिलें. (वा.रा.)

**अश्वमेधः**—एक यज्ञ. हा यज्ञ राजलोक करीत असत. [ १,८,६ ]

**अश्वमेधज**–पुरुवंशीय सहस्रानीकाचा पुत्र. ह्याचा पुत्र असीमकृष्ण. [ ९ २२,३५ ]

**अश्वमेधपुरी**–पूर्वदशाण देशाच्या पूर्वेस असणारी नगरी. येथें पांडवांच्या वेळीं रोचमान राजा होता.

**अश्वरथा**–हिमालयावरील नदी.

**अश्ववती**–भारतवर्षीय नदी.

**अश्वशंकु**–दनुपुत्र एक दानव.

**अश्वशिरस्**–अथर्वण व चित्ति ह्यांचा पुत्र जो दध्यंच त्याचें नांव. हा ब्रह्मर्षि होता. [ ४,१,४२ व ६,९,५२ ] ह्याला अश्वाचें शीर जोडून अश्विनीकुमारांनीं ब्रह्मविद्या मिळविली.

( २ ) दनुपुत्र दानव.

**अश्वसेन**–श्रीकृष्णपत्नी जी नाग्नजिती तिचा मुलगा. [ १०,६१,१३ ]

( २ ) कद्रूपुत्र तक्षकाचा पुत्र. अर्जुनानें खाण्डवन अग्नीला दिलें, त्यावेळीं याची आई याला चोंचींत धरून बाहेर येत होती, पण अर्जुनानें बाणानें त्यांस परत अग्नींत टाकिलें असतां त्यांतून हा बचावला. तो सूड धरून हा कर्णाच्या बाणावर बसला. पण कृष्णानें भार घालून रथ दाबल्यामुळें अर्जुनाचा फक्त मुकुटच विद्ध झाला.

**अश्विनी**–एक नक्षत्र. चंद्राची स्त्री.

( २ ) अक्रूराची एक स्त्री.

**अश्विनीकुमार**–सूर्यापासून संज्ञा नांवाची स्त्री घोडीच्या स्वरूपांत असतां तिला नासिकेंतून झालेले दोन पुत्र. हे देवांचे वैद्य होते [६ ६·४०]. वैवस्वत मन्वंतरांतील देव [ ८,१३,४ ]. यांनीं वृद्ध च्यवन ऋषीला तरुण करून त्याच्या साह्यानें यज्ञांतील हविर्भागाचा अधिकार मिळविला [ ९,३,२४ ]. हे आकाशांत शिशुमार चक्राच्या स्तनावर आहेत [ ८५,२३,७ ].

**अष्टउपद्वीप**–जंबुद्वीपाच्या आसमंतांत क्षार समुद्रामध्यें हीं आठ उपद्वीपें आहेत. त्यांचीं नांवें:—स्वर्णप्रस्थ, चंद्रशुक्ल, आवर्तन, रमणक, मंदरहारिण, पांचजन्य, सिंहल, लंका [ ५,१९,३० ].

**अष्टक**–विश्वामित्राचा पुत्र [ ९,१६,३६ ]. हा विश्वामित्र कुलांतील **प्रवरप्रवर्तक** आणि **मंत्रद्रष्टा** असून तो आपल्या तिघां भावांसह अरण्यांत तप करीत असतां ययातिराजा आत्मश्लाघेनें स्वर्गांतून पतन पावला होता, त्याला आपल्या बंधुसहित पुण्य देऊन यानें स्वर्गास पाठविलें. हा एकदां एक मोठा यज्ञ केल्यावर आपल्या प्रतर्दन, वसुमना आणि शिबि या तीन बंधूंसहवर्तमान रथांत बसून जात असतां वाटेंत नारद भेटले. त्यांना त्यानें रथांत घेतलें व विचारलें; ' स्वर्गांत गेल्यावर आमच्यांतून कोण प्रथम पतन पावेल तें सांगा.' तें ऐकून नारद म्हणाले, तुला आपल्या गोप्रदानाचा अभिमान आहे, म्हणून प्रथम तूं पतन पावशील. प्रतर्दनानें आपले रथाचे अश्व ब्राह्मणांस दिले, परंतु घरीं आल्यावर-ब्राह्मणांस केव्हां काय मागावें याचें ज्ञान नसतें-असे उद्गार त्यानें काढले म्हणून नंतर तो पतन पावेल. वसुमनाच्या रथाची ब्राह्मणींनीं स्तुति केली, तेव्हां त्यावर ब्राह्मणांचें मन गेलें आहे, हें जाणूनहि त्यानें तो त्यांस दिला नाहीं, म्हणून तो त्यानंतर पतन पावेल. शिबि मात्र तेथें राहील.

**अष्टका**–एक श्राद्धदेवता. प्रस्तुत तें देवतात्व अच्छोदेकडे आहे. मार्गशीर्षादि चार महिन्यांच्या वद्य अष्टमीस अष्टका नांवाचें श्राद्ध करावयाचें असतें.

**अष्टकुलाचल**–भारतवर्षीय भरतखण्डांतील आठ उपपर्वत. त्यांचीं नांवें:–उपगिरि हिमालय, पारियात्र, ऋष्यवान् अ. ऋक्षवान्, विंध्याद्रि, सह्याद्रि, मलय, महेंद्राचल आणि शुक्तिमान.

**अष्टदिक्पाल**–कल्पारंभीं पूर्वादि दिशाक्रमानें ईशान्य दिशेपर्यंत–इंद्र, अग्नि, पितर, निर्ऋति, वरुण, वायु, सोम अ. वैश्रवण आणि ईशान–असे आठ

दिक्पाल होते. व त्यावरूनच त्यांचीं नांवें त्या त्या दिशांना पडलीं आहेत. परंतु चालु मन्वंतरांत जे अष्टदिक्पाल मानतात ते असेः—द्वादशादित्यांतील इंद्र अ. शुक्र, अनल ना. वसु, सूर्य-पुत्र यम, निर्ऋति ना. रुद्र, वरुण ना. आदित्य, अनिल ना. वसु, वैश्रवण अ. कुबेर व ईश्वर अ. रुद्र.

**अष्टदिग्गज**–ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम आणि सुप्रतीक.

**अष्टनाग**–अनंत, वासुकि, तक्षक, कर्कोटक, शंख, कुलिक, पद्म आणि महापद्म.

**अष्टभैरव**–असितांग, रुरु, चंड, क्रोध, उन्मत्त, कुपति अ. कपाली, भीषण आणि संहार.

**अष्टमर्यादागिरि**–हिमालय, हेमकूट, निषध गंधमादन, नील, श्वेत, शृंगवान आणि माल्यवान. हे आठ महागिरि, जंबूद्वीपांत जे भारतादि नऊ वर्ष आहेत, ते होण्यास कारण आहेत. यांचा अनेक पुराणग्रंथांत उल्लेख आहे.

**अष्टमहासिद्धि**–अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्या, ईशित्वा आणि वशित्वा.

**अष्टयोगिनी**–दुर्गेच्या आठ परिचारिका राक्षसी त्यांचीं नांवें:–मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिद्धा आणि संकटा. हीं नांवें पाठ भेदानेंहि दिसतात. ( योगिनी शब्द पहा. )

**अष्टवसु**–चालु वैवस्वत मन्वंतरांतील जो धर्म ऋषि त्यापासून प्राचेतस दक्षकन्या वसु तिला झालेले वसु संज्ञक आठ देवः–द्रोण, प्राण, ध्रुव, अर्क, अग्नि, दोष, वसु व विभावसु (६, ६, ११)

**अष्टवायन**–हळकुंड, सुपारी, दक्षिणा, खण, सूप, कंकण, धान्य व कांचमणी. हीं लग्नांत सौभाग्यप्राप्तिसाठीं वधूनें द्यावयाचीं असतात.

**अष्टविनायक**–मोरेश्वर ( मोरगांव ), बल्लाळेश्वर ( मुरुड–पाली ), विनायक ( मढ कर्जतजवळ ) चिंतामणि (थेऊर) गिरिजात्मज ( लेण्याद्रि पुणें ), विघ्नेश्वर ( ओझर जुन्नर नजीक ), गणपति ( रांजणगांव पुणें ), गजमुख सिद्धटेक ( नगर. ).

**अष्टावक्र**–कहोड ऋषीचा पुत्र. गर्भांत असतांना ह्यानें बापास रात्रभर अध्ययन करतांना पाहून हिणविलें म्हणून बापाच्या शापानें हा आठ ठिकाणीं वांकडा झाला. जनक राजाच्या सभेंत असलेला वरुणपुत्र बंदी, यानें कहोडास वादांत जिंकून समुद्रांत बुडविलें, असें समजतांच यानें वादांत बंदीचा पराभव करून कहोडास परत आणिलें. तेव्हां कहोडानें प्रसन्न होऊन यास सरळ केलें. ( भा. वन. )

**असकृत**–भृगु व पुलोमा यांच्या सात पुत्रांतील एक.

**असमंजस**–सगर व केशिनी ह्यांचा पुत्र. ह्याचा मुलगा अंशुमान [ ९,८,१५ ]. ( २ ) यदुवंशीय कंबलबर्हिष राजाचा पुत्र. ह्याचा पुत्र तमोजा.

**असिक्नी**–पंजाब प्रांतांतील महानदी. सध्यां ही चिनाब नांवानें प्रसिद्ध आहे. [ ५,१९,१८ ]

**असिक्नी**–प्राचेतस दक्षाची स्त्री [६,४,५१]

**असित**–एक ऋषि. युधिष्ठिराच्या यज्ञांतील ऋत्विज [ १०.७४,७ ]. स्यमंतक्षेत्रीं गमन [१०,८४,३]. कृष्णासह विदेहाकडे गमन [१०-८६-१८]. नारदादिकांसह पिंडारकक्षेत्रीं गमन [ ११,१,१२ ]. जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य.

( २ ) मरीचिकुलोत्पन्न एक ऋषि. ह्याची पत्नी हिमालयकन्या एकपर्णा.

( ३ ) मांधाता राजाच्या हातून मरण पावलेला राजा.

( ४ ) काम्यकवनाच्या पश्चिमेकडील पर्वत. येथें कक्षसेन ऋषीचा आश्रम असे.

**असिता**–एक अप्सरा.

**असितांग**- अष्टभैरवांतील एक.

**असिपत्रवन**- (तीक्ष्ण धारांच्या खड्गांचें वन.) एक नरक. वेदबाह्यवर्तनाचे लोक येथें जातात [ ५,२६,१५ ].

**असिलोमा**–दनुपुत्र दानव.

**असी**–काशीजवळ गंगेस मिळणारी नदी.

**असीमकृष्ण**-जनमेजय वंशांतील अश्वमेधजाचा पुत्र. ह्याला निमिचक्र असेंहि म्हणतात [ ९,२२,३९ ].

**असुरथ**–एक यादव.

**असुरा**–प्राधाकन्या एक अप्सरा.

**असूर्तरजस**–मूर्तय राजाचें नांव.

**अस्ति**–जरासंधाची कन्या व कंसाची पत्नी. [ १०,५०, ]

**अहल्या**-सोमवंशीय कुरुकुलांतील मुद्गल राजाला दोन जुळीं मुलें झालीं, त्यांतील मुलगा तो दिवोदास व मुलगी अहिल्या. हिला गौतमऋषीपासून शतानन्द नावाचा मुलगा झाला [ ९,२१,३४ ].

( २ ) ब्रह्मदेवाची मानस कन्या. हिच्या पतीचेंहि नांव गौतम असून मुलगा शतानन्द होता. तोच विदेहवंशीय जनकाचा उपाध्याय. इंद्रानें हिला भ्रष्ट केल्यानें ती शिला होऊन पडली होती. तिचा उद्धार रामचंद्रानें केला. ( कुमारिल भट्ट हें रूपक मानतो. इंद्ररूपी सूर्यानें अहल्यारूपी रात्रीचें घर्षण केलें, असें हें निरगूढ्य आहे, असें तो सांगतो ) ( वा. रा. )

**अहल्याऱ्हद**-गौतमवनांतील भारतीय तीर्थ.

**अहिक्षत्र**–एक नगर.

**अहिच्छत्रा**–द्रुपदराजाची पूर्व नगरी.

**अहिर्बुध्न्य**–एक रुद्र.

**अहिवास**–सौभरि ऋषीच्या मथुरेंतील आश्रमाचें नांव.

**अहीन**–सोमवंशीय सहदेव राजाचा पुत्र. याचा पुत्र जयसेन.

**अहीनगु**–अनीह राजाचें नांव.

**अहीनर**–राजाचे नांव.

**अहोवर्य**–एक ऋषि.

**अहंयाति**–पुरुवंशीय संयातीचा पुत्र. ह्याचा पुत्र रौद्राश्व [ ९,२०,३ ].

**अहिर्बुध्न्य**-एकादश रुद्रांपैकीं एक रुद्र. [ ६,६,१८ ]

## आ

**आकाशगंगा**-इंद्रानें श्रीकृष्णाला हिच्या उदकानें अभिषेक केला. [१०,२७,२२]

**आकूती** स्वायंभुव मनूची कन्या व रुचिऋषीची पत्नी. हिचा पुत्र सुयज्ञ. [ २,७,२ आणि ३,१२,५५ ]

(२) ऋषभकुळांतील सर्वतेजस राजाची पत्नी. हिचा पुत्र चक्षु. [४,१३,१५]

(३) पृथुषेण राजाची पत्नी. हिचा पुत्र नक्त [ ५,१५,६ ].

**आकृति**–एक कौशिकाचार्य ( गारुड विद्येचा आचार्य ). युधिष्ठिराचे राजसूय यज्ञाचे वेळीं सहदेव दक्षिणदिग्विजयाला गेला असतां त्यानें ह्याला जिंकून करभार घेतला. ( भा. सभा. अ. ३१)

(२) भोजराजा भीष्मक त्याचा भ्राता.

**आग्नीध्र**–श्रौतकर्मांतील एक ऋत्विज. याला ऋग्वेदांत अग्निध व अग्निमिंध असें म्हटलें आहे. अथर्ववेदांत आग्नीध्र शब्दानेंच उल्लेख आहे.

(२) प्रियव्रत राजा व बर्हिष्मति यांचा ज्येष्ठ पुत्र. यानें पूर्वचित्ति नामक अप्सरेशी दहा कोटी वर्षे समागम केला. तिजपासून नाभिप्रमुख नऊ पुत्र झाले. पुढें कांहीं कालानें ती अप्सरा निघून गेली असतां तिच्या विरहानें व्याकुल होउन हा उदास झाला, व आपल्या देशाचे नऊ भाग करून ते आपल्या नऊ पुत्रांना यानें दिलें, व हा तपार्थ अरण्यांत गेला. [ ५,१,३३ व ५,२,१,२२ ]

**आग्नीध्रक**-रुद्रसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षीं पैकीं एक ऋषि [ ८,१३,२८ ].

**आग्नीध्रशाला**—यज्ञमण्डपांतील आग्नीध्रनामक ऋत्विजांकरितां तयार केलेला एकभाग. दक्षयज्ञांत शिवगणांनीं हिचा विध्वंस केला [ ४,५,१४ ].

**आग्नेय**–अठरा महापुराणांपैकीं एक. ह्या पुराणांचे अठरा हजार श्लोक आहेत. [ १२,१३,५ ]

**आग्नेयकोसल**–इंद्रप्रस्थाच्या आग्नेयी दिशेकडे असणारा कोसल देश. याची राजधानी अयोध्या. ही सरयु नदीचे कांठीं आहे. पांडवांच्या वेळेस येथें बृहद्बल राजा असून त्याचा भाऊ दीर्घयज्ञ युवराज होता.

**आङ्गिरस**–भीष्माकडे आलेला एक ऋषि. [ १,९,८ ]

(२) एक यज्ञ [ १०,२३,३ ].

(३) शुनकाचें नांव. ह्यानें बभ्रु व सैंधवायन ह्यांना अथर्ववेद शिकविला [ १२,७,३ ].

**आङ्गिरसी**–प्लक्षद्वीपांतील एक नदी. [ ५,२०,४ ]

(२) वसूची पत्नी [ ६,६,१५ ].

**आचार्य**–(उपनयन करून वेद शिकविणारा) गर्ग हा यदूंचा आचार्य होता. [ १०,८,७ ]

**आजगर**—कावेरी नदीच्या तीरावर राहणारा एक मुनि. ह्याचा आणि प्रल्हादाचा ब्रह्मज्ञान विषयक संवाद झाला होता. [ ७,१३,११]

**आजमीढ**– अजमीढ कुलोत्पन्न पुरुष. ( धृतराष्ट्र ) [१,१३,२८]

**आजीगर्त**–( शुनःशेप शब्द पहा. ) [ ९,१६,३० ]

**आज्यप**– पितरांतील एक भेद [४,१,६३]. हे ब्रह्ममानसपुत्र पुलह ऋषीचे वंशज असून यज्ञामध्यें आज्य ( शेळीच्या दुधापासून झालेलें तूप ) पान करतात. यांस सुस्वधा असेंहि कोठें म्हटलें आहे. हे मुख्यत्वें करून वैश्य जातीस पूज्य आहेत. ( म. पु.)

**आंजनेय**—अंजनापुत्र मारुतीचें नांव.

**आडी**—अंधकासुराचा पुत्र. यानें तपानें देवास प्रसन्न केलें व अमरत्व मागितलें; पण तें न मिळाल्यानें रूपांतर पावल्यावांचून मला मृत्यू येऊं नये असें त्यानें मागितलें. पुढें बापाच्या मरणाचा सूड उगवावा म्हणून हा कैलासाला गेला. तेथें शंकराच्या द्वारावर वीरक नांवाचा गण होता, त्यानें अडवूं नये म्हणून यानें सर्परूपानें आंत प्रवेश केला, व पार्वतीचे रूप घेऊन शंकराजवळ गेला, परंतु शंकरानें तें कपट जाणून याचा वध केला. (मत्स्य० अ० १५५)

**आतप**—प्राचेतस वंशांतील विभावसु व उषा ह्यांचा पुत्र. ह्याचा पुत्र पंचयाम. [ ६,६,१६ ]

**आत्मभू**—ब्रह्मदेवाचें नांव.

**आत्मवान्**—एक ब्रह्मऋषि.

**आत्रेय**—अत्रिकुलोत्पन्नास हें नांव आहे.
( २ ) वामदेव ऋषीचा एक शिष्य,
( ३ ) जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य.

**आत्रेयायनि**—अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**आत्रेयि**—भारतवर्षीय एक नदी.
( २ ) रामकालीन एक तापसी.

**आदिकवि**—ब्रह्मदेवाचें नांव [ १,१,१ ]. वाल्मीकि ऋषीसहि हें नांव आहे.

**आदित्य**—अदितीचे पुत्र. हे बारा आहेत. [ ६,१०,१७ ]

**आदित्यकेतु**—धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.
( २ ) वैवस्वतमन्वंतरांतील देव. [ ८,१३,४ ]

**आदिदैत्य**—हिरण्याक्षाचें नांव.

**आदिराज**—पृथुराजाचें नांव [ ४,२२,४८ ].

**आदिवराह**—हिरण्याक्ष वधाकरितां भगवंतांनीं घेतलेला अवतार. याला श्वेतवराह असेंहि ह्मणतात.

**आद्य**—चाक्षुषमन्वंतरांतील पंचविध देवांतील एक भेद.
( २ ) एक ब्रह्मर्षि. हा उपरिचराच्या सोळा ऋत्विजांत होता.

**आरब्ध**—अनुवंशीय सेतूचा पुत्र. ह्याचा पुत्र गांधार [ ९,१३,५ ].
( २ ) अरणीच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या शुकाचार्यास नांव.

**आरुणि**—दुष्यंत पुत्र भरताच्य वंशांतील दुरितक्षयाचा मुलगा. हा ब्राह्मण झाला. [ ९,२१,१९ ]
( २ ) अरुणि ऋषीचा पुत्र व धौम्य ऋषीचा शिष्य. यासच उद्दालक असें नांव पडलें.
( ३ ) सामवेदोपनिषत्.

**आरुषी**—च्यवन ऋषीच्या दोन स्त्रियांतील ज्येष्ठ. हिचा पुत्र ऊर्व.

**आर्चनाकस**—एक ब्रह्मर्षि.

**आर्चीक**—ऋचीक ऋषीच्या कुलांतील ऋषि.
( २ ) ऋचीक ऋषि ज्या पर्वतावर रहात होता तो पर्वत.

**आर्जव**—गांधार देशाधिपति शकुनीच्या सहा बंधूपैकीं एक. याला इरावानानें मारिलें.

**आर्जीकीया**—पंजाबांतील बियास नदी.

**आर्तव**—बर्हिषदना. पितरांचें नाम तर.

**आर्द्र**—सूर्यवंशीय इंदुराजाचें नाम तर.

**आर्द्रा**—एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक.

**आनक**–यदुवंशीय शूराचा पुत्र. ह्याचे पुत्र सत्याजित् व पुरुजित. [९,२४,२८-४१]

**आनकदुन्दुभिः**–वसुदेवाचें नांव. ह्याच्या जन्माच्या वेळीं देवांनीं दुन्दुभि वाजविल्या म्हणून त्याला हें नांव मिळालें. ह्याचा पुत्र श्रीकृष्ण. [ ९,२४,३० ]

**आनकि**–सिंधुदेशाधिपति जयद्रथाच्या सहा बंधूंतील एक.

**आनन्दवन**–काशी क्षेत्राचें नांव.

**आनर्त**–शर्यातीचा मुलगा. [ ९,३,२७ ]

( २ ) एका देशाचें नांव. ह्या देशाचा राजा रैवत [ १०,५२,१५ ]. श्रीकृष्णाची द्वारका या देशांत होती.

**आन्वीक्षिकी**–अध्यात्मविद्या. [ १०,२५,४]

**आन्ध्र**–एक देश व त्यांतील राजे. कलियुगांत सात आन्ध्रराजे झाले [१२,१,२३]. सध्या या देशास तेलंगण ह्मणतात.

**आप**–( जल ) क्रौंचद्वीपस्थ लोकांची उपास्य देवता. [ ५,२०,२२-२३ ]

( २ ) भगवंताची विभूति. [११,७,३३]

( ३ ) अन्हवपूर्चें नांव.

( ४ ) स्वारोचिष मन्वंतरांतील वासिष्ठपुत्र प्रजापतीचें नांव.

**आपगा**–(नदी.) भागीरथीस विशेषें करून हें नाव लाविलेलें आढळतें.

( २ ) वाहिक प्रदेशांतील नदी.

**आपव**–वशिष्ट ऋषीचें नामांतर. याचा आश्रम सहस्रार्जुनानें दग्ध केल्यावर तुझें सहस्र हात भग्न होतील, असा यानें त्यास शाप दिला. (म.अ.४४)

**आपस्तंब**–भृगुकुलोत्पन्न एक ऋषि. कश्यप ऋषीनें दितीकडून करविलेल्या पुत्र कामेष्टींत हा आचार्य होता या दृष्टीपासून मरुद्गण उत्पन्न झाले हा सूत्रकार व स्मृतिकार आहे. (मत्स्य.)

**आपस्तंबि**–आपस्तंब कुलोत्पन्न ऋषि.

( २ ) अंगिरा कुलोत्पन्न एक ऋषि.

**आपस्थूण**–एक ब्रह्मर्षि.

**आपाग्नेय**– ,,

**आपिकायनि**– ,,

**आपिशलि**–हा पाणिनीच्या पूर्वी एक मोठा व्याकरणकार होता.

**आप्तोर्याम**–ब्रह्मदेवाच्या मुखापासून झालेला एक यज्ञ [ ३,१२,४० ]

**आप्नवान्**–एक ब्रह्मर्षि

**आप्य**–चाक्षुष मन्वंतरांतील देव [८,५ ८ ].

**आप्यायन**–शाल्मलीद्वीपांतील एक खंड व ह्या खंडाचा राजा जो यज्ञबाहू त्याचा पुत्र. [ ५,२०,९ ]

**आब्रवंती**–भारतवर्षीय नगरी.

**आभीर**–एक देश. [ १०,१०,३५ ] राजपुतान्याचा पश्चिम व दक्षिण भाग.

( २ ) एक वंश. कलियुगांत सात आभीर शूद्र राजे संस्कारहीन झाले. [ १२, १,२७-३६ ]

**आम**–क्रौंचद्वीपांतील एक खंड.

( २ ) घृतपृष्ठाचा मुलगा. [५,२०,२१ ]

( ३ ) श्रीकृष्ण व नाग्नजिती यांचा पुत्र. [ १०.६१,१३ ]

**आमावसु**–(पितर विशेष.) हा इंद्रियनिग्रही होता. एकदां पितरांची मानस कन्या अच्छोदा ह्याच्यावर आसक्त झाली असत याने तिचा स्वीकार केला नाहीं. हें पाहून पितर प्रसन्न झाले, व ज्या तिथीस हें वर्तमान घडलें, तिला अमावास्या असें नांव देऊन

ती पितृप्रिय होईल असा वर दिला; व अच्छोदेला तूं मृत्युलोकांत पतन पावशील असा शाप दिला. तीच मत्स्यगंधा अ० सत्यवता झाली होती. सांप्रत ती स्वर्गांत अष्टका ना० देवतेच्या स्थानीं आहे. (मत्स्य०)

**आम्रातकेश्वर**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**आयतायन**–एक ब्रह्मर्षि.

**आयति**—मेरुची मुलगी व धात्याची पत्नी हिचा पुत्र मृकण्ड [ ४,१,४४ ]

( २ ) सोमवंशीय पुरूरवा कुलांतील नहुषाचा मुलगा [ ९,१८,१ ].

**आयास्य**–गौतमांगिरस वंशांतील एक कुल.

**आयु**–प्राण नामक वसु व ऊर्जस्वती ह्यांचा मुलगा. [ ६,६,१२ ]

( २ ) पुरूरव्याला उर्वशीपासून झालेल्या सहा पुत्रांतील ज्येष्ठ [ ९,१५,१ ]

( ३ ) विदर्भवंशीय अनुपुत्र पुरुहोत्राचा पुत्र. याचा पुत्र सात्वत [ ९,२४,६ ].

( ४ ) श्रीकृष्ण व रोहिणी यांचा पुत्र [ १०,६१,१७ ]

( ५ ) पौष महिन्यांत भगनांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा ऋषि.[१२,११,४२]

( ६ ) दहा आंगिरस देवांतील एक.

( ७ ) प्रसिद्ध मंडूकांचा एक राजा.

**आयुर्दा**–शाकद्वीपांतील एका नदीचें नांव. [ ५,२०,२६ ]

**आयुर्वेद**–( वैद्यशास्त्र ) हा ऋग्वेदाचा उपवेद असून ब्रह्मदेवाच्या पूर्वेकडील मुखांपासून उत्पन्न झाला. [ ३,१२,३८].

**आयुष्मान्**—दक्षसावर्णि मन्वंतरांतील ऋषभ अवताराचा पिता याची पत्नी अम्बुधारा[ ८ १३,२० ]

( २ ) प्रल्हाद दैत्याच्या पुत्रांतील ज्येष्ठ पुत्र.

**आरब्ध**–अनुवंशीय सेतूचा पुत्र. ह्याचा पुत्र गांधार [ ९,१३,१५ ]

( २ ) अरणीच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या शुकाचार्यास नांव.

**आरुणि**—दुष्यंत पुत्र भरताच्या वंशांतील दुरितक्षयाचा मुलगा. हा ब्राह्मण झाला [ ९,२१,१९ ]

( २ ) अरुणि ऋषीचा पुत्र व धौम्य ऋषीचा शिष्य. यासच उद्दालक असें नांव पडलें.

( ३ ) सामवेदोपनिषत्

**आरुषी**–च्यवन ऋषीच्या दोन स्त्रियांतील ज्येष्ठ. हिचा पुत्र ऊर्ध्व.

**आर्चनाकस**–एक ब्रह्मर्षि.

**आर्चीक**-ऋचीक ऋषीच्या कुलांतील ऋषि

( २ ) ऋचीक ऋषि ज्या पर्वतावर रहात होता तो पर्वत.

**आर्जव**–गांधार देशाधिपति शकुनीच्या सहा बंधुपैकीं एक. याला इरावानानें मारिलें.

**आर्जीकीया**–पंजाबांतील बियास नदी.

**आर्तव**–बर्हिषदनामक पितरांचें नामांतर.

**आर्द्र**–सूर्यवंशीय इंदुराजाचें नामांतर

**आर्द्रा**–एक नक्षत्र. हें नक्षत्र शिशुमारचक्राच्या उजव्या पायांवर आहे. [ ५,२३,६ ] सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक.

**आर्यक**-(धर्मसेतु शब्द पहा.) [८,१३,२६] (२) कद्रूपुत्र नाग. याची कन्या मारीषा अ. भोजा, यदुकुलोत्पन्न म दिली होती. तिची कन्या पृथा अ. कुंति. हिचा पुत्र जो भीम त्याला दुर्योधनादिकांनीं वीष चारून प्रमाणकोटीतीर्थांत बुडविलें असतां नागांनीं दंश केल्यामुळें त्याचें विष उतरलें. ते नाग त्याला पुन्हां दंश करणार तों तेथें आर्यक नाग आला, व आपल्या नातचा-कुंतीचा-पुत्र भीम पाहून त्याला अमृत प्यावयास दिलें व दहा हजार हत्तींचें बळ असो असा आशिर्वाद देऊन हस्तिनापुरांत पोंचतें केलें. (भा. आदि अ. १२८)

**आर्यका**-क्रौंचद्वीपांतील एक नदी. [५,२०,२१]

**आर्यावर्त**-विंध्य व हिमालय पर्वतांमधील प्रदेश. [९,१६,२२]

**आर्ष्टिषेण**-परीक्षिताकडे आलेला एक ऋषि. [१,१९,१०]

हा अर्ष्टिषेण ऋषीचा पुत्र असून याचा आश्रम हिमालय पवतावर नारायणाश्रमासमीप होता. एकदां हा धर्मराजाजवळ येऊन ह्मणाला, पूर्वी कृतयुगांत अर्ष्टिषेण नामक ब्राह्मण गुरुगृहीं अध्ययनांत दक्ष असे पण वेद येत नाहींत असें पाहून त्यानें मोठी तपश्चर्या केली. त्या योगानें त्यास वेदाचें उत्कृष्ट ज्ञान झालें. मग त्या ऋषीनें सिंधुद्वीप तीर्थाला तीन वर दिले. १ या तीर्थांत स्नान करणारास अश्वमेघांचे फल मिळेल. २ येथें सर्प बाधा होणार नाहीं. ३ येथें थोड्या कालांत पुष्कळ फळ मिळेल. (भा. वन०) (२) एक राजर्षि.

**आलक्षित**-किष्किंधेच्या पश्चिमेकडील वन.

**आवन्त्य**-अवंतिदेशांतील संस्कारहीन ब्राह्मण [१२,१,३८].

**आवन्त्य**-सुकर्माचा शिष्य. ह्यानें सामवेदाचें अध्ययन करून त्याच्या शाखा शिष्यांना शिकविल्या [१२,६,७७-८०].

**आवभृत्य**-एका राजवंशाचें नांव. हे राजे लोभी होते [१२,१,२९].

**आवरण**-ऋषभपुत्र भरताचा मुलगा. [५,७,३]

**आवर्तन**-जंबूद्वीपांतील द्वीप [५,१५ ३०].

**आवशीर**-भारतवर्षीय एक देश.

**आवसथ्य**-पवमान अग्नीचा पुत्र.

**आविक्षित**-अविक्षित पुत्र मरुत्ताचे नामांतर. हा चक्रवर्ती राजा असून इंद्रासारखा पराक्रमी, धार्मिक, जितेंद्रिय असा होता. यानें शंभर अश्वमेघ केले असून याच्या यज्ञासारखे यज्ञ कोणाचेच झाले नाहींत. या यज्ञांत अंगिरस पुत्र संवर्त पुरोहित असून सर्व वस्तू सोन्याच्या होत्या. मरुद्गण वाढपी असून विश्वेदेव सभासद होते. सोमपानानें इंद्राला मद चढला होता व खूप दक्षणा मिळाल्यामुळें ब्राह्मण बेहोष झाले होते. ह्याचा पुत्र दम.

**आविर्होत्र**-ऋषभदेवाचा पुत्र. हा महायोगी असून निमीच्या यज्ञांत यानें उपदेश केला [५,४,११ वं ११,२,२१].

**आवेद्**–एक ब्रह्मर्षि.

**आशावह**–एक यादव.

**आशी**–भग नांवाचा आदित्य व सिद्धि ह्यांची कन्या [ ६,१८,२ ].

**आश्मरथ्य**–आश्मरथ्याचे वंशजाचें कुल.

**आश्रम**–( ब्रह्मचर्यादि चार अवस्था. ) हे ब्रह्मदेवापासून उत्पन्न झाले. [३,१२, ४१ ] भगवद्भक्तानेंहि ह्यांचें आचरण करावें. [११,१०,१ ]

**आश्रय**–पुराणाच्या दहा लक्षणांतील दहावें ईश्वर स्वरूप लक्षण [ २,१०,१ ].

**आश्रायणि**–एक ब्रह्मर्षि

**आश्लेषा**–एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**आश्वलायन**–ऋग्वेदीय शाखेचा एक प्रणेता ह्यानें श्रौतसूत्रें, गृह्यसूत्रें, स्मृति वगैरे लिहिलीं [ १,४,२३ ].

**आश्विनेय**–अश्विनी रूपधारी सूर्य नी संज्ञा, तिच्या ठिकाणीं अश्वरूप धारण केलेल्या सूर्यापासून दोन पुत्र झाले ते. यांस अश्विनीकुमार व नासिकेंतून झाले म्हणून नासत्य असेंहि म्हणतात. हे चालु मन्वतरांत देव असून देवांचे वैद्य आहेत. ह्यांना च्यवन भार्गवानें यज्ञांत हविर्भाग चालू केला. ( च्यवन शब्द पहा. ) ह्यांतील वडील पुत्राचें नांव नासत्य व कनिष्ठाचें नांव दस्र असेंहि आढळतें.

**आषाढ**–दुर्योधन पक्षीय राजा.

**आसंग**–श्वफल्क व गांदिनी ह्यांच्या बारा पुत्रांपैकीं एक [ ९,२४,१६].

**आसारण**–भाद्रपद महिन्यांत विवस्वान नांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा यक्ष. [१२,११,३८ ]

**आसुरायणीय**–सामवेदाची एक शाखा. [ १,४,२३]

**आसुरि**–युधिष्ठिराच्या यज्ञांतील एक ऋत्विज. [ १०,७४,९]

( २ ) कपिलानें सांख्यशास्त्र आसुरि ब्राह्मणाला सांगितलें. [ १, ३,१० ]

**आसुरी**–सुमतिराजाची दुसरी स्त्री. [ ५, १५,३ ]

**आस्तिक**–भृगुकुलोत्पन्न जरत्कारु ऋषि व कश्यपकन्या मनसा, जरद्गौरी अ. जरत्कारु यांचा पुत्र. ही गर्भवती असतां जरत्कारूनें शंकरास प्रसन्न करून घेतलें, त्यावेळीं शंकरानें तिला ज्ञानोपदेश केला. तो यानें गर्भांतच ग्रहण केला. सर्पांच्या प्रार्थनेवरून जनमेजयाच्या सर्पसत्रांत जाऊन तें सत्र यानें थांबविलें, व तक्षकाचा प्राण वांचविला. कारण सर्प हे याचे मातुल होते.

**आहुक**–विदर्भवंशीय पुनर्वसूचा पुत्र. ह्याचा पुत्र देवक. [ ९,२४,२ ]

( २ ) यादवांपैकीं एक. हा श्रीकृष्णाबरोबर स्यमंतपंचक क्षेत्रांत गेला होता. ह्यानें ऋषीच्या शापानें सांबाला झालेल्या मुसळाचें चूर्ण करून उरलेला भाग समुद्रांत टाकिला. [ १०,८२, ५ आणि ११,१,२१ ]

**आहुकी**–आहुकाची बहीण [ ९,२४,३९ ]

## इ

**इक्षु**–भारतवर्षीय नदी.

**इक्षुदा**– ,,

**इक्षुमती**–सिंधुसौवीर देशांतील एक नदी. [ ५,१०,१

( रोहिलखंडातील काली नदी )

**इक्षुरसोद**–प्लक्षद्वीपाला वेष्टून असलेला समुद्र. याची रुंदी दोन लक्ष योजनें आहे [ ५,२०,७ ].

**इक्षुह्रद**–सुपार्श्वपर्वतावरील एक डोह. [ ५,१६,१३ ]

**इक्ष्वाकु**–स्वायंभुव मनूचा पुत्र[ ९,१२,१९]. ( २ ) श्राद्धदेवमनूचा पुत्र [८,१३,२]. हा त्या मनूला शिंकेपासून झाला. ह्याला शंभर पुत्र होते. त्यांत विकुक्षि निमि आणि दंडक हे तीन ज्येष्ठ होते हा राजा फार प्रसिद्ध असून सूर्य-वंशांत इक्ष्वाकु नांवानेंच याचें कुल-प्रसिद्ध आहे [ ९, ६, ४ ]. ह्या-कुलांतील मरु राजा कलियुगाच्या शेवटीं वर्णाश्रमाची स्थापना करील. [ १२, २, ३७ ]

**इज्या**–अध्वर्युनामक ऋत्विजानें करावयाचें कर्म. ( हवन, पूजन इत्यादि ) हें ब्रह्मदेवाच्या दक्षिण मुखापासून उत्पन्न झालें.

**इडविड**–कुबेराचें नांव. ह्यान ध्रुवाला वर दिला ( ४, १२, ९ ).

**इडाविडा**–तृणबिंदू आणि अलंबुषा अप्सरा यांची कन्या व विश्रव्याची पत्नी. हिचा पुत्र कुबेर. [ ४,१,३७ ] आणि [ ९,२,३१ ]

**इडस्पति**–यज्ञ व दक्षिणा यांच्या बारा पुत्रांपैकीं एक [ ४,१,७ ].

**इडावत्सर**–संवत्सरापैकीं एक भेद. [ ५,२२,७ ]

**इध्म**–यज्ञ व दक्षिणा यांच्या बारापुत्रांपैकीं एक. [ ४, १, ७ ]

**इध्मजिव्ह**–प्रियव्रताचा पुत्र व प्लक्षद्वीपाचा अधिपति. ह्यानें त्या द्वीपाचे सात भाग करून ते आपल्या पुत्रांना दिले. [ ५,१,२५–३३ आणि ५,२०,२ ]

**इध्मवाह**–परीक्षिताकडे आलेला एक ऋषि. [ १,१९,९ ]

( २ ) अगस्त्यपुत्र दृढच्युताचा मुलगा [ ४,२८,३२ ].

**इन्दु**–इक्ष्वाकुकुलोत्पन्न चन्द्रराजाचें नांव. ह्यासच आर्द्र असेंहि म्हणतात.

**इन्दुमती**–सिंहलद्वीपच्या चंद्रसेन राजाची कन्या. ( मंदोदरी शब्द पहा )

( २ ) अजपत्नी व दशरथाची माता.

**इन्द्र**–देवांचा राजा. [ १,१०,३ ] हा मोठा पराक्रमी आहे. ह्यानें वृत्रा-सुराची हत्या केल्यामुळें यास ब्रह्मह-त्येचें पातक लागलें, व बरेच दिवस लपून बसावें लागलें होतें. त्यांतून अश्वमेध केल्यावर याची मुक्तता झाली. जोंपर्यंत इंद्र गुप्तरूपानें राहिला होता, तोंपर्यंत नहुष राजा इंद्र झाला होता. ह्यानें कपटानें दितीच्या उदरांत जाऊन गर्भाचे तुकडे केले, ते ४९ मरुद्गण झाले. [ ६,१२,३२ ] आणि [ ६,१३,१६ २० ] ह्याची पत्नी इन्द्राणी अ० शची व पुत्र जयंत [ १,१४,३७ ]. हा तपोभंग करण्याकरितां नेहमीं अप्सरा पाठवितो. [ ११,४,७ ] श्रीकृष्णादिकांना त्रास देण्याकरितां पर्ज-न्य पाडल्यावर हा श्रीकृष्णाचें अद्भुत-सामर्थ्य पाहून त्याला शरण गेला. [ १०,२५,१ ] इंद्राचें निवासस्थान

स्वर्ग. राजधानी अमरावती, राजवाडा वैजयन्त, बाग नंदन, कंदसार किंवा पारुष्य. हत्ती ऐरावत, घोडा उच्चैःश्रवस्, रथ विमान, सारथी मातली-धनुष्य शक्रधनु व तरवार परंज. ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत १४ इंद्र होतात-यज्ञ, रोचन, सत्यजित्, त्रिशिख, विभु, मंत्रद्रुम, पुरंदर, बली, अद्भुत, शंभु, वैधृति, ऋतधामा, दिवस्पति, आणि शुचि. सांप्रत सहा इंद्र झाले असून सातवा पुरंदर चालू आहे.

(२) द्वादशादित्यापैकीं अकरावा. ह्याला पुलोमा स्त्री व जयंत, ऋषभ आणि मीढुष असे तीन पुत्र होते.

(३) भगवंताची एक विभूती. [ ११,१६,१३ ]

(४) श्रावण महिन्यांतील सूर्याचें नांव [१२,११,३७].

**इन्द्रकील**–हिमालय पर्वताचें एक मोठें शिखर [५,१९,६]. येथें अर्जुनानें किरातरूपधारी शंकरांस युद्धांत प्रसन्न करून पाशुपतास्त्र मिळविलें.

**इंद्रकौशिक**–एक ब्रह्मर्षि व त्याचें कुल.

**इंद्रजानु**–अकरा कोटी वानरांचा स्वामी. हा राम सेनेंत होता.

**इंद्रजित**–रावण व मंदोदरी यांचा पुत्र. यानें इंद्राला जिंकल्यामुळें याला इंद्र-जित असें ह्मणत. रामरावण युद्धांत यानें अनेकदां आपलें शौर्य गाजविलें होतें. शेवटीं हा जयप्राप्तीकरितां निकुंभिलेंत यज्ञ करीत असतां बि-भीषणानें त्या स्थानाचा नाश कर-विला, त्यावेळीं संतापानें यज्ञ अर्धा टाकून हा युद्धास आला, व लक्ष्मणाचे हातून मरण पावला. याची स्त्री सुलोचना ही महापतिव्रता होती.

**इंद्रजिव्ह**–रावणपक्षीय राक्षस.

**इंद्रदेश**–विदेह कुलोत्पन्नांचा देश. हा इंद्रपर्वताजवळ गंगा व यमुना यांच्या मध्यें व कनोजच्या पश्चिमेस होता. याची मुख्य नगरी सांकाश्या असून तेथें सुधन्वा राजा होता. त्याला जिंकून हा देश विदेह राजानें आपणाकडे घेतला होता.

**इन्द्रप्रमद**–भीष्म शरपंजरीं पडले असतां तेथें आलेला एक ऋषि.[ १,९,७ ]

**इन्द्रप्रमिति**–यानें व्यासशिष्य पैलापासून ऋग्वेदाचें अध्ययन करून त्याचे चार भाग केले, व ते शिष्यास पढविले. [ १२,६,५४-५५ ]

**इन्द्रप्रस्थ**–( व्यासांच्या सांगण्यावरून यमुनेच्या कांठीं युधिष्ठिरानें हें शहर वसविलें. ) पांडवांची राजधानी येथें युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ केला. [ १०,७७,६ ]

**इंद्रद्युम्न**–द्रविड देशीय पांडय देशचा राजा. हा एकदां ध्यान धारणेमध्ये निमग्न असतां त्याच्याकडे सशिष्य अंगिरा ऋषि आले, व राजा आपला सन्मान करीत नाहीं, असें पाहून संतापले, आणि त्याला ‘ हत्ती हो ’ असा शाप दिला, तोच पुढें प्रसिद्ध गजेंद्र झाला. [ ८,४,१० ]

(२) एक राजर्षि. हा स्वर्गातून पतन पावला असतां, यानें मार्कंडेयाला

विचारलें, आपण चिरंजीव आहां, मला ओळखतां कां? त्यावर मार्कंडेयानें नाहीं असें सांगून ' हिमालय पर्वतावरील प्रावारकर्ण नांवाचा उलूक माझ्यापेक्षां वृद्ध आहे, तो तुला कदाचित ओळखील ' असें म्हणाला. तेव्हां राजानें अश्वरूप घेऊन तो मार्कंडेयासह तेथें गेला, परंतु तोही यास ओळखीत नव्हता. तो म्हणाला, ' इंद्रद्युम्न सरोवरावरील नाडीजंघ बगळा माझ्यापेक्षां वृद्ध आहे, त्याला विचार.' तेव्हां तिघे तेथें आले. त्या बगळ्याला विचारतां तो म्हणाला ह्या सरोवरांतील कासव अतिवृद्ध आहे, तो कदाचित् सांगेल. त्याला विचारतां, तें कांसव म्हणालें, ह्या राजानें जे अनेक यज्ञ केले, त्यांत दक्षिणा देतांना सोडलेल्या उदकाचें हें तळें आहे हें ऐकतांच तेथें विमान आलें, व राजा परत स्वर्गास गेला. तात्पर्य, स्वतःच्या गुणांची स्वतःच प्रशंसा न करितां अन्यांनीं केली, तरच तो मोठा. [ भा. वन. अ. १९९ ].

( ३ ) विदेह वंशीय एक राजा.

( ४ ) पांडवाबरोबर द्वैतवनांत राहणारा एक ऋषि.

( ५ ) एक सरोवर.

**इंद्रपर्वत**—इंद्रदेशांतील एक पर्वत. यावर पांडवांच्या वेळेस सात किराताधिपति रहात असत [ भा. सभा. अ ३० ].

**इन्द्रबाहु**—एक ब्रह्मर्षि.

**इन्द्रमाली**- उपरिचर राजास नामांतर.

**इंद्रवर्मा**—भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. ह्याच्याजवळ अश्वत्थामा नांवाचा उत्तम हत्ती होता.

**इन्द्रवाह**—शशादपुत्र पुरंजयाचें नांव. [९,६,१२] ( ककुत्स्थ शब्द पहा.)

**इंद्रशत्रु**—वृत्रासुराचें नांव.

**इन्द्रसावर्णि**- श्वेतवाराह कल्पांती होणारा चौदावा मनु. उरु, गंभीर, बुद्धि, इत्यादि पुत्र यास होतील. या मन्वंतरांत अग्नि, बाहु, शुचि, शुद्ध, मागध, इत्यादि सप्तर्षि असतील आणि पवित्र, चाक्षुष, आदि देव व शुचि इंद्र होईल. [ ८,१३,३३ ]

**इन्द्रसेन**—बलीचें नांव. ह्यानें श्रीकृष्णाची पूजा केली. [ १०,८५,५२ ]

( २ ) प्लक्षद्वीपांतील एक पर्वत. [ ५,२०,४ ]

( ३ ) ऋषभदेवाचा पुत्र. [ ६,६,२५ ]

( ४ ) वैवस्वत मनूच्या वंशांतील कूर्च राजाचा मुलगा [ ९,२,१९ ]

**इन्द्रस्पृक्**—ऋषभदेवाचा पुत्र. [५,४,१०

**इन्द्राणी**- इन्द्राची स्त्री. हिनें नहुषराजा इंद्र असतां त्याला ऐश्वर्याचा मद चढला असल्याकारणानें युक्तीनें सर्प योनीस पोंचविलें [ ६,१३,१६ ] व [ १,१४,३७ ] इंद्राणीचीं नांवें इंद्राप्रमाणें पृथक आढळत नाहींत. पण तीं असावींत असें वाटतें. सांप्रत हिचें नांव शची आहे. ओरिसांत इंद्राणीची प्रचंड मूर्ति सांपडली आहे.

**इन्द्रोतःशौनक**—एक ऋषि. जनमेजय राजास ब्रह्महत्या घडली असतां त्यानें आपल्या पुरोहितास निष्कृति कर-

ज्यास सांगितलें, पण त्यानें तें अमान्य केल्यामुळें ह्या ऋषीनें यज्ञ करून त्यास स्वर्गास पाठविलें. [ भा. शांति. अ. १५२ ].

**इरा**–कश्यपपत्नी इलेचें नामांतर.

**इरागर्भशिरा**–दनुपुत्र एक दानव.

**इरावती**–भवरुद्राची पत्नी. [ ३,१२,१३ ]

( २ ) परीक्षित् राजाची पत्नी, व उत्तराची कन्या. [ १,१६,२ ]

( ३ ) पंजाबांतील रावी नदी.

( ४ ) ब्रह्मदेशांत ही नदी, मखौ व मालिखा या नद्यांचा संगम होऊन बनली आहे. ही नदी ९०० मैल वहात जाऊन बंगालच्या उपसागरास मिळते.

**इरावान्**–अर्जुन व उलुपी ह्यांचा पुत्र. ह्यास भारतीयुद्धांत दुर्योधनपक्षीय आर्षशृंगीनें मारिलें. [ ९,२२,३२ ].

**इल**–वैवस्वत मनूच्या सुद्युम्न पुत्राचें नांव.

**इलविल**–इक्ष्वाकुवंशीय शतरथाचें नांव.

**इला**–कश्यपाची पत्नी. [ ६,६,२५ ]

(२) वैवस्वत मनु व श्रद्धा यांची कन्या. [९,१,१६] हिला बुधापासून पुरूरवस् हा पुत्र झाला [ ९,१४,१५ ]. ( सुद्युम्न शब्द पहा )

(३) वसुदेवाची पत्नी. हिला उरुवल्कादि पुत्र झाले. [ ९,२४,४५-४९ ]

( ४ ) वायूची कन्या व ध्रुवाची पत्नी. हिचा पुत्र उत्कल. हा फारच सुंदर होता [ ४,१०,२ ].

**इलावर्त** ऋषभदेव व जयंती यांच्या शतपुत्रांतील एक. हा इलावर्त खंडाचा अधिपति होता [ ५,४,१० ].

( २ ) नव खंडांपैकीं एक खंड.

**इलावृत्त** आग्नीध्राचा पुत्र ह्याची स्त्री लता. हा याच खंडाचा अधिपति होता. [ ५,२,१९-२३ ]

( २ ) जंबूद्वीपांतील एक खण्ड. [ ५, १६,७ ] हें समचतुरस्र असून त्याच्या भोंवती नील, निषध, माल्यवान आणि गंधमादन असे चार पर्वत आहेत. या खंडांत पार्वतीच्या शापामुळें शंकरावांचून दुसरा कोणीहि पुरुष गेल्यास तो स्त्रीत्व पावतो. [ ५,१७,१५ ]

**इलास्पद**–भारतवर्षीय तीर्थ.

**इल्वल**–ऱ्हाद व धमनि यांचा मुलगा. ह्याला वातापि नांवाचा भाऊ होता. एकदां इल्वलानें इंद्रासारखा पराक्रमी पुत्र व्हावा, म्हणून एका ब्राह्मणाची प्रार्थना केली, परंतु ती त्यानें मान्य न केल्यामुळें हा ब्राह्मणांचा द्वेष करूं लागला. याच्याकडे कोणीही ब्राह्मण अतिथि आला असतां वातापीचा पाक करून त्यास हा भोजन देई, नंतर वातापी त्या ब्राह्मणाचें पोट फोडून बाहेर येई असा क्रम बरेच दिवस चालला होता. एके दिवशीं द्रव्याच्या इच्छेनें अगस्त्यऋषि, श्रुतर्वा, ब्रध्नश्व व त्रसद्दस्यु या राजांकडे गेला, पण तेथें अपेक्षित द्रव्य न मिळाल्यामुळें याच्याकडे आला. तेव्हां नित्याप्रमाणें वातापीचा पाक करून त्यांस भोजन

दिलें, पण हें कपट ओळखून अगस्तीनें वातापीस पचविलें. नित्याप्रमाणें तो बाहेर येईना. हें पाहून इल्वल अगस्त्यास शरण गेलें, व त्यांस इच्छित द्रव्य देऊन यानें ब्रह्मद्वेष सोडला. [भा. वन. अ. ९९]

**इष**–ध्रुवपुत्र वत्सर व स्ववींथि यांच्या सहा पुत्रांपैकीं तिसरा [ ४,१३,१२ ].

( २ ) चैत्रादि क्रमानें सातवा महिना जो आश्विन त्याचें नांव. यांत त्वष्टा नांवाचा आदित्य आपल्या गणासह फिरत असतो [ १२,११,४३ ].

**इषंधर**–शाल्मली द्वीपांतील लोकांपैकीं एक भेद. [ ५, २०, ११ ]

**इषुपात्**–दनुपुत्र एक दानव.

**इषुमान्**–यदुकुलोत्पन्न देवश्रवा व कंसावती यांचा दुसरा पुत्र [ ६,१८,१५ ] व [ ९,२४,४१ ].

ई

**ईजिक**–भारतवर्षीय एक देश.

**ईडय**–आठव्या सावर्णि मनूचा एक पुत्र.

**ईशान**–शाकद्वीपांतील एक पर्वत. [ ५,२०,२६ ]

( २ ) एकादश रुद्रांपैकीं एक. ईशान्य दिशेचा अधिपति.

**ईशानकल्प**–दिवसानुक्रमानें ब्रह्मदेवाच्या चालु मासांतील दहावा दिवस. या कल्पारंभीं ईशान अवतार झाला.

**ईशानी**–मायेचें नांव. [ १०,२,१२ ]

**ईशान्यकोसल**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील दोन कोसल देशांतील इशान्येकडे असणारा देश. यास काशी अ० कुंतिकोसल असेंहि म्हटलें आहे. याची राजधानी श्रावस्ती.

**ईश्वर**–परमेश्वर, ईशानाचें नांव.

( २ ) भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय एक राजा. हा क्रोधवश नामक असुराच्या अंशानें जन्मला होता. [ भा. आदि. अ. ६७ ].

उ

**उक्थ**-एकप्रकारचा यज्ञ. [ ३,१२,४० ]

( २ ) चालू मन्वंतरांतील बृहस्पतीची कन्या स्वाहा, तिचा पुत्र.

( ३ सामवेदाचें नांव.

( ४ ) सूर्यवंशीय एक राजा.

**उख**–तैत्तिरीय शाखीय एक ऋषि.

**उग्र**–एकादश रुद्रांपैकीं एक [ ६,६,१७ ].

( २ ) वारुणि कवीच्या आठ पुत्रांतील कनिष्ठ.

( ३ ) धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांपैकीं एक.

**उग्रतीर्थ**–भारती युद्धांतील दुर्योधन पक्षीय एक राजा.

**उग्रदंष्ट्री**–हरिवर्षाची पत्नी [ ५,२,२३ ].

**उग्रमन्यु**–भारतीयुद्धांत अर्जुनाकडून मारला गेलेला एक राजा.

**उग्रवीर्य**–महिषासुराचा अनुयायी असुर.

**उग्रश्रवा**–लोमहर्षण सूताचा पुत्र. यास लोमहर्षणि अ० सौति असें म्हणतात.

( २ ) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**उग्रसेन**-परीक्षिताचा पुत्र [ ९,२२,३५ ].

( २ ) देवकीचा पुत्र [ ९,२४,२१ ].

( ३ ) कंसाचा पिता व मथुरेचा राजा. [ १०,४५,१२ ]

( ४ ) भाद्रपद महिन्यांत विवस्वान नांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा गंधर्व. [ १२,११,३८ ]

( ५ ) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**उग्रसेन**–दुर्योधनपक्षीय एक राजा.

**उग्रसेना**–अक्रूराची एक स्त्री.

**उग्राय**–महिषासुरपक्षीय एक असुर.

**उग्रायुध**–पुरुवंशीय नीप राजाचें नामांतर

**उच्चैःश्रवा**–समुद्रमंथनांतून निघालेल्या चतुर्दश रत्नांतील एक अश्व. तो प्रथम बलीनें घेतला. नंतर तो इंद्राकडे आला [ ८, ८, ३ ].

( २ ) सूर्याच्या रथाचा अश्व.

**उज्जयन**–विश्वामित्र कुलोत्पन्न ऋषि.

**उज्जयिनी**–उज्जनी. पूर्वीची अवंतिका.

**उज्जानक**–काश्मीरजवळचें एक तीर्थ. येथें स्कंदानें आपला क्रोध शांत केला.

**उज्जालक**–मरुधन्व देशाजवळील समुद्र भाग. येथें उत्तंक ऋषीचा आश्रम होता.

**उज्जिहाना**- दक्षिण कोसल देशांतील नगरी.

**उडुपति**-चंद्राचें नांव.

( २ ) अंगिरा कुलोत्पन्न ऋषि.

**उडू**–ओढया प्रांत.

**उडूकेरल**–द्रविड देशाच्या दक्षिणेकडील देश

**उत्तंक**–एक ऋषि. (कुवलयाश्व शब्द पहा) [ ९,६,२२ ]

( २ ) भृगुकुलोत्पन्न ऋषि. ह्यानें सूर्यवंशीय सौदास राजाच्या स्त्रीचीं कुंडलें गुरु पत्नीला आणून दिलीं होतीं. त्यामुळें प्रसन्न झालेल्या धौम्य गुरूनें आपली कन्या यास दिली. [ भा. अश्व. अ. ५३ ]

( ३ ) ह्याचें मूळचें नांव उपमन्यु. वेद ऋषीचा शिष्य. हा गुरुगृहीं असतां गाई चारण्याचें काम करीत असे. तेथें तो, प्रथम मधुकरी, नंतर गाईचें दुध, त्यानंतर वत्सांच्या मुखांतील फेंस ह्यावर उपजीविका करीत असे. पण गुरूनें त्या सर्वांचा क्रमेंकरून प्रतिषेध केल्यावर हा रुईचीं पानें खाऊं लागला. पण त्या कांहीं दिवसांनीं यास अंधत्व आलें. एकदां हा आश्रमांत येत असतां एका कूपांत पडला. संध्याकाळीं गाई घरीं आल्या पण उपमन्यु नाहीं, असें पाहून गुरू यास हांका मारीत शोधण्यास निघाला. तों कूपांतून याचा शब्द ऐकून गुरूनें याला मांडीला धरून वर काढिलें, म्हणून यास उत्तंक असें नांव मिळालें. नंतर प्रसन्न होऊन गुरूनें यास दृष्टि दिली, व घरीं जाण्यास सांगितलें. त्यावेळीं गुरुदक्षिणा घेण्याविषयीं ह्यानें आग्रह केल्यावरून गुरुपत्नीनें पौष्य राजाच्या पत्नीचीं कुंडलें आण, म्हणून सांगितलें. तीं आणीत असतां वाटेंत तक्षकानें तीं हरण केलीं पण इंद्रसहाय्यानें तीं यानें परत मिळवून गुरुपत्नीला समर्पण केलीं; व तो राग मनांत ठेऊन ह्यानें जनमेजयाला सर्पसत्रास प्रवृत्त केलें [ भा. आदि. अ. ३ ].

**उत्कच**–हिरण्यकशिपूच्या राजसभेंतील एक दैत्य [ ७,२,१८ ].

**उत्कल**–ध्रुव व इला यांचा पुत्र. हा विरक्त होता [ ४,१३,६ ].

( २ ) सुद्युम्नाचा पुत्र हा दक्षिणदिशेचा राजा होता [ ९,१,४१ ].

( ३ ) वृत्रासुराच्या सैन्यांतील एक असुर. यानें समुद्रमंथनानंतर मातृगणांशी युद्ध केलें [ ८,१०,३३ ].

**उत्कल**—अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

( ५ ) भारतवर्षीय देश.

**उत्कला**—मरीचिराजाची माता [५,१५,१५]

**उत्कोचला**—पांडवांचा पुरोहित जो धौम्य त्याच्या आश्रमाजवळचें तीर्थ.

**उतथ्य**—स्वायंभू मन्वंतरांतील अंगिरा ऋषीच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ

( २ ) वैवस्वत मन्वंतरांतील वारुणि अंगिरा ऋषीच्या आठ पुत्रांतील दुसरा. यानें मांधाता राजास राजनीति सांगितली. याची स्त्री सोमकन्या भद्रा.

**उत्तम**-प्रियव्रताचा पुत्र. हा तिसरा मनु होता. [ ८,१,२३ ]

( २ ) उत्तानपादाच्या सुरुचि नामक पत्नीपासून झालेला पुत्र. ध्रुवाचा सावत्र भाऊ. हा विवाहापूर्वीच मृगयेस गेला असतां यक्षांच्या हातून मरण पावला [४,८,९ व ४ १०,३]

**उत्तमा**--वैवस्वत मन्वंतरांतील एकविसाव्या चौकडींत झालेला व्यास. याला हर्यात्मा असेंहि नांव होतें.

**उत्तमौजा**-पांचालदेशीय राजपुत्र. हा पांडवांकडे होता. युद्ध आटोपल्यावर निद्रिस्त असतां यास अश्वत्थाम्यानें मारिलें. [ भा सौ. अ. ९ ].

**उत्तर**—विराटाचा पुत्र व परीक्षिताचा मामा. [ १,१६,२ ] हा भारतीयुद्धांत पांडवांकडे असून शल्याच्या हातून मरण पावला. ह्याची कन्या इरावती परीक्षिताला दिली होती.

**उत्तर**—कश्यप कुलोत्पन्न एक ऋषि.

**उत्तरकुरु**-उत्तरेकडील एक खंड[५,१७,८]

**उत्तरकोसल**—अयोध्या प्रांत. ह्या देशांतील सर्व लोकांना रामानें निजधामाला नेलें [ ५,१९,८ ].

**उत्तरपंचाल** रोहिलखण्ड.

**उत्तरवेदि**—कुरुक्षेत्र.

**उत्तरा**-विराटाची कन्या व अभिमन्यूची पत्नी. हिचा पुत्र परीक्षित. [ ९,२२,३३ ]

( २ ) प्राचेतस दक्षानें सोमास दिलेल्या सत्तावीस कन्यापैकीं एक.

( ३ ) एक नक्षत्र.

**उत्तराभाद्रपदा** एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक.

**उत्तराषाढा**—एक नक्षत्र.

**उत्तानपाद** स्वायंभुव मनूचा पुत्र. ह्याचा पुत्र ध्रुव. [ ३,२१,२ व ४,८,८]

**उत्तानबर्हि**-शर्यातीचा पुत्र. [ ९,३,२७ ]

**उत्पलारण्य**—पांचाल प्रांताचा भाग. (काकुपुर व बिठोर या मधला)

**उत्सर्ग**—मित्रनामक आदित्याचा पुत्र. [ ६,१८,६ ]

**उदक्स्वन** बृहदिषूच्या वंशांतील विष्वक्सेनाचा मुलगा [ ९,२१,२६ ].

**उदान**—शरीरांत कंठस्थानीं राहणारा वायु.

**उदानकल्प** दिवसानुक्रमाने ब्रह्मदेवाच्या दिवसांतील तेरावा दिवस.

**उदापेक्षी**—विश्वामित्राचा एक पुत्र.

**उदावसु**-मिथिलाचा पुत्र [ ९,१३,१४ ]

**उद्गाता** प्रतीहाचा पुत्र. [ ५,१५,५ ]

( २ ) यज्ञांतील सामवेदी ऋत्विज.

**उद्गीथ**-भूमा व ऋषिकुल्या ह्यांचा पुत्र. [ ५,१५,६ ]

**उद्गीथ**-स्वायंभू मन्वंतरांतील मरीचि व ऊर्णा यांचा पुत्र. हा पुढें देवकीचे पोटीं जन्मास आला होता.

**उद्दालक**-गौतमगोत्रोत्पन्न अरुणिचा पुत्र. धौम्य ऋषीचा शिष्य. हा एकदां गुरूच्या सांगण्यावरून शेतावर बांध घालण्यास गेला असतां मातीच्या बांधानें पाणी अडेना म्हणून हा स्वतः आडवा निजला व पाणी अडविलें. बरेच दिवस झाले तरी शिष्य परत आला नाहीं, हें पाहून धौम्य शेतावर गेले,व त्याची ती अवस्था पाहून संतुष्ट झाले आणि त्यास उद्दालक असें नांव दिलें. यास श्वेतकेतु, नचिकेता असें दोन पुत्र व सुजाता नांवाची कन्या होती, ती कहोडाची पत्नी.

(२) याची स्त्री चंडी. ही नेहमीं पतीच्या विरुद्ध वागे, म्हणून हा ऋषि नेहमीं तिला विरुद्ध गोष्टीच करावयास सांगत असे. पण एकदां विस्मरणानें श्राद्धाचे पिंड गंगत टाकण्यास यानें सांगितलें. नेहमींच्या विरुद्ध वर्तनी स्वभानुसार तिनें ते पिंड अमंगल स्थलीं टाकिलें. तें पाहून यानें स्त्रीला शाप दिला कीं, शिला होऊन पड. नंतर तिच्या प्रार्थनेवरून अर्जुनस्पर्शानें तूं मुक्त होशील असा उःशाप दिला. [ जै. अश्व. अ. १६ ]

**उद्धव**-( यादवांतील प्रमुख ) वसुदेवाचा धाकटा भाऊ जो देवभाग त्याच्या कंसा स्त्रीपासून झालेला पुत्र. हा बुद्धिमान् व नीतिमान् असून कृष्णाचा मंत्री होता. द्वारकेंत गमन. [१,८,७] विदूर व उद्धव यांची यमुनेचे कांठी भेट [ ३,१,४ ]. गोकुलीं गमन. [ १०,४६,१ ] भगवद्भक्तीविषयीं कृष्णाशीं संवाद [ ११,१,२६ ]. बदरिकाश्रमीं गमन. [ ११,३०,१ ].

**उद्वलायन**-कश्यप कुलोत्पन्न ऋषि.

**उद्वह**-भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**उन्नति**-स्वायंभू मन्वंतरांतील धर्मऋषीच्या तेरा स्त्रियांपैकीं एक. हिचा पुत्र अभिमान.

**उन्मत्त**-अष्टभैरवांपैकीं एक.

**उपगु**-वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**उपगुप्त**-निमिवंशांतील उपगुरूचा पुत्र. हा अग्नीचा अंश होता. [ ९,१३,२४ ]

**उपगुरू**- सत्यरथ राजाचा पुत्र[९,१३,२४]

**उपदानवी**-दनुपुत्र वैश्वानराची कन्या व हिरण्याक्षाची पत्नी [ ६,६,३३ ].

**उपदेव**-बाराव्या रुद्रसावर्णि मनूचा पुत्र. [ ८,१३,२७ ]

( २ ) अक्रूराचा पुत्र. [ ९,२४,१८ ]

( ३ ) आहुकपुत्र जो देवक त्याचा पुत्र. [ ९,२४,२२ ]

**उपदेवा**-वसुदेवाची एक पत्नी. हिला कल्प, वर्ष, वगैरे दहा पुत्र होते. [९,२४, श्लो. २३-५१ ]

**उपनन्द**-वसुदेव व मदिरा ह्यांचा पुत्र. [ ९,२४,४८ ]

( २ ) गोकुळांतील प्रमुख गोप. ह्याच्याच सांगण्यावरून नंदादि गोप वृंदावनांत गेले. [ १०,११,२२

**उपनन्दक**-धृतराष्ट्राच्या शतपु तील एक.

**उपनिषत्**-(अध्यात्म प्रतिपादक श्रुति) उपनिषत् ज्ञानानें शाश्वत कल्याण होतें [ १०,८७.३ ].

**उपप्लव्य**-विराट नगराजवळचें एक ठिकाण पांडव अज्ञातवासानंतर येथें रहात होते [ भा. उद्योग अ. ८].

**उपबर्हिण**-क्रौंचद्वीपांतील एक पर्वत. [ ५, ०,०१ ]

**उपमन्यु**—वसिष्ठ कुलोत्पन्न व्याघ्रपाद ऋषीचा पुत्र व धौम्यऋषीचा भ्राता. गरीबीमुळें याची आइ दुधाचे ऐवजीं पाण्यांत पीठ कालवून तें दूध म्हणून यास देत असे. हा एकदां दुसऱ्या आश्रमांत खेळावयास गेला असतां, तेथें गाइचें दुध प्यायला व घरीं येऊन आइजवळ दुध पिण्यास मागितलें. आइनें नित्याप्रमाणें पाण्यांत पीठ कालवून याला दिलें, तें तो पिईना. तेव्हां आइ म्हणाली, खरें दुध पिण्याचें तुमचें पुण्य कोठें आहे ? हें ऐकून यानें शंकराची उपासना करून क्षीरसागराचें आधिपत्य मिळविलें. कृष्णानें याजपासून शैवदीक्षा घेतली होती ( भा. अनु अ. ४ )

( २ ) कृष्णद्वैपायन व्यासाचा पुत्र व शुकाचार्याचा बंधु.

( ३ ) वेदऋषीचा शिष्य ( उतंक पहा )

( ४ ) वसिष्ठ कुलोत्पन्न भद्रऋषीचा पुत्र.

**उपरिचर**-सूर्यवंशीय कृति राजाचा पुत्र. ह्याचा पुत्र बृहद्रथ [ ९ २०,५ ]. ह्यानें आपल्या तपानें इंद्रास संतुष्ट करून त्याजपासून एक माला व विमान मिळविलें. हा एकदां विमानांतून जात असतां शुक्तीमती नदीचा प्रवाह कोलाहल पर्वतानें अडविला होता, यानें तो पर्वत फोडून प्रवाह मोकळा केला, त्यामुळें ती नदी प्रसन्न झाली व यास एक सुंदर कन्या व पुत्र त्या नदीनें राजास दिलीं. त्यांतील मुलगी गिरिजा ही स्वतःची पत्नी करून मुलाला सेनापत्य दिलें. हा एकदां शिकारीस गेला असतां याचें रेत पतन पावलें. तें यानें द्रोणांत भरून आपल्या पत्नीकडे नेऊन देण्यास एका श्येन पक्षास सांगितलें. तो तें घेऊन जात असतां, त्याच्यावर दुसऱ्या श्येन पक्षानें झडप घातल्यामुळें तें नदींत पडलें. तेथें अद्रिका नामक अप्सरा मत्स्ययोनींत जन्माला आलीं असतां, तिनें तें भक्षण केलें. पुढें तिला एका धीवरानें धरून चिरली तों त्यांत एक मिथून सांपडलें ते घेऊन तो उपरिचरवसुकडे आला, व तें त्यास समर्पण केलें. त्यांतील मुलगा राजानें आपणांस घेऊन त्याचें मत्स्यराज असें नांव ठेविलें, व ती मुलगी त्या धीवरास परत दिली. तीच सत्यवती शंतनुराजाची स्त्री.

( २ उत्तानपादकुलोत्पन्न एक राजा. एकदां इंद्र व ऋषि यांचा यज्ञीय पशुहिंसेबद्दल वाद चालला असतां, हा तेथें गेला. तेव्हां त्यांनीं आपला निर्णय यास विचारला. यानें इंद्रमताला अनुकूल असें हिंसापक्षी मत

दिल्यानें ऋषीला राग आला, व तूं अधोलोकीं पतन पावशील असा यास शाप दिला. त्यामुळें हा रसातलांत पतन पावला. ( मत्स्य. अ. १४२ ) हा यज्ञप्रिय असून यानें अनेक यज्ञ केले होते. [ भा. शांति. अ. ३३६ ]

**उपवेद**-आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, आणि स्थापत्य वेद हे ऋग्वेदादि चार वेदांचे उपवेद असून त्यांची उत्पत्ति ब्रह्मदेवाच्या चार मुखांपासून अनुक्रमें झाली. [ ३, १२, ३८ ]

**उपश्रुति**-रात्रीची अभिमानी देवता.

**उपश्लोक**-ब्रह्मसावर्णि नामक दहाव्या मनुचा पिता. [ ८, १३, २१ ]

**उपसुंद**-एक असुर. (सुंदापसुंद शब्द पहा)

**उपस्थल**-वसिष्ठ कुलोत्पन्न एक ऋषि.

**उपावृत्त**-भारत वर्षीय देश.

**उपावृद्धि**-वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**उपेन्द्र**-वामनाचें दुसरें नांव [ ८, २३, २२ ]

( २ ) जसा राजाचा युवराज त्याप्रमाणें इंद्राचा उपेंद्र. सांप्रत पुरंदर नांवाचा इंद्र जो स्वर्गांत आहे, त्याच्यामागें बली हा इंद्र होणार असल्यामुळें सध्यां त्याला हें नांव आहे.

**उपेंद्रा**-भारतवर्षीय एक नदी.

**उभयजात**-भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**उभयसृष्टि**-शाकद्वीपांतील एक मोठी नदी. [ ५, २०, २६ ]

**उमा**-पार्वतीचें नांव. ती शंकरप्रीत्यर्थ तप करीत असतां, आपलें शरीर कष्टवुं नको, असें तिच्या आईनें तिला वारंवार म्हणावें. उ हें संबोधनार्थी अव्यय व मा हें निषेधार्थी अव्यय.

**उमावन**-चंपका नगरीसमीपचें सरोवर.

**उम्लोचा**-एक अप्सरा.

**उरग**-( सर्प ) हा एकदां सरस्वती तीरावर निद्रिस्त असलेल्या नंदाला गिळीत होता [ १०, ३४, ५ ].

**उरु**-इंद्रसावर्णि मनूचा पुत्र. [ ८, १३, ३३ ]

**उरुक्रम**-बारा सूर्यांपैकीं एक. [ ६, ६, ३९ ]

**उरुक्रिय**-सूर्यवंशीय बृहद्रणाचा पुत्र. [ ९, १२, १० ]

**उरुगाय**-त्रेतायुगांतील आराध्य दैवत. [ ११, ५, २६ ]

**उरुवल्क**-वसुदेव व इला यांचा पुत्र. [ ९, २४, ४९ ]

**उरुशृंग**—शाकद्वीपांतील एक पर्वत. [ ५, २०, २६ ]

**उरुश्रवा**-सत्यश्रव्याचा पुत्र [ ९, ९, २० ].

**उर्मन** देवविशेष. ( साध्यदेव पहा )

**उर्मिला**-एक गंधर्वी. सोमदेवाची माता.

( २ ) सीरध्वजाची मुलगी व दशरथ पुत्र लक्ष्मणाची पत्नी.

**उर्वरा**-एक अप्सरा.

**उर्वशी**-एक अप्सरा. हिच्या दर्शनानें मित्रा वरुणाचें रेतस्खलन झालें [ ६, १८, ६ ]. मित्रावरुणांच्या शापानें ती पुरूरव्याकडे गेली [ ९, १४, १७ ].

( २ ) बदरिकाश्रमीं नरनारायण तप करीत असतां इंद्रानें त्यांच्या परीक्षेकरितां वसंत, काम, अप्सरा वगैरे पाठविल्या. तेव्हां त्या ऋषीनीं आपल्या सामर्थ्यानें त्यांच्यापेक्षांहि सुंदर अप्सरा निर्माण केल्या. त्यांना पाहून इंद्राकडील अप्सरा लज्जित झाल्या, व वसंतादिकासह परत जात असतां,

त्या ऋषींनीं ह्यांतील एक अप्सरा घेऊन जाण्यास त्यांना सांगितलें. त्या वेळीं ऋषीच्या उरुजवळ असलेली अप्सरा इंद्राकरितां त्यांनीं घेतली, तिचें नांव उर्वशी [ ११,४,१५ ].

( ३ ) प्राधाकन्या, एक अप्सरा. केशी दैत्य हीस पळवून घेऊन जात असतां पुरूरव्यानें हिला सोडविलें.

( ४ ) सामवंशीय प्रतीपराजा तप करीत असतां गंगा त्याच्या उजव्या मांडीवर येऊन बसली, म्हणून तिला प्राप्त झालेलें नांव ( भा. शां० अ. २९ )

( ५ ) ही अंशुनामक सूर्यासह मार्गशीर्षांत असते [ १२,११,४१ ].

**उर्वी**–पृथ्वी अधमामुळें रसातळास जात असतां कश्यपानें तिला ऊरूवर धारण केल्यामुळें हें नांव पडलें [भा. शांति]

**उलूक**–हिरण्याक्षाच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ.

( २ ) विश्वामित्राचा पुत्र.

( ३ ) द्रौपदीस्वयंवरांतील एक राजा

( ४ ) शकुनीचा पुत्र. यास युद्धापूर्वी दुर्योधनानें पांडवांकडे पाठविलें होतें. तेथें तुला व शकुनीला मी मारीन अशी सहदेवानें प्रतिज्ञा केली होती. हा सहदेवाच्या हातून मरण पावला. ( भा. शल्य० अ. २८ )

( ५ ) एक देश. येथें पांडवांच्या वेळेस सेनाबिंदु राजा होता.

( ६ ) उलूक देशाजवळचा पर्वत. येथें पांडवांच्या वेळीं बृहंत राजा होता.

**उलूत**–एक देश.

**उलूप**--विश्वामित्रकुळांतील एक ब्रह्मर्षि.

**उलूपी**–नागकन्या. अर्जुनाची पत्नी. हिचा पुत्र इरावान्. [ ९,२२,३२ ]

**उल्कामुख**–रामसेनेंतील वानर. हा सीताशोधासाठीं अंगदाबरोबर दक्षिणदिशेस गेला होता.

**उल्बण**–स्वायंभू मन्वंतरांतील वसिष्ठाच्या सात पुत्रांपैकीं एक [ ४,१४,१ ]

**उल्मुक**–दुसरा मनु चक्षु व नड्वला यांच्या बारा पुत्रांपैकीं कनिष्ठ. याला अंग, सुमनस ख्यात, क्रतु, आंगिरस आणि गय असे सहा पुत्र व पुष्करिणी नांवाची स्त्री होती [ ४,११,१७ ].

( २ ) यादवांपैकीं एक [ ११,३०,१७]

**उशना**-स्वायंभुमन्वंतरांतील भृगुपुत्र कवीचा पुत्र यास काव्य असेंहि नांव होतें. प्रियव्रतराजाची कन्या ऊर्जस्वती ही याची स्त्री. याला भार्गव असेंहि म्हणतात.

( २ ) वैवस्वत मन्वंतरांतील वारुणि कवीचा पुत्र. हा दैत्यांचा आचार्य होता. याचे पुत्र शंड व अमर्क. [ ७,५,१ ] ह्याला शुक्राचार्य असें नांव असून देवयानी नामक कन्या होती. [ ९,१८,५ ]

**उशिक**–सोमवंशीय यदुकुळांतील कृति राजाचा पुत्र. ह्याचा पुत्र चेदि. [ ९,२४,२ ]

**उशिज**–अंगिराकुलोत्पन्न मंत्रद्रष्टा ऋषि. यास ऋत्विज असेंहि म्हणतात. ह्याची स्त्री ममता व पुत्र दीर्घतमा.

**उशीनर**-एक देश. [ ७, ,२८ ]

( २ ) अनुवंशीय महामनाचा पुत्र. [ ९,२३,२ ]

( ३ ) भोजनगरीचा राजा. ययातिकन्या माधवी ही याची पत्नी व शिबि पुत्र. ( गालव शब्द पहा )

**उषस्त** चक्रायण ऋषीचा पुत्र.

**उषा** विभावसु नामक वसूची पत्नी. [ ६,६,१६ ]

**उषान**–देवविशेष. ( साध्यदेव श. पहा )

**उष्मप**–पितरांतील एक भेद.

## ऊ

**ऊती**–लीला. [ १ ४, ३७ ]

( २ ) पुराणाच्या दहा लक्षणांतील पांचवें लक्षण कर्मवासना. [२,१०,१]

**ऊर्ज**–ध्रुवपुत्र वत्सर व स्वर्वीथि यांच्या सहा पुत्रांपैकीं चौथा. [ ४, १३, १२ ]

( २ ) स्वारोचिष मन्वतरांतील सप्तर्षी पैकीं एक [ ८, १, २० ].

( ३ ) वर्षांतील आठवामहिना (कार्तिक) या महिन्यांत विष्णु नांवाचा आदित्य आपल्या गणांसह फिरत असतो. [ १२,११,४४ ]

**ऊर्जयोनि**–विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**ऊर्जस्वती** प्रियव्रताची कन्या व शुक्राचार्यांची पत्नी [ ५,१,२५ ].

( २ ) प्राण नामक वसूची पत्नी. [ ६,६,१२ ]

**ऊर्जा**–स्वायंभूमन्वंतरांतील वसिष्ठ ऋषीची दुसरी स्त्री. हिला चित्रकेतु, सुरोचि, विरजा, मित्र, उल्बण, वसुभृद्यान व द्युमान असे सात पुत्र असून ते सर्व ब्रह्मर्षि होते. [ ४,१,४० ]

**ऊर्जित**–सहस्रार्जुनाचा पुत्र. [ ९,२३,२७ ]

**ऊर्ण**–पौष महिन्यांत भग नांवाच्या सूर्याबरोबर असणारा यक्ष[१२,११,४२].

**ऊर्णनाभ**–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

( २ ) अत्रिकुलोत्पन्न ऋषि.

**ऊर्णनाभि**–एक प्राणि. (कोळी) ह्याला अवधूतानें गुरू केलें होतें. [ ११,७,३४ ]

**ऊर्णा**–चित्ररथाची पत्नी. हिचा पुत्र सम्राट [ ५, ५,१४ ]

( २ ) स्वायंभू मन्वंतरांतील मरीचि ऋषीची दुसरी स्त्री. हिला स्मर, उद्गीथ, परिष्वंग, पतंग आणि धृणि असे सहा पुत्र होते. ते सहाही एकदां ब्रह्मदेवास हंसले, म्हणून ब्रह्मदेवानें त्यांस शाप दिला कीं, तुम्ही दुष्टयोनि पावाल. त्या शापानें ते प्रथम हिरण्यकशिपूचे व दुसऱ्या जन्मीं वसुदेवदेवकीचे पुत्र होऊन कंसाचे हातानें मरण पावल्यावर उत्तमलोकीं गेले [ १०,८५,५१ ]

**ऊर्णायु**-प्राधेपासून झालेला देवगंधर्वांपैकीं एक.

**ऊर्ध्वकेतु**–निमिवंशांतील सनद्वाजाचा मुलगा [ ९,१३,२२ ].

**ऊर्ध्वग**–श्रीकृष्ण व लक्ष्मण यांचा पुत्र. [ १०,६१,१५ ]

**ऊर्ध्वबाहु** रैवत मन्वंतरांतील सप्तऋषीपैकीं एक [ ८,५,३ ].

**ऊर्ध्वरोमा**–कुशद्वीपांतगत एक पर्वत. [ ५,२०,१५ ]

**ऊर्ध्वायन**–प्लक्षद्वीपांतील एक जाति. [ ५,२०,४ ]

**ऊर्व**-वारुणि भृगुपुत्र च्यवन ऋषीचा पुत्र.

**ऊषा**-बाणासुराची कन्या व अनिरुद्धाची स्त्री [ १०,६२,१ ]

## ऋ

**ऋक्ष**–अजमीढाचा मुलगा. [ ९,२२,३ ]

(२) भरद्वाजांगिरस कुलांतील एक ऋषि.

**ऋक्षगिरि**–एक पर्वत. ( ५,१९,१६ )

**ऋक्षदेव**-द्रुपदपुत्र शिखंडी या दोन पुत्रांपैकीं एक. हा भारतीयुद्धांत पांडवांकडे होता. याच्या रथाला सानरी रंगाचे घोडे असत. [ भा. द्रोण. ]

**ऋक्षराज**-ब्रह्मदेवाच्या नेत्रोदकापासून झालेला वानर. हा ब्रह्मदेवाजवळ असतां फलमूलें आणण्याकरितां मेरूपर्वतावर गेला होता. तेथील एका सरोवरांत आपलें प्रतिबिंब पाहून हा दुसरा वानर आहे, असें यास वाटलें, व यानें त्यावर उडी घातली पण पाण्यांत दुसरें कोणी नाहीं, हें समजल्यावर स्नान करून बाहेर आला तों याचें पुरुषत्व जाऊन यास स्त्रीत्व प्राप्त झालें. याचवेळी तथून इंद्र व सूर्य जात असतां त्यांनीं हिला पाहून ते कामपीडित झाले, व त्यांचें वीर्य वाल व ग्रीवा यावर पडलें. त्यापासून वाली व सुग्रीव असे दोन वानर उत्पन्न झाले. त्यांना मालादि प्रसाद देऊन ते देव निघून गले. दुसऱ्या दिवशीं या वानराला पुन्हां पुरुषत्व मिळालें. तेव्हां त्या पुत्रांसह हा ब्रह्मदेवाकडे गेला; व त्याला सर्व हकीगत सांगितली. नंतर ब्रह्मदेवानें त्यास पृथ्वीवर पाठवून किष्किंधेचा अभिषेक करविला. त्यावळीं वाली युवराज होता. त्याला सुषेण वानराची कन्या तारा ही दिली; व सुग्रीवाला तार नामक वानराची कन्या रुमा दिली होती ( वा रा. )

**ऋक्षवान्**—ऋष्यवान् शब्द पहा.

**ऋग्वेद**-ब्रह्मदेवाच्या पूर्वेकडील मुखापासून उत्पन्न झाला [ ३, २,३७ ]. ऋषी ह्यांतील मंत्रानीं सूर्याची स्तुति करितात [ १२, ?,४७ ]. वेदांचें अध्ययन करणाराला मध व तूप यांची प्राप्ति होते [ १२,१? ६२ ].

**ऋचीक**-ऋषि. ह्याचा पुत्र जमदग्नि व नातू परशुराम. यानें एकदां गाधीराजाकडे जाऊन त्याजपाशीं कन्या मागितली. एक हजार श्यामकर्ण दिल्यास कन्या देइन असें राजानें सांगितल्यावरून ह्यानें वरुणाकडे जाऊन अश्व आणले व राजास देऊन त्याच्या सत्यवती नामक कन्येशीं विवाह लाविला. एकदां गाधिपत्नी व सत्यवती यांच्या प्रार्थनेवरून पुत्रप्राप्त्यर्थ चरु तयार केला असतां तो त्यांनीं बदलून भक्षिला. हें ऋचिकास कळल्यावर हा आपल्या पत्नीस म्हणाला, तुला क्षात्र धर्माचा पुत्र होईल परंतु तिच्या प्रार्थनेवरून तो पुत्र न होतां पौत्र झाला. तोच परशुराम [ ९, ५,५ ].

**ऋजु**—वसुदेव व देवकी यांचा चौथा पुत्र. ह्याला कंसानें मारिलें [९,२४,५४].

**ऋणंजय**—एक ऋषि.

**ऋत**—चक्षुमनु व नडवला यांच्या बारा पुत्रांपैकीं पांचवा [ ४, १३ १६ ]
( २ ) विदेहवंशीय विजयाचा पुत्र. [ ९, १३, २५ ]
(३) बाराव्या रुद्रसावर्णि मनूस नामांतर.
( ४ ) देव विशेष.
( ५ ) शेतांतील किंवा बाजारांतील दाणे टिपून त्यावर उपजीविका करणें.

**ऋतंजय**—एक ब्रह्मर्षि.

**ऋतधामा**–रुद्रसावर्णिमन्वंतरांतील इंद्र. [ ८,१३,२८ ]

( २ ) कंकापासून कर्णिकेला झालेल्या दोन पुत्रांतील एक [९, २४, ४४].

( ३ ) तेराव्या देवसावर्णि मनूस नामांतर

**ऋतध्वज**–धन्वंतरीचा पुत्र. [ ९,१७,६ ]

**ऋतम्भरा**–प्लक्षद्वीपांतील एक नदी. [ ५,२०,४ ]

**ऋतव्रत**–शाकद्वीपांतील एक जात. [ ५,२०,२७ ]

**ऋतसेन** अंशुनामक सूर्याबरोबर मार्गशीर्ष महिन्यांत असणारा गंधर्व. [ १२,११,४१]

**ऋतु** पर्जन्य नामक सूर्यासह फाल्गुनांत फिरणारा यक्ष. [ १२,११,४० ]

**ऋतुध्वज**–एकादश रुद्रांपैकीं एक. [ ३,१२,१२ ]

**ऋतुपर्ण**-सूर्यवंशीय अयुतायुचा पुत्र. हा नळाचा मित्र होता. [ ९,९,१७ ]

**ऋतुमत्**–वरुणाचें उपवन. [ ८,२,९ ]

**ऋतुस्थला**–एक अप्सरा,

**ऋतेयु**–रौद्राश्वाचा पुत्र. ह्याचा पुत्र रन्तिभार [ ९,२०,४ ]

**ऋत्वा**–गंधर्व विशेष.

**ऋत्विज**—श्रौतस्मार्त कर्मे करण्याकरितां नियोजित केलेले अध्वयु आदि ब्राम्हण.

**ऋद्धि**—कुबेराची स्त्री.

**ऋभ**—चाक्षुषमन्वंतरांतील पंचविध देवापैकीं तिसरे.

**ऋभु**—दक्षयज्ञांत शिवगणांच्या नाशाकरितां भृगुनें यज्ञानें उत्पन्न केलेले देव. [ ४, ४, ३३, ]

( २ ) ब्रम्हदेवाचा एक मानस पुत्र. ४, ८, १ ] याचा शिष्य निदाघ.

( ३ ) वैवस्वत मन्वंतरांतील देव. [ ९,१३,४ ]

**ऋश्यकेतु**-कृष्णपौत्र अनिरुद्धास नांव.

**ऋषभ**–नाभी व मरुदेवी ह्यांच्यापासून झालेला भगवंताचा आठवा अवतार [ १,३,१३ ]. ह्यानें परमहंस दीक्षा घेतली होती [ २,७,१० ]. ह्याला जयंती नामक स्त्रीचे ठिकाणीं भरतादि शंभर पुत्र झाले [ ५,६,१९ ].

( २ ) आयुष्मान व अम्बुधारा ह्यांचा पुत्र. हा दक्षसवर्णिमन्वंतरांतील अवतार [ ८,१३,२० ].

(३) पूर्वेकडील एक दिग्गज[५,२०,३९].

( ४ ) क्रौंचद्वीपांतील एक जात. [ ५,२०,२२ ]

( ५ ) इंद्राचा एक पुत्र. [ ६,१८,७ ]

( ६ ) सोमवंशीय कुशाग्र राजाचा पुत्र. ह्याचा पुत्र सत्यहित [ ९,२२,६ ].

( ७ ) एका गोपाचं नांव.[१०,२० ३१]

( ८ ) श्रीकृष्णाच्या पुत्रांपैकीं एक. [ १, ४,३१ ]

( ९ ) एक तपस्वी ऋषि हा हेमकूटपर्वताच्या ऋषभकूट शिखरावर रहात असतां लोकांपासून यास त्रास होऊं लागल्यामुळें यानें पवतास व वायूस आज्ञा केलीं कीं, जो कोणी मजकडे येईल, त्याच्या अंगावर पाषाणवृष्टी करून त्याला मागें परत लावा. [ भा. वन अ ११० ]

( १० ) एक ऋषि. यानें सुमित्र राजास आशा किती मोठी असते, याचें वर्णन करून सांगितलें होतें. [ भा. शांति.]

**ऋषभ**–वृत्रासुरानुयायी एक असुर.

( १२ ) रामसेनेंतील एक वानर. यानें महापार्श्वास मारिलें.

( १३ ) एक असुर. जरासंधपिता बृहद्रथ यानें या असुरास मारून याच्या चर्माच्या दुन्दुभि केल्या होत्या.

( १४ ) भारती युद्धांतील दुर्योधन-पक्षीय एक राजा.

**ऋषभकूट**—हेमकूट पर्वताचें शिखर. येथें ऋषभ ऋषीचा आश्रम होता.

**ऋषभयोगी**—शिवांशानें पृथ्वीवर फिरणारा एक योगी.

**ऋषभस्कंध**—रामसेनेंतील एक वानर.

**ऋषभा**—विंध्यपर्वतोत्पन्न एक नदी.

**ऋषभाद्रि**–दक्षिणेकडील एक पर्वत.

**ऋषिक**—दुर्योधन पक्षीय राजा.

( २ ) भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा परमकांबोजाच्या उत्तरेस असून हाच रशिया असें कोशकार म्हणतात.

**ऋषिकुल्या**–भूमाची पत्नी. [ ५,१५,६ ]

( २ ) एक नदी. [ ५,१९,१८ ]

**ऋष्य**– देवातिथीचा पुत्र. [ ९,२२,११ ]

**ऋष्यमूक**-पंपासरोवरासमीप असलेल्या मतंग पर्वताचें शिखर. येथें मतंग ऋषीचा आश्रम असे. त्यानें शापानें वालीला प्रतिबंध केल्यामुळें सुग्रीव येथें रहात असे. तुंगभद्रा कांठच्या अणगुंदी पासून ८ मैलावर. [ ५,१९,१६ ]

**ऋष्यवान्**–एक उपपर्वत. रेवा प्रांतांत आहे.

**ऋष्यशृंग**-सावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८,१३,१५ ]

**ऋष्यशृंग**–विभांडकऋषीला एका हरिणी पासून झालेला पुत्र. याच्या मस्तकावर हरणाचें शिंग होतें म्हणून यास ऋष्यशृंग म्हणत. एकदां रोमपाद राजाच्या राज्यांत अवर्षण पडलें असतां याला मोठ्या युक्तीनें राजानें आणिलें. यानें यज्ञ करून सर्वत्र आबादि केली. रोमपादानें यास आपली शांता नामक कन्या दिली होती. दशरथानें याच्या हस्तें पुत्रकामेष्टी यज्ञ केल्यावर त्यास पुत्र झाले [ ९,२३,८ ].

## ए

**एक**–रय राजाचा पुत्र. [ ९,१५,२ ]

**एकचक्र**–कश्यप व दनू यांच्यापासून झालेला एक दानव. [ ६,६,३१ ]

**एकचक्रा**–पांडव लाक्षागृहांतून मुक्त झाल्यावर या नगरींत आले होते. येथें असतां त्या नगरीला त्रास देणाऱ्या बकासुराचा भीमानें नाश केला.

**एकजटा**–सीतारक्षणार्थ असलेली एक राक्षसी

**एकत**–श्रीकृष्णाला भेटण्यासाठीं स्यमंतपंचक क्षेत्रीं गेलेला एक ऋषि [१०,८४,५]. हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असून द्वित व त्रित यांचा हा भाऊ होता.

( २ ) गौतमऋषीच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ पुत्र. यांचीं नांवें हींच होतीं.

**एकपर्णा**–हिमालय व मेनका यांची कन्या. अपर्णा व पर्णा यांची भगिनी व असित ऋषीची पत्नी.

**एकपादा**–सीतारक्षणार्थ असलेली एक राक्षसी

**एकल**–श्रीकृष्ण व कालिंदी यांचा पुत्र. [ १०,६१,१४ ]

**एकलव्य**—निषादाधिपति हिरण्यधेनुकाचा पुत्र. द्रोणाचार्यांनीं धनुर्विद्या शिकविण्याचें नाकारल्यावरून यानें त्यांच्या पादुका गुरुस्थानीं स्थापून धनुर्विद्येचा अभ्यास केला. हा अलौकिक धनुर्धारि होता. अर्जुनापेक्षां वरचढ होऊं नये म्हणून द्रोणाचार्यांनीं याच्या जवळ अंगठा न लावतां बाण सोडीत जा अशी गुरुदक्षिणा मागितली. यानेंही तसें वागण्याचें कबूल केलें. अद्यापहि सव किरात हें व्रत पाळतात. (भा. आदि.)

**एकलोचना**—सीतारक्षणार्थ रावणानें ठेवलेली एक राक्षसी [ भा. वन. अ. २८० ].

**एकवीर**—सोमवंशीय तुर्वसुकुलांतील हरिवर्मा राजास विष्णुप्रसादानें प्राप्त झालेला पुत्र. हा वाजीरूपधारी विष्णु पासून वडवारूप लक्ष्मीला झाला होता, म्हणून यास हैहय म्हणतात. हा यदुकुलोत्पन्न हैहय राजाहून अगदीं भिन्न असून यास एकावली आणि यशोवती अशा दोन स्त्रिया होत्या.

**एकवीरा**—एकवीर राजाची उपास्य देवता.

**एकादशरुद्र**—ब्रम्हदेवाचा क्रोध नत्रांतून बाहेर पडून त्यापासून नीललोहित नामक रुद्र झाला, त्याचींच नांवे किंवा रूपें—मन्यु, मनु, महिनस, महान्, शिव, ऋतुध्वज, उग्ररेता, भव, काल, वामदेव आणि धृतव्रत. यांचीं पुराणांतरीं भिन्नभिन्न नांवें आहेत. यांच्या पासून उग्रप्रजा उत्पन्न होऊन सव जग भरून गेलें [ ३, १२, १२ ].

**एकांभक**—भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**एकायन**—भृगुकुलोत्पन्न ब्रम्हर्षि.

**एकावळी**—एकवीर राजाची स्त्री.

**एरका**-एक प्रकारचें गवत. ( लव्हाळे ) [ ११,३०,२० ] यादवांनीं मुसळाचें चूर्ण करून समुद्रांत टाकलें असतां, त्यापासून उत्पन्न होऊन हे यादव नाशाला कारण झाले.

**एलापत्र**–श्रावण महिन्यांत इंद्र नांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा एक नाग. [ १२,११,३७ ]
( २ ) कद्रूपु नाग.

## ऐ

**ऐडविड**-मूलकपुत्र दशरथाचा मुलगा. [ ९,९,४१ ]
( २ ) इडविडेचा पुत्र. ( कुबेर )

**ऐतरेय**–ऋक् शाखीय एक ऋषि व उपनिषत्

**ऐंद्रबाहु**–रैवतमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

**ऐरावत** इंद्राचा हत्ती. हा समुद्र मंथनकालीं समुद्रांतून निघाला होता. हा पूर्वेकडील दिग्गज असून सर्व दिग्गजांचा स्वामी शुभ्रवर्णाचा व चार दांतांचा आहे. ह्याचे कडून श्रीकृष्णाला अभिषेक केला. [ ८,८,४ आणि १०,२५,७ ]
( २ ) फाल्गुनमहिन्यांत पर्जन्य नांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा नाग. [ १२,११,४० ]

**एरंडी**–नर्मदा नदीस मिळणारी नदी.

**ऐल**–पुरूरव्याचें नांव. हा उर्वशी विरहानें शोकाकुल झाला [ ९,१४,३२ ].

## ओ

**ओघवत्**–ओघवान राजाचा पुत्र. [ ९,२,१८ ]

**ओघवती**–प्रतीकाची कन्या व सुदर्शनाची पत्नी [ ९,२,१८ ].

**ओघवती**-सरस्वती नदीच्या सप्तप्रवाहांतील एक प्रवाह. हिच्या कांठीं कौरव पांडवांचें युद्ध झालें. [भा. शल्य अ.६२].

**ओघवान्**-नीकाचा पुत्र [ ९,२,१८ ].

**ओज**-श्रीकृष्ण व लक्ष्मणेचा पुत्र. [ १०,६१,१५ ]

**ओजस्**-वैशाख महिन्यांत अर्यमा नांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा यक्ष. [ १२,११,३४ ]

**ॐ**-अ, उ व म ह्या तीन अक्षरांच्या योगानें झालेला प्रणव. हें परब्रह्माचें स्वरूप होय [ १२,६,३९ ].

**औ**

**औपगवि** उद्धवाचें नांव. [ ३,४,२७ ]

**औरग**-सर्पांचीं कपटें व माया, ह्यांना हें नांव आहे. [ १०,५५,२३ ]

**और्व**-परीक्षिताला भेटण्याकरितां आलेला एक ऋषि [ १,१९,१० ]. ह्याचे सांगण्यावरून सगरानें अश्वमेध केला; व तालजंघ नांवाच्या क्षत्रियकुलाचा संहार केला [९,८,८व९,२३,२८].

( २ ) स्वारोचिष मन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक.

(३) वारुणीभृगुच्या सात पुत्रांतील चौथा.

**औशनस** भारतवर्षीय तीर्थ येथें उशना ऋषीनें तप करून नीतिसूत्रें रचलीं. यास कपालमोचन असेंहि म्हणतात.

**क**

**ककुत्स्थ** इक्ष्वाकुवंशीय शशादाचा पुत्र. ह्याला पुरंजय व इन्द्रवाह हीं नांवें असून ह्यानें देव दैत्य यांच्या युद्धांत इंद्राला सहाय्य केलें. [ ९,६,१२ ]

**ककुद्मान्**-हिमालयाचें एक शिखर. हें कैलासाच्या वायव्येस आहे. नंदीची उत्पत्ती येथें झाली [मत्स्य.अ.१२०.]

**ककुद्मी**-रेवतराजाचा मुलगा. याला रेवती नांवाची मुलगी होती. तिला घेऊन हा ब्रह्मदेवाकडे वर विचारण्याकरितां गेला. तेथें गाणें चाललें होतें म्हणून क्षणभर थांबला. नंतर ब्रह्मदेवाला विचारिलें. तेव्हां तो हंसून म्हणाला, तूं येथें आल्यापासून पृथ्वीवर चार युगांच्या सत्तावीस फेऱ्या झाल्या. आतां तुझ्या नातवांच्या नांवाचीहि वार्ता नाहीं. सांप्रत द्वापारयुगांत परमेश्वर अंशानें बलराम अवतरला आहे त्याला ही कन्या दे [ ९,३,२९ ].

**ककुब्**-दक्षकन्या व धर्मपत्नी. [ ६,६,४ ]

**ककुभ**-एक पर्वत. [ ५,१९,१६ ]

**कक्षसेन**-असितपर्वतावर रहाणारा राजर्षि.

**कक्षीवान्**-भीष्माला भेटण्याकरितां आलेला एक ऋषि. [ १,९,७ ]

**कङ्क**-म्लेंच्छराजांचा वंश. ह्यांचा पराभव दुष्यंतपुत्र भरतानें केला. [ ९,२०,३० ]

( २ ) उग्रसेनाचा चौथा पुत्र, व कंसाचा कनिष्ठ भाऊ. बलरामानें ह्याचा वध केला. [९,२४,२४ व १०,४४,४०]

( ३ ) शूर व मारिषा यांचा सातवा पुत्र. ह्याची पत्नी कर्णिका व पुत्र ऋतधाम आणि जय [९,२४,२९-४४].

( ४ ) एक देश. येथील लोकांनीं श्रीकृष्णाचें स्वागत केलें. [१०,८६,२० ]

( ५ ) कलियुगांतील सोळा राजे. [ १२,१,२१ ]

**कङ्क**–अज्ञातवासांत असतां धर्मराजानें धारण केलेलें नांव.

**कङ्का**-उग्रसेनाची कन्या व आनकाची पत्नी हिचे पुत्र सत्यजित् व पुरुजित्. [ ९,२४,२५-४१ ]

**कच**-चालू मन्वंतरांतील अंगिरापुत्र बृहस्पतीचा पुत्र. हा देवांच्या कार्यासाठीं शुक्राचार्याकडे संजीविनी विद्या प्राप्त करण्यासाठीं गेला असतां शुक्राचार्यांची मुलगी देवयानी हिचें याजवर प्रेम जडलें. बृहस्पतिपुत्र संजीवनी विद्या संपादन करण्याकरितां शुक्राचार्याकडे येऊन राहिला आहे असें समजतांच दैत्यांनीं यास अनेकवेळां ठार मारिलें, पण देवयानीच्या आग्रहानें तितक्याहि वेळां आचार्यांनीं यास उठविलें. हें पाहून दैत्यांनीं याची राख करून ता दारूंतून आचार्यांस पाजली. हें कपट जाणून शुक्राचार्यांस पुढें काय करावें हें सुचेना. पण देवयानीच्या सांगण्यावरून त्यांनीं उदरांतच कचास संजीवनी विद्येचा उपदेश केला, व पोट फोडून बाहेर येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें कच बाहेर आल्यावर त्यानें आपल्या गुरूला उठविलें. त्याच वेळीं शुक्राचार्यांनीं नियम केला कीं, जो कोणी ब्राह्मण आजपासून मद्य प्राशन करील, तो इहपरलोकीं पापी होईल. नंतर हा कृतकृत्य होऊन परत जात असतां देवयानीनें यास आपला विवाहाचा हेतु कळविला. परंतु तूं गुरुकन्या असल्यामुळें मला हें कबूल करतां येत नाहीं, असें कचानें सांगितलें असतां, तिनें शाप दिला कीं, ही विद्या तुला उपयोगाला येणार नाहीं. तेव्हां कचानें रागाच्या भरांत तिला उलट शाप दिला, कीं तुला ब्राह्मणपुत्र वरणार नाहीं. ( भा. आदि. अ. ८३ )

**कच्छानिलय**–दाक्षिणेकडील पाणथळ प्रदेश.

**कच्छनीर**–वैशाखमाहिन्यांत अर्यमा नांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा नाग. [ १२,११,३४ ]

**कच्छप**–कुबेराच्या नऊ निधींतील पाचवा.

**कच्छपी**–नारदाच्या वीणेचें नांव.

**कंजनाभ**–भगवंताचें नांव.

**कंजानना**–रामपुत्र लवाची स्त्री.

**कटरुद्र**–यजुर्वेदोपनिषत्.

**कटवल्लि**- ,, ,,

**कटायनि**–भृगुकुलोत्पन्न एक ऋषि.

**कटु**–अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**कटोदक**-मृतसंबंधीं क्रिया [ ७,२,१७ ].

**कणजिव्ह**-अत्रिकुलोत्पन्न एक ऋषि.

**कणाद्**–वैशेषिक न्यायशास्त्राचा कर्ता. षड्दर्शनापैकीं एक शास्त्र. विश्वांतील सर्व पदार्थाचे सहा वर्ग पडतात, त्यांत विशेष हा एक पदार्थ आहे, असें प्रतिपादल्यावरून यांस वैशेषिक व कण ( अणु ) वादाचा अंगिकार केल्यावरून कणाद असें नांव यास मिळालें. द्रव्याचे परमाणू असतात, ही कल्पना प्रथम कणादानें काढली.

**कणीक**–धृतराष्ट्राचा ब्राह्मण मंत्री. त्यानें पांडवांविषयीं धृतराष्ट्राचे मन कलुषित केलें होतें.

**कण्डरीक**–ब्रह्मदत्त राजाच्या मंत्र्याचा पहिला मुलगा.

**कण्डु**–एक ऋषि. याचा दहा वर्षांचा पुत्र ज्या अरण्यांत मृत झाला होता, तें अरण्य यानें वृक्षोदक रहित केलें.

**कण्डुक**-मारिषेचा पिता. ( मारिषा शब्द पहा. ) [ १,३,१० ]

**कण्डू**–एक ऋषि. ह्याच्या तपाचे नाशाकरितां इंद्रानें प्रम्लोचा नांवाची अप्सरा पाठविली होती. [ ४,३०,१३ ]

**कण्व**–कुरुवंशीय अप्रतिरथाचा पुत्र. ह्याचा पुत्र मेधातिथि [ ९,२०,६ ].

( २ ) एक ऋषि. ह्यानें शकुंतलेचें पालन केलें व तिच्या पुत्राचे-भरताचे-जातकर्मादि संस्कार केले. याचा आश्रम मालीनीतीरावर होता [९,२०,१८].

( ३ ) कलियुगांतील राजे. हे अल्पगुणी असूनहि यांनीं तीनशें पंचेचाळीस वर्षे राज्य भोगिलें. [ १२,१,१९-२१ ]

**कत**-विश्वामित्र कुलोत्पन्न ऋषि व कुल.

**कतृण**–अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**कथक**-विश्वामित्र कुलोत्पन्न ऋषि व कुल.

**कदली**–एक नदी.

**कद्रू**–दक्षकन्या व कश्यपपत्नी. हिचे पुत्र काद्रवेय संज्ञक सर्प. [ ६,६,२१ ]

**कध्मोर**–एक राजर्षि.

**कनकांगद**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक

**कनकायु**- ,, ,,

**कनखल**-एक तीर्थ.

( २ ) एक पर्वत.

**कन्दर्प**-मदनाचें नांव.

**कंदर्पकल्प**–दिवसानुक्रमानें ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील आठवा दिवस. या कल्पारंभीं मदनाचा जन्म झाला.



**कन्यक**–कश्यप कुलोत्पन्न एक ऋषि.

**कन्यका**-योगमायेचें एक नांव.[१०,२,१२]

**कन्यकागुण**–भरतखंडस्थ देश.

**कन्यातीर्थ**-भरतखंडस्थ तीर्थ.

**कन्यादुर्गा**-देवीचें नांव. ही देवी दक्षिणसमुद्रकांठीं आहे. येथें बलराम तीर्थयात्रेला आला होता. [१०,७९,१७ ]

**कन्याश्रम**–एक तीर्थ.

**कप**–देवविशेष. यांनीं पूर्वी स्वर्गाचा अपहार केला असतां, ब्राह्मणांनीं इंद्राचा :पक्ष धरून यांचा नाश केला. [भा. अनु.]

**कपर**–दुनुपुत्र दानव.

( २ ) लंकेंतील एक राक्षस.

**कपर्दी**–शंकराचें नांव.

**कपर्देय**–विश्वामित्र कुलोत्पन्न एक ऋषि.

**कपालमोचन**-औशनस तीर्थ. हत्या घडून मागें लागलेलें कपाल या तीर्थांत स्नान करण्याने नाहींसें झालें.

**कपालि**–एकादश रुद्रापैकीं एक.

( २ ) अष्ट भैरवांपैकीं एक.

**कपि**–तामस मन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक.

( २ ) भरद्वाजांगिरस कुलांतील एक ऋषि व त्याचें कुल.

**कपिंजल**-वसिष्टकुलोत्पन्न एक ऋषि.

( २ ) ( कवडा ) हा पक्षी विश्वरूपाच्या सोमपीथ नांवाच्या मस्तकापासून झाला. [ ६,९,५ ]

**कपिंजला**–एक नदी.

**कपिंजल्य**-इंद्रप्रभृति ऋषीसच नामांतर.

**कपिध्वज**–पंडुपुत्र अर्जुनाचें नांव.

**कपिभू**–अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**कपिल**–कर्दम व देवहूती यांचा पुत्र. हा विष्णूचा पांचवा अवतार होय. ह्यानें

सांख्यशास्त्र उत्पन्न केलें, व देवहूतीला उपदेश केला. [ १,३,१० व २४,६ ] पृथूनें पृथ्वीचें दोहन केलें, तेव्हां सिद्धांनीं कपिलाला वत्स करून अणिमा आदि सिद्धींचें दोहन केलें. [ ३,२५१,३ व ४१८,१९ ] सगरपुत्र ह्याच्या कोपाग्नीनें दग्ध झाले. [ ९,८,१२ ]

(२) एक पर्वत [ ५,१६,२६ ]

(३) कश्यप व दनू यांचा पुत्र [६,६,३०]

( ४ ) रुद्रगणांतील एक.

( ५ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

( ६ ) कद्रूपुत्र एक नाग.

( ७ ) अश्वशास्त्रप्रणेता जो शालिहोत्र ऋषि, त्याचा पिता.

( ८ ) विंध्यपर्वतावरील एक वानर.

( ९ ) वसुदेव व सुतनु यांचा पुत्र.

**कपिला**–कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांपैकीं एक.

**कपिलावट**-एक तीर्थ.

**कपिलाश्व**-धुंधुमाराचा पुत्र. [९,६,२४]

**कपिलोदक**–एक तीर्थ.

**कपिवती**--एक नदी.

**कपिश**–दनुपुत्र एक दानव.

**कपिशा**–ताम्रलिप्तीच्या जवळची एक नदी

**कपिलाह्रद**–वाराणसी क्षेत्रांतील एक तीर्थ.

**कपोत**–एक राजा. हा आत्मज्ञानी होता. [ १०,७२,२१ ]

( २ ) ( पक्षी ) अवधूतानें केलेला एक गुरू. [ ११,७,३३ ]

**कपोतरोमा**–कुकुरपुत्र विलोम्याचा पुत्र, ह्याचा पुत्र अनु. [ ९,२४,२० ]

( २ ) औशीनर शिबीचा पुत्र.

**कबंध**–स्थूलशिरा ऋषीच्या शापानें असुरत्व पावलेला विश्वावसु गंधर्व. हा दण्डकारण्यांत रहात असे. इंद्राच्या वज्रानें याचें मस्तक उदरांत गेलें होतें, पण हात मात्र एक योजन लांबीचे असून त्यांत जें सांपडल तें तो खात असे. रामलक्ष्मण दण्डकारण्यांत आले असतां, ते याच्या हातांत सांपडले तेव्हां रामानें याचे हस्त छेदून यास मुक्त केलें. ( वा. रा. )

**कबंधी**–पिप्पलादऋषीचा ब्रह्मविद्येचा शिष्य.

( २ ) पंचशिखऋषीची माता.

( ३ ) आसामांतील एक नदी.

**कमलाक्ष**–त्रिपुरांतील सुवर्णपुराचा अधिपति. एक असुर.

**कंपन**–अंगदानें युद्धांत मारलेला राक्षस.

**कंपना**–भारतवर्षीय नदी.

**कम्बल**–पातालांतील नागांच्या अधिपतिपैकीं एक. [ ५,२४,३१ ]

( २ ) आश्विन महिन्यांत त्वष्टा नांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा नाग. [ १२,११,४३ ]

**कम्बलबर्हि**–सात्वतवंशीय अंधकाचा पुत्र. [ ९,२४,१९ ]

**कम्बु**–( शंख ) भगवंतानें आपल्या वेदरूप शंखानें ध्रुवाला स्पर्श केला. [ ४, ९, ४ ]

**कम्बुग्रीव**–इंद्रदेशीय सुधन्वा राजाचा पुत्र.

**कम्बोज**–हिमालयाच्या उत्तरेस व काश्मीरच्या पूर्वेस असलेला एक देश. येथें घोडे व शाली उत्तम होतात.

**कयाधु**–जंभासुराची कन्या व हिरण्यकशिपूची पत्नी. हिला संह्राद, अनुह्राद,

ह्राद व प्रह्राद असे चार पुत्र आणि सिंहिका नांवाची कन्या होती ती विप्रचित्ति दानवाला दिली होती. ही प्रल्हादाचे वेळीं गर्भिणी असतां हिरण्यकशिपू तप करण्याकरितां निघून गेला, तेव्हां इंद्र अनेक दैत्यांना मारून हिला घेऊन जात असतां वाटेंत नारद भेटला. त्यानें इंद्राला हा गर्भ विष्णुभक्त होईल असें सांगून सोडविलें; व गंगातीरीं येऊन तिला ज्ञानोपदेश केला. तो उपदेश गर्भांतून ऐकल्यामुळें प्रल्हाद मोठा भगवद्भक्त झाला. पुढें नारदानें तिला हिरण्यकशिपूच्या स्वाधीन केलें. [ ६,१८,१२ व ७,७,७ ]

( २ ) ययातिवंशीय त्रिभानुचा पुत्र. हा मोठा उदारबुद्धि होता. [९,२३,१७]

**करक**–भारतवर्षीय एक देश.

**करकर्ष**–सोमवंशीय यदुकुलांतील शिशुपालाच्या चार पुत्रांपैकीं एक. याचा चेकितान यादवाशीं अत्यंत स्नेह होता.

**करकाक्ष**–भारतीयुद्धांतील दुर्योधन पक्षीय एक राजा

**करट**–भारतवर्षीय देश.

**करतोया**–बंगालप्रांतांतील एक नदी. ही प्राचीन काळीं फार पवित्र मानली जात असे. प्राचीन कामरूप राज्याच्या सरहद्दीवर ही नदी असून पलीकडे पोंड लोकांचा पौंड्रवर्धन हा देश होता. ही जलपैगुरी जिल्ह्याच्या अगदीं वायव्य टोकास वैकुंठपुर जंगलांत उगम पावून २१४ मैल वहात जाऊन बोग्रा जिल्ह्यांत हल्लालिया नदीस मिळते. [ ज्ञा. को. ]

( २ ) विंध्य पर्वतापासून निघालेली एक नदी. हिला सदानीरा असें नांव आहे.

**करन्धम**–सोमवंशीय ययातीच्या कुलांतील त्रिभानुचा पुत्र [ ९,२३,१७ ].

( २ ) सोमवंशीय दिष्टकुलोत्पन्न खनिनेत्राचा पुत्र [ ९, २, २५ ]. एकदां यास पुष्कळ राजांनीं अतिशय त्रास दिला असतां यानें आपले हस्त कंपित करून सैन्य उत्पन्न केलें आणि त्यांचा पराजय केला. याचें मूळचें नांव सुवर्चा होतें. (भा.अश्व अ.१६)

**करभाजन**-ऋषभाचा पुत्र. हा योगी व ब्रह्मज्ञानी होता. याने विदेहाच्या यज्ञांत ज्ञानोपदेश केला. [ ५,४,११] व [ ११,२.२१ ]

**करम्भ**–अगस्त्य कुलोत्पन्न एक ऋषि.

( २ ) दनुपुत्र एक दानव.

( ३ ) भारतवर्षीय करूषकदेशाचा राजा.

**करम्भि**-विदर्भवंशीय शकुनीचा पुत्र. त्याचा पुत्र देवरात. [ ९,२४,५ ]

**करवीर**–मेरूच्या दक्षिणेकडील एक पर्वत. [ ५,१६,२७ ]

( २ ) एक देश. ( कोल्हापुरप्रांत )

**करल**–एक गंधर्व.

( २ ) लंकेंतील एक राक्षस.

( ३ ) विदेहवंशीय एक राजा. याचा वसिष्ठ ऋषींशीं संवाद झाला होता.

**करूष**–वैवस्वत मनुच्या दहा पुत्रांतील एक. याची संतति कारूषक नांवानें प्रसिद्ध होती, व त्यांचें आधिपत्य उत्तरेकडे होतें. [ ८, १३, ३ ] आणि [ ९, २, १६ ]

(२) अयोध्या व मिथिला यांमधील प्रदेश. पूर्वी येथें करम्भ नांवाचा राजा होता, परंतु पाण्डवांच्या वेळेस जरासंधाचे प्रधान हंस व डिंभक हे दोघे सहोदर राज्य करीत असत. वृद्धशर्मा राजा व त्याचा पुत्र दंतवक्र याचेच दायाद होते. [ वा. रा. बा.]

**करेणुपालि**- गौतमांगिरसमालिकेतील एक ऋषि.

**करेणुमती**- नकुलाची पत्नी व शिशुपालाची कन्या. हिचा पुत्र निरमित्र. [ ९,२२,३२ ]

**कर्कोटक**- भग नांवाच्या सूर्याबरोबर पौष महिन्यांत फिरणारा नाग. [ १२, ११,४२ ]

(२) कद्रूपुत्र एक नाग. हा नारदाच्या शापानें दावाग्नींत पडला असतां यास नलराजानें सोडविलें, म्हणून यानें नलाचा वनवास संपेपयत त्याला कोणी ओळखूं नये, व कलीची पीडा होऊं नये याकरितां दंश करून विरूप केलें होतें.

**कर्ण**- कुंतीला कन्यकावस्थेंत सूर्यापासून झालेला पुत्र. यास तिनें लज्जेनें नदींत सोडिला असतां अधिरथाला सांपडला. [ ९,२४,३५ ] राजसूय यज्ञांत दानधर्म करण्याच्या कामावर याची योजना केली होती [ १०,७५,५ ]. हा कौरव पांडवांबरोबरच धनुर्विद्या शिकला होता. हा मोठा उदार असून ब्राह्मणवेषधारी इंद्राला--यानें कवच कुंडलें काढून दिलीं होती. मृगयेंत याचे हातून एक होमधेनु मारली गेल्यामुळें त्या ब्राह्मणानें याला शाप दिला होता कीं, युद्धांत तुझ्या रथाचें चाक भूमि गिळील. भारती युद्धांत अर्जुनाच्या हातून हा मरण पावला.

(२) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**कर्णक**- अत्रिकुलोत्पन्न एक ऋषि.

**कर्णवेष्ट**- पांडवपक्षीय राजा.

**कर्णश्रवा**- हा ऋषि पांडवांबरोबर द्वैतवनांत होता.

**कर्णिका**- ( कंक शब्द पहा. )

(२) एक अप्सरा.

**कर्णिकार**- जटायूच्या पुत्रांपैकीं एक.

**कर्णिरथ**- अत्रि कुलोत्पन्न एक ऋषि.

**कर्दम**- ब्रह्मदेवाच्या छायेपासून झालेला पुत्र. ह्याची पत्नी देवहूती व पुत्र कपिल. हा देवर्षि होता. [ ३,१२,२७ ] [ ३,२३,४ ]

**कर्मजित्**- चंद्रवंशीय बृहत्सेनाचा पुत्र. ह्याचा पुत्र सुतंजय. [ ९,२२,४७ ]

**कर्मश्रेष्ठ**- स्वायंभूमन्वंतरांतील पुलह ऋषीच्या गतिनामक स्त्रीच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. [ ४, १, ३८ ]

**कर्मायन**- भृगुवंशीय ऋषि.

**कर्मी**- शुक्राचार्यांच्या चार पुत्रांतील कनिष्ठ.

**कर्वट**- बंगालच्या पूर्वेकडील प्रदेश. पांडवांच्या वेळीं येथें ताम्रलिप्त राजा होता.

**कलविंक**- विश्वरूपाच्या तीन मस्तकांपैकीं सुरापीथ नांवाच्या मस्तकापासून झालेला पक्षी. (चिमणी) (६,९,५)

**कलशीकंठ**- अंगिरावंशीय ऋषि.

**कला**- कर्दमकन्या व मरीचि प्रजापतीची पत्नी. हिला कश्यप व पूणमान असे

दोन पुत्र झाले. [ ३,४,२२ व ४, १,१३ ]

(२) बिभीषणाची ज्येष्ठ कन्या. ही रामाकडील कुशलवृत्त सीतेस कळवित असे. [ वा. रा. सुंदर स. ३७]

**कलाप**-(काल्पी) येथें देवापि व मरु रहात असून ते कलियुगांत आपल्या नष्ट झालेल्या वंशांचे पुनरुज्जीवन करतील [ १२,-,३७ ]

**कलावती**-काशीपतीची कन्या व सोमवंशीय दशार्ह पुत्र व्योमाची-दाशार्हाची-पत्नी ही दुर्वास ऋषीची शिष्य असून अत्यंत पवित्र असे. हिचें पाणिग्रहण केल्यावर रात्रीं हिला आलिंगन देत असतां, राजाचे शरीर पोळलें. म्हणून त्यानें असे होण्याचें कारण विचारलें असतां, ही म्हणली, तुह्मीं अभक्ष्य भक्षण करून अपवित्र झालां आहां, म्हणून असें झालें असेल. हे ऐकून तो गर्गमुनीस शरण गेला, व आपलें अंग शुद्ध करून आल्यावर तिचें अंग त्याला चंदनाप्रमाणें शीतल लागलें. [ स्कंद. ब्र.]

**कलि** कृतादि चार युगांपैकीं चौथें. [ ,१, २१] ह्याचा निग्रह परीक्षित् राजानें केला [१,१७,३५ ]. याची वर्षसंख्या देव मानानें १२०० वर्षांची असून मनुष्य मानानें चार लक्ष बत्तीस हजार वर्षे आहे [ ३,११,१८-१९]. सप्तर्षी मघा नक्षत्रांत आले म्हणजे कलियुगाला आरंभ होतो. श्रीकृष्ण निर्याण कालापासून कलियुगाला आरंभ झाला असें समजतात [ १२,२,३३ ].

(२) (कलह) [ १०,६८,१४ ]

(३) क्रोध व हिंसा यांचा पुत्र. [४,८,३]

**कालिंग**-जगन्नाथ ते कृष्णेपर्यंतचा पूर्वप्रदेश.

( २ ) सोमवंशीय ययातीच्या कुलांतील बलीचा पुत्र. [ ९,२३,५-१६ ]

**कल्कि** शम्भल गांवांत विष्णुयशस् नांवाच्या ब्राह्मणाचा पुत्र. हा विष्णुचा अवतार असून ह्याच्या अवताराचेवेळीं कृतयुगाला प्रारम्भ होईल. [ १,३,२५] आणि [ १२,२,१८-२३ ]

**कल्प**-ध्रुव व भ्रमि यांचा पुत्र. [४,१०,१]

(२) ब्रह्मदेवाचा दिवस. ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा मन्वंतरें होत असून एक हजार चतुर्युगांचा काळ जातो. त्यावेळीं स्वर्गांतहि चौदा इंद्र होतात. एक मनु सामान्यतः ७१ $\frac{6}{14}$ इतक्या युगपर्यायाच्या काळापर्यंत असतो. सध्यां ब्रह्मदेवाचा सातिवावा-वाराहकल्प-सुरू आहे. ब्रह्मदेवाच्या दिवसा इतकाच त्याच्या रात्रीचा काळ असून त्यावेळीं नैमित्तिक प्रलय होतो. [ ३,११,२४-३५ ] आणि [१२,४, १-२] कल्प तीस आहेत, त्यांचीं नांवें १ श्वेतकल्प २ नीललोहित ३ वामदेव ४ रथंतर ५ रौरव ६ देव ७ बृहत् ८ कंदर्प ९ सद्य १० ईशान ११ तम १२ सारस्वत १३ उदान १४ गरुड १५ कौर्म १६ नारसिंह १७ समाने १८ आग्नेय १९ सोम २० मानव २१ तत्पुरुष २२ वैकुंठ २३ लक्ष्मी २४ सावित्री २५ घोर २६ वाराह ( हा सध्यां चालू आहे. ) २७ वैराज २८ गौरी २९ माहेश्वर आणि पितृ-

कल्प. हे तीस कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक महिना होत असून त्यांत कौर्मकल्प ही पौर्णिमा व पितृकल्प ही अमावास्या हाय ! कल्पारंभीं जो अवतार होतो तेंच त्या कल्पाचें नांव असतें. [ मत्स्य. अ. २८९ ]

( ३ ) वसुदेव व उपदेवा यांचा पुत्र. [ ९, २४, ५१ ]

( ४ ) तेरा सैंहिकेयांतील एक.

**कल्माषपाद**–सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न सुदास राजाचा पुत्र ! यासच मित्रसह, वीर्यसह किंवा सौदास, हीं नांवें होतीं. हा एकदां अरण्यांत मृगयेस गेला असतां तेथें दोन राक्षस पाहिले. त्यांतून एकास यानें मारिलें, पण दुसरा पळाला. पळालेला राक्षस राजाचा सूड मनांत धरून याच्याकडे आचारी म्हणून राहिला. एकद वसिष्ठ ऋषि याजकड भोजनास आले असतां, त्यांस वेषधारी आचाऱ्यान नरमांस शिजवून वाढिलें. राजानें आपल्या पानांत नरमांस वाढविलें आहे, असें समजून वसिष्ठ ऋषि संतापले, व ' राक्षस हो ' असा त्यांनीं राजास शाप दिला. आपला अपराध नसतां वसिष्ठानें आपणास निष्कारण शाप दिला हें पाहून राजा रागावला; व यानेंही उलट ऋषीस शाप देण्याकरितां ओंजळींत पाणी घेतलें, परंतु राणी मदयंतीनें याचें मन वळवून यास शाप देण्यापासून परावृत्त केलें. तेव्हां राजानें अंजलींत अभिमंत्रित केलेलें पाणी जमिनीवर टाकिल्यास ती रुक्ष होऊन जाईल ह्या भीतीनें तें जळ आपल्याच पायावर टाकिलें. त्यायोगें याचे पाय जळाले व यास कल्माषपाद असें नांव पडलें. नंतर तो वसिष्ठशापाप्रमाणें द्वादशवर्षेपर्यंत राक्षस होऊन पुन्हां पूर्वस्वरूपास प्राप्त झाला. परंतु एकदां हा राक्षसयोनींत अरण्यांत भटकत असतां भुकेनें व्याकुळ झाला असतां एक ब्राह्मण दंपत्य याच्या नजरेस पडलें. त्यांतील ब्राम्हणास यानें भक्षण केलें. तेव्हां त्या दुःखित झालेल्या ब्राह्मणीने राजाला शाप दिला कीं, ' तूं आपल्या स्त्रीशीं समागम करतांच तुलाहि मृत्यु येईल ' त्या शापामुळें हा अनपत्य होता. पुढें मदयंतीला वसिष्ठापासून पुत्र झाला, तो अश्मक. [ ९, ९, २० ते ३८ ]

**कल्माषा**-भारतवर्षीय एक नदी.

**कल्याणिनी**–धरनामक वसूची स्त्री. हिला द्रविण अथवा रमण पुत्र होता.

**कवची**–धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांतील एक.

**कवष**–परीक्षित राजाकडे आलेला एक ऋषि. हा युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांत ' होता ' नामक ऋत्विज होता. [ १, ९, १० आणि, १०, ७४, ७ ]

**कवषा**–तुर ऋषीची माता.

**कवि**–यज्ञ व दक्षिणा यांचा पुत्र. स्वायंभुवमन्वंतरांतील तुषित नामक देवांपैकीं एक. [ ४, १, ७–८ ]

( २ ) स्वायंभु मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र भृगुऋषीचा पुत्र. ह्याचा पुत्र उशना. [ ४, १, ४५ ]

(३) प्रियव्रत राजर्षि व बर्हिष्मती यांचा पुत्र. हा नैष्टीक ब्रह्मचारी व महायोगी होता.

(४) ऋषभ व जयंती यांच्या नऊ सिद्ध पुत्रांतील ज्येष्ठ. हा महावैष्णव व ज्ञानी होता. ह्यानें मिथिला नगरींत निमि राजाला उपदेश केला.
[ ५,४, ११ आणि ११, २, ३३ ]

(५) वैवस्वत मनु व श्रद्धा यांच्या दहा पुत्रांतील कनिष्ठ. हा लहानपणापासून विरक्त असल्यानें बंधु व राज्य सोडून मुक्त झाला. [ ९. १, १२ ] आणि [९, २, १५]

(६) सोमवंशीय दुरितक्षयाचा पुत्र हा तपानें ब्राह्मण झाला. [ ९,२१,१९ ]

(७) श्रीकृष्ण व कालिन्दी यांचा पुत्र. हा मोठा पराक्रमी होता. [१०,६१,१४ आणि १०,९०,३४]

(८) तामसमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

(९) रैवतमनूच्या दहा पुत्रांतील पांचवा

(१०) अंगिराकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

(११) वैवस्वत मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र. यास वारुणिकवि अशी संज्ञा होती. याला कवि, काव्य, धृष्णु, उशना, भृगु, विराज, काशि आणि उग्र, असें आठ पुत्र होते. ( भा अनु. अ. ८५ )

(१२) ब्रह्मपुत्र जो वारुणि कवि त्याच्या आठ पुत्रांतील ज्येष्ठ.

**कविरथ**–सोमवंशीय पाण्डव कुलांतील चित्ररथाचा पुत्र. ह्याचा पुत्र वृष्टिमान् [ ९, २२, ४० ]

**कव्यवाल**–पितराविशेष.

**कशेरक**–यक्षविशेष.

**कश्यप**–मरीचि प्रजापति व कर्दमकन्या कला यांचा पुत्र. दक्षाच्या-अदिति, दिति, दनु, काष्ठा, अरिष्टा, सुरसा, इला, मुनि, क्रोधवशा, ताम्रा, सुरभि, सरमा आणि तिमि अशा तेरा कन्या याच्या स्त्रिया होत्या, व त्यांचे पासून देव, दैत्य, मनुष्य, पशु, पक्षी वगैरे अनेकविधसृष्टि उत्पन्न झाली.
[ ४, १, १३ आणि ६, ६, २५ ]

(२) भीष्मशरपंजरीं पडले असतां त्यांच्याकडे आलेला एक ऋषि.
[ १, ९, ८ ]

(३) चालु वैवस्वत मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८, १३, ५ ]

(४) परशुरामानें निःक्षत्रिय पृथ्वी केल्यावर यज्ञांत ह्याला पृथ्वीचा मध्यभाग दान दिला. [ ९, १६, २२ ]

(५) वैद्यशास्त्रप्रवीण एक ब्राम्हण. हा परीक्षित राजाला होणाऱ्या तक्षकदंशावर उपाय करण्याकरितां जात असतां, वाटेत तक्षकानें यास द्रव्य देऊन परत लाविलें [ १२, ६, ११ ]

(६) अथर्वणवेदाचा आचार्य. हा पौराणिक म्हणूनहि प्रसिद्ध आहे.
[ २,७, ४ ५ ]

(७) आकाशांतील एक तारका.
[ ४,९,२१ ]

(८) अंशुमान नांवाच्या सूर्याबरोबर मार्गशीर्ष मासांत फिरणारा ऋषि
[ १२, १२, ४१ ]

**कंस**–यदुकुलांतील सात्वतवंशीय उग्रसेनाचा मुलगा व देवकीचा चुलत बंधु. हा कालनेमि असुराच्या अंशानें

जन्मास आला होता. [ ९, २४, २४ आणि १०, १, ६८ ] ह्याला जरासंधाच्या अस्ति व प्राप्ति ह्या दोन कन्या दिल्या होत्या [ १०, ५०, १ ]. वसुदेव देवकीच्या विवाहांत हा मोठ्या समारंभानें त्यांचा रथ हांकीत असतां, ‘ देवकीचा आठवा गर्भ तुझा नाश करील ’ अशी आकाशवाणी झाली, ती ऐकून हा देवकीस मारण्यास प्रवृत्त झाला, पण वसुदेवानें देवकीचे पुत्र देण्याचें अभिवचन देऊन यास भगिनीवधापासून परावृत्त केलें. [ १०, १,३० ] देवकीच्या पुत्रांचा नाश करण्याविषयीं नारदाचा उपदेश. [ १०,१,६२ ] पित्यास व वसुदेवदेवकीस बंदींत टाकतो. [ १०,१ ६६–६९ ] श्रीकृष्ण व बलराम यांस आणण्याकरितां अक्रूरास गोकुळीं पाठवितो. [ १०, ३६, ३७ ] कृष्णाचे हस्तें मृत्यु. [ १०,४४,३५ ]

**कंसवती**–उग्रसेनाची कन्या व वसुदेवाचा कनिष्ठ भ्राता देवश्रवा याची पत्नी. हिला सुवीर व इषुमान् असे दोन पुत्र होते. [ ९, २४ २५–४१ ]

**कंसा**-उग्रसेनाची कन्या व देवभागाची पत्नी. हिचे पुत्र चित्रकेतु व बृहद्बल. [ ९, २४, २५–४० ] ( हिचाच पुत्र उद्धव असें म्हणतात. )

**कहोड**–उद्दालक ऋषीचा शिष्य. यानें गुरुगृहीं राहून गुरुसेवा उत्तम प्रकारें केल्यामुळें गुरूनें आपली कन्या यास दिली होती. तिचें नांव सुजाता. ती गर्भवती असतां पोटांतील गर्भानें कहोडास अध्ययन करतांन पाहून त्याचा निषेध केला, म्हणून यानें त्या गर्भास–‘ आठ ठिकाणीं वांकडा हो ’ असा शाप दिला. कांहीं काळानें हा द्रव्य याचनेकरितां जनकराजाकडे गेला असतां, तेथें वरुण पुत्र बंदीनें यास वादांत जिंकून समुद्रांत बुडविलें. परंतु अष्टावक्रानें बंदीशीं वाद करून याला परत आणिलें. यास कौषीतकेय असेंहि म्हणतात.

## का

**काकवर्ण**-प्रद्योत संज्ञक राजानंतर गादीवर आलेल्या शिशुनागाचा पुत्र. हा कलियुगांतील मोठा राजा असून यानें पुष्कळ वर्षे राज्य केलें याचा पुत्र क्षेमधर्मा. [ १२,१,५ ]

**काकी**–कश्यप व ताम्रा यांच्या कन्येंतील एक ( २ ) स्कंदाच्या शरीरापासून उत्पन्न झालेल्या मातृकांतील एक.

**काकुत्स्थ**–ककुत्स्थ पुत्र जो अनेना अथवा सुयोधन त्याचें नामांतर.

**काकेयस्थ**–कृष्णपराशर कुलोत्पन्न एक ऋषि

**काक्षीवान्**–अनुकुलोत्पन्न बली राजानें आपली स्त्री सुदेष्णा हिला दीर्घतमा ऋषीकडे पुत्र प्राप्तीकरितां पाठविलें असतां, तिनें स्वतः न जातां आपल्या दासीला पाठविलें. तिला झालेला पुत्र. हा तपान ब्रह्मलोकास मेला.

**कांचन**–सोमवंशीय पुरूरव्याच्या नातवाचा भीमाचा-पुत्र. याचा पुत्र होत्रक [ ९, १५, ३ ]

( २ ) च्यवन भार्गवास नामांतर.

**काचनाक्षि**-सरस्वती नदीच्या सप्तप्रवाहापैकीं एक.

**कांची**-( पुरी ) ( कांजीवरम् ) मोक्षदायक सप्तपुरींपैकीं एक. चोल राजांची राजधानी. येथें बलराम तीर्थ यात्रेस आला होता [ १०,७९,१४ ]

**काट्य**-अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**काण्डूषप**-गौरपराशर कुलोत्पन्न ऋषि.

**काण्व**-कण्व घराण्यांतील चार राजे. यांनीं ३४५ वर्षे राज्य केलें. त्यांना कण्यायन अशीहि संज्ञा होती. [१२, १, २१] ( विष्णु पुराणांत हा काल ४५ वर्षांचा सांगितला आहे. )

( २ ) वसिष्ठ कुलोत्पन्न एक ऋषि.

**काण्वायन**-अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**कात्यायन**-कश्यप कुलोत्पन्न ऋषि. हा याज्ञवल्क्य स्त्री कात्यायनीचा पिता व यजुर्वेद प्रातिशाख्य, श्रौतसूत्रें, अष्टाध्यायीवरील वार्तिकें यांचा कर्ता.

**कात्यायनी**-पार्वतीचें नांव. ( एक व्रत ) श्रीकृष्ण प्राप्तीकरितां गोपींनीं मार्गशीर्ष मासांत केलेलें व्रत [ १०, २२, १ ]

( २ ) याज्ञवल्क्य ऋषीची एक पत्नी.

**काद्रवेय**-कद्रूपुत्र नागांस संज्ञा.

**काद्रुपिंगाक्षि**-कश्यपकुलोत्पन्न एक ऋषि.

**कानीन**-अग्निवेश्य, व्यास, कर्ण, इत्यादि आपल्या आईच्या कन्यकावस्थेंत जन्मास आले, म्हणून त्यांस ही संज्ञा आहे. [ ९, २, २१ ]

**कान्यकुब्ज**-( कनोज. ) ( कुशनाभ शब्द पहा. ) [ ६, १, २१ ]

**कापिलेय**-पंचशिख ऋषीचें नामांतर.

**कापी**-एक नदी.

**काप्य**-पतंजल ऋषीस कपिवंशोत्पन्नत्वामुळें प्राप्त झालेलें नामांतर.

**काम**-( मदन ) ब्रह्मदेवाच्या हृदयापासून उत्पन्न झाला. त्याची स्त्री रति. हा शंकराच्या तृतीय नेत्राग्नीनें भस्म झाला होता. तोच पुन्हां रुक्मिणीच्या ठिकाणीं प्रद्युम्न रूपानें जन्मास आला. [ ३,१२, २६ व १०,५५,१ ]

( २ ) संकल्पाचा पुत्र [ ६,६,१० ]

( ३ ) चतुर्विध पुरुषार्थांतील तिसरा.

( ४ ) वैवस्वत मन्वंतरांतील बृहस्पतीचा दौहित्र.

**कामकायन**-विश्वामित्र कुलोत्पन्न एक ऋषि

**कामकाष्णी**-पूर्वेकडील एक तीर्थ. येथें बलराम तीर्थयात्रेचे वेळीं आला होता. [ १०,७९,१४ ]

**कामगम**-धर्मसावर्णि मन्वंतरांतील देव. [ ८,१३,२५

**कामगिरि**-एक पर्वत यास कामशैल असेंहि म्हणतात.

**कामदुघ**-सुस्वधा नामक पितरांचा लोक.

**कामदेव**-केतुमाल खण्डांतील लोकांचें उपास्य दैवत. [ ५,१८,१५ ]

**कामधेनु**-( हविर्धानी शब्द पहा. )

**कामन्द**-एक ब्रह्मर्षि. आंगरिष्ट राजानें यांस शुद्ध धर्म, अर्थ, आणि काम कोणते, असा प्रश्न विचारिला असतां, यानें चित्त शुद्ध होईल तो धर्म, मोक्षपुरुषार्थ साधेल तो अर्थ, आणि देह निर्वाहा पुरतीच इच्छा तो काम, असें उत्तर दिलें होतें. [भा. शांति. अ. १२३

**कांपिली**-ब्रम्हदत्त राजाची नगरी.

**काम्पिल्य**–सोमवंशीय भर्म्याश्व राजाच्या पांच पुत्रांपैकीं चौथा. [ ९,२१,३२ ]

**काम्बोज**-इंद्रप्रस्थाच्या उत्तर व पश्चिमेकडे असलेला देश. त्यांत उत्तरेकडे असलेल्या देशास उत्तर कांबोज व परमकांबोज अशीं दोन नांवें आहेत. पांडवांच्यावेळीं ह्या देशाचा राजा सुदक्षिण युधिष्ठिराच्या राजसूययज्ञाला आला होता. [ १०, ८२, १३ ]

**काम्यकवन**-इंद्रप्रस्थाच्या पश्चिमेस सरस्वतीच्या तीरावरील वन. पाण्डव वनवासांत असतांना येथें पुष्कळ दिवस राहिले होते. येथें त्यांस सूर्यापासून इच्छित अन्न देणारी स्थाली मिळाली. हे वन कुरुजांगल देशांत होतें. [ भा. वन. अ. ३ ]

**काम्या**-एक अप्सरा.

**कायनि**–भृगुवंशीय एक ऋषि.

**कायव्य**-एक निषाद. हा अरण्यांतील दस्यूंचा आधिपति होता. हा शूर व धार्मिक असल्यामुळें, याला याच्या लोकांनीं विचारिलें, आम्ही कसे आचरण केलें असतां उत्तम गति पावूं तें सांग. तेव्हां हा म्हणाला, ब्राह्मणांचा द्वेष करूं नका; व मुलें, स्त्रिया, भयभीत यांना मारूं नका. [ भा. शांति. ]

**कायशोधन**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**कायाधव**–कयाधूचे प्रल्हादादि पुत्र.

**कारकि**–अंगिरा कुलोत्पन्न एक ऋषि.

**कारंधम**–सूर्यवंशीय करंधम पुत्र अवीक्षिताचें नामांतर.

( २ ) दक्षिण समुद्राकडील एक तीर्थ.

**कारस्कर**–एक देश.

**कारस्कार**–कारस्कर देशाचा राजा. हा राजसूय यज्ञांत युधिष्ठिराला बराच उपयोगी पडला होता. हा कुकुर वंशीय असल्यामुळें यास कौकुर असेंहि म्हणत

**कारीरय**–अंगिरा कुलोत्पन्न ऋषि.

**कारीषि**-विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**कारुकायन**– ,, ,,

**कारूपथ**–लक्ष्मणपुत्र अंगदाचा देश. याची राजधानी अंगदीया.

**कारूष** ( क ) करूषक देशाचा राजा वृद्धशर्मा त्याचें नांव. याचा पुत्र दंतवक्र. हा राजा भारतीयुद्धांत दुर्योधनाकडे होता [ ९, २४, ३७ ]

( २ ) वैवस्वत मनुचा पुत्र जो करूष त्याचा क्षत्रियवंश. हे राजे धर्मनिष्ठ असून उत्तरेकडे राज्य करीत असत. [ ९, २, १६ ]

**कारोटक**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**कार्ण**–कर्ण पुत्र. [ ९, २३, १४ ]

**कार्तवीर्य**–सोमवंशीय कृतवीर्याचा पुत्र. यास सहस्रार्जुन नांव होतें. हा दत्तउपासक असे. हा अनुप देशावर राज्य करी. याची राजधानी माहिष्मती होती दत्तात्रेयाचे प्रसादानें यास हजार हात व सुवर्णमयरथ मिळाला होता याच्या रथाची गति कोठेंहि कुण्ठित होत नसून रावणाला तर यानें लीलेनें पराजित केलें होतें. दत्ताच्या वरप्रसादानें याच्या हातून कांहीं पाप होत नसे. यानें ८५००० वर्षें राज्य केलें. एकदां जमदग्नीच्या आश्रमांत जाऊन यानें त्याच्या होमधेनूचें वांसरूं हरण करून त्याच्या

आश्रमाचा नाश केला, म्हणून जमदग्निपुत्र भार्गवानें याच्याशीं युद्ध करून याचे हात तोडले व यास ठार मारिलें. याच्या सारखा मोठा राजा दुसरा फार क्वचितच झाला असून याच्या स्मरणानें नष्ट वस्तु पुनः प्राप्त होतात. याच्या हजारों पुत्रांपैकीं, परशुरामाबरोबर झालेल्या युद्धांतून पांच वांचले, ते जयध्वज, शूरसेन, वृषभ, मधु आणि ऊर्जित.

[ ९,२३, २४ ते २८ ]

**कार्तिकेय**–एकदां देवकार्य साधण्याकरितां अग्नि ब्राह्मणरूपानं शंकराकडे भिक्षेस गेला असतां, तेव्हां पार्वतीनें शंकरांचे रेत त्यास भिक्षा म्हणून घातलें. तें त्याने भक्षण केलें. त्या योगें त्याच्या उदरांत गर्भसंभव झाला असतां त्यानें तो गर्भ गंगेंत सोडला. तेथें त्याचे सहा विभाग झाले, व त्याच वेळीं गंगेंत स्नान करीत असलेल्या सहा ऋषिपत्न्यांच्या उदरांत त्यांनीं प्रवेश केला. एकाएकीं गरोदरावस्था प्राप्त झालेली पाहून त्या ऋषिपत्न्या भयभीत झाल्या; व पतीच्या आज्ञेवरून त्यांनीं आपापल्या पोटांतील गर्भाचा गवतांत त्याग केला. अशा प्रकारें याचा जन्म झाल्यामुळें यास शरजन्मा, गंगेच्या प्रवाहांत गर्भसंभव झाल्यामुळें गांगेय, अग्निपासून प्रसव म्हणून अग्निभू इत्यादि नांवें असून सहा मुखें असल्यामुळें षडानन, देवांचा सेनानी इत्यादि नांवें मिळालीं. ( ग. पु. )

**कार्तिवय**–कश्यप कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**कार्दमायनि**–भृगुकुलोत्पन्न एक ब्रम्हर्षि.

**कार्पणि**– ,, ,,

**कार्ष्णायन**–कृष्णपराशरकुलीन एक ऋषि.

**कार्ष्णि**–श्रीकृष्णपुत्र प्रद्युम्नाचें एक नांव. [ ९, ५५, ९ ]

( २ ) कश्यप व दक्षकन्या मुनि यांपासून झालेल्या देव गंधर्वांतील एक.

**काल**–अकरा रुद्रांपैकीं एक. [ ३,१२,१२ ]

( २ ) ध्रुवनामक वसूचा पुत्र.

( ३ ) प्राण्यांच्या कर्तव्याकर्तव्याचा एक साक्षी [ ६, १, ४२ ].

( ४ ) जगाची उत्पत्ति व प्रलय करणारी शक्ति. [ १२, ४, १७ ]

(५) महिषासुराचा अनुयायी एक असुर.

( ६ ) एक योद्धा.

( ७ ) एक पर्वत. [ वा. रा किष्किं. ]

**कालकंठ**–रुद्रगणांतील एक भेद.

**कालकवृक्षायमुनि**–याचेजवळ त्रिकालज्ञ पक्षी होता. हा त्या पक्ष्यासह कोसलदेशाधिपति क्षेमदर्शी राजाकडे गेला असतां, त्या राजाने माझे मंत्री मजविषयीं कसे आहेत, तें ह्या पक्ष्याकडून सांगवा; असें विचारलें. त्या पक्ष्यानें एका मंत्र्याचे दुर्गुण सांगितले, व इतरांविषयीं उद्यां सांगेन असें म्हणाला. पक्षाकडून आपलेहि दुष्ट वेत राजाला कळणार म्हणून त्या मंत्र्यांनीं त्या पक्ष्याला रात्रीं ठार मारलें. हें राजाला समजल्यावर राजानें सर्वच मंत्री माझे अनिष्ट करणारे आहेत, असें जाणून ह्या ऋषीच्या सहाय्यानें सर्व मंत्र्यास शासन केलें. (भा. शांति. अ. १०१ )

**कालका**-वैश्वानर दानवाची कन्या व कश्यप प्रजापतीची पत्नी. हिच्यापासून कालकेय दानव उत्पन्न झाले. [ ६, ६, ३३ ते ३५ ]

**कालकाक्ष**-गरुडानें मारलेला असुर.

**कालकाम**-विश्वेदेवांतील एकभेद.

**कालकामुक**-खरराक्षसाच्या बारा अमात्यांपैकीं एक.

**कालकाल**-महादेवाची संज्ञा.

**कालकीर्ति**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**कालकूट**-उत्तर आनर्त देशाच्या उत्तरेकडील देश.

( २ ) मगध देशांतील एक पर्वत.

( ३ ) समुद्रमंथनकालीं निघालेल्या विषाचें एक नांव.

**कालकेतु**-एक असुर. हैहयकुलीन एकवीर राजानें यास मारिलें.

**कालकेय**-कालकेचे पुत्र. हे साठ हजार निवातकवच पैका असून यांचा नाश अर्जुनानें इंद्राच्या हिताकरितां केला. [ ६ ६,३६ ]

**कालकोटि**-नैमिषारण्यांतील एक तीर्थ.

**कालगौतम**-एक ऋषि.

**कालघट** जनमेयाच्या सर्पसत्रांतील एक सदस्य.

**कालाजित**-लक्ष्मणाचा सेनापति.

**कालजिव्ह**-एक रुद्रगण.

**कालंजर**-मेरुकर्णिकापर्वतांतील एक पर्वत. येथें जडभरत हरणाच्या जन्मास आला होता. [ ५,१६,२६ ] आणि [ ५,८,३० ]

**कालतोयक**-भारतवर्षीय एक देश.

**कालदंष्ट्र**-दैत्य विशेष.

**कालनर**-सोमवंशीय अनुराजाच्या वंशांतील सभानराचा पुत्र. याचा पुत्र सृंजय. [ ९,२३,१ ]

**कालनाभ**-हिरण्यकशिपूच्या सभेंतील एक दैत्य व रुषाभानूचा पुत्र. [७,२,१८]

**कालनेमि**-शंभर मुखांचा दैत्य. याचा विष्णूनें वध केल्यामुळें त्याचा सूड उगविण्याकरितां हा दुसऱ्या जन्मीं कंसरूपानें जन्मला [ १०, १, ६८].

( २ ) तारकासुराचा सेनापति.

( ३ ) लंकेंतील राक्षस. युद्धांत लक्ष्मण मूर्च्छित झाला असतां, मारुति द्रोणाचलावरील औषधि आणावयास जात असतां, विघ्न करण्याकरितां यास रावणानें पाठविलें होतें. हा ऋषिवेष घेऊन मार्गांत बसला असतां, मारुतीनें याचें कपट ओळखून याचा वध केला. ( अ. रा. युद्ध. स ७ )

**कालभैरव**-काशीपुरस्थक्षेत्रपाल एकरुद्रगण.

**कालमही**-एक नदी

**कालयवन**-एका यवनाधिपतीनें आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं गर्गमुनीपासून यादवनाशार्थ उत्पन्न करविलेला पुत्र. नारदाचे सांगण्यावरून यानें मथुरेवर स्वारी केली. त्याच वेळीं, जरासंधानेंहि अठराव्या वेळीं मथुरेवर चाल केली. ह्या प्रसंगीं श्रीकृष्णानें समुद्रांत द्वारका नगरी उत्पन्न करून तिच्यांत सव बायकामुलांना ठेविलें व आपण निःशस्त्र स्थितींत कालयवनाच्या समोरून पळूं लागला. तेव्हां काल्य-

वनहि त्याच्या मागून पळूं लागला. अशा स्थितींत श्रीकृष्ण एका गुहेंत शिरले व तेथें निद्रित असलेल्या मुचकुंदाच्या मागें गुप्त झाले. श्रीकृष्णाच मागून काल्यवनहि गुहेंत शिरला व निजलेला पुरुष हा श्रीकृष्णच असें समजून यानें त्यास लाथ मारली त्याबरोबर मुचकुंद राजानें क्रोधानें याकडे पाहिलें. त्याच्या नेत्राग्निपासून याचें भस्म झालें. [ १०,५१,१२ ]

**कालरात्रि**–पार्वतीची एक शक्ति. (शुंभनिशुंभ शब्द पहा.)

**कालवध**–विश्वामित्र कुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**कालवीर्य**–एक असुर.

**कालशिख**–वसिष्ठकुलीन एक ब्रह्मर्षि.

**कालशैल**–एक सामान्य पर्वत.

**कालसूत्र**–पितृद्रोही व ब्रह्मद्वेषी लोकांना प्राप्त होणारा नरक. हा दहा हजार योजनें असून तांब्याच्या तप्तपत्र्याच्या रूपानें असतो. [ ५, २६, १४ ]

**काला**–पार्वतीची शक्ति.

( २ ) कश्यपपत्नी कालिकेचें नांव.

**कालाग्निरुद्र**–महादेवाची एक मूर्ति.

( २ ) यजुर्वेदोपनिषत्.

**कालानर**–कालनर राजाच नांव.

**कालिका**–भारतवर्षीय एक नदी.

( २ ) कश्यप प्रजापतीची स्त्री. हिचे पुत्र कालकेय.

**कालिंग**–कलिंग देशाचा राजा. हा अनिरुद्धाच्या विवाहाला आला असतां, यानें रुक्मीला द्यूत खेळून बलरामाचा पराभव करावयास सांगितलें. द्यूत खेळत असतां हा राजा उपहासानें बलरामाला हंसला, म्हणून संतापानें बलरामानें ह्याचे दांत पाडले. [ १०, ६१, २७–३७ ]

**कालिंजर**–एक वन.

( २ ) काशीक्षेत्रांतील एक स्थळ.

**कालिन्दी**–यमुना नदीचें नांव. [३,४,३६] हें नांव अंशुमंती नदीसहि आहे. ( भा. विराट अ. १ )

( ३ ) श्रीकृष्णाची सातवी स्त्री. ही पूर्वजन्मीं सूर्यकन्या असून ह्या जन्मीं श्रीकृष्णप्राप्ती करितां यमुनेवर तप करीत असतां तिचा मनोदय जाणून श्रीकृष्णानें तिचें पाणीग्रहण केलें. हिला श्रुत आदि दहा पुत्र होते [१०,५८, २० आणि १०,६१,१४ ]

**कालिय**–यमुनेच्या डोहांतील एक नाग. हा पूर्वी रमणक द्वीपांत रहात असे तेथून गरुडाच्या भीतीनें येथें आला होता. एकदां गोप व गाई ह्या डोहाचें पाणी प्यायल्यामुळें मृत झाले. तेव्हां श्रीकृष्णानें याचें मर्दन करून यास पुन्हां रमणक द्वीपांत घालविलें, व यमुनेचें जल शुद्ध केलें. [ १०,१६,६० ]

**कालियावर्त**–वृंदावन.

( २ ) दाशरथी रामाच्या सभेंतील एक हास्यकार.

**काली**–भीमाची एक स्त्री. हिचा पुत्र सर्वगत. [ ९, २२, ३१ ]

( २ ) कालिकेचें नांव. हिनें शुंभनिशुंभांचा वध केला.

( ३ ) मत्स्यीच्या उदरीं जन्मलेली उपरिचर वसु राजाची कन्या. हिचीच

नांवें मत्स्यगंधा, योजनगंधा, सत्यवती इत्यादि आहेत.

( ४ ) एक नदी.

**कालेय**-रसातलांत राहणाऱ्या दैत्यांपैकीं दैत्य विशेष. [ ५, २४, ३० ]

( २ ) अत्रिकुलोत्पन्न ऋषि

**कावषेय**-तुरऋषि व कवषा यांचा पुत्र. हा जनमेजयाच्या अश्वमेधांत पुरोहित होता. [ ९, २२, ३७ ]

**कावेरी**-द्रविड देशांतून वाहणारी एक पुण्यकारक नदी. येथें बलराम तीर्थयात्रेचे वेळीं आला होता. [१०, ७९,१४ ]

**काव्य**-शुक्राचार्यांचें नांव. हे दैत्यांचे गुरू होते, यांची कन्या देवयानी. [७,५,१ आणि ९, १८, ५-२५ ]

( २ ) अंगिरा कुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

( ३ ) बर्हिषद पितरांतील एक भेद.

( ४ ) वारुणिकवीच्या पुत्रांतील दुसरा.

**काशय**-एक देश.

**काशि**-नहुषवंशीय काश्य राजाचा पुत्र. [ ९,१७,४ ]

( २ ) वारुणिकवीच्या पुत्रांतील सातवा.

( ३ ) काशी क्षेत्र.

**काशिक**-भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा.

**काशिका**- एक नदी.

**काशिकोशल**-उत्तर कोसल देशाचें नांव.

**काशिराज**-अंबा, अंबिका, अंबालिका, यांचा पिता. हें नांव काशीच्या राजांना आहे [ ९,२२,२३ ]

( २ ) भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**काशी**-गंगेच्या तीरावरील प्रसिद्ध क्षेत्र. सप्तपुऱ्यांपैकीं एक. [ १२,१३,१७ ]

**काश्मीर**-उत्तरेकडील प्रसिद्ध देश. पाण्डवांच्या वेळीं उत्सवसंकेत, सप्तगण आणि लोहित या दोन देशांच्यामध्यें होते. [ १२,१,३९ ]

**काश्य**-आयुकुलोत्पन्न सुहोत्र राजाच्या तीन पुत्रांपैकीं ज्येष्ठ. याचा पुत्र काशि. [ ९,१७,३ ]

( २ ) अजमीढ कुलांतील सेनजित् राजाचा पुत्र. [ ९, २१, २३ ]

( ३ ) सांदीपनीचा पिता.

( ४ ) भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा. यास युद्धाचे वेळीं एकरथीचा अष्टरथी होण्याचा वर असे. [ भा. उद्योग अ. ४ ]

**काश्यप**-भृगुकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

( २ ) कश्यप कुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

( ३ ) दाशरथी रामाच्या सभेंतील आठ धर्मशास्त्र्यांपैकीं एक.

( ४ ) एक ऋषि. याला एकदां वैश्याच्या रथाचा धक्का लागून हा मूर्च्छित झाला; व अशा कष्टदायक देहाचा त्याग करावा असें याच्या मनांत आलें. तेव्हां इंद्रानें जंबूकरूपानें याचेजवळ येऊन यास मनुष्य देहाचें महत्व सांगितलें. [ भा शांति. ]

( ५ ) पाण्डवांबरोबर वनवासांत असलेला एक ऋषि.

( ६ ) सावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतील एक.

( ७ ) रामाच्या सभेंतील एक हास्यकार.

**काश्यपपुर** मुलतान. हें रावीनदीच्या जुन्या पात्रावर आहे.

**काश्यपि**—कश्यपाचा वंशज. अरुणासहि हें नांव आहे.

**काश्यपी**—संपूण पृथ्वी कश्यपाची म्हणून पृथ्वीला हें नां- आहे.

**काश्यपेय**—एक ब्रह्मर्षि.

( २ ) सूर्याचें नांव.

( ३ ) कृष्णसारथी दारुकाचें नामांतर.

**काष्ठा**—दक्षाची कन्या व कश्यपाची पत्नी. [ ६।६।२५. ]

**काष्ठाहारिण**—कश्यपकुलीन एक ब्रह्मर्षि.

**कासार**—एक ऋषि यानें वालखिल्य शाखेचें अध्ययन केलें. [१२।६।५९]

**कासोरु**—अंगिराकुलांतलि एक ऋषि

**कि**

**किंकर**—विश्वामित्राच्या आज्ञेनें कल्माषपाद राजाच्या शरीरांत प्रवेश केलेला एक राक्षस.

( २ ) लंकेंतील ऐशींहजार राक्षसांचा समुदाय विशेष. [ वा. रा. सुंदर. ]

**किंकेण**—यदुपुत्र क्रोष्टा याच्या वंशांतील भजमानाचा पुत्र. [ ९।२४।७ ]

**किंनराश्व**—इक्ष्वाकुकुलोत्पन्न सुनक्षत्रपुत्र पुष्कर राजाचें नामांतर.

**किंपुना**—भारतवर्षीय एक नदी.

**किंपुरुष**—आग्नीध्राच्या नऊ पुत्रांतील दुसरा. ह्याची प्रतिरूपा स्त्री असून हा किंपुरुषवर्षाचाच अधिपति होता. [ ५,२,१९-२३ ]

**किंपुरुषवर्ष**—जंबुद्वीपांतील एक खण्ड. याच्या उत्तरेस हेमकूटपर्वत, दक्षिणेस हिमालय, आणि पूर्वपश्चिम दिशेकडे क्षारसमुद्र आहे. येथें किन्नरांची वसति आहे. [ ५,१६,९ ]

**किरात**—इंद्रप्रस्थाला मध्य धरून पूर्वकिरात, पश्चिमकिरात, उत्तरकिरात या तीन नांवानीं प्रसिद्ध असलेला देश. आसामांतील टिप्रा प्रांत[९,२०,३०]

**किरीटी**—पण्डुपुत्र अर्जुनाचें नांव.

**किर्मीर**—बकासुराचा भाऊ पाण्डव काम्यक वनांत आले असतां यानें त्यांचा मार्ग रोखून धरला. त्यावेळीं याचें भीमाशीं युद्ध होऊन त्यांत हा मेला.

**किलकिला**—एक नगरी. येथें कलियुगांतील १९ राजांनीं १०६ वर्षे राज्य केलें. [ १२,१,३२ ]

**किष्किंध** एक पर्वत,

**किष्किंधा**-एक नगरी व देश. येथें मूळ राजा वालीपिता ऋक्ष हा होता. पाण्डवांच्या वेळीं मैंद व द्विविद हे वानर या देशाचे राजे होते. म्हैसूर व हैदराबाद या मधील प्रदेश. तुंगभद्राकांठीं हंपीजवळ या नांवाचें एक लहानसें खेडें आहे. अनागोंदि म्हणजे किष्किंधा असें बऱ्याच लोकांचें मत आहे.

**की**

**कीटक**—ऋषभदेवाचा पुत्र व एक खण्ड. मगध देश. सध्यांचा बहार प्रांत. [ ५,४,१० ]

( २ ) धर्मपुत्र संकटाचा मुलगा. याच्या पासून भूमीवरील दुर्गाभिमानी देव उत्पन्न झाले. [ ६,६,६ ]

( ३ ) भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा

**कीचक**—पूर्व मत्स्य देशाचा राजा जो विराट त्याचा सेनापति व विराटपत्नी सुदेष्णेचा भाऊ. हा केकयदेशांतील एक

मोठा पराक्रमी पुरुष होता. याला अनुकीचक नांवाचे १०५ भाऊ होते. अज्ञातवासांत पाण्डव विराटाच्या घरीं असतां, त्यावेळीं द्रौपदी सैरंध्री नांवानें सुदेष्णेची दासी म्हणून राहिली होती. तिच्याजवळ अतिप्रसंग केल्यामुळें यास भीमानें मारिलें. ( भा. विराट. अ. २३ )

**कीरिटकायन**–कश्यपकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**कीर्ति**–उरुक्रम नांवाच्या बाराव्या आदित्याची पत्नी. हिचा पुत्र बृहत्श्लोक. [ ६, १८, ८ ]

**कीतधर्मा**–भारतीय युद्धांतील पाण्डवपक्षीय राजा.

**कीर्तिमती**–शुक्राचार्यांची कन्या कृत्वी तिचें नामांतर. नीप अथवा अणुह राजाची पत्नी व ब्रह्मदत्ताची माता.

**कीर्तिमान्**–उत्तानपादराजाचा पुत्र व ध्रुवाचा भाऊ.

( २ ) वसुदेव व देवकी यांचा पहिला पुत्र. यास ठरावाप्रमाणें न मारतां कंसानें प्रथम सोडलें होतें, परंतु नारदाच्या उपदेशावरून नंतर मारिलें. [ ९, २४,५४ आणि १०, १, ५७ ]

**कीर्तिरथ**–विदेहवंशीय कीर्तिरथ राजाचें नामांतर.

**कीर्तिरात**–विदेहवंशीय जनकास नामांतर.

## कु

**कुकर**–एक देश.

**कुकुर**–यदुवंशीय सात्वतपुत्र अंधकाचा मुलगा. याचा पुत्र वन्हि. [ ९,२४,१९ ]

( २ ) यादवांतील एक भेद. [ ११,३०,१८ ]

**कुकुरांगार**–भारतवर्षीय एक देश.

**कुक्षि**–पाष्यांजि ऋषीचा शिष्य. यानें सामवेदाच्या शंभर संहितांचें अध्ययन केलें. [ १२,६,७९ ]

( २ ) रैभ्य ऋषीचा पुत्र.

**कुक्षिभीम**–बलीच्या शतपुत्रांतील एक.

**कुक्षेयु**–पुरुकुलांतील रौद्राश्व राजाचा पुत्र. [ ९,२०,४ ]

**कुज**–भूमिपुत्र मंगळ ग्रहाचें नांव.

२ ) नरकासुराचें नांव. [ २,७,३४ ]

**कुजंभ**–एक दैत्य. यानें महिषासुर प्रभृति दानवांसह तारकासुरास राज्याभिषेक केला होता. ( मत्स्य० अ. १४६ )

**कुंजर**–तारकासुराचा एक सेनापति.

( २ ) अंजनेचा पिता.

( ३ ) सौवीर देशांतील एक राजपुत्र.

**कुटक**–दक्षिणेकडील एक देश. येथें अर्हन् राजा राज्य करीत असे. [ ५,६,९ ]

( २ ) याच देशांतील एक पर्वत. वैराग्यशील ऋषभदेव येथें वणव्यांत सांपडून दग्ध झाला. [ ५,६,७ ]

( ३ ) एक राजपुत्र.

**कुटिका**–भारतवर्षीय नदी.

**कुटिकोष्ट्रिका**–प्राग्वटपुरासमीप असणारी एक नदी.

**कुटीचर**–रुद्रगणांतील एक.

**कुण्डज**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**कुण्डजठर**–जनमेजयाच्या सर्पसत्रांतील एक सदस्य ऋषि.

**कुण्डधार**–कद्रूपुत्र एक नाग.

( २ ) एक मेघ. हा एकदां एका ब्राह्मणास भेटला असतां, त्या ब्राह्मणानें

याचे जवळ द्रव्य मागितलें. तेव्हां त्या ब्राह्मणाच्या स्वप्नांत जाऊन यानें द्रव्य किति अनर्थकर आहे, हें सांगितलें. त्यामुळें तो ब्राह्मण द्रव्येच्छेपासून परावृत्त झाला. [ भा. शांति ]

**कुण्डभेदी**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**कुण्डल**-भारतवर्षीय देश.

**कुण्डली**-भारतवर्षीय नदी.

**कुण्डिका**-सामवेदोपनिषत्.

**कुण्डिकेर** हैहयाच्या पांचकुलांपैकीं एक.

**कुण्डिन**-विदर्भदेशाची राजधानी. येथें भीष्मक नांवाचा राजा होता. श्रीकृष्ण-रुक्मिणीचा विवाह येथें झाला. [ १०, ५३, २१ ]

( २ ) वसिष्ठकुलोत्पन्न एक ऋषि. याचा पुत्र कौण्डिन्य.

**कुण्डोद**-भारतवर्षीय सामान्यपर्वत.

**कुण्डोदर**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रापैकीं एक.

**कुड्मला**-भारतवर्षीय नदी.

**कुणि**-सात्वत कुलांतील जयराजाचा पुत्र. याचा पुत्र युगंधर. [ ९,२४,१४ ]

**कुणिगर्ग**-एक ब्रह्मर्षि. यास एक मानसकन्या होती. तिला योग्य पति न मिळाल्यानें ती ब्रह्मचर्य अवस्थेंत तप करीत होती. पुढें तिला वृद्धावस्था प्राप्त झाल्यावर देह त्याग करावा असें तिच्या मनांत आलें. इतक्यांत तेथें नारद येऊन तिला म्हणाले, तुं तपस्विनी असल्यामुळे उत्तम लोकाला जाशील, पण संस्कारहि न असल्यामुळें तुला अक्षय गति मिळणार नाहीं. म्हणून संस्कारयुक्त होऊन उत्तमलोक जिंकावा हें बरें ! हें ऐकून ती एके ठिकाणीं ऋषिपुत्र अध्ययन करीत होते तेथें गेली, व त्यांस म्हणाली, तुम्हांपैकी जो माझा पति होईल, त्यास मी पुष्कळ द्रव्य व तपाचें अर्धें पुण्य देईन. पण ती वृद्ध असल्यामुळें कोणी कबूल होईना ! शेवटीं त्यांतीलच गालववंशोत्पन्न प्राक्शृंगवान् नामक ऋषिपुत्रानें तिच्याशीं विवाह लावण्याचें कबूल केले. त्याच्याशीं विधिपूर्वक विवाह लावल्यावर रात्रीं ती स्त्री तरुणी होऊन त्या ऋषिपुत्राजवळ गेली. नंतर प्रातःकाल होतांच त्या ऋषिपुत्रास पुष्कळ द्रव्य व तपाचें अर्धें पुण्य देऊन ती उत्तम लोकाला गेली. हीच सुलभामैत्रेयी असावी. ( भा. शल्य. अ. ५२ )

**कुत्स**-उत्तानपादवंशीय चक्षुमनु व नड्वला यांचा एक पुत्र [ ४, १३, १६ ]

( २ ) अंगिराकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. याचे वंशज कौत्स.

( ३ ) दाशरथि रामाच्या सभेंतील एक ऋषि.

**कुत्सन्य**-भृगुकुलोत्पन्न एक ऋषि.

**कुन्तल**-भारतवर्षीय देश.

( २ ) कौतपुराधिपति एक राजा.

**कुन्ति**-सोमवंशीय सहस्राजिताच्या कुलांतील नेत्र राजाचा पुत्र. याचा पुत्र सोहंजि. [ ९, २३, २२ ].

( २ ) सोमवंशीय ज्यामघ कुलांतील क्रथ राजाचा पुत्र. याचा पुत्र धृष्टि. [ ९, २४, ३ ].

( ३ ) यास कुंतिभोज असेंहि म्हणतात. हा कुन्तिराष्ट्र देशाचा अधिपति

होता. याचा यदुकुलोत्पन्न शूर राजा मित्र असून त्या शूराची पृथानामक कन्या यानें दत्तक घेतली होती. हीच पण्डुराजपत्नी कुन्ती. [९,२४,३०].

( ४ ) श्रीकृष्ण व नाग्नजिती यांचा पुत्र. [ १०, ६१, १३ ].

**कुन्तिभोज**-स्यमंतपंचकक्षेत्रीं आलेला एक राजा. [ १०, ८२, २४ ].

**कुन्ती**-यदुकुलोत्पन्न शूराची कन्या. हिचें नांव पृथा होतें. हिला कुन्तिराजानें दत्तक घेतलें होतें. हा कुन्तिराजाच्या घरीं असतां हिला दुर्वास ऋषीच्या कृपेनें देवहूती विद्या प्राप्त झाली. दुर्वास ऋषि निघून गेल्यावर बालस्वभावामुळें हिनें सूर्याला आवाहन केलें. त्याक्षणीं सूर्य तेथें प्राप्त झाला. त्याच्यापासून प्राप्त झालेला पुत्र तो कर्ण. त्याला लज्जेमुळें हिनें नदींत सोडिलें. [ ९, २४, ३० ते ३५ ]. त्यानंतर हिचा विवाह पुरुवंशीय पाण्डु राजाशीं झाला. पुढें पाण्डुराजाला शाप झाल्यामुळें हिला यम, वायु, इन्द्र यांच्या मंत्रप्रभावेंकरून क्रमानें धर्म, भीम व अर्जुन हे पुत्र झाले. हिनें आश्विनीकुमारांचा मंत्र माद्रीला दिला. त्यापासून माद्रीला दोन पुत्र झाले, ते नकुल व सहदेव होत. कुंतीनें केलेली श्रीकृष्णाची स्तुति [ ९,२२,२७-२८ ] [ १,८,१८ ]

**कुन्द**-शाल्मलीद्वीपांतील एक पर्वत. [ ५,२०,१० ]

( २ ) भारतवर्षीय एक देश.

( ३ ) कुबेराच्या नऊ निधींतील सातवा.

**कुबेर**-पुलस्त्यपुत्र विश्रवा व इडविडा यांचा पुत्र. रावण व कुंभकर्ण हे याचे सावत्र भाऊ होत. याचे पुत्र मणिग्रीव आणि नलकूबेर. हा उत्तर दिशेचा अधिपति असून यक्षांचा राजा आहे. [ ४, १, ३७ आणि १०, ९, २३ ] मेरूच्या उत्तरेला विभावरी व कैलास पर्वतावर अलका अशा याच्या दोन नगऱ्या आहेत. [ ५, २१, ७ ] आणि [४, ६,२३ ] ध्रुवाचें यक्षांशीं युद्ध झाल्यावर हा त्याला उपदेश करितो. [ ४, १२, २ ].

( २ ) चालू मन्वंतरांतील पुलस्त्यपुत्र विश्रवा ऋषि व भरद्वाज कन्या देववर्णिनी यांचा पुत्र. यास रुद्रप्रदासानें लंका नगरी व पुष्पक विमान मिळालें होतें. रावणानें लंका नगरी व पुष्पक विमान घेतल्यावर हा कैलास पर्वतावर राहूं लागला. याचा मंत्री प्रहास नांवाचा असून गौ, पुष्कर, शुक्र, प्रौष्ठपद इत्यादि याचे अनुचर होते. ( दे.भा. ) (भा. वन० ) (वा. रा. )

**कुब्जा**-कंसाची दासी. ही तीन ठिकाणीं वाकडी होती. श्रीकृष्ण-बलराम धनुर्यागाकरितां मथुरेस गेले असतां हिच्या जवळून सुवासिक उटी घेऊन श्रीकृष्णानें हिला सरळ केलें. [१०,४२,४]

**कुमार**-सनकादि ब्रह्मदेवाचे चार मानस पुत्र, हे नेहमीं पांच वर्षांचेच असतात [ ६,३,२० ].

( २ ) कार्तिक स्वामीचें नामांतर.

( ३ ) अनलवसूचा एक पुत्र.

( ४ ) मंगल ग्रहाचें नांव.

( ५ ) भारतवर्षीय भरतखण्डस्थ देश. हा चेदी देशाच्या पूर्वेस असून, पाण्डवांच्या वेळीं येथें श्रेणिमान् नांवाचा राजा होता. [ भा. सभा० ]

**कुमारकोटी**–भारतवर्षीय तीर्थ.

**कुमारधारा**– ,, ,,

**कुमारवन**–एक वन. ऊर्वशीच्या विरहानें भ्रमिष्ट झालेला पुरूरवा येथें फिरत होता.

**कुमारी**–धनंजय ऋषीची स्त्री.

( २ ) भारतवर्षीय एक नदी.

( ३ ) ( कन्याकुमारी. ) भरतखण्डाचें दक्षिण टोंक.

( ४ ) अवधूतानें केलेला एक गुरु [ ११, ७, ३४ ].

**कुमुद**–मेरूपर्वताच्या उत्तरेकडील पर्वत. हा दहा हजार योजनें लांब आहे. [ ५, १६, ११ ].

( २ ) विष्णूचा एक पार्षद. [८,२१,१६]

( ३ ) नैर्ऋत्य दिशेकडील दिग्गज.

( ४ ) गोमती नदीचे तीरीं रम्यक पर्वतावर राहणारा रामसेनेंतील वानर.

**कुमुदा**–मायेचें नांव. [ १०, २, १२ ]

**कुमुदाक्ष**–विष्णूचा एक पार्षद.[८,२१,१६]

**कुमुद्वती**–भारतवर्षीय भरतखण्डस्थ नदी.

( २ ) रामपुत्र कुशाची एक पत्नी. हिचा पुत्र अतिथि.

( ३ ) मयुरध्वज राजाची स्त्री व ताम्रध्वजाची माता.

**कुम्भ**–लंकेंतील एक राक्षस. [ ९,१०,१८ ]

( २ ) कुम्भकर्णाचा ज्येष्ठ पुत्र.

( ३ ) प्रल्हाद दैत्याच्या पुत्रांतील एक.

**कुम्भकर्ण**–हा पूर्वजन्मीं हिरण्याक्ष असून आतां विश्रवा व केशिनी यांचा पुत्र व रावणाचा भाऊ झाला होता. [ ४,१,३७ आणि ७,१,४३ ] यानें गोकर्णक्षेत्रीं उग्र तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला प्रसन्न केलें. ब्रह्मदेवानें देवांच्या प्रार्थनेवरून वर मागतांना याच्या बुद्धीला सरस्वतीकडून मोह पाडला, त्यामुळें यानें ‘ निद्रा प्राप्त व्हावी ’ असा वर मागितला. हा सहा महिन्यांनीं एक दिवस जागा होत असे. याला बलीनें आपली नात ( मुलीची मुलगी ) वज्रज्वाला दिली होती. तिच्यापासून कुम्भ व निकुम्भ हे दोन पुत्र झाले. रामरावण युद्धांत याचा रामानें वध केला. ( वा.रा. ) [ ९,१०,१८ ]

**कुम्भनिकुम्भ**-कुम्भकर्ण व वज्रज्वाला यांचे पुत्र. हे दोघे महापराक्रमी होते. रामरावणयुद्धांत सुग्रीवानें कुम्भास व मारुतीनें निकुम्भास मारिलें. ( वा. रा. युद्ध. स. ७७ )

**कुम्भयोनि**–अगस्त्य ऋषीचें नामांतर. [ १, १९, १० ]

( २ ) द्रोणाचार्यासही हें नांव आढळतें. ( भा. द्रोण. अ १८४ )

**कुम्भरेता**–भरद्वाज अग्नि व वीरा यांचा पुत्र. याला शरयू स्त्री व सिद्धि पुत्र होता. यासच वीर, रथप्रभु, रथाध्वान इ. नांवें आहेत.

**कुम्भहनु**–प्रहस्ताचा एक मन्त्री राक्षस. यास तार वानरानें मारिलें.

**कुम्भाण्ड**–बाणासुराचा सचिव व चित्रलेखेचा पिता. याचें बलरामाबरोबर युद्ध होऊन त्याचे हातून मरण पावला [१०,६२,१४ आणि १०,६३,१६].

**कुम्भीनसी**–बली दैत्याची कन्या व बाणासुराची भगिनी. ( मत्स्य० अ. १८६ )

( २ ) सुमाली राक्षस व केतुमती यांच्या कन्यांतील कनिष्ठ. रावणाची मावशी.

( ३ ) माल्यवान् राक्षसाची कन्या अनला हिला विश्वावसु राक्षसापासून झालेली कन्या. हिला मधु दैत्यानें चोरून नेऊन हिच्याशीं विवाह लावला. हिचा पुत्र लवणासुर.

( ४ ) पुष्पोत्कटा व विश्रवा ऋषि यांची कन्या ( लिंगपु. अ. ६३ )

**कुम्भीपाक**–सजीव प्राण्यांना शिजविणाऱ्या लोकांना प्राप्त होणारा नरक. हा तप्त तैलमय आहे [ ५,२६,१३ ].

**कुरंग**–मेरुपर्वताच्या कर्णिकेंतील एक पर्वत [ ५, १६, २६ ].

**कुरज**–दहा विश्वेदेवांपैकीं एक.

**कुरर**–मेरुपर्वताच्या कर्णिकेंतील एक पर्वत. [ ५, १६, २६ ].

( २ ) ( टिटवी ) अवधूतानें केलेला एक गुरु. [ ११, ९, २ ]

**कुरु**–प्रियव्रताचा पुत्र आग्नीध्र व पूर्वचित्ति अप्सरा यांच्या नऊ पुत्रांपैकीं सातवा. याचा देश याच नांवानें प्रसिद्ध आहे [ ५, २, १३ ]

( २ ) सोमवंशीय पुरुकुलांतील संवरण व तपती यांचा पुत्र यानें दीर्घ तप करून जें स्थल वसविलें तें कुरुक्षेत्र याचे वंशजास कौरव ही संज्ञा आहे, पण ती धृतराष्ट्र पुत्र दुर्योधनादिकांना विशेष रूढ आहे. [ ९, २२, ४ ].

( ३ ) भारतवर्षीय भरतखण्डस्थ देश. याची राजधानी हस्तिनापुर. इंद्रप्रस्थ, वारणावत हीं यांतीलच शहरें होत. [ ३, १, २४ ].

( ४ ) एक ऋषि.

**कुरुक्षेत्र**–भारतवर्षीय भरतखण्डस्थ देश. हा ब्रह्मावर्ताच्या पश्चिमेस आहे. [ १,१०,३४–३५ ]

( २ ) कुरु राजानें येथें तप करून इंद्राला प्रसन्न केल्यामुळें त्याच्या प्रसादानें यास क्षेत्रत्व आलें. हा प्रदेश दृषद्वती व सरस्वति यांच्या मध्यें आहे. यांत अनेक तीर्थे असून, त्यांत ( १ ) पृथूदक, ( २ ) स्यमंतपंचक ( ३ ) व सन्निहती हीं तीन मुख्य आहेत. येथें युद्धांत मरणारा स्वर्गास जातो, म्हणून भारतीय युद्ध येथें झालें. यास उत्तरवेदि अंतर्वेदि विनशनक्षेत्र असेंहि म्हणतात [ ३,९,१ ].

**कुरुजांगल**–कुरुदेशाजवळचा पश्चिमेकडील देश [ १,९,३४ ].

**कुरुपांचाल**–कुरुदेशाच्या पूर्वेकडील देश.

**कुरुवर्णक**–भारतवर्षीय देश.

**कुरुवर्ष**–आग्नीध्र पुत्र कुरुचा देश. हा शृंगवान पर्वत व क्षारसमुद्र यांमध्यें धनुष्याकार आहे. यास उत्तरकुरु व ऐरावत वर्ष अशीं नामांतरें आहेत. [ ५,२,२१ ]

**कुरुवश**–सोमवंशीय क्रथकुलांतील मधूचा पुत्र. याचा पुत्र अनु. [ ९,२४,५ ]

**कुल**–दाशरथी रामाच्या सेनेतील वानर.

**कुलक**—कुशद्वीपांतील लोकविशेष. [ ५,२०,१६ ].

( २ ) इक्ष्वाकु वंशांतील रणक राजाचें नामांतर.

**कुलत्थ**—भारतवर्षीय देश.

**कुलम्पुन**—भारतवर्षीय तीर्थ

**कुलह**—कश्यप कुलांतील ऋषि.

**कुलिक**—कद्रूपुत्र. पातालांत राहणारे नागविशेष [ ५, २४, ३१ ]

**कुलिंगा**—भारतवर्षीय नदी.

**कुलिंद**—कुरु देशाजवळचा उत्तरेकडील व केकय देशाच्या दक्षिणेकडील सरस्वती तीरचा देश ( सहाराणपुर ) याचा अपर उत्तर कुलिन्द असा एक भेद आहे. याची राजधानी चंदनावती.

**कुलूत**—सतलजच्या पूर्वेचा व जालंदर दुआबच्या आग्नेयीकडील देश.

**कुवल**—वीरवर्मा राजाच्या पुत्रांपैकीं एक

**कुवलयापीड**-कंसाचा प्रमुख हत्ती. यास दहा हजार हत्तींचें सामर्थ्य होतें. धनुर्यागाचे वेळीं अंबष्ठाकडून यास श्रीकृष्णाचे अंगावर घातलें असतां, त्यानें याचा नाश केला. [ १०, ४३, १४ ].

**कुवलयाश्व**—इक्ष्वाकु वंशांतील बृहदश्व राजाचा पुत्र. यानें उतंक ऋषीच्या सांगण्यावरून आपल्या एकवीस हजार पुत्रांसह धुंधुदैत्यांशीं युद्ध केलें. त्या दैत्याच्या मुखांतून निघणाऱ्या ज्वालांनीं ते सर्व पुत्र दग्ध झाले, त्यांतील तीन शिल्लक राहिले ते दृढाश्व, कपिलाश्व आणि भद्राश्व. यास धुन्धुमार असेंहि नांव आहे. [ ९,६,२१ ]

( २ ) सोमवंशीय दिवोदास राजाचा पुत्र. यासच द्युमान्, प्रतर्दन, शत्रुजित्, ऋतध्वज अशीं नांवें होतीं. [ ९,१७,६ ]

**कुवला**—हंसध्वज राजाची कन्या व सुधन्व्याची भगिनी.

**कुवीरा**-भारतवर्षीय नदी.

**कुश**-सुरासमुद्राच्या पलीकडे आठ लक्ष योजनें विस्तृत हें द्वीप असून घृतसमुद्रानें वेष्टित आहे. यांत अग्नीप्रमाणें तेजस्वी कुशस्तंब आहे. येथें प्रियव्रत पुत्र हिरण्यरेत अधिपति आहे. येथील लोक अग्न्युपासक आहेत. [ ५,२०,१३ ]

( २ ) दाशरथी राम व सीता यांचा ज्येष्ठ पुत्र. यास चंपिका व कुमुद्वती अशा दोन स्त्रिया होत्या पहिलीस नऊ कन्या व दुसरीस आठ पुत्र होते त्यांतील ज्येष्ठ आतिथि. राम असतांना हा कुशावती नगरींत रहात असे. [ ९,११,११ ].

( ३ ) सोमवंशीय अजक राजाचा पुत्र. यास कुशाम्बु, मूर्तय, वसु व कुशनाभ असे चार पुत्र होते. त्यांस कौशिक असें म्हणतात. [९,१५,४]

( ४ ) सोमवंशीय आयुकुलांतील सुहोत्र राजाच्या तीन पुत्रांपैकीं दुसरा. याचा पुत्र प्रति [ ९, १७, ३-१६ ]

( ५ ) सोमवंशीय विदर्भाचा पुत्र. [ ९, २४, १ ].

( ६ ) ( दशविधदर्भांतील एक प्रकार ) भगवंताची विभूति [११, १६, ३०].

( ७ ) भारतवर्षीय देश,

**कुशचीरा**–भारतवर्षीय एक नदी.

**कुशधारा**– ,, ,,

**कुशध्वज**–निमिवंशीय सीरध्वजाचा पुत्र. [ ९, १३, १९ ].

( २ ) रथध्वज राजाचा पुत्र. याची कन्या वेदवती. ( वेदवती शब्द पहा )

**कुशनाभ**–सोमवंशीय अजक पुत्र कुश अथवा कुशिकाचा पुत्र. यानें महोदयनगरी स्थापिली होती. याच्या शंभर कन्या वायूच्या कोपानें वांकड्या झाल्या असतां कांपिली पुरीच्या चुलिसूनू ब्रह्मदत्त राजास दिल्यावर त्या सरळ झाल्या. पण देशास कान्यकुब्ज नांव पडलें. [ ९, १५,४ ] ( वा. रा बाल. स. ३२)

**कुशप्लव**–एक वन. येथें दितीनें पुत्र होण्याकरितां तप केलें. पुढें येथेंच विशाला नगरी स्थापन झाली.

**कुशल**–कुशद्वीपांतील लोक विशेष. [ ५,२०,१६ ].

**कुशलप्लवन**–भारतवर्षीय तीर्थ.

**कुशल्य**–भारतवर्षीय देश.

**कुशस्तम्ब**–देवांनीं उत्पन्न केलेला कुश द्वीपांतील कुशांचा ( दर्भ विशेष ) तेजस्वी खांब. यामुळेंच त्या द्वीपाला कुशद्वीप असें नांव मिळालें [ ५,२०,१३ ]

**कुशस्थली**–द्वारकेचें पूर्वीचें नांव. सूर्यवंशीय रेवत राजानें समुद्रांत स्थापिलेली नगरी [ ७,१४,३१ व ९,३,२८ ]. व आनर्त देशाची राजधानी. रेवत राजा ब्रह्मलोकास गेल्यावर ही यक्षांनीं उध्वस्त केली.

**कुशाग्र**–सोमवंशीय बृहद्रथाचा पुत्र. याचा पुत्र ऋषभ. [ ९,२२.६ ]

**कुशाम्ब**–सोमवंशीय उपरिचरवसूच्या पुत्रांपैकीं एक. हे चेदि देशाचे अधिपति होते. [ ९,२२,६ ]

**कुशाम्बु**–सोमवंशीय विजयाच्या वंशांतील कुशराजाचा पुत्र. यास कुशाम्ब असें नांव आहे. यानें कौशाम्बी नगरी स्थापिली.याचा पुत्र गाधि [९,१५,४]

**कुशावती**–दशरथि रामाचा पुत्र जो कुश, त्याची नगरी.

**कुशावर्त**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेव व जयन्ती यांचा एक पुत्र. याचा खण्ड याच नांवानें प्रसिद्ध आहे [ ५, ४, १० ].

( २ ) गंगाकांठचें तीर्थ.

( ३ ) त्र्यंबकेश्वर येथें प्रसिद्ध असलेलें एक तीर्थ.

**कुशिक**–विश्वामित्र कुलांतील एक ऋषि व कुल.

**कुशीलव**–रामचंद्रानें गर्भवती सीतेचा त्याग केल्यावर वाल्मीकि आश्रमांत झालेले दोन पुत्र. वाल्मीकीनें एकाची रक्षा कुशमुष्टीनें व एकाची लवमुष्टीनें केल्यामुळें यांस हीं नांवें मिळालीं. हे दोघे पराक्रमी होते. रामाचा अश्वमेधाचा शामकर्ण अश्व, लवानें अडवून शत्रुघ्नाशीं युद्ध केलें, त्यांत हा मूर्च्छित झाल्यावर कुश तेथें येऊन यानें सर्वांचा पराभव केला. अखेर रामचंद्र स्वतः तेथें येऊन त्यांनीं युद्ध केलें, पण त्यांचाही पराभव झाला, तेव्हां सर्वांचे मुकुट व अलंकार काढून कुशानें सीतेजवळ

आणले. इतक्यांत वरुणाचे यज्ञाहून वाल्मीकि परत आले, व त्यांनीं सर्वांना सावध व सजीव करून कुशलवांस रामास अर्पण केलें ( जै. अश्व.)

**कुशोदका**–कुशद्वीपसंबंधीं देवता.

**कुषीतक**–एक ब्रह्मर्षि.

**कुसीदकी**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**कुसुमपुर**–( पाटलि पुत्र,) येथें आर्यभट्ट हा प्रसिद्ध ज्योतिषी झाला

**कुसुमामोदनी**–हिमालयावरील एक देवता ( मत्स्य० अ. १५५ )

**कुसुम्भ**–मेरुकर्णिका पर्वतांतील एक. [ ५,१६,२६ ].

**कुस्तुंबरु**–एक गंधर्व.

**कुहक**–शाप. [ १,१९,१५ ]

**कुहन**–सौवीर देशाचा एक राजपुत्र.

**कुहर**–भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**कुहू**–स्वायंभूमन्वंतरांत अंगिरा ऋषि व श्रद्धा यांच्या चार कन्यांतील दुसरी. [ ३,१,३४ ]

( २ ) धाता नामक आदित्याची पत्नी. [ ६,१८,३ ]

( ३ ) शाल्मली द्वीपांतील एक नदी. [५,२०,१० ]

( ४ ) हविष्मंत नामक पितरांची स्त्री.

(५) मयासुराच्या तीन कन्यांतील तिसरी

( ६ ) भारतवर्षीय भरतखण्डस्थ नदी.

## कू

**कूट**–कंसाच्या पदरीं असलेला एक मल्ल. यास धनुर्यागाचे वेळीं बलरामानें मारिलें [ १०,४४,२८ ]

**कूटक**–भारतवर्षीय एक पर्वत. [५,१९,१६]

**कूपकर्ण**–एक रुद्रगण. बाणासुराच्या युद्धांत बलरामाबरोबर याचें युद्ध झालें. [ १०,६३,८ ]

**कूपह्रद**–भारतवर्षीय तीर्थ.

**कूर्च**–सूर्यवंशीय नरिष्यन्त कुलांतील मीढ्वान् राजाचा पुत्र. याचा पुत्र इंद्रसेन [ ९, २, १९ ].

**कूर्चामुख** विश्वामित्र वंशांतलि एक ऋषि.

**कूर्म**–विष्णूचा अकरावा अवतार. यानें समुद्रमंथन प्रसंगीं मंदराचल पाठीवर धारण केला. [ १, ३, १६ व ८, ७, ८ ] हिरण्मयखण्डांतील उपास्य देवता. [ ५, १८, १९ ]

( २ ) कद्रुपुत्र नाग.

( ३ ) शरीरांतील उपप्राणांतील एक.

**कूष्माण्डराज**–रुद्रगणांपैकीं एक.

**कृकल**–शरीरांतील उपप्राणांपैकीं एक.

**कृकलास** ( सरडा ) नृगराजा ह्या जन्मास आला असतां श्रीकृष्णस्पर्शानें तो उद्धरला. [ १०, ६४, ३ ]

**कृत**–चार युगांतील पहिलें युग. याची वर्षसंख्या देवमानानें अठ्ठाचाळीसशें वर्षांची आहे. म्हणजे मनुष्य मानानें १७,२८,००० वर्षांची आहे. याची संध्या व संध्यंशकाल देवमानानें आठशें वर्षांचा आहे. ( मस्य. अ. १६४ ) जेव्हां चंद्र, सूय, बृहस्पति व पुष्यनक्षत्र हीं एकत्र येतील त्यावेळीं कृतयुगाला आरंभ होईल. [ १२,२, २४ ] दैवीयुग व मानवीयुग हीं भिन्न आहेत. चार किंवा पांच वर्षांचें मानवीयुग.

( २ ) सोमवंशीय कुरुकुलांतील जय राजाचा पुत्र. याचा पुत्र हर्यवन. [ ९,१७,१७

( ३ ) वसुदेव व रोहिणी यांचा पुत्र. [ ९,२४,४८ ]

**कृतकः**–वसुदेव व मदिरा यांचा पुत्र. [ ९,२४,४८]

**कृतचेता**-पाण्डवांबरोबर द्वैतवनांत असलेला एक ऋषि.

**कृतंजय**–सूर्यवंशीय कुशकुलांतील बर्हि-राजाचा पुत्र. याचा पुत्र रणंजय [ ९,१२,१३ ].

( २ ) एक ऋषि.

**कृतद्युति**-चित्रकेतु राजाच्या कोटी स्त्रियांतील ज्येष्ठ. हिला अंगिराऋषीच्या कृपेनें पुत्र झाला, हें तिच्या सवतीनां सहन न झाल्यानें त्यांनीं त्या मुलाला विष दिलें [ ९,१४,४३ ].

**कृतध्वज**–विदेहवंशीय धर्मध्वजाचा पुत्र. याचा पुत्र केशिध्वज. [९.१३,१९].

( २ ) प्रतर्दन राजाचें नामांतर.

**कृतप्रज्ञ**–भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय भगदत्ताचा पुत्र. याला नकुलानें मारिलें.

**कृतमाला**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. या नदीवर सत्यव्रत राजा अर्घ्यप्रदान करीत असतां, त्याच्या ओंजळींत मत्स्य सांपडला, तोच मत्स्यावतार. येथें बलराम तीर्थ यात्रेला आला होता [५,१९,१८ ] [ ८,२४,१२ व १०,७९,१६ ].

**कृतवर्मा**-सोमवंशीय धनक राजाचा पुत्र [ ९,२३,२३ ].

( २ ) सात्वतकुलांतील हृदीकाच्या तीन कुलांतील तिसरा. हा भारतीयुद्धांत कौरवांकडील वाचलेल्या तीन वीरांनीं पाण्डवशिबिरावर जो हल्ला केला, त्यांत होता. हा पुढें यादवांच्या आपसांत झालेल्या संहारांत सात्यकीच्या हातून मरण पावला. [ ९,२४,२७ ]. ( भा.मौसल.अ.३)

**कृतवाक्**–अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**कृतवीर्य**–सोमवंशीय धनकाच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. याचा पुत्र सहस्रार्जुन. [ ९, २३, २३ ].

**कृतशौच**–भारतवर्षीय क्षेत्र.

**कृतस्थली**–एक अप्सरा.

**कृताग्नि**-सोमवंशीय धनकराजाच्या चार पुत्रांपैकीं दुसरा [ ९, २३, २३ ].

**कृतान्त**–संहारकर्ता काल. यमाचें नांव.

**कृताश्व**–कृशाश्वाचें नामांतर.

**कृति**–कयाधुपुत्र संह्रादाची पत्नि. हिचा पुत्र पंचजन [ ६, १८, १४ ].

( २ ) विदेहवंशीय बहुलाश्वाचा पुत्र. याचा पुत्र महावशी. [ ९,१३,२६ ]

( ३ ) नहुषराजाच्या सहा पुत्रांपैकीं कनिष्ठ [ ९, १८, १ ]

( ४ ) पुरुकुलांतील संनतिमान राजाचा पुत्र. यानें हिरण्यनाभापासून प्राच्यसामांच्या सहा संहिता मिळविल्या व त्या शिष्यांना पढविल्या. याचा पुत्र नीप. [ ९, २१, २८ ].

( ५ ) सोमवंशीय कुरुपुत्र सुधनुवंशांतील च्यवन राजाचा पुत्र. याचा पुत्र उपरिचरवसु. [ ९, २२, ५ ].

( ६ ) सोमवंशीय ज्यामघ कुलांतील रोमपादपुत्र बभ्रचा पुत्र. याचा मुलगा उशिक. [ ९, २४, २ ].

( ७ ) दुर्योधनपक्षीय राजा. याचा पुत्र रुचिपर्वा.

**कृतिमान्**- सोमवंशीय पुरुकुलांतील द्विमीढ-पुत्र यवीनराचा मुलगा. याला सत्यधृति असेंहि नामांतर आहे. याचा पुत्र दृढनेमि. [ ९, २१, २७ ].

**कृतिरथ**-विदेहवंशीय प्रतीपकाचा पुत्र. याचा पुत्र देवमीढ. [ ९, १३,१६ ].

**कृतिरात**-विदेहवंशीय महाधृतीचा मुलगा याचा पुत्र महारोमा. [९,१३,१७].

**कृती**-वसुपुत्र विश्वकर्म्याची पत्नी. हिला चाक्षुष नांवाचा सहावा मनु झाला. [ ६,६,१५ ].

**कृतेयुक**- सोमवंशीय पुरुकुलांतील रौद्राश्व व घृताची अप्सरा यांच्या दहा पुत्रांतील चौथा. [ ९ २०,४ ].

**कृतौजा**-सोमवंशीय धनक राजाच्या चार पुत्रांतील चौथा. [ ९,२३,२३ ].

**कृत्तिका**-अग्नि नामक वसूची पत्नी. हिचा पुत्र स्कंद. [ ६,६ १४ ].

( २ ) एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक [ ६,६,२३ ].

**कृत्या**-भारतवर्षीय नदी.

**कृत्वी**- ( त्वा ) शुकाचार्याची कन्या व नीप राजाची पत्नी. हिचा पुत्र ब्रह्मदत्त [ ९,२१,२५ ]

**कृप**-गौतमकुलोत्पन्न शरद्वान ऋषींचा तपोभंग करण्याकरितां इंद्रानें उर्वशी अप्सरा पाठविली होती, तिच्या दर्शनानें त्याचें वीर्य दर्भाच्या बेटावर पडलें. त्यापासून जें जुळें झालें, त्यांतील पुत्र. या जुळ्याचें राजा शंतनूनें पालन केलें. हा धनुर्विद्येंत प्रवीण होता. भारतीयुद्धांत हा दुर्योधनाकडे होता. युद्धानंतर पाण्डवांनीं यास आश्रय दिला होता. [ ९,२१, ३६ ] ( भा. स्त्री. अ. ११ ) हा चिरंजीव असून सावर्णिमन्वंतरांत सप्तर्षींपैकीं एक होईल. [ ८,१३,१५ ]

( २ ) ध्रुवाचा नातु जा शिष्ट त्याच्या चार पुत्रांपैकीं ज्येष्ठ.

**कृपा**- भारतवर्षीय भरतखण्डस्थ देश.

**कृपी**- कृपाचार्याच्या जुळ्यांतील मुलगी. द्रोणाचार्यांची पत्नी. हिचा पुत्र अश्वत्थामा [ ९,२१,३६ ].

**कृमिभोजन**-अतिथि वगैरेनां न देतां स्वतः करितांच अन्न शिजवून जे खातात, त्यांस प्राप्त होणारा नरक [५,२६,१८]

**कृश अ. कृशतनु**-एक ऋषि. हा प्रतिग्रह न घेता तप करीत असे. यानें वीरद्युम्न राजाचा पुत्र भूरिद्युम्न नष्ट झाला असतां, त्याला तपोबलानें आणलें व त्यास कित्येक इतिहासहि सांगितले. [ भा. शांति. अ. १२८ ].

**कृशाश्व**-एक ऋषि. याला दक्षकन्या अर्चि व धिषणा अशा दोन स्त्रिया होत्या. अर्चिचा पुत्र धूम्रकेश आणि धिषणेला वेदशिर, देवल, वयुन व मनु असे चार पुत्र होते. [ ६, ६, २० ]. शिवाय यास जया वसुप्रभा अशा दोन कन्या होत्या. जयेला शंभर पुत्र व वसुप्रभेला पन्नास होते. ते सर्व अस्त्ररूप असल्यानें विश्वामित्रानें आपल्याजवळ ठेविले होते. ( वा. रा. बाल. स. २१ )

( २ ) सूर्यवंशीय दिष्टकुलांतील सहदेवाचा पुत्र. याचा पुत्र सोमदत्त. [ ९, २, ३४ ].

( ३ ) इक्ष्वाकुवंशांतील बर्हणाश्व राजाचा पुत्र. याचा पुत्र सेनजित [९,६,२५]

( ४ ) नाटयकलेचा आचार्य.

( ५ ) अस्त्र विद्येचा आचार्य. (उ. रा.)

**कृष्ण**–उत्तानपाद वंशांतील हविर्धान व हविर्धानी यांच्या सहा पुत्रांतील चवथा. [ ४,२४,८ ].

( २ ) सोमवंशीय यदुकुलांतील वसुदेव व देवकी यांना कंसाच्या कारागृहांत झालेला आठवा पुत्र. हा भगवान विष्णूचा अवतार होता. याला जन्मल्याबरोबर वसुदेवानें कंसाच्या भीतीनें मथुरेंतून गोकुलांत नंदाच्या घरीं नेलें व तेथील कन्या घेऊन आला. [१०, ३,५१, ] याचें जन्म चालू वैवस्वत मन्वंतराच्या प्रस्तुत अठ्ठाविसाव्या युगपर्ययांत द्वापाराच्या शेवटीं श्रावण वद्य अष्टमीस मध्यरात्रीं झालें. ( दे. भा. स्कं. ४ अ. १६ ) गोकुळांत गेल्यावर नंदगृहीं वाढत असतां, अरिष्ट, पूतना, तृणावर्त, केशिनी, वत्सासुर, बकासुर, अघासुर इत्यादि अनेक असुरांचा नाश केला. गोपांसहवर्तमान गायींचें पालन करीत असतां, यानें गोपांचें दावाग्नीपासून रक्षण केलें, व ऋषिपत्न्यांचा उद्धार, इंद्रगर्वपरिहार, गोवर्धनोद्धारण ब्रह्मदेवगर्वनिरसन, गोपींशीं क्रीडा, इत्यादि कृत्यें केलीं. पुढें कंसानें धनुर्यागाचे निमित्तानें यास आणण्याकरितां अक्रूराला पाठविलें असतां, बलरामासह तेथें जाऊन कुब्जेवर अनुग्रह, रजकाचा नाश, मालाकाराकडून सन्मान इत्यादि पावल्यावर धनुष्याचा भंग, कुवलयापीड हत्तीचा नाश, मुष्टिकादि वीरांचें हनन करून कंसाचा वध केला. [ १०, ४४, ३८] नंतर वसुदेवादिकांची सुटका केली.[१० ४४,५० ] उपनयन इत्यादि होऊन हा बलरामासह सांदीपिनी गुरूच्या आश्रमीं अध्ययनाकरितां गेला तेथें चौसष्ट दिवसांत अध्ययन समाप्त केलें, व मृतगुरुपुत्र परत आणून गुरुदक्षिणा दिली. [ १०, ४५, ४६. ] नंतर मथुरेंत आल्यावर जरासंधाचा सत्रावेळां पराभव केला. [ १०, ५०, ४२, ] अठराव्या वेळीं जरासन्ध येण्याच्या पूर्वी नारदाच्या सांगण्यावरून कालयवन आला [ १०, ५०, ४४ ] तेव्हां समुद्रांत द्वारकेची स्थापना केली [ १०, ५०, ५०. ] व कालयवनाचा नाश केला. [ १०, ५१, १२, ] जरासंधाला फसवून बलराम-कृष्ण परत द्वारकेंत आले. [ १०,५२,१४ ] तेथें अष्टनायकांशीं प्रसंगांप्रसंगानें विवाह केला, त्या– १ रुक्मिणी, २ जाम्बवती, ३ सत्यभामा ४ भद्रा ५ मित्रविंदा ६ सत्या ७ कालिन्दी आणि ८ लक्ष्मणा, या प्रत्येकीस दहा दहा पुत्र होते [ १० ६१, ७ ] रुक्मिणीला चारुमती नांवाची मुलगी असून ती कृतवर्म्याचा पुत्र बली यास दिली होती. [ १०, ६१, २४ ] शिवाय नरकासुराचा वध करून त्याच्या बंदिवासांत

असलेल्या सोळा हजार कन्यांशीं यानें विवाह केला. [ १०,५९,४२ ]. आणखीहि याला शंभर स्त्रिया होत्या. याचे प्रद्युम्नादि पुत्र व पौत्र १८ महारथी होते. [ १०, ९०, ३३ ]. युधिष्ठिराच्या यज्ञाचे निमित्तानें भीमाकडून जरासंधाचा वध [ १०, ७२, ४५ ] यज्ञांत श्रीकृष्णाची अग्रपूजा सहन न झालेल्या शिशुपालाचा वध [ १०, ७४, ४३ ]. पांडवांचा वनवास संपल्यावर कौरवांकडे शिष्टाई, युद्धांत अर्जुनाला गीतेचा उपदेश, व वेळोवेळीं मदत. पांडवांचा अश्वमेध यज्ञ झाल्यावर कुंतीची स्तुति. [ १, ८, १८ ]. उत्तरेच्या गर्भाचे रक्षण [१,१२,१०]. द्वारकेंत आगमन [ १, ११, २३ ]. सुदामा ब्राह्मणाचा सत्कार, [ १०, ८०, २० ], मिथिलेंत गमन [ १०, ८६, २१ ]. सूर्यग्रहणानिमित्त स्यमंतपंचकक्षेत्रीं गमन व सर्वांच्या भेटी [ १०, ८२, २ ]. ऋषिशापानें सांबाला झालेल्या मुसळाचें वृत्त [११,१,१७ ]. यादवांसह प्रभासक्षेत्रीं जाण्याचा निश्चय [ ११, ६, ३५ ]. उद्धवाला उपदेश. द्वारकेंत उत्पात होऊं लागल्यामुळें बायकामुलांना शंखोद्धारक्षेत्रीं पाठवून सर्व यादव प्रभासक्षेत्रीं गेले. [ ११, ३०, १० ] आपसांत युद्ध यादवांचा नाश. [११,३०,२४] जरा नामक व्याधाचा बाण लागून त्याचा उद्धार व भगवंताचें निजधामीं प्रयाण [ ११, ३१, ६ ] श्रीकृष्ण निजधामाला गेल्यावर कलियुगाला सुरवात [ १२, २, ३३ ]. भारतांत श्रीकृष्णाच्या जन्माबद्दल अशी कथा आहे कीं विष्णूनें आपल्या मस्तकावरील एक काळा व एक पांढरा असे दोन केस उपटले, ते देवकी व रोहिणीच्या उदरांत जाऊन त्यापासून श्रीकृष्ण व बलराम उत्पन्न झाले. कृष्णाची आकृति अति उच्च, ऱ्हस्व, स्थूल किंवा कृश नसून मध्यम प्रकारची होती. याचे नेत्र कमलासारखे विस्तीर्ण, नासिका सरळ, अंगकांति श्यामवर्ण असे. पीत वस्त्रें परिधान करणें यास आवडत असून हा अध्यात्म विद्या पारंगत होता. त्यावेळीं भीष्मा वांचून याच्या इतका उत्कृष्ठ वक्ता दुसरा कोणी नव्हता.

( ३ ) श्रीकृष्णाचा मित्र एक गोप. [ १०, १५, २० ]

( ४ ) कद्रूपुत्र नागांतील एक.

( ५ ) अथर्वणवेदोपनिषत्.

( ६ ) अर्जुनाच्या दहा नांवांपैकीं एक. [ १, ९ १५ ].

( ७ ) शुकाचार्यास पीवरीपासून झालेल्या चार पुत्रांपैकीं एक.

( ८ ) व्यासांचें एक नांव. [ १,४,३२ व ९,२२,२२ ]

( ९ ) कलियुगांत कण्वराजा नंतर आलेल्या आन्ध्र घराण्यांतील बलिराजाचा भाऊ. हा दुसरा राजा होता. [ १२,१,२३ ].

**कृष्णद्वैपायन**—मैत्रावरुणि जो वसिष्ठ ऋषि त्याच्या शक्ति नामक पुत्राचा पौत्र व

पराशर ऋषीचा सत्यवती पासून झालेला पुत्र. हा सत्यवतीला कौमार दशेंत झाला होता. यालाच पाराशर्य द्वैपायन, बदरिवनांत तप केलें म्हणून बादरायण, वेदव्यास, इत्यादि नांवें आहेत. यानें पुराणें व महाभारत रचिलें. यानें छिन्न झालेला शंतनूचा वंश वृद्धिंगत केला. यास वेदपरंपरा चालविणारे पैलादि चार शिष्य असून रोमहर्षण नांवाचा पुराणांचा शिष्य होता. याशिवाय असित व देवल असे दोन शिष्य होते. हा चिरंजीव असून सावर्णिमन्वंतरांत सप्तर्षींपैकीं एक होईल. यानें नारदाच्या उपदेशावरून भागवत ग्रंथ रचिला. याचा पुत्र महायोगी शुकाचार्य. [ १,७,८ ] [ ९,२२,२२,२५ ] [ १२,४,४० ] [ १२,६,४९ ] व [ १२,७,६ ].

**कृष्णपराशर**–पराशर कुलोत्पन्न एक ऋषि व कुल. याच्या कुलांत कार्ष्णायन, कपिमुख, काकेयस्थ, अजःपाति व पुष्कर हे मुख्य ऋषि होते.

**कृष्णा**–सह्याद्रि पर्वतांत महाबळेश्वरापासून उगम पावलेली एक नदी.[५,१९,१८]

(२) योगमायेचें नांव. [ १०,२,१२ ].

( ३ ) द्रौपदीचें नांव. [ १०,५८,५ ].

**कृष्णेक्षणा**–मलयध्वज राजाची बहीण व अगस्त्य ऋषीची पत्नी. हिचा पुत्र दृढच्युत. [ ४,८,३० ३२ ].

## के

**केकय**–भारतवर्षीय भरत खण्डस्थ देश. पंजाबांतील बियास नदीच्या पश्चिमेकडील देश. हा आग्नेय कोसलाच्या उत्तरेस असावा. येथील राजांस हें नांव साधारण असे. दशरथाच्या वेळीं येथें अश्वपति नांवाचा राजा असून त्याची कन्या कैकयी ही दशरथाची पत्नी होती. पाण्डवांच्या वेळीं येथें धृष्टकेतु नांवाचा राजा होता. याची राजधानी गिरीव्रज नगर. वसुदेवानें आपल्या यज्ञांत या राजाचा सत्कार केला [ १०,८४,५५ ].

( २ ) केकयदेशचा एक राजर्षि. हा अरण्यांत मृगयेला गेला असतां याच्या अंगावर एक राक्षस धावून आला. परंतु राजा धर्मनियमानुसार राज्यशकट हाकीत असल्याचें समजतांच तो दूर झाला. (भा. शांति. अ. ७७)

( ३ ) भारतियुद्धांतील पाण्डवपक्षीय व दुर्योधनपक्षीय राजे. ( भा. उद्यो. अ. १७१–१९५ )

**केकयी**-कैकयीचे नामांतर.

**केतु**–ऋषभदेवाच्या नऊ खण्डाधिपती पुत्रांपैकीं एक. [ ५, ४, १० ].

( २ ) नवग्रहांपैकीं एक. कोणी याला छायाग्रह समजतात. हा शिशुमार चक्राच्या सर्व अवयवावर असतो. [ ५, २३, ७ ].

( ३ ) विप्रचित्ति दानव व सिंहिका यांच्या शंभर मुलांना संज्ञा. राहूचे धाकटे भाऊ. [ ६, ६, ३७ ].

( ४ ) तामस नांवाच्या चवथ्या मनूच्या पुत्रांपैकीं एक. [ ८, १, २७ ].

( ५ ) भारतवर्षीय एक खण्ड.

( ६ ) दनुपुत्र एक दानव.

**केतुमती**-सुमाली राक्षसाची स्त्री. रावणाची मातामही. ( आईची आई )

**केतुमान्**-सूर्यवंशीय नृगकुलांतील अंबरीष राजाचा एक पुत्र. [ ९, ६, १ ].
( २ ) सोमवंशीय क्षत्रवृद्धाच्या कुलांतील धन्वंतरि राजाचा पुत्र. याचा पुत्र भीमरथ. [ ९, १७, ५ ].
( ३ ) दनुपुत्र एक दानव.
( ४ ) मनुष्यजातीय पश्चिम दिग्पाल. ( पृथु शब्द पहा )
( ५ ) निषादाधिपति भारती युद्धांतील दुर्योधन पक्षीय राजा.

**केतुमाल**-आग्नीध्र राजाच्या नऊ पुत्रांतील कनिष्ठ. याची स्त्री मेरुकन्या देववीति. याचा खण्ड याच नांवानें प्रसिद्ध आहे. [ ५, २, १९ ].

**केतुमालवर्ष**-माल्यवान पर्वत आणि क्षीरसमुद्र यांच्यामधील जंबुद्वीपाच्या नऊ वर्षांतील एक वर्ष. हा परीक्षित राजानें दिग्विजायाचे वेळीं जिंकला होता. [ ५, १६, १० व १, १६, १२ ].

**केतुमाला**-काम्यकवनाच्या पश्चिमेकडील एक नदी.

**केतुवर्मा**-त्रिगर्ताधिपति सूर्यवर्म्याचा भ्राता. यास अर्जुनानें मारिलें. (भा. अश्व.)

**केतुवीर्य**-एक दानव.

**केदार**-हिमालयावरील एक प्रसिद्ध क्षेत्र. हें द्वादश ज्योतिर्लिंगापैकीं एक आहे
( २ ) एक राजर्षि. ( दे. भा. )

**केन**-सामवेदोपानिषत्.

**केरल**-( मलबार ) किष्किंधेच्या दक्षिणेकडील देश. हा पाण्डवांच्या वेळीं पादपुरुष देशाच्या दक्षिणेकडे होता. ( भा. सभा. अ. ३१ ) येथें पांडवांच्या किंचित्पूर्वी चंद्रहास पिता सुधार्मिक हा राजा होता. येथें बलराम तीर्थ यात्रेचे वेळीं आला होता. [ १०,७९,१९ ].

**केवल**-सूर्यवंशीय दिष्टकुलोत्पन्न नरराजाचा पुत्र. याचा पुत्र बंधुमान् [ ९,२, ३० ]

**केशिध्वज**-निमिकुलांतील कृतध्वजाचा पुत्र. हा आत्मज्ञानी होता. याचा चुलतभाऊ खाण्डिक्य हा कर्ममार्गी होता. या दोघांत द्वेष असल्यामुळें खाण्डिक्याला पळून जावें लागलें. पण पुढें त्यांचें परस्परावर प्रेम उत्पन्न होऊन खाण्डिक्यानें यास गोहत्येच्या पापापासून मुक्त केलें व यानें त्याला योगशास्त्राच्या गूढ गोष्टी सांगितल्या. [ ९,१३,२० ].

**केशिनी**-विश्रवाऋषीची एक पत्नी. हिचे पुत्र रावण, कुंभकर्ण आणि बिभीषण [ ४,१,३७ व ७,१,४३ ].
( २ ) सूर्यवंशीय सगर राजाची पत्नी व असमंजसाची आई. हिला, शैब्या, भानुमती, अशीहीं नांवें होती. [ ९,८,१५ ].
( ३ ) एक राजकन्या. हिच्या स्वयंवरप्रसंगीं प्रल्हादपुत्र विरोचन व अंगिरा ऋषीचा पुत्र सुधन्वा हे दोघेही एकदम येऊन पोंचले. तेव्हां त्या दोघांत श्रेष्ठ कोण असा वाद उत्पन्न होऊन त्यांनीं आपापले प्राण पणास लावले; आणि दोघेहि प्रल्हादाकडे आले. तेव्हां प्रल्हादानें सुधन्व्याचा पक्ष सत्य आहे, असें सांगून त्याचेजवळ विरोचनाच्या प्राणदानाची प्रार्थना केली. शेवटीं हिचा विवाह सुधन्व्याशीं लागला. ( भा. उद्यो. अ. ३५ )

( ४ ) प्राधाकन्या एक अप्सरा.

( ५ ) सोमवंशीय अजमीढ राजाच्या चार स्त्रीयांपैकीं एक.

( ६ ) अयोध्या नगरी व भागीरथी यां मधील एक लहान नदी. (वा. रा.)

( ७ ) दमयंतीची दासी.

**केशी**—वसुदेव व कौसल्या यांचा पुत्र. [ ९,२४,४८ ].

( २ ) कंसाचा एक सेवक. हा कंसाज्ञेनें अश्वरूप घेऊन श्रीकृष्ण नाशाकरितां गेला असतां, कृष्णाच्या हातून मरण पावला. [ १०,३७,१-७ ]

( ३ ) एक असुर. हा उर्वशी व चित्रलेखा या अप्सरांस घेऊन पळून जात असतां, पुरुरवाराजानें यास मारून अप्सरांस सोडविलें ( मत्स्य अ.२४ )

( ४ ) एका प्रजापतीच्या देवसेना आणि दैत्यसेना ह्या दोन कन्या हरण करून पळणारा असुर. त्यांपैकीं दैत्यसेना यास वश झाली, व इंद्रानें याचा पराभव करून देवसेनेला सोडविलें. ( भा. वन. अ. २२३ ).

**केसराचल**—मेरूच्या सभोंवतालचा एक पर्वत. यावरून सीता नांवाची नदी वहाते. [ ५,१७,६ ].

**केसरी**—अंजनेचा पति व मारुतीचा पिता एक वानर हा गोकर्णपर्वतावर रहात असे. यानें शंबसादन असुराचा वध करून ऋषींची पीडा दूर केल्यामुळें त्यांनीं संतुष्ट होऊन यास आशीर्वाद दिला, कीं तुला सुस्वभावी, भगवद्भक्त व बलाढ्य पुत्र होईल. ( वा. रा. सुंदर स. ३५ )

**केसरी**—गद्गदवानराचा पुत्र. जांबवानाचा कनिष्ठ भ्राता.

## कै

**कैकय**—सोमवंशीय अनुकुलांतील शिबिराजाचा चौथा पुत्र. [ ९,२३,३ ]. यास केकय असें म्हटलें आहे.

( २ ) एक देश. [ १०,२,३ ].

**कैकरसप**—कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**कैकसी**—सुमाली राक्षसाची कन्या व विश्रवा ऋषीची पत्नी.

**कैकेय**—एका राजवंशाचें नांव. यांतील राजे रुक्मिणी स्वयंवराचें वेळीं आले होते. [ १०,५४,५८ ].

**कैकेयी**—सृंजयराजाची पत्नी. ( सृंजय शब्द पहा. )

( २ ) सूर्यवंशीय दशरथ राजाच्या मुख्य तीन स्त्रियांपैकीं तिसरी. ही केकय देशाच्या अश्वपती राजाची कन्या असून दशरथाची अत्यंत आवडती होती. हिनें रामाच्या यौवराज्याभिषकाच्या वेळीं दशरथानें पूर्वी देऊं केलेले दोन वर मंथरेच्या सांगण्यावरून मागून एकानें रामास वनवास व दुसऱ्या वरानें भरतास राज्य मागून घेतलें हिचा पुत्र भरत.

( ३ ) मत्स्यपति विराट राजाची पत्नी सुदेष्णा ती केकयाधिपतीची कन्या म्हणून तिचें नांव (भा.वि.रा. अ.९)

**कैटभ**—मधु दैत्याचा धाकटा भाऊ. यास विष्णूनें मारिलें. [ १०,४०,१७ ].

**कैतव**—शकुनीचा भाऊ उलूक, त्याचें नामांतर. ( भा. उद्योग. अ. १६३ )

**कैरात**—कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**कैराती**–अंगिराकुलातील एक ब्रह्मर्षि.

**कैलास**–मेरूच्या परिस्तरणगिरींतील एक पर्वत. तिबेटांत मानस सरोवराच्या उत्तरेस २१,८३० फूट उंचोचा हा पर्वत आहे, शंकर पार्वतीचें निवासस्थान येथें आहे यावर गौरीकुण्ड म्हणून एक तीर्थ असून तें नेहमीं थिजलेलें असतें. [ ५,१६,२७ ].

( २ ) शिवलोक. हा सत्यलोकांत अंतर्भूत आहे.

( ३ ) हेमकूटपर्वतावरील कुबेराचें स्थान.

( ४ ) हिमालयाचें शिखर.

**कैवल्य**–यजुर्वेदोपनिषत्

**कैशिक**–सोमवंशीय विदर्भराजाचा पुत्र. याचा पुत्र चिदि.

## को

**कोकनद**–भारतवर्षीय देश.

**कोकामुख**–भारतवर्षीय तीर्थ.

**कोंक**–दक्षिणेकडील एक देश येथें अर्हन् नांवाचा राजा होता, त्यानें पाखण्डीधर्माचा स्वीकार केला. [ ५,६,९ ].

**कोंकण**–भारतवर्षीय देश. सहदेव दक्षिणदिग्विजयाच्यावेळीं या देशांत आला होता. पश्चिमेस अरबी समुद्र व पूर्वेस सह्याद्रि पर्वत यामधील प्रदेश. याची सामान्यतः रुंदी २५-३० मैल व लांबी ६२० मैल आहे. परशुरामानें यज्ञांत सर्व पृथ्वी दान दिल्यावर तो पुन्हां क्षत्रिय दिसला कीं, त्याला मारीत असे, म्हणून त्यास दान दिलेल्या भरतवर्षाबाहेर रहावयास जा, असें ऋषीनें सांगितलें असतां, समुद्रानें त्यास हा प्रदेश दिला. ( भा. शांति. अ. ४९ )

**कोटरा**–बाणासुराची माता. हिनें बाणासुराचें रक्षण करण्याविषयीं श्रीकृष्णाची प्रार्थना केली. [ १०,६३,२० ]

( २ ) देवता विशेष. [ १०,६,२८ ]

**कोटिक**–शिबि देशाधिपति सुरथ राजाचा पुत्र व जयद्रथाचा मित्र. हा भीमाच्या हातून मरण पावला.

**कोटिकास्य**–कोटिकाचें नांव.

**कोटितीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**कोपचय**–अंगिरा कुलांतील एक ऋषि.

**कोलगिरि**–कर्णप्रावर देशाच्या दक्षिणेस असणारा एक पर्वत.

**कोलुक**–भारतवर्षीय पर्वत. [५,१९,१६].

**कोलापूर**– ( कोल्हापूर. ) (दे. भा. स्कं.७)

**कोलाहल**–एक पर्वत. ( उपरिचर शब्द पहा. )

**कोविद** कुशद्वीपांतील लोकांचा एक भेद. [ ५,२०,१६ ].

**कोशा**–( षा ) भारतवर्षीय भरत खण्डस्थ एक नदी.

**कोसल**–एक देश. याचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग आहेत. उत्तर कोसल म्हणजे हल्लींचा घोगरा नदीच्या उत्तरेकडील अयोध्याप्रांत. या देशाची राजधानी श्रावस्ती. ही नेपाळांत हिमालयाच्या पायथ्याशीं होती. दिग्विजयाच्या वेळीं हा देश भीमानें जिंकला, ( भा. सभा. ) दक्षिण कोसल हा प्रांत महानदीच्या खोऱ्यांत महानदी व गोदावरी यांच्यामधील पूर्वेकडचा प्रांत. ( हल्लींचा छोटा नागपुर ) रामपुत्र कुश येथें राजा असून त्याची कुशावती राजधानी होती. दिग्विजयाच्यावेळीं सहदेवानें

ह्या देश जिंकला. कांहींच्या मतें छत्तीसगड, अमरकंटक, व कांकर ह्या प्रांत ह्मणजे दक्षिण कोसल. कोणी याचे पूर्व कोसल व दक्षिण कोसल असे भेद मानून पूर्वकोसलांत ईशान्य कोसल व आग्नेय कोसल असे पोट-भेद मानतात. छत्तीसगड म्हणजे महाकोसल. ह्या देशाचे राजे युधिष्ठिराच्या राजसूयज्ञाला आले होते. [ १०,७५,१२ ]

कौ

**कौकुट्टम**–भारतवर्षीय देश.

**कौकुर**-कुरुवंशोत्पन्न कारस्कार राजाचें नामांतर.

**कौकुरुण्डी** उत्तम मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

**कौचकी**–अंगिराकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**कौचहस्तिक**–भृगुकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**कौटिल**– ,, ,,

**कौणकुत्स्य**–एक ऋषि.

**कौण्डिन्य**–कुण्डिनकुलांतील एक ब्रह्मर्षि. युधिष्ठिराच्या अश्वमेधयज्ञांतील एक सदस्य. ( जै. अश्व. अ. ६३ )

**कौतुजाति**–नीलपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**कौत्स**–भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि. भृगुवंशीय भगीरथ राजानें आपली कन्या हंसी यास दिली होती.

**कौथुम**–वेदाची एक शाखा. यांतील मंत्रानीं स्तुति करुन भगीरथानें गंगेस प्रसन्न केलें. ( दे. भा. स्कं. ९ अ. ११ )

**कौन्तल**–( क्षा ) कुंतल राजाची नगरी. ( चंद्रहास शब्द पहा. )

**कौन्तेय**–कुन्तिपुत्र धर्म, भीम, अर्जुन यांस संज्ञा.

**कौमण्ड**–गौतमांगिरस कुलांतील एक ऋषि व त्याचें कुल.

**कौमारी**–सप्तमातृगणातील एक.

( २ ) कुमार जो कार्तिकेय त्याची शक्ति

**कौमोदकी**–खाण्डववन दहन प्रसंगीं अग्नीनें श्रीकृष्णास दिलेली गदा.[१०,७८,८]

**कौरव**–कुरुवंशांतील राजे. विशेषतः धृतराष्ट्रपुत्र दुर्योधनादिकांना ही संज्ञा आहे. [ १,१०,३३ ].

**कौरव्य**–वासिष्ठकुलांतील एक ऋषि.

( २ ) ऐरावतकुलोत्पन्न नाग. उलूपीचा पिता. याच्या कुलांतील जनमेजयाच्या सर्पसत्रांत १० कुळें दग्ध झालीं–तीं एरक, कुंडल, वेणी, वेणिस्कन्ध, कुमारक, बाहुक, शृंगवेर, धूर्तक आणि प्रातरातग.

( ३ ) कुरुकुलांतील एका राजाचें नांव

**कौरुक्षेत्री**–अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**कौरुपति**– ,, ,,

**कौर्मकल्प**–मासांतील दिवसानुक्रमानें ब्रह्मदेवाची पूर्णिमा. या कल्पारम्भीं कूर्मावतार झाला.

**कौर्मपुराण**–हें अठरा महापुराणांपैकीं एक असून याची श्लोकसंख्या सतरा हजार आहे. [१२,७,२३ व १३,८]

**कौवेरक**–कश्यपकुलांतील एक ऋषि.

**कौशल**–कलियुगांत राज्य करणारे सात राजे. [ १२,१,३५ ].

**कौशल्य**–सुकर्मब्राह्मणाचा शिष्य. यानें सामवेदांचें अध्ययन केलें [१२,६,७७]

( २ ) पिप्पलाद ऋषीचा शिष्य. हा आश्वलायन ऋषि कुलांतील होता.

( ३ ) अंगिराकुलांतील एक ऋषि.

**कौशापि**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**कौशाम्बी**-सोमवंशीय विजयकुलांतील कुशाम्ब अथवा कुशाम्बुराजानें स्थापिलेली नगरी. हस्तिनापूर पुरानें वाहून गेल्यावर नेमिचक्रराजा या नगरींत राहूं लागला. [९,१५,४व९,२२,४०]

**कौशि**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**कौशिक**-भीष्म शरपंजरीं पडले असतां त्यांचेकडे आलेला एक ऋषि.[१,९,७]

( २ ) सोमवंशीय विजयकुलोत्पन्न कुशाम्बु, गाधि, विश्वामित्र प्रभृति राजांस साधारण नांव, व गोत्र. पुढें विश्वामित्राच्या अनेक मुलांमुळें याच्या अनेक शाखा झाल्या [ ९,१६,३७ ].

( ३ ) विश्वामित्र ब्राह्मणत्व पावल्यावर त्याच्या कुलांतील एक ऋषि. याची स्त्री हैमवती. ( भा. उद्यो. अ. ११७)

( ४ ) कुरुक्षेत्रस्थ एक ब्राह्मण. याला पितृवर्ती इत्यादि सात पुत्र होते.

( ५ ) तपश्चर्या करून राहणारा सत्यनिष्ठ ब्राह्मण. एकदां कांहीं श्रीमंत प्रवासी अरण्यांतून जात असतां त्यांचेवर चोरांनीं हल्ला केला, तेव्हां ते प्राणभयानें या ऋषीच्या आश्रमांत आले. इतक्यांत पाठीमागून चोर येऊन त्यांनीं विचारलें असतां, यानें ते प्रवासी आश्रमांत असल्याचें सांगितलें. हें ऐकून चोरांनीं त्या प्रवाशांस मारून त्यांचें द्रव्य नेलें. पण हा ब्राह्मण त्यामुळें अधोगतीस गेला. ( भा. कर्ण अ. ६९ )

( ६ ) इंद्राचें नांव.

**कौशिक**-वसुदेवास वैश्य जातीची एक स्त्री होती, तिच्या पासून झालेला पुत्र.

( ८ ) सावर्णिमन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षीपैकीं एक.

**कौशिकी**-भारतवर्षीय नदी. या नदीच्या जलानेंच शमीकपुत्रानें परीक्षित राजास शाप दिला होता [ ५,१९, १८ व १,१८,३६ ].

( २ ) जमदग्नि ऋषीची माता सत्यवती नदीरूप पावल्यावर तिला मिळालेलें नांव. [ ९,१५,१२ ].

**कौषारव**-( वि ) मैत्रेय ऋषीस नांव. [ १,१३,१२ व ३,४,२६ ].

**कौषीतक**-एक ऋषि. याचा पुत्र किंवा वंशज कहोड ऋषि.

**कौषीतकि**-ऋग्वेदाची एक शाखा व उपनिषत्.

**कौषीतकेय**-कहोड ऋषीस नामांतर.

**कौषेय**-एक ऋषि.

**कौष्ठिकि**-अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**कौसला**-कृष्णपत्नी सत्येचें नामांतर.

**कौसल्य**-(अयोध्या) येथें श्रीकृष्ण व सत्या यांचा विवाह झाला. [१०,५८,३४]

**कौसल्या**-ईशान्य कोसल देशीय भानुमान राजाची कन्या व दशरथ राजाची पत्नी. हिचा पुत्र रामचंद्र.

( २ ) वसुदेवाची एक पत्नी. हिचा पुत्र केशी [ ९,२४,४८ ]

( ३ ) काशीराजाच्या अंबादि तीन कन्यांस नामांतर.

**कौस्तुभ**-समुद्रमंथनकालीं निघालेल्या चौदा रत्नांपैकीं एक. याचा स्वीकार विष्णूनें केला. [ ८,८,५ ].

### क्र

**क्रतु**–स्वायंभूमन्वंतरांत ब्रह्मदेवाच्या हातापासून याची उत्पत्ति झाली. हा दहा प्रजापतींपैकीं एक होय. [ ३,१२,१२ ] याला कर्दमप्रजापतीची क्रिया नामक कन्या दिली असून तिच्यापासून ६० हजार वालखिल्य नामक पुत्र झाले. संपूर्ण ब्रह्ममानसपुत्र महादेवाच्या शापानें नष्ट झाल्यानंतर ववस्वत मन्वंतरारंभीं ब्रह्मदेवानें यांना पुन्हां उत्पन्न केलें.

( २ ) वैवस्वतमन्वंतरांत यास संतति नव्हती. हा आयु नांवानें पौष महिन्यांतील सूर्याबरोबर फिरतो.

( ३ ) उल्मुक व पुष्करिणी यांच्या सहा पुत्रांतील चौथा. [ ४,१३,१७ ].

( ४ ) एक असुर. याची स्त्री वैश्वानरकन्या हयशिरा. [ ६,६,३४ ].

( ५ ) श्रीकृष्ण व जांबवती यांचा पुत्र. [ १०,६१,१२ ]

( ६ ) फाल्गुन महिन्यांत पर्जन्य नांवाच्या सूर्याबरोबर फिरणारा यक्ष. [ १२,११,४० ].

( ७ ) दहा विश्वेदेवांतील एक.

( ८ ) बारा भार्गव देवांतील एक.

**क्रतुमत्**–विश्वामित्राचा एक पुत्र. [ ९,१६,३६ ].

**क्रथ**–सोमवंशीय ज्यामघ पुत्र विदर्भ राजाचा पुत्र. याचा पुत्र कुन्ति. [ ९,२४,१ ]

( २ ) शुक्तिमान पर्वताच्या पूर्वेकडील राजा. हा भारतीयुद्धांत दुर्योधनाकडे होता.

**क्रथक**–विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**क्रथन**–वरुण लोकांतील एक असुर.

( २ ) रामसेनेंत या नांवाचे दोन वानरांचे अधिपति होते. (वा. रा. युद्ध.)

[illegible] नामक अग्नीचा पुत्र. याचें प्रेतदहनांत प्राधान्य.

### क्रा

**क्राथ**–क्रथवानरांतील एकाचें नामांतर.

( २ ) एक राजा. याच्या पुत्रास भारतीयुद्धांत अभिमन्यूनें मारिलें.

### क्रि

**क्रिया**–कर्दम प्रजापतीची कन्या व क्रतूची पत्नी. [ ३,२४,२३ ].

( २ ) स्वायम्भू मन्वंतरांतील दक्षाच्या सोळा कन्यांपैकीं व धर्मऋषीच्या तेरा पत्न्यांपैकीं एक. हिचा पुत्र योग [ ४,१,४९ ].

( ३ ) विधातानामक आठव्या आदित्याची पत्नी. हिला पुरीष्य नांवाचे पंचचित अग्नि झाले. [ ६,१८,४ ].

### क्रो

**क्रोडोदरायण**–वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**क्रोध**–ब्रह्मदेवाच्या भ्रुकुटीपासून उत्पन्न झालेला पुत्र. [ ३,१२,२६ ]

यानें एकदां जमदग्नीनें पितराकरितां सिद्ध केलेलें पायस सर्परूप धारण करून विषानें दूषित केलें; त्यामुळें जमदग्नीस कोप आला नाहीं, पण पितरांच्या शापानें यास कांहीं काळ नकुल जन्म घ्यावें लागलें. पुढ याचा उद्धार झाला. ( जै. अश्व. )

( २ ) लोभ व निकृति यांचा पुत्र. [ ४,८,३ ]

**क्रोध**–अष्टभैरवांतील एक.

( ४ ) कश्यपपत्नी कालेच्या चार पुत्रांतील एक.

**क्रोधन**–सोमवंशीय जन्हुकुलांतील अयुत-राजाचा पुत्र. याचा पुत्र देवातिथि [ ९,२२,११ ]

( २ ) कौशिक ऋषीच्या सात पुत्रांपैकीं एक. ( पितृवर्ती शब्द पहा. )

( ३ ) एक ऋषि.

**क्रोधनायन**-वसिष्ठवंशीय श्यामपराशर कुलांतील एक ऋषि.

**क्रोधवश**–महातलांतील सर्पविशेष. [ ५,२४,२९ ].

( २ ) कश्यप व क्रोधवशा अथवा क्रोधा या पासून झालेले पुत्र व त्यांचें वंशज. यांस भीमानें मारिलें. ( भा.)

( ३ ) रावणपक्षीय एक राक्षस.

**क्रोधवशा**–कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांपैकीं एक. हिचे पुत्र दंदशूकादि सर्प. [ ६,६,२६-२८ ].

**क्रोधशत्रु**–कश्यप स्त्री काला, तिच्या चार पुत्रांतील एक.

**क्रोधहन्ता**– ,, ,,

**क्रोधा**–क्रोधवशेचें नामांतर. हिला क्रोधवश नांवाचे लक्ष पुत्र असून मृगी, मृग-मंदा, हरि, भद्रमना, मातंगी, शार्दूली, श्वेता, सुरभि आणि सुरसा, अशा नऊ कन्या होत्या.

**क्रोष्टा**–सोमवंशीय आयुकुलांतील यदु-राजाच्या चार पुत्रांतील दुसरा. या-सच क्रोष्टु असेंहि म्हणतात. याचा पुत्र वृजिनवान् [ ९,२३,२०-३० ].

( २ ) भरद्वाजांगिरस वंशांतील ऋषि.

**क्रोष्टु**–क्रोष्टा राजाचेंच नामांतर.

## क्रौ

**क्रौंच**–हिमवान् पर्वत व मेना यापासून झालेला एक पुत्र. हा ज्या द्वीपांत आहे, त्यास क्रौंचद्वीप असें नांव मिळालें आहे. [५,१,३२ आणि ५,२०,१८].

**क्रौंचद्वीप**-पृथ्वीच्या सप्त महाद्वीपांतील पांचवें. हें घृतोदाच्या पलीकडे असून याचा विस्तार सोळा लक्ष योजनें आहे. व यास इतक्याच प्रमाणाच्या क्षीरसमुद्राचे वेष्टण आहे. येथें प्रिय-व्रताचा पुत्र घृतपृष्ठ अधिपति असून यांत क्रौंच पर्वत असल्यामुळें या द्वी-पाला हें नांव पडलें आहे. घृतपृष्ठानें याचे सात भाग करून ते आपल्या सात पुत्रांना विभागून दिले [ ५,२०,१८–२० ].

**क्रौंचारण्य**–दण्डकारण्याच्या दक्षिणेस अस-णारें एक वन. येथें राम–लक्ष्मण आले असतां, त्यांस अयोमुखी, कबंध, राक्षस भेटले. यास क्रौंचावट असेंहि म्हटलें आहे. ( वा. रा अर. )

**क्रौंचावट**–क्रौंचारण्याचें नामांतर.

## क्ष

**क्षत्ता**–विदुराचें नामांतर. [ ३,१,१ ].

**क्षत्र**–एक यादव.

**क्षत्रंजय**–धृष्टद्युम्नाच्या पुत्रांतील एक. हा भारतीयुद्धांत मरण पावला. ( भा. )

**क्षत्रदेव**-शिखण्डीचा पुत्र. हा भारती-युद्धांत पाण्डवांकडे होता. याच्या रथाचे अश्व वर्णनीय होते. हा दुर्यो-धनपुत्र लक्ष्मणाच्या हातून मरण पावला. ( भा. द्रोण० अ. २३ )

**क्षत्रधर्मा**–( वर्मा ) क्षत्रवृद्धकुलांतील जो जयराजा त्याचा पुत्र.

**क्षत्रधर्मा**–धृष्टद्युम्नाचा एक पुत्र. द्रोणाचार्यांचे हातून मरण पावला. ( भा. द्रोण० )

**क्षत्रवृद्ध**–सोमवंशीय आयुराजाच्या पांच मुलांपैकीं दुसरा. याचा पुत्र सुहोत्र. [ ९,१७,१-२ ]

**क्षपणक**–पाखण्डमतानुयायी एक पुरुष.

**क्षपाविश्वकर**–अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**क्षमावंत**–देवलऋषीच्या दोन पुत्रांतील एक. प्रत्यूष नामक वसूचा पौत्र.

## क्षा

**क्षारकर्दम**–( एक नरक ) स्वतः भ्रष्ट असून अभिमानानें जो तप, विद्या, इत्यादिकांच्या योगानें श्रेष्ठ असलेल्या लोकांचा अपमान करतो, त्याला हा नरक प्राप्त होतो. [ ५,२६,३० ].

**क्षारोदधि**-हा जबूंद्वीपाच्या सभोंवताली वलयाकार असून सप्तमहासागरांपैकीं पहिला आहे. याची रुंदी एक लक्ष योजनें असून पलीकडे प्लक्षद्वीप वेष्टून राहिलें आहे. [ ५,२०,१ ].

## क्षि

**क्षिप्रा**–विंध्याचलापासून निघणारी नदी. ही माळव्यांतून वहात जाते.

## क्षी

**क्षीर**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**क्षीरा**–भारतवर्षीय नदी.

**क्षीरावती**– ,, ,,

**क्षीरोद**–सप्तमहासागरांतील पांचवा. हा क्रौंचद्वीपासभोंवती वर्तुलाकार असून याची रुंदी सोळा लक्ष योजनें आहे. व याला वेष्टून शाकद्वीप आहे. ह्याचें देवदैत्यांनीं मंथन केलें. [ ५,२०,१८ आणि ८,६,२२ ].

## क्षु

**क्षुद्रक**-इक्ष्वाकुवंशीय प्रसेनजित् राजाचा पुत्र याचा पुत्र रणक अथवा कुलक. [ ९,१२,१४ ].

**क्षुद्रभृन**-स्वायंभुवमन्वंतरांतल्या मरीचिऋषीच्या सहा पुत्रांपैकीं एक हा कृष्णावतारीं त्याच्या सहा भावांत जन्मून कंसाचे हातून मरण पावला.

**क्षुधि**–श्रीकृष्ण व मित्रविंदा यांचा पुत्र. [ १०,६१,१६ ].

**क्षुप**–ब्रह्मदेवाच्या शिंकेपासून झालेला एक प्रजापति. ( भा. शांति. अ. १२२)

**क्षुभ्य**–भृगुकुलोत्पन्न एक ऋषि.

**क्षुरिका**–यजुर्वेदोपनिषत्

## क्षे

**क्षेत्रोपेक्ष**–श्वफल्कयादवाच्या तेरा पुत्रांपैकीं एक. अक्रूराचा भाऊ. [९,२४,१६].

**क्षेम**–स्वायंभुवमन्वंतरांतील धर्म व तितिक्षा यांचा पुत्र. [ ४,१,५२ ].

( २ ) प्रियव्रतपुत्र इध्मजिव्हाच्या सात मुलांतील पांचवा पुत्र. व त्याच्या वर्षाचें नांव. [ ५,२०,३ ].

( ३ ) प्लक्षद्वीपाच्या सात वर्षांतील पांचवा. [ ५,२०,३ ].

( ४ ) पूरुकुलांतील जरासंधाच्या वंशांतील शुचि राजाचा पुत्र. याचा पुत्र सुव्रत. [ ९,२२,४८ ].

( ५ ) क्रोधवशनामक असुरांशानें जन्मलेला दुर्योधनपक्षीय राजा. (भा.आ.)

**क्षेमक**–पाण्डवांचे कुलांतील निमिराजाचा पुत्र. हा ह्या वंशांतील शेवटचा राजा. ह्याचे नंतर मगधराजे राज्य करूं लागले. [ ९,२२,४४ ].

**क्षेमक**–भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा.

**क्षेमंकर**–पश्चिमत्रिगर्तदेशीय राजा.

**क्षेमदर्शी**-उत्तरकोसल देशाचा राजा. याचे अमात्य अतिशय वाईट असत, म्हणून हा अगदीं त्रासला असतां कालकवृक्षीय कोणी ब्राह्मणानें युक्तीनें सर्वांचें शासन करून यास सुखी केलें. विदेहवंशीय एका जनकाची कन्या याची स्त्री होती. (भा शांति.)

**क्षेमधन्वा**-इक्ष्वाकुकुलांतील कुशाच्या वंशांत जन्मलेल्या पुण्डरीक राजाचा पुत्र. याचा पुत्र देवानीक [ ९,१२,१ ].

**क्षेमधर्मा**–कलियुगांतील शिशुनागवंशीय काकवर्ण राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षेत्रज्ञ. [ १२,१,५ ].

**क्षेमाधि**–विदेहवंशीय चित्ररथ राजाचा पुत्र. याचा पुत्र समरथ. [ ९,१३,२३ ].

**क्षेमधूर्ति**–भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा. ( भा द्रोण. अ. २५ )

( २ ) भीमसेनानें मारिलेला दुर्योधन पक्षीय राजा. ( भा कर्ण. अ १३ )

**क्षेममूर्ति**-भीमानें मारलेला धृतराष्ट्राचा पुत्र.

**क्षेमवृद्धि**–शाल्वराजाचा सेनापति.

**क्षेमशर्मा**-भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय एक राजा.

**क्षेमा**–एक अप्सरा.

**क्षेम्य**–सोमवंशीय नहुषकुलांतील नीप राजाचा पुत्र. याचा पुत्र सुवीर. [ ९,२१,२९ ].

## क्षौ

**क्षौमि**–श्यामपराशर कुलोत्पन्न ऋषि.

## ख

**खग**–आकाशांत संचार करण्यामुळें सूर्याचें नामांतर.

**खगण**–इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय वज्रनाभ राजाचा पुत्र. याचा पुत्र विधृति. [ ९,१२,३ ].

**खट्वांग**–इक्ष्वाकु कुलोत्पन्न विश्वसह राजाचा पुत्र. हा देवदैत्यांच्या युद्धांत देवांना मदत करण्याकरितां स्वर्गांत गेला होता. तेथें युद्ध समाप्ती नंतर देवांनीं यास वर मागण्यास सांगितलें असतां, यानें आपलें आयुष्य किति अवशेष आहे, असें विचारिलें. दोन घटिकाच आयुष्य आहे असें समजतांच घाईनें पृथ्वीवर येऊन ईश्वरस्वरूपीं चित्त लीन केलें, व मुक्त झाला. याचा पुत्र दिविरथ. [ ९,९,४१ ते ४९ ].

( २ ) हा प्रख्यात यज्ञ करणारा होता. याच्या यज्ञांत विश्वावसुप्रभृति साठ हजार गंधर्व गायन करीत असत. या यज्ञांत सुवर्णाचे यूप ( पशु बांधण्याचे खांब ) असून, वेदघोष, धनुष्याचा टणत्कार, आणि द्या, असा त्रिविध घोष ऐकूं येत असे. ( भा. शांति. )

( ३ ) महादेवाचें एक आयुध.

**खण्ड**–महाद्वीपाच्या पोटभेदास जशी वर्ष ही संज्ञा आहे, त्याप्रमाणें वर्षाच्य पोटविभागास खण्ड म्हणतात. आपण राहतों या भरतवर्षांत, कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मावर्त, मलय, केतु, भद्रसेन, इंद्रस्पृक्, विदर्भ आणि कीकट असे नऊ खण्ड आहेत. हीं नांवें मत्स्यपुराणांत वेगळीं आहेत.

**खनपान**–सोमवंशीय अनुकुलांतील अंग राजाचा पुत्र. याचा पुत्र दिविरथ. [ ९,२३.६ ].

**खनित्र**-सूर्यवंशीय दिष्टकुलांतील प्रमति राजाचा पुत्र. याचा पुत्र चाक्षुष. [ ९,२,२४ ]

**खनिनेत्र**-सूर्यवंशीय दिष्टकुलांतील रम्भ राजाचा पुत्र [ ९,२,२५ ]. हा दुष्ट होता म्हणून यास राज्यावरून काढून त्याच्या पुत्रास-करंधमास-गादीवर बसविलें. ( भा. अश्व. अ. ४ )

**खर**-विश्रवाऋषि व राका राक्षसी यांचा पुत्र. हा रावणाचा सावत्र भाऊ होता. हा पूर्वजन्मींचा याज्ञवल्क्यपुत्र चंद्रकान्त होय. हा शूर्पणखेसह जनस्थानांत रहात असतां रामचंद्रानें याचा नाश केला. याचा पुत्र मकराक्ष. ( भा. वन अ. २७५ व वा. रा. )

( २ ) रावणपक्षीय एक राक्षस. (भा.)

( ३ ) लवणासुराचा एक भाऊ (मत्स्य.)

**खरवाक्**-विश्वामित्रकुलांतील एक ऋषि.

**खर्व**-कुबेराच्या नऊ निधींपैकीं एक.

**खल्वायन**-धूम्रपराशरकुलांतील एक ऋषि

**खश**-( स ) भारतवर्षीय भरतखंडस्थ देश व तेथील लोक. भरतानें येथील राजांचा पराभव केला. [९,२०,३०]

**खा**

**खाण्डव**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**खाण्डवप्रस्थ**-इंद्रप्रस्थाचें नांव. [ १०,७३,३२ ]

**खाण्डववन**-यमुनातीरावरील वनविशेष. हें अर्जुनानें अग्नीस भक्षणाकरितां दिलें होतें. हें वन जळत असतां तक्षकाचा पुत्र अश्वसेन, त्यांतून वांचला, मयासुर शरण येऊन वांचला व शार्ङ्गपक्षाचीं चार पिलें अग्नीनें वांचविलीं. [ १०,७१,४५ ]

**खाण्डवायन**-ब्राह्मण समुदाय विशेष. पूर्वी परशुरामानें सर्व पृथ्वी निःक्षत्रिय करून एक मोठा यज्ञ केला, त्यांत सुवर्णाची एक वेदी करून ती कश्यपाला दान दिली, ती ज्यानीं खण्डशः वांटून घेतली त्यांना हे नांव मिळालें. [ भा. वन. अ. ११७ ]

**खाण्डिक्य**-विदेहवंशीय मितध्वजाचा पुत्र. ह्याला कर्ममार्गाचें उत्तम ज्ञान होतें. ह्याला याचा चुलत भाऊ जो केशिध्वज त्याच्या भीतीनें पळून जावें लागलें. याचा पुत्र भानुमान्. [ ९,१३,२०-२१ ].

**खासीर**-भारतवर्षीय देश.

**खि**

**खिलखिली**-विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**ख्या**

**ख्याति**-कर्दमऋषींची कन्या व भृगुऋषींची पत्नी. [ ३,२४,३ ].

( २ ) चक्षुसंज्ञक दुसऱ्या मनूचा अकरावा मुलगा जो उल्मुक त्याचा पुष्करिणी स्त्रीचे ठिकाणीं झालेला पुत्र. याचा पुत्र अंग [ ४,१३,१७].

( ३ ) तामस मनूच्या पुत्रांतील एक.

**ख्यातेय**-नीलपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**ग**

**गगनमूर्द्धा** दनुपुत्र एक दानव.

**गंगा**-एक महानदी व तिची मूर्तिमान् देवता. भूलोकीं पतन पावशील असा हिला ब्रह्मदेवाचा शाप झाला होता मृत्युलोकीं पतन पावल्यावर

ही शंतनुराजाची पत्नी झाली होती. व त्याचे पासून हिला आठ पुत्र झाले. ते सर्व हिनें पूर्वसंकतानुरूप गंगेंत सोडले. परंतु आठवा पुत्र शंतनूच्या विनंतीवरून त्याच्या स्वाधीन केला, व शापकाल पूर्ण झाल्यामुळें ही गुप्त झाली. हिचा आठवा पुत्र भीष्म परम प्रतापी होता म्हणून हिला भीष्मसु, असें नांव मिळालें. याशिवाय विष्णुपदी, त्रिस्रोता, भागीरथी जान्हवी हीं नांवें आहेतच. हिचें मूळचें नांव स्वर्धुनी. स्वर्धुनीच्या सप्तप्रहांतील एक. हिचे मूळ उगमस्थान हिमालय.

**गंगाद्वार**–मेरूपर्वतावरून भरतवर्षांत प्रथम ज्यास्थळीं गंगा आली तें स्थळ हें नांव नर्मदा व गोदावरी यांच्याही आद्य स्थळास आहे.

**गंगाधर**–शंकरानें गंगा मस्तकीं धारण केल्यामुळें त्यास मिळालेलें नांव.

**गंगासागर**-गंगेचा समुद्राशीं जेथें संगम होतो, तें स्थळ. येथें बलराम तीर्थ यात्रेस आला होता. [१०,७९,११].

**गंगान्हद्**–गंगेसंबंधी तीर्थ.

**गंगोद्भेद**– ,, ,,

**गज**–( हत्ती ) अवधूतानें केलेला एक गुरू. [ ११,७ ३३ ]

( २ ) शकुनीच्या सहा भावांतील कनिष्ठ. यास अर्जुनपुत्र इरावानानें मारिलें. [ भा. भीष्म अ. ९० ]

( ३ ) गजासुर.

**गजकर्ण**–एक यक्ष व एक तीर्थ.

**गजपुर**–हस्तिनापूर.

**गजसाऽह्वय**–हस्तिनापूर [ १,४,६ ]

**गजानन**–एक शिवगण. एकदां पार्वतीनें अंगास उटणें लावून मळ काढला, व त्याचा एक पुतळा केला त्याला सहज हत्तीप्रमाणें सोंड केली होती. कांहीं वेळ नें तिनें तो पुतळा पाण्यांत टाकला, तों त्यांतून एक पुरुष निघाला. त्याला पार्वतीनें, पुत्रा, इकडे ये, अशी हांक मारिली. तेव्हां हा जवळ गेला असतां, तिनें यास रुद्रगणाचें आधिपत्य दिलें, म्हणून गणपति, हत्तीसारखें तोंड हातें म्हणून गजानन अशीं नांवें मिळालीं. [मत्स्य. अ.१५३ (गणेश श. पहा.)

**गजासुर**-तारकासुराच्या सैन्यांतील एक असुर हा कपाली नामक रुद्राच्या हातून मरण पावला. ( मत्स्य. अ. १५२ )

**गजेंद्र**–स्वायंभुवमन्वंतरांत पाण्ड्य देशाच्या इंद्रद्युम्न राजाला अगस्त्य ऋषीनें शाप दिल्यामुळे तो गज योनींत जन्मास आला होता. ह्याला त्रिकूट पर्वतावरील सरोवरांत नक्रानें धरिल्यामुळ यानें भगवंताची स्तुति केली; व हरिसंज्ञक परमात्मा तेथे येऊन चवथ्या तामस मन्वंतरांत याचा उद्धार केला. [ ८,२,३१ ]

**गणेश किंवा गणपति**-शंकराच्या गणाचा अधिपति. गणेश ही विद्येची देवता व संकट निवारण करणारी देवता म्हणून प्रसिद्ध आहे. कोणत्याही महत्कार्याच्या आरंभीं गणेशाची स्तुति व आराधना करण्याचा प्रघात आहे. व्यासांनीं सांगितलेलें भारत गणपतीनें

लिहिलें अशी समजूत आहे. अंगानें स्थूल, किंचित पिंवळ्या वर्णाचा, मोठ्या पोटाचा, चार हात, एकदन्त, हत्तीचें डोकें असलेला असें गणेशाचें वर्णन आहे. यानें चारहि हातांत अनुक्रमें शंख, चक्र, गदा, पद्म हीं आयुधें धारण केलीं असून हा कधीं कधीं मूषकवाहन करून चालला असल्याचें वर्णन आढळतें. याला हत्तीचें मस्तक कां याविषयीं अनेक कथा उपलब्ध आहेत. हा पार्वती व शंकर यांचा पुत्र असून यास गजानन, गजवदन, करीमुख, हेरम्ब, लंबोदर, द्विदेह, विघ्नेश, विघ्नहारी इत्यादि नांवें आहेत. हा युगपरत्वें दशभुज, षड्भुज, चतुर्भुज द्विभुज असल्याचाही उल्लेख आहे. ह्याचे संबंधीं गणेशपुराण, मुद्गलपुराण वगैरे स्वतंत्र ग्रंथ आहेत. हा त्रिगुणांचा स्वामी असल्यामुळें यास गुणेश असेंहि म्हणतात. हा गणेश व मागें लिहिलेला गजानन परस्परवाचकही आहेत. गणेश किंवा गणपति या नांवाचा उल्लेख श्रीमद्भागवत ग्रंथांत नाहीं.

**गण्डक**-भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा पाण्डवांच्या वेळीं पूर्वपांचालाच्या पूर्वेस होता. ( भा. सभा. अ. २९)

**गण्डकण्डु**-यक्ष विशेष.

**गण्डकी**-भारतवर्षीय नदी. जडभरत याच नदीचे तीरावर पुल्हाश्रमांत रहात असे. बलराम तीर्थयात्रेचे वेळीं येथें आला होता. [ १०,७९,११ ] ही नेपाळच्या मध्यभागीं असलेल्या पहाडाच्या खोऱ्यांतून उगम पावते. हिच्या वेगवेगळ्या उगमास सप्तगण्डकी हें नांव आहे. ही धवलगिरी व गोसेननाथ या पर्वतांतून वहाते. ह्यांतील मोठ्या प्रवाहास त्रिशूलगंगा हें नांव आहे. हे सर्व प्रवाह त्रिवेणी येथें एक होतात. हिला नेपाळांत शाळग्रामी हें नांव असून संयुक्त प्रांतांत हिला नारायणी म्हणतात. ही पाटणास गंगेला मिळते. ही १९२ मैल वहाते. हिच्या तीरावर हरिहर क्षेत्र आहे. हिच्यांत शालिग्राम सांपडतात.

**गति**-कर्दम प्रजापतींच्या नऊ कन्यांतील एक. स्वायंभु मन्वंतरांतील पुलहऋषीची पत्नी. [ ३,२४,२३ ]

**गद**-वसुदेवाला रोहिणी व देवरक्षिता या दोन स्त्रियांपासून झालेल्या दोनहि पुत्राचें नांव. ह्यापैकीं एक भारतीयुद्धांत पाण्डवांकडे होता. [ ९,२४,४६-५२ ]

**गदाग्रज**-श्रीकृष्णाचें नांव.

**गदायन**-कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गद्गद**-एक ऋक्ष. जांबवान व केसरी यांचा पिता. ( वा. रा. युद्ध. स. ३० )

**गंधमाद**-रामाच्या सेनेंतील एक वानर. [ ९,१०,१९ ].

( २ ) यदुकुलांतील श्वफल्काच्या तेरा पुत्रांपैकीं एक. [ ९,२४,१७ ].

**गंधमादन**-मेरुपर्वताच्या पश्चिमेकडील पर्वत. हा दक्षिणोत्तर असून नील व निषध या दोन पर्वतास क्रमानें स्पर्शून आहे. हा पर्वत व पश्चिमसमुद्र

यांमधील प्रदेशास भद्राश्ववर्ष म्हणतात. [ ५-१६-१० ].

( २ ) हिमालय पर्वताचें एक शिखर. पांडव वनवासांत असतां कांहीं काळ येथें रहात होते. ( भा.वन अ.१५८)

**गंधर्व**-देव विशेष. स्वर्गांतील गायक [ २,१,३६ ].

**गंधर्वतीर्थ**-भारतवर्षीय तीर्थ.

**गंधर्वाधिपति**-चाक्षुमन्वंतरांत चित्ररथ-गंधर्व अधिपति आहे.

(२) भारतीयुद्धांतील कौरवपक्षीय राजा.

**गम्भीर**-सोमवंशीय आयुकुलांतील रभस राजाचा पुत्र. याचा पुत्र आक्रिय [ ९,१७,१० ].

**गम्भीरबुद्धि**-पुढें होणाऱ्या इंद्रसावर्णि मनूच्या पुत्रांतील एक. [८,१३,३३]

**गय**-उत्तानपादवंशीय उल्मुकराजाच्या सहापुत्रांतील कनिष्ठ [ ४.१३,१७].

( २ ) उत्तानपादवंशीय हविर्धान-राजाच्या सहा पुत्रांतील दुसरा. यास सांग असें नामांतर होतें. [ ४,२४.८ ]

( ३ ) प्रियव्रतवंशीय ऋषभदेवकुलांतील नक्त व द्रुति यांचा पुत्र. हा आत्मज्ञानी असून विष्णूचा अंश होता. ह्याला गयंती नामक पत्नी व चित्ररथ, सुगति व अवरोधन असे तीन पुत्र होते. [ ५,१५,६ ].

( ४ ) सूर्यवंशीय सुद्युम्न राजाच्या तीन पुत्रांतील मध्यम हा धार्मिक असून दक्षिणदिशेकडे राजा होता. [ ९,१,४१ ].

( ५ ) सोमवंशीय विजयकुलांतील मूर्तय अथवा अमूर्तरयाचा पुत्र. यानें वानिरमालिनी नदी, आणि ब्रह्मसर, यांसमीप अनेक यज्ञ केले होते; त्या यज्ञ प्रसंगीं अन्न इतकें झालें होतें कीं, सर्वांचीं भोजनें झाल्यावर पर्वततुल्य पंचवीस राशी अवशेष राहिले होते. ( भा. वन०अ. ९५ )

( ६ ) अमूर्तरजस नांवाचा एक राजा. ( भा. द्रोण० अ. ६६ )

( ७ ) पुरविशेष (भा. शल्य. अ. ३८)

( ८ ) काम्यकवनाच्या पूर्वेकडील पर्वत.

**गयन्ती**-( गय शब्द पहा. ५,१५,६ )

( २ ) एक ऋषि.

**गयशिर**-गयेजवळचा एक पर्वत. ( गया-क्षेत्र ) यासच गयाशीर असेंहि म्हटलें आहे [ ७,१४,३० ]

**गया**-बहार प्रांतांतील फल्गू नदीच्या तीरावर असलेलें प्रसिद्ध क्षेत्र. येथें बलराम यात्रेकरितां आला होता. [ १०,७९,११ ].

**गरिष्ठ**—एक ऋषि.

**गरुड**—कश्यप व विनता ( सुपर्णा ) यांचा पुत्र व अरुणाचा भाऊ. हा मोठा पराक्रमी असून विष्णूचें वाहन आहे. [ ६,६,२२ ] यानें आपल्या मातेला कद्रूच्या दास्यांतून सर्पांस अमृत आणून देऊन मुक्त केलें. हा चाक्षुमन्वंतरांत सर्व पक्ष्यांचा अधिपति आहे, हा शाल्मलीद्वीपांत रहतो. [ ५,२०,८ ]. यानें श्रुतश्री, श्रुतसेन, विवस्वान, रोचना-मुख, प्रस्तुत आणि कालकाक्ष

इत्यादि दैत्य मारिले. याचा पुत्र सुमुख. यास तार्क्ष्य हेंहि नांव आहे ( भा.आदि. अ २७ उद्योग. भीष्म.)

**गरुडकल्प**–चालू ब्राह्ममासांतील चौदावा कल्प अथवा दिवस. याचे आरंभीं गरुडावतार झाला.

**गरुत्मान्**– ( गरुड ) [ ३,१९,११ ]

**गर्ग**-सोमवंशीय पुरुकुलांतील मन्यूचा पुत्र. याचा पुत्र शिनि. [ ९,२१,१-१९ ]

( २ ) यादवांचा आचार्य. यानें बलराम व श्रीकृष्ण यांचे नामकरण संस्कार केले. [ १०,८,१ ]

( ३) भरद्वाजांगिरसवंशांतील एक ऋषि

( ४ ) एक ऋषि. (पितृवर्ती शब्द पहा.)

**गर्गस्रोत**–भारतवर्षीय तीर्थ.

**गर्जनतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ. येथें इंद्रजितानें तप केलें (मत्स्य.अ १८९ )

**गर्दभ**-कलियुगांत आभीरराजानंतर झालेल्या दहा राजांचा वंश. [ १२,१,२९ ].

**गर्दभीविपात** गौतमकुलोत्पन्न एक ऋषि.

( २ ) भारद्वाजकुलांतील एक ऋषि.

**गर्दभीमुख**–कश्यपकुलांतील एक ऋषि.

**गर्भ**–यजुर्वेदोपनिषत्.

**गर्व**-सावर्णिमन्वंतरांतील धर्मऋषि व पुष्टि यांचा पुत्र.

**गवय**–रामसेनेंतील वानरांचा एक अधिपति.

**गवलागन**–संजयाचा पिता.

**गवाक्ष**–रामसेनेंतील एक वानराधिपति.

( २ ) शकुनीच्या सहा भावांपैकीं एक. हा रात्रियुद्धांत भीमाकडून मारला गेला ( भा द्रोण. अ. १५७ )

**गविजात** एक ब्रह्मर्षि.

**गविष्ठ**-देव विशेष. आंगिराऋषि व सुरूपा यांपासून झालेल्या दहा आंगिरस देवांपैकीं एक.

( २ ) दनुपुत्र एक दानव.

**गविष्ठिर**-अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि व कुल.

( २ ) अत्रिकुलांतील एक ऋषि.

**गवेषण**–अक्रूर यादवाचा एक पुत्र.

## गा

**गांगेय**–शंतनुराजास गंगेपासून झाल्यामुळें भीष्माचे नामांतर.

**गांगोदधि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**गाण्डीव**–अग्नीनें पण्डुपुत्र अर्जुनास दिलेलें धनुष्य [ १,७,१६ ].

**गात्रवान्**–श्रीकृष्ण व लक्ष्मणा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१५ ].

**गाथि**–अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**गाथिन** -विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**गाधि**-सोमवंशीय कुशाम्बु राजाचा पुत्र, व कान्यकुब्ज देशाचा राजा. यास सत्यवती नामक एक कन्या होती. ती ऋचिक ऋषीनें मागितली असतां, त्याचेजवळ यानें एक हजार श्यामकर्ण अश्व मागितले. ते त्यानें आणून दिल्यावर त्यास यानें आपली सत्यवती कन्या दिली. त्यानंतर ऋचीकऋषीनें चरु मंत्रून दिला असतां जो पुत्र झाला तो विश्वामित्र. ( ऋचीक शब्द पहा) [९,१५,४व९,१६,२८]

**गानबंधु**–वाराहकल्पापूर्वीच्या घोरकल्पांतील एक गायनाचार्य. त्यावेळच्या नारदानें यापासून गायनाचें शिक्षण घेतलें होतें. कांहीं कारणानें हा घुबडाच्या जन्मास गेला होता. (वा.रा.)

**गान्दिनी**-काशीराजाची कन्या व श्वफल्क यादवाची स्त्री. हिचे अक्रूरादि तेरा पुत्र होते. [ ९,२४,१५ ].

**गांधर्ववेद**-सामवेदाचा उपवेद. हा ब्रह्मदेवाच्या पश्चिम मुखापासून झाला. [ ३,१२,३८ ].

**गांधार**-सोमवंशीय द्रुह्युकुलांतील आरब्ध राजाचा पुत्र. याचा पुत्र धर्मसुत. [ ९,२३,१५ ].

( २ ) भारतवर्षीय भरतखण्डस्थ देश. ( कन्दाहार ) सिंधु नदीच्या उभयतीरावरील प्रदेश. येथील राजे शैलूष गंधर्वाचे वंशज होत. ( वा रा. उत्तर. अ. १०० ) या देशाची राजधानी तक्षशिला. शिवाय पुष्करावती म्हणूनहि एक नगरी होती.

( ३ ) गांधर देशाच्या राजांस साधारण नांव. पण शकुनीला विशेष प्रवृत्ति.

**गांधारकायण**-अगस्त्यकुलांतील एक ब्रह्मर्षि

**गांधारी**-गांधारदेशाधिपती सुबल राजाची कन्या व धृतराष्ट्राची पत्नी. ही महापतिव्रता होती. हिनें लहानपणीं रुद्राला प्रसन्न केलें असतां तुला शंभर पुत्र होतील असा त्यानें वर दिला होता. त्याप्रमाणें शंभरपुत्रांचा एकदांच हिला गर्भ राहिला. पण तो लवकर बाहेर येईना. इतक्यांत कुन्तीला युधिष्ठिर पुत्र झाल्याचें समजल्यावरून हिनें उत्कंठेनें आपला गर्भ बलात्कारानें बाहेर काढला, तों अंगुष्ठाएवढे मृतप्राय शतपुत्र बाहेर आले. इतक्यांत व्यास तेथें प्रकट होऊन त्यांनीं ते पुत्र घृतकुंभांत घालून ठेवण्यास सांगितलें. ते हे दुर्योधनादि पुत्र झाले. शिवाय हिला दुःशला या नांवाची कन्या होती. ( भा. आदि. अ. ११५-११६ ) हिनें श्रीकृष्णाला शाप दिला होता कीं, तुं पाण्डवांस सहाय्य होऊन माझ्या पुत्रांचा नाश केलास म्हणून आजपासून छत्तिसाव्या वर्षी तुझा कुलक्षय होईल. ( भा. स्त्रीपर्व. ) भारती युद्धांत दुर्योधनादि मृत झाल्यावर ही वृद्धपणीं धृतराष्ट्राबरोबर हिमालयाकडे गेली असतां, तेथें धृतराष्ट्राबरोबर हिनें अग्नींत प्रवेश केला. [ १,१३,५७ व ९,२२,२६ ]

**गायत्री**-चोवीस अक्षराचा एक छंद. याची उत्पत्ती ब्रह्मदेवाचे त्वचेपासून झाली [ ३,१२,४४ ].

( २ ) सावित्री सरस्वति या नामांतरानीं ब्रह्मदेवाची ज्ञानशक्ति.

( ३ ) उपासनार्थ असलेला मंत्र.

**गायन**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**गारुड**-अटरा महापुराणांपैकीं एक. याची श्लोकसंख्या एकोणीस हजार आहे. [ १२,१३,८ ].

( २ ) अथर्वणवेदोपानिषत्.

**गार्ग**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**गार्गी**-वचक्नु ऋषीची कन्या म्हणून हिला गार्गी वाचक्नवी हें नाव आहे. ही परमब्रह्मनिष्ठ असून परमहंसाप्रमाणें पृथ्वीवर संचार करीत असे. हिचा दैवराति जनकाच्या सभेंत याज्ञवल्क्याशीं झालेला सवाद बृहदारण्यकाच्या मधुकांडात प्रसिद्ध आहे.

**गार्ग्य**-सोमवंशीय शिनिराजाचा पुत्र. ही संतति ब्राह्मणत्व पावली होती. [ ९,२१,१९ ].

**गार्ग्य**—अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( २ ) अंगिराकुलांतील एक ऋषि. हा केकयाधिपति युधाजित् राजाचा पुरोहित होता. ( वा.रा.उत्तर.स.१०० )

**गार्दभि**—भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( २ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

**गार्हपत्य**—पवमान अग्नीचें नामांतर.

**गार्हायन**—भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गालव**—आठव्या सावर्णिमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८,१३,१५ ].

( २ ) कुन्तलराजाचा एक पुरोहित.

( ३ ) भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( ४ ) विश्वामित्राचा एक पुत्र. एकदां दुष्काळ पडला असतां विश्वामित्र आपल्या बायका पोरांना टाकून अरण्यांत गेला. तेव्हां त्याच्या स्त्रीनें ना–इलाज म्हणून एका मुलाच्या गळ्यांत दर्भाची दोरी बांधून त्यास विकावयास नेलें. मार्गांत इक्ष्वाकुकुलांतील सत्यव्रत राजानें मुलाची ही स्थिति पाहून याचें कारण विचारिलें, व सर्व हकिगत समजल्यावर विश्वामित्र परत येईपर्यंत रोज थोडें मांस देण्याचें कबूल केलें. या मुलाच्या गळ्यांत दावें बांधलें होतें म्हणून यास गालव असें नांव मिळालें. ( दे भा. स्कं. ७ अ. १० )

( ५ ) विश्वामित्राचा एक शिष्य. यानें आपल्या उत्कृष्ट सेवेनें गुरूस प्रसन्न केलें होतें, म्हणून अध्ययन समाप्त होतांच गुरूनें यास घरीं जाण्याची आज्ञा दिली. त्यावेळीं गुरुदक्षिणा म्हणून कांहीं तरी मागा असें यानें विश्वामित्रास पुनः पुनः विनविल्यावरून विश्वामित्रानें आठशें श्यामकर्ण अश्व दे, असें रागानें सांगितलें. आठशें श्यामकर्ण कसे मिळतील या विवंचनेनें व्याकूल होऊन यानें विष्णूची आराधना केली. विष्णूनें याचें इच्छित पूर्ण करण्याकरितां गरुडाला पाठविलें. गरुड तेथें येतांच यानें अश्व न मागतां पृथ्वी पाहण्याची इच्छा प्रदर्शित केली. गरुडानें याला सर्व पृथ्वी फिरवून दाखविली, पण यास अश्व कोठेंच दिसेनात, तेव्हां निराश होऊन हा देहत्याग करण्यास सिद्ध झाला. गरुडानें देहत्यागाचें कारण विचारतांच यानें सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून गरुडानें यास ययाति राजाकडे नेलें. वाटेंत ऋषभपर्वतावर शांडिली तपस्विनीचें दर्शन घेऊन उभयतां ययाति राजाकडे आले. गरुडानें ब्राह्मणाचें इच्छित ययाति राजास सांगितलें, व तो निघून गेला. परंतु यावेळीं ययाति राजा शतावधि यज्ञ करून अरण्यांत रहात असल्यानें त्याचेजवळ अश्वही नव्हते व द्रव्यही नव्हतें, म्हणून त्यानें आपली माधवी नांवाची कन्या यास दिली. व तिला कोणा राजास देऊन अश्व मिळीव असें सांगितलें. तिला घेऊन हा इक्ष्वाकुलोत्पन्न अनरण्यपुत्र हर्यश्व राजाकडे आला, त्याच्याजवळ आठशें अश्व नसून फक्त दोनशें होते. त्यानें माधवीस एक पुत्र होईपर्यंत ठेवण्याचे अटीवर दोनशें अश्व देण्याचें कबूल

केलें. तेव्हां माधवीच्या विचारानें ते अश्व घेण्याचे यानें ठरविलें. हर्यश्वापासून माधवीला वसुमना नामक पुत्र झाल्यावर हा तिला घेऊन सोमवंशीय दिवोदास राजाकडे आला. त्याचे जवळहि दोनशेंच अश्व असल्यानें, तेथेंहि एक पुत्र होईपर्यंत यानें माधवीस ठेविलें; त्यापासून माधवीस प्रतर्दन पुत्र झाला नंतर तिला घेऊन हा भोजनगरीच्या उशीनर राजाकडे आला. त्याचे जवळहि दोनशेंच अश्व होते. तेव्हां पूर्वीच्या कराराप्रमाणें एक पुत्र होईपर्यंत यानें माधवीस उशीनर राजाकडे ठेविलें. त्यापासून शिबी नामक पुत्र झाला. याप्रमाणें ६०० श्यामकर्ण यानें मिळविले, परंतु बाकी राहिलेले दोनशें श्यामकर्ण मिळतना. शेवटीं मिळविलेले अश्व व माधवीला घेऊन विश्वामित्राकडे आला. आणि सर्व हकिगत सांगून दोनशें अश्वाकरितां माधवीचा स्वीकार करा अशी प्रार्थना केली. ती विश्वामित्रानें मान्य करून माधवीस ठेवून घेतलें, व तिच्यापासून अष्टक नांवाचा पुत्र होतांच तिला गालवाच्या स्वाधीन केलें. याने तिला परत ययाति राजाकडे पोंचाविलें, व त्यास आशिर्वाद दऊन हा निघून गेला. (भा.उद्योग.)

**गालवि**—अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गालादित्**—गालवि ऋषीचें नामांतर.

**गावल्गणि अथवा गावलगाणि**—धृतराष्ट्राचा सारथि जो गवलागन अथवा गवल्गण त्याचा पुत्र जो संजय त्याचें नांव. [ १,१३,३१ ].

## गि

**गिरी**—श्वफल्क यादवाच्या तेरा पुत्रांपैकीं एक

**गिरिकर्णिका**—भारतवर्षीय नदी.

**गिरिका**—उपरिचरवसु राजाची स्त्री. हिला बृहद्रथादिक सहा पुत्र व काली अथवा मत्स्यगंधिनी कन्या झाली होती. ही कोलाहलपर्वतापासून शुक्तिमति नदीचे ठायीं झालेल्या युग्मांतील कन्या.

**गिरिव्रज**-केकयदेशाची राजधानी.(वा.रा) ( २ ) मगध देशाची राजधानी. हिची स्थापना उपरिचरवसुराजानें केली, म्हणून हिला वसुमती असेंहि म्हणतात. ( वा. रा. बा. स. ३३ ) पाण्डवांच्या वेळीं येथें जरासंध ( हल्लींचे राजगीर पाटणाच्या आग्नेयीस ४० मैलांवर ) राजा होता.

**गिरिश**—शंकराचें नांव. [ ३,१,३८ ].

## गी

**गी**—वाणीची देवता जी सरस्वती तिचें नांव.

**गीष्पति**-अग्नि व बृहस्पति.

## गु

**गुडाकेश**-अर्जुनाचें नांव. [१०,५८,२३].

**गुणकेशी**—इन्द्रसारथि मातली व त्याची स्त्री सुधर्मा यांची कन्या. हिला वर पहात असतां, कोठेंहि अनुरूप वर मिळेना. शेवटीं नागलोकांतील चिकुर नागाचा पुत्र सुमुख हा वर पसंत केला. पण त्याचें गरुडाशीं वैर असल्यानें मातलीनें सुमुखाला इन्द्राजवळ नेऊन त्यास अमृत पाजवून अमरत्व देवविलें, व विष्णूनें गरुडास सांगून

त्याचा असलेला वैरभाव टाकविला, आणि तिचा सुमुखाबरोबर विवाह केला. ( भा. उद्यो. अ. ९७–१०५ )

**गुणवती**–सिंहलद्वीपच्या चंद्रसेनाची स्त्री.

**गुप्तक**–एक राजा.

**गुरु**–अंगिरा कुलांतील एक ब्रह्मर्षि.

( २ ) बृहस्पतीचें नांव.

( ३ ) सोमवंशीय पुरुकुलांतील संकृति राजाचा पुत्र. यास गुरुधि हेंहि नांव आहे.

**गुरुण्ड**–कलियुगांत यवन राजानंतर झालेले दहा राजे. [ १२,१,३० ].

**गुरुधि**-संकृतिपुत्र गुरुच नामांतर.

**गुरुवीत्**–अंगिरा कुलोत्पन्न एक ऋषि.

**गुर्वक्ष**–बली दैत्याच्या शतपुत्रांपैकीं एक.

**गुह**–कार्तिकेयाचें नांव [ ३,१,२२ ].

( २ ) शृंगवरपुरीचा किराताधिपति व दशरथाचा मित्र. राम अरण्यांत गेला असतां ह्यानें त्याचा उत्तम सत्कार करून त्यास गंगापार केलें. (वा.रा.)

### गृ

**गृत्समद**–भीष्म शरपंजरी पडले असतां त्यांचेकडे आलेला एक ऋषि. [ १,९,७ ].

( २ ) सोमवंशीय आयुकुलांतील सुहोत्र राजाचा पुत्र. याचा पुत्र शुनक. [ ९,१७,३ ].

( ३ ) दण्डकारण्यांत राहणारा एक ऋषि. याला शंभर पुत्र होते ( वा. रा. )

( ४ ) वीतहव्य राजा भृगुवचनानें ब्राह्मणत्व पावल्यावर त्यास झालेला पुत्र. याचा पुत्र सुचेता. (वीतहव्य पहा.)

**गृध्र**–श्रीकृष्ण व मित्रविंदा यांचा एक पुत्र [ १०,६१,१६ ].

**गृध्रकूट**–भारतवर्षीय पर्वत.

**गृध्रिका**–कश्यप व ताम्रा यांची कन्या.

### गो

**गोकर्ण**–एक क्षेत्र. हें उत्तर कानडा जिल्ह्यांत आहे. येथें महाबलेश्वराचें मंदिर असून तें एक ज्योतिर्लिंगापैकीं आहे. या ठिकाणीं स्नान केलें असतां ब्रह्महत्येचेंहि पातक नाहींसें होतें. येथें बलराम तीर्थ यात्रेचे वेळीं आला होता. [ १०,७९,१९ ].

( २ ) हिमालय पर्वतावरील एक तीर्थ.

( ३ ) काशी पुरींतील एक स्थल.

( ४ ) निषध पर्वतावरील तपोवन.

( ५ ) एक पर्वत.

( ६ ) दण्डकारण्यांतील एक क्षेत्र. येथें कुम्भकर्णानें तप केलें.

**गोकामुख**–भारतवर्षीय पर्वत.[५,१९,१६]

**गोकुळ**–संयुक्तप्रांतांतील मथुरेजवळचें एक शहर. याच्याजवळून यमुना नदी वहाते. येथें नंद राजा असून बलराम व श्रीकृष्णाचें बालपण येथें गेलें, त्यामुळें हें अत्यंत पवित्र स्थान समजलें जातें. [ १०,५,१९ ]. येथें रमण, रेती व ब्रह्मांडतीर्थ हीं स्थानें पवित्र आहेत.

**गोखल्य**–शाकल्य ऋषीचा शिष्य. यानें ऋग्वेदाच्या एका शाखेचें अध्ययन केलें. [ १२,६,५७ ].

**गोणीपति**–अंगिरा कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गोतीर्थ**–नैमिषारण्यांतील व प्रयागाजवळचें तीर्थ.

**गोदावरी**–एक नदी. ही नाशिक जिल्ह्यांत त्र्यंबकेश्वराजवळ उगम पावते. ही गंगा व सिंधु यांच्या खालोखाल आहे. ही १८०० मैल वहाते रामचंद्र वनवासांत असतां बराच काळ हिच्या कांठीं राहिले होते. हिला वृद्धगंगा असें म्हणतात, व गंगा आणि गोदा एकच होत असें समजतात. [ ५,१९,१८ ].

**गोध**- भारतवर्षीय एक देश.

**गोप**–एक गंधर्व.

**गोपति**--सूर्याचें नांव. [ १,१ ,१० ].

( २ ) महादेव.

( ३ ) कश्यप स्त्री मुनीपासून झालेल्या गंधर्वांतील एक.

( ४ ) सिंहसेन राजाचा पिता एक पांचाल. हा भारती युद्धांत पाण्डवांकडे होता. ( भा. द्रोण. अ. २३ )

( ५ ) गार्यीनीं अरण्यांत रक्षिलेला शिबि पुत्र. ( भा. शांति अ. ४९ )

**गोपन**–आत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गोपराष्ट्र**–भारतवर्षीय एक देश.

**गोपालकक्ष**–आग्नेय कोसल, आणि ईशान्य कोसल या मधील देश (भा. सभा.)

**गोपालतपन**–अथर्वणवेदोपनिषत्.

**गोपालि**- गौरपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**गोपाली**–एक अप्सरा.

**गोपुच्छ**–वानरांची एक जात. [३,२९,४४]

**गोप्रतार**–सरयु नदीसंबंधीं एक तीर्थ. अयोध्येच्या पश्चिमेस. हल्लींचा गुप्तारघांट. (वा.रा. उत्तर. स.११.)

**गोभानु**-सूर्यवंशीय वन्हिराजाचा पुत्र.

**गोभिल**–कश्यप कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गोमती**–संयुक्त प्रांतांतील एक नदी. ही पांचशें मैल वहात जाऊन गाझीपूर येथें गंगेला मिळते. [ ५,१९,१८ ]

( २ ) विश्वभुक् अग्नीची स्त्री.

**गोमयान**–कश्यप कुलांतील एक ऋषि

**गोमुख**-एक वाद्य. [१, ०,१५](तुताऱ्या)

( २ ) मातलीचा पुत्र. इंद्रपुत्र जयंताचा सारथि. ( भा. उद्योग अ. १०० )

( ३ ) भारतीयुद्धांतील कौरवपक्षीय राजा.

**गोमेदगंधिक**- अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि

**गोरथ**–मगधदेशांतील गिरिव्रज राजधानीच्या जवळच्या पांच पर्वतांतील एक.

**गोलभ**–एक गंधर्व. याचें वालीशीं सतत पंधरा वर्षं युद्ध होऊन त्यांत हा मरण पावला. (वा. रा किष्किंधा. स. २२)

**गोलोक**–पृथ्वीच्या वर असलेल्या सप्तलोकांतील एक लोक.

**गोवर्धन**–यमुनातीरीं वृंदावना समीप असलेला एक पर्वत. इंद्रानें गोकुलावर अतिशय वृष्टी केली असतां श्रीकृष्णानें आपल्या करांगुलीवर सात दिवस हा पर्वत उचलून सर्वांचें रक्षण केलें. तेव्हां इंद्र खजिल होऊन त्यानें वृष्टि थांबविली. हा पर्वत धारण केल्यामुळें कृष्णास गोवर्द्धनधारी हें नांव मिळलें. [ ५,१९,१६ व १०,२५,१९ ].

**गोवासन**–भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय शैब्य राजा. ( भा. द्रो. अ. ९५ )

**गोशृंग**-निषादभूमि व पटच्चर यांच्या दक्षिणेकडील पर्वत. पांडवकाळीं येथें श्रेणिमान् राजा होता. (भा. सभा.)

**गोष्ठायन**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**गोसव**–एक यज्ञ. हा ब्रह्मदेवाच्या उत्तर-मुखापासून झाला. [ ३,१२,४० ].

**गौ**

**गौ**–सरस्वतीच्या पात्रांतील एक तीर्थ. विदूर येथें तीर्थयात्रेला आला होता. [ ३,१,२२ ]

( २ ) मानसनामक पितरांची कन्या.

( ३ ) सूर्यवंशीय तृणबिंदु राजाची कन्या व चालू मन्वंतरांतील पुलस्त्य ऋषीची पत्नी. हिचा पुत्र विश्रवा. ( भा. वन. अ. २७४ )

( ४ ) सोमवंशीय ब्रह्मदत्तराजाची स्त्री. हिला सरस्वती अथवा सन्नति नामांतर होतें.

( ५ ) शमीक ऋषीची स्त्री. हिचा पुत्र शृंगी.

( ६ ) वरुणाचा पुत्र व बलाध्यक्ष. ( वा रा उत्तर स. २३ )

**गौडिनि**–वसिष्ठ कुलांतील एक ऋषि.

**गौतम**–वैवस्वत मन्वंतरांतील सप्तर्षी पैकीं एक. याला ब्रह्ममानसकन्या अहल्या पत्नी असून शतानंद नांवाचा पुत्र होता. तो जनकाचा पुरोहित. [ ८,१३,५ व ९,२१,३४ ].

( २ ) पूषा नामक सूर्यासह माघ महिन्यांत फिरणारा ऋषि. [१२,११,३९]

( ३ ) अंगिराकुलांतील एक ऋषि.

( ४ ) अंगिराकुलांतील दुसरा एक ऋषि हा चालू मन्वंतरांतील विसाव्या पर्यायांतील व्यास असावा.

( ५ ) कौशिकऋषीचा शिष्य व रामाच्या सभेंतील एक धर्मशास्त्री (वा. रा.)

( ६ ) एकत, द्वित, त्रित यांचा पिता.

( ७ ) **गौतम**–विंध्याश्व राजाची कन्या अहल्या तिचा पति. याला शतानंद आणि चिरकारी असे दोन पुत्र होते.

( ८ ) दीर्घतमा ऋषीचा पुत्र. गोदावरीस गौतमी नांव याच्यामुळेंच पडलें असावें ( दे. भा. स्कं. ११ अ. ९ )

( ९ ) अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( १० ) कृपाचार्याचें नामांतर(भा.उद्यो)

( ११ ) एक कृतघ्न ब्राह्मण. (भा. शां.)

**गौतमी**–अश्वत्थाम्याच्या मातेचें नांव. [ १,७,४७ ].

( २ ) एक वृद्ध ब्राह्मणी. (अर्जुनक पहा)

**गौपायन**–वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गौरग्रीव**–अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गौरजिन**– ,, ,,

**गौरथ**–वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**गौरपराशर**–एक ऋषि. या कुलांत, कांडूषप, वाहनप, जैह्मप, भौमतापन आणि गोपालि हे प्रख्यात ऋषि झाले.

**गौरपृष्ठ**–एक राजर्षि.

**गौरप्रभ**–शुकाचार्य व पीवरी यांच्या पांच पुत्रापैकीं एक.

**गौरमुख**–शमीक ऋषीचा शिष्य. यानें शमीकाचे आज्ञेवरून परीक्षित राजास त्याचा मृत्यु कळविला.

**गौरवीति**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**गौरशिरा**–एक ऋषि.

**गौराश्व**– ,, ,,

**गौरी**–पूर्वी पार्वती श्यामवर्ण असल्यामुळें शंकरानें तिला काली म्हटलें, त्यावरून तिनें तप करून गौरवर्ण मिळविला त्यामुळें तिला हें नांव मिळालें. ( मत्स्य. अ. १५६ )

**गौरी**–स्वायंभू मन्वंतरांतील पश्चिमदिग्पाल वरुणाची स्त्री. (भा. उद्योग)

**गौरीकल्प**–चालू ब्राह्ममासांतील पुढें येणारा अठ्ठाविसावा दिवस. या कल्पारंभीं गौरीचा अवतार होईल.

**गौरीशंकर**–हिमालयाचें सर्वांत उंच शिखर. हें नेपाळांत आहे. याची उंची २९००२ फूट असावी असा अंदाज आहे.

**गौरीशिखर**–एक पर्वताचें शिखर. यावर स्तनकुण्ड तीर्थ आहे.

**ग्रंथिक**–अज्ञात वासाचे वेळीं सहादेवानें धारण केलेलें नांव. (विराट. अ. ३)

**ग्रसन**–तारकासुराचा सेनापति. याचे तारकामय संग्रामांत यमाशीं युद्ध होऊन शेवटीं विष्णूनें यास मारिलें. (मत्स्य. अ. १५०)

**ग्रह**–आकाशांत सूर्य, चंद्र, शुक्र, बुध, मंगळ, बृहस्पति व शनैश्चर अशीं मंडलें दोन दोन लक्ष योजनें अंतरावर आहेत. नक्षत्रें जरी ग्रहांत नाहींत तरी तींहि मण्डलेंच होत. [ ५,२२, ७ ते १७ ]. ( लिंगपु. अ. ६१ ) चालू मन्वंतरांत विवस्वान् नामक आदित्य सूर्य मंडलाधिपति असून सोमनामक वसु चंद्र मंडलाधिपति आहे. अर्थात प्रत्येक मन्वंतरांत या मण्डलांचा आधिपति भिन्न असतो. याचप्रमाणें इतरांविषयींहि जाणावें. राहु मण्डल सूर्याचे खालीं दहा हजार योजनें आहे. [५,२४,१]

**ग्रामणि**–एक गंधर्व.

**ग्रामद**–भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**ग्राम्यायनि**–भृगुकुलांतील एक ऋषि.

### घ

**घटसृंजय**–भारतवर्षीय एक देश.

**घटोत्कच**–पंडुपुत्र भीम व हिडिम्बा यांचा पुत्र. हा जन्मला त्यावेळीं याचें मस्तक घटासारखें होतें, व केश मुळींच नव्हते, म्हणून यास हें नांव ठेविलें. [ ९, २२, ३० ] ( भा. आदि. अ. १५५ ) याचे पुत्र अंजन पर्वा व मेघवर्ण. पाण्डव वनवासांत असतां गंधमादन शिखरावर जातांना दमल्यामुळें भीमानें याचें स्मरण केलें तेव्हां यानें सर्व ऋषींसह पाण्डवांस एका क्षणांत नरनारायणाश्रमीं नेलें. ( भा. वन. अ. १४५ ) वत्सला स्वयंवर प्रसंगीं सर्व कौरवांची दुर्दशा करून वत्सला व अभिमन्यु यांचा विवाह लाविला. हा भारतीयुद्धांत पाण्डवांकडे होता. याच्या रथास आठ चाकें असून त्याला शंभर अश्व असत. याचा ध्वज गृध्र पक्ष्याचा असे. याचें धनुष्य पौलस्त्य व सारथी विरूपाक्ष राक्षस. ( भा. द्रोण. अ. २३ ) हा रात्रियुद्धांत कर्णाबरोबर युद्ध करीत असतां त्याच्या वासवी शक्तीनें मरण पावला. पण मरतां मरतां आपला देह पर्वतासारखा करून तो कौरवसैन्यांत पडला, त्यामुळें पुष्कळ सैन्याचा नाश झाला. ( भा. द्रोण)

**घटोदर**–रावण पक्षीय एक पुरातन राक्षस.

**घण्टाकर्ण**–शिवगण विशेष. हा शिवनाम अथवा त्याचे गुणानुवाद, या शिवाय

कांहीं ऐकूं येऊं नये म्हणून निरंतर कानांत घण्टा बांधीत असे.

**घण्टेश**–मंगळाचा पुत्र.

**घण्टेश्वर**–भारतवर्षीय तीर्थ.

**घन**–लंकेंतील एक प्रमुख राक्षस. ( वा.रा. )

**घर्घर**––भारतवर्षीय एक नद.

घृ

**घृणि**–स्वायम्भुमन्वंतरांतील मरीचीचा पुत्र.

**घृतकुल्या**—( तुपाचे पाट ) वेदाध्ययन करणाऱ्यांना प्राप्त होते. [१२,१२,६२]

**घृतकौशिक**—विश्वामित्रकुलांतील एक ऋषि व कुल.

**घृतच्युता**—कुशद्वीपांतील महानदी. [ ५,२०,१५ ].

**घृतपृष्ठ**—प्रियव्रत राजाच्या दहा पुत्रांतील सहावा. क्षीरोदानें वेष्टित जें क्रौंचद्वीप तेथील अधिपति. यानें आपल्या द्वीपाचे सात भाग करून आम, मधुरुह, मेघपृष्ठ, सुधामा, भ्राजिष्ठ, लोहितार्ण आणि वनस्पति अशा आपल्या पुत्रांस त्यांचींच नांवें देऊन दिले [ ५,१,२५ व ५,२०,२० ]

**घृतवती**––भारतवर्षीय नदी.

**घृताची**—कश्यप स्त्री प्राधा तिच्यापासून झालेली एक अप्सरा. रौद्राश्वाची स्त्री. हिला ऋतेयु आदि दहा पुत्र झाले. [ ९, २०, २० ].

(२) पूषानामक सूर्यासह माघ महिन्यांत सूर्यमण्डळांत फिरणारी अप्सरा. [ १२, ११, ३९ ]

**घृतोद**–पृथ्वीवर जे सात महासमुद्र आहेत, त्यांतील एक. याचें कुशद्वीपाला वेष्टन असून याच्या पलीकडे क्रौंचद्वीप आहे. [ ५,२०,१३ ].

घो

**घोर**–वैवस्वत मन्वंतरांतील अंगिरा ऋषीच्या आठ पुत्रांतील एक.

( २ ) लंकेंतील राक्षस. (वा. रा.सुंदर.)

**घोरकल्प**–प्रस्तुत चालु जो ब्राह्ममास त्यांतील पंचविसावा दिवस. या कल्पाची रात्र समाप्त होण्याच्या संधींत मत्स्यावतार झाला होता. व पुढें जो दिवस निघाला तो वाराहकल्प सध्यां सुरू आहे.

**घोष**–मौर्यवंशानंतर झालेल्या शुंगघराण्यांतील पुलिंद राजाचा पुत्र. याचा पुत्र वज्रमित्र. हा सहावा राजा होता. [ १२,१,१७ ].

(२) वैवस्वत मन्वतरांतील धर्मऋषीला लम्बा नामक स्त्रीपासून झालेले पुत्र.

च

**चकोर**—आंध्र घराण्यांतील सुनंदन राजाचा पुत्र. याचा पुत्र शिवस्वाति. [ ५,१,२६ ].

**चक्र**––कुशद्वीपस्थ एक पर्वत. [५,२०,१५]

(२ भारतवर्षीय देश.

(३) लंकेंतील रावणपक्षीय राक्षस.

(४) सुदर्शन चक्र [ १०,५७,२१ ].

**चक्रक**—विश्वामित्राचा एक पुत्र.

**चक्रतीर्थ**—सरस्वती नदीच्या उगमाकडे असलेल्या तीर्थांतील एक. येथें बलराम तीर्थयात्रेच्या वेळीं आला होता. [ १०, ७८, १९ ].

**चक्रधनु**–-कपिल मुनीस नामांतर.

**चक्रधर्मा**—एक विद्याधर.

**चक्रनदी**—( गंडकी ) या नदींत शाल्ग्राम शिला सांपडत असून हिच्या कांठीं

पुलहाश्रम होता. प्रसिद्ध हरिहरक्षेत्र गंडकी तीरावरच असून भगवान पुलहाश्रमांत राहणाऱ्या भक्तांना इच्छित रूपानें दर्शन देत असतो. ऋषभपुत्र भरत तपश्चर्येला येथेंच रहात असे [ ५,७,१० ]

**चक्रपाणी**-विष्णूचें नांव [ १, १८, ४३ ]

**चक्रमाली**-रावणाच्या सचिवांतील एक.

**चक्रवाक**-भारतवर्षीय तीर्थ.

**चक्रवात**-तृणावर्त राक्षसाचें नांव.

**चक्रवान्**-भारतवर्षाच्या पश्चिमेकडील पर्वत.

**चक्रव्यूह**-सैन्यरचनेंतील एक प्रकार. भारतीयुद्धांत द्रोणाचार्यांनीं हा रचिला असून त्याचा भेद अभिमन्यूनें केला.

**चक्रातय**-भारतवर्षीय देश.

**चक्रायण**-उषस्त ऋषीचा पिता.

**चक्री**-अंगिराकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

( २ ) विष्णूचें नांव.

**चक्षु**-उत्तानपादवंशीय सर्वतेजस राजर्षिपासून आकूतीला झालेला पुत्र. हा दुसरा मनु होय. याला नड्वला स्त्री व पुरु, कुत्स, त्रित, द्युम्न, इत्यादि बारा पुत्र होते [ ४, १३, १५ ]

( २ ) भगवत्पदीच्या चार प्रवाहांतील पूर्वेकडील प्रवाह. हा केतुमालवर्षांतून समुद्रास मिळतो [ ५, १७, ५ ]

( ३ ) सामवंशीय अनुराजाच्या तीन पुत्रांपैकीं दुसरा [ ९, २३, १ ].

**चंचला**-एक नदी.

**चंचुलि**-विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**चण्ड**-अष्टभैरवांतील एक.

( २ ) विष्णूचा एक पार्षद.

( ३ ) प्रलयमेघांतील चौथा मेघ.

( ४ ) मुंडाचा ज्येष्ठभ्राता एक असुर.

( ५ ) रामसेनेंतील एक वानर.

**चण्डकौशिक**-एक ऋषि. याच्या प्रसादानें बृहद्रथ राजास जरासंध पुत्र झाला.

**चण्डबल**—रामसेनेंतील कुम्भकर्णानें मारिलेला नामांकित वानर.

**चण्डभार्गव**—च्यवन भार्गव कुलांतील एक ऋषि. हा जनमेजयाच्या सर्पसत्रांत 'होता' नामक ऋत्विज होता.

**चण्डमुण्ड**—शुंभनिशुंभांचे अनुयायी सहोदर बंधु. हे कालिकेच्या हातून मरण पावले.

**चंडिका**—योगमायेचें नांव. [१०,२,१२]

**चण्डी**—उद्दालक ऋषींची स्त्री ( उद्दालक शब्द पहा. )

**चण्डीश**-शंकराच्या गणांतील एक. यास चंडी, चंड, चंडेश्वर, चंडघंट इत्यादि नांवें आहेत. दक्षयज्ञ विध्वंसनाच्या वेळीं यानें पुषानामक ऋत्विजास बांधिलें [ ४, ५, १७ ].

**चण्डोदरी**-अशोक वनिकेंतील एक राक्षसी.

**चतुरंग**-सोमवंशीय अनुकुलांतील चित्ररथ अथवा रोमपादाचा पुत्र. हा ऋष्यशृंगानें पुत्रकामेष्टि केल्यामुळें झाला. याचा पुत्र पृथुलाक्ष. [९,२३,१०

**चतुरस्य**-एक राजर्षि.

**चतुर्मुख**-ब्रह्मदेव कमलांतून उत्पन्न झाल्यावर तो चारी दिशकडे पाहूं लागला, तोंच त्याला चार मुखें प्राप्त झाली. [ ३, ८, १६ ]

**चतुर्युग**-कृत, त्रेता, द्वापार व कलि. [ १२, ६, ४६ ]

**चतुःशृंग**–कुशद्वीपांतील एक पर्वत. [ ५,२०,१५ ]

**चन्द्र**–अत्रि व अनुसूया यांचा ब्रह्मांशानें झालेला पुत्र. सत्तावीस दक्षकन्या याच्या स्त्रिया होत्या. [ ४, १, ३३ ]

( २ ) सूर्यवंशीय ककुत्स्थकुलांतील विश्वरंधीचा पुत्र. याचा पुत्र युवनाश्व [ ९,६,२० ].

( ३ ) चतुर्दश रत्नांतील एक. याला शंकरानें मस्तकावर धारण केला.

( ४ ) सूर्यमंडलांतील पृथ्वीचा उपग्रह. हा सूर्यकिरणांच्यावर एक लक्ष योजनें असून यास सर्व नक्षत्रांतून एक फेरा होण्यास सुमारें एक महिना ( २७ दिवस १९ घटका ) व एक राशी भोगण्यास सुमारें एक दिवस लागतो. हा शुक्ल पक्षांत व कृष्ण पक्षांत वृद्धिगत व क्षीण होणाऱ्या कलांनीं देवांचीं व पितरांचीं अहोरात्रें करितो. दहा इंद्रियें, पंचमहाभूतें व मन ह्या सोळा कलांनीं हा सर्वांचा प्राणाधार असल्यानें यास सर्वमय म्हटलें आहे. [ ५,२२,८ ते १० ].

( ५ ) हा शिशुमार चक्राच्या मनाचे ठिकाणीं असतो. [ ५,२३,७ ].

( ६ ) श्रीकृष्ण व नाग्नजिती यांचा पुत्र. [ १०,६१,१३ ].

( ७ ) अवधूतानें केलेला एक गुरू. [ ११,७,३३ ].

( ८ ) सूर्यवंशीय कुशकुलांतील भानुराजाचा पुत्र. याचा पुत्र श्रुतायु.

( ९ ) दाशरथिरामाच्या सुज्ञ प्रधानाच्या पुत्रांतील एक.

**चन्द्रकान्त**—याज्ञवल्क्य ऋषीचा पुत्र. हा आपले महामेध व विजय हे बंधु व चौदाहजार शिष्य यांसह महादेवाच्या शापानें राक्षस योनीस प्राप्त झाला असतां खर, दूषण, त्रिशिरा यानांवांनीं प्रसिद्ध होता. यांतील खर राक्षस हा होय. ( वा. रा. अरण्य.)

( २ ) चंद्रकेतु राजाचें नगर. हें कारुपथ देशाच्या उत्तरेकडे होतें. ( वा. रा. उ स. १०२ ) यास धनरत्न असेंहि म्हणतात.

**चंद्रकेतु**—लक्ष्मण पुत्र चित्रकेतूचें नामांतर हा चंद्रकांत नगरांत रहात असे.

( २ ) अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा

( ३ ) हंसध्वज राजाचा बंधु.

**चंद्रगिरि**—सूर्यवंशीय तारापीड राजाचा पुत्र. याचा पुत्र भानु.

**चंद्रगुप्त**—नंदराजानंतर गादीवर आलेला मौर्यवंशीय पहिला राजा. शेवटच्या नंदाला मुरा नामक शूद्रीपासून झाला म्हणून मौर्य नांव पडलें अशी दंतकथा आहे. याला आर्यचाणक्यानें नंदांचा निःपात करून गादीवर बसविलें. यानें चोवीस वर्षें राज्य केलें. याचा पुत्र वारिसार. [१२,१,१३,].

**चंद्रचित्र**—भारतवर्षीय देश.

**चंद्रदेव**—युधिष्ठिराचा चक्ररक्षक पांचाल. यास कर्णानें मारिलें.

( २ ) अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा.

**चंद्रप्रदर्शन**-सिंहिका पुत्र.

**चंद्रप्रभ**—मेरुपर्वतावरील एक सरोवर. यांतून जंबु नदी उगम पावत्ये.

( २ ) कैलास पर्वताच्या ईशान्येकडील हिमालयाचें एक शिखर. येथें मणिभद्र यक्ष राहतो.

( ३ ) शरवणांत जाऊन स्त्रीत्व पावलेल्या इल राजाचा अश्व.

**चंद्रभागा**—पंजाबांतील चिनाब नदीचें मूळचें नांव. [ ५,१९,१८ ].

( २) पंढरपुरजवळील भीमानदीचें नांव.

( ३ ) नर्मदेसंबंधी एक तीर्थ.

**चंद्रभानु**—कृष्ण व सत्यभामा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१० ]

**चंद्रमसतीर्थ**—एक तीर्थ.

**चंद्रमा**—भारतवर्षीय एक नदी.

( २ ) दक्षिणसमुद्रतीरीं राहणारा ऋषि.

**चंद्रवती**—दहा प्रचेत्यांस मारिषेपासून झालेली कन्या. प्राचेतसदक्षाची भगिनी.

( २ ) एक नदी.

**चंद्रवर्मा**—भारतीयुद्धांतील काम्बोज देशाचा एक राजा.

**चंद्रवसा**-( शा ) कुलपर्वताजवळून वाहणाऱ्या चंद्रवसा, ताम्रपर्णी, वटोदका ह्या तीन नद्यांतील एक. पाण्डय देशचा मलयध्वज राजर्षि आपल्या पुत्रांना राज्य विभागून देऊन तप करण्याकरितां अरण्यांत आला असतां ह्या नद्यांत स्नान करून अंतर्बहि शुद्ध झाला [५, १९, १८ व ४,२८,३५]

**चंद्रवाह**—ककुत्स्थ राजास नामांतर.

**चंद्रविज्ञ**—कलियुगांतील बहुसंज्ञक राजवंशांतील विजयाचा पुत्र [१२,१,२७]

**चंद्रशुक्र**—अष्टउपद्वीपांतील एक[५,१९.३०]

**चंद्रसेन**—सिंहलद्वीपाचा राजा.

(२) भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

( ३ ) पाण्डवपक्षीय राजा. याच्या रथाचे अश्व चंद्रासारख्या वर्णाचे होते. यास रात्रियुद्धांत अश्वत्थाम्यानें मारिलें. ( भा. द्रोण. अ. १५६ )

**चंद्रहास**—केरल देशाधिपति सुधार्मिक राजाचा पुत्र. हा सुंदर व सर्वलक्षणयुक्त होता. परंतु याचें जन्म मूळ नक्षत्रावर झालें होतें आणि अलक्ष्मी सूचक अशी सहावी अंगुली याच्या वामपादास होती. या अशुभचिन्हांमुळें याचा जन्म होतांच शत्रूंनीं याच्या पित्यास मारिलें; व याची आई सती गेली. अशाप्रकारें हा अनाथ झाला असतां याच्या उपमातेनें ( दाई ) यास कौंतलकापुरींत नेलें व तेथें भिक्षा मागून तिनें याचा सांभाळ केला.कांहीं दिवसांनीं ती मृत झाली व हा भिक्षान्न सेवून राहूं लागला. एके दिवशीं हा धृष्टबुद्धिप्रधानाच्या घरीं ब्राह्मणभोजनप्रसंगीं आला. तेथें ब्राह्मणांनीं ‘ हा राजा होईल ’ असें भविष्य कथून त्याचा सांभाळ करण्याविषयीं प्रधानास सांगितलें. परंतु प्रधानास समाधान वाटण्याऐवजीं वैषम्य वाटलें आणि त्यानें मांगास द्रव्याची लालूच देऊन यास ठार मारण्यास सांगितलें. प्रधानाच्या आज्ञेप्रमाणें मांगांनीं यास अरण्यांत नेलें व आतां ठार मारणार इतक्यांत यानें केलेली देवाची प्रार्थना ऐकून त्यांना दया आली व त्यांनीं यास ठार न मारतां फक्त त्याच्या डाव्या

पायाची सहावी अंगुली कापून घेतली व ती प्रधानास दाखवून यास ठार मारल्याचें सांगितलें. इकडे हा अरण्यांत भटकत असतां कुलिंद देशाचा राजा शिकारीकरितां त्याच अरण्यांत आला होता, तो याला आपल्या नगरांत घेऊन गेला. तो निपुत्रिक असल्यामुळें त्यानें या मुलाचें नांव चंद्रहास्य ठेवून याचें मुलाप्रमाणें पालन करून यास सर्व विद्या शिकविल्या. चंद्रहास्यानें स्वपराक्रमानें .अल्पकालांतच कुलिंद देश समृद्ध व सुखी केला. कुलिंदराजा प्रतिवर्षि कौंतलक राजास करभार देत असे, त्याप्रमाणें चंद्रहास्यानें करभार देऊन आपल्या प्रतिनिधीस धष्टबुद्धि प्रधानाकडे पाठविलें असतां त्यांजकडून चंद्रहास्याचें वर्तमान प्रधानास समजलें; व आपण ज्यास मारेकऱ्याच्या स्वाधीन केलें होतें तोच हा चंद्रहास्य अशी खातरी पटतांच तो कुलिंदराजाकडे गेला. राजानें त्याचें स्वागत करून त्यास हा पुत्र आपणास कसा सांपडला वगैरे इत्थंभूत वर्तमान सांगितलें. तें ऐकतांच धृष्टबुद्धि प्रधानाची द्वेषबुद्धी तीव्र झाली, आणि त्यानें याच्या नाशाची नवीन कल्पना काढून एक पत्र तयार केलें, व त्यावर मुद्रा करून तें पत्र चंद्रहास्याच्या स्वाधीन केलें. आणि तें आपला पुत्र मदन यास तांतडीनें नेऊन देण्यास सांगितलें, व आपण तेथेंच राहिला. आज्ञेप्रमाणें चंद्रहास्य पत्र घेऊन निघाला तो कौंतलक राजाच्या नगरी बाहेरील उपवनांत येऊन पोंचला; व प्रवासाच्या श्रमानें थकल्यामुळें आपला घोडा एका वृक्षास बांधून तो तेथील शिलातलावर विश्रांतीकरितां पहुडला असतां त्यास निद्रा लागली. इतक्यांत राजकन्या चंपकमालिनी व प्रधानकन्या विषया अशा आपल्या सखीजनासह तेथें विहार करण्यास आल्या होत्या त्यापैकीं विषयेची दृष्टि या तरुण चंद्रहास्याकडे गेली व याचें सुंदर स्वरूप पाहून ती मोहीत झाली. ती याचेकडे निरखून पाहात असतां याच्या उरस्थलावर खोंचून ठेवलेलें व अर्धवट बाहेर आलेलें पत्र तिच्या दृष्टीस पडलें. त्यावर आपल्या वडिलांचीच मुद्रा असल्याचें पाहून तिनें तें हळूच उघडून वाचून पाहिलें. त्या पत्रांत– " विषमस्मै प्रदातव्यं " ( विष यास तत्काळ द्यावें ) असे शब्द पाहून तिला आश्चर्य वाटलें, आणि यांत आपल्या वडिलांचा हस्तदोष झाला आहे असें समजून तिनें एका काडीनें डोळ्यांतील काजळ घेऊन " विषयाऽस्मै प्रदातव्या " ( विषया यास तत्काळ द्यावी ) अशी सुधारणा केली व तें पत्र पूर्ववत बंद करून व जेथल्या तेथें ठेवून सखीजनासह ती निघून गेली. कांहीं वेळानें चंद्रहास्य जागा झाला व दिवस थोडा राहिला

असें पाहून लगबगीनें घोड्यावर स्वार होऊन प्रधानपुत्र मदन याजकडे गेला, व त्यास यानें तें पत्र दिलें. पत्र वाचून पहातांच त्यांत लिहिल्याप्रमाणें मदनाने ब्राह्मणांस बोलावून मोठ्या समारंभानें चंद्रहास्याबरोबर विषयेचा विवाह करून ब्राह्मणांस विपूल दक्षणा दिली. इकडे धृष्टबुद्धि प्रधानानें चंद्रहास्यास पत्र देऊन पाठविल्यानंतर कुलिंदराजास बंदिखान्यांत टाकून त्याची सर्व संपात्ति हरण केली, व मोठ्या उल्हासानें परत आपल्या राजधानीस यावयास निघाला. तोंच मार्गांत त्यास अनेक ब्राम्हण भेटले, व त्यांजकडून चंद्रहांस्याबरोबर विषयेचें लग्न मोठ्या थाटानें झाल्याचें वर्तमान समजलें. तें ऐकतांच त्याचा द्वेषाग्नि भडकला. तो त्वरेनें घरीं आला व आपल्या पुत्रास दोष देऊं लागला. मदनानें त्याचें पत्र पुढें केलें आणि आपल्या आज्ञेप्रमाणेंच आपण सर्व केलें असें म्हटलें. पत्र पहातांच प्रधान खजील झाला व प्रारब्धकर्मापुढें उपाय नाहीं असें म्हणून त्यानें बाह्यतः आनंद व्यक्त केला. परंतु त्याच्या मनाची रुखरुख मात्र शांत झाली नाहीं. मुलीस वैधव्य आलें तरी चालेल, परंतु चंद्रहास्याचा नाश झालाच पाहिजे अशी त्याच्या मनानें पुन्हा उचल घेतली, आणि त्यानें आतां एक नवीनच युक्ति योजिली. त्यानें पूर्वीच्या चांडाळास बोलावून सांगितलें, तुम्ही चंद्रहास्यास न मारतां त्यास जीवंत सोडलें व मला खोटें सांगून बक्षिस मिळविलें. बरें असो, पण आतां पुन्हां असें करूं नका. आज रात्रीं गांवाबाहेर अंबिकेचे देवालयांत तुम्ही लपून बसा, व जो कोणी पुरुष देवीच्या पूजेचें साहित्य घेऊन येईल त्यास कांहीं एक विचार न करतां ठार मारा. याप्रमाणें व्यवस्था लावल्यावर त्यानें चंद्रहास्यास सांगितलें कीं, लग्न झाल्यानंतर नवऱ्यामुलानें एकटें गांवाबाहेरील चंडिकेच्या देवालयांत जाऊन देवीची पूजा करावी, असा आमचा कुलाचार आहे. त्याप्रमाणें आज सायंकाळीं पूजासाहित्य घेऊन तुम्ही चंडिकेच्या देवालयांत जावें. श्वशुराच्या आज्ञेप्रमाणें सायंकाळ होतांच चंद्रहास्य पूजासाहित्य घेऊन चंडिकेच्या देवालयाकडे जावयास निघाला. इतक्यांत इकडे असें वर्तमान झालें कीं, त्याचवेळीं राजमंदिरांत गालव नामक राजपुरोहितानें राजास अरिष्टाध्याय वाचून दाखविला. त्याच्या श्रवणानें आपला मरणकाल सन्निध आला असें जाणून राजानें आपली कन्या चंद्रहास्यास देण्याचा व त्यास गादीवर बसवून आपण वानप्रस्थाश्रम घेण्याचा निश्चय केला. आणि लगेच प्रधानपुत्र मदनास, चंद्रहास्यास आणावयास पाठविलें. मदन लगबगीनें घरी येत आहे तों मार्गांतच चंद्रहास्य त्यास भेटला.

तेव्हां त्याचे जवळील पूजासाहित्य मदनानें मागून घेऊन–' मी चंडिकेच्या देवालयांत जातो, व तुम्ही राजमंदिरांत जा, राजा आपली मार्गप्रतीक्षा करीत आहे,'–असें त्यानें त्यास सांगितलें. तेव्हां चंद्रहास्यानें पूजासाहित्य मदनाच्या स्वाधीन केलें आणि आपण राजमंदिरांत गेला. इकडे मदन चंडिकेच्या मंदिरांत जातांच धृष्टबुद्धीच्या आज्ञेप्रमाणें मारेकऱ्यांनीं त्यास ठार केलें व आपला मार्ग धरिला. इकडे चंद्रहास्य राजवाडयांत जातांच त्याच मुहूर्तावर राजानें आपली कन्या चंपकमालिनी त्यास विधिपूर्वक अर्पण करून राज्याभिषेक केला, आणि धृष्टबुद्धि प्रधानास बोलावून आणून त्यास चंद्रहास्याच्या आज्ञेंत वागण्याची आज्ञा केली, व आपण वनांत निघून गेला. हा सर्व प्रकार पाहून धृष्टबुद्धि आश्चर्यानें थक्क झाला; व त्यानें नम्रपणें आपल्या नवीन राजास प्रणाम करून त्यास मदनाचें वर्तमान विचारलें. ' पूजासाहित्य घेऊन मदन चंडिकेच्या देवालयांत गेला व आपणास मार्गांतूनच त्यानें राजवाड्यांत पाठविलें ' इत्यादि वर्तमान चंद्रहास्याच्या मुखानें ऐकतांच धृष्टबुद्धीच्या मनास एकदम धक्का बसला. तो तसाच धांवत चंडिकेच्या मंदिरांत गेला, व आपल्या प्रियपुत्राचें शरीर विदीर्ण होऊन पडलेलें पहातांच तो शोकाकुल झाला; व त्यानें ताडकन भिंतीवर आपलें मस्तक आपटून प्राण सोडले. सकाळीं हें वर्तमान गांवभर पसरलें. तेव्हां चंद्रहास्य देवीच्या देवाल्यांत गेला व देवीची आराधना करून त्यानें त्या पितापुत्रास जिवंत करविलें. पुढें मदनास यानें प्रधानपद दिलें,व धृष्टबुद्धीस सन्मार्गास लाविलें आणि कुलिंदराजास बंधमुक्त करून मोठ्या समारंभानें राजधानीस आणून पित्याप्रमाणें त्याच्या आज्ञेंत हा राहूं लागला. यास विषयेपासून मकराक्ष व चंपकमालिनीपासून पद्माक्ष असे दोन पुत्र झाले. तेहि बापाप्रमाणेंच महापराक्रमी होते. युधिष्ठिराच्या अश्वमेधप्रसंगीं यांनीं शामकर्ण धरला होता, परंतु श्रीकृष्णाच्या आज्ञेवरून अर्जुनानें याच्याशीं सख्य केलें, आणि यानें युधिष्ठिराच्या यज्ञकार्यास सर्व प्रकारचें साह्य दिलें. [ जै. अ. ]

( २ ) रावणास रुद्रप्रसादानें मिळालेलें खड्ग.

**चंद्राद्रि**–क्षीरसमुद्रांत असणारा एक पर्वत.

**चंद्रावलोक**–इक्ष्वाकुकुलोत्पन्न सहस्राश्व राजाचा पुत्र. याचा पुत्र तारापीड.

**चंद्रांशुतापन**–एक दानव.

**चंद्राश्व**-सूर्यवंशीय कुवलाश्वपुत्र भद्राश्वाचें नामांतर.

**चंद्रिका**-भारतवर्षीय नदी.

**चमस**–ऋषभदेवाच्या नऊ पुत्रांपैकीं एक. हा महायोगी होता. यानें विदेहराजाच्या यज्ञांत जाऊन ज्ञानोपदेश केला. [ ५,४,११ व ११,५,२ ]

**चमसोद्भव**–एक तीर्थ.

**चमसोद्भेदन**–एक भारतीय तीर्थ.

**चम्प**–सूर्यवंशीय हरित राजाचा पुत्र. याचा पुत्र सुदेव. यानें चम्पानगरी बसविली. [ ९,८,१ ].

( २ ) सूर्यवंशीय अनुकुलोत्पन्न पृथुलाक्ष राजाचा चौथा पुत्र. यानें मालिनी नगरीस चम्पा नांव ठेविलें.

**चंपक**–एक गंधर्व.

**चंपकमालिनी**–कौंतलक देशाच्या राजाची कन्या व चंद्रहासाची पत्नी. हिचा पुत्र पद्माक्ष.

( २ ) रामपुत्र कुशाची कन्या.

**चम्पका**–हंसध्वज राजाची नगरी.

**चम्पा**–चम्पराजानें वसाविलेली नगरी. [ ९,८,१ ]

( २ ) चंद्रसेना असुरस्त्रीचें नामांतर.

( ३ ) मालिनी नगरीचें नांव. ही अंगदेशाची राजधानी असून पाण्डवांच्या वेळीं येथें कर्ण रहात असे. ( भा. )

**चम्पारण्य**–एक विशिष्ट प्रांत.

**चम्पिका**–रामपुत्र कुशाच्या दोन स्त्रियांपैकीं ज्येष्ठ. हिला चंपकमालिनी वगैरे नऊ कन्या होत्या.

**चरक**–वैशंपायन ऋषीचे शिष्य. यांनीं वैशंपायनाच्या ब्रह्महत्येकारितां व्रत केलें होतें. [ १२,६,६१ ]

( २ ) यजुर्वेदाच्या कांहीं प्राचीन शाखा. यांत कठ, अव्हर, ककठ, प्राच्यकठ, कपिष्ठल कठ, इत्यादि भेद येतात.

**चर्मकोट**-भारतवर्षीय तीर्थ.

**चर्मण्वती**–( चंबळा ) भारतवर्षीय नदी. ही अपरकुन्तिराष्ट्राच्या दक्षिणेस असून, रंतिदेव राजाच्या यज्ञांत जे पशु मृत झाले, त्यांच्या चर्मराशी पासून निघालेल्या रक्तापासून उत्पन्न झाली. [ ५,१९,१८ ]. (भा.शांति.)

**चर्ममण्डल**–भारतवर्षीय देश.

**चर्मवान्**-शकुनीच्या सहा कनिष्ठ बंधूंतील एक. यास भारतीयुद्धांत इरावानानें मारिलें. ( भा. भीष्म. अ. ९० )

**चर्षणी**–अर्यमा आदित्य व मातृका यांच्या मुलांना संज्ञा. चर्षणी म्हणजे विवेकी. [ ६,६,४२ ].

( २ ) वरुण नामक नवव्या आदित्याची पत्नी. हिचा पुत्र भृगु. [ ६,१८,४ ]. ' मित्रस्यचर्षणी ' असा मंत्र असल्यामुळें ही मित्रआदित्याची स्त्री वरुणाची नाहीं,असें प्रा. ऐ. कोशकार म्हणतात.

**चलकुंडल**–भृगुकुलोत्पन्न एक ऋषि.

**चलिक**– ,, ,,

## चा

**चाक्रायण**–उषस्त ऋषीचा पिता.

**चाक्षुष**–विश्वकर्म्याचा पुत्र. याच पुत्र विश्वेदेव व साध्यगण.

( २ ) चक्षु नावाच्या दुसऱ्या मनूचा पुत्र. हा सहावा मनु होता. याचे पुत्र पुरु, पुरुष सुद्युम्नादि. या मन्वंतरांत मंत्रद्रुम नांवाचा इंद्र, आप्यादि देव, हविष्मदादि ऋषि असून वैराज व संभूति यांचे पासून अजित नांवाचा अवतार झाला. ज्यानें समुद्रमंथनप्रसंगीं कूर्मरूपानें पर्वत धारण केला. [ ८,५,७ ते १० ].

( ३ ) इंद्रसावर्णिमन्वंतरांतील देव. [ ८,१३,१४ ].

( ४ ) चक्षुमनूचें मन्वंतर.

**चाक्षुष**–सूर्यवंशीय खनित्रराजाचा पुत्र. याचा पुत्र विविंशति. [ ९,२,२४ ].

**चाणक्य**—नंदवंशाचा उच्छेद करून मौर्य वंशाची स्थापना करणारा ब्राह्मण यानें चंद्रगुप्ताला अभिषेक केला. याला विष्णुगुप्त, कौटिल्य अथवा कौटल्य इ. नांवें आहेत. याचा कौटलेय अर्थशास्त्र म्हणून प्रसिद्ध ग्रंथ आहे. [ १२,१,२ ].

**चाणूर**–कंसाच्या सभेंतील एक मल्ल. यास कृष्णानें धनुर्याग प्रसंगीं मथुरेंत मारिलें [ १०,४४,२३ ].

**चातकि** —भृगुकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**चातुर्मास्य**—सविता नांवाचा पांचवा आदित्य व पृश्नि यांच्या अपत्यांतील एक. [ ६,१८,१ ]

( २ ) याग विशेष. [ ५, ७, ५ ]

( ३ ) आषाढशुद्ध शयनी एकादशीपासून कार्तिकशुद्ध प्रबोधिनी एकादशीपर्यंतचा काळ. हा फार पवित्र मानला जातो.

**चांद्रमासि**–भृगुकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**चामुंडा**–कालिकेचें नांव. ( दे. भा. )

**चाम्पेय**–विश्वामित्र ऋषीचा एक पुत्र.

**चारण**–देव विशेष. राहूच्या खालच्या प्रदेशांत हे राहतात. [ ५,२४,४ ]

**चारु**–श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा पुत्र. [ १०,६१,९ ].

**चारुगुप्त**– ,, ,, [ १०,६१,८ ].

**चारुचंद्र**– ,, ,, [ १०,६१,९ ].

**चारुचित्रांगद**–धृतराष्ट्राच्या पुत्रांपैकीं एक.

**चारुदेष्ण**–श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा पुत्र. [ १०,६१,८ ].

( २ ) मद्र देशाचा राजपुत्र. याची पत्नी मन्दोदरी.

**चारुदेह**–श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा पुत्र. [ १०,६१,८ ].

**चारुधि**–मेरुकर्णिका पर्वतापैकीं एक. यास जारुधि असेंहि नांव आहे. ( दे.भा.)

**चारुनेत्रा**–प्राधेच्या कन्यांतील एक अप्सरा.

**चारुपद**–सोमवंशीय पुरुकुलांतील नमस्युचा पुत्र. याचा पुत्र सुद्यु [ ९,२०,२ ].

**चारुमती**– श्रीकृष्ण व रुक्मिणी यांची कन्या व कृतवर्मापुत्र जो बली त्याची पत्नी. [ १०,६१,२४ ].

**चारुमत्स्य**- विश्वामित्राचा एक पुत्र.

**चारुशीर्ष** – इंद्राचा मित्र एक राजर्षि.

**चार्वाक**—एक राक्षस. ब्राह्मणांचा जोंपर्यंत अपमान होणार नाहीं, तोंपर्यंत मृत्यु नाहीं, असा याला ब्रह्मदेवाचा वर होता. धर्मराजाच्या राज्याभिषेक प्रसंगीं हा ब्राह्मणवेष घेऊन तेथें गेला व धर्मराजास म्हणाला, ‘ बंधुवध करून हें राज्य तूं मिळविलें आहेस यास्तव अन्तीं नरकाला जाशील. ’ हें ऐकून धर्मराज राज्यत्याग करावयास उद्युक्त झाला, तेव्हां ऋषीनीं याचें कपट ओळखून हा राक्षस आहे, तुला अन्तीं चांगली स्थिति प्राप्त होईल, असें धर्मास सांगितलें, व याच्यावर हुंकार सोडला. तोंच याचें भस्म झालें. ( भा. शां.अ. ३८)

( २ ) एक नास्तिक तत्वज्ञानी. अवन्ती देशांत क्षिप्रा व चामला यांच्या संगमावर शंखोद्धार क्षेत्रीं याचें जन्म झालें. याचा पिता इन्दुकान्त व

माता स्त्रिवणी. पुष्करतीर्थी यज्ञगिरी पर्वतावर हा मृत्यु पावला.

## चि

**चिकुर**–आर्यक नागाचा पुत्र व सुमुख नागाचा पिता.

**चिक्षुर**–महिषासासुराचा सेनापति. यास चिक्षुराक्ष असेंहि म्हणतात.

**चित्तहार्य**–साध्य देवांपैकीं एक.

**चिति**–अथर्वण ऋषीची स्त्री. हिचा पुत्र दध्यंच. तो अश्वमुखी होता. [ ४,१,४२ ].

**चित्र**–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांपैकीं एक. यास भीमानें मारिलें.

( २ ) पाण्डवपक्षीय राजा. यास कर्णानें मारिलें.

**चित्रक**–राजसूय यज्ञांत पाण्डवांना साह्य करणारा एक राजा.

( २ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**चित्रकूट**–प्रयागापासून दहा कोसावर बांडा जिल्ह्यांत असलेला एक पर्वत. याच्या पायथ्यापासून एका मैलावर पैशुनी नदी वहाते. रामचंद्र वनवासांत असतां येथें आला होता. येथें भरद्वाज ऋषीचा आश्रम होता. भरताहि रामचंद्रास भेटण्याकरितां येथेंच आला होता. येथें चातुर्मास्य राहिल्यावर रामचन्द्र दक्षिण दिशेकडे आले [ ५,१९,१ ]. ( वा. रा. अयो. )

( २ ) कुशद्वीपांतील एक पर्वत. [ ५,२०,१५ ].

**चित्रकूटा**–भारतवर्षीय एक नदी.

**चित्रकेतु**–स्वायंभूमन्वंतरांतील वसिष्ठऋषि

( २ ) शूरसेन देशाचा राजा. यास एक कोटी स्त्रिया होत्या, पण संतान नव्हतें. एकदां अंगिरा ऋषी याचेकडे आले असतां, राजाचे प्रार्थनेवरून. त्यांनीं यज्ञ केला व त्यांत आदित्याला हविर्भाग दिल्यावर हुतशेष ज्येष्ठ पत्नी कृतद्युतीनें भक्षण केला. त्यामुळें तिला पुत्र झाला. पण हें तिच्या सवतींस न सहन होऊन त्यांनीं मुलास विष दिलें. इतक्यांत तेथें अंगिरा व नारद ऋषी येऊन त्यांनीं बालकाला सचेतन केलें, व त्याचेकडून ‘ अनित्याचा शोक करणें योग्य नव्हे ’ असा उपदेश करविला. तें ऐकून राजानें शोक आंवरून मुलाचें उत्तरकृत्य केलें, व नारदाचा उपदेश घेऊन तपाकरितां हा यमुनातीरावर गेला. पुढें हा दुसऱ्या जन्मीं विद्याधरांचा आधिपति झाला. हा विद्याधर झाल्यावर विमानांतून फिरत असतां पार्वतीला माण्डीवर घेऊन शंकर सभेंत बसला आहे, हें पाहून हंसला, म्हणून पार्वतीनें ‘ राक्षस हो ’ असा शाप दिला. तोच पुढें वृत्रासुर झाला. [ ६,१४,१७ ].

( ३ ) दशरथपुत्र लक्ष्मणाचा एक मुलगा. [ ९,११,१२ ].

( ४ ) देवभाग व कंसा यांचा ज्येष्ठ पुत्र. [ ९,२४,४० ].

( ५ ) श्रीकृष्ण व जांबवती यांचा पुत्र.

**चित्रकेतु**–भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय पांचाल राजा. याचा पुत्र सुकेतु. द्रोणाचार्यांनें यास मारिलें. (भा.द्रोण).

**चित्रगु**–श्रीकृष्ण व सत्या यांचा पुत्र. [ १०,६१,१३ ].

**चित्रगुप्त**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( २ ) यमाचा एक प्रतिनिधि.

**चित्रचाप**–धृतराष्ट्राचा एक पुत्र. यास भीमानें मारिलें.

**चित्रधर्मा**–भारतीयुद्धांतील कौरवपक्षयि राजा.

**चित्रबाहु**–श्रीकृष्ण पुत्रांपैकीं एक. हा महारथी होता. [ १०,९०,३४ ].

( २ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**चित्रभानु**–कृष्णाचा नातु. हा महारथी होता. [ १०,९०,३३ ].

**चित्रमाल**–एक ऋषि.

**चित्ररथ**–ऋषभदेववंशांतील गय व गयंती यांचा पुत्र. याला ऊर्णेपासून सम्राट् झाला. [ ५,१५,१४ ].

( २ ) विदेह वंशीय सुपार्श्वक राजाचा पुत्र.याचा पुत्र क्षेमाधि. [९,१३,२३].

( ३ ) सोमवंशीय पाण्डव कुलांतील नेमिचक्र राजाचा पुत्र. याचा पुत्र कविरथ. [ ९,२२,४० ].

( ४ ) अनुकुलोत्पन्न धर्मरथ राजाचा पुत्र. ह्यालाच रोमपाद असें नांव असून यानें दशरथकन्या शांता दत्तक घेतली होती. हा राजा निपुत्रिक असल्यामुळें याच्या राज्यांत अनावृष्टि झाली असतां यानें ऋष्यशृंग ऋषीला मोठ्या युक्तीनें आणिलें, व त्यानें यज्ञ केल्यावर या राजाला चतुरंग नांवाचा पुत्र झाला. शांता ऋष्यशृंग ऋषीलाच दिली होती. [ ९,२३,७, ते १० ].

( ५ ) सोमवंशीय यादव कुलांतील रुशेकु राजाचा पुत्र. याचा पुत्र शशबिन्दु. [ ९,२३,३१ ].

( ६ ) सात्वतवंशीय वृष्णीचा पुत्र व अक्रूराचा चुलता. [ ९,२४,१५ ]

( ७ ) मुनीस झालेल्या सोळा गंधर्वांतील एक. हा संपूर्ण गंधर्वांचा स्वामी आहे.

( ८ ) दशरथ राजाचा सारथी. (वा.रा.)

( ९ ) मार्तिकावतदेशाचा प्राचीन राजा.

( १० ) भारती युद्धांतलि पाण्डव पक्षीय शैब्य राजा. ( भा. द्रोण. अ. २३ )

( ११ ) पाण्डवपक्षीय एक राजा. यास द्रोणाचार्यानें मारिलें. ( भा. द्रोण. )

**चित्ररथा**–भारतवर्षीय नदी.

**चित्ररूप**–रुद्रगणांतील एक.

**चित्ररेफ**-प्रियव्रताचा पुत्र मेधातिथी त्याच्या सातपुत्रांपैकीं एक. व शाकद्वीपांतर्गत याच्याच खण्डाचें नांव. [५,२०,२५]

**चित्रलेखा**–बाणासुराच्या कुंभांड नामक मंत्र्याची मुलगी. ही बाणकन्या उषेची मैत्रीण असून चित्रकलेंत प्रवीण होती. हिनें त्रैलोक्यांतलि अनेक चित्रें काढून उषेला दाखविलीं, व कृष्णपौत्र अनिरुद्धाला योगसामर्थ्यानें आणलें. [ १०, ६२, १४ ]

( २ ) केशी दैत्यास मारून पुरुरव्यानें सोडविलेली अप्सरा.

**चित्रवर्मा**–धृतराष्ट्र पुत्रांपैकीं एक.

( २ ) द्रोणाचार्यानें मारलेला पाण्डवपक्षीय राजा.

**चित्रवाहन**—मणिपुर नगरीचा राजा. अर्जुन तीर्थयात्रेस गेला असतां यानें आपली कन्या चित्रांगदा ( प्रथम पुत्र होईल तो घेण्याच्या अटीवर ) पुत्रिका-धर्मानें अर्जुनास दिली. त्यांपासून झालेला पुत्र बभ्रुवाहन. हाच याच्या राज्याचा अधिकारी झाला. चित्र-वाहनाचा मूळ पुरुष प्रभंजन. (भा.)

**चित्रवाहा**—भारतवर्षीय नदी.

**चित्रसेन**-तेराव्या देवसावर्णिमनूचा पुत्र.

( २ ) सूर्यवंशीय नरिष्यंत राजाचा पुत्र. याचा पुत्र दक्ष. [ ९, २, १९ ]

( ३ ) विश्वावसु गंधर्वाचा पुत्र. हा देवर्षि आहे.

( ४ ) अभिसारी पुरीचा राजा. हा दुर्योधन पक्षीय होता.

( ५ ) भीमसेनानें मारलेला धृतराष्ट्रपुत्र.

( ६ ) नकुलानें मारलेला कर्णपुत्र.

( ७ ) कर्णानें मारलेला पांचाल.

**चित्रसेना**-एक अप्सरा.

( २ ) भारतवर्षीय नदी.

**चित्रस्वन**-वरुण नांवाच्या सूर्याबरोबर आषाढ महिन्यांत फिरणारा राक्षस. [ १२,११,३६ ].

( २ ) एक गंधर्व.

**चित्रा**-एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक.

( २ ) एक अप्सरा.

**चित्राक्ष**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**चित्रांगद**-शंतनु राजा व सत्यवती यांचा ज्येष्ठ पुत्र. हा लहानपणींच चित्रांगद नांवाच्या गंधर्वाबरोबर युद्ध करीत असतां मृत झाला. [ ९,२२,२० ].

( २ ) एक गंधर्व.

( ३ ) सीमंतिनी नांवाच्या एका राजकन्येचा पति.

( ४ ) कलिंग दशांतील राजपूर नगरीचा राजा.

( ५ ) द्रौपदी स्वयंवराचे वेळीं आलेला एक राजा.

**चित्रांगदा**—चित्रवाहनराजाची कन्या व अर्जुनाची पत्नी. हिचा पुत्र बभ्रुवाहन.

( २ ) एक अप्सरा.

**चित्रायुध**—द्रौपदीच्या स्वयंवरास गेलेला राजा. हा भारतीययुद्धांत पांडवांकडे होता. याच्या रथाचे घोडे पळसाच्या फुलाच्या रंगासारखे असत. ( भा. द्रोण. अ. २३ )

( २ ) धृतराष्ट्राचा पुत्र. यास भीमानें मारिलें. ( भा. द्रोण. अ. १३७ )

**चित्राश्व**—शाल्वदेशाधिपति द्युमत्सेन पुत्र सत्यवानास नामांतर.

( २ ) एक राजर्षि

**चित्रोपला**—भारतवर्षीय एक नदी.

**चिदि**—सोमवंशीय विदर्भपुत्र कैशिक-राजा त्याचा पुत्र.

**चिबिलक**—आन्ध्रवंशांतील पांचव्या लंबोदर राजाचा पुत्र. याचा पुत्र मेघस्वाति. [ १२,१,२४ ].

**चिरकारी**—गौतम ऋषीच्या दोन पुत्रांतील एक.

## ची

**चीन**—हा महादेश इंद्रप्रस्थाच्या दृष्टीनें ईशान्येस असून प्राक्ज्योतिष देशाजवळ आहे. येथें प्राचीनकाळीं धौतमूलक राजा असल्याचें आढळतें. याचा रमणचीन असाही एक भेद आहे.

**चीरवासा**–दुर्योधनपक्षीय राजा.

**चीरिणी**–बदरीवनांतील एक तीर्थ. येथें वैवस्वतमनूनें दहा हजार वर्षें तप केलें. ( भा. वन. अ. १८७ )

### चु

**चुलुका**–भारतवर्षीय नदी.

### चू

**चूडाला**-शिखिध्वज राजाची स्त्री. ही स्वतः आत्मनिष्ठ असे. हिनें राज्य सोडून अरण्यांत गेलेल्या आपल्या पतीला आत्मज्ञानी करून राज्य करावयास लाविलें होतें. ( यो. वा. )

**चूलि**–एक ऋषि. हा तप करीत असतां सोमदा नामक अप्सरेनें याची उत्कृष्ट सेवा केली, व तप समाप्त झाल्यावर पुत्राची इच्छा दर्शविली. तेव्हां यानें एक मानसपुत्र उत्पन्न करून तो तिला दिला. त्याचें नांव ब्रह्मदत्त. ( वा. रा. बाल. स. ३३ )

**चूलिसूनु**–चूलि ऋषीनें उत्पन्न केलेल्या ब्रह्मदत्ताचे नामांतर.

### चे

**चेकितान**–हा यादव असून भारतीय युद्धांत पांडवांकडे होता. याच्या रथाचे अश्व पिंगट वर्णाचे असत. याचें सुशर्म्याशीं बरेच दिवस युद्ध झालें. पण अखेर द्रोणानें यास मारिलें. ( भा द्रोण. अ. २३–१२५ ) याच्या सारथ्याचें नांव पार्ष्णि.

**चेदि**–सोमवंशीय रोमपादाच्या कुलांतील उशिक राजाचा पुत्र. याचा पुत्र दमघोष. याच्या नांवावरून याच्या देशास चेदि व वंशजास चेदिप अथवा चैद्य असें नांव पडलें. [ ९,२४,२ ].

**चेदिदेश**–इंद्रप्रस्थाकडून पूर्वदशार्ण देशाच्या आग्नेयी दिशेस असणारा देश. याची राजधानी शुक्तिमती नगरी असून पाण्डवांच्या वेळेस तेथें शिशुपाल राजा होता. ( भा. सभा. अ. ३० )

**चेदिप**–कुरुवंशांतील उपरिचरवसूचा पुत्र. हा चेदि देशाचा राजा होता. [ ९,२२,६ ].

**चेदिमत्स्य**–पूर्व मत्स्य देशास संज्ञा. कारण त्याच्याजवळ चेदि देश आहे.

### चै

**चैत्य**-यालाच क्षेत्रज्ञ म्हणतात. अन्तःकरणांपासून चित्त व त्याची देवता चैत्य हीं उत्पन्न झालीं. [ ३, २६, ६१ ]

**चैत्यक**-मगध देशांतील पर्वत.

**चैत्रक**–प्रयाग क्षेत्रांतील एक तीर्थ.

**चैत्ररथ**–मेरुमंदर पर्वतावरील देवांचें उद्यान. येथें पुरूरवा उर्वशीसह क्रीडा करण्यास आला होता. [ ५,१६, १४ व ९, १४, २४ ]

( २ ) चित्ररथ राजाचा पुत्र. हा पाण्डवपक्षीय होता.

( ३ ) स्वर्गांतील इंद्राचें उद्यान.

( ४ ) हिमालयावरील कुबेराचें उद्यान.

**चैत्रसेनि**-चित्रसेन पांचालाचा पुत्र. हा भारतीययुद्धांत पांडवांकडे होता.

**चैत्रा**–ज्यामघ राजाची स्त्री. हिला शैब्या असें नामांतर आहे.

**चैत्रायण**–अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**चैद्य**-चेदिराजाचे वंशज. शिशुपालाचें नांव. [ १०, २९, १३ ]

### चो

**चोल**-भारतवर्षीय एक देश.

## चौ

**चौलि**—वसिष्ठ कुलीन एक ब्रह्मर्षि.

**च्यवन**—वारुणि भृगु व पुलोमा यांच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ. याच्या वेळीं पुलोमा गर्भिणी असतां तिला घेऊन एक राक्षस पळाला. त्यावेळीं वाटेंतच पुलोमा प्रसूत झाली. गर्भाची च्युति ( पतन ) झाली, म्हणून यास च्यवन असें नांव पडलें. याचें विलक्षण तेज पाहून राक्षस पळाला व पुलोमा यास घेऊन घरीं आली. हा मोठा तपस्वी होता. तप करीत असतां याच्या अंगावर वारुळ वाढलें होतें एकदां शर्याति राजा अरण्यांत शिकारीकरितां आला असतां, त्याच्या कन्येनें त्या वारुळां-तून दिसणाऱ्या याच्या नेत्रांस तेजस्वी पदार्थ समजून कांट्यानें वेध केला, तोंच त्यांतून रक्त आलें. हें पाहून ती घाबरली व मुकाट्यानें परत गेली. परंतु या अपराधामुळें राजाच्या सैन्यांत सर्वांचा मलावरोध झाला. त्यावेळीं चौकशी करितां सुक-न्येनें घडलेली हकीकत पित्यास सांगितली. ती ऐकून राजा ऋषी-जवळ आला व याची प्रार्थना केली, राजानें याचे इच्छेवरून यास आपली कन्या समर्पण केली. सुकन्या आपल्या सेवेनें यास संतुष्ट करीत असे. एके दिवशीं याचेकडे अश्विनीकुमार आले असतां, यानें त्यांस यज्ञांत हविर्भाग देण्याचें कबूल करून तारुण्य मागि-तलें. तेव्हां अश्विनीकुमारांनीं यास उत्कृष्ट सौंदर्ययुक्त तारुण्य दिलें. पुढें शर्याति राजाच्या यज्ञांत इंद्राच्या विरोधालाही न जुमानतां यानें अश्विनीकुमारांस हविर्भाग दिला, आणि तेव्हांपासून आश्विनीकुमार यज्ञांत कायमचे समाविष्ट झाले. [ ९,३,२ ].

( २ ) परीक्षितराजाकडे आलेला एक ऋषि.

( ३ ) सोमवंशीय पुरुकुलोत्पन्न मित्रेयु राजाचा पुत्र. याचा पुत्र सुदास. [ ९,२२,१ ].

( ४ ) सोमवंशीय सुहोत्र राजाचा पुत्र. याचा पुत्र कृती. [ ९,२२,५ ].

## छ.

**छत्रवती**—द्रोणाचार्यानें द्रुपदराजाचा परा-भव करून त्याची नगरी घेतल्यावर द्रुपदानें ही नगरी स्थापून तो हिच्यांत राहूं लागला. ( भा. आदि. अ. १३८ )

**छत्राक**—पावसाळ्यांत झाडावर किंवा जमिनीवर उगवणारें एक पांढऱ्या वर्णाचें छत्रीसारखं झाड. ( अळंबें ) [ १०,२५-१९ ].

**छन्द**—वेदाचें नांव अनुष्टुभादि वृत्तांचें नामांतर [ १२,६,६० ].

**छन्दोगेय**—अत्रिकुलोत्पन्न एक ऋषि.

**छम्बट**—( नाश ) [ ३,१८,२६ ].

## छा

**छाया**—विवस्वान मनूची पत्नी. हिला, शनै-श्वर, सावर्णि व तपती अशीं तीन अपत्यें झालीं. त्यांपैकीं सावर्णि हा मनु होणार असून शनैश्वरानें शनि-मण्डलाचें आधिपत्य मिळविलें. तप-ती संवरणराजाची स्त्री. [ ६,६,४१ ]

## ज.

**जगती**–अठ्ठेचाळीस अक्षरांचा एक छंद. हा ब्रह्मदेवाच्या अस्थिपासून उत्पन्न झाला [ ३,१२,४५ ].

**जंगारि**–विश्वामित्र कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**जंघ**–रावणपक्षीय एक राक्षस.

**जटापूर**–नगरविशेष. (वा. रा. कि.)

**जटायु**–विनता पुत्र अरुणाच्या दोन पुत्रांपैकीं एक. संपातीचा ज्येष्ठ भ्राता. रावण सीताहरण करून जात असतां यानें त्याच्याशीं युद्ध केलें, त्यांत पक्ष छेद होऊन हा मरणोन्मुख स्थितींत पडला असतां, राम लक्ष्मण तेथें आले, त्यावेळीं रावण सीतेला घेऊन दक्षिणेकडे गेला आहे, असें सांगून यानें प्राण सोडला. नंतर रामानें यास अग्निसंस्कार देऊन सीताशोधार्थ तो पुढें गेला. मरणसमयीं याचें वय साठ हजार वर्षांचें होतें. ( वा. रा. अरण्य. ) यास कर्णिकार, शतगामी, सारस, रज्युबाल, आणि मेरुण्ड असे पांच पुत्र होते.

**जटासुर**–अलंबुष राक्षसाचा पिता. पाण्डव वनवासांत असतां बदरिकाश्रमीं आले, तेव्हां हा ब्राह्मणवेषानें त्यांचेजवळ राहून आपणच आपल्या तपाची प्रशंसा करीत असे. एके दिवशीं भीम अरण्यांत गेला आहे आणि अर्जुन इंद्रलोकीं गेला आहे अशी संधी पाहून द्रौपदीसह सर्व पांडवांना घेऊन हा पळूं लागला असतां, धर्मराजानें यास पुष्कळ उपदेश केला. परंतु तो यानें ऐकला नाहीं. तेव्हां त्यानें याचेवर इतका भार दिला किं, त्यामुळें यास पुढें जातां येईना. इतक्यांत भीम तेथें आला व याच्याशीं युद्ध करून त्यांत यास मारिलें. ( भा. वन. अ. १५७ )

**जटिला**–गौतम कुलोत्पन्न कन्या. हिला सात पती होते. (भा.आदि.अ.१९५)

**जटी**–रावणानें जिंकलेल्या पाताळांतील नागांपैकीं एक. (वा. रा.युद्ध. अ.७)

**जठर**–मेरूच्या परिस्तरगिरींतील पूर्वदिशेकडील पर्वत. हा अठरा हजार लांब व दोन हजार रुंद आहे.[५,१६,२७]
( २ ) भारतवर्षीय एक देश.

**जडभरत**–प्रियव्रतवंशांतलि ऋषभ देवाचा ज्येष्ठ पुत्र. हा राज्य सोडून गंडकीनदीच्या तीरावर पुलहाश्रमीं तप करण्याकरितां गेला असतां, तेथें हरिण बालकाच्या निदिध्यासामुळें पुढील जन्मीं हरीण झाला. पुढें हरणाच्या योनींतून मुक्त झाल्यावर आंगिरस गोत्री एका ब्राह्मणाकडे याचा जन्म झाला; परंतु पूर्वपुण्यानें यास पूर्वजन्माचें स्मरण असल्यानें सर्वसंगपरित्याग करून यानें जडचर्या स्वीकारली, त्यामुळें यास जडभरत असें नांव पडलें. एकदां चोरांनीं यास बळी देण्याकरितां देवीपुढें नेलें असतां देवी क्षुब्ध होऊन तिनें त्या चोरांचाच नाश केला. कांहीं कालानें रहुगण राजाचे सेवक याला भोई म्हणून घेऊन गेले असतां तेथें यानें राजाला ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला. याच्या नांवावरूनच या

देशाला भारत असें नांव पडलें. [ ५, अ. ७ ते १३ ].

**अरुण**—अंगिराकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**जनक**–इक्ष्वाकुपुत्र जो निमि त्याला वसिष्ठाचा शाप होऊन त्याचा देहपात झाला असतां, देवांच्या सांगण्यावरून ब्राह्मणांनीं त्याचा देह मंथन केला, त्यांतून निघालेला पुरुष. याला विदेह, मिथिल, अशी नांवें असून यानें मिथिला नगरी स्थापिली. हा मोठा भगवद्भक्त होता. याचा पुत्र उदावसु. पुढें जनक हें नांव याच्या वंशांतील पुरुषांना सामन्यच झालें. [९,१३,१३ व ६,३,२० ].

**जनककूप**--भारतवर्षीय तीर्थ.

**जनदेव**--विदेहवंशीय एक जनक. याच्याकडे शंभर आचार्य होते. पण त्यांचेकडून याला आत्मज्ञान होईना. एके दिवशीं पंचशिख नांवाचा एक ऋषि याचेकडे आला, व त्यानें याचें सर्व अज्ञान नाहींसें केलें. तेव्हां जनकानें पुढील गीत गायिलें–

"अपिच भवति मैथिलेन गीतं
नगरमुपाहित मग्निनाभिवीक्ष्य ।
नखलु ममहिदह्यतेऽत्र किंचि
त्स्वयमिदमाहकिलस्मभूमिपालः" ॥

तात्पर्य, राजगृह जरी जळूं लागलें, तरी यास त्याविषयीं नित्यत्वबुद्धि व ममत्वबुद्धि उत्पन्न झाली नाहीं. ) ( भा. शांति. अ. २१८–२१९ )

**जनपादप**–विश्वामित्रकुलांतील एक ऋषि.

**जनमेजय**–सोमवंशीय ययातिपुत्र पुरूचा पुत्र. यानें चार यज्ञ केल्यावर तो वनांत गेला. याला माधवी स्त्रीपासून प्राचिन्वान् अथवा प्राचीतत् पुत्र झाला. [ ९,२०,२ ].

( २ ) सोमवंशीय अनुकुलोत्पन्न सृंजय राजाचा पुत्र. याचा पुत्र महाशील. [ ९,२३,२ ].

( ३ ) सोमवंशीय पुरुकुलांतील परीक्षित व इरावती यांच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. परीक्षित राजा सर्पदंशानें मृत झाल्यावर यानें उत्तंक ऋषीच्या प्रोत्साहनानें सर्पसत्र केलें, त्यांत कवषापुत्र तुरऋषि हा मुख्य उपाध्याय होता. चण्डभार्गव, पिंगलऋषि, जैमिनि आणि अंगिरा हे क्रमानें, होता, अध्वर्यु, उद्गाता आणि ब्रह्मा असे ऋत्विज होते. यांशिवाय कृष्णद्वैपायन व्यास, उद्दालक, प्रमत्तक, श्वेतकेतु, पिंगल, असित, इत्यादि ऋषि सभासद होते. यानें केलेल्या सर्पसत्रांत नागांचीं कुळें दग्ध झालीं तीं–

१५ वासुकीचीं, १८ तक्षकाचीं, १० ऐरावतनागाचीं, ९ कौरवनागाचीं, ३५ धृतराष्ट्रनागाचीं. याशिवाय इतरहि अनेक सर्प भस्म झाले. हें सत्र आस्तिकऋषीनें येऊन बंद करविलें. [ १,१६,२ व ९,२२,३५ ] ( भा. आदि.) कांहीं काळानें यानें आणखी एक यज्ञ केला, त्यांत वाजसनेय शाखेचा ब्रह्मा केलेला पाहून वैशंपायनानें यास शाप दिला, त्यामुळें राज्यभ्रष्ट होऊन हा अरण्यांत मरण पावला. ( मत्स्य. )

( ४ ) इंद्रोतःशौनकानें पावन केलेला प्राचीन राजा. हा पण परीक्षिताचाच पुत्र होता.

( ५ ) एक नाग.

( ६ ) सूर्यवंशीय दिष्टकुलोत्पन्न सुमतीचा पुत्र. यानें तीन दिवसांत सर्व पृथ्वी जिंकिली. ( भा. शांति. अ. १२४ )

( ७ ) भारती युद्धांतील पाण्डव पक्षीय राजा. याचे अश्व मोहरीच्या फुलाच्या रंगाचे असत. यास धृतराष्ट्रपुत्र दुर्मुखानें मारिलें. ( भा. द्रोण. )

( ८ ) भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय एक राजा.

**जनस्थान**–( नासीक ) गोदावरीच्या दक्षिण तीरीं असलेला प्रदेश. रामाच्या वेळेस येथें शूर्पणखा, खर, दूषण रहात होते. ( वा. रा. अ. स. १८ )

**जनोलोक** - भूर्लोकादि सप्तलोकांतील पांचवा लोक. येथें सनकादि योगी राहतात. [ ११,२४,१४ ].

**जन्तु**–सोमवंशीय पुरुकुलोत्पन्न सोमक राजाचा पुत्र. याला शंभर पुत्र होते. [ ९,२२,२ ].

**जन्मेश्वर**–भारतवर्षीय तीर्थ.

**जन्हु**–सोमवंशीय विजयाच्या कुलांतील होत्रकाचा पुत्र. यानें गंगेचा एक घोट करून तिला पिऊन टाकलें. याचा पुत्र पूरु. [ ९,१५,३ ] यानें गंगेला जंघेंत गुप्त करून सोडलें, म्हणून तिला जान्हवी असें नांव पडलें. ( वा. रा. बाल. स. ४३ )

( २ ) सोमवंशीय पुरुकुलांतील कुरु राजाच्या चार पुत्रांपैकीं तिसरा. [ ९, २२, ४ ]

**जमदग्नि**–वारुणि भृगुकुलोत्पन्न ऋचीक ऋषि व गाधिकन्या सत्यवती यांचा पुत्र. याला आर्चीक असेंहि म्हणतात. हा विश्वामित्राचा भाचा होय. याला प्रसेनजित् राजर्षीची कन्या रेणु अथवा रेणुका दिली होती. हा अत्यंत कोपिष्ट असे. यास वसुमदादि पुत्र असून परशुराम हा धाकटा होता. सहस्रार्जुनानें कामधेनु पळविली असतां त्याचा वध करून ती परशुरामानें परत आणिली. एकदां रेणुका नदीवर गेली असतां, तेथें चित्ररथ गंधर्वाची क्रीडा पाहात राहिल्यामुळें आश्रमांत येण्यास तिला थोडा वेळ लागला, त्यामुळें संतापून यानें परशुरामाकडून तिचा आणि मुलांनीं पित्राज्ञा पाळली नाहीं म्हणून त्यांचा वध करविला. मग परशुरामानें पित्याची प्रार्थना करून सर्वांस उठविलें. पुढें सहस्रार्जुनाच्या पुत्रांनीं परशुराम आश्रमांत नाहीं, असें पाहून जमदग्नीचा वध केला. [ ९,१५ व १६ ].

( २ ) वैवस्वत मन्वंतरांतील सप्तर्षी पैकीं एक. [ ८,१३,५ ].

( ३ ) त्वष्टा नांवाच्या सूर्यासह आश्विन महिन्यांत फिरणारा ऋषि. [ १२,११,४३ ].

**जंबुक**–एक शूद्र. दाशरथि रामाच्या वेळीं हा तप करूं लागल्यामुळें रामानें याचा वध केला. यास वा. रामायणांत शंबूक म्हटलें आहे. ( भा. )

**जम्बुप्रस्थ**–केकयदेशांतून अयोध्येस येत असतां वाटेंत भरताला लागलेला गांव.

**जम्बुमार्ग**-भारतवर्षीय देश.

**जम्बुमाली**-रावणमंत्री प्रहस्ताचा पुत्र. यास अशोक वनिकाविध्वंसनाचे वेळीं मारुतीनें मारिलें. ( वा. रा. सुं.)

( २ ) एक राक्षस. यासहि मारुतीनें मारिलें.

**जम्बू**-प्रियव्रतराजा सर्व पृथ्वीवर प्रकाश असावा अशा इच्छेनें रथांत बसून जात असतां त्याच्या रथानें जे पृथ्वीचे सात भाग झाले, त्यांतील एक. यांत मध्यभागीं मेरू आहे. हा एकलक्ष योजनें विस्तृत असून क्षार-समुद्रानें वेष्टित आहे. याचे प्रियव्रत पुत्र आग्नीध्रानें नऊ भाग करून ते आपल्या नऊ पुत्रांस दिले. त्यांचीं नांवें. अजनाभ, किंपुरुष, हरि, भद्राश्व, रम्यक, हिरण्मय, कुरु, केतुमाल, आणि सर्वांच्या मध्यभागीं असलेला इलावृत. [ ५,१,३२ ].

**जम्बूनदी**-मेरूच्या दक्षिणेकडे असलेल्या मेरु मंदरपर्वतावर असलेल्या जांभूळ वृक्षाच्या हत्तीएवढाल्या फळांच्या रसापासून उगम पावून दक्षिण-कडील इलावृत खण्डांतून वहाते. [ ५,१६,१९ ].

( २ ) मेरूच्या पार्श्वभागीं असणाऱ्या चंद्रप्रभ सरोवरांतून निघणारी नदी.

( ३ ) स्वर्धुनीच्या सप्तप्रवाहांतील एक.

**जम्भ**-बलीचा मित्र. इंद्राच्या वज्रानें बली विव्हल झाल्यावर हा सिंहावर बसून इंद्राशीं युद्ध करूं लागला असतां इंद्रानें याचा शिरच्छेद केला. [ ८,११,१३ ].

( २ ) तारकासुराचा अनुयायी एक असुर. यास विष्णूनें मारिलें. याची कन्या कयाधु. [ ६,१८,१२ ]

( ३ ) रावणपक्षीय राक्षस. याचा पुत्र सुंद. सुंदाची पत्नी ताटका.

( ४ ) रामसेनेंतील एक वानर.

**जम्भक**--इंद्रानें मारलेला दैत्य.

**जय**--( जयविजय शब्द पहा. )

( २ ) ध्रुवपुत्र वत्सर व स्वर्वीथि यांच्या सहा पुत्रांपैकीं कनिष्ठ.

( ३ ) ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८,१३,२२ ].

( ४ ) विदेहवंशीय श्रुतनामक जनक-राजाचा पुत्र. याचा पुत्र विजय. [ ९,१३,२५ ].

( ५ ) सोमवंशीय पुरूरवा व उर्वशी यांच्या सहा पुत्रांतील कनिष्ठ याचा पुत्र आमित [ ९,१५,१ ].

( ६ ) विश्वामित्राचा पुत्र. [९,१६,३६]

( ७ ) सोमवंशीय संजयराजाचा पुत्र. याचा पुत्र कृत. [ ९,१७,१६ ]

( ८ ) आयुकुलांतील संकृतीचा पुत्र. याचा पुत्र क्षत्रधर्मा .[ ९,१७,१८].

( ९ ) सोमवंशीय दुष्यन्तकुलांतील मन्यूच्या पांच पुत्रांतील दुसरा पुत्र. [ ९,२१,१ ].

( १० ) युयुधान अथवा सात्यकी याद-वाचा पुत्र. [ ९,२४,१४ ].

( ११ ) यादव कुलांतील कंक व कर्णिका यांच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. [ ९,२४,४४]

( १२ ) श्रीकृष्ण व भद्रा यांचा पुत्र.. [ १०,६१, ७ ].

**जय**–शुक्राचार्यास पीवरीपासून झालेल्या पांच पुत्रांतील कनिष्ठ.

( १४ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र. यास भीमानें मारिलें.

( १५ ) कर्णानें मारलेला पाण्डवपक्षीय राजा.

**जयत्सेन**–भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय एक राजा.

( २ ) अभिमन्यूनें मारलेला दुर्योधनपक्षीय मागध.

( ३ ) दुर्योधनपक्षीय एक राजा.

**जयद्रथ**–सोमवंशीय आयुकुलांतील बृहत्काय राजाचा पुत्र. याचा पुत्र विशद. [ ९,२१,२२ ].

( २ ) अनुवंशीय बृहन्मना राजाचा पुत्र [ ९,२३,११ ]. यास संभूति स्त्री असून विजय पुत्र होता.

( ३ ) सिंधुदेशाचा राजा. वृद्धक्षत्र राजाचा पुत्र व धृतराष्ट्रकन्या दुःशलेचा पति. हा दुर्योधनपक्षीय होता. पाण्डव वनवासांत असतां हा द्रौपदीला घेऊन पळूं लागला इतक्यांत पांडवांनीं याचा पराजय करून याचा साह्यकारी जो कोटिकं त्यास ठार मारिलें. त्या अपमानामुळें गंगाद्वारीं जाऊन यानें रुद्राला प्रसन्न केलें. त्यानीं अर्जुनावांचून इतर पाण्डवांचा तूं पराभव करशील असा यास वर दिला. भारती युद्धांत यानें अर्जुन नसतांना पाण्डवांचा पराभव केला, व अभिमन्यूला चक्रव्यूहांत मारिलें, म्हणून अर्जुनानें प्रतिज्ञा करून कृष्णसहाय्यानें याचा वध केला. ( भारत )

**जयध्वज**–सहस्रार्जुनाच्या अवशिष्ट पांच पुत्रांपैकीं एक. याचा पुत्र तालजंघ. [ ९. २३, २७ ]

**जयन्त**–एक यादव. [ १, १४, २८ ]

( २ ) धर्मऋषि व मरुत्वती यांचा पुत्र. हा भगवंताचा अंश असून यास उपेंद्र असें म्हणतात [ ६, ६, ८ ]

(४) विष्णूचा एक पार्षद. [८,२१,१७]

( ५ ) त्रेतायुगांतील परमेश्वराचें नांव. [ ११, ५, २६ ]

( ३ ) इंद्रनामक अकरावा आदित्य व पौलोमी यांचा पुत्र. [ ६, १८, ७ ]

( ६ ) एक रुद्र.

( ७ ) एक रुद्रगण.

( ८ ) दशरथाच्या अष्टप्रधानांपैकीं एक.

(९) भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा.

**जयन्ती**–स्वायंभूमन्वंतरांतील स्वर्गाधिपति यज्ञ नामक इंद्राची कन्या व ऋषभदेवाची पत्नी. हिला भरतादि शंभर पुत्र झाले. [ ५,४,८ ]

( २ ) चाक्षूमन्वंतरांतील स्वर्गाधिपति पुरंदरनामक जो इन्द्र त्याची कन्या व वारुणिभृगूच्या पुत्रांपैकीं शुक्राची स्त्री. देवयानीची माता ( मत्स्य. )

( ३ ) भारतवर्षीय नदी.

**जयरात**–कलिंगदेशीय भानुमन्त राजाचा भाऊ. यास रात्रियुद्धांत भीमानें मारिलें. ( भा. द्रोण. अ १५५ )

**जयविजय**–विष्णूचे दोन द्वारपाल. हे सनकादिकांच्या शापानें असुर योनीस गेले होते [ ३,१६,३२ ]

**जयसेन**–सोमवंशीय क्षत्रवृद्धकुलांतील अहीन राजाचा पुत्र. याचा पुत्र संकृति. [ ९,१७,१७

**जयसेन**–जरासंध कुलांतील सार्वभौम नांवाच्या राजाचा पुत्र. याचा पुत्र राधिक. [ ९,२२,१० ]

( ३ ) अवंत्यराजा. राजाधिदेवीचा पति व विंदानुविंदाचा पिता. याची कन्या मित्रविंदा. तिला श्रीकृष्णानें वरलें होतें

**जया**––कृशाश्वप्रजापतीची कन्या.

**जयानीक**––द्रुपदपुत्र एक पांचाल. यास अश्वत्थाम्यानें मारिलें.

**जयाश्व**––जयानीकाचा भाऊ. यासहि अश्वत्थाम्याने मारिलें.

**जरत्कारु**—भृगुकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. हा महातपस्वी व ब्रह्मचारी होता. एकदां यानें आपल्या पितरांना गर्तेत लोंबतांना पाहून त्यांस असे होण्याचें कारण विचारलें. ' आमच्या वंशांत पुढें संतति होणार नाहीं, ह्मणून ही स्थिति आह्मांस प्राप्त झाली आहे ' असें ऐकून हा ह्मणाला, जर माझ्याच नांवाची कन्या मला भिक्षेंत मिळेल, तर मीं तिच्याशीं विवाह करीन. पुढें कश्यपपुत्र वासुकीनें आपली भगिनी जरत्कारु यास भिक्षेंत घातली. तिला पुत्र झाला तो आस्तिक.

( २ ) वासुकीची भगिनी, जरत्कारु ऋषीची पत्नी व आस्तिकाची माता.

**जरद्गौरी**-आस्तिकमाता जरत्कारुचें नामांतर

**जरा**–वसुदेव व रथराजि स्त्री यांचा पुत्र. हा दुराचरणानें व्याध झाला. याचाच बाण लागून श्रीकृष्ण निजधामास गेले. [ ११,३०,३३ ]. ( भा. )

( २ ) एक राक्षसी. हिनें जरासंधाची दोन शकलें सांधलीं. [ ९,२२,८ ]

**जरासन्ध**–सोमवंशीय पुरुकुलांतील बृहद्रथराजाच्या एका स्त्रीचा पुत्र. हा झाला तेव्हां याचीं दोन शकलें होतीं, तीं याच्या आईनें बाहेर टाकिलीं, इतक्यांत जरा राक्षसीनें तीं सांधून ' जग, जग ' असें म्हणतांच तीं जुळलीं, हा मोठा पराक्रमी होता. याच्या अस्ति व प्राप्ति अशा दोन कन्या कंसाला दिल्या होत्या. हा मगध देशाचा राजा असून राजधानी गिरिव्रज असे. [ ९,२२,८ व १०,५०,१ ]. श्रीकृष्णानें कंसाला मारल्यामुळें यानें मथुरेवर सत्रा वेळां स्वाऱ्या केल्या, पण तितके वेळां कृष्णानें याचा पराभव केला. हंस व डिंभक यांचे भाऊ असून शिशुपाल याचा सेनापति होता. यानें शेंकडों राजांना जिंकून आपल्या बंदींत ठेविलें होतें, व शंभर वर्षानंतर त्यांस हा यज्ञांत बली देणार होता. ८६ वर्षें बंदींत काढल्यावर त्या राजांनीं आपला एक दूत श्रीकृष्णाकडे पाठविला. [ १०,७०,३१ ] ( भा. सभा. अ. २० ) तेव्हां श्रीकृष्ण, भीम व अर्जुन यांना बरोबर घेऊन अतिथिवेषानें जरासंधाकडे आला, व भीमाचें आणि याचें सत्तावीस दिवस द्वंद्वयुद्ध झालें, पण कोणी हार जाईना. शेवटीं श्रीकृष्णाच्या सूचनेप्रमाणें भीमानें याचा देह मधोमध फाडून विरुद्ध दिशेस फेंकताच हा मृत झाला. [ १०,७२,४५ ]. याचा पुत्र सहदेव.

( २ ) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**जलसंध**-भारतीयुद्धांत सात्यकीनें मारलेला दुर्योधनपक्षीय राजा.

**जर्तिक**- वाहिकदेशीय एक प्रदेश.

**जलद**-अत्रिकुलांतील एक ऋषि.

**जलंधर**-कश्यपवंशीय एक ऋषि.

**जलसंध**-अंगिरावंशीय एक ऋषि.

( २ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( ३ ) सात्यकीनें मारिलेला दुर्योधन-पक्षीय राजा.

**जलेयु**-सोमवंशीय पुरुकुलांतील रौद्राश्व व घृताची अप्सरा यांचा पुत्र. [ ९,२०,४ ]

**जलोद्भव** - पाण्डव हिमालयावर असतांना त्यांचेबरोबर असलेला एक राजा.

**जल्म**—तामसमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

**जव**—विराध राक्षसाचा पिता.

**जवि**—भृगुकुलीन एक ब्रह्मर्षि.

**जह्नु**—सोमवंशीय पुरुकुलांतील पुण्यवान राजाचा पुत्र. [ ९, २२, ७ ]

**जा**

**जागुड**—भारतवर्षीय देश.

**जांगल**—कुरुदेशाजवळील पश्चिमेकडील देश. यास कुरुजांगल असेंहि म्हणतात. [ १,१०,३४ ]

**जाजलि**—एक ऋषि. यास पश्चिम समुद्रतीरावर मुक्ति मिळाली. [४,३१,२]

( २ ) वेदशीर्ष ऋषीचा एक शिष्य. यानें अथर्व वेदाचें अध्ययन केलें. [ १२,७,२ ]

**जाटासुरि**—जटासुरपुत्र अलम्बुषाचें नांव.

**जातवेदस्**—शमीवृक्षापासून निघालेला अग्नि. उर्वशीविरहानें व्याकुळ झालेल्या पुरूरवानें गंधर्वांची आराधना केली असतां त्यांनीं संतुष्ट होऊन त्यास एक थाळी दिली, ती अरण्यांत टाकून तो घरीं आला. तेव्हां त्रेतायुग होतें. त्याला तीन वेद स्फुरले. त्यावेळीं हा पुन्हां अरण्यांत गेला. जेथें थाळी टाकिली होती, तेथें शमी वृक्षांतून पिंपळ निघालेला त्यानें पाहिला. त्याच्या दोन अरण्या काढून मंथन केलें, तों त्यांतून अग्नि निघाला. तो तीन प्रकारचा होता. त्यांस यानें आपले पुत्र मानले, आणि त्या अग्नीनें यज्ञ केला. [ ९, १४, ४६ ] कुशद्वीपांतील लोकांची उपास्यदेवता [ ५,२०,१६ ]

**जातिस्मर**- भारतवर्षीय तीर्थ.

**जातुकर्ण**—चालुमन्वंतरांतील सत्ताविसावा व्यास ( व्यास शब्द पहा )

**जातूकर्ण्य**—अग्निवेश्याचें नाव. [ ९,२,२१ ]

( २ ) शाकल्यमुनीचा शिष्य. यानें शाकलसंहितेचें अध्ययन केलें. [ १२, ६, ५८ ]

**जानकी**-सीतेचें नामांतर.

( २ ) दुर्योधनपक्षीय एक राजा.

**जानपदी**- एक अप्सरा.

**जान्हवी**—जन्हुराजामुळें भागिरथीस प्राप्त झालेलें नांव. [ ५,१७,१ ].

**जाबाल**—भृगुकुलीन एक ऋषि.

( २ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

( ३ ) यजुर्वेद व अथर्ववेद यांचीं दोन उपनिषदें.

**जाबालदर्शन**—सामवेदोपनिषत्.

**जाबालि**—जाबालाचे वंशज.

( २ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

**जाबालि**—दशरथाचा एक मंत्री.

(४) दाशरथिरामाच्या सभेंतील एक धर्मशास्त्री.

**जामदग्न्य**—जमदग्नीचे पुत्र. परशुरामास विशेष नांव.

**जांमि**—दक्षकन्या व धर्मपत्नी. हिचा पुत्र स्वर्ग. [ ६,६,४ ].

**जाम्बवती**—जांबवानावाची कन्या व कृष्ण-पत्नी. हिला सांब वगैरे दहा पुत्र होते. [१०,५६,३२ व १०,६१,१२]

**जाम्बवान्**—ब्रह्मदेवाच्या जांभयी पासून झालेला वानर. हा मोठा पराक्रमी होता. रामचंद्राला यानें सहाय्य केलें होतें. स्यमन्तकमण्याचे निमित्ताने श्रीकृष्णाचें याच्याशीं अठ्ठावीस दिवस युद्ध झाल्यावर हा पूर्वीचा राम अवतार आहे, असें ओळखून यानें कृष्णाची स्तुति केली व स्यमंतक मण्यासह आपली कन्या जाम्बवती अर्पण केली. [ १०,५६,३२ ].

**जाम्बूनद**—जम्बुनदीमध्यें उत्पन्न होणारें सुवर्ण. [ ५,१६,२० ].

**जायंत-जायंतेय**—ऋषभदेव व जयंती यांच्यापासून झालेले शंभर पुत्र.

**जायद्रथ**—जयद्रथपुत्र सुरथ.

**जारासंधि**—जरासंध पुत्र सहदेव.

**जारुधि**—मेरुकार्णिका पर्वतांतील एक. [ ५,१६,२५ ]. यासच चारुधि असें नांव आहे.

**जालंधर**—एक क्षेत्र व पर्वत.

**जाळधि**—भृगुकुलीन एक ऋषि.

## जि

**जितव्रत**—उत्तानपाद वंशीय हविर्धान व हविर्धानी यांच्या सहा पुत्रांतील कनिष्ट. [ ४,२४,८ ].

**जितश्रम**—रामचंद्राच्या सेनेंतील मुख्य-प्रधानाचा मुलगा. हा कुशाच्या हातून अश्वमेधप्रसंगीं मरण पावला.

**जित्वा**—एक ऋषि. शिलीन ऋषीचा पुत्र.

**जिन**— ,, ,,

(२) बौद्धमतानुसारी पुरुष.

**जिम्हक**—भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**जिष्णु**—विष्णु, इंद्र आणि अर्जुन यांस नांव. [ १०, ५५, ५ ]

## जी

**जीमूत**—सोमवंशीय विदर्भ कुलांतील व्योम राजाचा पुत्र. याचा पुत्र विकृति अथवा विमल. [ ९, २४, ४ ].

(२) विराटाचे घरीं भीमसेनानें मारलेला मल्ल. ( भा. विराट. अ. १३ )

**जीवंति**-भृगुवंशांतील एक ऋषि.

**जीवल**-अयोध्याधिपति ऋतुपर्ण राजाचा अश्वपाल.

**जृम्भणास्त्र**—एक अस्त्र. हे बाणासुरयुद्धांत श्रीकृष्णानें शंकराच्या सैन्यावर सोडले. [ १०, ६३, १४ ]

## जै

**जैगीषव्य**—एक ऋषि. याला शिकविण्या-करितां ब्रह्मदत्तपुत्र विष्वक्सेनानें योग-शास्त्रावर ग्रंथ रचला. [९,२१,२६]

(२) एक ऋषि. याची स्त्री पर्णा ( मत्स्य. अ. १७९ ) याचा शिष्य देवल ऋषि. (भा. शल्य. अ ५० )

**जैत्यद्रोणी**-अंगिरावंशांतील एक ऋषि.

**जैत्र**-कृष्णाचा एक सेवक.

**जैमिनि**-युधिष्ठिराच्या यज्ञांतील ऋत्विज. [ १०,७४,८ ] जनमेयाच्या सर्पसत्रांत हा उद्गाता होता.

( २ ) व्यासांचा सामवेदाचा शिष्य. यानें पूर्वमीमांसा शास्त्र व अश्वमेधपर्व लिहिलें. [ १२,६ ५३ ].

**जैह्मप**-गौरपराशर कुलांतील एक ऋषि.

**जैह्वल यनि**-अंगिराकुलांतील एक ऋषि.

**ज्ञ.**

**ज्ञ**-सोमपुत्र बुधाचें नांव.

**ज्ञाति**-सोमवंशीय अनुकुलांतील एक राजा.

**ज्ञानपावन**-भारतवर्षीय तीर्थ.

**ज्ञानयोग**-श्रीकृष्णानें उद्धवाला केलेला उपदेश. [ ११,२०,७ ].

**ज्ञानसंज्ञय** कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**ज्यामघ**--सोमवंशीय यदुपुत्र क्रोष्टा त्याच्या वंशांतील रुचक राजाच्या पांच पुत्रांतील कनिष्ठ. यास शैब्या अ. चैत्रा नांवाची स्त्री होती. याला संतति नव्हती, पण स्त्रीच्या भीतीनें यास दुसरें लग्न करतां येईना. एकदां यानें शत्रूकडून भोज्या नांवाची कन्या हिरावून आणिली. तिला रथांत पाहून शैब्या रागानें म्हणाली,-ही कोण आणली आहे ?-तेव्हां हा घाबरून म्हणाला, ही तुझी सून. पुढें याला शैब्येपासून विदर्भ नांवाचा मुलगा झाला, व त्याला ती कन्या दिली. [ ९,२३,३५ ]

**ज्येष्ठ**--ज्येष्ठसामाचा कर्ता एक ऋषि.

**ज्येष्ठा**--एक नक्षत्र. हें शिशुमारचक्राच्या दक्षिणस्कंधावर आहे. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक. [ ५,२३,६ ]

( २ ) वरुणनामक आदित्याची स्त्री. हिला बल, अधर्म, बंदी, पुष्कर, इ. पुत्र व सुरा नांवाची कन्या होती.

**ज्येष्ठिल**-भारतवर्षीय तीर्थ.

**ज्येष्ठिला**-भारतवर्षीय नदी.

**ज्योति**-वसिष्ठाचा एक पुत्र.

**ज्योतिरथा**-भारतवर्षीय नदी.

**ज्योतिर्धाम**-तामसमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८,१,२८ ].

**ज्योतिर्भास**-मानसनामक पितरांचा लोक.

**ज्योतिर्मुख**-रामसेनेंतील एक वानर.

**ज्योतिष्मती**-विष्णुपदनामक सरोवरांतून निघालेली नदी.

**ज्योतिष्मान**-प्लक्षद्वीपांतील पर्वत [५,२०,४]

**ज्योत्स्ना**-सोमकन्या.वरुणपुत्र पुष्कराची स्त्री

**ज्वर**-एक अस्त्र. बाणासुर युद्धांत शंकरानें व कृष्णानें आपापलीं ज्वरास्त्रें सोडलीं होतीं. शैवज्वरानें केलेली श्रीकृष्णाची स्तुति [ १०,६३,२३-२५ ].

**ज्वलना**-तक्षक कन्या. सोमवंशीय औचेयु अथवा ऋतेयूची पत्नी.

**झि**

**झिल्लिक**-भारतवर्षीय देश.

**झिल्ली**-वृष्णिकुलोत्पन्न एक यादव.

**टि**

**टिट्टिभ**-वरुणलोकांतील एक असुर.

**ड**

**डमरु**-शंकरांचें एक वाद्य. याच्या नादापासून व्याकरणाचीं चौदा सूत्रें निघालीं.

**डाकिनी**-शिवगणांतील पिशाच्यांची एक देवता. ही बाणासुर युद्धांत शंकराबरोबर होती. [ १०,६३,१० ].

डिंभक-जरासंधाच्या दोन प्रधानांतील एक. हंसाचा कनिष्ठ बंधु.

डुंडुभ-शापानें सर्पजाति पावलेला एक ऋषि. ( रुरु शब्द पहा. )

ढ

ढक्का-शंकराचें एक वाद्य.

त

तकिबिंदु-अत्रि कुलांतील एक ऋषि.

तक्ष-सूर्यवंशीय दशरथपुत्र भरत व माण्डवी यांच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. याला कालिका व चपला अशा दोन स्त्रिया होत्या. यानें गांधार देशाची राजधानी तक्षशिला स्थापिली. [ ९, ११, १२ ]

( २ ) यदुकुलांतील वृक व दुर्वाक्षी यांचा ज्येष्ठ पुत्र. [ ९, २४, २३ ]

तक्षक-कद्रुपुत्र एक नाग. हा सव्वीस नागकुलांपैकीं एका कुलाचा अधिपति होता. शमीक ऋषिपुत्राच्या शापाप्रमाणें यानें परीक्षिताला दंश केला. १, १८, ३७ व १२, ६, ११] जनमेयकृत सर्पसत्रांत याचीं अठरा कुळें दग्ध झालीं. तीं:- पिच्छांडक, मंडलक, पिण्डसेक्ता, भेणक, उच्छिख, शरभ, भंग, बिल्वतेजा, विरोहण, शिली, शलकर, मूक, सुकुमार, प्रवेपन, मुद्गर, शिशुरोमा, सुरोमा आणि महाहनु. याचें हवन होत असतां, हा इंद्राला शरण गेला, व इंद्रानें याचें संरक्षण केलें. [ १२,६,१७ ]

( २ ) सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील प्रसेनजित् राजाचा पुत्र. याचा पुत्र बृहद्बल. [ ९,१२,८ ]

तक्षशिला-गांधार देशाची राजधानी. ही भरतपुत्र तक्षानें स्थापिली. ही सिंधु व झेलम या नद्यांमध्यें व अभिसारि देशाच्या दक्षिणेस आहे.

तंगण-भारतवर्षीय देश.

तण्डि-अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि. यानें दहा हजार वर्षें तप करून शंकरास प्रसन्न केलें; व उपमन्यु ऋषीला शिवसहस्रनामयुक्त शैवी दीक्षा दिली. ( भा. अनु. अ. १६-१७ )

तत्पुरुष--शिवाचें एक स्वरूप.

तत्पुरुषकल्प-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील एकविसावा दिवस. याचे आरंभीं तत्पुरुषावतार झाला.

तत्वदर्शी-( र्शी ) देवसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८,१३,१३ ]

( २ ) रैवतमनूच्या दहा पुत्रांपैकीं एक.

( ३ ) सुदरिद्र ब्राह्मणाचा एक पुत्र.

तन्ति-धूम्रपराशर कुलोत्पन्न एक ऋषि.

तन्तिपाल-अज्ञातवासांत असतां सहदेवानें धारण केलेलें नांव. ( भा. विराट )

तन्तु-विश्वामित्राचा एक पुत्र.

तन्दुलिकाश्र-भारतवर्षीय एक तीर्थ.

तप-( तपश्चर्या ) ब्रह्मदेवाच्या पश्चिम मुखापासून उत्पन्न झालें. धर्माच्या चार पायांपैकीं एक [ ३,१२,४१ ]

( २ ) सप्तलोकांतील सहावा लोक.

तपती-विवस्वान् सूर्य व छाया यांची कन्या व संवरणाची पत्नी. हिचा पुत्र कुरु. [ ६,६, ४१ व ९,२२, ४ ]

( २ ) भारतवर्षीय एक नदी.

तपन-सूर्याचें नांव.

**तपन**–कर्णानें मारलेला पाण्डवपक्षीय पांचाल ( भा कर्ण. )

( १ ) गजवानराने मारलेला रावणपक्षीय राक्षस. ( वा. रा. )

**तपस्य**-( फाल्गुन ) या महिन्यांत पर्जन्य नांवाचा सूर्य आपल्या गणांसह फिरत असतो. [ १२,११.४० ]

( २ ) तामस मनूच्या पुत्रांतील एक.

**तपस्वी**—रुद्रसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८,१३,२८ ]

**तपस्**--( माघ ) यांत पूषानामक आदित्य आपल्या गणांसह फिरत असतो. [ १२,११,३९ ]

**तपोत्सुक**—सुदरिद्र ब्राह्मणाच्या चार पुत्रांपैकीं एक (पितृवर्ती शब्द पहा )

**तपोद्यति**---तामस मनूच्या पुत्रापैकीं एक.

**तपोधन**-- ,, ,

**तपोभागी**-- ,, ,,

**तपोमूर्ति**--रुद्रसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८,१३,२८ ].

**तपोमूल**--तामस मनूचा एक पुत्र.

**तपोयोगी**-- ,, ,,

**तपोरति** -- ,, ,,

**तपोवन**--नर्मदातीरीं असलेलें एक वन.

**तप्तसूर्मि**—अगम्यगमन करणाऱ्या लोकांस प्राप्त होणारा नरक. [ ५,२६,२० ]

**तम**—ब्रह्मदेवानें छाये—( अज्ञाना ) पासून उत्पन्न केलेल्या पांच अविद्यांपैकीं एक. [ ३, २०, १८ ]

( २ ) श्रवाऋषीच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र प्रकाश.

**तमकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील अकरावा दिवस.

**तमसा**–भारतवर्षीय नदी. हिच्या तीरीं वाल्मीकीचा आश्रम होता. रेवा प्रांतांतून ईशान्येकडे वहात जाऊन भागीरथीला मिळणारी नदी.

( २ ) एक नदी. हिच्या कांठीं दशरथानें श्रावणास मारिलें. ही कोसल देशाकडे वहात जाते. सरयूच्या उजव्या बाजूला दहा पंधरा मैलावर.

**तमोजा** यदुवशीय अंधक कुलांतील असमंजस् राजाचा पुत्र.

**तरंतुक**-कुरुक्षेत्रांतील एक डोह.

**तरस**–रामसेनेंतील एक वानर.

**तरुक्ष**–एक ब्रह्मर्षि.

**तर्कमुद्रा**–अंगुष्ठ व तर्जनी यांचीं अग्रें जुळून ठविलीं कीं, तिला तर्कमुद्रा म्हणतात. [ ४, ६, ३८, ]

**तर्ज**–उत्तम मनूचा एक पुत्र.

**तर्ष**–अर्क नामक वसूचा पुत्र. [६, ६ १३]

**तलक**–कलियुगांतलि आन्ध्रवंशीय हालेय राजाचा पुत्र. याचा पुत्र पुरीषभीरु. [ १२, १, २५, ]

**तलातल**–सप्त पातालांतील चौथें. हें विराटपुरुषाच्या जंघाच्या ठिकाणीं कल्पिलें आहे.[२,१,२६,व ५,२४,७]

## ता

**ताटका**--सुकेतु यक्षाची कन्या व जंभपुत्र सुंदाची स्त्री. हिचे पुत्र मारीच व सुबाहु. अगस्त्य ऋषीच्या कोपानें सुंद मृत झाला असतां, ही मलद व करुषक ह्या देशाजवळ आपल्या पुत्रांसह येऊन राहिली. विश्वामित्र यज्ञरक्षणाकरितां जात असतां वाटेंत रामानें हिचा वध केला (वा. रा.)

**ताटकेय**--ताटकेचे दोन पुत्र.

**ताडका**--ताटकेचें नामांतर.

**ताडकायन**--विश्वामित्राचा एक पुत्र.

**ताण्डव**--एकप्रकारचें नृत्य. हें शंकराला फार प्रिय आहे. [ १०,६२,४ ]

**ताण्डि**-तण्डि ऋषीचा पुत्र.

**तापी**-भारतवर्षीय नदी. सूर्यानें स्वतःच्या उष्णतेपासून बचाव करण्याकरितां ही नदी उत्पन्न केली अशी समजूत आहे. मुलताईच्या सरोवरापासून हिचा उगम आहे. [ ५,१९,१८, ]

**तामस**-प्रियव्रत राजाचा पुत्र हा चालू श्वेतवाराह कल्पांत चौथा मनु होऊन गेला. या मन्वंतरांत पृथु, ख्याति, इत्यादि दहा पुत्र असून त्यांना अकल्मष, धन्वी, तपोमूल, तपोधन, तपोरति, तपस्य, तपोद्यपि, परंतप, तपोभागी आणि तपोयोगी, अशींही नांवें होतीं. कवि, पृथु, अग्नि, अकपि, कपी, जल्प आणि धीमान् हे सप्तर्षि ज्योतिर्धामा इत्यादि नामांतरानीं असत. सत्यक, हरि, वीर, इत्यादि साध्यसंज्ञक देव असत. त्यावेळीं त्रिशिख नांवाचा इंद्र व हरि अवतार झाला. [ ५,१,२८ व ८,१,२७ ]

**तामिस्र**-ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेली एक अविद्या. [ ३, २०, १८ ]

( २ ) परद्रव्य व परस्त्री हरण करणारांस प्राप्त होणारा नरक. हा अंधकारमय आहे. [ ५, २६, ८ ]

**ताम्र**-महिषासुराचा धनाध्यक्ष.

( २ ) मुर दैत्याच्या सात पुत्रांपैकीं एक.

**ताम्रतप्त**-श्रीकृष्ण व रोहिणी यांचा एक पुत्र. [ १०, ६१, १८ ]

**ताम्रध्वज**-मयूरध्वज राजाचा पुत्र.

**ताम्रपर्णी**-मद्रास इलाख्यांतील तिनेवेल्ली जिल्ह्यांतील एक नदी. ही पश्चिमघाटांत आगस्त्य मलई शिखराजवळ उगम पावते. पुढें कांहीं अंतरावर पापनाशनम् नांवाचें एक तीर्थ असून वनतीर्थाजवळ हिचा धबधबा आहे. ही मानारच्या आखातास मिळते. हिच्या मुखाशीं मोत्यें सांपडतात. येथें मलयध्वज पाण्ड्य राजा वानप्रस्थांत आला होता. [ ४, २८, ३५ व ५, १९, १८ ]

**ताम्रलिप्त**-कर्वट देशचा एक राजा. (भा.)

**ताम्रलिप्ति**-बंगाल्यांतील मिदनापूर जिल्ह्यांतील एक शहर. कलकत्याच्या नैर्ऋत्येस ४२ मैलांवर आहे.

**ताम्रलोचन**-एक शिवगण.

**ताम्रा**-कश्यपाची पत्नी. हिला, शुकि, श्येनी, भासी, सुग्रीवी, गृधिका, शुचि, काकी आणि धृतराष्ट्री अशा आठ कन्या होत्या.

( २ ) वसुदेवाची एक स्त्री.

**ताम्रारुण**-भारतवर्षीय तीर्थ.

**ताम्रोष्ठ**-एक गंधर्व.

**तार**-मयासुराचा एक सहचर दैत्य.

( २ ) रामसेनाधिपति एक वानर. याची कन्या रुमा ती सुग्रीवाची स्त्री.

**तारक-तारकासुर**-त्रिपुरांतील एक दैत्य. याला ताराक्ष अथवा तारकाक्ष, कमलाक्ष आणि विद्युन्माली, असे तीन पुत्र होते. (भा कर्ण. अ. ३३ )

( २ ) दनुपुत्र दानवांतील एक.

**तारक**–वज्रांग दैत्य व वरांगी यांचा पुत्र. यानें पारियात्र पर्वतावर तप करून ब्रह्मदेवाजवळ अमरत्व मागितल, पण ते मिळालें नाहीं. तेव्हां सात दिवसांच्या शिशुवांचून मृत्यु येऊं नये, असा वर यानें मागून घेतला, व त्रैलोक्यास पीडा देऊं लागला. जंभ, कुजंभ, मेघ, कालनेमि, निमि, मथन, जंभक, आणि शंभ, असे याचे सेनानायक होते. शेवटीं याच्या नाशार्थ कार्तिकेयाचा अवतार झाला, व त्यानें सातव्या दिवशींच याचा वध केला. (मत्स्य.)

**तारकाक्ष**-तारकासुराचा एक पुत्र.

**तारसार**–यजुर्वेदोपनिषत्.

**तारा**-बृहस्पतीची पत्नी. हिला चंद्रानें पळवून नेलें असतां देवदानवांचें युद्ध झालें. शेवटीं अंगिरा ऋषीनें चंद्राची निंदा करून तारेला परत आणिलें. त्यावेळीं ती गरोदर होती. तिला चंद्रापासून जो मुलगा झाला तो बुध. [ ९, १४, ४ ]

( २ ) सुषेण वानराची कन्या व वालीची स्त्री. हिचा पुत्र अंगद.

( ३ ) सूर्यवंशीय हरिश्चंद्र राजाची स्त्री. हिला तारामती असें नांव असून रोहित पुत्र होता.

**तारापीड**-सूर्यवंशीय कुशकुलांतील चंद्रावलोकाचा पुत्र. याचा पुत्र चंद्रगिरि.

**तारामती**–हरिश्चंद्र राजाची पत्नी.

**तारेय**-तारापुत्र अंगद.

**तार्क्ष**-मार्गशीर्षमहिन्यांत अंशुमान् सूर्यासह फिरणारा यक्ष. [१२,११, ४१]

**तार्क्ष्य**–कश्यपाचें नांव. [ ६, ६, २१ ]

( २ ) गरुडाचें नामांतर. ( भा. अनु )

( ३ ) अरिष्टनेमि ऋषीचें नामांतर.

**ताल**–भारतवर्षीय एक देश.

**तालकृत**-अंगिरा कुलांतील एक ऋषि.

**तालकेतु**–कृष्णानें मारिलेला एक राक्षस.

**तालजंघ**–म्लेच्छ विशेष. सगर राजानें यांचा पराभव केला, पण और्व ऋषीच्या सांगण्यावरून यांस ठार न मारितां विरूप केलें. [ ९, ८, ५ ]

( २ ) सहस्रार्जुनाच्या जयध्वज पुत्राचा मुलगा. याचें कूल याच नांवानें प्रसिद्ध असून तें सर्व और्व शिष्य सगर राजाकडून मृत झालें. याचा वडील पुत्र वीतिहोत्र. [ ९,२३,२८ ]

( ३ ) बलरामाच्या रथावरील ध्वज. [ १०, ५०, २२ ]

**तालवन**–वृंदावनासमीपचें अरण्य. येथें बलरामानें धेनुकासुराचा वध केला. [ १०, १५, २१ ]

**तालाकट**–शूर्पारक देशासमीपचा देश.

## ति

**तिग्मकेतु**–ध्रुवपुत्र वत्सर व स्वर्वीथि यांच्या सहा पुत्रांतील दुसरा. [ ४,१३,१२]

**तित्तिरी**–( २ ) ( लावापक्षी ) विश्वरूपाच्या तीन मस्तकांपैकीं अन्नाद नांवाच्या मस्तकापासून झालेला पक्षी. [ ६, ९, ५, ]

( २ ) वैशंपायनानें सांगितल्यावरून याज्ञवल्क्यानें आपला वेद परत दिला असतां तो ऋषींनीं हें रूप घेऊन भक्षण केला. [ १२, ६, ६५]

**तित्तिरी**-आंगिरस कुलांतील एक ऋषि यानें तैत्तिरेय शाखेचें अध्ययन केलें. याचा पुत्र तैत्तिरि.

(४) भारतवर्षीय एक देश.

**तितिक्षा**-सहनशीलपणा.

(२) स्वायंभू मन्वंतरांतील दक्षकन्या व धर्मपत्नी. हिचा पुत्र क्षेम. [ ४,१,५० ].

**तितिक्षु**-सोमवंशीय अनुकुलांतील महामना राजाचा पुत्र. याचा पुत्र रुदद्रथ. [ ९,२३,२ ].

**तिथि**-भृगुकुलांतलि एक ऋषि.

**तिमि**-कश्यपाची पत्नी. हिच्यापासून जलचर प्राणी उत्पन्न झाले [ ६,६,२६ ].

(२) सोमवंशीय पांडव वंशांतील दुर्व राजाचा पुत्र. याचा पुत्र बृहद्रथ. [ ९,२२,४२ ].

**तिमिंगल**-पांडवांच्या वेळीं रामक पर्वतावर असलेला राजा. ( भा. सभा. )

**तिमिध्वज**-दक्षिण देशांतील दण्डकारण्यासमीपच्या वैजयंत नामक पुरीचा राजा. यास शंबर असेंहि म्हणत. हा असुरास अनुकूल होऊन इंद्राबरोबर युद्ध करीत असतां इंद्रानें दशरथ राजास सहाय्यास बोलाविलें. त्याचे बरोबर यावेळीं कैकयी होती. दशरथानें घोर युद्ध करून यांचा पराभव केला. (वा. रा. अयो. )

**तिलोत्तमा**-प्राधाकन्या एक अप्सरा. ही त्वष्टानामक सूर्यासह आश्विन महिन्यांत असते. [ १२,११,४३ ].

(२) सुंदोपसुंदांच्या वधाकारितां विश्वकर्म्यानें उत्पन्न केलेली अप्सरा.

## ती

**तिष्य**-पुष्पनक्षत्राचें नांव. [ १२,२,४४ ].

**तीक्ष्णवेग**-रावण पक्षीय राक्षस.

**तीर्थ**-पुण्यकारक जलें. [ ११,१२,२ ].

**तीर्थवती**-क्रौंचद्वीपांतील नदी. [५,२०,२१]

**तीव्ररथ**-हंसध्वज राजाच्या सुमतिनामक मंत्र्याचा मुलगा.

## तु

**तुङ्ग**-भारत वर्षीय तीर्थ.

**तुंगेकारण्य**-एक अरण्य.

**तुंगभद्रा**-( एक नदी ) म्हैसूरच्या कडूर जिल्ह्यांत पश्चिम घाटांत गंगामुळा येथें हिचा उगम झाला असून तुंगा आणि भद्रा हे दोन लहान प्रवाह मिळून ही नदी झाली आहे. शिमोगा जिल्ह्याच्या उत्तरेस कुदाली येथें तुंगा आणि भद्रा यांचा संगम झाला आहे. ही चारशें मैल वहात जाऊन कर्नूलच्या पलीकडे कृष्णेला मिळते. हिला कुमुद्वती, वरदा व हरिद्रा या नद्या मिळतात. हिच्यासंबंधानें एक अशी आख्यायिका आहे कीं, एक राक्षस पृथ्वीला धरून पाताळांत नेत असतां, विष्णूने वराह अवतार धारण करून समुद्रांत उडी मारिली, व पृथ्वीला वर आणिलें. यामुळें विष्णूला फार श्रम झाले, म्हणून तो वराह पर्वतावर विश्रांति घेत बसला असतां त्याच्या मुखावरून घामाच्या धारा चालल्या होत्या. त्यांतील डाव्या बाजूच्या दांतापासून निघालेल्या धारेचें नांव तुंगा व उजव्या बाजूच्या सुळ्यापासून निघालेल्या धारेचें नांव

भद्रा. म्हणून हिला तुंगभद्रा असें नांव पडलें. [ ५,१९,१८ ].

**तुंगवेणा**-भारतवर्षीय भरतखण्डस्थ नदी.

**तुण्ड**-नलवानरानें मारिलेला राक्षस.

**तुण्डी**-नन्दिकेश्वर.

**तुम्बरु**-( तुम्बुरु ) प्राधेच्या गंधर्व पुत्रांपैकीं एक. याची स्त्री रंभा. ( भा. उद्योग. अ. ११७ ) हा नारदासह ब्रह्मसभेंत जाऊन गायन करितों [ ५,२५,८ ] हा अनुराजाचा मित्र होता [ ९,२४,२० ]. श्रीकृष्णाकडे गोकुळांत गेला. [ १०,२७,२४ ].

( २ ) चैत्रमहिन्यांत धातानामक सूर्याबरोबर फिरणारा गंधर्व [१२,११,३३]

( ३ ) एक ऋषि.

**तुर**-कवषा नामक ब्राह्मणीचा पुत्र. यास कावषेय म्हटलें आहे. हा जनमेजयाच्या सर्पसत्रांत उपाध्याय होता.

**तुरा**-नर्मदेस मिळणारी नदी.

**तुरीय**-यजुर्वेदोपनिषत्.

**तुरुष्क**-कलियुगांत या संज्ञेनें चवदा राजे झाले. [ १२,१,३० ]

**तुर्वसु**-सोमवंशीय ययाति राजा व देवयानी यांच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याचें पश्चिमेकडे यवनांवर अधिपत्य होतें. यानें ययातीची जरा घेतली नाहीं, म्हणून छत्रचामरादि चिन्हें यास नव्हती. [ ९, १८, ३३ व ९, १९, २२ ] याचा पुत्र वन्हि [ ९,२३,१६ ].

**तुलसी**-शंखचूड असुराची स्त्री. (दे. भा.)

**तुला**-बारा राशींपैकीं एक. [ ५,२१,४ ].

**तुलाधार**-एक धार्मिक वैश्य. यानें जाजली ऋषीचा तपाचा अभिमान नष्ट केला. ( भा. शांति. अ. २६१)

**तुषार**-भारत वर्षीय देश व तेथील लोक. ( भा र्ण. अ. ७३ )

**तुषित**-यज्ञ व दक्षिणा यांचे बारा पुत्र. तोष, प्रतोष, संतोष, भद्र, शान्ति, इडस्पति, इध्म, कवि, विभु, स्वन्ह, सुदेव व रोचन. हे स्वायंभुव व स्वारोचिष मन्वंतरांतील देव होत. [ ४,१,८ व ८,१,२० ].

**तुषिता**-स्वारोचिष मन्वंतरांतील वेदशिरा ऋषीची स्त्री. हिचा पुत्र विभु. [ ८,१,२१ ].

**तुष्ट**--हंसध्वज राजाचा प्रधान.

**तुष्टि**--स्वायंभु मन्वंतरांतलि दक्षकन्या व धर्माच्या १३ पत्न्यांपैकीं एक. हिचा पुत्र मुद. [ ४,१,५१ ].

**तुष्टिमान**--आहुकपुत्र उग्रसनाच्या नऊ पुत्रांपैकीं एक [ ९,२४,२४ ]

**तुहुंड**--दनुपुत्र एक दानव.

( २ ) भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा.

## तू

**तूण**--( भाता ) [ १०,५८,१६ ]

**तूर्य**--( तुतारी ) [ १०,१,३३ ]

**तृणप**--प्राधा पुत्र गंधर्वांतील एक.

( २ ) एक राजर्षि.

**तृणबिंदु**--सूर्यवंशीय दिष्टकुलांतील बन्धु राजाचा पुत्र. हा फारच गुणवान असल्यामुळें अनेक लोक याच्या भजनीं लागत असत. याची पत्नी अलंबुषा अप्सरा. विशाल, शून्यबंधु आणि धुम्रकेतु हे तीन पुत्र, व इड-

विडा नामक कन्या. ती विश्रवा ऋषीला दिली होती. [९,२,३०,३३]

( २ ) सूर्यवंशीय नरिष्यन्त कुलांतील दम राजाचा पुत्र. हा मेरुपर्वतावर तप करीत असतां, यानें आपली गौ नामक कन्या पुलस्त्य ऋषीला दिली (पुलस्त्य शब्द पहा )

( ३ ) वैवस्वत मन्वंतरांतील चोविसावा व्यास.

( ४ ) पाण्डवांबरोबर द्वैतवनांत असलेला एक ऋषि.

**तृणावर्त**--कंसाचा एक सेवक. हा कृष्णनाशाकरितां वायुरूप धारण करून गोकुळांत गेला होता. तेथें कृष्णाला आकाशांत नेत असतां त्याच्या अति भारानें हा शिळेवर पडून मृत्यु पावला. [ १०,७,२६ ].

**तृतीया**--भारतवर्षीय नदी.

**तृक्ष**--कश्यप ऋषीस नामांतर. (भा. वन )

## ते

**तेजस्वी**--एक गोप. [ १०,२२,३१ ]

( २ ) पूर्वेंद्रांतील पांचवा. हाच पुढें पण्डुपुत्र सहदेव झाला होता.

**तेजोबिंदु**--यजुर्वेदोपनिषत.

## तै

**तैजस**--एकतीर्थ. येथें देवांनीं तारकासुर वधार्थ कार्तिकेयास अभिषेक केला.

**तैत्तिरि**--तित्तिरि ऋषीचा पुत्र. कृष्ण द्वैपायन व्यासांचा शिष्य जो वैशंपायन तो याचा वंशज.

**तैत्तिरीय**--(क) यजुर्वेदाची एक शाखा. याशाखेचें औखेय आणि खाण्डिकेय असे दोन भेद आहेत. बौधायन, आपस्तंब, सत्याषाढ, भारद्वाज, वैखानस व वाधुल हे या शाखेचे पुनर्भेद आहेत. याज्ञवल्क्याचें गुरुशीं भाण्डण होऊन त्यानें वमन केलेला वेद तित्तिर पक्ष्यानें ग्रहण केला, म्हणून हें नांव या शाखेस पडलें. तित्तिर नामक शाखा प्रवर्तक ऋषीमुळें हें नांव पडलें असेहि कांहीं विद्वान म्हणतात. [ १२,६,६५ ]

**तैलप**--अत्रिकुलांतील एक ऋषि.

**तैलेय**--धुम्रपराशर कुलोत्पन्न एक ऋषि.

**तोशल**--(क) कंसाचा एक मल्ल ह्याला कृष्णानें मारिलें [ १०,४४,२७ ]

**तोष**--( तुषित शब्द पहा ) [ ४,१,७ ]

**तौलेय** -अंगिराकुलांतील एक ऋषि.

**त्याज्य**--बारा भार्गव देवांतील एक.

**त्रयी**--सविता व पृश्नि यांची कन्या. [ ६,१८,१ ]

( २ ) ऋग्-यजुः-साम ह्या तीन वेदांस ही संज्ञा आहे.

**त्रय्यारुण**--सूर्यवंशीय इक्ष्वाकु कुलांतील त्रिधान्व्याचा पुत्र.

( २ ) चालू मन्वंतरांतील पंधरावा व्यास

**त्रय्यारुणि**--सोमवंशीय दुष्यंत कुलांतील दुरितक्षयाचा पुत्र. हा ब्राह्मण झाला. [ ९,६,२३ ] यानें रोमहर्षणापासून पुराणाचें अध्ययन केलें [१२,७,५].

**त्रसद्दस्यु**--युवनाश्वपुत्र मांधाता याचें नामांतर [ ९,६,३३ ].

( २ ) सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील मांधात्याचा पौत्र व पुरुकुत्स आणि नागकन्या नर्मदा यांचा पुत्र. याला पौरुकुत्स असेंहि नांव आहे. याच्या

पुत्र अनरण्य [ ९,७.४ ]. अगस्त्य ऋषि याचेकडे द्रव्य मागावयास आला असतां याचें आयव्यय पाहून परत जाऊं लागला, तेव्हां यानें इल्वलाचा पराभव केल्यास अपार द्रव्य मिळेल असें सांगितलें. याला विष्णुवृद्ध नांवाचाहि एक पुत्र होता. (भा. वन.)

**त्रिककुत्**—सोमवंशीय आयुकुलांतील शुचि राजाचा पुत्र. हा धर्मनिष्ठ होता. याचा पुत्र शांतरय. [ ९,१७,११ ]

**त्रिकुट**—मेरुकर्णिका पर्वतांतील एक पर्वत. येथें गजेंद्रमोक्ष झाला. [ ५,१६,२६ व ८, २, १ ]

( २ ) एक सामान्य पर्वत [५,१९,१६].

( ३ ) लंबनामांतरानें लंकेंतील एक पर्वत

**त्रिगर्ति**—भारतवर्षीय देश. याचे उत्तरत्रिगर्त आणि पाश्चिमत्रिगर्त असे दोन भेद आहेत. बलराम तीर्थ यात्रेचे वेळीं येथें आला होता. ( हल्लींचा जालंधर ) [ १०,७९,१९ ].

**त्रिगर्त**—एक राजर्षि.

**त्रिजट**—गार्ग्यकुलोत्पन्न अयोध्येंत राहणारा एक वृद्धश्रेष्ठ ब्राह्मण. राम वनवासाला जात असतां हा स्त्रीच्या सांगण्यावरुन द्रव्ययाचनेकरितां रामाकडे आला. रामानें विनोदानें त्यास सांगितलें कीं, आपला दंड ह्या गाईच्या कळपांत फेंका, तो जेथें पडेल तितक्या गाई मीं तुम्हांला देईन. त्यावेळीं ब्राह्मणानें आपलें सर्व सामर्थ्य खर्च करून तो दण्ड इतक्या जोरानें फेंकला कीं, गाईच्या दुसऱ्या कळपाच्याही पलीकडे गेला. तेव्हां रामानें त्या सर्व गाई व दुसरेंहि धन देऊन यास संतुष्ट केलें. ( वा.रा. अयोध्या)

**त्रिजटा**—लंकेंतील एक वृद्ध राक्षसी. ही अशोकवनिकेंत सीतासंरक्षणार्थ असलेल्या राक्षसींत मुख्य होती. हिला एकदां स्वप्नामध्यें रावण, कुंभकर्ण, इंद्रजित अंगाला तेल लावलेले, नग्न, उन्मत्त, अमंगल वाहनावर बसलेले दिसले, आणि राम-लक्ष्मण श्वेतवस्त्रें परिधान करुन गज आदि उत्तम वाहनावर बसलेले दिसले. म्हणून हिनें सीतेला पीडा न देण्याचें ठरविलें. ( वा. रा. सुंदर. )

**त्रिणकर्णी**-अंगिराकुलांतील एक ऋषि.

**त्रित**-भीष्म शरपंजरीं पडले असतां त्यांस भेटण्याकरितां आलेला ऋषि. हा युधिष्ठिराच्या यज्ञांत ऋत्विज होता. [ १,९,७ व १०,७४,७ ].

( २ ) गौतम ऋषीच्या तीन पुत्रांपैकीं एक. एकत व द्वित यांचा कनिष्ठ भ्राता हा आपल्या दोन्हीं बंधूंपेक्षां विद्वान होता. एकदां याची विद्वत्ता पाहून एका यजमानानें याच्या बंधूंपेक्षां यास द्रव्य व गायी अधिक दिल्या. तें पाहून याचे बंधु याचा द्वेष करूं लागले. त्या गायी घेऊन घरीं येत असतां मार्गांत लांडग्याचे भीतीनें मार्ग चुकवून चालतांना हा एका कूपांत पडला पण मत्सरामुळें यास बाहेर न काढतांच याचे भाऊ घरीं गेले. त्यावेळीं त्या कूपांत लोंबत असलेल्या एका वल्लीला सोमवल्लीची कल्पना करून

यानें देवांना आवाहन केलें. देव तेथें येऊन सोमप्राशन करूं लागतांच कूपांतून एक उदकाचा प्रवाह जोरानें निघाला, व त्याबरोबर हा बाहेर आला. नंतर यानें देवांपाशीं या कूपांत स्नान करणारास सोमपान केल्याचें फल मिळो, असा वर मागितला. तेव्हां पासून त्या कूपाला त्रितकूप असें नांव मिळालें. (भा. शल्य.)

( ३ ) सरस्वतीच्या पात्रांतील एक तीर्थ येथें विदूर तीर्थ यात्रेकरितां आला होता. [ ३,१,२२ ].

( ४ ) चक्षु व नड्वला यांचा पुत्र. [ ४,१३,१५ ]

( ५ ) ब्रह्मदेवाच्या मानस पुत्रांपैकीं एक.

**त्रितकूप**—त्रित ऋषीचें तीर्थ. येथें बलराम तीर्थयात्रेला आला होता. [ १०,७८,१९ ].

**त्रिदिवा**—भारतवर्षीय नदी.

**त्रिधन्वा**—सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील संभूति राजाचा पुत्र. याचा पुत्र त्र्य्यारुण.

**त्रिधामा**—चालू मन्वंतरांतील दहावा व्यास

**त्रिनेत्र**—महिषासुराचा अनुयायी एक असुर.

**त्रिपथगा**—तिनि लोकांत संचार करणाऱ्या भागिरथीस नामांतर.

**त्रिपुर**—पूर्वी देव दानवांचें युद्ध होऊन, दानवांचा पराभव झाल्यावर मयासुरानें तारक आणि विद्युन्माली या दोन मित्रांसह ब्रह्मदेवाची तपश्चर्या केली व शंभर योजनांच्या अंतरावर तीन पुरें उत्पन्न करण्याचा व तीं शंकरांच्या बाणावांचून अभेद्य असण्याचा वर मागून घेतला. नंतर मयासुरानें पुष्य नक्षत्रावर लोह, रजत आणि सुवर्ण यांचीं एकावर एक अशीं सारख्या अंतरावर तीन पुरें निर्माण करून त्यांचें, तारकासुर, कमलाक्ष व विद्युन्माली यांस आधिपत्य दिलें. याशिवाय दुसरींही अनेक पुरें निर्मून त्यांत इतर राक्षसांस ठेविलें, आणि सर्वांच्या वरती एक दिव्य पूर निर्माण करून त्यांत आपण राहिला. मयासुरानें अशी व्यवस्था करून सर्वांस सांगितलें कीं, ईश्वराविषयीं अनादर करूं नका. पण त्या उन्मत्त राक्षसांनीं देवांस पीडा दिली. तेव्हां ब्रह्मदेवाचे प्रार्थनेवरून शंकरांनीं पृथ्वीला रथ, ब्रह्मदेवाला सारथि, विष्णूला बाण व अन्य देवांचाहि यथायोग्य उपयोग करून पुष्य नक्षत्रावर तीं तीन पुरें क्षणभर समसूत्रांत येतांच त्यांचा नाश केला. त्यांत सर्व असुर नाश पावले, पण मयासुर मात्र ईश्वरोपासक असल्यानें वांचला. [ ७,१०,६६ ] (भा द्रोण.)

**त्रिपुरा**—ऋग्वेदोपनिषत्.

**त्रिपुरातपन**—अथर्वण वेदोपनिषत.

**त्रिपुरी**—एक नगरी. (भा. वन. अ. २५४)

**त्रिबन्धन**-सूर्यवंशीय मांधाता पुत्र पुरुकुत्साच्या कुलांतील अरुणाचा पुत्र. याचा पुत्र त्रिशंकु. [ ९,७,४ ]. यास निबंधन असें अन्यत्र नांव आहे.

**त्रिभागा**—महेंद्र पर्वतापासून निघालेली नदी.

**त्रिभानु**-सोमवंशीय तुर्वसुकुलांतील भानुमान् राजाचा पुंत्र. याचा पुत्र करन्धम. [९,२३,१७].

**त्रिमूर्ति**—ब्रह्मदेव, विष्णु व महेश, या तीन देवतेपासून उत्पन्न झालेली मूर्ति. दत्तात्रेय. हे देव सत्व, रज व तम या तीन गुणांपासून अनुक्रमें विष्णु, ब्रह्मदेव व शंकर असे उत्पन्न झाले.

( २ ) इंद्रप्रमदि ऋषीस नामांतर.

**त्रिमूर्धा**—रावणाचा मुलगा.

**त्रिलोचन**—शंकराचें नामांतर आणि त्याचा गणसमुदाय.

**त्रिवक्रा**—कंसदासी कुब्जा. [१०,४२,३]

**त्रिविक्रम**—त्रैलोक्यव्यापी विष्णूचें नांव.

**त्रिवृष**—चालू मन्वंतरांतील अकरावा व्यास

**त्रिवेणी**—गंगा, यमुना, सरस्वति यांचा संगम. प्रयाग.

( २ ) बंगाल्यांत त्रिवेणी नांवाचें एक गांव हुगळी जिल्ह्यांत असून तेथेंहि या तीन नद्यांचा संगम झाला आहे. हिंदुस्थानांत चार विद्यापीठें होतीं, तीं—१ नवद्वीप, २ शांतिपुर, ३ गुसीपार आणि ४ त्रिवेणी. येथें ३० संस्कृत शाळा होत्या.

**त्रिशंकु**—सूर्यवंशीय इक्ष्वाकु कुलांतील त्रिबंधन राजाचा पुत्र हरिश्चंद्र. यानेंच दुष्काळांत विश्वामित्राच्या पत्नीला मांस देण्याचें कबूल केलें होतें. याचें मूळचें नांव सत्यव्रत. हा दुर्वर्तनी होता म्हणून पित्यानें यास घालवून दिलें होतें. स्त्रियांचा अपहार, गोवध आणि अप्रोक्षित वस्तूंचा उपयोग, या तीन शंकूं—( पातका )—स्तव यास वसिष्ठानीं त्रिशंकु असें नांव ठेविलें. पुढें बापानें यास गादीवर बसविलें, व यानें पुष्कळ वर्षें चांगलें राज्य केलें. एकदां याला सदेह स्वर्गास जाण्याची इच्छा झाली, पण वसिष्ठ पुरोहित होईनात; उलट त्यांना 'चांडाळ हो' असा शाप दिला. तेव्हां पूर्वीं केलेल्या उपकारांना स्मरून विश्वामित्र याचा पुरोहित झाला. पण यजमान चाण्डाळ व उपाध्याय क्षत्रिय, अशा स्थितींत कोणीहि देव किंवा ऋषि यज्ञास येईना! तेव्हां विश्वामित्रानें आपल्या तपःसामर्थ्याच्या जोरावर यास स्वर्गांत पाठविलें; पण तेथून इंद्रानें खालीं ढकललें. तेव्हां हा आक्रोश करूं लागला असतां 'तिष्ठतिष्ठ' असें म्हणून विश्वामित्रानें यास अंतराळीं थोपवून धरिलें; व प्रतिसृष्टी निर्माण करूं लागला. शेवटीं इंद्रानें विश्वामित्राची समजूत करून याला नक्षत्रांत स्थान दिलें. तो अद्यापि आकाशांत दिसत आहे. [९,७,५] (वा.रा.)

**त्रिशिख**-तामसमन्वंतरांतील इंद्र [८,१,२८].

**त्रिशिरा**—त्वष्टानामक प्रजापतीचा पुत्र जो विश्वरूप त्याचें नामांतर. याला तीन मुखें असून हा एकानें वेदाध्ययन, एकानें सोमपान व एकानें सुरापान करी. हा कांहीं दिवस देवांचा पुरोहित होता. ( विश्वरूप शब्द पहा )

( २ ) दूषण राक्षसाच्या चार आमात्या पैकीं एक. [९,१०,९]

( ३ ) रावणाचा त्रिशीर्ष पुत्र.

**त्रिशिला**—भारतवर्षीय नदी.

**त्रिशीर्ष**—रावणाचा एक पुत्र. यास मारुतीनें मारिलें. (वा. रा. युद्ध. स. ७०)

**त्रिशूलखात**—भारतवर्षीय तीर्थ.

**त्रिशृंग**—मेरूच्या परिसरण गिरींतील एक पर्वत. [ ५ १६,२७ ]

**त्रिष्टुप्**—चव्वेचाळीस अक्षरांचा एक छन्द. हा ब्रह्मदेवाच्या मांसापासून उत्पन्न झाला. [ ३,१२,४५ ]

**त्रिसामा**—भारतवर्षीय नदी. [५,१९,१८]

**त्रिस्तनी**—अशोक वनिकेंतील एक राक्षसी.

**त्रिस्रोता**—तिन्हीं लोकांत संचार असल्यामुळें भागीरथीचें नामांतर.

**त्रेता**—आहवनीय, दक्षिणाग्नि व गार्हपत्य या तीन अग्नींच्या समुच्चयांस नांव.

**त्रेतायुग**—चार युगांतील दुसरें युग व त्याची मूर्तिमान् देवता. याची वर्षसंख्या देवमानानें छत्तीसशें वर्षांची; म्हणजे मनुष्य मानानें १२९६००० वर्षांची आहे. याचा संधि व संध्यंशकाल देवमानानें दोनशें वर्षांचा असतो. या युगांत यज्ञांनीं भगवंताचें पूजन केलें जातें. [ १२,३,५२ ]

**त्रैपुर**—त्रिपुरीचा राजा. यास सहदेवानें जिंकिलें होतें. ( भा. सभा. )

**त्रैशंकव**—त्रिशंकुपुत्र हरिश्चन्द्र.

**त्रैशृंगायन**—वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**त्र्यक्ष**—हिरण्यकशिपूच्या राजसभेंतील एक दैत्य. [ ७,२,४ ]

**त्र्यक्षी**—अशोकवनिकेंतील एक राक्षसी.

**त्र्यंबक**—तीन अंबक म्हणजे नेत्र ज्याला आहेत असा शंकर.

( २ ) एक क्षेत्र नाशीक पासून वीस मैलांवर. येथें द्वादशज्योतिर्लिंगापैकीं त्र्यंबकेश्वर हें ज्योतिर्लिंग आहे. येथेंच गोदावरी नदीचा उगम झाला असून तो कुशावर्त नांवाच्या कुण्डांत जातो.

**त्वष्टा**—प्रियव्रतवंशीय ऋषभदेवकुलांतील भौवन राजा व दूषणा यांचा पुत्र याची पत्नी रोचना व पुत्र विरज. [ ५,१५,१५ ]

( २ ) अदितीपासून झालेल्या द्वादशादित्यांपैकीं एक. हा आश्विन महिन्यांत आपल्या गणांसह फिरतो. [ ६, ६, ३९ व १२, ११, ४३ ]

( ३ ) एक प्रजापति. यास दैत्यभगिनी रचना स्त्री असून संनिवेश व विश्वरूप दोन पुत्र होते. इंद्रानें विश्वरूपास मारिल्यामुळें पुरंदर इंद्राच्या नाशाकरितां यानें वृत्रासुराला उत्पन्न केलें. [ ६, ९, ११ ]

( ४ ) चालू मन्वंतरांतील विश्वकर्मा म्हणजे शिल्पी. यानें आपली कन्या, त्वाष्ट्री या नांवानें प्रसिद्ध असलेली जी संज्ञा, ती विवस्वान आदित्यास दिली होती. परंतु विवस्वान आदित्याचें तेज संज्ञेस सहन होईना, तेव्हां यानें त्यास चक्रावर घालून त्याचें तेज कमी केलें. दधीचि ऋषीच्या अस्थींचें वज्र करून यानेंच इंद्राला दिलें. [ ६, ९, ५४ ]

( ५ ) एक असुर. ( मत्स्य. अ. १७२]

**त्वष्टाधर**—शुक्राचार्यांचा एक पुत्र.

**त्वाष्ट्र**—त्वष्टा प्रजापतीचा पुत्र. विश्वरूप, वृत्रासुर इत्यादि. [ ६, ९, १८ ]

**त्वाष्ट्री**—त्वष्टा जो विश्वकर्मा त्याची संज्ञा नामक कन्या व विवस्वान आदित्याची स्त्री.

## द

**दक्ष**—दहा प्रजापतीपैकीं एक. हा ब्रह्मदेवाचा मानस पुत्र असून अंगुष्ठापासून

उत्पन्न झाला होता [ ३, १२, २२ ]. याला स्वायंभु मनूची कन्या प्रसूति दिली होती. याला श्रद्धा, मैत्री, दया, शान्ति, तुष्टि, पुष्टि, क्रिया, उन्नति, बुद्धि, मेधा, तितिक्षा, ऱ्ही, मूर्ति, स्वाहा, स्वधा व सती, अशा सोळा कन्या होत्या [ ४, १, ४८ ]. या सोळा कन्यापैकीं तेरा कन्या यानें कश्यपाला आणि तीन कन्या क्रमानें अग्नि, पितर व शंकर यांना दिल्या होत्या. एकदां प्रजापतींच्या यज्ञांत याला शंकरानें उत्थापन न दिल्यानें हा शंकराची निंदा करून त्याचा द्वेष करूं लागला [ ४, २, १७ ]. एकदां यज्ञ प्रसंगीं यानें सर्वांना आमंत्रणें केलीं, पण शंकरांना आमंत्रण केलें नाहीं तथापि सती शंकर नको म्हणत असतां आपल्या पित्याकडे गेली तेथें शंकरविरहित यज्ञ चाललेला पाहून तिनें योगानें आपला देह यज्ञकुंडांत विसर्जन केला [ ४, ४, २७ ]. हें वर्तमान शंकरास समजतांच त्यांनीं जटेपासून वीरभद्रास उत्पन्न केलें, व त्यास दक्षयज्ञ विध्वंसनाकरितां पाठविलें. त्यानें यज्ञाचा नाश करून दक्षाचा वध केला [ ४, ५, २४ ]. पुढें देवांच्या प्रार्थनेवरून बोकडाचें मस्तक लावून शंकरानें दक्षास पुन्हां सजिव केलें [ ४, ७, ९ ].

( २ ) उत्तानपादवंशीय चक्षु मनूच्या वंशांतील प्राचीनबर्हि राजाच्या दहा प्रचेतस संज्ञक पुत्रांचा मारिषेपासून झालेला पुत्र. हा दक्षांशानेंच जन्मला होता. याला प्राचेतसदक्ष अशी संज्ञा आहे. याला ब्रह्मदेवानें सर्व प्रजापतींचा अधिपति नेमिलें. [ ४, ३०, ४९--५१ ]. याला पंचजन प्रजापतीची कन्या असिक्नी, आणि वीरिणि अशा दोन स्त्रिया होत्या. असिक्नीला हर्यश्व संज्ञक दहा हजार पुत्र झाले. ते नारदाच्या उपदेशानें विरक्त झाले. तेव्हां यानें पुनः शबलाश्व संज्ञक दहा हजार पुत्र उत्पन्न केले, पण तेहि नारदोपदेशानें संन्यासी झाले. तेव्हां यानें नारदाला शाप दिला कीं, ‘ संतान छेद करणाऱ्या तुला कोठेंहि निश्चित स्थान मिळणार नाहीं. ’ [ ६,५,१ आणि ३३–४३ ] पुढें ब्रह्मदेवानें समाधान केल्यावर यानें असिक्नीच्या ठिकाणीं साठ कन्या उत्पन्न केल्या; त्यापैकीं धर्माला दहा, कश्यपाला तेरा, चंद्राला सत्तावीस, भूत, आंगिरा आणि कृशाश्व या प्रत्येकाला दोन दोन आणि चार तार्क्ष्यनामक कश्यपाला दिल्या [ ६, ६, १–२ ]. (मत्स्य.)

( ३ ) सूर्यवंशीय चित्रसेन राजाचा पुत्र. याचा पुत्र मीढ्वान् [ ९, २, १९ ]

( ४ ) सोमवंशीय अनुकुलांतील उशीनर राजाच्या पुत्रांपैकीं एक [ ९,२३,३ ]

( ५ ) दहा आंगिरस देवांतील एक.

( ६ ) दहा विश्वेदेवांतील एक.

( ७ ) भृगुपुत्र बारा देवांपैकीं एक.

**दक्षसावर्णि**- नववा मनु. हा वरुणाचा पुत्र होय. यास रौच्य अशीही संज्ञा आहे. या मन्वंतरांत भूतकेतु, दीप्तकेतु हे

पुत्र; पार, मरीचिगर्भ, इत्यादि देव, अद्भुत नांवाचा इंद्र, द्युतिमान् इत्यादि सप्तर्षि व ऋषभ अवतार असेल. [ ८, १३, १८ ]

**दक्षिणकर्णाटक**-कर्णाटक देशाचा एक भेद [ ५, ६, ७ ]

**दक्षिणकोसल**-इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील देश. यांत उज्जिहनी नगरी आहे.

**दक्षिणनिषाद**-निषाद देशाचा एक भेद.

**दक्षिणमत्स्य**-दक्षिण शूरसेन देशाच्या दक्षिणेकडील मत्स्य. ( भा. सभा. )

**दक्षिणयवन**-यवन देशाचा एक भेद.

**दक्षिणशूरसेन**-इंद्रप्रस्थानिकट दक्षिणेस असलेला शूरसेन देशाचा एक भेद.

**दक्षिणा**-रुचि ऋषि व मनुकन्या आकूती यांची कन्या व यज्ञाची पत्नी. हिला तुषित संज्ञक असे बारा पुत्र झाले. ही स्वायंभुव मन्वंतरांतील इंद्राणी. त्यावेळीं यज्ञ इंद्र होता. [४,१,४-७]

**दक्षिणाग्नि**-तीन श्रौत अग्नींपैकीं एक. दक्षयज्ञांत भृगूनें यांत यजुर्मंत्रांनीं हवन करून ऋभुदेव उत्पन्न केले. [४,४,३२]

**दक्षिणामूर्ति**-शंकराचा ज्ञानविग्रही अवतार.

( २ ) यजुर्वेदोपनिषत्.

**दण्ड**-सूर्याचा एक पार्षद. यासच दण्डी असें नांव आहे.

( २ ) सूर्यवंशीय भद्राश्वाचें नामांतर.

( ३ ) द्रौपदी स्वयंवरांतील एक राजा. विदण्ड राजाचा पुत्र. ( भा. आदि. )

( ४ ) कर्णानें मारलेला पांडवपक्षीय एक राजा.

**दण्डक**-सूर्यवंशीय इक्ष्वाकूचा पुत्र. हा लहानपणापासून मूढ व उन्मत्त असे. हा विन्ध्याद्री व शैवल या पर्वतामधील प्रदेशाचा राजा यानें एकदां आपल्या भृगुकुलोत्पन्न गुरूच्या अरजा नामक कन्येवर बलात्कार केल्यामुळें गुरूच्या शापानें याचा नाश झाला व त्याचा चारशें योजनें असलेला देश अरण्यप्राय झाला. म्हणून त्यास दण्डकारण्य हें नांव पडलें. दक्षिणेंतील नर्मदा व गोदावरी यांमधला प्रदेश. याची राजधानी मधुमंत नगरी होती. [ ९,६,४ ] ( वा. रा. उत्तर. ) बलरामतीर्थयात्रा करीत असतां या देशांतून नर्मदेला गेला [ १०,७९,२० ].

( २ ) या नांवाचा कोंकणपट्टींत प्राचीनकाळीं एक देश होता. सहदेवानें पश्चिमकिनाऱ्याचे जे देश जिंकले, त्यांत शूर्पारक, दण्डक व करहाटक हीं नांवें आहेत. दण्डक म्हणजे शूर्पारकाच्या दक्षिणेकडील कोंकण.

**दण्डकारण्य**—( दण्डक शब्द पहा. )

**दण्डकेतु**—भारतीयुद्धातील पाण्डवपक्षीय एक राजा.

**दण्डगौरी**—एक अप्सरा.

**दण्डधर**—यमास नामाभिधान.

**दण्डधार**—धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

( २ ) द्रोणाचार्यानें मारलेला पाण्डवपक्षीय राजा. ( भा. द्रोण. अ. २३ )

( ३ ) अर्जुनानें मारलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भा. कर्ण. अ. १८ )

( ४ ) युधिष्ठिराचा चक्ररक्षक एक पांचाल यास कर्णानें मारिलें. ( भा. कर्ण. )

**दण्डपाणि**—सोमवंशीय पांडवकुलांतील वहीनर राजाचा पुत्र. याचा पुत्र निमि. [ ९,२२,४५ ]
( २ ) यम व कालभैरव यांस संज्ञा.

**दण्डी**—एक रुद्रगण.
( २ ) सूर्यपार्षद दण्डाचें नामांतर.
( ३ ) भृगुकुलांतील एक ऋषि.
( ४ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**दत्त-दत्तात्रेय**—हा चाक्षुमन्वंतराच्या प्रथम पर्यायांतील त्रेतायुगांत जन्मला होता. ( मत्स्य. अ. ४७ ) ( दे भा स्कं. ४ ) अत्रि व अनुसूया यांपासून झालेला विष्णूचा सहावा अवतार. यानें अलर्क, प्रल्हाद, यदु, सहस्रार्जुन यांना ब्रह्मविद्येचा उपदेश केला. [ १, ३, ११ व ४, १,१५ ]
( २ ) स्वायंभू मन्वंतरांतील अत्रि-ऋषीच्या तीन पुत्रांपैकीं एक. याचा पुत्र निमि ऋषि. हा स्वारोचिष मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक होता. ( भा. अनु . अ. ९१ )

**दत्तामित्र**—अर्जुनानें मारिलेला पूर्व दिशेकडील एक राजा.

**दधिमुख**—रामसेनेंतील एक वानर. हा वालीच्या मधुवनाचें संरक्षण करीत असे. यालाच दधिवक्र म्हटलें आहे. ( वा. रा युद्ध. स. ३० )

**दधिमण्डोद**—पृथ्वीवरील सप्तसमुद्रांतील सहावा. याचें वेष्टण शाकद्वीपास असून हा बत्तीस लक्ष योजनें रुंद आहे, व याच्या भोंवतीं पुष्कर द्वीप आहे. [ ५,१,३३ व ५,२० २४ ]

**दधिवाहन**— खनपान राजास नामांतर.

**दधीच**—( ची ) दध्यङ् ऋषीस नामांतर

**दध्यङ्-दध्यंच**—स्वायम्भू मन्वंतरांतील अथर्वण ऋषि व चिति यांचा पुत्र. याला दध्यङाथर्वण असेहि नांव आहे. यानेंच आपल्या अस्थि चाक्षू मन्वंतरांतील इंद्रास वृत्रासुर वधाकरितां दिल्या होत्या त्यांचें विश्वकर्म्यानें वज्र करून इंद्राला दिलें. इंद्रानें यास ब्रह्मविद्या शिकवून असें सांगितलें होतें कीं, जर तूं ही विद्या कोणास सांगशील तर तुझें शीर तोडीन. एकदां अश्विनीकुमार याचेकडे विद्या मागण्याकरितां आले असतां यानें इंद्राची प्रतिज्ञा सांगितली. तेव्हां ते म्हणाले कीं, " हें तुझें प्रस्तुतचें शीर तोडून आम्हीं बाजूला ठवितों, व तुला अश्वाचें शीर जाडितों. त्या मुखानें तूं आम्हास ब्रह्मविद्या सांगितली कीं, इंद्र तुझें तें शीर तोडील, नंतर आम्हीं तुझें पूर्वीचें शीर जोडून तुला सजीव करूं." अश्वमुखानें अश्विनीकुमारास ब्रह्मविद्या सांगितल्यानें या विद्येस अश्वशिरस् असें नांव मिळालें [ ४,१,४२; ६,९,५१ व ६,१०,१३ ] ( दे भा )

**दनायु**— कश्यपऋषीच्या एका पत्नीचें नांव. हिला विक्षर, बल, वृत्र आणि वीर, असे चार पुत्र होते.

**दनु**—दक्षकन्या व कश्यप पत्नी. हिला द्विमूर्धा, शम्बर, अरिष्ट, हयग्रीव व विभावसु इत्यादि ६१ पुत्र झाले. ही संख्या भारत व मत्स्यपुराणांत शंभर दिली आहे. हिच्या पुत्रांस दानव म्हणतात [ ६,६,२९ ].

**दन्तवक्त्र**—करूष देशाधिपति वृद्धशर्मा व वसुदेवभगिनी श्रुतदेवा यांचा पुत्र. हा असुरांशानें जन्मला असून श्रीकृष्णाचे हातून मरण पावला व वैकुंठाला गेला. [ ९, २४, ३७ व १०,७८,१०]. यास वक्रदंत असेंहि म्हणतात.

( २ ) रामसभेंतील एक हास्यकार.

( ३ ) अधिराज्य देशाचा राजा.

**दन्दशूक**—सर्पांनीं व्याप्त असा एक नरक. हा प्राण्यांना पीडा देणारे दुष्ट लोक त्यांस प्राप्त होतो. [ ५,२६,३३ ]

**दम**—सूर्यवंशीय दिष्टकुलांतील मरुत्तराजाचा पुत्र. याचा पुत्र राज्यवर्धन. [ ९, २, २९ ].

(२) वैवस्वतपुत्र नरिष्यन्त राजाचा पुत्र. याचा पुत्र तृणबिंदु.

( ३ ) भृगुकुलांतील एक ऋषि.

( ४ ) अंगिराकुलांतील एक ऋषि.

( ५ ) अंगिरस संज्ञक देव विशेष.

( ६ ) विदर्भदेशाधिपति भीमराजाचा ज्येष्ठ पुत्र. दमयन्तीचा भाऊ.

( ७ ) एक ऋषि. यानेंच पण्डुराजास स्त्रीसंग होतांच मरण पावशील असा शाप दिला होता.

**दमघोष**—सोमवंशीय ज्यामघ कुलांतील चेदि राजाचा पुत्र. वसुदेवभगिनी श्रुतश्रवा याची पत्नी असून शिशुपाल पुत्र होता. [ ९,२४,३९ ].

**दमन**—एक ब्रह्मर्षि. याच्या प्रसादानें भीमराजास दम आदि तीन पुत्र व दमयन्ती कन्या झाली.

( २ ) भीमराजाचा द्वितीय पुत्र.

( ३ ) दुर्योधनपक्षीय पौरव राजा.

( ४ ) दुष्यंत पुत्र भरतास नामांतर.

**दमयन्ती**-विदर्भ देशाधिपति भीमाची कन्या व नलाची स्त्री. ही महापतिव्रता होती. हिनें आपल्या अद्वितीय सौंदर्यानें सर्व सुंदर स्त्रियांचा गर्व हरण केला, म्हणून हिला ‘ दमयंती’ असें नांव पडलें. एका सुवर्ण हंसाचे द्वारें नलराजाचे गुण श्रवण करून स्वयंवरांत हिनें इंद्रादि देवांचाहि अव्हेर करून नलाला वरिलें. पुढें द्यूतांत नलराजा सर्व राज्य हरला असतां ही एक वस्त्रानिशीं पतीबरोबर वनांत गेली. वनांत गेल्यावर हिला पती सोडून गेला असतां ही आपल्या पित्याकडे गेली, आणि नळाचा शोध लावण्याच्या उद्देशानें पुन्हां स्वयंवराचा योग आणून नलास स्वगृहीं आणलें ( भा. वन. अ. ७६ )

**दम्भ**-अधर्म व मृषा यांचा पुत्र. याला लोभ व निकृति अपत्यें झालीं. [४,८,२].

( २ ) विप्रचित्ति दानवाचा पुत्र. याचा पुत्र शंखचूड.

**दम्भोद्भव**-एक राजा. हा आपल्या सभेंतील ब्राम्हणास रोज विचारीत असे कीं, ‘ माझ्यापेक्षां अथवा माझ्या इतका बलवान कोण आहे ? ’ तेव्हां एका ब्राम्हणानें उत्तर दिलें, ‘ तुझ्यापेक्षां गंधमादन शिखरावर तप करणारे नरनारायण बलाढ्य आहेत.’ हें ऐकून हा तेथें गेला, व त्यांस यानें युद्धाचें आव्हान केलें. तेव्हां ते म्हणाले आमच्या जवळ क्रोध मुळींच नाहीं मग युद्ध कसें होणार ? परंतु यानें

हट्टच धरला तेव्हां ऋषींनीं एक मुष्टी दर्भ मंत्रून याच्या सैन्यावर टाकिले. त्याबरोबर सर्व सैन्य, कान, डोळे, नासिका इत्यादि अवयव विरहित झालें. हा प्रकार पहातांच याचा सर्व अभिमान नष्ट होऊन हा त्या ऋषींस शरण गेला. त्यांनीं यास उपदेश केला व गर्वरहित होत्साता हा राज्य करूं लागला. ( भा. उद्योग. )

**दया**-स्वायम्भूमन्वंतरांतील दक्षकन्या व धर्मपत्नी. हिचा पुत्र अभय [४,१,५०].
( २ ) धर्माच्या चार पायांपैकीं एक. [ १२,३,१८ ].

**दरद**-काश्मीरच्या उत्तरे कडील एक देश. ( दर्दिस्तान ) व तेथील पतित क्षत्रिय ( भा. सभा. अ. २७ )
( २ ) भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय एक राजा.

**दरवर**-श्रेष्ठ शंख [ १,११,१ ].

**दरिद्योत**-यदुकुलांतील दुन्दुभीचा पुत्र. याचा पुत्र पुनर्वसु [ ९,२४,२० ].

**दरीमुख** रामसेनेंतील अधिपति वानर.

**दर्दुर**-कंसाश्रित एक दैत्य. [ २,७,३४ ].

**दर्प**-कश्यप व उन्नति याचा पुत्र.
( २ ) दोन पर्वत. (वा. रा. भा. व. न.)

**दर्भक**-कलियुगांताल शिशुनागवंशीय जो अजातशत्रू त्याचा पुत्र. याचा पुत्र अजय. [ १२, १, ६ ].

**दर्भवाह**-अगस्त्यकुलांतील एक ऋषि.

**दर्भि**-( ऋषि ) यानें एकदां समुद्रांस सांगितलें कीं, तुम्ही सातजणांनीं एक असें तीर्थ उत्पन्न करा कीं, त्यांत स्नान केलें असतां तुमचें सर्वांचें स्नान केल्याचें फल मिळावें. हें ऐकून सात समुद्रांनीं अर्द्धकील तीर्थ यास उत्पन्न करून दिलें. ( भा. वन. अ. ८३. )

**दर्विसंक्रमण**-भारतवर्षीय तीर्थ.

**दर्श**-धातानामक सातवा आदित्य व सिनीवाली यांचा पुत्र [ ६,१८,३ ].
( २ ) श्रीकृष्ण व कालिन्दी यांचा पुत्र. [ १०,६१,१४.]

**दर्शक**-दर्भकाचें नामांतर.

**दर्शपूर्णमास**-एक याग [ ५,७,५ ].

**दल**-सूर्यवंशीय परीक्षित राजाचा एक पुत्र.

**दशकंठ**-( ग्रीव ) रावणाचें नामांतर.

**दशज्याति**-धूम्रा, अर्चि, ऊष्मा, ज्वलिनी, ज्वालिनी, विस्फुलिंगिनी, सुश्री, सुरूपा, कपिला आणि हव्यकव्यवाहा अशा दहा कलांनीं युक्त म्हणून अग्नीचें नामांतर (भा. आदि. अ.१)

**दशपुर**-रन्तिदेव राजाची राजधानी.

**दशमी**-ब्रह्मदेवाची मानसकन्या.

**दशरथ**-सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील नारीकवच अथवा मूलक राजाचा पुत्र. याचा पुत्र ऐडविड [ ९ ९ ४१ ].
( २ ) इक्ष्वाकुकुलांतील रघुराजाचा पौत्र व अजराजाचा पुत्र. याला कौसल्या, कैकयी व सुमित्रा प्रमुख अनेक स्त्रिया होत्या; पण पुत्र मात्र नव्हता. म्हणून यानें शरयूतीरीं शृंगऋषी-कडून पुत्रकामेष्टी यज्ञ करविला. तेव्हां अग्निकुंण्डांतून प्राजापत्य पुरुष निघाला व त्यानें राजाला पायसपात्र दिलें. राजानें तें आपल्या तिन्हीं राण्यांस वाटून दिलें. त्यायोगें कौसल्येला चैत्र शुद्ध नवमीच्या

माध्यान्हकाळीं पांच ग्रह उच्चीचे असतां पुत्र झाला, तो राम. मीनलग्नीं पुष्य नक्षत्रीं कैकेयीला पुत्र झाला, तो भरत. आणि कर्कलग्नीं आश्लेषानक्षत्रीं सुमित्रेला लक्ष्मण आणि शत्रुघ्न असे दोन पुत्र झाले. रामाच्या यौराज्याभिषेक प्रसंगीं मंथरेच्या सांगण्यावरून कैकयीनें रामास वनवास आणि भरतास राज्य, हे दोन वर मागितले. ते ऐकतांच यास अति दुःख झालें, व राम सीता-लक्ष्मणासह अरण्यांत गेल्यावर हा सहा दिवस शोक व मूर्च्छा यांनीं व्याप्त होऊन सातव्या दिवशीं पूर्वशापानुसार पुत्रशोकानें मृत्यु पावला. यानें आपली शांता नामक कन्या रोमपादराजाला दत्तक दिली होती. ती ऋष्यशृंग ऋषीची पत्नी. [ ९, १०, १ व ९, २३,७–१० ] ( वा. रा. बाल. )

( ३ ) सोमवंशीय कथवंशातील नवरथाचा पुत्र. याचा पुत्र शकुनि. [ ९, २४. ४ ]

( ४ ) मौर्यवंशीय अशोकाचा नातु. हा अशोकानंतर राज्यावर आला. हा पूर्वेकडील राजा होता. याचा भाऊ संप्रति. ( वायु. विष्णु. )

**दशारण्या**–एक अरण्य.

**दशार्ण**–एक प्राचीन देश. याची राजधानी वेत्रवती नदीच्या कांठीं व हल्लींच्या माळव्याच्या उत्तरेस विदिशा होती.

**दशार्णा**–माळव्यांतलि नदी. हल्लींची दशान ही बिरवा नदीस मिळते.

**दशार्ह**–सोमवंशीय यदुकुलांतील निर्वृति अथवा विदूरथ राजाचा पुत्र. याचा पुत्र व्योम. दाशार्ह कुळाचा मूळ पुरुष [ ९, २४, ३ ].

**दशावर**–वरुण लोकांतील एक असुर.

**दशाश्व**–सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजाच्या शतपुत्रांपैकीं एक. याचा पुत्र मदिराश्व. ( भा. अनु. अ. २ )

**दशाश्वमेध**–वाराणसीतील एक तीर्थघाट.

**दंष्ट्र**–लंकेंतील एक राक्षस. ( वा. रा. )

**दस्र**–अश्विनीकुमारांपैकीं एक याच्यापासून सहदेव झाला. [ ९,२२,२८ ]

**दहन**–एकादश रुद्रांपैकीं एक.

( २ ) पाकक्रिया प्रशस्त अग्नी.

## दा

**दाकव्य**–वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**दाकायन**–,, ,,

**दाक्षापायन**–कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**दाक्षायाणी**–स्वायंभू मन्वंतरांतील दक्षकन्या सतीचें नामांतर.

**दाक्षि**–अंगिरा कुलांतील एक ऋषि.

( २ ) अत्रि कुलांतील एक ऋषि.

**दान**–धर्माचा एक पाय [ १२, ३, १८ ].

**दानपति**–अक्रूराचें नामांतर [ १०,४९,२६ ]

**दानव**–कश्यप व दनु यांचे पुत्र. हे रसातलांत राहतात [ ५, २४, ३० ]

( २ ) कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**दानव्रत**–शाकद्वीपांतील लोक [ ५,२०,२७ ]

**दामघोष**–शिशुपालाचें नामांतर.

**दामचंद्र**–भारती युद्धांतील पाण्डवपक्षीय एक राजा. ( भा. द्रोण. )

**दारद**–दरददेशीय राजा व तेथील लोकांस साधारण नांव.

**दारुक**–श्रीकृष्णाचा सारथि. हा श्रीकृष्णबलरामाकरितां आलेल्या दिव्य रथा-

बरोबर आला होता. श्रीकृष्ण निजधामाला गेल्याबर हा द्वारकेस गेला. [ १०, १५, ६६ व ११, ३०, ४१] याला काश्यपेय असें नामांतर होतें.
( २ ) महिषासुराचा सारथि.

**दार्व**–भारतवर्षीय उत्तरत्रिगर्तांच्या उत्तरेकडील देश. ( भा. सभा. अ. २७)

**दाल्भ्य**–उत्तममन्वतरांतील सप्तर्षींपैकीं एक.
( २ ) द्युमत्सेन राजाचा अरण्यांतील सहचर ऋषि. ( भा. वन. )

**दाल्भ्यघोष** एक ब्रह्मर्षि.

**दाशपूर**–एक नगर.

**दाशरथि**–दशरथ पुत्रांस संज्ञा.

**दाशार्ण**-( क )-दशार्ण देशांतील लोक.

**दाशार्ह**–यदुवंशीय व्योम राजास नामांतर व त्याचे कुल श्रीकृष्णासहि ही संज्ञा आहे [ ३, १, २९ ]

**दाशेरक**-भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा

## दि

**दिण्डीपुण्यकर**–भारतवर्षीय तीर्थ.

**दिती**–वैवस्वत मन्वंतरांतील दक्षकन्या व कश्यपपत्नी दैत्यांची माता. ही अवेळीं कामातुर होऊन गर्भसंभव झाल्यानें हिला हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु हे क्रूर पुत्र झाले. हिचे सर्व पुत्र देवांकडून मृत झाले, तेव्हां इंद्रनाशार्थ ही पुंसवनव्रत करीत असतां इंद्रानें व्रतभंगाचा योग साधून हिच्या शरीरांत प्रवेश केला व पोटांतील गर्भाचे ४९ तुकडे केले. ते मरुद्गण म्हणून झाले [४,१४,७–३९,व६,१७,७७]

**दित्स**–कश्यपकुलांतील एक ऋषि.

**दिलीप**–सूर्यवंशीय सगर कुलांतील अंशुमान् राजाचा पुत्र. याची स्त्री सुदक्षिणा व पुत्र भगीरथ, यानें पृथ्वीवर गंगा आणण्याकरितां तीस हजार वर्षे तपश्चर्या केली [ ९, ९, २ ]
( २ ) सोमवंशीय कुरुपुत्र जन्हुचे वंशांतील ऋष्य राजाचा पुत्र. याचा पुत्र प्रतीप. [ ९, २२, ११ ]

**दिवस्पती**–तेराव्या देवसावर्णि मन्वंतरांत होणारा इन्द्र [ ८, १३, ३१ ]

**दिवाक**–( र ) सूर्यवंशीय कलियुगांतील भानुराजाचा पुत्र. याचा पुत्र सहदेव. [ ९, १२, १० ]

**दिवावष्टाश्व**-कश्यप कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**दिविरथ**–सोमवंशीय अनुकुलांतील खनपान राजाचा पुत्र. याचा पुत्र धर्मरथ. [ ९, २३. ६ ]

**दिवोदास**–सोमवंशीय आयुपुत्र क्षत्रवृद्ध कुलांतील भीमरथाचा पुत्र. याचा पुत्र द्युमान् अथवा प्रतर्दन. हा ययाति कन्या माधवीपासून झाला होता. ( गालव शब्द पहा ) [९, १७, ६]
( २) सोमवंशीय पुरुकुलातील मुद्गलाला झालेल्या जुळ्या कुलांतील पुत्र. याची भगिनी अहल्या. याचा पुत्र मित्रेयु. [ ९, २ , ३४ व ९, २२, १ ]
( ३ ) काशीपति वसुदेव राजाचा पुत्र. याला सौदास असेंहि म्हणतात. यानें इंद्राच्या आग्रहावरून भागीरथी व गोमती यांच्यामध्यें वाराणसी पुरी वसविली. हैहय राजांनीं त्रास दिल्यामुळे भारद्वाज ऋषीस हा शरण गेला व शत्रुनाश करणारा पुत्र मागितला. त्यानें पुत्रकामेष्टी यज्ञ केल्यावर जो पुत्र झाला तो प्रतर्दन.

**दिवोदास**—भृगुकुलांतील एक ऋषि.

**दिव्य**—सोमवंशीय विदर्भपुत्र क्रथकुलांतील सात्वताचा तिसरा पुत्र. [ ९,२२,६ ]

**दिव्यकटपूर**-अमरपर्वताच्या दक्षिणचें नगर

**दिशा**—भारतवर्षीय एक नदी.

**दिष्ट**—वैवस्वत-श्राद्धदेव-मनु व श्रद्धा यांच्या दहा पुत्रांपैकीं एक.[८,१३,२]

## दी

**दीक्षा**—वामदेव रुद्राची पत्नी. [३,१२,१३]

**दीप्तकेतु**—नवव्या दक्षसावर्णि मनूचा एक पुत्र. [ ८, १३, १८ ]

**दीप्तिमान्**-आठव्या सावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक. [ ८, १३, १५ ]

(२) श्रीकृष्ण व रोहिणी यांचा एक पुत्र. [ १०, ६१, १८ ]

**दीप्तोद**—भारतवर्षीय एक तीर्थ.

**दीर्घ**—पण्डुराजानें मारिलेला मगधदेशीय एक राजा.

**दीर्घजिव्ह**— दनुपुत्र एक दानव.

( २ ) पातालांतील एक नाग.

**दीर्घजिव्हा**— अशोकवनिकेंतील राक्षसी.

**दीर्घतमस्**—सोमवंशीय आयुकुलांतील राष्ट्र राजाचा पुत्र. याचा पुत्र धन्वंतरी राजा. [ ९,१७,४ ]

( २ ) बृहस्पतीचा बंधु जो उतथ्य त्याचा पुत्र. हा जन्मांध होता. याचे पासून अनुकुलांतील बलीच्या स्त्रीला अंग, वंग, कालिंग, सुह्म, पुंड्र आणि अंध्र असे सहा पुत्र झाले. [९,२३,५,]

**दीर्घदंष्ट्र**—एक रुद्रगण.

**दीर्घप्रज्ञ**—भारतीयुद्धांतील दुर्योधन पक्षीय एक राजा. ( भा. आदि. )

**दीर्घबाहु**—सूर्यवंशीय खट्वांग राजाचा पुत्र. याचा पुत्र रघु. [ ९,१०,१ ]

( २ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**दीर्घलोचन**— ,, ,,

**दीर्घसत्र**—भारतवर्षीय तीर्थ.

**दीर्घायु**—भारती युद्धांतील दुर्योधन पक्षीय अच्युतायु राजाचा पुत्र.

## दु

**दुन्दुभि**—सोमवंशीय यदुकुलांतील अन्धक राजाचा पुत्र. याचा पुत्र दरिद्योत. [ ९,२४,१० ]

( २ ) मायासुर व हेमा अप्सरा यांचा पुत्र. यानें तप करून हजारों हत्तींचें बल मिळविलें होते. हा एकदां महिषाचें रूप घेऊन समुद्राशीं युद्ध करण्यास गेला असतां समुद्र म्हणाला, 'मी तुजबरोबर युद्ध करण्यास समर्थ नाहीं, तूं हिमालयाकडे जा.' हें ऐकून हा हिमालयाकडे गेला. त्यानें यास वालीकडे पाठविलें. याची घोर गर्जना ऐकतांच वाली इंद्रदत्त माला गळयांत घालून युद्धास आला, व अनेक दिवस युद्ध करून यास ठार मारिलें.

( ३ ) एक गंधर्वी. ही ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून मंथरा झाली होती.

**दुःप्रहर्ष**—धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**दुराराधन**— ,, ,,

**दुरितक्षय**—सोमवंशीय पुरुकुलांतील मन्यु पुत्र महावीर्याचा पुत्र. याला त्रय्यारुणि, कवि आणि पुष्करारुणि, असे तीन पुत्र होते [ ९,२१,१९ ].

**दुरुक्ति**—क्रोध व हिंसा यांची कन्या. हिचा भाऊ कलि. [ ४,७,३ ]

**दुर्ग**—हिरण्याक्षाच्या वंशांतील रुरुचा पुत्र. यास दुर्गम असेंहि म्हणतात. याला दुर्गेनें मारिलें.

**दुर्गंधा**—शंतनु पत्नी सत्यवतीचें नांव.

**दुर्गम**—एक रुद्रगण.

( २ ) दुर्गासुराचें नामांतर.

**दुर्गा**—योगमायेचें नांव. [ १०,२,११ ]

( २ ) दुर्ग राक्षसानें ब्रह्मदेवाला प्रसन्न करून संपूर्ण वेद यावेत असा वर मागितला. तो मिळतांच याला सर्व वेद स्फुरले, व सर्व ब्राह्मण वेद विसरले. त्यामुळें यज्ञादि कर्में बंद होऊन यानें सर्व देवांचीं स्थानें हरण केलीं. तेव्हां देवांनीं आदिशक्तीचें आराधन केलें. देवी प्रकट होऊन 'वर मागा' म्हणून म्हणत असतां, अशक्तपणामुळें देवास बोलवेना. तेव्हां हिनें शतावधि नेत्रांनीं कृपादृष्टीनें त्यांचेकडे पाहून हातांतील शाकांनीं त्यांचें भरण केलें, म्हणून हिला शताक्षी, शाकम्भरी, अशीं नांवें मिळालीं. या राक्षसाचा नाश केल्यामुळें दुर्गा असें नांव पडलें. (दे.भा.)

( ३ ) भारतवर्षीय नदी.

**दुर्गालदेश**—भारतवर्षीय देश.

**दुर्जय**—दनपुत्र एक दानव. [ ६,६,३१ ]

( २ ) सूर्यवंशीय सुवीर राजाचा पुत्र. याचा पुत्र दुर्योधन. ( भा. अनु. )

( ३ ) एक रुद्रगण.

( ४ ) खर राक्षसाचा एक अमात्य.

( ५ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( ६ ) कर्णानें मारलेला पाण्डव पक्षीय एक राजा. ( भा. कर्ण. )

( ७ ) दुर्योधनपक्षीय एक राजा. (भा.)

**दुर्जया**—इल्वल व वातापि यांची नगरी. हिला मणिमती असेंहि म्हणत.

**दुर्दमन**—सोमवंशीय पाण्डव कुलांतील शतानीक राजाचा पुत्र. याचा पुत्र वहीनर. [ ९,२२,४३ ]

**दुर्धर**—महिषासुराचा अनुयायी एक राक्षस.

( २ ) रावणाचा एक प्रधान. (वा.रा.)

( ३ ) रामसेनेंतील एक पराक्रमी वानर

**दुर्धर्ष**—मारुतीनें मारिलेला रावणाचा सेनापति. ( वा. रा. सुंदर. )

( २ ) रामानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस. ( वा. रा. युद्ध. )

( ३ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**दुर्बुद्धि**—धृतराष्ट्र नागाचा पुत्र. ( बभ्रुवाहन शब्द पहा )

**दुर्मद**—सोमवंशीय यदुकुलांतील भद्रसेन राजाचा पुत्र [ ९,२३,२३ ].

( २ ) वसुदेव व रोहिणी यांचा एक पुत्र [ ९,२४,४६ ].

( ३ ) वसुदेव व पौरवी यांचा एक पुत्र. [ ९,२४,४७ ].

( ४ ) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**दुर्मना**—द्रुह्युकुलांतील धृतराजाचा पुत्र. याचा पुत्र प्रचेता. [ ९,२३,१५ ].

**दुर्मर्ष**—एक असुर. समुद्रमंथनानंतर झालेल्या देव–दैत्य युद्धांत याचें कामदेवाशीं युद्ध झालें. [ ८,१०,३३ ].

**दुर्मर्षण**—संजय व राष्ट्रपाली यांच्या दोन पुत्रांपैकीं एक. [९,२४,४२ ].

( २ ) धृतराष्ट्राचा एक महारथी पुत्र.

**दुर्मित्र**—कलियुगांत बाल्हीक राजानंतर झालेल्या पुष्पमित्र राजाचा पुत्र. [ १२,१,३४ ].

**दुर्मुख**–रामानें मारिलेला रावणपक्षीय एक राक्षस. [ ९,१०,१८ ].
( २ ) कद्रुपुत्र एक नाग.
( ३ ) वरुणसभेंतील एक असुर.
( ४ ) रामसेनेंतील एक वानर.
( ५ ) पाण्डवपक्षीय जनमेजय पांचालाचा पिता. ( भा. द्रोण. ).
( ६ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.
( ७ ) महिषासुर पक्षीय एक असुर

**दुर्मुखी**–अशोकवनिकेंतील एक राक्षसी.

**दुर्योधन**–( सुयोधन ) धृतराष्ट्र व गांधारी यांच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ [ ९,२२, ३६ ]. हा कलीच्या अंशानें जन्मला होता. ( भा. आदि.) हा पाण्डवांचा कट्टा शत्रु होता. गदायुद्धांत बलरामाचा हा शिष्य असून प्रवीण होता [ १०, ५७, २६ ]. युधिष्ठिराच्या मयसभेंत यास जलस्थल भ्रम झाला होता [ १०,७५,३६ ]. हा भारतीययुद्धांत भीमाबरोबर गदायुद्ध करीत असतां ऊरुभग्न होऊन मृत झाला [ १,७,१३]. याचा पुत्र लक्ष्मण व कन्या लक्ष्मणा ती कृष्णपुत्र सांबाला दिली होती. [ १०,६८,१]
( २ ) सूर्यवंशीय दुर्जय राजाचा पुत्र. याला साक्षात् नर्मदेनें वरिलें होतें. तिच्यापासून झालेली कन्या सुदर्शना ती यानें अग्नीला दिली होती. (भा.)

**दुर्व**–सोमवंशीय पाण्डवकुलांतील नृपंजय राजाचा पुत्र. याचा पुत्र तिमि. [ ९,२२,४२ ].

**दुर्वाक्षी**–वसुदेवाचा भाऊ जो वृक त्याची पत्नी. हिला तक्ष, पुष्कर, शाल, इत्यादि पुत्र झाले. [ ९,२४,४३ ].

**दुर्वासा**–स्वायंभुव मन्वंतरांतील अत्रि व अनुसूया यांचा पुत्र. यानें इंद्राला 'तुझी संपत्ती समुद्रांत जाईल ' असा शाप दिला, व याच्याच उःशापानें ती समुद्रमंथनानें पुन्हा बाहेर आली. [ ८,५,१६ ].
( २ ) वैवस्वत मन्वंतरांतील अत्रि व अनुसूया यांस रुद्रांशानें झालेला पुत्र. हा महातपस्वी व तामसी होता. [ ४,१,१५ ] यानें अम्बरीष राजाचा छळ केला [९,४,३७]. कुन्तीला देवहूती विद्या दिली [ ९,२४,३२ ]. हा दुर्योधनाच्या सांगण्यावरून दहा हजार शिष्यांसह पाण्डव वनवासांत असतां त्यांचें सत्व हरण करण्यास गेला पण श्रीकृष्णाच्या कृपेनें पांडवांचें सत्व हरण न होतां उलट पांडवांस आशिर्वाद देऊन हा आपल्या शिष्यांसह परस्पर निघून गेला (भा. वन.)

**दुर्विरोचन**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**दुर्विषह**– ,, ,,

**दुःशल**– ,, ,,

**दुःशला**–धृतराष्ट्राची कन्या व सिंधुदेशाधिपति जयद्रथाची पत्नी [९,२२-२६].

**दुःशासन**–धृतराष्ट्राचा एक पुत्र. याला दुर्योधनानें यौवराज्य दिलें होतें. यानें भरसभेंत द्रौपदीचें वस्त्र हरण करण्याचा प्रयत्न केला. शेवटीं भीमानें याचा वध करून प्रतिज्ञेप्रमाणें रक्तपान केलें [ ३,१,१४ ].

**दुष्कन्त**–रावणानें जिंकलेला एक राजा.

**दुष्कर्ण**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**दुष्प्रधर्षण**– ,, ,,

**दुष्यन्त**–सोमवंशीय पूरुकुलांतील रैभ्य राजाचा पुत्र. याला लक्षणा व शकुंतला अशा दोन पत्न्या होत्या. एकदां हा राजा मृगयेकरितां अरण्यांत फिरत असतां, कण्व ऋषीच्या आश्रमाजवळ गेला, तेथें शकुंतलेशीं गांधर्व विधीनें विवाह केला. पुढें शकुंतलेस पुत्र झाला त्यास सर्वदमन अथवा भरत अशीं नांवें होतीं. कण्वाच्या आज्ञेनें पुत्रासह शकुंतला राजाकडे आली असतां, विस्मृतीमुळें राजा तिचा स्वीकार करीना. परंतु इतक्यांत आकाशवाणी होऊन राजाची शंका दूर झाली व यानें पुत्रासह शकुंतलेचा स्वीकार केला [९,२०,७व९,२३,१८]

**दुःसह**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**दुःस्वभाव**–धृतराष्ट्र नामक नागाचा पुत्र.

## दू

**दूषण**–खर राक्षसाचा सेनापती. याला वज्रवेग व प्रमाथि असे दोन भाऊ होते. हा जनस्थानांत रामाचे हातून मृत्यु पावला. [ ९,१०,९ ]

**दूषणा**–ऋषभदेववंशीय भौवन राजाची स्त्री. हिचा पुत्र त्वष्टा. [ ५,१५,९ ]

## दृ

**दृढ**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. ( २ ) धृतराष्ट्राजा एक पुत्र.

**दृढक्षत्र**– ,, ,,

**दृढच्युत**–अगस्त्य ऋषि व कृष्णेक्षणा यांचा पुत्र. याचा पुत्र इध्मवाह. [ ४,२८,३२ ].

**दृढद्युम्न**–अगस्त्यकुलांतील एक ऋषि.

**दृढधन्वा** द्रौपदीस्वयंवरांत आलेला एक राजा. ( भा. आदि. अं. १८६ )

**दृढनेत्र**-विश्वामित्र ऋषीचा एक पुत्र.

**दृढनेमि**–सोमवंशीय पूरुकुलांतील द्विमीढ वंशीय कृतिमान अथवा सत्यधृति राजाचा पुत्र. याचा पुत्र सुपार्श्व. [ ९,२१,२७ ]

**दृढरथ**–एक राजर्षि. ( भा. अनु. ) ( २ ) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**दृढरुचि**–प्रियव्रत पुत्र हिरण्यरेता, त्याच्या सात पुत्रांतील तिसरा. याचा खंड दृढरुचि नांवानेंच प्रसिद्ध आहे. [ ५,२०,१४ ]

**दृढवर्मा**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**दृढसंध**– ,, ,,

**दृढसेन**–द्रोणाचार्यांनीं मारिलेला पाण्डवपक्षीय राजा. ( भा. द्रोण. )

**दृढस्यु**–अगस्त्य व लोपामुद्रा यांचा पुत्र. हा मोठा तपस्वी व विद्वान असे. लहानपणीं हजार पुरुषांनीं उचलणारें समिधांचें ओझें हा सहज लीलेनें आणीत असे, म्हणून यास इध्मवाह हें नांव मिळालें होतें. क्रतु ऋषि अनपत्य असल्यामुळें त्यानें यास आपला पुत्र मानिलें होतें. (भा.वन.)

**दृढहनु**—सोमवंशीय अजमीढपुत्र बृहदिषूच्या कुळांतील सेनजित् राजाचा पुत्र. [ ९,२१,२३ ]

**दृढहस्त**—धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**दृढायुध**— ,, ,,

**दृढाश्व**—सूर्यवंशीय कुवलयाश्व राजाच्या एकवीस हजार पुत्रांतून शिल्लक राहि-

लेल्या तीन पुत्रांपैकी ज्येष्ठ. याचा पुत्र हर्यश्व. [ ९,६,२४ ]

**दृढास्य**—अगस्त्य व लोपामुद्रा यांचा एक पुत्र व दृढस्युचा भाऊ (मत्स्य.अ ३०१)

**दृषद्वती**—भारतवर्षीय नदी. हस्तिनापुर व कुरुक्षेत्र यांच्यामध्यें, आर्यावर्त देशाची पूर्वमर्यादा. ही सरस्वतीला मिळते अंबाला व सरहिंद यांच्या मधून ही वहाते [ ५,१९,१८]

( २ ) सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील हर्यश्व राजाची पत्नी.

**दृढरथ** —एक राजर्षि.

## दे

**देव**—ज्यांस निमेषोन्मेषांचा व्यापार नाहीं, ज्योतिरूप देह असल्यामुळें छाया नाहीं व पृथ्वीवर आले असतां भूमीस पादस्पर्श नाहीं, असे जे सत्यादि लोकांत राहणारे ते देव. अदितीच्या पुत्रांसहि ही संज्ञा आहे ब्रह्मदेवापासून नागापर्यंत, वालखिल्य, नारद आदि-ऋषि, उर्वश्यादिक अप्सरा, नद्या व पर्वत यांच्या देवता, या सर्वांस देव अशी संज्ञा आहे. (भा. अनु. १६५) सध्यां देव हा शब्द ईश्वरवाचक आहे. पण हा शब्द मूळचा विशिष्ट लोकांचा वाचक असावा. कारण, देव आणि मनुष्य हे शेजारीं असून तपोबलानें देवांचा उत्कर्ष झाला आणि मनुष्यांचा अपकर्ष तसाच राहिला असें आपस्तंब म्हणतो. देवांस मनुष्यांप्रमाणेंच नायकामुळें, बागा, राजधान्या इत्यादि असून त्यांच्या राजास इंद्र म्हणत. कोटी व कुळी हे शब्द मूळचे एकच असावेत. देवांचीं तेहेतीस कुळें होतीं. आदित्यांची बारा ( द्वादशादित्य ) वसूंचीं आठ ( अष्टवसु ) रुद्रांची अकरा ( एकादशरुद्र ) आणि इंद्र व प्रजापती यांचीं दोन.

**देवऋषभ**—वैवस्वत मन्वंतरांत धर्म ऋषि व भानु यांचा पुत्र. याचा पुत्र इंद्रसेन. [ ६,६,५ ]

**देवक**--कौंचद्वीपांतील लोक विशेष. [५,२०,२२]

( २ ) युधिष्टिर व पौरवी यांचा पुत्र. [ ९,२२,३० ]

( ३ ) सोमवंशीय यदुकुलांतील आहुक राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यास देववान, उपदेव, सुदेव आणि देववर्द्धन असे चार पुत्र; व धृतदेवा, शांतिदेव, उपदेवा, श्रीदेवा, देवरक्षिता, सहदेवा आणि देवकी अशा सात कन्या होत्या, त्या सर्व वसुदेवाला दिल्या होत्या. [ ९,२४,२१ ]

**देवकल्प**—ब्रह्मदेवाचा सहावा दिवस.

**देवकी**-देवकाची एक कन्या व वसुदेवाची एक पत्नी व कंसाची चुलत बहीण. ही पृश्नि व नंतर अदिती असून आतां देवकी रूपानें आली होती. हिला कीर्तिमान, सुषेण, भद्रसेन, ऋजु, संमर्दन आणि भद्र हे पुत्र होऊन ते कंसाचे हातून मृत झाल्यावर बलराम गर्भांत आला; पण तो तेथून रोहिणीच्या उदरांत गेला. नंतर भगवान श्रीकृष्ण स्वतः पुत्ररूपानें आले. हिच्या विवाहप्रसंगीं हिच्या ८ व्या

पुत्रापासून तुला मृत्यु येईल असें कंसाला आकाशवाणीनें सांगितल्यामुळें कंसानें हिला कारागृहांत ठेवलें होतें [९,२४,५४ व १०,३,३२,४२] कंसवधानंतर कारागृहांतून मुक्तता व श्रीकृष्ण बलरामाची भेट. [ १०, ४४, ५० ]. स्यमंतपंचक क्षेत्रीं यशोदा इत्यादिकांची भेट [ १०, ८२, ३६ ]. श्रीकृष्णानें करविलेली मृतपुत्रांची भेट [ १०, ८५, ५३ ] देवकीचा मृत्यु [ ११ ३१, १९ ]

( २ ) ऋषभदेववंशीय उद्गीथाची पत्नी. हिचा पुत्र प्रस्ताव [ ५,१५,६ ]

**देवकुल्या**- स्वायंभूमन्वंतरांतील मरीचि ऋषीचा पुत्र पूर्णिमा, त्याची कन्या. हिनें पूर्वजन्मीं भगवंताचें पादप्रक्षालन केलें होतें, त्या पुण्यप्रभावानें ही सांप्रत स्वर्धुनी झाली आहे. [ ४, १, १४]

**देवकूट**-मेरूच्या परिस्तरणगिरींतील पर्वत. [ ५, १६, २७ ]

( २ ) भारतवर्षीय एक तीर्थ.

**देवक्षेत्र**-सोमवंशीय ज्यामघकुलांतील क्रथ वंशांत जन्मलेल्या देवरात राजाचा पुत्र. याचा पुत्र मधु [ ९,२४,५ ]

**देवगंधर्व**-कश्यप व अरिष्टा यां पासून झालेले जे पुत्र ते. [ ६,६,२९ ]

( २ ) कश्यपपत्नी मुनीचे पुत्र. भीमसेन, उग्रसेन, सुपर्ण, वरुण, गोपती, धृतराष्ट्र, सूर्यवर्चा, सत्यवाक, अर्कपर्ण प्रयुत, भीम, चित्ररथ, शालिशिरा, पर्जन्य, कलि आणि नारद. ( भा. आदि. अ. ६५ )

( ३ ) कश्यप व प्राधा यांचे पुत्र. सिद्ध पूर्ण, बर्हि, पूर्णायु, ब्रह्मचारी, रतिगुण, सुपर्ण, विश्वावसु, भानु आणि सुचन्द्र याशिवाय अतिबाहु, हाहा, हूहू, तुंबरु, हे चार पुत्र हिचेच असल्याचें आढळतें.

**देवगर्भा**-कुशद्वीपांतील नदी [५,२०,१५]

**देवगिरी**-चर्मण्वतीजवळचा एक पर्वत. [ ५, १९, १६ ]

**देवगुह्य**-सावर्णि मन्वंतरांतील एक ब्राह्मण. याचे पासून सरस्वति स्त्रीचे ठिकाणीं सार्वभौम नामक अवतार होईल. [ ८, १३, १७ ]

**देवज**-सूर्यवंशीय तृणबिंदूच्या कुलांतील संयमनामक राजाच्या दोन पुत्रांपैकीं एक. [ ९,२,३४ ]

**देवजिव्ह**-अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**देवताजित्**-ऋषभदेवपुत्र भरत त्याचा पुत्र सुमति त्यास वृद्धसेनेपासून झालेला पुत्र. याची स्त्री आसुरि व पुत्र देवद्युम्न. [ ५, १५, २ ]

**देवदत्त**-पातालांतील सर्पाधिपतिपैकीं एक. [ ५, २४, ३१ ]

( २ ) सूर्यवंशीय नरिष्यंत कुलांतील उरुश्रवा राजाचा पुत्र. याचा पुत्र अग्निवेश्य [ ९, २, २० ].

( ३ ) भगवान कल्कीच्या अश्वाचें नांव. [ १२, २, १९ ]

( ४ ) इंद्रानें दिलेला अर्जुनाचा शंख. ( भा. वन. अ. १६८ )

( ५ ) शरीरांतील उपप्राणांपैकीं एक.

**देवदूत**-एक देवर्षि.

**देवद्युम्न**–ऋषभकुलांतील देवताजित् व आसुरी यांचा पुत्र. याला धेनुमती स्त्री व परमेष्ठी पुत्र होता. [५, १५, ३]

**देवधानी**–मानसोत्तर पर्वतावरील द्वादशादित्यांतील इंद्र आदित्याची नगरी. हिला वस्त्वेकसारा व माहेंद्री अशीं ही नांवें आहेत [ ५, २१, ७ ]

**देवपति**–भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**देवपथ**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**देवपाल**–शाकद्वीपातील पर्वत.[५,२०,२६]

**देवप्रस्थ**–एक गोप. श्रीकृष्ण व बलराम यांचा मित्र. [ १०, २२, ३१ ]

( २ ) अर्जुनानें जिंकलेली सेनाबिंदु राजाची उत्तरेकडील नगरी.

**देवप्रहरण**–स्वर्गांतील देव विशेष. (मत्स्य)

**देवबाहु**–सोमवंशीय सात्वतकुलांतील हृदीक राजाचा एक पुत्र. [ ९, २४, २७ ]

**देवभाग** सोमवंशीय सात्वत कुलांतील शूर व मारिषा यांच्या दहा पुत्रांतील दुसरा. कंसभगिनी कंसा ही याची स्त्री आणि चित्रकेतु व बृहद्बल हे दोन पुत्र होत. [ ९, २४, २८–४० ] उद्धवहि याचाच पुत्र होता.

**देवभूति**—कलियुगांतील शुंगघराण्यांतील भागवत राजाचा पुत्र. हा अखेरचा राजा होय ! [ १२, १, १८ ]

**देवमत**–एक ब्रह्मर्षि ( भा. अश्वमेध. )

**देवमति**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**देवमित्र**–माण्डूकेय ऋषीचा शिष्य. यानें सौभरी वगैरे शिष्यांना शाकलसंहिता सांगितली. [ १२, ६, ५६ ]

**देवमीढ**-विदेहवंशीय कृतिरथ जनकाचा पुत्र. याचा पुत्र विसृत. [ ९, १३, १६ ]



**देवमीढ**–सोमवंशीय सात्वत कुलांतील हृदीक राजाचा पुत्र. याचा पुत्र शूर. [ ९, २४, २७ ]

**देवयजन**–मांधाता राजानें यज्ञ केलेलें स्थळ

**देवयान**--कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( २ ) देवांकडे जाणारा मार्ग हा ज्ञानमय व प्रकाशयुक्त असतो.

**देवयानी**–प्रियव्रताची कन्या ऊर्जस्वती व शुक्राचार्य यांची कन्या [५,१,३४] शुक्राचार्याकडे कच संजीवनीविद्या शिकण्यास आला असतां हिचें त्याच्यावर प्रेम बसले, व हिनें आपला मनोदय कचास कळविला. परंतु गुरुभगिनीचें नातें असल्यामुळें कचानें हिची विनंती अमान्य केली, म्हणून हिनें त्याला शाप दिला. तेव्हां त्यानेंहि हिला शाप दिला कीं, ' तुला ब्राह्मणपुत्र वरणार नाहीं. ' [ ९,१८,२२ ]. एकदां दैत्यकन्या शर्मिष्ठेसह ही नग्न स्थितींत जलक्रीडा करीत असतां, शंकर पार्वतीसह नंदीवर बसून त्या मार्गानें जाऊं लागला. त्यास पाहतांच गडबडीनें सर्व मुलींनीं आपापलीं वस्त्रें परिधान केलीं. त्यांत चुकून देवयानी व शर्मिष्ठा यांच्या वस्त्राची अदलाबदल झाली त्यावरून मानापमानासंबंधानें दोघींचें भांडण होऊन राजकन्या शर्मिष्ठेनें हिला नग्न स्थितींतच कूपांत लोटलें; व आपण घरीं निघून गेली. त्याच वेळीं शिकारीस निघालेला ययातीराजा तेथें आला, व त्यानें हिला कूपांतून वर काढिलें, आणि हिच्या

इच्छेप्रमाणें हिचें पाणिग्रहण केलें. झालेल्या अपमानाची फेड म्हणून राजगुरु शुक्राचार्य यांच्या आज्ञेप्रमाणें शर्मिष्ठेनें हिचें दासीपण स्वीकारलें. हिला यदु आणि तुर्वसु असे दोन पुत्र होते. [ ९,१८,१ ते ३३] मत्स्य पुराणांत इन्द्रकन्या जयन्ती व वारुणि भृगुपुत्र शुक्र यांची कन्या देवयानी असें म्हटलें आहे.

**देवरक्षिता**-देवकाची कन्या व वसुदेवाची स्त्री. हिला गद वगैरे नऊ पुत्र झाले. [ ९,२४,२३,५२ ].

**देवरत**–विश्वामित्रकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**देवरात**–विदेहवंशीय सुकेतुजनकाचा पुत्र. याचा पुत्र बृहद्रथ. शंकरानें आपलें धनुष्य याच्या घरीं ठेविलें होतें, तें पुढें सीरध्वज जनकानें सीतास्वयंवरांत पणास लाविलें असतां त्याचा रामाने भंग केला. [ ९,१३,१४ ]

( २ ) शुनःशेपाचें नामांतर. ( शुनःशेप शब्द पहा ) [ ९,१६,३० ]

( ३ ) सोमवंशीय विदर्भ कुलांतील करंभि राजाचा पुत्र. याचा पुत्र देव क्षेत्र. [ ९,२४,५ ]

**देवरारी**—अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**देवल**—परीक्षित राजाकडे आलेला एक ऋषि. [ १,१९,१० ] यानें देवलोकांत पितरांना महाभारत सांगितलें.

( २ ) कृशाश्व व धिषणा यांच्या चार पुत्रांपैकीं दुसरा [ ६,६,२० ].

( ३ ) चाक्षूष वैवस्वत मन्वंतरापूर्वीचा एक ऋषि. यानें हूहू गंधर्वाला शाप दिला होता. [ ८,४,३ ]

( ४ ) कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( ५ ) प्रत्यूषनामक वसूचा पुत्र. याला क्षमावंत आणि मनीषि असे दोन पुत्र होते.

( ६ ) पांडवांचा पुरोहित धौम्यऋषीचा बंधु. हा जनमेजयसर्पसत्रांत होता.

**देववती**–ग्रामणीनामक गंधर्वाची कन्या व सुकेश राक्षसाची पत्नी.

**देववर्णिनी**—भारद्वाज ऋषीची कन्या व विश्रवाची पत्नी.

**देववर्धन**—सोमवंशीय यदुकुलांतील अंधक वंशांत जन्मलेल्या देवकाच्या चार पुत्रांपैकीं चौथा [ ९,२४,२२ ].

**देववर्ष**– प्रियव्रत पुत्र जो यज्ञबाहु त्याचा पुत्र व याच्या वर्षाचें नांव. हा शाल्मली द्वीपांत आहे [५,२०,९ ]

**देववान**—रुद्रसावर्णि मनुपुत्र.[८,१३,२७]

( २ ) अक्रूराचा ज्येष्ठ पुत्र.[९,२४,१८]

( ३ ) अन्धक कुलांतील देवकाच्या चार पुत्रांपैकीं एक. [ ९,२४,१८ ]

**देववीति**—मेरूची कन्या व आग्नीध्रपुत्र केतुमालाची पत्नी. [ ५,२,२३ ]

**देवव्रत**--भीष्माचें नांव. [ १,९,१ ]

**देवशर्मा**—एक ऋषि. याची स्त्री रुचि.

( २ ) जनमेयाच्या सर्पसत्रांतील सदस्य

**देवश्रवा**—सोमवंशीय सात्वत कुलांतील शूर व मारिषा यांच्या दहा पुत्रांपैकीं एक. कंसभगिनी कंसवती ही याची स्त्री, आणि सुवीर व इषुमान् हे याचे पुत्र होते. [ ९,२४,२८–४१ ]

( २ ) विश्वामित्रकुलांतील दोन ऋषि.

**देवश्रेष्ठ**—रुद्रसावर्णि मनुपुत्र.[८,१३,२७]

**देवसखा**—भारतवर्षीय पर्वत. ( वा. रा. )

**देवसावर्णि**--चालू श्वेतवाराह कल्पांतील तेरावा मनु. चित्रसेन, विचित्र इत्यादि याचे पुत्र; याच्या मन्वंतरांत सुकर्म, सुत्राम संज्ञक देव, दिवस्पति नांवाचा इन्द्र, निर्मोक, तत्वदर्शी इत्यादि ऋषि आणि देवहोत्र व बृहती यांचे पासून योगेश्वर नामक अवतार होऊन तो इंद्राला सहाय्य करील. [ ८,१३,३०-३२ ]

**देवसेना**—प्रजापतीच्या दोन कन्यांतील एक. हिला केशी दैत्यापासून इन्द्रानें सोडविल्यावर हिनें कार्तिकेयास वरिलें होतें. ( भा. वन. अ. २२३ )

**देवस्थान**—एक ब्रह्मर्षि.

**देवस्थानि**—अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**देवहव्या**—एक ब्रह्मर्षि

**देवहूती**—स्वायंभुव मनूची कन्या व कर्दम प्रजापतीची पत्नी. [ ३,१२,५४ ] हिला कला, अनसूया, श्रद्धा, हविर्भू, गति क्रिया, ख्याति, अरुन्धति आणि शान्ति, अशा नऊ कन्या व कपिल नामक पुत्र होता. [३,२४,२२-२६] कपिलानें केलेला सांख्यशास्त्राचा उपदेश. [३,२५,७] जेथें उपदेश झाला तें सिद्धपदक्षेत्र. कपिल उपदेश करून गेल्यावर ही योग्यांना सिद्धि प्राप्त करून देणारी नदी झाली. [ ९,३३,३१-३२ ]

**देवहोत्र**--देवसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या योगेश्वर अवताराचा पिता. हा एक क्षत्रिय होता. [ ८,१३,३२ ]

**देवातिथि**—सोमवंशीय पुरुकुलांतील क्रोधन राजाचा पुत्र. याचा पुत्र ऋष्य. [ ९,२२,११ ]

**देवानीक**–कुशद्वीपस्थ पर्वत. [५,२०,१५]

( २ ) सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील क्षेमधन्वा राजाचा पुत्र. याचा पुत्र अनीह. [ ९,१२,२ ]

**देवान्तक**—मारुतीनें मारिलेला रावणपुत्र.

**देवापि**—सोमवंशीय पुरुकुलांतील प्रतीप राजाचा ज्येष्ठ पुत्र. शंतनूचा भाऊ. हा कलापग्रामीं रहात असून कलियुगाअन्तीं वर्णाश्रमधर्माची स्थापना करील. [ ९,२२,१२-१७ व १२,२,३७ ].

(२) कर्णानें मारिलेला पाण्डवपक्षीय राजा.

**देवावृध**–सोमवंशीय सात्वत राजाच्या सात पुत्रांपैकीं पांचवा. हा देवांसारखा होता. याचा पुत्र बभ्रु हे पिता पुत्र फार प्रसिद्ध असून देवावृधाच्या उपदेशानें सहा हजार त्र्याहात्तर पुरुष मुक्त झाले. [९,२४,७-१०].

( २ ) सहदेवपुत्र शतानीकानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा. ( भा.कर्ण. )

**देविका**–भारतवर्षीय एक नदी.

**देवी**–प्रल्हादपुत्र विरोचनाची स्त्री. हिचा पुत्र बलि [ ६,१८,१६ ]

( २ ) एक अप्सरा.

( ३ ) अथर्वण वेदोपनिषत्.

## दै

**दैतेय**-कश्यप व दिति यांचे पुत्र [६,१८,१०].

**दैत्य**– ,, ,,

**दैत्यसेना**–देवसेनेची ज्येष्ठ भगिनी व केशी दैत्याची पत्नी.

**दैर्घतम**–दीर्घतमापुत्र धन्वंतरीचें नामांतर.

**दैवराति**-देवरात जनकपुत्र बृहद्रथाचें नामांतर

## दो

**दोष**–अष्टवसूंपैकीं एक. [ ६,६,११ ].

**दोषा**-उत्तानपादवंशीय पुष्पार्णाची पत्नी. हिला प्रदोष, निशीथ, व्युष्ट, असे तीन पुत्र होते [ ४,१३,१३ ].

**दौ**

**दौर्मुखी**-दुर्मुख पांचालाचा पुत्र यशोधराचें नामांतर. यास जनमेजय असेंहि नांव आहे.

**दौःशालेय**-जयद्रथपत्नी दुःशला, तिच्या पुत्राचें-सुरथाचें-नामांतर.

**दौःशासनि**-दुःशासनाचा पुत्र.

**दौष्यन्ति**--दुष्यन्तपुत्र भरत.

**द्यु**-अष्टवसुंपैकीं एक. एकदां सर्व वसु आपआपल्या पत्नीसह वनविहार करीत असतां वसिष्ठाची कामधेनु त्यांनीं पाहिली. तेव्हां त्या स्त्रियांनी आपआपल्या पतीस तिचे हरण करण्यास सांगितलें. इतरांनीं तुमतें होय म्हटलें, परंतु यानें लगेच तिचें हरण केलें. तेव्हां वसिष्ठानें त्या सर्वांस 'तुम्ही पृथ्वीवर जन्मास याल' असा शाप दिला तेच पुढें शंतनुपासून गंगेच्या उदरीं जन्मास येऊन त्वरित स्वर्गास गेले. पण हा मात्र प्रत्यक्ष धेनुचा अपहारकर्ता असल्यामुळें भीष्म होऊन दीर्घकाळ पृथ्वीवर राहिला आणि शेवटीं भारतीयुद्धांत इच्छामरणानें स्वर्गी गेला.

**द्युति**-द्रुतीचें नामांतर.

**द्युतिमान्**-दक्षसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८,१३,१९ ].

( २ ) सूर्यवंशीय मदिराश्व राजाचा पुत्र. याचा पुत्र सुवीर. (भा. अनु.)

( ३ ) शाल्ववंशीय एक राजा. यानें आपलें राज्य ऋचीकऋषीस अर्पण करून उत्तमलोक मिळविला भा.शां.)

( ४ स्वायंभुमनूच्या दहापुत्रांपैकीं एक.

( ५ ) शाल्वदेशीय चित्राश्व (सत्यवान) राजाचा पिता. सावित्रीचा श्वशुर.

**द्युमत्सेन**-जरासंधकुलांतील शमराजाचा पुत्र याचा पुत्र सुमति [९,२२,४८]

**द्युमान्**-वसिष्ठ व ऊर्जा यांच्या सात पुत्रांपैकीं कनिष्ठ [ ४,१,४१ ].

( २ ) स्वारोचिषमनूचा पुत्र.[८,१,१९]

( ३ ) सोमवंशीय पुरूरव्याचा पुत्र जो आयू त्याच्या वंशांतील कुवलयाश्वाचे नामांतर. [ ९,१७,६ ].

( ४ ) शाल्वराजाचा अमात्य. याला प्रद्युम्नाने मारिलें [ १०,७६,२६ ].

**द्युम्न**-चक्षु व नड्वला याचा पुत्र[४,१३,१६]

**द्यौ**-( द्यु शब्द पहा. )

**द्रविड**-दक्षिणहिंदुस्थानांतील एक देश. याची राजधानी कांचीपुर. श्रीरंगपट्टणापासून कन्याकुमारीपर्यंत. येथें वैवस्वतमनु अधिपति होता. [९,१,२].

( २ ) श्रीकृष्ण व जाम्बवती यांचा पुत्र [ १०,६१,१२ ].

**द्रविण**-उत्तानपादवंशीय पृथुराजा व अर्चि यांच्या पांच पुत्रांपैकीं चौथा. हा उत्तर दिशेचा राजा होता. [ ५,२२,५४ व ५,२४,२].

(२) कुशद्वीपांतील पर्वत. [५,२०,१५]

( ३ ) क्रौंचद्वीपस्थ लोक [ ५,२०,२२]

**द्रविणक**-अग्निनामक वसु व वसोर्धारा यांचा एक पुत्र. [ ६,६,१३ ].

**द्रुति**-ऋषभदेववंशीय नक्तराजाची स्त्री. हिचा पुत्र गय. [ ५, १५, ६ ] हिला द्युति असेंहि नामांतर होतें.

**द्रुपद**-पुरुकुलांतील अजमीढ वंशीय पृषत् राजाचा पुत्र. यास यज्ञसेन, पार्षत व पांचाळ अशीं नांवें होतीं. हा द्रोणाचार्यांचा पिता जो भारद्वाज ऋषी त्याचा शिष्य व द्रोणाचार्यांचा गुरुबन्धु होता. राज्याधिकार प्राप्त झाल्यावर मजकडे आल्यास मी तुझा सत्कार करीन असें यानें द्रोणांस सांगितलें होते पुढें कांहीं काळानें हा राजा झाल्यावर एकदां द्रोणाचार्य याचेकडे आले, परंतु यानें उन्मत्तपणानें त्यांचा अनादर केला. तेव्हां द्रोणाचार्यांस क्रोध आला, आणि 'शिष्याच्या हातून तुझा पराजय करीन' अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली. पुढें द्रोणाचार्य कौरवपांडवांचे गुरु झाले, व त्यांनीं त्यांस धनुर्विद्येचें शिक्षण दिलें. त्यांत अर्जुनाचें प्राविण्य विशेष दिसून आलें. तेव्हां अर्जुनास पाठवून त्याच्या हातून याचा पराभव केला व याचें अर्धे राज्य द्रोणाचार्यांनीं घेतलें. ह्या अपमानामुळे द्रोणाचार्यांस मारील असा पुत्र व्हावा ह्या इच्छेनें हा अरण्यांत भटकत असतां काश्यप गोत्रांतील याजोपयाज ऋषींच्या आश्रमाजवळ गेला, आणि तेथें उपयाजाची सेवा करून त्याच्या सूचनेप्रमाणें याज ऋषीस आपल्या राज्यांत आणून त्याजकडून इच्छित पुत्रप्राप्तीस्तव यज्ञ करविला. तेव्हां अग्निकुंडांतून धनुर्बाणधारी धृष्टद्युम्न व कृष्णा अथवा द्रौपदी निर्माण झालीं. शिवाय याला बलानीक, श्रुत, सुरथ, शत्रुंजय असे चार पुत्र व शिखण्डिनी नामक कन्या होती. यानें माकंदी, छत्रवती, कांपिल्य इत्यादि नगरें वसविलीं होतीं. याची राजधानी अहिच्छत्रा. हा भारतीयुद्धांत सैन्यासह पाण्डवांकडे युद्ध करीत असतां द्रोणाचार्यांचे हातून मृत्यु पावला. [ ९, २२, २ ] (भा. आदि. द्रोण.)

**द्रुम**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा

**द्रुमकुल्य**-एक देश. येथील लोक दुराचारी असून समुद्रास फार पीडा देत, म्हणून रामानें बाण मारून त्यांचा नाश केला. पुढें तेथें मरु नांवाचें अरण्य झालें. ( वा. रा. )

**द्रुमसेन**-धृष्टद्युम्नानें रात्रियुद्धांत मारिलेला दुर्योधनपक्षीय एक राजा.

**द्रुमिल**-ऋषभदेवाचा एक पुत्र. हा महायोगी होता. यानें निमिला उपदेश केला. [ ५, ४, ११ व ११, ४, २ ]

**द्रुहिण**-ब्रह्मदेवास नांव

**द्रुह्यु**-सोमवंशीय ययाति व शर्मिष्ठा यांच्या तीन पुत्रांपैकीं दुसरा. यानें पित्याची जरा घेतली नाहीं, म्हणून यास सार्वभौमत्व मिळालें नाहीं. याचा पुत्र बभ्रु. [ ९, १८, २३, व ९, २३, १४ ]

**द्रोण**-एक पर्वत. [ ५, १९, १६ ]

( २ ) अष्टवसूंपैकीं एक. याची स्त्री धरा. हींच पुढें नंद व यशोदा झालीं होतीं. [ ६, ६, ११ व १०, ८, ४८-५० ]

( ३ ) भृगु कुलांतील एक ऋषि.

( ४ ) प्रलय मेघांतील एक मेघ.

( ५ ) क्षीरसमुद्रकांठचा एक पर्वत.

**द्रोणाचार्य**-भारद्वाज ऋषीस बृहस्पतीच्या अंशानें झालेला पुत्र. घृताची नामक अप्सरेच्या दर्शनानें भारद्वाज ऋषींचें रेत पतन पावून तें त्यानें द्रोणांत भरून ठेविलें, त्यापासून याची उत्पत्ती झाली. हा आपल्या पित्याजवळ वेदवेदांग व धनुर्विद्या शिकला. अग्निवेश्य नामक चुलत्याजवळ कवचविद्या व ब्रह्मशिरास्त्र शिकला, व परशुरामाजवळ अस्त्रविद्या शिकला. याची स्त्री कृपी व पुत्र अश्वत्थामा. याचेच बरोबर द्रुपदराजा अध्ययन करीत असे. एकदां हा द्रुपदाकडे द्रव्य मागण्याकरितां गेला असतां त्यानें याचा अपमान केला तेव्हां हा कृपाचार्याकडे हस्तिनापुरीं आला एकदां कौरव पांडव विटी-दांडु खेळत असतां, त्यांची विटी एका विहिरींत पडली, ती यानें दर्भ मंत्रून विहिरींत फेकतांच वर आली. हें याचें धनुर्वेदकौशल्य पाहून भीष्मानें यास कौरव-पांडवांचें शिक्षक नेमिलें. त्यावेळीं इतरहि अनेक देशांतील राजपुत्र शिक्षणार्थ याजकडे आले होते. त्यांत हिरण्यधेनुक निषादाचा पुत्र एकलव्य होता, पण त्याला यानें धनुर्वेद शिकविण्याचें अमान्य केलें. ( एकलव्य शब्द पहा ). यानें आपल्या शिष्यांपैकीं अर्जुनाकडून द्रुपदाचा पराभव करून त्याचें अर्धें राज्य घेतलें. भारतीयुद्धांत हा दुर्योधनाकडे होता. त्यांत दहाव्या दिवशीं भीष्म शरपंजरीं पडल्यावर हा सेनापति झाला. हा पांच दिवस सेनापति होता. या पांच दिवसांत यानें निकरानें युद्ध करून पांडवांकडील अगणित सैन्य मारलें यानें चक्रव्यूह रचिला त्यांत पार्थपुत्र अभिमन्यु मारला गेला. दुर्योधनाच्या अत्याग्रहामुळें यानें पांचव्या दिवशीं अहोरात्र निर्वाण युद्ध करण्याची प्रतिज्ञा केली. त्याप्रसंगीं मध्यरात्रीनंतर इंद्रवर्मा राजाचा अश्वत्थामा गज मृत झाला असतां ' अश्वत्थामा मेला ' अशी भीमानें गर्जना केली. ती ऐकतांच याचें मन संशयग्रस्त झालें, व खरें वर्तमान काय म्हणून यानें युधिष्ठिरास विचारलें असतां कृष्णाज्ञेनें त्यांनीं ' नरोवाकुंजरोवा ' असें म्हटलें. तें ऐकतांच हा हतधैर्य झाला आणि परत फिरला. इतक्यांत पितरांनीं यास युद्धापासून परावृत्त होण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें हा योगमार्गानें प्राणोत्क्रमण करीत असतां धृष्टद्युम्नानें येऊन याचा शिरच्छेद केला. त्यावेळीं याचें वय चारशें वर्षांचें होतें. याचा ध्वज कृष्णाजिन, कमंडलु आणि वेदि, या चिन्हांनीं युक्त असे. याची अंगकांति कृष्णवर्ण असून हा कौरव-पांडवांस धनुर्विद्या शिकवूं लागला, त्याचवेळी यास कुबड आलेलें होतें. [१,७,४५]

**द्रोणपुत्र**—अश्वत्थामा. [ ८,१३,१५ ].

**द्रोणी**—भारतवर्षीय नदी.

**द्रौणायन**-भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**द्रौणि**-अश्वत्थामा. हा पुढें येणाऱ्या एकुणतिसाव्या युगपर्ययाच्या द्वापारांत व्यास होईल.

**द्रौपदी**-द्रुपदराजास अग्नीपासून प्राप्त झालेली कन्या व पाण्डवांची स्त्री. हिला कृष्णा, पांचाली, याज्ञसेनी, अशींहि नांवें होतीं. ही पतिव्रता, सद्गुणी, क्षमाशील, पण मोठी मानी होती. श्रीकृष्णभगिनी सुभद्रा अर्जुनाची पत्नि, या नात्यानें श्रीकृष्ण हिला भगिनी प्रमाणेंच मान देत असे. तथापि श्रीकृष्णाचेठायीं हिची निस्सीम भक्ति असल्यामुळें श्रीकृष्ण हिच्या हितार्थ नेहमीं झटत असे. हिचा वर्ण गौरमिश्रित शाम असे. हिच्या स्वयंवरांत मत्स्ययंत्राचा वेध करून अर्जुनानें हिला जिंकिलें, पण आणिलेली भिक्षा समान वांटून घ्या, असें कुंतीनें ह्मटल्यावरून ही पांची पाण्डवांची पत्नी झालीच पाहिजे, असें युधिष्ठिरानें ह्मटलें. तेव्हां द्रुपदराजा विचारांत पडला असतां तेथें कृष्णद्वैपायन व्यास प्रगट होऊन, त्यांनीं पांडव हे पूर्वीचे पांच इंद्र आहेत व द्रौपदी शची आहे, याकरितां तिचा विवाह पांचाशीं होणें विरुद्ध नसून कुंतीच्या भाषणामुळें निंद्यही नाहीं. ( भा. आदि. ) हिला पांच पाण्डवांपासून अनुक्रमें प्रतिविंध्य, श्रुतसेन, श्रुतकीर्ति, शतानीक, आणि श्रुतकर्मा असे पांच पुत्र झाले होते [ ९,२२,२,२९ ]. राजसूययज्ञ झाल्यानंतर कौरवांनीं कपटानें द्युतांमध्यें हिला जिंकून भरसभेंत हिचें वस्त्र हरण करण्याचा प्रयत्न केला, पण श्रीकृष्णानें हिची लाज राखली. ही पांडवाबरोबर अज्ञातवासांत विराटाच्या घरीं असतांना हिनें सैरन्ध्री नांव धारण केलें होतें (भा. विराट) भारती युद्धानंतर अश्वत्थाम्यानें हिचे पुत्रांचा वध केला असतां भीमार्जुनांनीं त्यास बांधून हिच्यापुढें आणिलें व यास कोणती शिक्षा करूं म्हणून हिला विचारिलें. त्यावेळीं हिनें त्यास सोडून देण्यास सांगितलें. [ १,७,४३ ] द्रौपदी व कृष्णस्त्रियांची स्यमंतपंचकक्षेत्रीं भेट [ १०,८३,६ ]. पाण्डव महाप्रस्थानास निघाले त्यावेळीं श्रीकृष्णाच्या ठिकाणीं एकाग्र चित्त करून त्यांच्या मागून जात असतां ही मुक्त झाली. [ १,१५,५० ].

**द्रौपदेय**—द्रौपदीचे पुत्र.

**द्वादशादित्य**—कश्यप व अदिति यांचे पुत्र. विवस्वान, अर्यमा, पूषा, त्वष्टा, सविता, भग, धाता, विधाता, वरुण, मित्र, शुक्र, उरुक्रम. [ ६ ६,३९ ]. ग्रंथांतरीं यांचीं नांवें भिन्न आहेत.

**द्वापर**—चार युगांतील तिसरें युग व त्याची देवता. देवमानानें याचा काल २४०० वर्षांचा असून मनुष्यमानानें आठ लक्ष चौसष्ट हजार वर्षें आहे. याचा संधि व संध्यंश काल देवमानानें चारशें वर्षांचा आहे. [ १,४,१४ ]. ( मत्स्य. अ. १६४)

**द्वारका** कुशस्थली नगरीचें नामांतर. ही आनर्त देशाची राजधानी असून

श्रीकृष्णानें विश्वकर्म्याकडून यादव-संरक्षणार्थ समुद्रांत वसविली. ही बारा योजनें विस्तीर्ण, व अत्यंत संपन्न असे. येथें श्रीकृष्ण–बलराम संपूर्ण यादवांसह रहात असत. [ १०,५०,५ , व १०,५२,५ ]. हिला द्वार्वती, द्वारावती, अशींहि नांवें आहेत. श्रीकृष्ण निजधामास गेल्यावर सातव्या दिवशीं ही समुद्रांत लुप्त झाली. [ ११,३०,४७ ]. सध्यां बडोदें संस्थानांत अमरेळी तालुक्यांत गोमतीनदीच्या तीरावर हें शहर असून तेथें द्वारकानाथजीचें देवालय आणि शंकराचार्यांचा मठ आहे. चार धामांपैकीं हें धाम आहे.

**द्वारवती**–द्वारका. [ १०,६९,३ ].

**द्वार्वती**-द्वारका. [ ३,३,१९ ].

**द्विजराज**–चंद्र.

**द्विजिव्ह**-लंकेंतील रावणपक्षीय राक्षस. ( २ ) सर्प. ( दे भा. )

**द्वित**–ब्रह्मदेवाचा एक मानसपुत्र. ( २ ) गौतमऋषीच्या तीन पुत्रांपैकीं एक. हा स्यमंतपंचकक्षेत्रीं आलेल्या ऋषींत होता. [ १०,८४,५ ].

**द्विमीढ**–सोमवंशीय हस्तिराजाच्या तीन पुत्रांपैकीं दुसरा. याचा पुत्र यवीनर [ ९.२१,२१–२७ ].

**द्विमूर्धा**–कश्यप व दनू यांचा एक पुत्र. हा वृत्रासुराच्या सेनेंत एक अधिपति होता. [ ६,६,३० व ६,१०,१९ ]. ( २ ) अग्नि.

**द्विविद**–नरकासुराचा एक मित्र वानर. सुषेण वानराच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. मैंद वानराचा भाऊ. याला दहा हजार हत्तींचें बळ असे. अंगदाचा मामा व सुग्रीवाचा सचिव. यानें रामाला उत्तम सहाय्य केलें होतें. कृष्णानें नरकासुराचा वध केल्यावर हा आनर्त देशांत येऊन वारंवार त्रास देत असे. एकदां रैवतक पर्वतावर बलराम स्त्रियांसह क्रीडा करीत असतां, हा तेथें गेला व त्यांस त्रास देऊं लागला. तेव्हां बलरामानें यास मारलें [१०,६७,२]

**द्वीप**–( बेट ) पृथ्वीवरील लहान लहान भाग. हीं द्वीपें अनेक आहेत. सर्व द्वीपांना मेरूपर्वत केंद्र असून कमल-पत्राप्रमाणें हीं त्यापासून निघून समुद्राच्या योगानें वेगवेगळीं झालीं आहेत. त्यांतील मुख्य सात आहेत. जंबू, प्लक्ष, किंवा गोमेदक, शाल्मली किंवा शाल्मक, कुश, क्रौंच, शाक व पुष्कर. हीं क्षार इक्षु, सुरा, घृत, दधिमण्ड, क्षीर, व जल, या सात समुद्रांनीं वेष्टिलेलीं आहेत. [ ५,१६,५ ]. याशिवाय उपद्वीपें आहेत. भारतांत भद्राश्व, केतुमाल, जंबुद्वीप व उत्तरकुरु, हीं चारच द्वीपें सांगितलीं आहेत. विष्णुपुराणांत भारतवर्ष ( हिंदुस्थान ) नऊ द्वीपांचें असल्याचें लिहिलें आहे.

**द्वैतवन**-सरस्वतीनदीच्या कांठचें एक वन. याचेजवळ मरुधन्वदेश होता. वनवासांत असतानां पांडव येथें रहात होते.

**द्वैपायन**–कृष्णद्वैपायन व्यासाचेंच नांव. शुकाचार्याचा शोध. [१,२,२] भीष्म

शरपंजरीं पडलेला असतां आगमन [ १,१९,१० ]. हा युधिष्ठिराच्या यज्ञांत होता. [ १०, ७४, ७ ]

**द्वैपायन-ह्रद्**-कुरुक्षेत्रांतील एक डोह. भारतीयुद्धानंतर दुर्योधन यांत लपून बसला होता.

**द्वैपायनी**-दक्षिणेकडील एक देवी. बलराम तीर्थयात्रेचे वेळीं येथें आला होता. [ १०, ७९, २० ]

**द्यक्षी**-अशोकवनिकेंतील एक राक्षसी.

**द्याख्येयव**-आंगिराकुलांतलि एक ब्रह्मर्षि.

**ध.**

**धनक**-सोमवंशीय भद्रसेन अथवा रुद्रश्रेण्य राजाच्या दोन पुत्रांपैकीं दुसरा. याला कृतवीर्य, कृताग्नि, कृतवर्मा, कृतौजा असे पुत्र होते. [ ९, २३, २३ ]

**धनञ्जय**-पाताळांतील सर्प. [५, २४, ३१]
( २ ) अर्जुनाचें नांव. [११,३१,२५ ]
( ३ ) माघ महिन्यांत पूषानामक सूर्यासह फिरणारा नाग. [१२, ११,३९]
( ४ ) चालू मन्वंतरांतील सोळावा व्यास.
( ५ ) अत्रिकुलांतील एक ऋषि.
( ६ ) विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.
( ७ ) एक ऋषि. याची पत्नी कुमारी.
(८) शरीरांतलि पंच उपप्राणांपैकीं एक.
( ९ ) अग्नीचें नांव.

**धनद्**-कुबेराचें नांव. [ ९, २, ३२ ]

**धनरत्न**-चन्द्रकान्त नगराचें नांव.

**धनिष्ठा**-दक्षकन्या व सोमाच्या सत्ताविस स्त्रियांपैकीं एक. एक नक्षत्र. हें शिशुमार चक्राच्या उजव्या कर्णावर आहे. [ ५, २३, ६ ]

**धनी**-कप नामक देवांचा दूत.

**धनुर्ग्रह**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**धनुर्याग**-कंसानें श्रीकृष्णनाशास्तव केलेला एक उत्सव. [ १०,३६,२६ ]

**धनुर्वेद**-संपूर्ण शस्त्रास्त्रविद्या ज्यांत सांगितली आहे, असा वेद. हा यजुर्वेदाचा उपवेद असून ब्रह्मदेवाच्या दक्षिणमुखापासून उत्पन्न झाला. [ ३, १२, ३८ ] रथ, गज, अश्व व पदाति या चार योध्यांच्या प्रकारावरून धनुर्वेदास ' चतुष्पाद ' म्हटलें आहे. धनुर्वेदांत शस्त्रें, अस्त्रें, युद्ध करण्याचे प्रकार, वाहनें, इत्यादि अनेक गोष्टींचें विवेचन येतें. धनुर्वेदाचीं पांच अंगें आहेत, ती अशीं:- १ यंत्रमुक्त २ पाणिमुक्त ३ मुक्तसंधारित ४ अमुक्त व ५ बाहुयुद्ध, शिवाय १ शस्त्रसंपत्ति व २ अस्त्रसंपत्ति यांच्या भेदामुळें युद्धाचे दोन प्रकार होतात; व ऋजुत्व (सरळपणा) व मायावित्व ( गनिमी कावा ) यामुळें अनेक प्रकार होतात. ( अग्नि पुराण ) शस्त्रास्त्रविद्या अथर्वण वेदाचा उपवेद आहे असेंहि म्हणतात.

**धनुषाक्ष**-एक ब्रह्मर्षि.

**धनुष्य**-उपरिचराच्या ऋत्विजांपैकीं एक.

**धन्या**-उत्तानपादपुत्र ध्रुवाची स्त्री.

**धन्व**-(मारवाड) एक देश. [१०,८६,१०]

**धन्वती**-पारियात्र पर्वतापासून निघालेली एक नदी.

**धन्वंतरी**-विष्णूचा बारावा अवतार. हा समुद्रमंथनानंतर अमृतकलश घेऊन बाहेर आला. चौदा रत्नांपैकीं एक. [ १, ३, १३ व ८, ८, ३५ ]

( २ ) सोमवंशीय काश्यकुलांतील दीर्घतमा राजाचा पुत्र. हा भगवंताचा अवतार असून आयुर्वेदाचा प्रवर्तक आहे. याच्या स्मरणानेंच सर्व दुःखें नाहींशीं होतात. याचा पुत्र केतुमान [ ९, १७, ४]

**धन्वी**-चौथ्या तामस मनूच्या पुत्रांपैकीं एक.

**धमनि**-ह्रादाची पत्नी. हिचे पुत्र वातापी व इल्वल. [ ६, १८, १५ ]

**धमिल्ला**-अनुशाल्व राजाची स्त्री.(जै.अश्व.)

**धर**-अष्टवसूंतील एक. याची स्त्री कल्याणिनी व पुत्र द्रविण.

**धरणि**-ध्रुववसूची पत्नी. [ ६, ६, १२ ]

**धरणिस्थ**-एक ऋषि.

**धरा**-द्रोणवसूची पत्नी. हीच दुसरे जन्मीं यशोदा झाली. [ १०, ८, ४८ ]

( २ ) पृथ्वीचें नामांतर.

**धरणि**-अग्निष्वात्तादिक पितरांच्या दोन कन्येंतील एक. वयुनेची भागिनी. ही ब्रह्मनिष्ठ होती.

( ८ ) एका दसूची स्त्री.

**धर्म**-चार पुरुषार्थांतील पहिला. [ १,५,९ ] याला सत्य, दया, तप आणि दान असे चार पाय असून ते कृतादि चार युगांत एक एक ऱ्हास पावतात व कलियुगाच्या शेवटीं संपूर्ण धर्माचा नाश होतो. [ १२, ३, १८ ] व ३, ११, २१ ] कलियुगांत परीक्षितानें धर्माला अभय देऊन चतुष्पाद केलें. [ १, १७, ४२ ].

( २ ) स्वायंभु मन्वंतरांत ब्रह्मदेवाच्या दक्षिणस्तनापासून उत्पन्न झालेला मानसपुत्र. याला दक्षानें आपल्या तेरा कन्या दिल्या होत्या; त्या-श्रद्धा, मैत्री, दया, शान्ति तुष्टि, पुष्टि, क्रिया, उन्नति, बुद्धि, मेधा, तितिक्षा, ऱ्ही आणि मूर्ति त्यांना अनुक्रमें शुभ, प्रसाद, अभय, सुख, मुद, स्मय, योग, दर्प, अर्थ, स्मृति, क्षेम, प्रश्रय व नरनारायण, असे पुत्र होते. [ ३, १२, २५ व ४, १, ५० ]

( ३ ) ध्रुव मण्डलाभोंवतीं फिरणारी एक तारका. ही शिशुमारचक्राच्या पुच्छाच्या ठिकाणीं आहे [५,२३,५]

( ४ ) वेदप्रतिपादित तो धर्म [६,१,४०]

( ५ ) वैवस्वत मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र. याला प्राचेतस दक्षानें आपल्या साठ कन्यांपैकी दहा कन्या दिल्या होत्या. त्याः—भानु, लंबा, ककुब्, जामि, विश्वा, साध्या, मरुत्वती, वसु, मुहुर्ता आणि संकल्पा. यांचे पुत्र—देवऋषभ, विद्योत, संकट, स्वर्ग, विश्वेदेव, साध्यदेव, मरुत्वान, जयंत, अष्टवसु, मुहूर्ताभिमानी देव आणि संकल्प. [ ६. ६, ४ ते १०]

( ६ ) तिसऱ्या उत्तम मन्वंतरांतील सत्यसेन अवताराचा पिता. याची स्त्री सूनृता [ ८,१,२५ ].

( ७ ) यमाचें नामांतर [ ९,२२,२७]

( ८ ) सोमवंशीय द्रुह्युकुलांतील गांधार राजाचा पुत्र. याचा पुत्र धृत. [ ९, २३, १५ ]

( ९ ) सोमवंशीय यदुकुलातील हैहयराजाचा पुत्र. याचा पुत्र नेत्र. [ ९,२३,२२]

(१०) सोमवंशीय यदुपुत्रक्रोष्टा त्याच्या कुलांतील प्रतिश्रवा राजाचा पुत्र. याचा पुत्र उशना. [ ९,२३,३४ ]

(११) धर्मशास्त्र. [ १०,४५,३४ ]

(१२) युधिष्ठिराचें नामांतर.

(१३) एकब्रह्मर्षि. याची स्त्री धृति.(भा.)

**धर्मकेतु**–सोमवंशीय आयुपुत्र क्षत्रवृद्ध कुलांतील सुकेतन राजाचा पुत्र. याचा पुत्र सत्यकेतु. [ ९,१७,८ ].

**धर्मध्वज**–विदेहवंशांतील कुशध्वज राजाचा पुत्र. याचे पुत्र कृतध्वज आणि मितध्वज. [ ९,१३,१९ ].

( २ ) रथध्वज राजाचा पुत्र. याची कन्या तुलसी.

**धर्मपाल**–दशरथाच्या आठ अमात्यांतील मंत्रपालाचें नामांतर. (वा. रा. बाल.)

**धर्मप्रस्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**धर्मभृत्**–दण्डकारण्यांतील एकऋषि. (वा.)

**धर्मरथ**–सोमवंशीय अनुकुलांतील दिविरथ राजाचा पुत्र. यास बृहद्रथ असें नांव होतें. याचा पुत्र चित्ररथ अथवा सोमपाद. [ ९,२३,७ ].

**धर्मराज**–यम व युधिष्ठिर यांचीं नांवें.

**धर्मवर्धन**–केकय देशांतून अयोध्येस येतांना भरताला लागलेला एक गांव. (वा.)

**धर्मवृद्ध**–सोमवंशीय सात्वतकुलांती श्वफल्क व गांदिनी यांपासून झालेल्या अक्रूरादि पुत्रांपैकीं एक. [ ९,२४,१६ ]

**धर्मव्याध**—मिथिलानगरींत राहणारा एक व्याध. तपानें गर्विष्ठ झालेल्या ब्राह्मणांस यानें स्त्रीधर्म व पुत्रधर्माचा उपदेश केला. ( भा. वन. )

**धर्मसावर्णि**–अकरावा मनु. यास सत्य, धर्माआदि दहा पुत्र होतील. या मन्वंतरांत विहंगम, कामगम, निर्वाणरुचि हे देव; वैधृत नामक इंद्र; अरुण, हविष्मान, वपुष्मान्, अनघ, उरधिष्ण्य, निश्चर आणि अग्नितेजा हे सप्तर्षि, व धर्मसेतु हा अवतार होईल. [ ८,१३,२४–२५ ]

**धर्मसूत्र**–सोमवंशीय जरासंध कुलांतील सुव्रत राजाचा पुत्र. याचा पुत्र शम. [ ९,२२,४८ ]

**धर्मसेतु**–धर्मसावर्णि मन्वंतरांतील आर्यक व वैधृता यांचेपासून झालेला भगवंताचा अवतार. [ ८,१३,२६ ].

**धर्मसेन**-सूर्यवंशीय अंबरीषराजाचें नामांतर.

**धर्मा**–वैवस्वतमन्वंतरांतील चौदावा व्यास.

**धर्मारण्य**–एक ब्रह्मर्षि. यानें पद्मनाभनागापासून अध्यात्मविद्या मिळविली होती.

( २ ) पुरूरवापुत्र विजयाच्या कुलांतील मूर्तय राजानें स्थापिलेलें नगर.

( ३ ) गयेजवळील एक क्षेत्र व तीर्थ.

**धर्मेयु**—सोमवंशीय पुरुकुलांतील रौद्राश्व राजाचा सातवा पुत्र. [ ९,२०,४ ]

## धा

**धातकि**–प्रियव्रतपुत्र वीतिहोत्र त्याच्या दोन पुत्रांपैकीं एक. व याच्या वर्षाचें नांव. [ ५.२०,३१ ]

( २ ) पुष्करद्वीपांतील दुसरा वर्ष.

**धाता**—ब्रह्मदेवास नांव [ १,१,२२ ]

( २ ) स्वायंभु मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र भृगु व ख्याति याच्या तीन पुत्रांपैकीं पहिला. याची स्त्री आयति व पुत्र मृकण्ड. [ ४,१,४३–४४ ]

( ३ ) शिशुमारचक्रच्या कटिप्रदेशीं असलेली एक तारका [ ५,२३,५ ].

( ४ ) द्वादशादित्यांपैकीं एक. कश्यप व आदिति यांचा पुत्र. याला कुहू, सिनीवाली, राका आणि अनुमति अशा चार स्त्रिया होत्या, व त्यांना अनुक्रमें, सायंकाल, दर्श, प्रातःकाल आणि पूर्णमास असे पुत्र होते. [ ६,६,३९ व ६,१८,३ ].

( ५ ) चैत्र महिन्यांत-कृतस्थली अप्सरा, हेती राक्षस, वासुकि नाग, रथकृत यक्ष, पुलस्त्य ऋषि व तुंबुरु गंधर्व यांसह-फिरणारा सूर्य. [१२,११,३३]

**धात्रेय**–अत्रिकुलांतील एक ऋषि.

**धान्यमालिनी**-रावणाची एक स्त्री. हिचा पुत्र अतिकाय. ( वा. रा. सुंदर. )

( २ ) शापानें मगरी झालेली एक अप्सरा. कालनेमि राक्षसाच्या वधकालीं हिचा मारुतीनें उद्धार केला.

**धान्यायनि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**धामा**– एक ऋषि.

**धारा**-भारतवर्षीय एक नदी.

**धारिणी**–अग्निष्वात्तादि पितृगण व दक्ष कन्या स्वधा यांची एक कन्या. ही ब्रह्मनिष्ठ होती. [ ४,१,६४ ].

**धार्तराष्ट्र**—दुर्योधनादि [ १०,६८,६ ].

**धार्मिक**–दाशरथिरामाच्या सुज्ञ नामक मंत्र्याचा एक पुत्र.

**धार्ष्ट**-मनुपुत्र धृष्टकुलांतील क्षत्रिय. हे ब्राह्मणवृत्तीनें रहात असत. [ ९,२,१७ ].

**धिषणा**–कृशाश्व ऋषीची दुसरी स्त्री. हिला वेदशिर, देवल, वयुन आणि मनु, असे चार पुत्र होते. [ ६,६,२० ].

**धी**–मन्युनामक रुद्राची स्त्री. [३,१२,१३].

**धीमान्**–तामसमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक

**धुन्धु**–एक असुर. मधु कैटभाचा पुत्र. ( भा. वन. अ. २०२ ) हा वाळूमध्यें पुरून घेऊन तप करी, व वर्ष पूर्ण झाल्यावर एकदां श्वास सोडी. यास उत्तंक ऋषीच्या प्रेरणेनें सूर्यवंशीय कुवलयाश्व राजानें मारिलें. [ ९,६,२२ ].

**धुन्धुमार**–धुन्धु राक्षसाला मारल्यामुळें कुवलयाश्व राजास नामांतर. [९,६,२३].

**धुन्धुरी**-( वाद्य विशेष ) [ १,१०,१५ ]

**धुन्धुहा**–धुन्धुमाराचेच नांव [ १२,३,९ ].

## धू

**धूतपाप**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**धूतपापा**–हिमालयापासून निघणारी नदी.

**धूतवाहिनी**-ऋष्यवान् पर्वतापासून निघणारी एक नदी.

**धूमकेतु**–एक दैत्य. ( वा. रा. उत्तर. )

( २ ) आकाशांतील एक ज्योति. हे ज्यावेळीं आकाशांत दिसतात, त्यावेळीं मोठमोठीं संकटें येणार असें दर्शवितात. याचे तारा, शिखा आणि केतु असे तीन भाग असतात. याचें पुच्छ नेहमीं सूर्याच्या उलट बाजूस असतें, आणि केव्हां केव्हां याला अनेक पुच्छें असतात. कांहीं धुमकेतु सूर्यापेक्षांही मोठे असतात व त्यांचें पुच्छ पारदर्शक असतें. त्याची जाडी कधीं कधीं ५० हजार मैल असूनहि पलीकडील नक्षत्रें दिसतात. हे नियमित फिरतात. कांहीं ७६ वर्षांनीं एक फेरा करतात व कांहींस

तीन साडेतीन वर्षें पुरतात. या मधील कालमर्यादेंत फिरणारेहि कांहीं धूमकेतु आहेत.

**धूमकेश**–कश्यपदनुचा पुत्र. [६,६,३१].

**धूमावति**- भारतवर्षीय एक नदी.

**धूमित**–अंगिराकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**धूमिनी**-सोमवंशीय अजमीढ राजाच्या चार स्त्रियांपैकीं एक.

**धूमोर्णा**-यमाची स्त्री.

( २ ) मार्कंडेय ऋषीची स्त्री.

**धूम्र**–एक ब्रह्मर्षि.

( २ ) गद्गद वानराचा पुत्र. रामसेनेंतील एक वानर.

**धूम्रकेतु**–ऋषभदेवपुत्र भरत व पंचजनी यांचा एक पुत्र. [ ५,७,३ ].

( २ ) सूर्यवंशीय दिष्टकुलांतील तृणबिंदु व अलंबुषा अप्सरा यांच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. [ ९,२,३३ ].

**धूम्रकेश**–उत्तानपादवंशीय पृथुराजा व आर्चि यांच्या पांच पुत्रांपैकीं दुसरा. हा दक्षिण दिशेकडील राजा होता. [ ४,२२,५४ व ४,२४,२ ].

( २ ) कृशाश्वऋषि व अर्चि यांचा पुत्र. [ ६, ६, २० ]

**धूम्रपराशर**–पराशर कुलोत्पन्न एक ऋषि. याच्या कुलांत खल्वायन, वार्ष्णायन, तैलेय, यूथप आणि तन्ति, असे पांच ऋषि प्रख्यात होते.

**धूम्रलोचन**-शुंभनिशुंभांचा प्रधान, एक असुर. यास कालिकेनें मारिलें.

**धूम्राक्ष**–सूर्यवंशीय दिष्टकुलांतील हेमचंद्राचा पुत्र. याचा पुत्र संयम. [९,२,३४]

( २ ) रावणपक्षीय राक्षस. यास मारुतीनें मारिलें [ ९,१०,१८ ]

**धूम्रानीक**–प्रियव्रत पुत्र मेधातिथीच्या सात पुत्रांपैकीं चौथा. याचें वर्ष याच नांवानें प्रसिद्ध आहे. [ ५ २०,२५ ]

( २ ) शाक द्वीपांतील चौथा वर्ष [ ५, २०, २५ ]

**धूर्जटि**–महादेवास एक नांव.

**धृत**–सोमवंशीय द्रुह्यु कुलांतील धर्माचा पुत्र याचा पुत्र दुर्मना [९,२३,१५]

**धृतदेवा**–देवक राजाची कन्या व वसुदेवाची एक स्त्री. हिचा पुत्र विपृष्ठ. [ ९,२४,२२-५० ]

**धृतराष्ट्र**–पातालांतील सर्प. [५,२४,३१]. कद्रूपासून झालेल्या नागांतील एक. याची अनेक कुळें जनमेजयसर्पसत्रांत दग्ध झालीं. तीं–शंकुकर्ण, पिठरक, कुठारमुख, सेचक, पूर्णांगद, पूर्णमुख, प्रहास, शकुनि, दरि, आमाहठ, कामठक, सुषेण, मानस, अव्यय भैरव, मुंड, वेदांग, पिशंग, उद्रपारक ऋषभ, वेगवान, पिंडारक, महाहनु, रक्तांग, सर्वसारंग, समृद्ध, पटवासक, वराहक, वीरणक, सुचित्र, चित्रवेगिक पराशर, तरुपक, मणिस्कंध, आरुणि.

( २ ) सोमवंशीय पुरुकुलांतील शंतनुपुत्र विचित्रवीर्याच्या अंबानामक पत्नीला व्यासापासून झालेला पुत्र. [ ९, २२, २५ ] हा जन्मांध होता. हंस नामक गंधर्वाच्या अंशानें हा जन्मास आला होता. याची पत्नी सुबल राजाची कन्या गांधारी. याला कलीच्या अंशानें दुर्योधन व पौलस्त्यांच्या अंशानें दुःशासनादि ९९ पुत्र व दुःशला नामक कन्या होती.

या शिवाय युयुत्सु नामक एक दासी-पुत्र होता पुत्राच्या प्रेमामुळें यास अनेक दुःखें भोगावीं लागलीं. भारती युद्धानंतर पाण्डव यास भेटावयास गेले असतां, भीमास भेटण्याची यानें इच्छा दर्शविली. याचा हेतू लक्षांत घेऊन कृष्णानें भीम म्हणून एक लोखण्डाचा पुतळा पुढें केला. आपल्या शतपुत्रांचा नाश करणारा भीम समजून यानें त्यास इतक्या त्वेषानें आलिंगन दिलें कीं, त्या पुतळ्याचें चूर्ण झालें ( भा. स्त्री. अ. १२ ) हा पंधरा वर्षे पाण्डवांकडे होता. शेवटीं विदुरानें अतिशय निंदा करून ' तुझ्या शंभर पुत्रांना मारणाऱ्या पांडवांचें अन्न कुत्र्याप्रमाणें काय खात राहिला आहेस ' असें म्हटलें, तेव्हां हा गांधारीसह हिमालयाकडे गेला व तेथें अग्नींत सांपडून मृत झाला. [ १, १३, ५६ ] याच्या सर्व पुत्रांत विकर्ण नीतिमान होता.

( ३ ) आश्विनमहिन्यांत त्वष्टा सूर्याबरोबर फिरणारा गंधर्व. [१२,११, ४३]

( ४ ) कश्यप व मुनि या पासून झालेला गंधर्व. यास इंद्रानें मरुत्त राजाकडे निरोप सांगण्यास पाठविलें होतें.

( ५ ) बली दैत्याच्या शतपुत्रांपैकीं एक.

( ६ ) एक राजा. याच्याकडे एकदां बकदाल्भ्य ऋषि येऊन त्यानें यज्ञार्थ पशु मागितला असतां; यानें त्याचा उपहास करून मृतधेनु नेण्यास सांगितलें. त्यामुळें ऋषीस क्रोध आला; तेव्हां शापाच्या भीतीनें यानें त्यास पशु देऊन संतुष्ट केलें. ( भा. शल्य. अ. ४१ )

**धृतराष्ट्री**—ताम्रेच्या कन्येपैकीं एक.

**धृतवर्ता**—भारतवर्षीय एक नदी.

**धृतवर्मा**-सूर्यवर्मात्रिगर्ताचा भाऊ.(भा.अ.)

**धृतव्रत**-अकरावा रुद्र. [ ३, १२ १२ ]

( २ ) सोमवंशीय अनुकुलांतील धृति राजाचा पुत्र. याचा पुत्र सत्कर्मा. [ ९, २३, १२ ]

**धृतसेन**—दुर्योधनपक्षीय एक राजा.

**धृतायुध**- ,, ,,

**धृति**—विदेहवंशीय वीतहव्य जनकाचा पुत्र. याचा पुत्र बहुलाश्व [९९,१३ २६]

( २ ) अनुकुलांतील विजयराजाचा पुत्र. याचा पुत्र धृतव्रत. [९, २३, १२]

( ३ ) धर्मऋषीची स्त्री.

( ४ ) आठव्या सावर्णि मनूचा एक पुत्र.

**धृतिमान**—पांचव्या रैवतमनूचा एक पुत्र.

( ३ ) कृतिमान् राजाचें नामांतर.

( ३ ) सुदरिद्र ब्राह्मणाचा एक पुत्र.

**धृष्ट**-हिरण्यकशिपूच्या सभेंतील एक दैत्य. [ ७, २, १८ ]

( २ ) सातव्या वैवस्वतमनूच्या दहा पुत्रांपैकीं तिसरा.याच्या संततीस धार्ष्ट म्हणतात. [ ८,१३,२ व ९,२,१७ ]

**धृष्टकेतु**—विदेहवंशीय सुधुतिराजाचा पुत्र. याचा पुत्र हर्यश्व [ ९,१३,१५ ]

( २ ) सोमवंशीय काश्यकुलातील सत्यकेतूचा पुत्र. याचा पुत्र कुमार. [ ९. १७, ९ ]

( ३ ) पांचालकुलांतील धृष्टद्युम्नाचा पुत्र. हा भारतीयुद्धांत पांडवांकडे होता. [ ९,२२,३ ]

(४) केकय देशाच्या राजाचा पुत्र. याची पत्नी वसुदेवभगिनी श्रुतकीर्ति. याला संतर्दनादि पांच पुत्र झाले. [९, २४, ३८]

(५) चेदिदेशचा राजा शिशुपालाचा पुत्र. हा पराक्रमी असून भारतीयुद्धांत पांडवांकडे होता. याच्या रथाचे अश्व सारंग्या रंगाचे असत. यास द्रोणाचार्यानें मारिलें. यानें आपली बहीण करेणुमती नकुलास दिली होती. ( भा. द्रो. )

**धृष्टद्युम्न**—सोमवंशीय द्रुपदराजाचा पुत्र. हा द्रोणवधार्थ केलेल्या यज्ञांतून द्रौपदीसह प्रकट झाला होता. यास क्षत्रधर्मा, धृष्टकेतु आणि क्षत्रंजय, असे तीन पुत्र होते. हा भारतीयुद्धांत पाण्डवांचा सेनापति होता याच्या रथाचे अश्व पारव्या रंगाचे असत. अश्वत्थामा वधाची वार्ता ऐकून द्रोणाचार्यांनीं शस्त्रें ठेविलीं असतां, यानें त्यांचा वध केला. युद्धाच्या अठराव्या रात्रीं हा शिबिरांत निद्रिस्त असतां अश्वत्थाम्यानें येऊन याचा शिरच्छेद केला. [९,२२,२] ( भा. द्रोण. )

**धृष्टबुद्धी**—कुंतल राजाचा प्रधान. ( चंद्रहास शब्द पहा )

**धृष्टि**—सोमवंशीय यदुकुलांतील कुन्ति राजाचा पुत्र. याचा पुत्र निर्वृति. [९,२४,३]

(२) सोमवंशीय सात्वतकुलांतील भजमानाचा तिसरा पुत्र. [९, २४, ७]

**धृष्णु**—वारुणिकवीच्या आठ पुत्रांपैकीं तिसरा.

**धेनुक**—तालवनांतील असुर. बलरामानें याचा नाश केला. [१०,१५,३६]

**धेनुमति**—प्रियव्रतकुलांतील देवद्युम्नराजाची स्त्री. हिचा पुत्र परमेष्ठि. [५,१५,३]

## धौ

**धौतपापा**—भारतवर्षीय एक नदी.

**धौतमूलक**—पाण्डवांपूर्वी चीनदेशचा राजा.

**धौंधुमारि**—धुन्धुमार राजाचे पुत्र.

**धौम्य**—देवलऋषीचा कनिष्ठभाऊ, व पाण्डवांचा पुरोहित [१,९,२ व १०,७४,९]

(२) व्याघ्रपादऋषीच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. हा मोठा तपस्वी असे. याचा शिष्य आरुणि अथवा उद्दालक.

(३) एकऋषि. ( भा. वन. )

**ध्यानबिंदु**—यजुर्वेदोपनिषत्.

**ध्रुव**—स्वायंभूमनुपुत्र उत्तानपाद व सुनीति यांचा पुत्र [४,८,८]. सापत्न मातेनें केलेल्या अपमानामुळें यानें पांचव्यावर्षी तप करून ध्रुव (अढळ) पद मिळविलें [४,९,२०]. याला शिशुमार प्रजापतीची कन्या भ्रमि व वायूची कन्या इला अशा दोन स्त्रिया होत्या. भ्रमीचे पुत्र कल्प व वत्सर आणि इलेचा पुत्र उत्कल. हा फारच सुंदर होता [४,१०,१-२]. शिवाय याला धन्या नामक स्त्री असून तिचा पुत्र शिष्ट. ( मत्स्य. ) याचा सापत्न-भ्राता उत्तम यक्षांकडून मृत झाल्यावर यक्षांशीं युद्ध [४,१०,८]. मनूचा उपदेश [४,११,७]. युद्धापासून निवृत्ति व कुबेराशीं सख्य. यानें अनेक यज्ञ केले, व प्रजेला संतोष दिला. छत्तीस हजार वर्षे राज्य करून शेवटीं तें आपल्या पुत्रास दिलें आणि मृत्यूच्या मस्तकावर पाय देऊन हा

विष्णुदूतासह वैकुंठास गेला. वैकुंठास जातांना यास मातेचें दर्शन झालें. [ ४,१२,१ ते ३५ ]

( २ ) सर्वांच्या वरतीं असणारा एक लोक. [ ५,२३,१ ]

( ३ ) अष्टवसूंपैकीं एक. याची पत्नी धरणि. याला नगराभिमानी देव पुत्र होते. [६,६,१०]

( ४ ) सोमवंशीय पुरुकुलांतील रंतिभार राजाचा पुत्र. [ ९,२०,६ ]

( ५ ) वसुदेव व रोहिणी यांचा एक पुत्र. [ ९,२४,४६ ]

( ६ ) रात्रियुद्धांत भीमानें मारलेला कलिंगदेशाचा दुर्योधनपक्षीय राजा.

( ७ ) एक ब्रह्मर्षि.

**ध्रुवसन्धि**--रामपुत्र कुशाच्या वंशांतील पुष्य राजाचा पुत्र. याचा पुत्र सुदर्शन. [ ९,१२,५ ] याला भारतांत पौष्य म्हटलें आहे. याच्या स्त्रिया मनोरमा व लीलावती.

**ध्रुवाश्व**—इक्ष्वाकुकुलातील भानुमान राजास नामांतर.

**ध्रुवोधर**-भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा

**ध्वजग्रीव**-रावणपक्षीय राक्षस. (वा. रा.)

**ध्वजवती**-हरिमेधा ऋषींची कन्या.

## न

**नकुल**-सोमवंशीय पण्डुराजपत्नि माद्रीला अश्विनीकुमारांपैकीं नासत्यापासून झालेला पुत्र. हा रूपानें सुंदर होता. [ ९,२२,२८ ]. याला द्रौपदीपासून शतानीक पुत्र व शिशुपालकन्या करेणुमती पत्नीपासून निरमित्र पुत्र झाला. [ ९,२२,२९-३२ ]. यानें राजसूययज्ञाच्या वेळीं पश्चिम दिग्विजय केला. [ १०,७२,१३ ]. याच्याकडे यज्ञसामग्री जमविण्याचें काम होतें. [ १०,७५,४ ]. अज्ञातवासांत हा विराटाच्या घरीं ग्रंथिक या नांवानें होता. याला अश्वशास्त्र व अश्वपरीक्षा याचें उत्तम ज्ञान होतें. याच्या रथाचे अश्व कांबोज देशांतील पोपटी रंगाचे असत व रथावर शरभ पक्ष्याच्या चिन्हाचा ध्वज असे. याच्या शंखाचें नांव सुघोष व धनुष्याचें नांव वैष्णव. भारती युद्धानंतर पांडवांकडील अवशिष्ट राहिलेल्या सात वीरांत हा होता. युधिष्ठिराबरोबर हिमालयाकडे जाताना याचा देह पतन पावला. [ १,१५,४५-४८ ].

**नक्त**-प्रियव्रतवंशीय पृथुषेण राजा व आकूती यांचा पुत्र याची पत्नी द्रुति व पुत्र गय. [ ५,१५,६ ].

**नक्षत्र**-कृत्तिकादि सत्तावीस नक्षत्रें हीं चंद्राच्या स्त्रिया होत. [ ६,६,२३ ]. आकाशांत दिसणारीं तेजस्वीं मंडलें.

**नग**-शत्रुघ्नाचा सेनापति.

**नग्नजित्**-एक राजा. यास कर्णानें दिग्विजयाच्या वेळीं जिंकलें होतें. हा इषुपात् नामक असुरांशानें जन्मला होता भारतीयुद्धांत हा दुर्योधनाकडे होता. याची कन्या सत्या अथवा नाग्नजिती ही श्रीकृष्णाची पत्नी. [ १०,५८,३२ ].

**नग्नहु**-एक ब्रह्मर्षि. ( मत्स्य. अ. १४४ )

**नचिकेता**-गौतम गोत्रोत्पन्न आरुणिऋषीचा पुत्र. हा पांच वर्षाचा असतां याच्या

पित्यानें उत्तम गायी बाजूला काढून वाईट गायी दान देण्याकरितां ठेविल्या असतां हा पित्याला म्हणाला, मला कोणत्या ब्राह्मणाला दान देणार? मुलानें दोन तीन वेळां असा प्रश्न केल्यावरून 'मृत्यूला तुला दान देणार' असें वडिलानें म्हटलें. तेव्हां यानें धैर्यानें आपणास मृत्यूला दान देण्यास सांगितलें; व दान दिल्यावर हा मृत्युलोकीं गेला. तेथें यमदूत निवारण करीत असतांही हा अन्न-पाण्यावाचून तीन दिवस राहिला. तिसऱ्या दिवशीं यम तथें आला, त्याला दूतांनीं याची हकिगत सांगितली. तेव्हा यमानें यास तीन वर मागण्यास सांगितलें. यान एका वरानें ब्रह्मविद्या मागितली. ती यमानें याची योग्य परीक्षा करून दिली व उरलेल्या वरांनीं हा पित्याकडे परत आला.

**नडायन**-भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**नड्वला**—वीरणप्रजापतीची कन्या व चक्षुमनूची स्त्री. हिला पुरु, वत्स इत्यादि बारा निष्पाप पुत्र झाले. [४,१३,१६]

**नन्द**—विष्णूचा एक पार्षद. [४,१२,२२].

(२) क्रौंचद्वीपातील एक पर्वत. [५,२०,२१].

(३) वसुदेव व मदिरा यांचा एक पुत्र [९,२४,४८]

(४) गोकुलांतील गोपांचा स्वामी. हा द्रोण नामक वसूच्या अंशानें जन्मला होता. याची स्त्री यशोदा [१०,८,४८] वसुदेवानें श्रीकृष्णाला याचेकडे ठेविलें [१०,३,५१]. नन्द व वसुदेव यांची भेट [१०,५,२१]. नंद गोपालांना गर्गोक्त श्रीकृष्णस्वरूप सांगतो [१०,२६,१५]. नंदाचें वरुणलोकीं गमन व आगमन. [१०,२८,१-९]. नंदाचें मथुरेंत गमन [१०,३९,३३]. श्रीकृष्णाचा विरह व उद्धवकृत नंदाचें सांत्वन [१०,४६,२७ ३०] स्यमंतपंचक-क्षेत्रीं गमन. [१०,८२,३१].

(५) शिशुनागवंशीय महानन्दीचा शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र. व नन्दवंशाचा एक संस्थापक. याचें नांव महापद्म. हा महानन्दीचा वध करून गादीवर बसला. याची राजधानी पाटलीपुत्र. याचे वंशांत सुमाल्य आदि आठ पुरुष झाले व त्यांनीं शंभर वर्षें राज्य केलें. पुढें यांचा नाश होऊन मौर्यघराणें उदयास आलें. [१२,१,९-१२].

**नन्दक**-विष्णूचा खड्ग.

(२) दुर्योधन पक्षीय एक योद्धा.

(३) वसुदव व वृकदेवी यांचा पुत्र.

**नन्दन**-(वन) मेरूच्या पूर्वेस मंदरपर्वतावरील देवांचें वन. [५,१६,१४].

(२) क्रौंचद्वीपांतील पर्वत [५,२०,२१]

(३) इंद्राचें स्वर्गांतील वन.

(४) हिमालयावर असणारें एक वन.

**नन्दा**--अलकानगरीजवळून वाहणारी नदी. [४,६,२४, व ७,१४,३२].

(२) शाल्मलीद्वीपांतील एक नदी. [५,२०,१०].

(३) धर्मऋषीच्या हर्षनामक पुत्राची स्त्री.

**नन्दि**—कश्यप व जामि यांचा पुत्र जो स्वर्ग, त्याचा पुत्र [६,६,६].

**नन्दिक-नन्दिकेश्वर**–( नन्दी शब्द पहा. )

**नन्दिग्राम**–अयोध्येपासून एक कोसावर असलेला गांव. येथें भरत–रामचंद्र यांची भेट झाली [ ९,१०,३६ ].

**नन्दिनी**–कश्यप व सुरभि यांची कन्या.

( २ ) वसिष्ठाजवळ असलेली कामधेनूची कन्या. हिच्या प्रसादानें दिलीपराजास पुत्र झाला.

**नन्दिवर्धन**-विदेहवंशीय उदावसूचा पुत्र. याचा पुत्र सुकेतु. [ ९,१३,१४ ].

( २ ) कलियुगांतील प्रद्योतवंशीय राजकाचा पुत्र [ १२,१,४ ].

( ३ ) कलियुगांतील शिशुनागवंशीय अजयराजाचा पुत्र. याचा पुत्र महानन्दि. [ १२,१,७ ].

**नन्दी**-( **श्वर** ) स्वायम्भूमन्वंतरांतील कामधेनूचा पुत्र, व शिवगणांतील शंकराचें वाहन [ ४,४,५ व १०, ६३,६ ]. याची आकृती मनुष्यासारखी, मुख वानरासारखें व भुज ह्रस्व. दक्षयज्ञविध्वंसनाच्या वेळीं यानें भगनामक ऋत्विजास बांधिलें. दक्षास नंदीचा शाप. [ ४,२,२० ] यानें रावणासहि शाप दिला होता. ( वा. रा उत्तर. स. ५० ) लिंगायतांचा बसव हा नन्दीचा अवतार समजतात. नन्दीपुराण ह्मणून एक स्वतंत्र पुराण असून सत्यनन्दी ह्मणून एक व्रत आहे.

**नभ**–सूर्यवंशीय कुशपुत्र अतिथि कुलांतील निषध राजाचा पुत्र. याचा पुत्र पुंडरीक. [ ९,१२,१ ].

( २ ) दुसऱ्या स्वारोचिष मनूचा एक पुत्र.

( ३ ) तिसऱ्या उत्तम मनूचा एक पुत्र.

**नभग**–सातव्या वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांपैकीं एक. याचा पुत्र नाभाग, [ ८,१३,२ व ९,४,१ ].

**नभस्**–( श्रावण ) या महिन्यांत इंद्र नांवाचा सूर्य आपल्या गणांसह फिरत असतो. [ १२,११,३७ ].

**नभस्य**– भाद्रपद ) या महिन्यांत विवस्वान नांवाचा सूर्य आपल्या गणांसह फिरत असतो. [ १२,११,३८ ].

( २ ) स्वारोचिष मनूचा एक पुत्र.

( ३ ) उत्तम मनूचा एक पुत्र.

**नभस्वती**–उत्तानपाद वंशीय विजिताश्व राजाची दुसरी स्त्री. हिचा पुत्र हविर्धान. [ ४,२४,५ ].

**नभस्वान**–मूरनामक दैत्याचा पुत्र. याला कृष्णानें मारिलें. [ १०,५९,१२ ].

**नमस्यु**–पूरुकुलांतील प्रवीर राजाचा पुत्र. याचा पुत्र चारुपद [ ९,२०,२].

**नमुचि**–दनुपुत्र दानव. याची स्त्री सुप्रभा. [ ६,६,३२ व ६,१०,१९ ]. हा हिरण्यकशिपूच्या अनुयायांत होता. [ ७,२,४ ]. जलफेसवज्रानें इंद्रानें याचा वध केला. [ ८,११,४० ]

( २ ) दाक्षिणदिशेकडे राहणारा ब्रह्मर्षि.

**नर**–( नरनारायण शब्द पहा )

( २ ) सूर्यवंशीय दिष्टकुलांतील सुधृति राजाचा पुत्र. याचा पुत्र केवल, [ ९,२,२९ ].

( ३ ) सोमवंशीय पूरुकुलांतील मन्यु-राजाचा पुत्र. याचा पुत्र संकृति. [ ९,२०,१ ].

( ४ ) तामसमनूचा एक पुत्र.

**नरक**–पातकी लोकांना यमलोकीं मिळणारीं स्थानें. [ ५,२६,७–४० ].

( २ ) विष्णूनें मारिलेला एक दानव.

( ३ ) तेरा सैंहिकेयांतील एक.

**नरकासुर**–एक असुर. भूमीचा पुत्र म्हणून यास भौमासुर असेंहि म्हणतात. प्राग्ज्योतिषपुरचा राजा. भूमीनें विष्णूस प्रसन्न करून यास वैष्णवास्त्र दिलें होतें. पुढें तें यानें आपल्या भगदत्त नामक पुत्रास दिलें. ( भा. द्रोण. ) यानें विश्वकर्म्याची कन्या पळवून नेऊन तिजवर बलात्कार केला. तसेंच देव, गंधर्व, मानव यांच्या कन्या व अप्सरा अशा १६००० स्त्रियांना आपल्या वाड्यांत बंदींत ठेविलें होतें. श्रीकृष्णानें याचा वध करून त्यांची मुक्तता केली व इंद्राणीचीं कुंडलें तिला परत दिलीं. [ १०,५९,१९–३८ ]

**नर–नारायण**–दक्षकन्या मूर्ति व धर्मऋषि यांस विष्णूचे अंशानें झालेले दोन पुत्र. हा भगवंताचा चौथा अवतार. [ १, ३, ९ व ४, १, ५२ ] यांच्या तपोनाशाकरितां इंद्रानें मदनाला पाठविलें, त्यावेळीं यांनींच देवांच्या अप्सरांपेक्षां सुंदर स्त्रिया उत्पन्न करून त्यांतील उर्वशी नामक अप्सरा इंद्रास दिली. यांचें निवासस्थान बदरिकाश्रम [ ११, ४, ७ ] हेच पुढें अर्जुन व श्रीकृष्ण रूपानें अवतरले. श्रीकृष्ण व अर्जुन यांना दर्शन व उपदेश. [ १०,८९,६० ]

**नरवाहन**–कुबेराचें नांव.

**नरसिंह**–हिरण्यकशिपूच्या नाशाकरितां व प्रल्हादाच्या भक्तीकरितां झालेला भगवंताचा चौदावा अवतार. [ १, ३, १८ व ७, ८, १८ ] नृसिंहजयंती वैशाख शुद्ध १४ ला असते. अठरा उपपुराणांत हें एक असून याची संख्या १८ हजार आहे.

( २ ) हरिवर्ष खंडांतील लोकांची उपास्य देवता [ ५, १८, ८ ].

**नरान्तक**–अंगदानें मारिलेला रावण पुत्र. [ ९, १०, १८ ]

( २ ) प्रहस्त नामक रावणप्रधानाच्या चार पुत्रांतील एक. यास द्विविद वानरानें मारिलें.

**नरिष्यंत**–वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांपैकीं सातवा याचा पुत्र चित्रसेन. [ ८, १३, २ व ९, २, १९ ] याचा दम या नांवाचाही पुत्र होता.

**नर्मदा**–एक पवित्र नदी. ही अमरकंटक पर्वतांतील एका कुंडांत उगम पावून भडोचजवळ समुद्राला मिळते. हिच्या उगमाजवळ कापिलधारा नांवाचा ८० फूट उंचीचा एक धबधबा आहे. मंडला ते रामनगर पर्यंत १५ मैल हिचें पाणी निळ्यारंगाचें आहे. जबलपूरजवळ दूधधारा नांवाचा ३० फूट उंचीचा हिचा धबधबा असून पुढें ही संगमरवरी खडकांतून वहाते. हिच्या कांठीं महेश्वर, ओंकार मांधाता इत्यादि पवित्र क्षेत्रें आहेत. हिला रेवा असेंहि म्हणतात. हिची उत्पत्ति शंकराच्या शरीरापासून झाली, असा रामायण व महाभारतांत उल्लेख आहे. नर्मदाखंड म्हणून १४००० श्लोकांत हिचें

माहात्म्य वर्णिलें आहे. ही दक्षिण व उत्तर हिंदुस्थानची सीमा आहे. [ ५, १९, १८ ] हिच्याच कांठावर त्रेतायुगांत इंद्र व वृत्रासुराचें युद्ध झालें. [ ६, १०, १६ ]

( २ ) नागकन्या व मांधातापुत्र पुरुकुत्साची पत्नी. [ ९, ७, २ ]

( ३ ) सोमप पितरांची मानस कन्या.

( ४ ) एक गंधर्वी. हिनें आपल्या सुंदरी, केतुमती आणि वसुदा, अशा तीन कन्या सुकेश राक्षसाचे पुत्र माल्यवान, सुमाली आणि माली यांस अनुक्रमें दिल्या होत्या. ( वा. रा )

( ५ ) नदी. उगम-पारियात्रपर्वत.

**नर्मदाद्वार**-भारतवर्षीय तीर्थ.

**नल**-सोमवंशीय आयुकुलांतील यदुराजाच्या चार पुत्रांपैकीं तिसरा [ ९,२३,२० ]

( २ ) तेरा सैंहिकेयांतील एक.

( ३ ) इक्ष्वाकुवंशीय निषधराजाचा पुत्र. हा सुंदर, सत्यवादी, पराक्रमी व अश्वविद्येंत प्रवीण होता. विदर्भदेशाधिपति भीमकराजाची, सर्वगुण व सौंदर्यसंपन्न अशी कन्या जी दमयंती ती याची पत्नी. दमयन्ती व नल या उभयतांतलि प्रेमभाव एका सुवर्ण हंसाचे द्वारा दृढतर झाला होता. स्वयंवर प्रसंगीं, इंद्र, यम, अग्नि, व वरुण असे चारहि देव दमयंतीची लालसा धरून येत असतां मार्गांत नल राजाची भेट झाली. तेव्हां त्या चारहि देवांनीं आपणास सहाय्य करण्याविषयीं नलास प्रार्थना केली. ती नलानें मान्य केली. दमयंतीचे प्रेम नलावरच आहे असे जाणून स्वयंवर प्रसंगीं चारही देवांनीं नलाप्रमाणेंच रूप धारण केलें. परंतु दमयंतीनें शेवटीं खऱ्याच नलराजास माला घातली, तेव्हां सर्वत्र जयजयकार झाला; आणि चारहि देव संतुष्ट होऊन त्यांनीं नलराजास वर दिले. इंद्र म्हणाला, ' यज्ञ प्रसंगीं सर्व देव तुला गोचर होतील व अंतीं तुला उत्तम गति मिळेल.' अग्नि व वरुण म्हणाले, ' तूं इच्छा करताच आम्हीं प्रगट होऊं ' आणि ' तुला पाकपरिज्ञान उत्तम होईल' असा यमानें वर दिला. याप्रमाणें वर देऊन चारहि देव परत जात असतां मार्गांत कलीची व त्यांची भेट झाली. त्यावेळीं इंद्रानें स्वयंवराचें व दमयंतीचें वर्णन करून नलाची फारच स्तुति केली. ती ऐकून कलीस समाधान वाटण्याऐवजीं मत्सर उत्पन्न झाला आणि नलाचा छळ करण्याचा निश्चय त्यानें केला; आणि द्वापारास मदतीस घेऊन तो नलाच्या राजधानींत आला. व अपवित्रतेची संधी पाहून त्यानें नलाच्या शरीरांत प्रवेश केला. शरीरांत कलीचा प्रवेश होतांच नलराजास द्यूत खेळण्याची इच्छा अनावर झाली. त्यानें पुष्कर नामक भ्रात्यास बोलावून त्याबरोबर पण लावून तो खेळूं लागला. त्या पणांत राज्यासह तो सर्वस्व हरला. यावेळीं याला इंद्रसेन पुत्र व इंद्रसेना कन्या अशीं दोन मुलें होतीं. त्यांस दमयंतीनें आजोळीं पाठविलें. दमयंती

मात्र जाईना. तेव्हां तिला बरोबर घेऊन एकेक वस्त्रानिशीं यानें वनाचा मार्ग धरिला. अरण्यांत भटकत असतां याच्या नजरेस सुवर्णकांतीचे पक्षी पडले. त्यांस धरण्याच्या इच्छेनें यानें आपलें वस्त्र सोडून त्यांच्यावर टाकलें. त्याबरोबर ते पक्षी वस्त्र घेऊन आकाशांत उडाले आणि नलराजा दिगंबर झाला. तेव्हां दमयंतीनें आपलें अर्धे वस्त्र त्यास दिलें, व एका वस्त्रानिशीं तीं उभयतां संचार करूं लागलीं. दमयंतीनें माहेरीं जाऊन सुखांत राहावें अशी इच्छा नलराजाची होती परंतु अशा विपदावस्थेत पतीस सोडून आपण जाणार नाहीं, असा दमयंतीचा निश्चय होता. त्यामुळें नलाचा निरुपाय झाला होता.

अशा प्रकारें उभयतां एक वस्त्रानें वनात संचार करीत असतां एकदां दमयंती गाढ निद्रेंत आहे, व तेथूनच विदर्भ देशास जाण्याचा मार्ग जवळ आहे, असें पाहून नलराजानें हळूच अर्धे वस्त्र फाडलें व दमयंतीस तेथेंच सोडून तो निघून गेला. दमयंती जागी झाल्यानंतर पहाते तों नलराज आपणास सोडून गेल्याचें समजलें. ती शोकमग्न झाली, व नलाच्या शोधार्थ ती त्या वनात इतस्ततः भटकूं लागली. इतक्यांत एका व्याधाच्या दृष्टीस ती पडली. त्यानें तिला आश्वासन देऊन घरीं नेलें, परंतु त्याच्या मनांत कामवासना उत्पन्न झाली. त्यावेळीं त्या महापतिव्रता दमयंतीनें त्याजकडे दृष्टिपात करताच तो अधम भस्म झाला. पुढें ती वनांतील अनेक संकटें सहन करीत शेवटीं आपल्या पितृगृहीं येऊन पोंचली. मातापित्यांची व आपल्या बालकांची तिला भेट झाली; परंतु पतिविरहानें तिचें मन उद्विग्न झालें होतें. पतीची भेट होईपर्यंत नूतन वस्त्र परिधान करण्याचें किंवा वेणी घालण्याचेंहि तिनें वर्ज्य केलें. शेवटीं भीमक राजानें मंत्र्यांच्या विचारें नल राजाच्या शोधार्थ सर्वत्र दूत रवाना केले असतां अयोध्येंतील ऋतुपर्ण राजाकडे नलराजा बाहुक नांवानें सारथ्य करीत असल्याचें समजलें. तेव्हां परीक्षा पहाण्याकरितां एक दिवसाचा अवधि ठेवून दमयंतीच्या स्वयंवराची आमंत्रणपत्रिका तयार करून ती ऋतुपर्ण राजाकडे पाठविली. (महाभारतात नल-दमयंतीचा कथाभाग फारच चित्ताकर्षक व उद्बोधक असा वर्णिला आहे. आणि त्यावरून त्यावेळच्या समाजरचनेचे व पतिपत्नीप्रेमाचें उत्तम बोधपर चित्र वठतें)

असो; इकडे नलराजा दमयंतीस सोडून अरण्यांत भटकत असतां एका वणव्यांत एक सर्प जळत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर त्याच्या मनांत भूतदया प्रगट झाली, आणि त्यास त्यानें उचललें असतां तो सर्प त्यास म्हणाला; राजा दहा पावलें मोजून नतर मला खालीं ठेव. त्याप्रमाणें नलराजानें एक, दोन असें

भोजीत दश म्हणून सर्पास खालीं ठेवलें, तोंच सर्पानें नलराजास दंश केला. हा प्रकार पाहतांच नलराजास आश्चर्य वाटलें. तेव्हां तो सर्प म्हणाला, ' माझें नांव कर्कोटक आहे. तूं मला जीवदान दिलेंस त्या उपकाराच्या उतराईस्तवच मी तुला दंश केला आहे. माझें विष तुला न बाधतां तुझ्या शरीरात ज्या कलीनें प्रवेश केला आहे, त्यास तें बाधेल. माझ्या विषानें तुझें रूप पालटेल, परंतु सद्यःस्थितींत तें तुला हितावहच होईल तूं जेव्हां माझें स्मरण करशील, त्या वेळीं मी प्रगट होऊन माझें सर्व विष मी शोषून घेईन. तूं आतां येथून अयोध्येंत ऋतुपर्ण राजाकडे जा. मी दंश केल्यानें तुझ्या शरीरांतील कली नष्ट झाला आहे. यापुढे तुला तुझें सर्व ऐश्वर्य प्राप्त होईल. ' कर्कोटकसर्पाच्या सूचनेप्रमाणें नलराजा अयोध्येंत गेला आणि ऋतुपर्ण राजाच्या अश्वशाळेत 'बाहुक' हें नांव धारण करून सारथी म्हणून राहिला. पुढें दमयंतीच्या स्वयंवराची पत्रिका आली त्यावेळीं अयोध्येहून कुंडणपुरांत असलेलें ३५० योजनांचें अंतर एका दिवसांत गांठणें अशक्य असल्यानें राजा चिंतामग्न झाला असतां 'बाहुक' सारथ्यानें त्याची चिंता दूर केली. त्यावेळ मार्गानें जातांना बाहुकाचें अश्वविद्याकौशल्य पाहून ऋतुपर्ण राजा संतुष्ट झाला, आणि मार्गांतच उभयतांचा संवाद होऊन ऋतुपर्ण राजानें आपणास अवगत असलेली अक्षविद्या नलास शिकविली, व त्याजपासून अश्वविद्येचें ज्ञान संपादन केलें. विदर्भ नगरींत पोंचल्यावर, नलराजाची परीक्षा करण्याकरितां दमयंती आपल्या दोन्ही अपत्यांसह ऋतुपर्ण राजाच्या अश्वशाळेंत गेली, आणि खातरी पटतांच तिनें नलराजास आलिंगन दिलें. कर्कोटक सर्पाचें स्मरण करतांच तो प्रगट झाला, व त्यानें नलाच्या शरीरांतील विष शोषून घेतलें, त्याबरोबर नलराजास द्विगुणित दिव्यकांति प्राप्त झाली. सर्वत्र आनंदीआनंद झाला. नलासारख्या एका श्रेष्ठ पुरुषास आपण सारथ्य करावयास लावलें याबद्दल ऋतुपर्णराजानें खेद प्रदर्शित करून त्या प्रेमळ दांपत्याचें अभीष्ट चिंतिलें. पुढें नलराजानें आपलें राज्य परत संपादन करून अनेक वर्षें सुखोपभोग घेतला. [ ९,९,१० ] (भा. वन.)

( ४ ) रामसेनेंतील एक वानर. यानेंच समुद्रावर सेतु बांधिला.

( ५ ) इक्ष्वाकुवंशीय ऋतुपर्ण राजाच्या दोन पुत्रापैकीं दुसरा (लिंगपु. अ. ६६

**नलकूबर**—कुबेराचा पुत्र व मणिग्रीवाचा ज्येष्ठ भ्राता. नारदाच्या शापानें हे अर्जुनवृक्ष झाले असतां श्रीकृष्णानें उद्धार केला. [ १०,१०,२३ ]

**नलिनी**—स्वधुनीच्या सप्तप्रवाहांपैकीं एक. हा मेरुपर्वतावर आहे.

( २ ) इंद्राची नगरी. (वा. रा. अयोध्या)

**नवखण्ड**—इलावृत, भद्राश्व, हरिवर्ष, किंपुरुष, केतुमाल, रम्यक, भरत, हिरण्मय व उत्तर कुरु, हीं नऊ खंडें जम्बुद्वीपाचीं आहेत. भरत, वर्त्त, राम द्रामाळ, केतुमाल, हिरे, विधिवस, महि व सुवर्ण, हीं नांवें कांहीं ग्रंथांत सांपडतात.

**नवग्रह**—सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु व केतु.

**नवतन्तु**—विश्वामित्राचा एकपुत्र.

**नवनाग**—अनंत, वासुकी, शेष, पद्मनाथ, कंबल, शंखपाल, धृतराष्ट्र, तक्षक व कालिय, यांस ही संज्ञा आहे.

**नवनिधी**—महापद्म, पद्म, शंख, मकर कच्छप, मुकुंद, कुंद, नील, खर्व, असे कुबेराचे नवनिधि आहेत.

**नवरत्नें**—हिरा, माणिक, मोती, गोमेद, इंद्रनील, पाच, प्रवाळ, पुष्कराज, व वैडूर्य किंवा तोरमल्ली.

**नवरथ**—विदभकुलांतील भीमरथाचा पुत्र. याचा पुत्र दशरथ. [ ९,२४,४ ]

**नवरस**—शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अदभुत व शांत.

**नवराष्ट्र**—भारतवर्षीय एक देश व नगरी.

**नवसिद्ध**—ऋषभदेवाचे नऊ सिद्ध पुत्र. [ ५,४,११ ]

**नवविधाभक्ति**—श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन.

**नहुष**—सोमवंशीय पुरूरवापुत्र आयूचा पुत्र. [ ९,१७,१ ] पितरांची मानसकन्या जी विरजा ती याची स्त्री असून यति, ययाति, संयाति, आयति वियति आणि कृति, असे सहा पुत्र होते ब्रह्महत्येच्या भयानें इंद्र लपून बसला असतां, हा इंद्र झाला. इंद्रपद मिळतांच याला इंद्राणीची अभिलाषा उत्पन्न झाली काममदानें अंध झाल्यामुळें याची सारासार विचार-शक्ति नष्ट झाली, आणि इंद्राणीची-अपूर्ववाहनाची-इच्छा पूर्ण करण्यास्तव यानें सप्तऋषींचें वाहन केलें; आणि 'सर्प-सर्प' ( चला-चला ) असें म्हणून हा त्यांना पायानें लाथाडूं लागला. हा अन्याय असह्य होऊन अगस्त्य ऋषीनें-'सर्पहो'-असा यास शाप दिला. त्या शापाप्रमाणें हा दहा हजार वर्षे सर्पयोनींत राहिला असतां युधिष्ठिराच्या दर्शनानें याचा उद्धार झाला. [ ६,१३,१६ ] ( भा. वन.)

## ना

**नाकुरय**—कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**नाकुलि**—भृगुकुलोत्पन्न ऋषि.
( २ ) नकुलाच्या पुत्रांस संज्ञा.

**नाग**—मेरुकर्णिकेंतील एक. [५,१६,२६]
( २ ) तार्क्ष्य व कद्रू यांच पुत्र [ ६,६,२२ ]
( ३ ) शरीरांतील उपप्राणांपैकीं एक.
( ४ ) भारतवर्षीय तीर्थ.

**नागदत्त**—धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**नागदत्ता**—एक अप्सरा.

**नागपाश**—अस्त्रविशेष. यानें बाणासुरानें अनिरुद्धाला बांधिलें [ १०,६२,३५]

**नागपुर**—हस्तिनापुर.

**नागवीथी**—धर्मऋषि व यामी यांची कन्या.

**नागसाव्हय**—हस्तिनापुर.

**नाग्नजिति**—कोसलदेशाधिपति नग्नजित् राजाची कन्या. हिचें नांव सत्या होतें. हिच्या स्वयंवरांत सात वृषभांना जिंकण्याचा पण होता, तो जिंकून श्रीकृष्णानें हिच्याशीं विवाह केला. वीर, चंद्र, अश्वसेन, चित्रगु, वेगवान्, वृष, आम, शंकु, वसु, श्रीमान् आणि कुंति हे हिचे दहा पुत्र होते. [ १०, ५८,३३ व १०,६१,१३ ] स्वविवाह वृत्तांत कथन. [ १०,८३,१३ ]

**नागोद्भेद**—भारत वर्षीय तीर्थ.

**नाचिकि**—विश्वामित्राचा एक पुत्र.

**नाचिकत**—नचिकेत ऋषीचा पुत्र.

**नाडायन**—अंगिराकुलातील ब्रह्मर्षि.

**नाडीजंघ**-एक बक. (इंद्रद्युम्न शब्द पहा)

**नाद**—चाक्षुषमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

**नाभ**—इक्ष्वाकुकुलांतील भगीरथाचा पुत्र. याचा पुत्र सिंधुद्वीप. [ ९,९,१६ ].

**नाभाग**—वैवस्वत मनूचा एक पुत्र [८,१३,२]

( २ ) वैवस्वत मनूचा पुत्र दिष्ट, त्याचा पुत्र. हा वैश्य झाला. याचा पुत्र भलंदन. [ ९,२,२३ ].

( ३ ) वैवस्वत मनुपुत्र नभग त्याचा पुत्र. हा गुरुगृहीं अध्ययन करीत असतां याच्या भावांनीं सर्व संपत्ति वाटून घेतली, व हा परत आल्यावर यास तुझ्या वांटणीचा पिता आहे, म्हणून सांगितलें. तेव्हां हा आपल्या पित्याकडे गेला. त्यानें यास अंगिरा ऋषीच्या सत्रांत 'इदमित्था' व 'येयज्ञेन' हीं दोन सूक्तें सांग म्हणजे ते तुला द्रव्य देतील असें सांगितलें त्याप्रमाणें तेथें जाऊन यानें सूक्तें सांगितलीं असतां ऋषींनीं यास यज्ञशेष द्रव्य दिलें. परंतु इतक्यांत रुद्र तेथें आला व हें द्रव्य माझें आहे. असें म्हणाला. तेव्हां पित्याच सांगण्यावरून यानें तें सर्व द्रव्य रुद्राला दिलें. ही याची सत्यप्रियता पाहून रुद्रानें संतुष्ट होऊन यास तें सर्व द्रव्य परत दिलें. याचा पुत्र अम्बरीष. [९,४,१ ते १३].

**नाभि**—कस्तूरी मृग. [ ३,२१,४४ ].

( २ ) प्रियव्रतपुत्र आग्नीध्र व पूर्वचित्ति अप्सरा यांच्या नऊ पुत्रांतील ज्येष्ठ. याची स्त्री मेरुदेवी व पुत्र ऋषभदेव याच्या वर्षास अजनाभ हें नांव होतें. [ ५,२,१९ व ५,४,२ ].

**नाभिगुप्त**-प्रियव्रतपुत्र हिरण्यरेता त्याच्या सात पुत्रांतील चौथा. याचा वर्ष याच नावानें प्रसिद्ध आहे. [ ५,२०,१४].

( २ ) कुशद्वीपांतील चौथा वर्ष.

**नायकि**—अंगिराकुलांतील एक ऋषि.

**नारद**—स्वायंभुमन्वंतरांतील ब्रह्मदेवाच्या दहा मानस पुत्रांपैकीं एक. हा ब्रह्मदेवाच्या मांडीपासून झाला. [ ३, १२,२३ ] हा पूर्वजन्मीं दासीपुत्र होता. [ १,५,२३ ] यानें व्यासाला भागवत रचण्याचा उपदेश केला. [ १,५,८ ] हा ब्रह्मचारी होता. [ ४,८,१ ]. नारदाचा प्राचीनबर्हिराजाला उपदेश. [ ४,२५,३ ]. अंगिरा ऋषीसह चित्रकेतु राजाकडे आगमन व उपदेश [ ६,१४,६१ व ६,१६,१७]. नारदाचें श्रीकृष्णाला कर्तव्य कथन. [ १०, ३७, ९ ]. नारदानें पाहिलेलें श्रीकृष्णाचें विवि-

धत्व. [ १०,६९,८ ]. वसुदेवाला उपदेश. [ ११,२,३ ]. याशिवाय नारदाचा संबंध अनेक ठिकाणीं आला आहे, त्यांतील मुख्य प्रसंग वर दिले आहेत.

( २ ) मेरुकर्णिकेंतीली पर्वत [५,१६,२६]

( ३ ) भगवंताचा तिसरा अवतार. यानें ' पंचरात्रागम ' तंत्राचा सावर्णिमनूला उपदेश केला. भारतवर्षांतील प्रजेसह नरनारायणाचा उपासक [ १,३,८ व ५,१९,१० ].

( ४ ) एक पुराण. याची श्लोक संख्या २५ हजार आहे. [ १२, १३,५ ].

( ५ ) वैशाख महिन्यांत अर्यमा सूर्यासह फिरणारा गंधर्व. हा कश्यप ऋषि व मुनीपत्नी यांपासून झालेल्या गंधर्वांतील एक. [ १२,११,३४ ].

( ६ ) महादेवाच्या शापानें देहपात झाल्यावर ऋषिकुलांत उत्पन्न झालेला एक ऋषि. हा पर्वत ऋषींचा मातुल होता. या परस्परांनीं कोणत्याहि मनांत आलेला विचार एकमेकांपासून लपवून ठेवूं नये; व ठेवल्यास शाप द्यावा असें ठरविलें होतें. याची स्त्री संजयकन्या दमयन्ती.

( ७ ) एक ऋषि. याची भगिनी अरुंधति. ती वसिष्ठाला दिली होती. ( लिंग. पु अ. ६३ ) याची स्त्री सत्यवती.

( ८ ) कुबेरसभेंतील एक ऋषि यानें नारदनीति युधिष्ठिराला सांगितली मणिग्रीव व नलकूबेरांना शाप देणारा हा असावा. [१०,९,२३]. (भा. स )

( ९ ) विश्वामित्राचा एक पुत्र. हा जनमेजयाचे सर्पसत्रांत सदस्य होता.

(१०) रामाच्या सभेंतील एक धर्मशास्त्री.

( ११ ) एक स्मृतिकार.

**नारदपारिव्राजक**—अथर्वण वेदोपनिषत.

**नारदी**-विश्वामित्र ऋषीचा एक पुत्र.

**नारसिंह**—नरसिंहाचें नांव.

**नारसिंहकल्प**—ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला सोळावा दिवस.

**नारायण** ( नर नारायण शब्द पहा. ) सर्व जगतास आधारभूत एक परमात्मा. [ ९,१४,४८ ].

( २ ) चालू वैवस्वत मन्वंतरांतील धर्म ऋषि व साध्या यांचा एक पुत्र. ( साध्यदेव शब्द पहा. )

**नारायणगण**—सैन्य विशेष. यांतील कांहीं गण कृष्णानें दुर्योधनाकडे दिले होते, व कांहीं पांडवांकडे ठेविले होते. ते सर्व भीष्मादिकांच्या हातून मृत झाले.

**नारायणसरोवर** सिंधुनदाचा जेथे समुद्राशीं संगम होतो, तेथील एक तीर्थ. येथें दक्षपुत्र हर्यश्व तप करण्याकरितां आले होते. [ ६ ५,३ ].

**नारायणामृतबिंदु**—यजुर्वेदोपनिषत्.

**नारायणाश्रम**—बदरिवनांतील एक आश्रम. ( बदरिकाश्रम ) [ ९,३,३६ ].

**नारायणास्त्र**—अस्त्रविशेष. हें ध्रुवानें यक्षावर सोडिलें होतें. [ ४,११,१ ].

**नारायणी**—मायेचें नांव. [ १०,२,१२ ].

( २ ) मुद्गलाची स्त्री इंद्रसेनेचें नांव.

**नारी**—आग्नींध्रपुत्र कुरूची पत्नी [५,२,२३].

**नारीकवच**—मूलक राजाचें नामांतर. [ ९,९,४० ].

**नारीतीर्थ**–पंडुपुत्र अर्जुन तीर्थयात्रा करीत असतां दक्षिणसमुद्रावर त्यानें सौभद्र पौलोम, आगस्त्य, कारंधम, आणि भारद्वाज, अशीं पांच तीर्थे पाहिलीं. त्या सर्वांस नारीतीर्थ असें नांव होतें. परंतु त्यांत मगरी असल्यानें तेथें कोणीच जात नसत. हें वर्तमान तेथील ऋषींकडून समजतांच तेथील सौभद्र तीर्थांत अर्जुन उतरला. तोंच मगरीनें त्यास पकडलें. पण अर्जुनानें स्वसामर्थ्यानें तिला तीर्थाबाहेर काढिलें असतां ती एक दिव्य स्त्री झाली; आणि ह्मणाली, ' मी कुबेरसभेंतील एक अप्सरा आहे, माझें नांव वर्गा, एकदां सौरभेयी, समीची बुद्बुदा आणि लता, अशा माझ्या मैत्रिणींसह क्रीडा करीत असतां, अध्ययन करीत असलेल्या एका ऋषिपुत्रास आह्मांपासून त्रास झाला, व आह्मांस त्यानें शाप दिला कीं, तुह्मीं जलामध्यें नक्र होऊन पडाल. शाप ऐकतांच आह्मीं त्यास शरण गेलों, तेव्हां शंभर वर्षांनीं एका पुरुषाच्या स्पर्शानें तुमचा उद्धार होईल, असा त्यानें आह्मांस उःशाप दिला. आज तीं शापाचीं शंभर वर्षे पूर्ण झाल्यानें आपलें दर्शन होऊन माझा उद्धार झाला. आतां माझ्या मैत्रिणींचाही तुम्हीं उद्धार करा. हें ऐकून अर्जुनानें त्या सर्वांचा उद्धार करून तो मणिपूराला गेला. (भा.)

**नासत्य**–अश्विनीकुमारांचें नांव [ ६,६,४० व ९,२२,२८ ].

**नाहुष**–नहुषराजा व त्याचा पुत्र ययाती या दोघांस संज्ञा. ( भा. वन. )

### नि

**निकुम्भ**–सूर्यवंशीय हर्यश्वराजाचा पुत्र. याचा पुत्र बर्हणाश्व. [ ९,६,२४ ].
( २ ) कुंम्भकर्णाचा पुत्र [९,१०,१८].
( ३ ) दनुपुत्र एक दानव,
( ४ ) प्रल्हादाच्या पुत्रांपैकीं एक. याचे पुत्र सुंदोपसुन्द.
( ५ ) नीलवानरानें मारिलेला रावणाचा प्रधान. ( वा. रा. )

**निकुम्भनाभ**–बलीच्या शतपुत्रांपैकीं एक.

**निकुम्भिला**–लंकेच्या पश्चिमेस असणारें देवीचें स्थान. इंद्रजितानें येथें अनेक यज्ञ केले होते. इंद्रजिताची अभिचार कर्मभूमि. (वा. रा. उत्तर.)

**निकृति**–दम्भ व माया यांची कन्या. [ ४,८,३ ]

**निकृतिज** कश्यपकुलांतील एक ऋषि.

**निखर्वट**–तारवानरानें मारिलेला राक्षस.

**निघ्न**-सूर्यवंशीय अनरण्य राजाचा पुत्र. याचा पुत्र अनमित्र

**निचंद्र**–दनुपुत्र एक दानव.

**निचिता**–भारतवर्षीय नदि

**निजधृति**–शाकद्वीपस्थ नदी [६,२०,२६]

**नितम्भू**–एक ऋषि.

**नित्य**–मरीचिकुलोत्पन्न एक ब्रम्हर्षि.

**निदाघ**–कश्यपकुलांतील एक ऋषि. हा भृगु ऋषीचा शिष्य होता.

**निध्रुव**–कश्यप कुलांतील एक ऋषि.

**निबन्धन**–त्रिबंधन राजाचें नामांतर.

**निमि**—सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजाच्या शतपुत्रांतील दुसरा. [ ९, ६, ४ ] हा

गौतमाश्रमासमीप वैजयंत नगरांत राज्य करीत असे. एकदां याला यज्ञ करण्याची इच्छा झाली असतां, यानें वसिष्ठाला बोलाविलें. पण त्याच वेळीं त्याला इंद्राकडे यज्ञाला जावयाचें असल्यानें, त्यानें तो यज्ञ समाप्त करून परत आल्यावर तुझा यज्ञ करूं म्हणून सांगितलें. त्यावेळीं निमीनें जीवित क्षणभंगुर आहे, असें जाणून दुसऱ्या ऋत्विजांकडून यज्ञास प्रारंभ केला. वसिष्ठ परत आल्यावर यज्ञाला आरंभ झालेला पाहून त्यानें निमीला ' देह पतन पावो ' असा शाप दिला उलट निमीनें वसिष्ठाला तसाच शाप दिला. निमीचा देह पडल्यावर त्याचा देह सुगंधित द्रव्यांत ठेवून यज्ञ पुरा केला, व नंतर तो देह सजीव होण्याविषयीं ऋत्विजानीं देवांची प्रार्थना केली. परंतु निमीनें पुन्हां सदेह होण्याचें अमान्य केलें. तेव्हां देवांनीं त्याला प्राणिमात्राच्या नेत्रांत स्थान दिलें. पुढें निमीचा देह मंथन करून जो पुत्र झाला, तो जनक. त्याला मिथिल, वैदेह, हीं नांवे असून तोच विदेह वंशाचा मूळ पुरुष. [ ९, १३, १ ते १२ ] तेव्हांपासून हें कुल सूर्य वंशापासून भिन्न पडून गौतमकुल त्याचें उपाध्याय झालें. ( वा. रा. )

( २ ) सोमवंशीय पांडवकुलांतील दण्डपाणि राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षेमक. [ ९, २२, ४४ ]

( ३ ) स्वायंभू मन्वंतरांतील दत्त ऋषीचा पुत्र,

( ४ ) एक असुर.

**निघ्न**-सोमवंशीय यदुकुलांतील अनमित्र राजाचा पुत्र. याला सत्राजित् व प्रसेन असे दोन पुत्र होते.

**निम्लोचनी**-मानसोत्तर पर्वतावरील वरुणाची नगरी. [ ५, २१, ७ ]

**निम्लोचि**-सोमवंशीय यदुकुलांतील भजमानाच्या पहिल्या स्त्रीच्या तीन पुत्रांपैकीं एक. [ ९, २४, ७ ]

**नियतायु**-अर्जुनानें मारिलेला दुर्योधन पक्षीय श्रुतायु राजाचा पुत्र. (भा. )

**नियति**-मेरूची कन्या व स्वायंभूमन्वंतरांतील भृगुपुत्र विधात्याची पत्नी. हिचा पुत्र प्राण. [ ४, १२, ४४ ]

**नियुत्सर्पा**-शिव नामक रुद्राची पत्नी. [ ३, १२, १३ ]

**नियुत्सा**-ऋषभ देववंशीय प्रस्ताव राजाची पत्नी. हिचा पुत्र विभु. [५,१५,६]

**निरमित्र**-पंडुपुत्र नकुल व करेणुमती यांचा पुत्र. [ ९, २२, ३२ ]

( २ ) सोमवंशीय जरासंधाचे कुलांतलि अयुतायूचा पुत्र. याचा पुत्र सुनक्षत्र. [ ९, २२, ४६ ]

( ३ ) सहदेवानें मारिलेला त्रिगत देशीय राजा. ( भा. द्रोण. )

**निरय**-( नरक ) दम्भ व मृत्यु यांचे अपत्य [ ४, ८, ७ ].

**निरालंब**-यजुर्वेदोपनिषत्.

**निरुक्त**-एक वेदांग. हें वेदपुरुषाच्या कर्णस्थानीं आहे. यास्काचा निरुक्त ग्रंथ हा वस्तुतः वेदांवरील टीका ग्रंथ आहे. हा निघंटु नामक असामान्य व आर्ष वैदिक शब्दकोशाच्या आधारावर रचिला आहे. [१२,६,५८ ]

**निरोध**-( सृष्टिसंहार ) पुराणाच्या दश लक्षणांपैकीं आठवें लक्षण.[२,१०,१]

**निर्ऋति**-एकादश रुद्रांपैकीं एक. नैर्ऋत्य, दिग्पाल व भूत राक्षसांचा अधिपति. शत्रुनाशाची इच्छा करणाऱ्यांनीं याची उपासना करावी. [ २ ३, ९ ]

**निर्मोक**-आठव्या सावर्णि मनूच्या पुत्रांपैकीं एक [ ८, १३, ११ ].

( २ ) देवसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षीं पैकीं एक [ ८, १३, ३१ ].

**निर्मोचन**-एक नगर. ( भा. उद्योग. )

**निर्वाण**-ऋग्वेदोपनिषत्.

**निर्वाणरुचि**-धर्मसावर्णि मन्वतरांतील देव [ ८, १३, २५ ]

**निर्विन्ध्या** विंध्याचलापासून निघालेली नदी [ ५,१९,१८ ]

**निर्वीरतीर्थ**—वसिष्ठाश्रमाजवळचें तीर्थ.

**निर्वृत्ति**—क्रथकुलांतील धृष्टि राजाचा पुत्र. याचा पुत्र दशार्ह [ ९,२४,३ ].

**निल**--बिभीषणाच्या अमात्यापैकीं एक.

**निवातकवच**—पातालांत रहाणारे दैत्य विशेष. पुलोमा व कालका यांचे पुत्र. हे साठ हजार असून अर्जुनानें यांचा नाश केला [ ५,२४,३०व६,६,३६]

हे समुद्रात रहात असत. (भा. वन.)

**निवास**—भारतवर्षीय नदी.

**निशठ**—एक यादव. [ ११,३०,१७ ]

( २ ) एक राजर्षि.

**निशाकरमुनि**—चंद्रमामुनीचें नांव.

**निशीथ**--उत्तानपादवंशीय पुष्पार्ण व दोषा याचा पुत्र [ ४,१३,१४ ].

**निशुम्भ**- शुंभासुराचा भाऊ.

**निश्चला** --हिमालयापासून निघालेली नदी.

**निश्चवन**--बृहस्पति व तारा यांच्या सहा पुत्रांतील दुसरा. याचा पुत्र विपाप्मा.

( २ ) स्वारोचिष मन्वंतरांतील सप्तर्षिं-पैकीं एक.

**निषंगि**—धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**निषध**—जम्बूद्वीपांतील एक महापर्वत. हा हरिवर्षाच्या उत्तरेस असून पूर्व-पश्चिम क्षार समुद्राला वेढून आहे. यावर विष्णुपद नांवाचें सरोवर आहे. [ ५,१६,९ ] ( भा. भीष्म. )

( २ ) मेरुकर्णिका पर्वतांतील एक.

( ३ ) सूर्यवंशीय अतिथि राजाचा पुत्र. याला नल आणि नभ असे दोन पुत्र होते. [ ९,१२,१ ]

( ४ ) चेदिदेशाच्या पूर्वेकडील भारत-वर्षीय देश. येथील राजा नल.

**निषधाश्व**--पुरुकुलांतील कुरु राजाच्या पांच पुत्रांतील चौथा [ ९,२२,४ ].

**निषाद्**—वेनराजाचा देह मंथन केला असतां, त्याच्या ऊरूपासून निघालेला कृष्णवर्ण, र्‍हस्वभुज पुरुष. याला ऋषींनीं निषीद असें म्हटलें म्हणून याला निषाद हें नांव मिळालें. याचे वंशज नैषाद. ते पर्वत, अरण्यें यांत राहतात. [ ४,१४,४५ ]

( २ ) ब्राह्मण बाप व आई शूद्र यांच्या संततीस निषाद म्हणतात

**निषाददेश**-प्राचीन हिंदुस्थानांतील आग्नेयीकडील देश. याचे पूर्व, दक्षिण व अपरदक्षिण असे तीन भेद आहेत.

**निसान्दि** --एक असुर ( वा. रा. )

## नी

**नीद**—राजसूय यज्ञांत पाण्डवांस सहाय्य करणारा राजा.

**नीप**—सोमवंशीय बृहदिषूच्या वंशांतील पार राजाचा पुत्र. यास अणुह असे नामांतर होतें. शुक्राचार्यांची कन्या कृत्वी अथवा कीर्तिमती ती याची स्त्री. व पुत्र ब्रह्मदत्त. याला दुसऱ्या स्त्री पासून श्रीमान् इत्यादि शंभर पुत्र झाले. [ ९,२१,२४ ]

( २ ) देवमीढ कुलांतील कृति राजाचा पुत्र. हा तीक्ष्ण शस्त्रधारी होता. याचा पुत्र क्षेम्य. [ ९-२१,२९ ]

**नील**--इलावृत- उत्तरस्थ पर्वत. [५,१६,८]

( २ ) भारतवर्षीयपर्वत [ ५,१९,१६ ]

( ३ ) विश्वकर्म्याच्या अंशानें जन्मलेला रामसेनेंतील वानर. यानेंच सेतु बांधिला. [ ९,१०,१६ ] (वा. रा.)

( ४ ) पुरुकुलांतील अजमीढ व नलिनी यांचा पुत्र याचा पुत्र शांति. [ ९,२१,३० ]

( ५ ) भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

( ६ ) यदूचा एक पुत्र.

( ७ ) दुर्योधनपक्षीय एक राजा.

( ८ ) पाण्डवपक्षीय अनूप देशाचा राजा. यास अश्वत्थाम्यानें मारिलें,

( ९ ) कुबेराच्या नवनिधींतील आठवा.

(१० किष्किंधेच्या दक्षिणेस असणाऱ्या माहिष्मती नगराचा राजा. यास दिग्विजयाचे वेळीं सहदेवानें जिंकलें होतें. ( भा. सभा. अ. ३१ )

**नीलकंठ**—विषप्राशनानंतर शंकरास मिळालेलें नांव.

**नीलकुंड**- भारतवर्षीय तीर्थ.

**नीलकेतु**—( नीलध्वज शब्द पहा )

**नीलध्वज**—हस्तिनापुराच्या दक्षिणेस नर्मदेच्या कांठीं असणाऱ्या माहिष्मतीचा राजा. याची स्त्री सुनंदा व पुत्र प्रवीर. प्रवीर आपल्या मदनमंजरी स्त्रीसह अरण्यांत गेला असतां तेथें पांडवांचा अश्वमेधाचा अश्व त्यानें धरिला. तेव्हां त्याचें वृषकेतूशीं युद्ध होऊन तो पराजित झाला असतां नीलध्वज व अर्जुन यांचें युद्ध झालें. त्यांत याच्या अग्न्यस्त्रावर अर्जुनानें नारायणास्त्र सोडतांच अग्नीनें याचें अर्जुनाशीं सख्य केलें. ( जै. अश्व. )

**नीलपराशर** पराशरकुलांतील एक ऋषि व कुल. यांत अपोहय, वाङ्मय, ख्यातेय, कौतुजाति आणि हर्यश्वी, हे प्रसिद्ध ऋषि होते.

**नीललोहित**- ब्रह्मदेवाच्या भ्रुकुटींतून बाहेर पडलेल्या क्रोधापासून झालेला पुत्र. हाच महादेव. हा झाल्याबरोबर रडला, म्हणून याला रुद्र म्हणतात. याचीं अकरा नांवें व अकरा पत्न्या असून याची सर्व प्रजा उग्र होती. हा शरीरांत रहातो. [३,१३,७ ते २०].

**नीललोहितकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील दुसरा दिवस.

**नीला**—भारतवर्षीय एक नदी.

**नीलांबर**—बलरामाचें नामांतर.

**नीलिनी**—अजमीढ राजाच्या चार स्त्रियांपैकीं एक.

## नृ

**नृग**—वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांतील दुसरा. याचा पुत्र सुमति. [ ९,१,१२ व ९,२,१७ ].

**नृग**–सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजाचा पुत्र. यानें कोट्यावधि गोप्रदानें केलीं. पण एकदां चुकून दान दिलेली गाय पुन्हां दान दिली गेल्यानें हा दुसऱ्या जन्मीं सरड्याच्या जन्मास गेला. तेथें श्रीकृष्णाच्या हस्तस्पर्शानें याचा उद्धार झाला. [ १०,६४,१० ].

**नृचक्षु**–सोमवंशीय पांडवकुलांतील सुनीथ राजाचा पुत्र. याचा पुत्र सुखीनल. [ ९,२२,४१ ].

**नृपंजय**-सोमवंशीय पांडवकुलांतील सुनय राजाचा पुत्र. याचा पुत्र दूर्व. [ ९,२२,४२ ].

**नृसिंह**–चालू वैवस्वत मन्वंतराच्या चतुर्थ पर्ययांतील कृतयुगांत झालेला विष्णूचा अवतार. हा अर्धा नर व अर्धा सिंह होता. ( नरसिंह ) ( दे. भा. स्कं. ४ व मत्स्य. अ. ४७ )

**नृसिंहतापिनी**–अथर्वणवेदोपनिषत्.

**ने**

**नेतिष्य**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**नेत्र**–( रज्जु. ) समुद्रमंथनकालीं वासुकीची रज्जु केली होती. [ ८,६,२२ ].
( २ ) हैहयकुलांतील धर्मराजाचा पुत्र. याचा पुत्र कुन्ति. [ ९,२३,२२ ].

**नेपाल**–हिंदुस्थानच्या उत्तरेस हिमालयाच्या पायथ्याशीं असणारा एक देश. याची सध्याची राजधानी काटमांडू. यांतच पशुपतेश्वरचें स्थान असून सत्यगंडकी, त्रिशूलगंगा, सानकोसी, वाग्मती, विष्णुमती, इत्यादि नद्या आहेत.

**नेमि**–बलीच्या सैन्यांतील एक प्रमुख दैत्य. [ ८,६,२२ ].

**नेमिचक्र**–पांडवकुलांतील असीमकृष्ण राजाचा पुत्र. हस्तिनापुर वाहून गेल्यावर हा कौशाम्बी नगरींत राहूं लागला. याचा पुत्र चित्ररथ. [ ९,२२,३९ ].

**नै**

**नैकजिह्व**—भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**नैकदृक्**—विश्वामित्राचा एक पुत्र.

**नैकपृष्ठ**—भारतवर्षीय एक देश.

**नैकशि**—भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**नैगमेय**—अनलवसूचा पुत्र.

**नैद्राणि**—अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**नैध्रुव**—कश्यप कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**नैमिश**–( ष ) शतद्रु नदींतील तीर्थ.

**नैमिषकुंज**—एक तीर्थ.

**नैमिषा (शा) रण्य**–नर्मदेच्या उत्तरेस व कुरु देशाच्या पश्चिमेस गौतमी नदीजवळचें अरण्य. ब्रह्मदेवानें सोडलेलें चक्र येथें थांबलें होतें. येथेंच सूतानें पुराणें सांगितली. [ १, १, ४ ]. बलराम तीर्थयात्रेच्या वेळीं येथें आला होता. [ १०,७८,२० ].

**नैश्रेयस**—वैकुंठ लोकांतील एक उद्यान. [ ३,१५,१६ ].

**नैषध**–कलियुगांतील राजे. [ १२,१,३५ ].
( २ ) धृष्टद्युम्नानें मारिलेला दुर्योधन पक्षीय राक्षस. ( भा. द्रो )

**नैषादि**–द्रोणशिष्य एकलव्याचें नांव.

**नौबंधन**–पर्वतशृंग. पूर्वकल्पांत प्रलयाच्या वेळीं मत्स्यरूपी भगवंताच्या आज्ञेनें सत्यव्रत राजानें आपली नौका यास बांधिली होती.

**न्यग्रोध**–सोमवंशीय यदुकुलांतील उग्रसेनाच्या नऊ पुत्रांतील तिसरा. कंसाचा

भाऊ. याला बलरामानें मारिलें. [ ९,२४,२४१०,४४,४० ].

## प

**पंक्ति**–चाळीस अक्षरांचा एक छन्द. याची उत्पत्ती ब्रह्मदेवाचे मज्जेपासून झाली. [ ३,१२,४६ ].

**पंक्तिरथ**—दशरथ राजा.

**पंचकर्पट**–पश्चिम माळव्याच्या पश्चिमेकडील देश. ( भा. सभा. )

**पंचगण**–अपर उत्तर उलूक देशाच्या उत्तरेकडील देश. ( भा. सभा. )

**पंचचूडा**- एक अप्सरा. हिचा नारदाशीं स्त्रीस्वभावाविषयीं संवाद झाला.

**पंचजन**–एक प्रजापति. याची कन्या असिक्नी. प्राचेतस दक्षाची स्त्री. [ ६,४,५१ ].

( २ ) संह्राद दैत्याचा पुत्र. हा शंखरूप धारण करून समुद्रांत रहात असे. श्रीकृष्ण सांदीपिनी गुरूच्या मृत पुत्राला आणण्याकरितां समुद्रांत गेले असतां याला मारून शंख आपण घेतला. त्या शंखाचें नांव पांचजन्य. [ ६, ८,१४ व १०,४५,४० ].

**पंचजनी**–ऋषभपुत्र भरताची पत्नी. हिला सुमति, राष्ट्रभृत, सुदर्शन, आवरण, धूम्रकेतु, असे पांच पुत्र होते. [ ५,७,१–३ ].

**पंचनद**– ( पंजाब ) आभीर देशाच्या पश्चिमेकडील देश. शतद्रु, विपाशा, इरावती, चंद्रभागा व वितस्ता; या पांच नद्यांमुळें हें नांव या देशास मिळालें.

**पंचपदी**–शाकद्वीपांतील नदी. [५,२०,२६]

**पंचब्रह्म**—यजुर्वेदोपनिषत.

**पंचमी**—भारतवर्षीय नदी.

**पंचयाम**—विभावसु वसूच्या पुत्रांतील आतपाचा पुत्र. याच्या योगानें सर्व प्राणि कर्मप्रवृत्त होतात. [६,६,१६].

**पंचवटी**–नाशिकाजवळ गोदावरीच्या उत्तर तीरावरील स्थल. येथें पाच वट एकत्र असल्यानें हे नांव पडलें. रामचंद्र वनवासांत असतां येथें रहात होता. शूर्पणखा विरूपीकरण व सीताहरण येथेंच झालें. ( वा. रा. )

**पंचशिख**–एक ब्रह्मर्षि कापिला ब्राह्मणीचा पुत्र. यास कापिलेय ह्मणत असत. याचा शिष्य जनकवंशीय जनदेव.

**पंचशिरा**–एक ब्रह्मर्षि.

**पंचाप्सरस**–दण्डकारण्यांतील एक तीर्थ. बलराम तीर्थयात्रेला येथें आला होता. [ १०,७९,२८ ].

**पंचाल**– इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील देश. याचे उत्तर व दक्षिण असे दोन भेद होते. उत्तर पंचाला ( रोहिलखंड ) ची राजधानी अहिच्छत्रा. हा द्रोणाचार्यानें द्रुपदाकडून घेतला. दक्षिणपंचाला ( अंतर्वेदी ) ची राजधानी कांपिल्य. हा द्रुपदाकडे होता. भर्म्याश्व राजाच्या पांच पुत्रांनीं या देशाचें संरक्षण केलें, ह्मणून यास पंचाल अशी संज्ञा मिळाली. [ ९,२१,३३ ].

**पटच्चर**–एक राक्षस. यास शूरतर राजानें मारिलें.

( २ ) दक्षिण अपरमत्स्य देशाच्या दक्षिणेकडील एक देश.

**पट्टुश**–पनसवानरानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस.

**पणव**–कर्णे. [ १,१०,१५ ].

**पणि**–पातालांतील असुर. [ ५,२४,३० ].

**पण्डितक**– धृतराष्ट्राचा पुत्र.

**पतंग**–( पक्षी ) तार्क्ष्यव पतंगा यांचे पुत्र, [ ६,६,२१ ].

**पतंग**–मेरुकार्णिका पर्वतांतातील एक. [ ५,१५.२६ ].

( २ ) प्लक्षद्वीपांतील लोक विशेष. [ ५,२०,४ ].

( ३ ) स्वायंभू मन्वंतरांतील मरीचि ऋषीच्या सहा पुत्रांपैकीं चौथा, हाच पुढे कृष्णाच्या सहा भावांत जन्मला होता. [ १०,८५,५१ ].

**पतंगी**–तार्क्ष्याची पत्नी. [ ६, ६, २१ ]

**पतंजल**–कपिगोत्रोत्पन्न एक ऋषि. यास काप्य असेंहि म्हणतात.

**पतंजली** कद्रुपुत्र एक नाग.

( २ ) अंगिराकुलांतील एक ऋषि.

**पत्नीशाला**–यज्ञ मण्डपांतलि एक भाग. [ ४, ५, १४ ]

**पथ्य**–अथर्ववेदीयसुमन्तूशिष्य [१२,७,१]

**पद्म**–कद्रुपुत्र एक नाग.

( २ ) एक राजर्षि.

( ३ ) कुबेराच्या नऊ निधींतील एक.

**पद्मचित्र**- कद्रुपुत्र एक नाग.

**पद्मनाभ**–कद्रुपुत्र एक नाग. हा आत्मज्ञानी होता. याचा शिष्य धर्मारण्य.

( २ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( ३ ) विष्णूचें नांव व एक तीर्थ.

**पद्माक्ष**–चंद्रहास राजाचा कनिष्ठ पुत्र.

**पनस**--रामसेनेंत या नांवाचे दोन वानरांचे अधिपति होते.

( २ ) बिभीषणाच्या अमात्यापैकीं एक.

**पम्पा**-किष्किंधेजवळील एक सरोवर. रामलक्ष्मण येथें आले होते. बलराम तीर्थ यात्रेचे वेळीं येथें आला होता. [ ७, १४, ३१ व १०, ७९, १२ ] हें हल्लींच्या हंपी गांवाजवळ तुंगभद्रेच्या उत्तर तीरीं होतें.

( २ ) दण्डकारण्यांतील एक नदी.

**पयस्य**–वारुणि अंगिराऋषीच्या आठ पुत्रांपैकीं एक.

**पयस्विनी**–भारतवर्षीय नदी.

**पयोद**- विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**पयोव्रत**–फाल्गुन शुद्ध प्रतिपदेपासून द्वादशीपर्यंत करावयाचें एक व्रत. हें अदितीनें पुत्रप्राप्तीस्तव केलें होतें. [ ८, १६, २५ ]

**पयोष्णि**–( पूर्णा ) विंध्याचलापासून निघालेली नदी. ' पयोष्णी माहात्य ' म्हणून एक ग्रंथ आहे. ही खानदेशांत चांगदेव येथें तापीला मिळते. हिच्या कांठीं गय राजानें यज्ञ केला. बलराम तर्थियात्रेला येथें आला होता [ ५, १९, १८ व १०, ७९, २० ]

**पर**–विश्वामित्राचा एक पुत्र.

**परकाशय**–भारतवर्षीय देश.

**परण्य**–अंगिराकुलांतील एकऋषि.

**परंताप**–तामस मनूच्या दहापुत्रांपैकीं एक.

**परपुरंजय**- हैहय कुलोत्पन्न एक राजा. हा एकदां मृगयेस गेला असतां मृग समजून याच्याहस्तें एका ऋषिपुत्राचा वध झाला. आपल्या हातून घडलेल्या ब्रह्महत्येबद्दल यास फार वाईट वाटलें आणि तो त्या ऋषिपुत्राच्या जनकाचा

शोध करीत तार्क्ष्यऋषीच्या आश्रमांत गेला. तेथें पाहतों तों ज्या ऋषिपुत्रास आपण मारलें होतें, तो तेथें प्रत्यक्ष पाहून राजा आश्चर्यानें थक्क झाला. तेव्हां ऋषि म्हणाला, राजा, आम्ही इच्छामरणी आहों. ब्रह्महत्येविषयीं तूं खिन्न होऊं नको! ( भा. वन. )

**परब्रह्म**—अथर्वण वेदोपनिषत्.

**परमकांबोज**—लोहदेशाच्या उत्तरेकडील देश. याच्या उत्तरेस ऋषिक देश पांडवांच्या वेळीं होता. (भा. सभा.)

**परमहंस**—यजुर्वेद व अथर्वण वेदांचीं दोन उपनिषदें.

**परमेष्ठि**-ऋषभदेववंशीय देवद्युम्न व धेनुमती यांचा पुत्र. याची स्त्री सुवर्चला व पुत्र प्रतीह. [ ५,१५,३ ].

**परशुराम**-वैवस्वत मन्वंतरांतील भृगुवंशीय ऋचीक ऋषीचा पुत्र जमदग्नि व रेणुका यांचा धाकटा पुत्र. हा भगवंताचा सोळावा अवतार. [ १,३,२० व ९,१५,१३ ]. याचें जन्म चालू मन्वंतरांतील एकोणिसाव्या पर्ययाच्या त्रेतायुगांत झालें होतें. ( दे. भा. ) सहस्रार्जुनानें जमदग्नीची कामधेनु हरण केली, म्हणून यानें त्याचा वध केला [ ९,१५,३५ ]. पण पित्यानें हें कर्म चांगलें नाहीं, असें सांगितल्यावरून एक वर्ष तीर्थयात्रा. [ ९, १६,१]. पित्याच्या आज्ञेवरून मातेचा वध. सहस्रार्जुनाच्या पुत्रांकडून जमदग्नीचा वध. त्याच्या सुडाकरितां सहस्रार्जुनाच्या पुत्रांचा वध व एकवीस वेळां क्षत्रियकुलांचा संहार. क्षत्रियांच्या रक्तानें स्यमंतपंचक क्षेत्रांत नऊ डोह भरले, ते रामहृद या नांवानें प्रसिद्ध आहेत. क्षत्रियांचा संहार होत असतां कित्येक क्षत्रियांच्या स्त्रियांनीं आपलीं मुलें ऋषींच्या आश्रमांत टाकलीं म्हणून तीं वांचलीं, मूलक राजा स्त्रियांत लपून राहिला, म्हणून तो वांचला, व विदेही जनक ब्रह्मनिष्ठ होता. म्हणून तो वांचला. नंतर यानें पित्याचें उत्तरकार्य करून एक यज्ञ केला, त्यांत होत्याला पूर्व दिशा, ब्रम्ह्याला दक्षिणदिशा, अध्वर्यूला पश्चिम दिशा, उद्गात्याला उत्तर दिशा आणि इतर ऋत्विजांना उपदिशा देऊन कश्यपाला मध्यभाग दिला. आणि आपण समुद्रापासून नवीन देश ( कोंकण ) मागून घेऊन महेंद्रपर्वतावर राहिला. याचें तेज दाशरथी रामानें हरण केलें. [ ९,१६, १ ते २६ ]. सार्विमन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक. [ ८,१३,१५ ]. पुढे भीष्माचे हातून पराभव.[९,२२,२७]

**परस्परायणि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**परांतदेश**–भारतवर्षीय एक देश.

**परावसु**–एक गंधर्व. [ ८, ११, ४१ ]
( २ ) विश्वामित्रपुत्र रैभ्याचा मुलगा.
( ३ ) एक असुर.

**पराशर**–मैत्रावणि वसिष्ठाचा पुत्र जो शक्ति व त्याची स्त्री अदृश्यंति यांचा पुत्र. याच्या पित्याला राक्षसानें भक्षण केलें, म्हणून यानें राक्षससत्र

केलें. तें पुलस्त्यऋषीच्या प्रार्थनेवरून वसिष्ठानें थांबविलें. हा परीक्षिताकडे आला होता. शेष परंपरेंतील सांख्यायनाचा भागवताचा शिष्य. याचा पुत्र व्यास. [ १, ३, २१; १, १९, ९ व ३, ८, ८ ]. हा वसिष्ठकुलांतील मंत्रद्रष्टा असून याच्या कुलांत गौरपराशर, नीलपाराशर, श्वेतपराशर, कृष्णपराशर, श्यामपराशर असे सहा भेद होते. (मत्स्य.)

( २ ) एक स्मृतिकार.

**परिकूट**—विश्वामित्रकुलांतील एक ऋषि.

**परिप्लव**-सोमवंशीय पांडववंशांतील सुखीनल राजाचा पुत्र. याचा पुत्र सुनय. [ ९,२२,४२ ].

**परिवत्सर**-पंच संवत्सरांतील एक भेद. [ ५,२२,७ ].

**परिव्राजकान्नपूर्णा**-अथर्वण वेदोपनिषत्

**परिष्वंग**—स्वायंभूमन्वंतरांतील मरीचिऋषीच्या सहा पुत्रांतील एक. हा कृष्णाच्या सहा बंधूंत जन्मास आला होता. [ १०, ८५,५१ ].

**परीक्षित्**-सोमवंशीय पूरुकुलांतील अर्जुनपुत्र अभिमन्यु व उत्तरा यांचा पुत्र. श्रीकृष्णानें याचें गर्भांत रक्षण केलें. जन्म होतांच हा इकडे तिकडे पाहूं लागला म्हणून याला परीक्षित हें नांव पडलें. याचें मूळचें नांव विष्णुरात. याची स्त्री विराटपुत्र उत्तराची कन्या इरावती व पुत्र जनमेजय, श्रुतसेन, भीमसेन आणि उग्रसेन. [ १,१२, ७;१,१६,२ व ९,२२,३३ ]. हा कृपाचार्यापासून वेदविद्या व धनुर्विद्या शिकला. यानें तीन अश्वमेध केले. [ १,१६,३ ]. कलीचा निग्रह. [ १,१७,३५ ]. ऋषिपुत्राचा शाप व गंगेच्या दक्षिणतीरावर प्रायोपवेशन [ १,१८,३६ व १,१९,७ ]. शुकाचार्यांच्या द्वारा भागवत श्रवण. [२,१,१]. तक्षकाचा दंश व देह विसर्जन. [ १२,६,१२ ] हा छत्तीसाव्या वर्षी राज्यावर बसला व साठ वर्षें राज्य करून शहाण्णव्या वर्षी मृत्यु पावला. ( दे. भा. )

**परुष**-खरराक्षसाच्या बारा आमात्यांपैकीं एक

**परुष्णी**—रावी नदी.

**परोक्ष**-सोमवंशीय ययाति पुत्र अनुराजाचा कनिष्ठ पुत्र. [ ९,२३,१ ].

**पर्जन्य**-फाल्गुन महिन्यांत ऋतु यक्ष, वर्चस राक्षस, भरद्वाज ऋषि, सेनजित अप्सरा, विश्व गंधर्व व ऐरावत नाग यासह फिरणारा सूर्य.[१२,११,४०]

(२) रैवत मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

( ३ ) मुनीच्या देवगंधर्व पुत्रांतील एक.

**पर्णवि**—अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**पर्णशाल**-गंगा आणि यमुना यांच्यामधील यामुनगिरीच्या जवळचा प्राचीन गांव.

**पर्णा**-हिमालय पर्वताची कन्या व जैगीषव्य ऋषीची स्त्री.

**पर्णागारि**-वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**पर्णाद**-दमयंतीनें नलाच्या शोधास पाठविलेला ब्राह्मण.

**पर्णाशा**-नदी. उगम-पारियात्र पर्वत.

**पर्यावर्तन**-अतिथींचा अपमान करणाऱ्यास प्राप्त होणारा नरक. [ ५,२६,३५ ].

**पर्वण**—रावणपक्षीय राक्षस. ( भा. )

**पर्वत**-नारद ऋषीचा भाचा. जनमेजयाच्या सर्पसत्रांत हा सदस्य होता. भीष्मशरपंजरीं पडले असतां हा त्यांचेकडे आला होता. [ १,९,६ ].

**पर्वतायू**-बालधी ऋषीचा पुत्र मेधावी त्याचें नामांतर.

**पलाला**-मातृगणांतील एक देवता.

**पलिगु**—एक ब्रह्मर्षि.

**पलित**-लोमश मांजराला पाशांतून सोडविणारा एक उन्दीर. ( भा. शांति.)

**पल्हवदेश** -मद्रदेशाच्या पश्चिमेस असणारा समुद्रांतील देश. ( भा. सभा. )

**पवन**-मेरूच्या परिस्तरण गिरींतील एक. [ ५,१६,२७ ].

(२) उत्तम मनूचा एक पुत्र. [८,१,२३].

( ३ ) एक राजर्षि.

**पवनह्रद**—भारत वर्षीय तीर्थ.

**पवमान**-अग्नि व त्याची पत्नी स्वाहा यांस झालेल्या तीन पुत्रांतील एक. याचा पुत्र हव्यवाह. अरणीपासून जो अग्नि उत्पन्न करतात तो याचाच अंश असतो. त्यास गार्हपत्य म्हणतात.

(२) उत्तानपादवंशीय विजिताश्वराजाच्या तीन पुत्रांपैकीं दुसरा. हा पूर्वजन्मीं अग्नि असून वसिष्ठशापानें मनुष्यजन्मास आला होता. [४,२४,४ ].

( ३ ) प्रियव्रतपुत्र मेधातिथि, त्याच्या सात पुत्रांतील तिसरा. याचा खण्ड याच नांवानें प्रसिद्ध आहे [५,२०,२५]

( ४ ) शाकद्वीपांतील वर्ष. [५,२०,२५]

**पवित्र**—इंद्रसावर्णिमन्वंतरांतील देव. [ ८,१३,३४ ]

**पवित्रकूट**-भारतवर्षीय पर्वत.

**पवित्रपाणि**-एक ब्रह्मर्षि.

**पवित्रवती**-क्रौंचद्वीपांतील नदी [५,२०,२१]

**पवित्रा**-भारतवर्षीय नदी.

**पशु**-एक यज्ञ. [ ५,७,५ ]

( २ ) सविता नामक पांचवा आदित्य व पृश्नि यांच्या आठ अपत्यांतील एक. [ ६,१८,१ ]

**पश्चिमआनर्त**-पश्चिमेकडील देश. याची राजधानी द्वारका.

**पश्चिमउत्सवसंकेत**-वाटधान देशाच्या वायव्येकडील देश. ( भा. सभा. )

**पश्चिमकांबोज**-पश्चिम शूरसेनाच्या पश्चिमेचा देश.

**पश्चिमकिरात**-पश्चिमबर्बराच्या पश्चिमेकडील प्रदेश. याच्या पश्चिमेस पश्चिम यवन आहे.

**पश्चिमत्रिगर्त**-शिबिदेशाच्या पश्चिमेकडील देश. येथें पांडवांच्या वेळीं क्षेमंकर इत्यादि पांच राजे होते. (भा. शांति.)

**पश्चिमदशार्ण**-महेत्थ देशाच्या पश्चिमेकडील देश. पांडवांच्या वेळीं येथे हिरण्यवर्मा राजा होता.

**पश्चिमपांचाल**-जांगल देशाच्या पश्चिमेकडील देश.

**पश्चिमबर्बर**-पश्चिमसमुद्रांतील देश.

**पश्चिममत्स्य**-कुरुक्षेत्राच्या पश्चिमेस, व सारस्वतदेशाच्या पूर्वेस असणारा देश.

**पश्चिममालव**-इंद्रप्रस्थाच्या पश्चिमस्थ देश.

**पश्चिमयवन**—पश्चिमसमुद्रस्थ यवन देश.

**पश्चिमशाक**-पश्चिसमुद्रांतील शक देश.

**पश्चिमशूरसेन**-पश्चिमपांचालाच्या पश्चिमेकडील देश. याची राजधानी मथुरा.

( २ ) लोकविशेष.

**पार्षत्**–द्रुपद राजाचें नामांतर.

**पार्षती**–द्रौपदीचें नामांतर.

**पार्ष्णि**–चेकितान राजाचा सारथि.

**पालक**–कलियुगांतील बृहद्रथानंतर झालेल्या प्रद्योत राजाचा पुत्र. याचा पुत्र विशाखयूप. [ १२, १, ३ ]

**पालकाप्य**–हस्त्यायुर्वेदप्रवर्तक ऋषि.

**पालंकायन**–वसिष्ठ कुलांतील ऋषि.

**पालिशय**– „ „

**पालोह**– „ „

**पावक**–अग्नि व स्वाहा यांचा एक पुत्र. [ ४, १, ६० ] विद्युल्लतेंत असणाऱ्या अग्नीस हें नांव आहे. ब्रह्मचाऱ्यांना उपास्य. याचा पुत्र सहरक्ष.

( २ ) उत्तानपादवंशीय विजिताश्व राजाचा एक पुत्र. [ ४,२४,४ ].

**पावकाक्ष**—रामसेनेंतील एक वानर.

**पावकि**—कार्तिकेयाचें नांव.

**पावन**–श्रीकृष्ण व मित्रविंदा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१६ ].

( २ ) भारत वर्षीय तीर्थ

**पावनी**–सरस्वती नदीस नांव.

**पावमान्य**—एक ऋषि.

**पाशिनी**–नदी–उगम शुक्तिमान पर्वत.

**पाशिवाट**—भारत वर्षीय तीर्थ.

**पाशुपत**–शंकराचें एक अस्त्र. [ १०,६३, १३ ]. हें अर्जुनानें मिळविलें होतें.

( २ ) अथर्वणवेदोपनिषत्. व एक तीर्थ.

**पांपंडकपुर**–संजयती पुरीच्या आग्नेयी दिशेकडील एक नगर. ( भा. सभा.)

## पि

**पिंग**–एक ऋषि व तीर्थ.

**पिंगल**–सूर्याचा एक अनुचर.

(२) जनमेजयाच्या सर्पसत्रांतील अध्वर्यु.

( ३ ) भृगुकुलांतील ऋषि. हा जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य.

**पिंगलक**–एक गंधर्व.

**पिंगला**-मिथिला नगरींत राहणारी एक वेश्या ही एकदां पुरुषाची मार्गप्रतीक्षा करीत असतां निराशा झाली. शेवटीं वैराग्य उत्पन्न होऊन कृतार्थ झाली. हिला अवधूतानें एक गुरु केलें होतें [ ११, ७, ३४ व ११, ८, २२ ]

**पिंगलाक्ष**-शंकराचा एक गण.

**पिच्छिला**–भारतवर्षीय नदी.

**पिंजला**– „ „

**पिठर**-वरुण लोकांतील एक असुर.

**पिंडारक**–द्वारकेजवळचे एक क्षेत्र. येथें ऋषींनीं यादवपुत्रांस तुमचा संहार होईल, असा शाप दिला.[११,१,११]

**पितर**–देवयोनींतील एक भेद. हे स्वर्गांत रहात असून इच्छित रूपें धारण करणारे अति तेजस्वी आहेत. यांचे अग्निष्वात्त, सौम्य, काव्य, बर्हिषद, अथवा आर्तव, सोमप, सुस्वधा अथवा आज्यप, हविष्मंत, अर्यमा, साग्नि, निरग्नि, वैराज इत्यादि अनेक भेद आहेत. स्वायंभुमन्वंतरांतील दक्षप्रजापतीनें यांस स्वधा नामक कन्या दिली होती. तिला, वयुना व धारिणी अशा दोन ब्रह्मनिष्ठ कन्या झाल्या. यांत अग्निष्वात्त, बर्हिषद, सोमप हविष्मंत, आज्यप आणि सुकाली हे अनुक्रमें मरीचि, अत्रि, भृगु, अंगिरा, पुलस्त्य, आणि वसिष्ठ यांचे पुत्र

असून, देव, दैत्य, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांस पूज्य आहेत. [ ४, १, ६३ व ६, ६, १९ ]

**पितामह**-ब्रह्मदेवास नांव.

**पितृकल्प** ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील तिसावा दिवस अथवा कल्प. हा कल्प ब्रह्मदेवाची अमावास्या.

**पितृतीर्थ**-भारत वर्षीय तीर्थ.

**पितृवर्ती**-कुरुदेशांतील कौशिक ब्राम्हणाच्या सात पुत्रांतील कनिष्ठ. यास स्वसृप, क्रोधन हिंस्र, पिशुन, कवि, आणि वाग्दुष्ट असे भाऊ होते. हे गर्गमुनीचे शिष्य होते. पितृनिधनानंतर हे गर्गमुनीची सेवा करून अध्ययन करीत असतां एकदां अतिशय दुष्काळ पडल्यामुळें पुष्कळ दिवसपर्यंत यांस अन्न मिळालें नाहीं. एकदां नित्याप्रमाणें हे गाईला घेऊन अरण्यांत गेले असतां, क्षुधेच्या शांतीस्तव यांनीं गाय भक्षण करण्याचें ठरविलें. तव्हां पितृवर्ती म्हणाला जर धेनु भक्षण कर्तव्यच असेल, तर पितरांना अर्पण करून भक्षण करावी. हें भाषण सर्वांना मान्य झाल्यावर पितृवर्ती यजमान झाला, पांच ब्राम्हण श्राद्धाला बसविले व एकास अतिथि करून गायीचा विनियोग केला. नंतर संध्याकाळीं ते सर्वजण आश्रमांत आले, व वत्स गुरूच्या स्वाधीन करून गाय वाघ घेऊन गेला, म्हणून सांगितलें. कालांतरानें ते सर्व भाऊ मृत झाल्यावर, दशारण्यांत व्याध रूपानें जन्मले पण त्यांस पितृभक्तीमुळें पूर्वजन्माचें स्मरण होतें, म्हणून त्यांनीं वैराग्य धारण केलें. पुढें ते कालंजर पर्वतावर मृगरूपानें जन्मास आले; नंतर तिसऱ्या जन्मीं चक्रवाक होऊन चौथ्या जन्मीं मानससरोवरावर सातही बंधु हंस पक्षी झाले. त्यानंतर पितृवर्ती हा सोमवंशीय नीप राजाचा ब्रह्मदत्त नामक पुत्र झाला. दुसरे दोघ प्रधान पुत्र झाले. व उरलेले चार त्याच राजाच्या नगरांतील सुदरिद्र ब्राह्मणाचे पुत्र झाले श्राद्धांत विनियोग केलेली धेनु देवल ऋषीची कन्या सन्नति अथवा सरस्वती होऊन ब्रह्मदत्त राजाची पत्नी झाली सुदरिद्र ब्राह्मणाचे धृतिमान्, तत्वदर्शी, तपोत्सुक आणि विद्याचण्ड हे पुत्र तपाकरिता अरण्यास जाण्याची आज्ञा पित्याजवळ मागूं लागले असतां, वृद्धपणामुळें तो त्यांस जाऊं देईना. त्यावेळीं 'येविप्रमुख्याः कुरुजांगलेषु दाशा स्तथा दाशपुरे मृगाश्च। कालंजरे सप्तच चक्रवाका ये मानसे ते वय मत्र सिद्धाः'॥ हा श्लोक लिहून तो वडिलाजवळ दिला व त्यास ब्रह्मदत्त राजाकडे जावयास सांगितलें. श्लोक वांचताच राजा, कंडरीक व सुबालक प्रधानपुत्र यांस पूर्वजन्माचें स्मरण होऊन मूर्च्छना आली. नंतर त्या आलेल्या ब्राह्मणास विपूल द्रव्य देऊन व आपल्या विष्वक्सेन नामक पुत्रास राज्याभिषेक करून तो ब्रह्मदत्त राजा आपले प्रधान व स्त्रीसह ते ब्राह्मणपुत्र जेथें तप करीत होते, तेथें तपार्थ निघून गेला. ( मत्स्य. )

( २ ) लोकविशेष.

**पार्षत्**–द्रुपद राजाचें नामांतर.

**पार्षती**–द्रौपदीचें नामांतर.

**पार्ष्णि**-चेकितान राजाचा सारथि.

**पालक**–कलियुगांतील बृहद्रथानंतर झालेल्या प्रद्योत राजाचा पुत्र. याचा पुत्र विशाखयूप. [ १२, १, ३ ]

**पालकाप्य**-हस्त्यायुर्वेदप्रवर्तक ऋषि.

**पालंकायन**-वसिष्ठ कुलांतील ऋषि.

**पालिशय**- ,, ,,

**पालोह**- ,, ,,

**पावक**–अग्नि व स्वाहा यांचा एक पुत्र. [ ४, १, ६० ] विद्युल्लतेंत असणाऱ्या अग्नीस हें नांव आहे. ब्रह्मचाऱ्यांना उपास्य. याचा पुत्र सहरक्ष.

( २ ) उत्तानपादवंशीय विजिताश्व राजाचा एक पुत्र. [ ४,२४,४ ].

**पावकाक्ष**—रामसेनेंतील एक वानर.

**पावकि**—कार्तिकेयाचें नांव.

**पावन**–श्रीकृष्ण व मित्रविंदा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१६ ].

( २ ) भारत वर्षीय तीर्थ

**पावनी**-सरस्वती नदीस नांव.

**पावमान्य**--एक ऋषि.

**पाशिनी**-नदी–उगम शुक्तिमान पर्वत.

**पाशिवाट**—भारत वर्षीय तीर्थ.

**पाशुपत**-शंकराचें एक अस्त्र. [ १०,६३, १३ ]. हें अर्जुनानें मिळविलें होतें.

( २ ) अथर्वणवेदोपनिषत. व एक तीर्थ.

**पांपंडकपुर**–संजयती पुरीच्या आग्नेयी दिशेकडील एक नगर. ( भा. सभा. )

## पि

**पिंग**–एक ऋषि व तीर्थ.

**पिंगल**–सूर्याचा एक अनुचर.

(२) जनमेजयाच्या सर्पसत्रांतील अध्वर्यु.

( ३ ) भृगुकुलांतील ऋषि. हा जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य.

**पिंगलक**–एक गंधर्व.

**पिंगला**-मिथिला नगरींत राहणारी एक वेश्या ही एकदां पुरुषाची मार्गप्रतीक्षा करीत असतां निराशा झाली. शेवटीं वैराग्य उत्पन्न होऊन कृतार्थ झाली. हिला अवधूतानें एक गुरु केलें होतें [ ११, ७, ३४ व ११, ८, २२ ]

**पिंगलाक्ष**-शंकराचा एक गण.

**पिच्छिला**–भारतवर्षीय नदी.

**पिंजला**- ,, ,,

**पिठर**-वरुण लोकांतील एक असुर.

**पिंडारक**–द्वारकेजवळचें एक क्षेत्र. येथें ऋषींनीं यादवपुत्रांस तुमचा संहार होईल, असा शाप दिला.[११,१,११]

**पितर**–देवयोनींतील एक भेद. हे स्वर्गांत रहात असून इच्छित रूपें धारण करणारे अति तेजस्वी आहेत. यांचे अग्निष्वात्त, सौम्य, काव्य, बर्हिषद, अथवा आर्तव सोमप, सुस्वधा अथवा आज्यप, हविष्मंत, अर्यमा, साग्नि, निरग्नि, वैराज इत्यादि अनेक भेद आहेत. स्वायंभुमन्वंतरांतील दक्षप्रजापतीनें यांस स्वधा नामक कन्या दिली होती. तिला, वयुना व धारिणी अशा दोन ब्रह्मनिष्ठ कन्या झाल्या. यांत अग्निष्वात्त, बर्हिषद, सोमप हविष्मंत, आज्यप आणि सुकाली हे अनुक्रमें मरीचि, अत्रि, भृगु, अंगिरा, पुलस्त्य, आणि वसिष्ठ यांचे पुत्र

असून, देव, दैत्य, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांस पूज्य आहेत. [ ४, १, ६३ व ६, ६, १९ ]

**पितामह**-ब्रह्मदेवास नांव.

**पितृकल्प** ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील तिसावा दिवस अथवा कल्प. हा कल्प ब्रह्मदेवाची अमावास्या.

**पितृतीर्थ**-भारत वर्षीय तीर्थ.

**पितृवर्ती**-कुरुदेशांतील कौशिक ब्राम्हणाच्या सात पुत्रांतील कनिष्ठ. यास स्वसृप, क्रोधन हिंस्र, पिशुन, कवि, आणि वाग्दुष्ट असे भाऊ होते. हे गर्गमुनीचे शिष्य होते. पितृनिधनानंतर हे गर्गमुनीची सेवा करून अध्ययन करीत असतां एकदां अतिशय दुष्काळ पडल्यामुळें पुष्कळ दिवसपर्यंत यांस अन्न मिळालें नाहीं. एकदां नित्याप्रमाणें हे गाईला घेऊन अरण्यांत गेले असतां, क्षुधेच्या शांतीस्तव यांनीं गाय भक्षण करण्याचें ठरविलें. तव्हां पितृवर्ती म्हणाला जर धेनु भक्षण कर्तव्यच असेल, तर पितरांना अर्पण करून भक्षण करावी. हें भाषण सर्वांना मान्य झाल्यावर पितृवर्ती यजमान झाला, पांच ब्राम्हण श्राद्धाला बसविले व एकास अतिथि करून गायीचा विनियोग केला. नंतर संध्याकाळीं ते सर्वजण आश्रमांत आले, व वत्स गुरूच्या स्वाधीन करून गाय वाघ घेऊन गेला, म्हणून सांगितलें. कालांतरानें ते सर्व भाऊ मृत झाल्यावर, दशारण्यांत व्याध रूपानें जन्मले पण त्यांस पितृभक्तीमुळें पूर्वजन्माचें स्मरण होतें, म्हणून त्यांनीं वैराग्य धारण केलें. पुढें ते कालंजर पर्वतावर मृगरूपानें जन्मास आले; नंतर तिसऱ्या जन्मीं चक्रवाक होऊन चौथ्या जन्मीं मानससरोवरावर सातही बंधु हंस पक्षी झाले. त्यानंतर पितृवर्ती हा सोमवंशीय नीप राजाचा ब्रह्मदत्त नामक पुत्र झाला. दुसरे दोघ प्रधान पुत्र झाले. व उरलेले चार त्याच राजाच्या नगरांतील सुदरिद्र ब्राह्मणाचे पुत्र झाले श्राद्धांत विनियोग केलेली धेनु देवल ऋषीची कन्या सन्नति अथवा सरस्वती होऊन ब्रह्मदत्त राजाची पत्नी झाली सुदरिद्र ब्राह्मणाचे धृतिमान्, तत्वदर्शी, तपोत्सुक आणि विद्याचण्ड हे पुत्र तपाकरिता अरण्यास जाण्याची आज्ञा पित्याजवळ मागूं लागले असतां, वृद्धपणामुळें तो त्यांस जाऊं देईना. त्यावेळीं ‘ येविप्रमुख्याः कुरुजांगलेषु दाशा स्तथा दाशपुरे मृगाश्च । कालंजरे सप्तच चक्रवाका ये मानसे ते वय मत्र सिद्धाः ’ ॥ हा श्लोक लिहून तो वडिलाजवळ दिला व त्यास ब्रह्मदत्त राजाकडे जावयास सांगितलें. श्लोक वांचताच राजा, कंडरीक व सुबालक प्रधानपुत्र यांस पूर्वजन्माचें स्मरण होऊन मूर्च्छना आली. नंतर त्या आलेल्या ब्राह्मणास विपूल द्रव्य देऊन व आपल्या विष्वक्सेन नामक पुत्रास राज्याभिषेक करून तो ब्रह्मदत्त राजा आपले प्रधान व स्त्रीसह ते ब्राह्मणपुत्र जेथें तप करीत होते, तेथें तपार्थ निघून गेला. ( मत्स्य. )

**पिनाक**-शंकराचें धनुष्य.

**पिनाकि**-एकादश रुद्रांतील एक.

( २ ) शंकराचें नामांतर.

**पिप्पल**-मित्र नामक आदित्य व रेवती यांच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. [ ६,१८,६ ]

( २ ) ( अश्वत्थ ) श्रीकृष्ण निजधामाला जातेवेळीं याचे खालीं बसले होते. [ ११, ३०, २७ ]

**पिप्पलाद**-परीक्षित राजाकडे आलेला एक ऋषि. [ १, १९, १० ]

**पिप्पलायन**-ऋषभदेवाच्या नऊ सिद्ध-पुत्रांपैकीं एक यानें निमीला उपदेश केला. [ ५, ४, ११ व ११,३,३५]

**पिप्पलायनि**-वेददर्श ऋषीचा अथर्ववेदाचा शिष्य. [ १२, ७, २, ]

**पिप्पली**-नदी-उगम ऋष्यवान पर्वत.

**पिप्पल्य**-कश्यपकुलांतील एक ऋषि.

**पिशाच**-भारतवर्षीय देश.

**पिशुन**-कौशिकऋषीच्या सात पुत्रांतील एक.

**पिलि**-भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**पीठ**-कृष्णानें मारिलेला नरकासुराचा सेना-पति. [ १०, ५९, १४ ]

**पीतहव्य**-वीतहव्याचें नांव.

**पीवरी**-बर्हिषद पितरांची मानसकन्या व शुकाचार्याची स्त्री. हिला वीरिणी असेंहि म्हणतात.

**पुंजिकस्थला**-एक अप्सरा. ही शापामुळें अंजना झाली होती.

**पुंजिकस्थली**-वैशाख महिन्यांत अर्यमा सूर्याबरोबर फिरणारी अप्सरा. [ १२, ११, ३४ ]

**पुण्डरीक**-सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील नभ राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षेमधन्वा. [ ९,१२,१ ]

( २ ) अष्टदिग्गजांतील एक.

( ३ ) पातालांतील एक नाग.

**पुंडरीका**-एक अप्सरा.

**पुण्ड्र**-सोमवंशीय अनुकुलांतील बली राजाच्या सहा पुत्रांपैकीं एक. [९,२३,५]

( २ ) वसुदेव व सुतनु यांच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

( ३ ) अंगदेशाच्या पुढें मोदागिरि उल्लंघून असणारा देश. ( राजमहालाचे पूर्वेस. ) पांडवांच्या वेळीं येथें पौंड्रक वासुदेव राजा होता.

**पुत्रव**-अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**पुनर्वसु**--सोमाची पत्नी व दक्षाची कन्या. एक नक्षत्र. [ ५, २३,६ ].

(२) सोमवंशीय अंधककुलांतील दरिद्योताचा पुत्र. याला आहुक व आहुकी अशीं दोन मुलें होतीं.[९,२४,२०].

**पुनश्चंद्रा**-काम्यकवनाच्या दक्षिणेकडील नदी

**पुरंजन**-एक राजा. नारदानें प्राचीनबर्हीला उपदेश करतांना या राजाचें रूपक करून उपदेश केला. [४,२५,१० ].

**पुरंजय**--सूर्यवंशीय ककुत्स्थ राजास नामांतर. [ ९,५,६ ].

( २ ) कलियुगांतील जरासंधकुलांतील शेवटचा राजा. याचा प्रधान जो शुनक त्यानें याचा वध करून प्रद्योत वंशाची स्थापना केली. [ १२,१,२]

(३)कालियुगांतील मागधवंशीय विश्वस्फूर्जि राजाचें नामांतर. हा पापबुद्धी असून पराक्रमी होता. याची राजधानी पद्मवती. गंगाकांठावरील प्रयागापर्यंतचा प्रदेश याच्या राज्यांत होता [ १२,१,३६ ].

**पुरंदर**—वैवस्वत मन्वंतरांतील इन्द्र. वामन अवतार याच्या सहाय्याकरिता झाला होता. [ ८,१३,४ ]. पृथुराजाचा अश्वमेधाचा अश्व यानेंच हरण केला होता. [ ४,१६,२४ ] विश्वरूप वध, व वृत्रासुरवध यानेंच केला हा स्वर्गाधिपति झाला त्यास अठ्ठावीस महायुगें ( चौकड्या ) झालीं असून आणखी त्रेचाळीस महायुगें व आणखी कांहीं काळ हा स्वर्गात राहील हा ब्रह्मज्ञानी होता.

**पुरमालिनी**- भारतवर्षीय नदी.

**पुराण**—श्रुतिस्मृतींच्या खालोखाल पुराणांचें स्थान असून यांस पांचवा वेद म्हटलें आहे. पुराण ब्रह्मदेवाच्या सर्व मुखांपासून उत्पन्न झालें. [ ३,१२,३९]. पुराणांचीं पांच किंवा दहा लक्षणें असून उपपुराणांची पांच व महापुराणांचीं दहा लक्षणें मानिलीं आहेत [ १२,७,१० ]. पुराणाच्या पांच लक्षणांत, सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वंतरें आणि वंशानुचरित, हीं येत असून दहा लक्षणांत सामान्यसृष्टि, विशेषसृष्टि, संरक्षण, सृष्टिपोषण, कर्माची वासना, मन्वंतरांतील आचारधर्म, परमेश्वरी लीला, सृष्टिसंहार, मोक्ष आणि ईश्वरस्वरूप हीं येतात. [ २,१०,१ ] एकंदर पुराणें अनेक आहेत, व त्यांतील मुख्य प्रतिपादनहि भिन्न भिन्न आहे. परंतु अठरा महापुराणें व अठरा उपपुराणें मुख्य आहेत. ब्रह्म, पद्म, विष्णु, शिव, भागवत, नारद, मार्कंडेय, अग्नि, भविष्य, ब्रह्मवैवर्त, लिंग, वराह, स्कन्द, वामन, कूर्म, मत्स्य, गरुड, ब्रह्मांड, हीं अठरा महापुराणें होत. [ १२, १३, ४ ]

**पुरावती**—भारतवर्षीय नदी.

**पुरीमान्**—कलियुगांतील बहुसंज्ञक राजांतील गोमतीचा पुत्र. [ १२, १, २६ ]

**पुरीषभीरु**—कलियुगांतील आंध्रसंज्ञक राजांतील तलकाचा पुत्र. [ १२,१,२५ ]

**पुरीषी**—( चयन ) एक यज्ञ. हा ब्रह्मदेवाच्या दक्षिणमुखापासून उत्पन्न झाला. [ ३, १२, ४० ]

**पुरीष्य**—( अग्नि ) विधातानामक आठवा आदित्य व क्रिया यांपासून झालेल्या पंचचित अग्नींचें नांव. [६,१८, ४ ]

**पुरु**—उत्तानपादवंशीय चक्षुमनु व नड्वला यांचा ज्येष्ठ पुत्र. [ ४, १३, १६ ]

( २ ) वसुदेव व सहदेवा यांच्या आठ पुत्रांतील ज्येष्ठ. [ ९, २४, ५३ ]

( ३ ) काम्यक वनाच्या उत्तरेकडील पर्वत. येथें पुरूरव्याचें जन्म झालें.

**पुरुकुत्स**—सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील मांधाता व बिंदुमती यांचा पुत्र. याची पत्नी नागकन्या नर्मदा. यानें नागशत्रु गंधर्वांचा निःपात केल्यामुळें 'तुझ्या स्मरणानें सर्पभय नष्ट होईल' असा गंधर्वांनीं यास वर दिला होता. याचा पुत्र त्रसद्दस्यु. [ ९,६,३८ व ९,७,२ ] याला वसुद नांवाचाहि एक पुत्र होता.

( २ ) अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**पुरुज**-सोमवंशीय अजमीढकुलांतील सुशांति राजाचा पुत्र. याचा पुत्र अर्क. [ ९,२१,३१ ]

**पुरुजित्**-विदेहवंशीय अजराजाचा पुत्र, याचा पुत्र अरिष्टनेमि, [९,१३,२२]

( २ ) सोमवंशीय यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या कुलांतील रुचक राजाच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ.

( ३ ) वसुदेवाचा भाऊ आनक व कंका यांच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. [ ९,२४,४१ ]

( ४ ) श्रीकृष्ण व जाम्बवती यांचा एक पुत्र. [ १०,६१,११ ]

( ५ ) कुंतिभोज राजाचा पुत्र. कुन्तीचा भाऊ. हा भारतीयुद्धात आपल्या पित्यासह पांडवांकडे होता. ( भा. उद्योग. ) याच्या रथाचे अश्व इंद्र धनुष्याच्या रंगाचे असत याला अश्वत्थाम्यानें मारिलें. ( भा. द्रो. )

**पुरुमित्र**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**पुरुमीढ**-सोमवंशीय पूरुकुलांतील हस्तीच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. याला संतति नव्हती. [ ९,२१,२१-३० ].

**पुरुष**-विश्व नियामक शक्ति [११,२२,२९]

**पुरुषसूक्त**-परमेश्वरस्वरूप वर्णन करणारें सूक्त. 'सहस्रशीर्षा' हें वैदिक सूक्त पुरुषसूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. [ १०,१,२० ].

**पुरुहूत**—इंद्राचें नांव.

**पुरुहोत्र**-सोमवंशीय यदुवंशांतील अनु-राजाचा पुत्र. याचा पुत्र आयु. [ ९,२४,६ ].

**पुरूरवा**-सोमपुत्र बुध व इला यांचा पुत्र [ ९,१,३५ ]. याला ऐल असें नांव होतें. हा मोठा उदार व श्रेष्ठ राजा होता. इंद्राच्या सभेंत नारदमुखानें याचे गुण ऐकून उर्वशी याचेकडे आली. या उर्वशीला 'मनुष्य लोकीं जाशील' असा मित्रावरुणांचा शाप होता. ती याजकडे आली व तिनें राजास दोन अटी सांगितल्या. पहिली अट ही कीं, आपलीं दोन कोंकरें राजानें सांभाळावी व दुसरी अट अशी कीं, 'मी तूप खाऊन राहीन आणि मैथुन वाचून नग्नस्थितींत तुझें दर्शन घेणार नाहीं.' या दोन्ही अटी राजानें मान्य केल्या, व ती राजाजवळ राहिली. [९, १४, १५ ते २५ ] तिच्यापासून आयु, श्रुतायु, सत्यायु, रय, विजय आणि जय असे सहा पुत्र झाले [९,१५,१] याची राजधानी प्रयागाजवळ प्रतिष्ठान पुरी [ ९, १, ४२ ](दे.भा.) हा सोमवंशाचा मूळ पुरुष. पुढें इंद्रानें गंधर्वांकडून त्याचे मेष हरणकरवल्यामुळे उर्वशीच्या अटी राजाकडून पाळल्या गेल्या नाहींत, त्यामुळें उर्वशी निघून गेली. जातांना तिनें याला एक थाळी दिली. ती थाळी घेऊन हा वनात भटकत असे. ती जेथें टाकली, तेथ पुढें शमीगर्भ पिंपळ उगवला. त्याच्या अरणीपासून अग्नि उत्पन्न केला. तो तीन प्रकारचा होता. त्यांना यानें आपले पुत्र मानले; व त्यांत हवन करून हा

गंधर्व लोकाला गेला. ही गोष्ट त्रेतायुगाच्या आरंभीची झाली. [ ९, १४, २६ ते ४९].

ब्राह्मणादि चार वर्णांनीं परस्परापाशीं कसें वागावें याविषयीं याचा कश्यपऋषीशीं संवाद. (भा.शां. अ.२–३)

**पुरोचन**—दुर्योधनाचे सांगण्यावरून पांडवांना दग्ध करण्याकरितां लाक्षागृह निर्माण करणारा म्लेंच्छ. हा पांडवांबरोबर तेथें राहण्याकरितां गेला असतां लाक्षागृहांत दग्ध झाला. याच्या रथाला खर असत. ( भा. आदि. )

**पुरोजव**-प्रियव्रतपुत्र मेधातिथि त्याच्या सात पुत्रांतील पहिला. व याचा वर्ष. [ ५,२०,२५ ].

( २ ) शाकद्वीपांतील वर्ष.

( ३ ) प्राणनामक वसु व ऊर्जस्वति यांचा कनिष्ठ पुत्र. [ ६,६,१२ ].

**पुरोजवा**-अनीलनामक वसूचा पुत्र.

**पुलस्त्य** स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवाच्या कर्णापासून झालेला मानसपुत्र. कर्दमकन्या हविर्भूती याची पत्नी. याला अगस्त्य आणि विश्रवा असे दोन पुत्र होते. [ ३,१२,२४;३,२४,२२ व ४,१,३६ ].

( २ ) हा वैवस्वत मन्वंतरांत ब्रह्मदेवानें केलेल्या यज्ञांत अग्नीच्या पिंगट केशापासून उत्पन्न झाला. याच मन्वंतराच्या अकराव्या पर्ययाच्या सत्ययुगांत हा मेरूपर्वताच्या पार्श्वभागीं तप करीत असतां, तेथें गंधर्वकन्या येऊन गायन करीत. त्यामुळें याला त्रास होत असे. म्हणून यानें असा शाप दिला कीं 'जी कन्या माझेसमोर येईल, ती गर्भवती होईल.' हा शाप तृणबिंदूची कन्या गौ हिला माहीत नसल्यानें ती याचेपुढें आली, व गर्भवती झाली. म्हणून राजानें ती कन्या यासच दिली. ( भा. वन. ) तिनें याची उत्तम सेवा करून वेदाध्ययन श्रवण केलें, म्हणून तिला जो पुत्र झाला, त्याचें विश्रवा असें नांव ठेविलें. ( वा. रा. )

( ३ ) चैत्रमहिन्यांत धाता नामक आदित्याबरोबर फिरणारा ऋषि. [ १२,११,३३ ]

( ४ ) युधिष्ठिराला तीर्थयात्रा सांगणारा ऋषि. ( भा. वन. )

**पुलह**—स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवाचे नाभीपासून झालेला मानसपुत्र. याची स्त्री कर्दमकन्या गति व पुत्र कर्मश्रेष्ठ वरीयान् व सहिष्णु. [ ३,१२,२४; ३,२४,३३ व ४,१,३८ ]

( २ ) हा वैवस्वत मन्वंतरांत ब्रह्मदेवानें केलेल्या यज्ञांत अग्नीच्या केसापासून झाला. याची स्त्री संध्या व पुत्र कर्दम. ( भा. उद्योग. )

( ३ ) वैशाखांत अर्यमा सूर्याबरोबर फिरणारा ऋषि. [ ११,११,३४ ]

**पुलहाश्रम**—गण्डकी नदीचे तीरावरील एक क्षेत्र. [ ७,१४,३० ]

**पुलिन्द**—लोकविशेष. [ २,४,१८ ]

( २ ) कलियुगांतील शुंगघराण्यांतील राजा. याचा पुत्र घोष. [१२,१,१७].

( ३ ) एकदेश. इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेस व बुंदेलखण्डाच्या पश्चिमेस सागरजिल्ह्यांतील प्रदेश.

**पुलिंदनगर**--पाण्डवांच्या वेळीं येथें सुकुमार आणि सुमित्र असे बंधु राजे होते. ( भा. सभा. )

**पुलोमन्**-कश्यप व दनु यांचा पुत्र दानव हा हिरण्यकाशिपू व वृत्रासुर यांचा अनुयायी होता. [ ६, ६, ३१, ६, १०, २० व ७, २, ५ ]

**पुलोमा**—वैश्वानर दानवाची एक कन्या व कश्यप प्रजापतीची एक पत्नी. हिचे पुत्र पौलोम. [६,६,३३,३४]

( २ ) चाक्षुमन्वंतरांतील वारुणि भृगूची स्त्री. हिचे पुत्र च्यवन इत्यादि सात.

**पुल्कस**-(चाण्डाल) लोकविशेष.[२,४,१८]

**पुष्कर**-सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील सुनक्षत्र राजाचा पुत्र. याचा पुत्र अन्तरिक्ष. [ ९,१२,१२ ]. यास किंनराश्व असें नामांतर होतें.

( २ ) वसुदेवाचा भाऊ वृक व दुर्वाक्षी यांचा एक पुत्र. [ ९,२४,४३ ].

(३) कृष्णाचा एक पौत्र. [१०,९०,३४].

( ४ ) राजपुताना. अजमीराहून तीन कोसांवर हें तीर्थ आहे. या तीर्थावर ब्रह्मदेवानें पुष्कळ यज्ञ केले. याचे तीन भेद आहेत. १ ब्रह्मपुष्कर, २ विष्णुपुष्कर आणि ३ रुद्रपुष्कर. याच्या भोंवतीं अनेक तीर्थें व देवस्थानें आहेत. त्यांत,ब्रह्मदेव, सावित्री, वराह, बदरिनारायण, व शिव-आत्मेश्वर हीं पांच मुख्य आहेत. [ १२,१२,६० ].

( ५ ) वरुणाचा एक पुत्र व बलाध्यक्ष. ( वा. रा. ) याची पत्नी सोमकन्या ज्योत्स्ना. ( भा. उद्योग. )

( ६ ) कृष्णपराशर कुलांतील एक ऋषि.

( ७ ) नलाचा चुलत भाऊ.

**पुष्करचूड**-दक्षिण दिशेकडील दिग्गज. [ ५,२०,३९ ].

**पुष्करद्वीप**—पृथ्वीच्या सप्तमहाद्वीपांतील सातवें. हें दधिमण्डोदाच्या बाहेर असून याची रुंदी चौसष्ट लक्ष योजनें आहे; व याला गोड पाण्याच्या समुद्राचें वेष्टण आहे, प्रियव्रतपुत्र वीतिहोत्र, तो या द्वीपाचा अधिपति असून, त्यानें याचे दोन भाग करून ते आपल्या धातकि व रमणक या दोन पुत्रांना दिले. त्या दोन भागांची सीमा मानसोत्तर पर्वत आहे. यांत अग्निसारख्या तेजस्वी कोट्यावधि सुवर्णपत्रांचें कमल असून तें ब्रह्मदेवाचे आसन आहे. त्याचे वरून या द्वीपाला पुष्करद्वीप असें नांव मिळालें. [ ५,२०,२९ ].

**पुष्करमालिनी**--इंद्राची सभा.

**पुष्करारण्य**-वाटधान देशाजवळ असलेलें वन. ( भा. सभा. )

**पुष्करारुणि**-सोमवंशीय पूरुकुलांतील दुरितक्षयाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. हा तपानें ब्राम्हण झाला.[९,२१,२०]

**पुष्करावती**-( पुष्कलावती शब्द पहा. )

**पुष्करिणी**-उत्तानपादवंशीय व्युष्ट राजाची स्त्री. पुत्र सर्वतेजस. [४,१३,१४ ].

( २ ) उत्तानपादवंशीय उल्मुक राजाची स्त्री. हिला अंग, सुमनस, ख्याति, क्रतु, अंगिरा, व गय, हे पुत्र होते. [ ४,१३,१७ ].

**पुष्कल**–सूर्यवंशीय दशरथपुत्र भरताचा मुलगा. याची राजधानी पुष्कलावती व देश गांधार. [ ९,११,१२].
( २ ) ( लांगल शब्द पहा. )

**पुष्कलावती**–( त ) गांधार ( कंदाहार ) देशाची राजधानी. ही भरतपुत्र पुष्कलानें वसविली. हल्लीं पराग व चरसद्दा हीं दोन गांवें त्या ठिकाणीं आहेत. तीं स्वात नदीच्या पूर्व किनाऱ्यावर आहेत.

**पुष्टि**- स्वायंभुमन्वंतरांतील दक्षकन्या. हिचा पुत्र स्मय [ ४, ४,४९–५१ ].:

**पुष्प**–( **वर्ष** ) शाल्मलीद्वीपांतील एक.

**पुष्पक**–कुबेरानें तपानें मिळविलेलें विमान. त्याच्या जवळून तें रावणानें घेतलें होतें. व रावण वधानंतर हें रामचंद्राकडे आलें. हें इच्छागामी असून इष्ट आकारी होतें [ ९. १०, ४५ ]

**पुष्पजा**–मलयपर्वतापासून निघालेली नदी.

**पुष्पदन्त**–विष्णूचा एक पार्षद.[८,२१,१७]
( २ ) वायव्येकडील दिग्गज.
( ३ ) एक गंधर्व. ( दे. भा. स्कं. ९ ) यानें महिम्न स्तोत्र केलें.

**पुष्पदंष्ट्र**–कद्रुपुत्र एक नाग.

**पुष्पधन्वा**–मदनास पुष्पांचें धनुष्य घेतल्यामुळें मिळालेलें नांव.

**पुष्पभद्र**–स्वर्गांतील देवांचें एक वन.

**पुष्पभद्रा**–हिमालयाच्या उत्तरेकडील नदी. मार्कंडेय ऋषीचें जन्मस्थान व तपस्थान [ १२,८,१७ ].

**पुष्पमित्र**–कलियुगांतील बाल्हीक राजानंतर झालेला राजा. याचा पुत्र दुर्मित्र. [ १२,१,३४ ]

**पुष्परथ**–दाशरथिरामाचा रथ.

**पुष्पवती**–भारतवर्षीय एक नदी.

**पुष्पवर्ष**–शाल्मली द्वीपांतील एक पर्वत. [ ५,२०,१० ]

**पुष्पवहा**–पुष्पभद्राचें नांव [ १२,९,३० ].

**पुष्पवान्**- सोमवंशीय उपरिचरवसूपुत्र बृहद्रथ वंशांतील सत्यहित राजाचा पुत्र. याचा पुत्र जहु. [ ९,२२,७ ]

**पुष्पवाहन**- एक राजा. याची पत्नी लीलावती. याला हजार पुत्र होते.

**पुष्पाचंपा**–( भागलपूर ) एक नगर.

**पुष्पानन**–एक गंधर्व.

**पुष्पान्वेषि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**पुष्पार्ण**––उत्तानपादवंशीय वत्सर व स्ववींथि यांच्या सहा पुत्रांतील ज्येष्ठ. याला प्रभा नामक स्त्रीपासून प्रातः, सायं, मध्यान्ह, आणि दोषा नामक स्त्रीपासून प्रदोष, निशीथ, व व्युष्ट असे पुत्र झाले [ ४,१३,१२].

**पुष्पितक**–भारतवर्षीय पर्वत.

**पुष्पोत्कटा**–सुमाली राक्षसाची कन्या व विश्रवा ऋषीची पत्नी. प्रहस्त व कुंभीनसी यांची माता

**पुष्पोदका**- यमलोकाच्या मार्गांत असणारी नदी. ( भा. व न. )

**पुष्य**–एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक. हें शिशुमार चक्राच्या डाव्या कटिप्रदेशीं आहे. [५,२३,६]
( २ ) सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील हिरण्यनाभ राजाचा पुत्र. याचा पुत्र ध्रुवसन्धि. [ ९,१२,५ ]

**पुंसवन**–एक व्रत. हें दितीनें सुपुत्र प्राप्त होण्याकरितां केलें होतें. मार्गशीर्ष

शुद्धप्रतिपदेपासून कार्तिक वद्य अमावास्येपर्यंत हें करावयाचें असतें. इंद्रानें दितीचा गर्भाचा च्छेद केला, ते मरुद्गण. [ ६,१९,२ ]

## पू

**पूजनी**–( चिमणी. )

**पूतना**-कंसाची अनुचर राक्षसी. कृष्णनाशाच्या इच्छेनें स्तनांत विष भरून ही गोकुळांत गेली असतां बालरूपी कृष्णानें हिचे प्राण हरण केले. [ १०,६,२ ]

**पूतिमाष**–अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**पूयोद**–अगम्यगमन करणाऱ्या लोकांस प्राप्त होणारा नरक. [ ५,२६,२३ ].

**पूर**–(नगर) ध्रुवनामक वसु व धरणि याचें अपत्य. ( देवता ) [ ६,६,१२ ].

**पूरण**–विश्वामित्रकुलातील एक ऋषि.

**पूरु**–सहाव्या चक्षुमनूचा पुत्र. [ ८,५,७ ].

( २ ) विजयकुलांतील जन्हु राजाचा पुत्र. याचा मुलगा बलाक. [९,१५,३]

( ३ ) सोमवंशीय नहुष राजाचा पुत्र ययाति व वृषपर्वा दानवाची कन्या शर्मिष्ठा यांच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. यानें आपल्या पित्याचें वृद्धपण घेतलें म्हणून यास पित्याचें सार्वभौमत्व मिळालें. याचा मुलगा जनमेजय. [९,१८,३३;९,१९,२३व९,२०,२]

**पूर्ण**–प्राधापुत्र देवगंधर्वांतील एक.

**पूर्णभद्र**–वैश्रवणाच्या–कुबेराच्या-आमात्यांपैकीं एक यक्ष याचा पुत्र यज्ञ अथवा हरिकेश. ( मत्स्य. अ. १७९ )

**पूर्णमास**–श्रौतकर्मांतील एक इष्टि. (यज्ञ) ही पौर्णिमेला करतात. [ ५,७,५ ].

( २ ) धाता नामक सातवा आदित्य व अनुमति यांचा पुत्र. [ ६,१८,३ ].

( ३ ) कालिंदीपुत्र. [ १०,६१,१४ ].

( ४ ) अगस्त्यकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**पूर्णा**–( पयोष्णी शब्द पहा. )

**पूर्णायु**–प्राधापुत्र देवगंधर्वांतील एक.

**पूर्णिमान्**–मरीचिऋषि व कर्दमकन्या कला यांच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याचे पुत्र विरज, विश्वग व देवकुल्या कन्या. [ ४,१ १४ ].

**पूर्णिमागतिक**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**पूर्व**–कश्यपकुलांतील एक ऋषि.

**पूर्वकिरात**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेस इंद्रपर्वतासमीप असणारा देश येथें पाण्डवांच्या वेळीं सात किरात राजे राज्य करीत होते. ( भा. सभा. अ. ३० )

**पूर्वकोसल**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील देश.

**पूर्वचित्ति**–स्वायंभु मन्वंतरांतील एक अप्सरा आणि प्रियव्रतपुत्र अग्नीध्र राजाची पत्नी. हिला ब्रम्हदेवानें याचेकडे पाठविली होती. नाभि, किंपुरुष, हरिवर्ष, इलावृत, रम्यक, हिरण्मय, कुरु, भद्राश्व व केतुमाल असे नऊ पुत्र होतांच ही पुन्हां ब्रम्हदेवाकडे निघून गेली. [ ५,२,३-१९ ].

( २ ) वैवस्वत मन्वंतरांतील प्राधेच्या अप्सरा कन्येंतील एक. ही पौष महिन्यांत भगनामक सूर्याबरोबर फिरते. [ १२, ११, ४२ ]

**पूर्वदशार्ण**-विदेहदेशाच्या पूर्वेकडील देश. येथें पांडवांच्या वेळीं सुधर्मा राजा होता. ( भा. सभा. अ. २९ )

**पूर्वनिषाद**–भर्ग नांवाचा देश. येथें पांडवांच्या वेळीं मणिमान् वगैरे निषाद होते. ( भा. सभा. अ. ३० )

**पूर्वपांचाल**—कुरु देशाच्या पूर्वेकडील देश.

**पूर्वपालि**—भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा.

**पूर्वबर्बर** पूर्वशक देशाच्या पूर्वेकडील बर्बर

**पूर्वमत्स्य** सुपार्श्व देशाच्या पूर्वेकडील देश. येथें विराट राजा होता.

**पूर्वमित्रपद**—भारतवर्षीय एक तीर्थ.

**पूर्वशक**—अपर विदेहाच्या पूर्वेकडील देश.

**पूर्वसुह्म** व **प्रसुह्म**-हे दोन देश पांडवांच्या वेळीं पूर्वकिराताच्या पूर्वी क्रमानें होते.

**पूर्वा**—एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक. [ ५ २३, ५ ]

**पूर्वातिथि**—अत्रि कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**पूर्वाभाद्रपदा**-एक नक्षत्र सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक [ ५, २३, ५ ]

**पूर्वेंद्र**—पूर्वकल्पांतील पांच इन्द्र, पाण्डवरूपानें जन्मले होते, ते.

**पूषा**-स्वायंभुव मन्वंतरांतील दक्षप्रजापतीच्या यज्ञांतील एक ऋत्विज. याला त्या यज्ञांत चण्डीशानें बांधलें. याचे दांत पाडले होते, म्हणून शंकरानें यास यजमानाच्या दांतानीं खाणारा ‘ पिष्टभुक् ’ होशो असा वर दिला. [ ४,५,१७ व ४,७,४ ]

( २ ) बारा आदित्यांपैकीं एक. [ ६, ६,३९ ] हा व दक्षयज्ञांतील पूषा एकच, असें भागवतकारांचें म्हणणें आहे [ ६,६,४३ ]. पण त्यावेळीं द्वादशादित्य नसल्यानें हे दोन स्वतंत्र असें प्रा. ऐ. कोशकार म्हणतात.

( ३ ) माघ महिन्यांत धनंजय नाग, वातराक्षस, सुषेणगंधर्व, सुरुचियक्ष, घृताची अप्सरा, व गौतमऋषि, यांसह फिरणारा सूर्य. [१२,११,३४]

**पृथा**—शूरसेन यादवापासून कुन्ति राजानें दत्तक घेतलेली कन्या. हीच पांण्डवांची माता कुन्ती. [ ९,२४,३० ] ( कुन्ती शब्द पहा )

**पृथाश्व**—एक राजर्षि.

**पृथिवी**—पृथुराजामुळें भूमीस मिळालेलें नांव. सूर्यमालेमधील पृथ्वी हा सूर्यापासून तिसरा ग्रह आहे. पृथ्वी गोल नसून मध्यें फुगीर आहे. स्थूलमानानें पृथ्वीचें क्षेत्रफळ १९६५५०००० चौ. मैल भरतें; पैकीं ५५५०००००चौरस मैल जमीन असून बाकी सर्व पाणी आहे. पृथ्वीवरील एकंदर लोकसंख्या एक अब्ज ६५६ कोटी भरते पृथ्वी सूर्याभोंवती दीर्घवर्तुळाकार कक्षेत फिरत असून सूर्य त्या कक्षेचा केंद्र आहे. पृथ्वीचें वयोमान दोन चार कोटी तरी वर्षे आहे. हिचें पृथुराजानें दोहन करून सर्वत्र समृद्धि केली, व नगर, गांवें, इत्यादिकांची रचना केली [ ४,१८,२६ ] हिला अवधूतानें गुरू केलें [ ११,७,३२

**पृथिवींजय**—वरुणसभेंतील एक असुर.

**पृथु**—सरस्वतीपात्रांतील एकतीर्थ [३,१,२२]

( २ ) चक्षु मनूच्या वंशांतील वेन राजाचा पुत्र. हा भगवंताचा नववा अवतार होय. वेन राजा दुष्ट निघाल्यामुळें त्यास ऋषींनीं शाप देऊन दग्ध केलें त्याच्या देहाचें मंथन केलें, त्यापासून एक जुळें झालें त्यांतील मुलगा पृथु व कन्या अर्चि. तीच

याची पत्नी झाली. यानें गोरूपधारी पृथ्वीचें दोहन करून अनेक बीजें उत्पन्न केलीं, व पृथ्वी सारखी करून नगरें, ग्रामें, यांची स्थापना केली. व अनेक यज्ञ केले. हा पहिला राजा होय. याला विजिताश्व अथवा अंतर्धान, धूम्रकेश, हर्यक्ष, द्रविण आणि वृक असे पांच पुत्र होते. [१,३,१४ व ४, अ. १५ ते २४]. पृथ्वीचे दोहन सूर्यवंशीय पृथूनें केलें असावें, कारण बलीच्या वत्साची कल्पना तेव्हां संभवत, असें प्रा. ऐ. कोशकार म्हणतात.

(३) चौथ्या तामस मनूच्या दहा पुत्रांतील ज्येष्ठ.

(४) सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील अनेना राजाचा पुत्र, याचा पुत्र विश्वरन्धि. [९,६,२०]. हा पृथ्वीवर सुधर्मा, शंखपद, केतुमान् आणि हिरण्यरोमा असे पूर्वादि दिशांना चार दिक्पाल स्थापून आपण मध्यें रहात असे. (मत्स्य. अ. ८) यानें शंभर यज्ञ केले होते. याला विश्वग आणि विष्टराश्व असेही पुत्र होते.

(५) यदुवंशीय रुचकाच्या पांच पुत्रांतील चौथा. [९,२३,३४].

(६) सोमवंशीय वृष्णिकुलांतील चित्ररथाचा ज्येष्ठ पुत्र. [९,२४,१८].

(७) एक ब्रम्हर्षि.

(८) रामसेनेंतील एक वानर.

**पृथुग्रीव**-खर राक्षसाचा एक अमात्य. यास पृथुश्याम असेंहि नांव होतें

**पृथुदर्भ**-औशीनर शिबिपुत्र बृहद्गर्भाचें नामांतर.

**पृथुलाक्ष**-सोमवंशीय अनुकुलांतील चतुरंग राजाचा पुत्र. याला बृहद्रथ, बृहत्कर्मा, बृहद्भानु असे पुत्र होते. [९,२३,११] चंपहि एक याचा पुत्र होता.

**पृथुलाश्व**-एक राजर्षि.

**पृथुश्याम**-पृथुग्रीवाचें नामांतर.

**पृथुश्रवा**-सोमवंशीय यदुपुत्र क्रोष्टा त्याच्या वंशांतील महाभोज राजाचा पुत्र. याचा पुत्र धर्म. [९,२३,३३]

**पृथुषेण**-ऋषभदेववंशीय विभुराजाचा पुत्र याची स्त्री आकूती व पुत्र नक्त. [५,१५,६]

**पृथुसेन**-सोमवंशीय अजमीढपुत्र बृहदिषूच्या वंशांतील प्राज्ञ राजाचा पुत्र. याचा पुत्र पार. [९,२१,२४]

(२) कर्णाचा एक पुत्र.

**पृथूदक**-ठाणेश्वराजवळील एक तीर्थ, सरस्वतीच्या दक्षिणतीरावर. हल्लींचें पेहोआ.

**पृश्नि**—सविता नामक पांचव्या आदित्याची पत्नी. [६,१८,१]

(२) स्वायंभू मन्वंतरांतील सुतपा प्रजापतीची पत्नी. हीच देवकी झाली होती. [१०,३,३२]

**पृश्निगर्भ**-पृश्निपुत्र. हा भगवंताचा अवतार. त्रेतायुगांतील उपास्य देवता. [१०,३,३५ व ११,५,२६]

**पृषत्**-सोमवंशीय पांचालकुलांतील सोमकाचा पुत्र. याचा पुत्र द्रुपद. [९,२२,२]

**पृषदश्व**-सूर्यवंशीय अंबरीष पुत्र विरूपाचा मुलगा. याचा पुत्र रथीतर. [९, ६, १]

**पृषध्र**–वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांतील आठवा पुत्र. हा वसिष्ठ ऋषीच्या आश्रमांत असतां गुरुनें याला गोपालनाचें कार्य सांगितलें. एकदां अंधाऱ्या रात्रीं गाईच्या गोठ्यांत वाघ आल्यामुळें सर्व गायी घाबरून हंबरूं लागल्या. तें ऐकून यानें गर्दीनें हातांत तलवार घेतली, व वाघ समजून गाईवरच प्रहार केला. त्या गोवधानें हा पतित झाला असतां अरण्यांत वणव्यांत सांपडून दग्ध झाला. [ ९, १, १२ व ९, २, ३ ]

## पै

**पैंगल**–यजुर्वेदोपनिषत्.

**पैंगलायन**–भृगुकुलोत्पन्न ऋषि. पिंगल ऋषीचे वंशज.

**पैंग्य**–पिंगऋषीचे वंशज.

**पैजवन**–एक शूद्र. यानें ऐंद्राम विधानानें यज्ञ केला होता. (भा शांति. अ. ६०

**पैप्पल**–वेदाची एक शाखा. [ १, ३, २३ ]

( २ ) कश्यप आणि वसिष्ठ कुलांतलि दोन ऋषी.

**पैल**–ऋक्शाखेचें अध्ययन करणारा कृष्णद्वैपायन व्यासाचा शिष्य. हा वसुऋषीचा पुत्र असून पाण्डवांच्या राजसूय यज्ञांत 'होता' नामक ऋत्विज होता. [१, ४, २१ व १२, ६,५२]

( २ ) स्वायंभूमन्वंतरांत संपूर्ण ऋग्वेदाचें अध्ययन करणारा व्यासशिष्य.

( ३ ) अंगिरा कुलांतील एक ऋषि.

( ४ ) भृगुकुलातील एक ऋषि. हा पिली ऋषीचा वंशज.

**पोषण**–पुराणाच्या दशविधलक्षणांपैकीं एक. सृष्टिपोषण. [ २, १०, १ ]



## पौ

**पौगण्ड** वयाच्या पांच ते दहा किंवा सोळा वर्षांचा काळ. [ ३, ३१, २८ ]

**पौडव**–वसिष्ठ कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**पौंड्र**–एक राजा. ( पौण्ड्रक ) [११,५,४९]

( २ ) भीमसेनाच्या शंखाचें नांव.

**पौंड्रक**–करूष देशाचा राजा. याचें नांव वासुदेव होतें. हा कृष्णासारखीं कौस्तुभादि भूषणें धारण करून आपणांस अवतार समजत असे. एकदां यानें द्वारकेस कृष्णाकडे असा निरोप पाठविला कीं, "अवतार धारण केलेला वासुदेव मीं आहे. तूं आपलें वासुदेव नांव सोडून शंखचक्रादि धारण न करितां मला शरण ये!" दूतानें सांगितलेला हा निरोप ऐकून श्रीकृष्ण सैन्यासह युद्धास निघाला. त्यावेळीं पौंड्रकाला मदत करण्याकरितां काशीचा राजा तीन अक्षौहिणी सैन्य घेऊन आला होता पौंड्रकानें शंख, चक्र, तलवार, गदा, पद्म, शार्ङ्गधनुष्य, कौस्तुभ, वनमाला, हीं सर्व कृत्रिम भूषणें धारण केलीं होतीं. त्या युद्धांत श्रीकृष्णानें याचा शिरच्छेद केला. [ १०,६६,७ ते २१ ]

**पौण्ड्रकमात्स्यक**–भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**पौदन्यपुरी**–सूर्यवंशीय अश्मक राजानें स्थापिलेली नगरी.

**पौर**-भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**पौरंजनी**–पुरंजनराजाच्या एकशें दहा कन्या. [ ४,२७,७ ]

**पौरव**—विश्वामित्र ऋषीचा एक पुत्र.

पौ० ( २ ) पुरुकुलांतील एक दानशूर राजा, व त्याचे वंशज. ( भा. द्रोण. )

( ३ ) अश्वत्थाम्यानें मारिलेला पांडवपक्षीय राजा. ( भा द्रोण. )

( ४ ) पांडवांनीं मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा. याचा पुत्र दमन.

**पौरवी**–युधिष्ठिराची पत्नी. हिचा पुत्र देवक. [ ९, २२, ३० ]

( २ ) वसुदेवाची पत्नी. हिला सुभद्र, भद्रवाह, दुर्मद, भद्र असे पुत्र झाले. [ १२, ११, ३५]

**पौरुषेय**–ज्येष्ठमासीं मित्र नामक सूर्याबरोबर फिरणारा राक्षस. [१२,११,३५]

**पौर्णमास**–कलियुगांतील आन्ध्र राजापैकीं श्रीशांतकर्ण राजाचा पुत्र. याचा पुत्र लंबोदर. [ १२, १, २३ ]

( २ ) अगस्त्य कुलांतील एक ऋषि.

**पौलकायनी**–अंगिराकुलांतील ऋषि.

**पौलमौली**-कश्यपकुलांतील एक ऋषि.

**पौलस्त्य**–पुलस्त्य पु । विश्रवाऋषीचें नांव.

( २ ) भृगुकुलांतील एक ऋषि.

( ३ ) अगस्त्य कुलांतील एक ऋषि.

**पौलह**–पुलह ऋषीचे वंशज.

**पौली**-वसिष्ठ कुलांतील एक ऋषि.

**पौलोम**-पुलोमेचे पुत्र. हे हिरण्यपुरांत रहात असत. यांस अर्जुनानें मारिलें. [ ६, ६, ३५ ]

( २ ) दक्षिण समुद्राकडील एक तीर्थ.

**पौलोमी**–इंद्र(शक्र)नामक अकराव्या आदित्याची पत्नी. हिचे पुत्र जयंत, ऋषभ आणि मीढुष. [ ६,१८,७ ] ( ही पुलोमेची कन्या असावी. )

**पौषाजिति**-अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**पौष्य**—पुष्यपुत्र ध्रुवसंधीचें नामांतर.

**पौष्यंजि**-सुकर्मा ऋषीचा सामवेदाचा शिष्य [ १२,६,७८ ]

**प्रकाश**-तमऋषीचा पुत्र. वागींद्राचा पिता.

**प्रकाशक**-रैवतमनूचा एक पुत्र.

**प्रकृति**–त्रिगुणांची साम्यावस्था[३,२६,१०]

**प्रगाथा**—एक ब्रह्मर्षि.

**प्रघस**—मारुतीनें मारिलेला रावणपक्षीय राक्षस. ( वा. रा. सुंदर )

( २ ) सुग्रीवानें मारिलेला एक राक्षस.

**प्रघसा**—अशोकवनिकेंतील सीतारक्षणार्थ असलेली राक्षसी. ( वा. रा. सुंदर.)

**प्रघास**—रावणपक्षीय राक्षस.

**प्रघोष**—श्रीकृष्ण व लक्ष्मणा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१५ ]

**प्रचण्ड**—विष्णूचा एक पार्षद.

**प्रचिन्वान्**–सोमवंशीय पुरुकुलांतील जनमेजयाचा मुलगा. याचा पुत्र प्रवीर. [ ९,२०,२ ]

**प्रचेतस**–उत्तानपादवंशीय प्राचीनबर्हि व शतद्रुति यांचे दहा पुत्र. हे सर्व समानशील होते. पित्याचे आज्ञेप्रमाणें समुद्रामध्यें दहा हजार वर्षे तप करून त्यांनीं रुद्रास प्रसन्न केलें. [ ४, २४, १३ ] तप समाप्तीनंतर हे समुद्रांतून बाहेर आले तेव्हां सर्व पृथ्वी वृक्षांनीं व्याप्त झालेली पाहून यांनी आपल्या क्रोधाग्नीनें वृक्ष दग्ध करण्यास सुरवात केली. इतक्यांत तेथें औषधींचा राजा सोम येऊन त्यानें यांचें सांत्वन केलें, व यांस वृक्षांनीं पालन केलेली व कंडुकऋषीपासून

प्रम्लोचा अप्सरेला झालेली मारिषा कन्या दिली. हिला वार्क्षी असें नांव होतें. हिचा पुत्र प्राचेतस दक्ष. [ ६, ४, ४ ते १७ ]

**प्रचेता**–वरुणाचें नांव. [ ७, १२, २८ ]

( २ ) सोमवंशीय द्रुह्युकुलांतील दुर्मना राजाचा पुत्र. याला प्राचेतससंज्ञक शंभर पुत्र होते. [ ९,२३,१५ ]

**प्रजंघ**—अंगदानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस. ( वा. रा. युद्ध. )

( २ ) रामपक्षीय एक वानर. यानें संपाति इत्यादि राक्षसांस मारिलें.

**प्रजन**–सोमवंशीय कुरुराजाचा एक पुत्र.

**प्रजागरा**–एक अप्सरा.

**प्रजापति**–ब्रह्मदेव.

( २ ) ब्रह्मदेवाचे मरीच्यादि मानसपुत्र. [ ४, ७, ३ ]

( ३ ) वैवस्वत मन्वंतरांतील दुसऱ्या पर्ययांतील व्यास.

**प्रज्ञाचक्षु**–धृतराष्ट्र. [ १, १३, २८ ]

**प्रणव**–ॐकार. हा ब्रह्मदेवाच्या हृदयापासून उत्पन्न झाला. [ ३,१२,४४ ]

**प्रतपन**–नल वानरानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस.

**प्रतर्दन**–सोमवंशीय आयुपुत्र क्षत्रवृद्ध कुलांतील दिवोदासाचा पुत्र. हा माधवीपासून झाला होता. ( गालव शब्द पहा ) याळाच द्युमान्, शत्रुजित्, ऋतध्वज, कुवलयाश्व हीं नांवें होतीं. याचे पुत्र अलर्कादि. [ ९, १७ ६ ]

( २ ) काशीचा राजा सुदेव, त्याच्या सौदेव–दिवोदास–पुत्रास भारद्वाज ऋषीच्या कृपेनें झालेला पुत्र. हा भारद्वाज ऋषीजवळच शस्त्रास्त्र विद्या शिकला होता. यानें वीतहव्य राजाबरोबर युद्ध करून त्याच्या शंभर पुत्रांचा संहार केला, व त्यानें हरण केलेलें आपलें राज्य परत मिळविलें. या युद्धप्रसंगीं हतवीर्य झालेला वीतहव्य च्यवन ऋषीच्या आश्रमांत लपून बसला असतां प्रतर्दन तेथें गेला व ' येथें जो कोणी क्षत्रिय असेल तो माझ्या स्वाधीन करा ' असें ऋषास म्हणाला. तें ऐकून ऋषीनें येथें कोणी क्षत्रिय नाहीं, आम्हीं सर्व ब्राह्मण आहों, असें सांगितलें. त्यावरून ' तसेंच असो ' असें म्हणून हा परत आला व पित्यास राज्यावर बसविलें. हा मोठा दानशूर होता. एकदां यानें आपल्या पुत्रासहि दान दिलें होतें. ( भा. शांति. अनु. ) हा सिंहासनावर बसल्यावर यानें सर्व पृथ्वी जिंकली व स्वर्ग जिंकण्याकरितां एकटाच एका दूताला बरोबर घेऊन इंद्रलोकीं गेला, आणि इंद्रास कळविलें कीं, ' मी युद्धास आलों आहे, सामर्थ्य असल्यास मजबरोबर युद्ध कर, नाहींतर शरण ये. ' हा निरोप ऐकून इंद्र युद्धाकरितां आला, पण याला एकटा पाहून त्याला आश्चर्य वाटलें, पण याच्या इच्छेप्रमाणें युद्धास आरंभ केला. त्या युद्धांत यानें सर्व देवांचा पराभव केला. तेव्हां याचा पराक्रम पाहून संतुष्ट झालेल्या इंद्रानें यास वर मागण्यास सांगितलें. त्यावेळीं यानें इंद्रालाच सर्व श्रेष्ठ वर

काय असेल तें विचार करून दे, असें सांगितलें. तेव्हां इंद्रानें यास ब्रह्मविद्या देऊन कृतार्थ केलें. हा दाशरथि रामाचा परम मित्र होता.

**प्रताप**-जयद्रथाचा एक मित्र राजा.

**प्रति**-सोमवंशीय आयुकुलांतील कुश राजाचा पुत्र. याचा पुत्र संजय. [९,१७,१६]

**प्रतिबाहु**-श्वफल्क व गांदिनी यांचा एक पुत्र. अक्रूराचा भाऊ. [९,२४,१७]

( २ ) कृष्णाचा प्रपौत्र. सुबाहूचा पिता.

**प्रतिभानु**-श्रीकृष्ण व सत्यभामा यांचा एक पुत्र. [ १०, ६१, ११ ]

**प्रतिमत्स्य**-भारतवर्षीय एक देश.

**प्रतिरूपा**-आग्नीध्रपुत्र किंपुरुषाची पत्नी, व मेरूची कन्या. [ ५, २, २३ ].

**प्रतिविन्ध्य**-युधिष्ठिर व द्रौपदी यांचा पुत्र. [ ९, २२, २९ ] हा युद्धांत विंध्य-पर्वतासारखा निश्चल रहात असे. भारतीयुद्धांत याच्या रथाचे अश्व संपूर्ण शुभ्र असून त्यांचा कंठ निळा असे. हा शिबिरात निद्रिस्त असतां अश्वत्थाम्यानें यास मारिलें.

( २ ) शाकलदेशाधिपति दुर्योधन-पक्षीय एक राजा.

**प्रतिव्योम**-सूर्यवंशीय कुशकुलांतील वत्स-वृद्ध राजाचा पुत्र. याचा पुत्र भानु [ ९,१२,१० ]

**प्रतिश्रुत**-वसुदेव व शांतिदेवा यांचा एक पुत्र. [ ९, २४, ५० ]

**प्रतिष्ठान**-इलापुत्र पुरूरव्याची प्रयाग जव-ळची एक नगरी. [ ९, १, ४२ ]

( २ ) पैठणचें प्राचीन नांव.

**प्रतिहर्ता**-ऋषभदेववंशीय प्रतीह व सुवर्चला यांच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. हा यज्ञकर्मांत निपूण असे. याची पत्नी स्तुति. पुत्र अज व भूमा. [५,१५,५]

**प्रतीक**-नृगकुलांतील वसु राजाचा पुत्र. याचा मुलगा ओघवान् [ ९,२,१८ ]

**प्रतीकाश्व**-सूर्यवंशीय कुश कुलांतील भानु-मान् राजाचा पुत्र. याचा मुलगा सुप्रतीक. [ ९, १२, ११ ]

**प्रतीधक**-प्रदीपक राजाचें नामांतर.

**प्रतीप**-सोमवंशीय पुरुकुलांतील दिलीप राजाचा पुत्र. [ ९, २२, ११ ] संततीच्या इच्छेनें हा तप करीत असतां गंगा प्रत्यक्ष येऊन याच्या दक्षिणांकावर बसली. तें पाहून हा गंगेस म्हणाला, ‘ तूं माझी सून व्हावेंस ’ अशी माझी इच्छा आहे. तेव्हां गंगा ‘ तथास्तु ’ म्हणून निघून गेली, व हा घरीं आला. कांहीं कालानें यास देवापि, शंतनु आणि बाल्हीक असे तीन पुत्र झाले. त्यांत शंतनुवर याची अतिशय प्रीति होती. म्हणून यानें त्याला सांगून ठेविलें कीं, ‘ जी स्त्री तुला अरण्यांत वरील तिला नाहीं म्हणूं नको ’ पुढें शंतनूला गंगेनें वरिलें. [ भा आदि. ]

**प्रतीपक**-विदेहवंशीय मरु राजाचा पुत्र. याचा पुत्र कृतिरथ. [ ९, १३, १६]

**प्रतीह**-ऋषभदेववंशीय परमेष्ठीचा पुत्र. याच्या मातेच्या नांवाप्रमाणेंच याच्या स्त्रीचें नांवहि सुवर्चला होतें. यास प्रतिहर्ता, प्रस्तोता आणि उद्गाता असे तीन मुलगे होते. [ ५,१५,३ ].

**प्रतोष**–यज्ञ व दक्षिणा यांचा एक पुत्र ( तुषित शब्द पहा. ) [ ४,१,७ ].

**प्रत्यक्स्रोता**-भारतवर्षीय एक नदी.

**प्रत्यग्र**–सोमवंशीय पूरुकुलांतील उपरिचर-वसुराजाचा एक पुत्र. हा चेदिदेशाचा राजा होता. [ ९,२२,६ ].

**प्रत्यूष**–अष्टवसूंपैकीं एक.

**प्रत्यूह**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**प्रदीपक**–विदेहवंशीय मरुजनकाचा पुत्र. ( यास वा. रामायणांत प्रतींधक म्हटलें आहे. याचा पुत्र कृतिरथ. )

**प्रदोष**–उत्तानपादवंशीय पुष्पार्ण व दोषा यांचा ज्येष्ठ पुत्र [ ४,१३,१४ ].

**प्रद्युम्न**–चक्षु व नड्वला यांच्या बारा पुत्रांतील दहावा. [ ४,१३,१६ ] यास सुद्युम्न असें नांव होतें.

( २ ) श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा ज्येष्ठ पुत्र. हा पूर्वी शंकरानें दग्ध केलेल्या मदनाचा अवतार होय. याच्या हस्तें शंबरासुराचा वध होणार असें भविष्य वर्तविलें असल्यामुळें, याचें जन्म होतांच दहा दिवसांचे आंत शंबरासुरानें यास गुप्तपणें उचलून समुद्रांत टाकिलें. तेथें एका माशानें यास गिळिलें असतां पुढें तो मासा एका कोळ्यास जाळ्यांत सांपडला. कोळ्यानें तो मासा शंबरासुरास दिला शंबरासुरानें तो पाकशाळेंत पाठविला. पाकशाळेची व्यवस्था मायावतीकडे होती. ही मायावती म्हणजे मदनपत्नी रति होय. भविष्यवाणीस अनुसरून शंबरासुरवधार्थ येणाऱ्या मदनाच्या भेटीची इच्छा धरून ती तेथें येऊन राहिली होती, व पाकशाळेची व्यवस्था पहात असे. शंबरासुरानें दिलेला मासा चिरतांच त्यांतून एक सुंदर लहान बालक बाहेर पडलें. भविष्यवाणीप्रमाणें हा आपलाच पति हें मायावतीनें जाणलें, व तिनें त्याचें उत्तम संगोपन केलें. वयांत येतांच मायावतीनें यास पूर्ववृत्त सांगितलें. नंतर यानें शंबरासुराचा वध केला, व मायावतीसह द्वारकेंत आला. [ स्कं. १०, अ. ५५ ] याची पत्नी रुक्मीची कन्या रुक्मवती व पुत्र अनिरुद्ध [ १०, ६१,१८ ]. द्वारकेंत शाल्वाशीं युद्ध [ १०,७६,१३ ]. हा महारथी होता [ १०,९०,३३ ]. हा धनुर्विद्येंत अर्जुनाचा शिष्य होता. प्रभास क्षेत्रीं सर्व यादवासह मृत्यु. [ ११,१०,१६ ].

( ३ ) भगवंताच्या चतुर्मूर्तीपैकीं एक.

**प्रद्योत**–बृहद्रथवंशीय पुरंजयाचा वध करून शुनकानें राज्यावर बसविलेला प्रद्योतवंशांतील पहिला राजा. याचा पुत्र पालक. [ १२,१,३ ].

( २ ) उज्जनीचा राजा. याची कन्या वत्स राजास दिली होती.

**प्रद्योतन**–प्रद्योतवंशीय पांच राजे. यांनीं एकशेंअडतीस वर्षे राज्य केलें. [ १,२१,४ ].

**प्रद्वेशी**–दीर्घतमा ऋषीची स्त्री. आपला पति अंध असल्यामुळें ही पुनर्विवाह करणार होती, पण ऋषीनें शाप दिल्यामुळें तिची इच्छा अपूर्ण राहिली.

**प्रधान**–प्रकृतीचें नामांतर. [ ३,२६,१० ].
( २ ) एक राजर्षि. याची कन्या सुलभा ती ब्रह्मनिष्ठ होती.

**प्रपतन**–प्रयागांतील एक तीर्थ.

**प्रबल**–विष्णूचा एक पार्षद. [ ८,२१,१६ ].
( २ ) श्रीकृष्ण व लक्ष्मणा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१५ ].

**प्रबालक**–एक किन्नर.

**प्रबुद्ध**–ऋषभदेवाच्या नऊ सिद्ध पुत्रांतील एक. यानें निमीला उपदेश केला. [ ५,४,११ व ११,३,१८ ].

**प्रभ**–रामसेनेंतील एक वानर.

**प्रभंजन**–वायूचें नांव.
( २ ) मणिपूरचा राजा. यास रुद्राचें असें वरप्रदान होतें कीं, तुझ्या वंशांत एकच अपत्य होऊन ते राज्य चालवीत जाईल. त्या नियमाप्रमाणें याच्या वंशांत चित्रांगदापर्यंत राजे झाले, परंतु त्यास मुलगा न होतां, चित्रांगदा नांवाची मुलगी झाली. ती पुत्रिका धर्मानें अर्जुनास देऊन तिचा पुत्र बभ्रुवाहन हा चित्रांगदानें घेतला व त्यास मणिपूरचें राज्य दिलें.

**प्रभद्रक**-भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजे.

**प्रभद्रा**–कर्णपुत्र वृषकेतूची स्त्री. हिला भद्रावती असेंहि म्हणतात. ( जै. अश्व. )

**प्रभव**-बारा भार्गवदेवांतील एक.

**प्रभा**-उत्तानपादवंशीय पुष्पार्णाच्या दोन स्त्रियांतील पहिली. [ ४,१३,१३ ].
( २ ) राहूची कन्या व विवस्वान आदित्याची पत्नी. ही अनपत्य होती.
( ३ )सूर्यवंशीय सगरपत्नी सुमतीचेंनांव.

**प्रभानु**–श्रीकृष्ण व सत्यभामा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१० ].

**प्रभावती**-स्वयंप्रभेस नामांतर. (भा. वन.)
( २ ) यौवनाश्व राजाची स्त्री.
( ३ ) हंसध्वजपुत्र सुधन्व्याची स्त्री.

**प्रभास**-द्वारकेजवळचें एक क्षेत्र. येथें अर्जुन त्रिदण्डी संन्यास घेऊन राहिला होता. [ १०,८६,२ ] सरस्वती नदीजवळील तीर्थ आणि क्षेत्र. येथें विदुर यात्रेला आला होता. यादवांचा संहार येथेंच झाला. [ ३,१,२० व ११,३०,६ ].
( २ ) अष्टवसूं पैकीं एक. याची पत्नी आंगिरसी व मुलगा विश्वकर्मा.

**प्रभु**-भगनामक सहावा आदित्य व सिद्धि यांचा एक पुत्र. [६,१८,२]
( २ ) साध्य देवांपैकीं एक.
( ३ ) ब्रह्मसभेंतील एक ऋषि.

**प्रमतक**–जनमेजयसर्पसत्रांतील सभासद.

**प्रमति**-सूर्यवंशी दिष्टकुलांतील प्रांशूचा पुत्र. याचा पुत्र खनित्र [९,२,२४].
( २ ) वागींद्राचा पुत्र. याला घृताची अप्सरेपासून रुरु पुत्र झाला.
( ३ ) चाक्षुषमन्वंतराच्या शेवटल्या कलियुगांत झालेला विष्णूचा अवतार ( मत्स्य. अ १४३ )
( ४ ) बिभीषणाच्या चार अमात्यांपैकीं एक. ( वा. रा. युद्ध. )

**प्रमथ**–रुद्रगण. [ १०,६३,१० ]

**प्रमद**–वसिष्ठपुत्र, व उत्तम मन्वंतरांतील सप्तर्षी पैकीं एक [ ८,१,२४ ]

**प्रमद्वरा**–विश्वावसु गंधर्व व मेनका यांची कन्या. हिचें स्थूलकेश ऋषीनें पालन केलें. रुरुऋषीची पत्नी.

**प्रमन्थु**-ऋषभदेववंशीय वीरव्रत व भोजा यांचा कनिष्ठ पुत्र. [ ५,१५,१५ ]

**प्रमाणकोटी**-भागिरथीसंबंधी तीर्थ. यांत कौरवांनीं भीमास विष चारून बुडविलें होतें.

**प्रमाथ-थि**-दूषण राक्षसाचा एक अमात्य. यास रामानें मारिलें.

( २ ) रामसेनेंतील एक वानर.

**प्रमाथि**-विश्रवा ऋषि व बलाका राक्षसी यांचा मुलगा. दूषणाचा भाऊ. यास नील वानरानें मारिलें (भा.व.)

**प्रमाथिनी**-एक अप्सरा.

**प्रमीला**-स्त्रीराज्याची (भूतान) स्वामिनी. हिनें पांडवांचा यज्ञिय श्यामकर्ण-अश्व धरून अर्जुनाशीं युद्ध केलें, त्यांत अर्जुनानें हिला जिंकून हिच्याशीं विवाह केला. ( जै. अश्व.)

**प्रमुचि**-दाशरथि रामास भेटण्याकरितां अयोध्येस आलेला एक ऋषि (वा. रा)

**प्रमृत**-कृषिकृत उपजीविका [७,११,१८ ]

**प्रमोद**-सूर्यवंशीय दढाश्वाचा एक पुत्र.

**प्रमोदन**-एक ब्रह्मर्षि.

**प्रम्लोचा**-कण्डुऋषीच्या तपोनाशार्थ इंद्रानें पाठविलेली अप्सरा. हिचीच कन्या वृक्षांनीं संरक्षण करून ती प्रचेतसांना दिली होती. [ ४,३०,१३].

( २ ) श्रावणमासीं इंद्रनामक सूर्याबरोबर फिरणारी अप्सरा [ १२,११,३७ ].

**प्रयाग**-संयुक्त प्रांतातील एक क्षेत्र. येथे गंगा यमुना व सरस्वति या तीन नद्यांचा संगम झाला आहे. येथील मुख्य तीर्थें त्रिवेणि माधव, सोमेश्वर, भारद्वाजेश्वर, वासुकीश्वर, अक्षय्यवर, शेष, प्रयाग, वेणीमाधव, भागीरथी, सरस्वती, यमुना. या क्षेत्रीं सर्वांनीं क्षौर करावें असा प्रघात आहे. या क्षेत्राला तीर्थराज म्हणतात. बलराम तीर्थ-यात्रेचे वेळीं येथें आला होता. [ ७,१४,३० व १०,७९,१० ]

**प्रयुत**-मुनीच्या देवगंधर्व पुत्रांतील एक.

**प्ररुज**-रावणपक्षीय राक्षस. ( भा. वन. )

**प्रलंब**-कंसपक्षीय एक असुर. हा कपट-वेषाने गोपांत खेळतांना बलरामास घेऊन पळूं लागला असतां बलरामानें यास मारिलें.[१०,१८,३०].

**प्रलंबदेश**-भारतवर्षीय एक देश.

**प्रलंबायन**-वसिष्ठकुलांतील ब्रह्मर्षि.

**प्रवरा** एक नदी

**प्रवर्षण** द्वारकेजवळचा एक पर्वत. जरासंधाच्या भीतीनें रामकृष्ण यावर लपून राहिले असता, त्यानें या पर्वतास अग्नि लाविला. [ १०,५२,१० ]

( २ ) किष्किंधेजवळच्या माल्यवान पर्वतास नांव.

**प्रवहण**-उत्तम मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

**प्रवीर**-पुरुकुलांतील प्रचिन्वान राजाचा पुत्र. याचा पुत्र नमस्यु. [९,२०,२].

( २ ) हरिश्चंद्र राजास विकत घेणारा काशींतील चांडाळ. याला वीरबाहु असेंहि प्रसिद्ध नाव होतें.

( ३ ) नीलध्वज राजाचा पुत्र.

**प्रवीरक**-कलियुगांत मौन घराण्यांतील राजे नष्ट झाल्यावर किलकिला नगरींत झालेला एक राजा [१२,१,३३].

**प्रवेणी**-काम्यकवनाच्या दाक्षिणेस कण्वाश्रमासमीपची नदी.

**प्रशमी**–एक अप्सरा.

**प्रशस्ता**–भारतवर्षीय एक नदी.

**प्रश्न**–अथर्वण वेदोपनिषत.

**प्रश्रय**–स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषी व ह्री यांचा पुत्र. [ ४,१,५२ ].

**प्रश्रवण**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**प्रश्रुत**–प्रसुश्रुत राजाचें नामांतर.

**प्रसन्न**–सूर्यवंशीय सेनजित राजाचें नामांतर.

**प्रसभ**–रामसेनेंतील एक वानर.

**प्रसाद्**–स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषि व मैत्री यांचा पुत्र. [४,१,५०].

**प्रसुश्रुत**–सूर्यवंशीय रामपुत्र कुश-कुलांतील मरु राजाचा पुत्र. यालाच प्रश्रुत असें नामांतर होतें. याचा पुत्र सन्धि. [ ९, १२, ७ ]

**प्रसूति**–स्वायंभु मनूच्या तीन कन्येंतील एक. दक्षप्रजापतीची पत्नी. [ ३, १२, ५४ व ४, १, १, ]

**प्रसृति**–स्वारोचिष मनूच्या पुत्रांतील एक.

**प्रसेन**–यदुकुलांतील निम्नाचा मुलगा. सत्राजिताचा कनिष्ठ भाऊ. स्यमंतकमणि धारण करून हा शिकारीस गेला असतां यास सिंहानें मारिलें. [ ९, २४, १३ व १०, ५६,१३ ]

( २ ) सात्यकीनें मारिलेला कर्णाचा एक पुत्र ( भा. कर्ण. )

**प्रसेनजित्**–सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील विश्वसाह्व राजाचा पुत्र. याचा पुत्र तक्षक. [ ९, १२, ८ ]

( २ ) रामपुत्र कुशकुलांतील लांगल राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षुद्रक. [ ९, १२, १४ ]

( ३ ) एक प्रख्यात राजर्षि.(भा. शांति)

( ४ ) जमदग्नीचा श्वशुर जो रेणु त्याचें नामांतर.

**प्रस्कण्व**–सोमवंशीय रौद्राश्वपुत्र ऋतेयु-कुलांतील मेधातिथीचा एक पुत्र. हे सर्व ब्राह्मण झाले [ ९, २०, ७ ]

**प्रस्ताव**–ऋषभदेववंशीय भूमा राजा व देवकुल्या यांचा पुत्र. याची पत्नी नियुत्सा व पुत्र विभु. [ ५,१५,६ ]

**प्रस्तोता**–ऋषभदेववंशीय प्रतीह व सुवर्चला यांचा द्वितीय पुत्र. [ ५,१५,५ ]

**प्रस्थल**–वाहीक देशांतील प्रांत. (वा.रा.)

**प्रस्रवण**-जनस्थानाच्या दक्षिणकडील पर्वत.

**प्रस्तुत**–गरुडानें मारिलेला एक दैत्य.

**प्रहरण**–श्रीकृष्ण व भद्रा यांचा पुत्र. [ १०, ६१, १७ ]

**प्रहस्त**–सुमाली राक्षस व केतुमती यांच्या दहा पुत्रांतील ज्येष्ठ. रावणाचा मामा. हा रावणाच्या एकूतीयांश सेनेचा सेनापति व मुख्य प्रधान होता. रामरावण युद्धांत पांचव्या दिवशीं नरांतक, कुंभहनु, महानाद आणि समुन्नत हे युद्धांत पडल्यावर नील वानराशीं युद्ध करीत असतां हा मृत झाला. [ ९, १० १८ ]

( २ ) विश्रवाऋषि व पुष्पोत्कटा यांचा एक पुत्र. रामरावणयुद्धांत मृत झाला.

**प्रहास**–वरुणाचा मंत्री. ( वा. रा. )

**प्रहेति**–वृत्रासुरानुयायी असुर.[६,१०,२०]

( २ ) वैशाख महिन्यांत अर्यमा सूर्याबरोबर फिरणारा राक्षस [ १२,११, ३४ ] याचा पुत्र ब्रह्मधाता, तो वरुणाचा सेवक.

**प्रहेति**–राक्षसांचा मूळ पुरुष. याचा कनिष्ठ भाऊ हेति. ( वा रा.)

**प्रऱ्हाद**–हिरण्यकशिपू व कयाधु यांच्या चार पुत्रांतील कनिष्ठ. हा गर्भांत असतांच नारदाच्या उपदेशानें भगवद्भक्त झाला होता. [ ६, १८, १३ व ७, ७, १६ ] भगवद्भक्तीमुळें हिरण्यकशिपूनें याचा छळ केला. [ ७, ५, १८ ] प्रऱ्हादाचा हिरण्यकशिपूशीं संवाद [ ७, ५, २३ ] प्रल्हादाचा मुलांना उपदेश. [ ७, ६, १ ते ३० ] प्रऱ्हादकृत नृसिंहस्तुति [ ७, ९, ८ ]. भगवंताचा प्रसाद [ ७, १०, १८ ]. याचा पुत्र विरोचन [ ६, १८, १६ ]. हा चालू मन्वंतरांतील दैत्य दानवांचा अधिपति. याला आयुष्मान्, शिबि, बाष्कल, कुंभ, निकुंभ इत्यादि पुत्र होते. अवधूतानें याला उपदेश केला [ १, ३ ११ ]. पृथ्वी दोहनाचे वेळीं दैत्यानीं यास वत्स केलें. [ ४,१८,१६ ]. हा हरिवर्षांत नरसिंहाची उपासना करतो [५,१८,७]. हा महाभागवत होता [ ६,३,२० ]. आजगरमुनीशीं संवाद [७,१३,११]. बलीयज्ञांत वामनाची स्तुति [८,२३,६]

**प्रल्हाद**–भारतवर्षीय एक देश.

**प्राक्शृंगावान्**–गालव वंशांतील ऋषि.

**प्रागाथ**-अंगिरा कुळांतील एक ब्रह्मर्षि.

**प्राग्ज्योतिष**–शाकल देशाच्या उत्तरेस असलेला एक देश व नगर. पाण्डवांच्या वेळीं येथें नरकासुराचा पुत्र भगदत्त राजा होता. [ १०, ५९,२ ] ( असामप्रांताजवळील एक देश. )

( २ ) मद्रदेशाधिपति शल्य राजा, व त्याचें नगर.

**प्राग्रायण**–कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**प्राग्वटपूर**–कुटिकोष्टिका नदीजवळचें नगर.

**प्राग्वंश**–( यज्ञमंडपाचें पूर्वपश्चिम आढें ) [ ४,५,१४ ]

**प्राचीतत्**–सोमवंशीय जनमेजयपुत्र प्रचिन्वानाचें नामांतर.

**प्राचीनगर्भ** सारस्वत ऋषीस नामांतर.

**प्राचीनबर्हि**–पृथुपुत्र विजिताश्व, त्याच्या हविर्धान नामक पुत्राला हविर्धानीपासून झालेल्या पुत्रांतील ज्येष्ठ. याचें नांव बर्हिषद. यानें एकामागून एक केलेल्या यज्ञांतील पूर्वाग्र दर्भांनीं पृथ्वी व्याप्त झाल्यामुळें यास प्राचीनबर्हि असें नांव मिळालें. याची स्त्री समुद्रकन्या शतद्रुति अथवा सवर्णा व पुत्र प्रचेतस. [ ४, २४,८ ते १३ ] नारदाचा उपदेश. [ ४, २५, ३ ]

( २ ) स्वायंभुवमन्वंतरांतील एक राजा. दक्षयज्ञांत सतीच्या देहत्याग समयीं हा भरतखण्डाचा राजा होता.

**प्राचेतस**-वाल्मीकीचें नांव. [९,११,१०]

( २ ) सोमवंशीय द्रुह्युकुलांतील प्रचेता राजाचे शंभर पुत्र. हे उत्तरेकडे म्लेच्छांचे अधिपति झाले. [९,२३,१५]

**प्राचेतसदक्ष**–प्राचीनबर्हीचे प्रचेता संज्ञक दहा पुत्र, व वृक्षकन्या वार्क्षी यांचा पुत्र. यास साठ कन्या होत्या. [ ६,४,१७ ] ( दक्ष शब्द पहा )

**प्राचेता**-भृगुकुळांतील ब्रह्मर्षि.

**प्राचेय**-कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**प्राज्ञ**-सोमवंशीय अजमीढ पुत्र बृहदिषूच्या वंशांतील रुचिराश्वाचा पुत्र. याचा पुत्र पृथुसेन. [ ९,२१,२४ ]

**प्राण**—स्वायंभुव मन्वंतरांतील भृगुपुत्र विधाता व नियति यांचा पुत्र. याचा पुत्र वेदशिरा. [ ४,१,४४ ]

( २ ) अष्टवसूंपैकीं दुसरा. [ ६,६,११]

( ३ ) स्वारोचिष मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

( ४ ) चालू मन्वंतरांतील आंगिरस देवांपैकीं एक.

( ५ ) साध्य देवांपैकीं एक.

( ६ ) शरीरांतील प्राणांपैकीं पहिला.

**प्राणरोध**--कुत्रें व गाढवें पाळणारा ब्राह्मण आणि विनाकारण प्राणिहिंसा करणारे यांस प्राप्त होणारा नरक [५,२६,२४]

**प्राणाग्निहोत्र**—यजुर्वेदोपनिषत्.

**प्रातः**-प्रातःकाल. [ १,३,२९ ]

( २ ) उत्तानपादवंशीय पुष्पार्ण व प्रभा यांचा ज्येष्ठ पुत्र. [४,१३,१३]

( ३ ) धाता नामक सातवा आदित्य व राका यांचा पुत्र. [ ६,१८,३ ]

**प्रातिकामि**-दुर्योधनाचा सारथि. हा द्रौपदीला सभेंत आणण्याकरितां गेला होता

**प्रातीप**-प्रतीप राजाचे पुत्र. देवापि, शंतनु, आणि बाल्हीक यांस नांव.

**प्राद्युम्नि**—प्रद्युम्नपुत्र अनिरुद्ध.

**प्राधा**-चालू मन्वंतरांतील कश्यप ऋषीची एक पत्नी. हिच्यापासून अप्सरा व गंधर्व यांची उत्पत्ति झाली. त्यांतील अप्सरांचीं नांवें-अनवद्या, मनु, वंशा, असुरा, मार्गणप्रिया, अरूपा, सुभगा, भासी, अलंबुषा, मिश्रकेशी, विद्युत्पर्णा, तिलोत्तमा, अरुणा, रक्षिता, रंभा, मनोरमा, केशिनी, सुबाहु, सुरता, सुरजा, सुप्रिया, उर्वशी, पूर्वचित्ति, सहजन्या, मेनका, विश्वाचि घृताची, अनुचाना, शुचिस्मिता आणि चारुनेत्रा. गंधर्वांचीं नांवें— ( देवगंधर्व शब्द पहा. )

**प्राप्ति**-जरासंधाची कन्या व कंसाची पत्नी. [ १०,५०,१ ]

( २ ) धर्मपुत्र शमाची स्त्री.

**प्रावहि**—अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**प्रावारकर्ण**-हिमवान पर्वतावर राहणारा उलूक. ( इंद्रद्युम्न शब्द पहा. )

**प्रावृषदेश**—एक देश.

**प्राविपि**—अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**प्रांशु**-दिष्टकुलांतील वत्सप्रीति राजाचा पुत्र. याचा पुत्र प्रमिति. [ ९,२,२४ ].

**प्रियमेध**-सोमवंशीय पूरुकुलांतील अजमीढाच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. हा व याची संतति तपानें ब्राह्मण झाली. [ ९,२१,२१ ]

**प्रियमेलक**-एक देश व क्षेत्र.

**प्रियव्रत**—स्वायंभुव मनु व शतरूपा अथवा अनंती यांच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. उत्तानपाद राजाचा ज्येष्ठ भ्राता. [ ३,१२,५४ व ४,८,७ ] विश्वकर्मा पजापतीची कन्या बर्हिष्मती ही याची पत्नी. आग्नीध्र, इध्मजिव्ह, यज्ञबाहु, महावीर, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, सवन, मेधातिथि, वीतिहोत्र आणि कवि, असे दहा पुत्र व ऊर्जस्वती कन्या अशी यास संतती होती, ह्यांपैकीं कवि

महावीर व सवन यांनीं परमहंस दीक्षेचा स्वीकार केला. दुसऱ्या पत्नीपासून यास उत्तम, तामस आणि रैवत असे तीन पुत्र होते. ते मन्वंतराधिपति झाले. यानें अकरा अर्बुदें वर्षे राज्य केलें. ( १० कोटी वर्षे म्हणजे एक अर्बुद ) हा महापराक्रमी होता. सूर्यप्रकाश एके बाजूस असतो, आणि दुसरे बाजूस अंधार असतो म्हणून हा तेजस्वी रथांत बसून सूर्याचे मागून सात वेळ फिरला, व पृथ्वीवर सर्वत्र सारखा प्रकाश केला. याच्या रथचक्राच्या वेगानें जे खाडे पडले ते सात समुद्र झाले व त्यापासून जंबू, प्लक्ष, शाल्मली, कुश, क्रौंच, शाक आणि पुष्कर अशीं सात द्वीपें झालीं. या सात द्वीपांचें आधिपत्य यानें आपल्या सात पुत्रांस दिलें, व आपली ऊर्जस्वती कन्या शुक्राचार्याला देऊन नारदाच्या उपदेशाप्रमाणें हा मोक्षाला गेला. [ ५,१,२४–४० ]

**प्रोषकदेश**-एक देश. ( भा. भीष्म )

**प्रौष्ठपद**—कुबेराचा धनाध्यक्ष व मंत्री.

**प्रौष्ठपदी**-भाद्रपद पौर्णिमा. [१२,१३,१३]

**प्लक्षद्वीप**-पृथ्वीच्या सप्तमहाद्वीपांतील दुसरें हें क्षारसमुद्राच्या बाह्यप्रदेशीं मेरूच्या भोंवतीं वलयाकार असून याची रुंदी दोन लक्ष योजनें आहे; व तितक्याच रुंदीचें यास इक्षुरसाच्या समुद्राचें वेष्टण आहे. प्रियव्रतपुत्र जो इध्माजिव्ह तो याचा अधिपति. यानें या द्वीपाचे सात भाग करून ते आपल्या सात पुत्रांस दिले. या द्वीपांत मणिकूट, वज्रकूट, इंद्रसेन, ज्योतिष्मान, सुपर्ण, हिरण्यष्ठीव, आणि मेघमाल असे सात महापर्वत असून, अरुणा, नृम्णा, आंगिरसी, सावित्री, सुप्रभाता, ऋतंभरा आणि सत्यंभरा अशा सात नद्या आहेत. यांत प्लक्ष ( पायरी ) वृक्ष सुवर्णाचा अकराशें योजनें विस्ताराचा असल्यामुळें या द्वीपास हें नांव मिळालें आहे. यांतील लोकांना सहस्रवर्षे आयुष्य असून हंस, पतंग, ऊर्ध्वायन आणि सत्यांग असे त्यांचे चार भेद आहेत. ते वेदत्रयात्मक विद्येनें नारायणउपासना करितात. [५,२०,२–५]

**प्लक्षादेवी**-भारतवर्षीय एक नदी.

**प्लक्षावतरण**—यमुनानदीसंबंधी एक तीर्थ. ( भा. वन. ) हें कुरुक्षेत्राचें द्वार मानिलें आहे. यास स्वर्गद्वार असेंही म्हणतात. येथें मरुत्त राजानें यज्ञ केले होते.

**प्लवंग**-रामसेनेंतील वानर. ( वा.रा.उत्तर.)

## फ

**फलकक्ष**-एक यक्ष.

**फलकीवन**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**फलाहार**-अंगिराकुलांतील एक ब्रम्हर्षि.

**फलोदक**-एक यक्ष.

**फल्गु**-एक नदी. हिचा प्रवाह भूमींतून आहे. गयाक्षेत्र हिचे कांठावर आहे. एक तीर्थ. [ ७,१४,३१ ].

**फाल्गुन**-अर्जुन [१,७,२९व१०,८९,४३]
( २) दाक्षिणेकडील तीर्थ.[१०,७९,१८]

**फाल्गुनि**-अर्जुनाचे अभिमन्यु इत्यादि पुत्र.

## फे

**फेनप**-भृगुकुलांतील एक ब्रम्हर्षि.

( २ ) रसातलांतील एक ब्रम्हर्षि.

## ब

**बक**-कंसपक्षीयराक्षस. श्रीकृष्णनाशाकरितां बकवेषानें हा वृंदावनांत गेला असतां कृष्णानें यास मारिलें.[१०,११,४८]

( २ ) एकचक्रानगराजवळील वेताच्या वनांत रहाणारा असूर. हा जटासुराचा पुत्र. ह्या राक्षसापासून पीडा होऊं नये म्हणून त्या नगरींतील प्रत्येक कुटुंबान आपल्या पाळीप्रमाणें या राक्षसास गाडाभर अन्न व एक मनुष्य यावा, असा नियम केला होता. लाक्षागृहांतून निघाल्यानंतर पांडव या नगरींत ज्या एका ब्राम्हणाचे घरीं उतरले होते त्या ब्राम्हणाचे कुटुंबावरच त्या दिवसाची पाळी आली असतां, भीमानें अन्नाच्या गाड्याबरोबर ह्या बकराक्षसाकडे जाण्याचें कबूल केलें, आणि याचा नाश केला. [ भा. आ. अ. १६६ ]

**बकदाल्भ्य**-एक ऋषि. चिरंजीवी जीवांना कोणकोणतीं दुःखें असतात याविषयीं याचा इंद्राशीं संवाद झाला होता. ( भा. वन. ) पाण्डवांचा अश्वमेधाचा अश्व फिरत फिरत याच्या आश्रमाजवळ आला असतां, अर्जुनास याचें दर्शन झालें. डोक्यावर एक वटपत्र घेऊन बसलेली अशी ही ऋषीची मूर्ति अवलोकन करून ' आपण आश्रम कां बांधीत नाहीं ' असा अर्जुनानें यास प्रश्न केला. तेव्हां ' आयुष्य क्षणभंगुर आहे ' असें यांनीं त्यास उत्तर दिलें. साहजिक अर्जुनास जिज्ञासा उत्पन्न होऊन त्यानें प्रश्न केला कीं, अशा स्थितींत आपण येथें किती वर्षें आहांत ? तेव्हां ऋषि म्हणाला, मीं ब्रम्हदेवाचीं वीस अहोरात्रेंच पाहिलीं आहेत. ऋषीचें उत्तर ऐकून कृष्णार्जुन आश्चर्ययुक्त झाले. त्यांनीं या ऋषीस साष्टांग नमस्कार केला, आणि सादर शिबिकेत बसवून यास यज्ञसमारंभाकरितां हस्तिनापुरीं पाठविलें.

**बकनख**-विश्वमित्राचा एक पुत्र.

**बकी**-पूतना राक्षसी.

**बदरिकाश्रम**-हिमालयांतील एक स्थळ. हरिद्वारापासून पन्नास मैलावर. येथें बदरिवृक्ष अनेक असून त्यांचीं फळें मोठीं व रुचिकर असतात. नरनारायणांचें आश्रमस्थान. येथें अनेक राजे व ऋषि तपश्चर्येला गेले होते. [ ३,४,२१-९,३,३६-११,४,७ ]

**बदरीपाचन**-एक तीर्थ. येथें श्रुतावती नामक ऋषिकन्येनें इंद्र पति मिळावा म्हणून तप केलें.

**बन्दी**-वरुणाचा पुत्र. यानें ऐंद्र्युन्मि जनकाच्या वेळेस पुष्कळ ब्राम्हणांस वादात जिंकून समुद्रात बुडविलें, व वरुणाच्या यज्ञास पाठविलें. शेवटीं याचा पराभव अष्टावक्रानें केला.

**बन्धु**-दिष्टकुलांतील वेगवान् राजाचा पुत्र. याचा पुत्र तृणबिन्दु [ ९,२,३० ].

**बन्धुमान्**-सूर्यवंशीय दिष्टकुलांतील केवल राजाचा पुत्र. याचा पुत्र वेगवान्. [ ९,२,३० ].

**बभ्रु**–आयुकुलांतील ययातिपुत्र द्रुह्यूचा पुत्र. याचा पुत्र सेतु. [ ९,२३,१४ ].

( २ ) सोमवंशीय यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या कुलांतील रोमपाद राजाचा पुत्र. याचा पुत्र कृति.[ ९,२४,२ ].

( ३ ) सोमवंशीय सात्वत कुलांतील देवावृधाचा पुत्र. हे पिता–पुत्र मोठे प्रसिद्ध होते. बभ्रु सर्व मनुष्यांत श्रेष्ठ असून देवावृध देवासारखा होता. यांच्या उपदेशानें सहा हजार च्यहात्तर पुरुष मुक्त झाले. [ ९,२४,९–१० ]

( ४ ) कश्यपकुलांतील संपातीचा पुत्र.

( ५ ) विश्वामित्राचा एक पुत्र. याचे वंशज बाभ्रव्य नांवानें प्रसिद्ध आहेत.

( ६ ) कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( ७ ) ऋषभ पर्वतावर राहणारा गंधर्व.

( ८ ) एक यादव. याची स्त्री शिशुपालाने हरण केली होती.

**बभ्रुवाहन**–मणिपूरचा राजा. चित्रांगदा व अर्जुन याचा पुत्र. पांडवांचा अश्वमेधीय अश्व याचे नगराजवळ आला असतां यानें तो धरिला, परंतु अर्जुन आपला पिता आहे असें समजल्यावरून हा अश्वासह अर्जुनास शरण आला. परंतु याची ही कृति क्षात्रधर्माविरुद्ध वाटून अर्जुनानें याचा धिक्कार केला. पित्याने केलेला अपमान असह्य होऊन यानें पांडवसैन्याबरोबर निकारानें युद्ध केलें, आणि अनेक महारथ्यांचा पराभव करून कर्णपुत्र वृषकेतूसह पार्थास ठार केलें; आणि जयजयकार करीत नगरांत प्रवेश केला. अर्जुनाची मृत्यूची वार्ता ऐकतांच याची माता चित्रांगदा व सापत्न माता उलूपी शोकाकुल झाल्या, आणि पितृवध केल्याबद्दल त्यांनीं यास दोष दिला. मातेचें दुःख पाहून हा अग्निप्रवेश करण्यास सिद्ध झाला. परंतु नागकन्या उलूपीने यास आत्महत्येपासून परावृत्त केलें आणि पुंडरीक नांवाच्या एका नागाजवळ खुणेकरितां आपल्या कंठांतील सूत्र देऊन त्यास पाताळांत संजीवनीमणी आणण्याकरितां शेषाकडे पाठविलें. परंतु मृत्युलोकांत मणी पाठवितां येत नाहीं असें सांगून शेषानें त्यास परत पाठविलें. मणी घेतल्यावांचून पुंडरीक परत आलेला पाहतांच मातेची आज्ञा घेऊन हा पाताळांत गेला, आणि नागांचा पराभव करून मणी घेऊन आला. परंतु धृतराष्ट्र नांवाच्या एका नागानें दुःस्वभाव व दुर्बुद्धि या मंत्र्यांच्या सहाय्यानें मत्सरभावनेनें अर्जुनाचें शीर लपवून ठेवलें. शिरावाचून अर्जुन कसा उठणार ? अशा विवंचनेंत सर्व मंडळी पडली. इतक्यांत हस्तिनापुरीं कुंतीला दुष्ट स्वप्न पडल्यामुळें श्रीकृष्णासह कुंती, भीम, देवकी, वगैरे तेथें प्राप्त झालीं, आणि एकंदर प्रकार पाहून दुःखमग्न झालीं. नंतर श्रीकृष्णानें आपल्या सुकृताची प्रतिज्ञा करून अर्जुनाचें शीर येवो, असें म्हणतांच शीर पुढें येऊन पडलें. नंतर संजीवनी मणिप्रभावानें

सर्वांस सजीव केलें. पितापुत्रांनीं परस्परांस आलिंगन दिलें. नंतर सवास पांच दिवस तेथें ठेवून घेऊन यानें सर्वत्र आनंदोत्सव केला आणि अर्जुनाबरोबर अश्वसंरक्षणाकरितां निघाला. ( जै.अश्व ) (भा अश्व.)

**बर्बर**- एक देश व त्यांतील लोक. [९,८,५]

**बर्हणाश्व**-सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील निकुम्भाचा पुत्र. याचा पुत्र कृशाश्व [ ९, ६,२५ ]

( २ ) सूर्यवंशीय संहताश्वाचा पुत्र.

**बर्हि**—सूर्यवंशीय अन्तरिक्षाच्या कुलांतील बृहद्राज अथवा बृहत् राजाचा पुत्र. याचा पुत्र कृतंजय. [९, १२, १३]

**बर्हिकेतु**—मयूरध्वज राजास नामांतर.

**बर्हियोग**-कश्यप कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बर्हिषद**—स्वायंभु मन्वंतरांतील पितर विशेष. हे अत्रि ऋषीचे पुत्र असून विभ्राज लोकांत राहतात. दैत्य, दानव, गंधर्व इत्यादि यांस पूज्य मानतात. नांदीश्राद्धांत यांचे प्राधान्य असतें. सौम्य, देव आणि आर्तव असे यांचे तीन भेद आहेत. यांची पत्नी दक्षकन्या स्वधा. [ ४, १, ६३ ] ( मत्स्य अ. १४० )

( २ ) हविर्धान व हविर्धानी यांचा पुत्र. यांस प्राचीनबर्हि असेंहि म्हणतात. [ ४,२४,८–१० ]

( ३ ) एक ब्रह्मर्षि. ( भा. शांति. )

**बर्हिष्मती**—भारतवर्षांतील भरतखण्डांतील ब्रह्मावर्त देशाची राजधानी. येथें स्वायंभू मनु रहात असे. बर्हि ह्मणजे दर्भ. आदिवराहाचे केंस गळून त्याचे दर्भ जेथें झाले, त्याठिकाणीं ही नगरी वसविली, म्हणून तिला बर्हिष्मती असें नांव मिळालें. येथें मनूनें व अन्य ऋषींनीं अनेक यज्ञ केले होते. [ ३,२२,२८ ].

( २ ) स्वायंभुव मनूचा ज्येष्ठ पुत्र प्रियव्रत, त्याची स्त्री. ही त्याच मन्वंतरांतील विश्वकर्मा प्रजापतीची कन्या. [ ५,१,२४ ]

**बर्हिसादि**—अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बल**—सामर्थ्य. [ १,१६,२७ ]

( २ ) अतलामध्यें राहणारा मयासुराचा पुत्र. यानें पूर्वी शहाण्णव माया निर्माण केल्या. त्यापैकीं कांहींचा उपयोग मायावी दैत्य करितात. याच्या जांभईपासून स्वैरिणी, कामिनी आणि पुंश्चली अशा दु:शील स्त्रिया उत्पन्न झाल्या [ ५,२४,१६ ].

( ३ ) विष्णूचा एक पार्षद [ ८,२१,१६ ].

( ४ ) सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील पारियात्र राजाचा पुत्र. याचा पुत्र स्थल. [ ९,१२,२ ].

( ५ ) ( बलराम ) वसुदेव व रोहिणी यांचा ज्येष्ठ पुत्र. [ ९,२४,४६ ].

( ६ ) श्रीकृष्ण व लक्ष्मणा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१५ ].

( ७ ) इंद्रानें मारिलेला दनायूच्या पुत्रांतील एक असुर.

( ८ ) कुंभकर्णानें भक्षिलेला रामसेनेंतील एक वानर ( भा. वन. अ.२८७)

( ९ ) वरुण व ज्येष्ठा यांचा पुत्र.

( १० ) सूर्यवंशीय परीक्षित व सुशोभना यांचा एक पुत्र.

**बलदेव**-बलराम. [ १०,२४,१ ].

**बलभद्र**-शाकद्वीपांतील एक पर्वत. [ ५,२०,२६ ].

( २ ) बलराम. [ १०,४४,२४ ].

**बलराम**-सोमवंशीय यदुकुलांतील वसुदेव व रोहिणी यांचा ज्येष्ठ पुत्र [९,२४,४६] हा शेषांशानें जन्मला होता. प्रथम देवकीच्या उदरांत प्रवेशून नंतर हा रोहिणीच्या उदरांत गेला होता. [ १०,२,८ ]. श्रीकृष्णाचा ज्येष्ठ बन्धु. यास बलराम, संकर्षण, इत्यादि नांवें होतीं. याचें बालपण गोकुलांत गेलें, व तेथें अनेक असुरांचा यानें नाश केला. श्रीकृष्णाबरोबर कंस नाशाचे वेळीं मथुरेंत गमन. मुष्टिकादिकांचा नाश. व्रतबंध व सांदिपिनी गुरूकडे अध्ययनार्थ प्रयाण. जरासंधाचा सतरा वेळां पराभव. [ १०, ५२, ३२-४२ ] आनर्त देशाधिपति रेवत राजाची कन्या रेवती ही याची पत्नी, व कन्या वत्सला. ती अभिमन्यूला दिली होती. ( जै. भा. वन. ) गदायुद्धांत हा मोठा प्रवीण असून भीम व दुर्योधन हे याचे शिष्य होते. नंदयशोदेला भेटण्यासाठीं गोकुळीं गमन. तेथें क्रीडा व यमुनेचा निग्रह [१०,६५, २३ ] सांब विवाहप्रसंगानें हस्तिनापुराचें नांगरानें आकर्षण. [ १०, ६८, ४१ ] भारतीयुद्धप्रसंगीं तीर्थ यात्रा. नैमिषारण्यांत प्रवेश. रोमहर्षण सूताचा वध व उग्रश्रवासौतीला वरप्रदान. [ १०, ७८, २० ते ३६ ] बल्वल दैत्याचा वध. ऋषीनीं केलेला सत्कार [ १०, ७९, ५ ते ९ ] तीर्थयात्रा कुरुक्षेत्रांत आगमन व उपदेश. [ १०. ७९, २३ ते २८] यादव शापानंतर योगानें पश्चिमसमुद्रतीरीं देहत्याग. [ ११, ३०, २६ ] बलराम स्वभावानें उदार व सरळ असे. पण परम क्रोधी होता. सर्व यादवांस याचा अत्यन्त धाक असे. यास अक्षविद्येचें व्यसन होतें. या अक्षक्रीडाप्रसंगींच अन्यायामुळें यानें कलिंग राजाचे दांत पाडले, व रुक्मीस ठार मारिलें. याची अंगकांति गौर होती. नीलांबर परिधान करणें यास आवडत असे. याला वारुणी मदिरा प्रिय होती. नांगर व मुसल हीं याचीं मुख्य आयुधें होत. यामुळें यास हली, सीरपाणि, हलायुध, मुसली इत्यादि नांवें असत.

**बलाक**-सोमवंशीय पुरूरवा पुत्र विजयाच्या कुलांतील जन्हुपुत्र पूरुचा मुलगा. याचा पुत्र अजक. [ ९,१५,३ ]

( २ ) गर्गकुलांतील एक ऋषि.

( ३ ) मातृ-पितृ-भक्त एक व्याध. हा रोज एक श्वापद मारून त्यांचें पोषण करीत असे. एके दिवशीं सायंकाळपर्यंत श्वापद मिळालें नाहीं, त्यानंतर जें मिळालें, तें अंध होतें. त्यास यानें घरीं आणलें. अंध श्वापद मारणें अधर्म होय; पण तें दुष्ट असल्यामुळें यास अधर्म घडला नाहीं. कृष्णार्जुन संवाद. (भा. कर्ण.)

**बलाकी**—धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक.

**बलानीक**—द्रुपद राजाचा अश्वत्थाम्यानें मारिलेला एक पुत्र. ( भा. द्रोण. )

**बलाहक**-कृष्णाच्या रथाच्या चार अश्वांपैकीं एक [ १०,५३,५ ].

( २ ) कद्रूपुत्र नागांतील एक.

( ३ ) प्रलय मेघांतील एक.

( ४ ) जयद्रथाच्या सहा भावांपैकीं एक.

**बलि**—प्रह्लादपुत्र विरोचन व देवी यांचा पुत्र. यास वैरोचनि असेंहि म्हणतात. याच्या स्त्रीला अशना, विंध्यावली, कोटरा अशीं नांवें आहेत. आणि तीं प्रायः एकीलाच असावी. याला बाण अथवा बाणासुर, धृतराष्ट्र, सूर्य, चंद्र, चंद्रांशुतापन, निकुंभनाभ गुर्वक्ष, कुक्षिभमि, बिभीषण इत्यादि शंभर पुत्र होते. [ ६,१८,१६—१७ ] ( दे भा. स्कं. ९ ) यानें सर्व देवांना जिंकलें होतें, म्हणून समुद्रमंथनाच्या वेळीं देवांनीं याच्याशीं सख्य करून याचें सहाय्य घेतलें. [ ८,६,२७ ] समुद्र मंथनानंतर देवांशीं युद्ध व पराभव [ ८,१०,१६ व ८,११,४६ ]. शुक्राचार्यांनीं केलेला विश्वजित यज्ञ व त्यापासून रथ, आयुधें इत्यादिकांची प्राप्ति. इंद्रलोकीं प्रयाण व स्वर्गलोकाची प्राप्ति. [ ८,१५,४, ते ३३ ] यानें इंद्र होण्यासाठीं चालु मन्वंतराच्या सातव्या पर्ययांत नर्मदातीरीं भृगुकच्छ ( भडोच ) क्षेत्रांत नव्याणव यज्ञ केले, व शंभरावा यज्ञ समाप्त होण्यापूर्वीं भगवान विष्णु वामनरूपानें तेथें आला. बली व वामन यांचा संवाद [ ८,१८,२३ ते ८,१९,२८ ] शुक्राचार्यांचा बलीला उपदेश. बलीचा निश्चय व त्रिपादभूमि दान [ ८,१९,३० ते ८,२०,१६ ]. वामनाचें विराट स्वरूप दर्शन व भूमिआक्रमण. [ ८,२०,२० ते ८,२१,९ ] गरुडाकडून वरुणपाशानें बंधन. भगवंताकडून धिःकार. तिसऱ्या पावलाकरितां मस्तक समर्पण. [ ८,२१,२६ ते ८,२२,२ ] भगवंताची स्तुति. वामनाकडून बलीचा सुतलांत प्रवेश. [ ८, २२, ३३ ] [ ५, २४, १८ ] हा सावर्णिमन्वंतरांत इंद्र होणार आहे. [ ८,१३,१२ ]

( २ ) सोमवंशीय अनुवंशांतील सुतपा राजाचा पुत्र. याची स्त्री सुदेष्णा. यानें दीर्घतमा ऋषीकडून आपल्या पत्नीचे ठिकाणीं अंग, वंग, कलिंग, सुह्म, पुण्ड्र, आणि आन्ध्र असे सहा पुत्र उत्पन्न करविले. [ ९,२३,४-५ ].

**बलिविन्ध**-रैवत मनूच्या पुत्रांतील एक. [ ८,५,२ ].

**बली**-कृतवर्माराजाचा पुत्र. रुक्मिणीची कन्या चारुमती याची पत्नी. [ १०,६१२.४ ].

( २ ) सुशर्मानामक काण्वराजाचा सेवक यानें सुशर्माचा वध करून आंध्रघराण्याची स्थापना केली. [ १२,१,२२ ].

( ३ ) बलिदैत्याचें नाव.

**बलीभद्र**—रुद्रगणांपैकीं एक.

**बलीमुख**—रामसेनेंतील एक वानर.

**बलेक्षु**- वसिष्ठकुलांतील ब्रह्मर्षि.

**बलोन्मत्त**—रुद्रगणांतील एक.

**बहुघ**- अज्ञातवासांत असतां भीमानें धारण केलेलें नांव. ( भा. विराट. )

**बहुधदेश**-भारतवर्षीय बहवांचा देश.

**बल्वल**-विप्रचित्ति दानवाचा पौत्र व इल्वलाचा पुत्र. हा नैमिषारण्यांतील ऋषीस पीडा देत असे. याचा वध बलरामानें केला. [ १०,७८,३८ ]

**बहिर्गिरि** ज्या देशांत अनेक पर्वत असतात तो अंतर्गिरि, व ज्या देशाला अनेक पर्वतांचें वेष्टण असतें तो बहिर्गिरी. हे दोन देश जवळ जवळ होते ( भा. सभा अ. २७ )

**बहुगव**-पूरुकुलांतील सुद्युराजाचा पुत्र. याचा पुत्र संयाति. [ ९, २०, ३ ]

**बहुगण**-एक गंधर्व.

**बहुदंष्ट्र**-रावणपक्षीय राक्षस. (वा. रा. सु.)

**बहुधान्यक**-कुरुभूमीच्या पश्चिमेकडील देश.

**बहुरथ**-सोमवंशीय पूरुकुलांतील द्विमीढवंशीय रिपुंजयाचा पुत्र. याचा पुत्र पुरुमीढ. [ ९,२१,३० ]

**बहुरूप**-प्रियव्रतपुत्र मेधातिथीचा सहावा पुत्र, व याचा वर्ष [ ५,२०,२५ ]

( २ ) शाकद्वीपांतील सहावा वर्ष.

( ३ ) एकादशरुद्रापैकीं एक. [६,६,१८]

**बहुल**- कद्रूपुत्र एक नाग.

**बहुलध्वज** तक्षध्वज राजाचा प्रधान.

**बहुला**-भारतवर्षीय नदी.

( २ ) कृत्तिका नक्षत्र.

**बहुलाश्व**—विदेहकुलांतील धृतीचा पुत्र. श्रीकृष्ण याला भेटण्याकरिता मिथिलेंत गेला होता. याचा पुत्र कृति. [ ९,१३,२६ व १०,८६,१६ ]

**बहुर्वानि**- अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बव्हृच**—ऋक्शाखाध्यायी ब्राह्मण व एक ऋग्वेदोपनिषत् [ १४,१ ]

**बव्हाशी**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

## बा

**बाण**-बाणासुर. बलिदैत्याच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ शोणितपुराचा राजा हा शिवभक्त असून त्याच्या गणांत प्रमुख होता शंकर स्वतः याच्या नगराचें रक्षण करितों. [ ६,८,१८] शंकराच प्रसादानें यास सहस्र भुजा प्राप्त झाल्या होत्या एकदा हा शंकराजवळ जाऊन त्यास म्हणाला, आपण मला सहस्र हात दिले, पण माझ्याशीं युद्ध कोणीच करीत नाहीं ! ह्या सहस्र भुजांच्या मदानें हा इतका गर्विष्ठ झाला कीं, आपणास जोडीदार योद्धा मिळावा म्हणून यानें प्रत्यक्ष शंकराला युद्धाचें आव्हान केलें तेव्हां शंकरानें ' तुझा दर्प हरण करणारा योद्धा, तुझा रथध्वज केाेसळून पडताच मिळेल ' असें सांगितलें [ १० ६२, २ ते १० ] पुढें उषा व अनिरुद्ध निमित्त झालल्या युद्धांत श्रीकृष्णानें याचे बाहु तोडून टाकले, पण शंकराच्या प्रार्थनेवरून चार हात अवशिष्ट राहिले. [ १०,६३, १२ ते ४९]

( २ ) एक दानव. याची स्त्री अनुपम्या हा त्रिपुर निर्माण करून अंतरिक्षांत रहात असे मयासुराच्या त्रिपुराहून हे त्रिपुर भिन्न होय ! (मत्स्य.)

( ३ ) दनुपुत्र एक दानव.

**बादरायण**–बदरीवनांत तप केल्यामुळें कृष्णद्वैपायन व्यासास मिळालेलें नांव. [ १,१,७ ] भीष्मशरपंजरीं पडले असतां त्यांच्याकडे हा आला होता. [ १,९,६ ] सावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [८,१३,१५]

**बादरायणि**—शुकाचार्य. [ १०,८५,१ ]

**बादरि**–श्यामपराशर कुलोत्पन्न ऋषि.

**बाभ्रव्य**–विश्वामित्र कुलांतील बभ्रु ऋषींचा पुत्र व त्याचें कुल.

**बाभ्रव्यायणि**–विश्वामित्राचा एक पुत्र.

**बार्हदीषव**–अजमीढपुत्र बृहदिषूचे वंशज. [ ९,२१,२६ ]

**बार्हद्रथ**—पूरुकुलांतील बृहद्रथाचा पुत्र जरासंध व वंशज [ १०,५०,३५ ].

**बालडि**–अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बालधि**–**धी**–एक ब्रह्मर्षि. याचा एक पुत्र अल्पायु मृत झाल्यानंतर यानें अमर पुत्र होण्याकरितां तप केलें. ' अमर पुत्र मिळणें शक्य नाहीं ' असें देवतांनीं सांगितलें; तेव्हां ' निदान समोरच्या पर्वता इतका तरी दीर्घायु पुत्र असावा ' असा वर यानें मागितला. त्या इच्छेनुरूप देवतांनीं यास पुत्र दिला. त्याचें नांव'मेधावि'ठेविलें. परंतु हा त्यास पर्वतायु म्हणत असे. आपण पर्वतायु आहों, असें समजतांच तो फार उन्मत्त झाला. त्यानें एकदां धनुषाक्ष ऋषीस त्रास दिला असतां ' तूं मृत हो ' असा ऋषीनें त्यास शाप दिला, पण तो मृत झाला नाहीं. हें पाहून ऋषीस आश्चर्य वाटलें. त्यानीं दिव्य दृष्टीनें विचार करितां याच्या मृत्यूला निमित्त हा पर्वत आहे असें समजलें. तेव्हां ऋषीनें तो पर्वत महिषांकडून उध्वस्त केला. पर्वत उध्वस्त होतांच तो पुत्र मृत झाला. ( भा. वन. अ. १३५ )

**बालपि**–भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बालाकी**— ,, ,,

( २ ) भरद्वाजांगिरस कुलांतील गर्गगोत्रोत्पन्न एक ऋषि. हा विद्वान व गर्विष्ठ असे. एकदां विद्वानांस जिंकून हा काशीराजास म्हणाला ' वाद कर नाहीं तर शिष्य हो ' राजाला याचें भाषण ऐकून आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, ' आजपर्यंत माझ्याकडे पुष्कळ वृद्ध व विद्वान लोक अले, पण ' शिष्य हो ' असें म्हणणारा कोणीही आला नाहीं. आणि तूं तरुण असून असें म्हणतोस, अर्थात् तूं धन्य आहेस. ही सशास्त्र सहस्र गायींची दक्षणा सिद्ध आहे, तर मला काय सांगणार, तें कृपा करून लवकर सांग!' राजाचें भाषण ऐकून बालाकीनें सांगण्यास आरंभ केला, पण राजा ब्रह्मज्ञानी असल्यानें त्यानें त्याच्या सर्व भाषणाचें खण्डण केलें. शेवटीं राजाचा अधिकार पाहून बालाकी त्याला शरण गेला, व आत्मज्ञानाचा उपदेश करण्याविषयीं विनंती केली, नंतर राजानें याचा उत्तम सत्कार करून त्याला ब्रह्मविद्येचें दान केलें.

**बालायनि**–एक ऋषि. यानें वालखिल्य संहितेचें अध्ययन केलें. [१२,६,५९]

**बालिशायनि**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बाल्हीक**-सोमवंशीय पुरुकुलांतील प्रतीप राजाचा पुत्र. शंतनूचा कनिष्ठ भ्राता. याचा पुत्र सोमदत्त. [ ९,२२,१२ ]

( २ ) एक देश. हा उत्तरेकडे चोल आणि दरद या दोन देशांच्यामध्यें पांडवांच्या वेळीं होता. या देशाचे राजे भारतीयुद्धांत दुर्योधनाकडे होते. या देशाचे राजे स्यमंतपंचक क्षेत्रीं आले होते. [१०, ८२, २५ ] ( भा. सभा द्रोण. ) सांप्रत यास बल्ख हे नांव असून तें अंदखुर्दच्या पूर्वेस १०० मैलांवर व ऑक्ससच्या दक्षिणेस सुमारें ४६ मैलावर अफगाणिस्थानांतील एक शहर आहे. हें अतिशय प्राचीन असून याला ' शहरांची आई ' असें म्हणतात.

( ३ ) कलियुगांत किलकिला नगरींत राज्य करणाऱ्या राजांचे तेरा पुत्र, त्यास संज्ञा [ १२, १, ३४ ].

**बाष्कल**-अनुल्हादाचा एक पुत्र [६,१८,१६]

(२) इंद्रप्रमदऋषीचा शिष्य.[१२,६,५४]

( ३ ) रुद्रगणांपैकीं एक.

( ४ ) हिरण्यकशिपूचा एक पुत्र.

( ५ ) प्रल्हादाचा एक पुत्र.

( ६ महिषासुराचा एक पुत्र.

**बाष्कलि**-अंगिराकुलांतील ऋषि. यानें वालखिल्य संहिता रचून ती बालायनि, भज्य व कासार या शिष्यांस शिकविली. [ १२, ६, ५९, ]

**बाहु**-इंद्रसावर्णिमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. [ ८, १३, ३४ ]

**बाहुक**-( ठेंगणा ) [ ४, १४, ४३ ]

**बाहुक**—सूर्यवंशीय हरिश्चंद्रकुलांतील वृक राजाचा पुत्र. याचें राज्य शत्रूंनीं हरण केल्यावर हा आपल्या स्त्रियांसह अरण्यांत रहात असे. वृद्धपणीं हा मृत झाला असतां याची मुख्य राणी सहगमन करूं लागली; पण ती गरोदर असल्यामुळें और्व ऋषीनें तिला परावृत्त केलें. पण तिचें गर्भारपण तिच्या सवतींना असह्य होऊन त्यांनीं तिला विष दिलें. पण ती न मरतां तिला पुत्र झाला तो सगर [ ९,८,२ ]

( ३ ) ऋतुपर्ण राजाच्या घरीं असतां नलानें धारण केलेलें नांव.

( ४ ) एक यादव.

**बाहुदा**-हिमालयापासून निघणारी नदी. हिला सैतवाहिनी असे नांव आहे.

**बाहुलेय**-कार्तिकेयाचें नांव

**बाह्य**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि

**बाह्यक**-वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बाह्यका**-सात्वतकुलांतील भजमानाची स्त्री.

**बाह्या**-सह्याद्रिपर्वतापासून निघालेली नदी.

## बि

**बिडाल**-महिषासुराचा एक प्रधान.

**बिन्दु**-अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

( २ ) दनुपुत्र एक दानव.

**बिन्दुमती**-मरीचि राजाची पत्नी. हिचा पुत्र बिन्दुमान. [ ५,१५,१५ ]

( २ ) सूर्यवंशीय युवनाश्वपुत्र मांधात्याची पत्नी. हिचे पुत्र पुरुकुत्स, अम्बरीष आणि मुचकुन्द. [९,६,३८]

**बिंदुमाधव**-काशीक्षेत्रांतील एक देव.

**बिंदुमान्**–प्रियव्रतवंशीय मरीचि व बिंदुमती यांचा मुलगा. याची पत्नी सरघा आणि पुत्र मधु. [५,१५,१५]

**बिन्दुसर**--कर्दम प्रजापतीनें सरस्वतीचे तीरीं तप केल्यावर प्रसन्न झालेल्या विष्णूच्या डोळ्यांतून जे आनंदाश्रु भूमीवर पडले, त्यापासून झालेलें सरोवर. [ ३,२१,३७–३९ व ७, १४,३१ ] बलराम तीर्थ यात्रेला येथें आला होता. [ १०,७८,१९ ,

( २ ) भागीरथीचा ओघ शंकरांनी मस्तकीं धारण केला, त्यांतून जे बिंदु भूमीवर पडले, त्यापासून झालेलें सरोवर. हें हिमालयाच्या हिरण्यशृंग शिखराच्या पायथ्याशीं आहे. (मत्स्य)

**बिंद्वात्मप्रबोध**–ऋग्वेदोपनिषत्.

**बि(वि)भीषण**–विश्रवा ऋषि व कैकसी यांचा कनिष्ट पुत्र. रावण कुंभकर्णाचा भाऊ. याने आपल्या भावाबरोबर पांच हजार वर्षें तपश्चर्या केली. ब्रह्मदेव प्रसन्न झाल्यावर यानें बुद्धि स्वधर्मी रत असावी असा वर मागितला. ब्रह्मदेवानें प्रसन्न होऊन यास आणखी चिरंजीवित्वहि दिलें. हा रावणाबरोबर लंकेंत रहात असे. याची स्त्री शैलूष गंधर्वकन्या सरमा सीताहरणानंतर यानें रावणादिकांस उपदेश केला, पण त्यांनीं याचा अपमान केल्यामुळें हा आपल्या चार अमात्यांसह रामाकडे आला, व त्यास युद्धांत मदत केली. रावणानंतर हा लंकेचा राजा झाला. [ ४,१,३७; व ९, १०, १६ ] ( वा. रा. )

( २ ) बलीदैत्याच्या शतपुत्रांतील एक.

( ३ ) एक गंधर्व.

**बिल्वक**–एक तीर्थ.

### बी

**बीज**–दहा विश्वेदेवांपैकीं एक.

**बीजवाप**–( पी ) अत्रिकुलांतील ब्रह्मर्षि.

**बीभत्सु**–अर्जुनाचें नामांतर.

### बु

**बुद्ध**–अजननामक कुलांत कीकट (गयाप्रांत) देशांत झालेला विष्णूचा अवतार. [ १,३,२४ ]

**बुद्धि**–स्वायंभू मन्वंतरांतील दक्षकन्या व धर्म ऋषीची स्त्री. [ ४, १, ५० ]

( २ ) इंद्रसावर्णि मनूचा एक पुत्र. [ ८, १३, ३३ ]

**बुद्बुदा**–शापानें मकरी झालेली अप्सरा. ( नारीतीर्थ शब्द पहा )

**बुध**–ग्रहमालिकेंत शुक्राच्या वर दोन लक्ष योजनें असलेला ग्रह. हा प्रायः सर्वांना शुभ असतो. पण जेव्हां सूर्याचें उल्लंघन करितो तेव्हां अनावृष्टि भय सुचवितो [ ५, २२, १३]. सूर्यमालेंतील एक अंतर्ग्रह. सूर्यमालेमध्यें सूर्याला फार जवळ असणारा हा ग्रह आहे. बुधाचें सूर्यापासून मध्यम अंतर ४०३८९००० मैल आहे. बुध सूर्याभोंवतीं ८७ दिवस २३ तास १५ मिनिटें आणि ४६ सेकंद इतक्या कालांत एक प्रदक्षिणा करितो. आणि तो आपल्या आंसाभोंवतीं २४ तास ५ मिनिटें इतक्या कालांत एक प्रदक्षिणा करितो. बुधाची गति आंदोलनासारखी असते.

यामुळें बुध रात्रीं डोक्यावर कधींहि दिसावयाचा नाहीं. बुधबिंबाचा व्यास ३१४० मैल आहे. हा सूर्य-प्रकाशानें प्रकाशित होतो.

( २ ) चालू मन्वंतरांतील सोम व बृह-स्पतीची पत्नी तारा यांचा पुत्र. याची पत्नी इला. [ ९, १४, १४ ]

**बुधकौशिक**-एक ऋषि. रामरक्षेचा कर्ता.

## बृ

**बृहक**-एक गधव.

**बृहच्छुक्र**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बृहच्छ्लोक**-त्रिविक्रम नांवाचा बारावा आदित्य व कीर्ति यांचा पुत्र याचे पुत्र सौभाग्यादि. [ ६, १८, ८ ]

**बृहज्जाबाल**-अथर्वणवेदोपनिषत्

**बृहती**-छत्तीस अक्षरांचा एक छंद. हा ब्रह्म-देवाच्या प्राणापासून झाला [ ३,१२,४६ ]

( २ ) देवहोत्राची पत्नी व देवसावर्णि-मन्वंतरांतील योगेश्वर नामक अवताराची माता. [ ८, १३, ३२ ]

**बृहत्**-बृहत्कर्म्याचेंच नांव.

**बृहतकर्मा**-सोमवंशीय अनुकुलातील पृथु-लाक्षाचा एक पुत्र. [ ९, २३, ११ ]

**बृहत्कल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील सातवा कल्प.

**बृहत्काय**-सोमवंशीय अजमाढपुत्र बृह-दिषूचा पौत्र व बृहद्धनूचा पुत्र. याचा पुत्र जयद्रथ. [ ९,२१,२२ ]

**बृहत्क्षत्र**-सोमवंशीय रौद्राश्वपुत्र ऋतेयु-कुलांतील मन्युराजाच्या पांच पुत्रातील ज्येष्ठ. याचा पुत्र हस्ती ९,२१,१-२० ]

( ) धृष्टद्युम्नानें मारिलेला भारती-युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

( ३ ) द्रोणाचार्यानें मारिलेला केकय-देशीय पाण्डव पक्षीय राजा.

**बृहत्वा**-एक गंधर्व.

**बृहत्सेन**-सोमवंशीय जरासंधकुलांतील सुनक्षत्र राजाचा मुलगा. याचा मुलगा कर्मजित्. [ ९,२२,४७ ]

( २ ) श्रीकृष्ण व भद्रा यांचा एक पुत्र. [ १०,६१,१७ ]

( ३ ) भारती युद्धांतील दुर्योधन पक्षीय राजा. मद्रदेशाचा एक सामान्य राजा याची कन्या लक्ष्मणा, कृष्णाची पत्नी.

**बृहत्सेना**-मदयंतीची परिचारिका.

**बृहदश्व**-भीष्माकडे आलेला एक ऋषि. [ १,९,६ ] पांडव वनवासांत असतां यानें त्यांस अक्षविद्या व अश्वहृदय विद्या सांगितली. ( भा. वन. )

( २ ) सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील शाश्वतराजाचा पुत्र. याचा पुत्र कुवलयाश्वक [ ९, ६, २१ ].

( ३ ) कलियुगांत झालेल्या सूर्यवंशीय सहदेवाचा पुत्र [ ९, १२, ११ ].

**बृहदारण्यक**-यजुर्वेदोपनिषत्.

**बृहदिषु**-सोमवंशीय पुरुकुलांतील अजमीढ राजाचा पुत्र. याचा पुत्र बृहद्धनु. [ ९, २१, २२ ] बृहदिषूच्या वंशास बार्हदीषव अशी संज्ञा आहे.

( २ ) सोमवंशीय अजमीढपुत्र नीलाचे कुलांतील भर्म्याश्व राजाच्या पांच पुत्रांतील तिसरा [ ९, २१, ३२

**बृहदुक्थ**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**बृहद्दर्भ**–सोमवंशीय अनुकुलांतील उशीनरपुत्र शिबीच्या पांच पुत्रांपैकीं एक. यास पृथुदर्भ नामांतर होतें. सत्व पाहण्याकरितां आलेल्या ब्राह्मणास इच्छाभोजन देण्याकरितां शिबीनें यास वधिलें.

**बृहद्धनु**–पुरुकुलांतील बृहदिषूचा पुत्र, याचा पुत्र बृहत्काय. [ ९,२१,२२ ]

**बृहद्बल**–सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील तक्षक राजाचा पुत्र. हा भारतीयुद्धांत अभिमन्यूकडून मारला गेला. याचा पुत्र बृहद्रण. [ ९,१२, ८ ]

( २ ) देवभाग व कंसा यांचा पुत्र. उद्धवाचा भाऊ. [ ९, २४, ४० ]

( ३ ) शकुनीचा एक भाऊ.

**बृहद्भानु**–इंद्रसावर्णि मन्वंतरांत सत्रायणि व वितना यांचेपासून झालेला भगवंताचा अवतार. [ ८, १३, ३५ ]

( २ ) सोमवंशीय अनुकुलांतील पृथुलाक्षाचा एक पुत्र. [ ९, २३, ११ ]

( ३ ) श्रीकृष्ण व सत्यभामा यांचा एक पुत्र. [ १०, ६१, १० ]

**बृहद्युम्न**–अर्वावसु व परावसु यांस यज्ञार्थ वरणारा राजा. (भा. वन. अ. १३८)

**बृहद्रण**–सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील बृहद्बल राजाचा पुत्र. याचा पुत्र उरुक्रिय. [ ९, १२, ९

**बृहद्रथ**–विदेहवंशीय देवराताचा पुत्र. याचा पुत्र महावीर्य. [ ९,१३,१५ ] यानें शाकल्यादि ऋषि, याज्ञवल्क्य इत्यादिकांस बोलावून दानाकरितां गायी ठेविल्या, आणि जो ब्रह्मनिष्ठ असेल त्यानें या गायी घेऊन जाव्या असें सांगितलें असतां, त्या गाई याज्ञवल्क्यानें हांकून नेल्या, आणि हा त्याचा (याज्ञवल्क्याचा) शिष्य झाला.

( २ ) सोमवंशीय उपरिचरवसूचा ज्येष्ठ पुत्र. यास दोन स्त्रियांपासून कुशाग्र व जरासंध असे दोन पुत्र झाले. [ ९, २२, ५ ते ८ ]. यास महारथ असेंहि नांव होतें. हा एकदां अरण्यांत गेला असतां यानें एका आम्रवृक्षाखालीं चण्डकौशिक ऋषीस पाहिलें. त्या ऋषीला वंदन करून हा उभा असतां, ऋषीनें क्षेम विचारिलें. यानें संततीवांचून सर्व ठीक आहे, असें सांगितलें. तें ऐकून ऋषि क्षणमात्र ध्यानस्थ झाला. इतक्यांत वृक्षाचें पिकलेलें फळ त्याच्या मांडीवर पडलें, तें त्यानें राजास दिलें, व स्त्रीला भक्षण करण्यास दे, म्हणून सांगितलें. राजानें तें फळ आपल्या दोन पत्न्यांस समान चिरून दिलें. पुढें दोघी प्रसूत होऊन त्यांस एक एक शकल झालें, तें त्यांनीं निर्जनस्थलीं फेंकून दिलें. तेथें जरा नामक राक्षसी येऊन तिनें तीं शकलें सांधिलीं, व तो पुत्र राजाजवळ आणून दिला. त्याचें नांव जरासंध असें ठेविलें. यानें ऋषभनामक राक्षसास मारून त्याच्या चमाच्या दोन दुन्दुभि महाद्वारावर ठेविल्या होत्या. ( भा.सभा ) भागवतांत जरासंधाचें जन्म एकाच स्त्रीपासून झालें असें लिहीलें आहे. ( जरासंध शब्द पहा. )

( ३ ) पाण्डवकुलांतील तिमि राजाचा पुत्र. याचा पुत्र सुदास. [ ९,२२,४३ ]

**बृहद्रथ**–सोमवंशीय अनुकुलांतील पृथुलाक्षाचा एक पुत्र. याचा पुत्र बृहन्मना [ ९, २३, ११ ]

( ५ ) कलियुगांतील मौर्यवंशीय शतधन्व्याचा पुत्र. हा शेवटचा राजा होय. [ १२, १, १५ ]

( ६ ) सोमवंशीय अनुकुलांतील धर्मरथाचे नामांतर. यास मातेनें परशुराम निःक्षत्रिय पृथ्वी करीत असतां गृध्रकूट पर्वतावर लपविलें होतें. ( भा. शांति अ. ४९ )

( ७ ) दुर्योधन पक्षीय राजा.

**बृहद्राज**–सूर्यवंशीय कुशकुलांतील अमित्रजित राजाचा पुत्र. याचा पुत्र बर्हि. [ ९, १२, १३ ] यास बृहत असेंहि म्हणत असत.

**बृहद्वती**–भारतवर्षीय एक नदी.

**बृहन्त**–उलूक पर्वतावरील त्याच देशाचा राजा. हा भारतीयुद्धांत शकुनीचे हातून मरण पावला. याचा भाऊ क्षेमधूर्ति. ( भा. सभा. द्रोण. )

**बृहन्नटा**–अज्ञातवासांत असतां अर्जुनानें केलेलें नामांतर. उवशीच्या शापानें त्याचा वेषहि बदलला होता. याच स्वरूपांत त्यानें उत्तराला सारथी करून विराटाचीं गोधनें सोडविलीं ( भा. विराट. )

**बृहन्मना**–अनुकुलांतील बृहद्रथाचा पुत्र. याचा पुत्र जयद्रथ. [ ९,२३,११ ]

**बृहस्पति**–स्वायंभुवमन्वंतरांतील अंगिरा ऋषीचा एक पुत्र. स्वारोचिष मन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक. [४,१,३५] पृथ्वीदोहनाचे वेळीं ऋषींनीं यास वत्स केले होतें. [ ४,१८,१४ ]

( २ ) चालू वैवस्वत मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र अंगिरा ऋषि त्याच्या आठ पुत्रांतील ज्येष्ठ. स्वायंभुव मन्वंतरांतील बृहस्पतीच्या अंशानेंच हा जन्मास आला होता. हा देवांचा गुरु यास शुभा आणि तारा अशा दोन स्त्रिया होत्या त्यांपैकीं शुभेला भानुमति, राका, सिनीवाली, अर्चिष्मती, हविष्मती, महिष्मती व महामति, अशा सात कन्या होत्या. आणि तारेस शंयु, निश्च्यवन, विश्वजित्, विश्वभुक्, वडवाग्नि आणि स्विष्टकृत्, असे सहा पुत्र व स्वाहा नामक कन्या होती. चालू मन्वंतरांतील हा होऊन केलला चौथा व्यास. (भा. वन.)

( ३ ) एक यज्ञ. [ ४,३,३ ]

( ४ ) ( गुरु ) सूर्य मण्डलांतील सर्वांत मोठा ग्रह मंगळाच्या वर दोन लक्ष योजनें असतो [ ५,२२,१५ ]. हा शुक्राच्या खालोखाल तेजस्वी आहे. पृथ्वी एवढाले १३९० गोल एकत्र होतील इतका हा मोठा आहे. गुरु लोकावरील दिवस ९ तास ५५॥ मिनिटांचा असून वर्ष आपल्या बारा वर्षांइतकें मोठें आहे. सूर्यापासून पृथ्वीच्या पांचपट अंतरावर गुरू आहे. गुरूला आठ उपग्रह आहेत. गुरू व त्याचे उपग्रह ही एक लहानशी सूर्यमालाच आहे.

( ५ ) जनमेजयाच्या सर्पसत्रांतील एक ऋषि. [ १२,६,२३ ]

**बोधदश** -भारतवर्षीय एक देश.

**बोधा** वसिष्ठकुलांतील ब्रह्मर्षि.

**बोध्य**-बाष्कल ऋषीचा बाष्कल संहितेचा एक शिष्य. [ १२,६,५५ ]

( २ ) एक ऋषि. याचा ययातिराजाशी संवाद झाला होता. ( भा. शांति )

**बौद्ध** बुद्धरूप परमेश्वराचा अवतार.

**ब्रह्मश्व**-एक राजर्षि. याचकडे अगस्त्य-ऋषि द्रव्याचे इच्छनें आला होता, पण याचे आय-व्यय सम असल्यानें तो परत गेला.

**ब्रह्म**-गुणत्रय, भेदत्रय, परिच्छेदत्रय आणि माया व त्याचें रहित असें जें उत्पत्ति-नाश रहित, वाणी व मनास अविषय. परंतु सच्चित्सुखमात्र पदार्थांच्या निषेधास अवधिभूत असें स्थान. [ १,११ [ ५,२०,३२ ].

( २ ब्रह्मदेव, वेद व ब्राह्मण यास संज्ञा [ ११,१३,२ व ३,९,१ ].

( ३ ) यजुर्वेद उपनिषत्.

**ब्रह्मकमंडलु** एक तीर्थ.

**ब्रह्मचर्य** चार आश्रमांतील पहिला आश्रम. हा भगवन्ताच्या हृदयापासून झाला. [ ११,१७,१४ ]

**ब्रह्मचारी**–प्रथमाश्रमी ७ १२,१ ].

( २ ) प्राधा पुत्र गंधर्वांतील एक.

**ब्रह्मज्योति** अग्निविशेष.

**ब्रह्मतीर्थ** एक तीर्थ

**ब्रह्मतु** –एक पर्वत.

**ब्रह्मदत्त** सोमवंशीय पुरुकुलांतील नीप अथवा अणुहराजा, आणि शुकाचा-याची कन्या कृत्वा अथवा कीर्तिम-मती यांचा पुत्र. याची पत्नी सरस्वति व पुत्र विष्वक्सेन. [ ९,२१, २५ ] जनांतरीचा पितृवर्ती ब्राह्मण.

( २ ) कालगौतम ऋषीच्या शापानें गृध्रयोनि पावलेला एक प्राचीन राजा. एका उलुकाचा व याचा गृहानिमित्त वाद होऊन ते रामसभेंत आले असत श्रीरामदर्शनानें याचा उद्धार झाला. ( व . रा. )

( ३ ) सामदा गंधर्वीस चूलिऋषीनें दिलेला पुत्र. हा कांपिली नगरींत राज्य करीत असे. यास कुशनाभ राजानें आपल्या शंभर कन्या दिल्या.

( ४ ) सोमवंशीय एक प्राचीन राजा. याच्या पुत्रानें पूजनी नामक एका पक्षिणीचा पुत्र मारिल्यामुळें तिनें त्याचे नेत्र फोडिले होते. त्यावरून पूजनीचा व याचा संवाद झाला ( भा. शांति. )

( ५ ) अगस्त्यऋषीनें रामचंद्रास दिलेला बाण ( वा. रा अरण्य. )

**ब्रह्मदेव**-सृष्टीच्या उत्पत्तीस कारणीभूत जो रजोगुण त्याची मूर्तिमान देवता. यास चार मुखें असल्यानें चतुर्मुख चतुरानन म्हणतात. यानें संकल्पमात्रें-करून सर्व सृष्टि निर्माण केली देव, ऋषी, प्रजापति यांचा कर्ता असल्यामुळें यास धाता, विश्वसृट् इत्यादि अर्थाचा नांवें मिळालीं. असून पुत्राकडून कांहीं प्राणि उत्पन्न केल्यामुळें यास पितामह असेंहि म्हणतात. याची उत्पत्ती विष्णूच्या नाभिकमलापासून झाली [ ३ ८,१५]. ब्रह्मदेवानें केलेली श्रीकृष्णाची स्तुति.

[ १०,१३,४० ]. ( भा. आदि. शांति. ) ( मत्स्य. ) त्रेचाळीस-लक्ष वीस हजार वर्षांचा एक पर्यय, असे सहस्र पर्यय झाल्यानें याचा एक दिवस होतो व तितक्याच प्रमाणाची याची रात्र. अशा अहोरात्रास कल्प अशी संज्ञा आहे. प्रत्येक कल्पांत पृथ्वीवर चौदा मनु व स्वर्गांत चौदा इन्द्र होतात. अशा तीनशें साठ कल्पांचें याचें एक वर्ष. या मानानें हा शतायु आहे. सांप्रत याचें प्रथम परार्ध ( पन्नासवर्षें ) संपून द्वितीय परार्ध सुरु आहे. त्यांत श्वेतवराह संज्ञक सत्त्विसावा कल्प म्हणजे कृष्ण पक्षांतील एकादशी सुरु आहे. यांत सहा मनु होऊन सातव्या वैवस्वत मनूचे सत्तावीस पर्यय होऊन गेले आहेत, व अठ्ठाविसाव्या पर्ययांतील कलियुगाचीं पांच हजार वर्षें भरत आलीं आहेत. [ ३,११,२२ते३५ ].

(२)भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा.

**ब्रह्मपुराण**-अठरा महापुराणांपैकीं एक. याची श्लोक संख्या दहा हजार आहे. [ १२,१३,४ ].

**ब्रह्मपुरेयक**-वसिष्ठकुळांतील एक ब्रह्मर्षी.

**ब्रह्मबल**- ,, ,,

**ब्रह्मबली**- ,, ,,

**ब्रह्ममाल**-एकदेश. ( वा. रा. किष्किंधा. )

**ब्रह्मयोनी**-एक तीर्थ.

**ब्रह्मरात**-शुकाचार्य. [ १,९,८ ].

**ब्रह्मलोक**-( सत्यलोक ) मूर्तिपूजकांना हा लोक प्राप्त होतो. [११,२७,५२].

**ब्रह्मवादिनी**-अष्टवसूंतील प्रभास नामक वसूची पत्नी.

**ब्रह्मवान**-भृगुकुळांतील एक ब्रह्मर्षि.

**ब्रह्मविद्या** यजुर्वेदोपनिषत्.

**ब्रह्मवेणी**-एक नदी.

**ब्रह्मवैवर्त**-अठरा महापुराणांपैकीं एक. याची श्लोकसंख्या अठरा हजार आहे [ १२,१३,६, ].

**ब्रह्मशत्रु**-रावणपक्षीय एक राक्षस.

**ब्रह्मसर**-गय राजानें यज्ञ केलेलें गयसीर पर्वता जवळचें तीर्थ.

**ब्रह्मसावर्णी**-पुढें होणार दहावा मनु. हा उपश्लोकाचा पुत्र. यास भौत्य असेंहि नामांतर आहे. याला भूरिषेणादि पुत्र व हविष्मान, सुकृति, सत्य, जय, मूर्ति हे सप्तर्षी त्यावेळी असतील. या मन्वंतरांत सुवासन, विरुद्ध, इत्यादि देव, व शंभु नामक इंद्र आणि विश्वसृट् ऋषि व विषूची यांचा पुत्र विष्वक्सेन हा अवतार होईल. [ ८, १३, २१ ते २३ ]

**ब्रह्मस्थान**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**ब्रह्मा**-ब्रह्मदेव [ १, ३, २ ]

**ब्रह्माणी**-ब्रह्मदेवाची शक्ति. सावित्री.

**ब्रह्माण्डपुराण**-अठरा महापुराणपैकीं एक. याची श्लोकसंख्या बारा हजार आहे. [ १२, १३, ८ ]

**ब्रह्मापेत**-आश्विन महिन्यांत त्वष्टा नामक सूर्याबरोबर फिरणारा राक्षस. [ १२,११,४३ ]

**ब्रह्मावर्त**-सरस्वती व दृषद्वती यामधील प्रदेश [ १, १०, ३४ ]. स्वायंभु मनु येथें बर्हिष्मती पुरी स्थापून रहात असे [ ३, २१, २५ ]. येथें पृथुराजानें शंभर यज्ञ केले [ ४, १९, १ ]

**ब्रह्मावर्त**–ऋषभदेवाच्या शतपुत्रांत जे नऊ खण्डांचे अधिपति होते, त्यांतील तिसरा. व याचा खण्ड. [५,४,१०].
( ३ ) भरतवर्षाच्या नऊ खण्डांतील तिसरा. यासच सध्यां भरतखण्ड असें म्हणतात.
( ४ ) भागीरथी तीरावरील एक क्षेत्र.

**ब्रह्मास्त्र**–अस्त्र विशेष. [ १, ७, २७ ]

**ब्राह्मिष्ट**–सोमवंशीय मुद्गल नामक पांचालाचा पुत्र. याचा पुत्र इंद्रसेन.

**ब्राह्मणमण्डल**–यजुर्वेदोपनिषत्.

**ब्राह्मणाद्वयकारक**–,, ,,

**ब्राह्मणी**–भारतवर्षीय एक नदी.

**ब्राह्मी**–ब्रह्माणीस नांव. मातृगणांतील एक.

## भ

**भक्ति**–मोक्षमार्गापैकीं एक मार्ग. व्यक्तोपासना ह्मणजे भक्ति. उपनिषदांतील उपासनामार्गांतूनच भक्तिमार्ग निघाला आहे. भक्तिमार्गांत परब्रह्माच्या सगुण स्वरूपाची उपासना करून तद्वारा ब्रह्माची ओळख करून घेणें हें अंतिम साध्य मानलें आहे. ज्ञानरूपी साध्याची भक्ति हें साधन होय. भक्तिमार्गाचा प्रमाणग्रंथ भागवत पुराण. भक्तीचे, सात्वीक, राजस, तामस, असे तीन प्रकार आहेत. इहलोकांतील अर्थ साधण्याकरितां केलली भक्ति तामस. विषयोपभोगाचा अभिलाष धरून यशःप्राप्तीसाठीं केलेली भक्ति राजस. व ईश्वरार्पण बुद्धीनें केलेली भक्ति सात्विक. भक्ति करण्याचे मार्ग मुख्यतः नऊ आहेत. ( नवविधाभक्ति शब्द पहा ) भक्तिमार्ग सर्वांना आचरणीय आहे. [ १,२,६ ]

**भक्तियोग**–( भक्ति ) [ १,२,७ ]

**भग**—विषयसेवनाची शक्ति. [१,१६,२८]
( २ ) स्वायंभुव मन्वंतरांत झालेल्या दक्षयज्ञांतील ऋत्विज. यास नंदीनें बांधिलें व दक्षकृत शिवनिंदेला यानें नेत्रानें संमति दिली म्हणून वीरभद्रानें याचे डोळे फोडिले. [ ४,५,१७–२० ] मित्राच्या नेत्रांनीं भग पाहो असा शंकराचा वर. [४,७,३]
( ३ ) द्वादशादित्यांपैकीं सहावा. याची पत्नी सिद्धि. याला महिमा, विभु, प्रभु, असे तीन पुत्र व आशी नामक सुस्वरूप व तपोनिष्ठ कन्या झाली. [ ६,६,३९ व ६,१८,२ ]
( ४ ) पौषमहिन्यांत स्फूर्जराक्षस, अरिष्टनेमि गंधर्व, ऊर्ण यक्ष, आयु ऋषि, कर्कोटकनाग, पूर्वचित्तिअप्सरा यांसह फिरणारा सूर्य. [ १२,११,४२ ]

**भगदत्त**–प्राग्ज्योतिष देशाचा राजा. हा भौमासुराचा पुत्र. यास किरात व चीन या देशांचा मोठा आश्रय असे. अर्जुन उत्तर दिग्विजयाला गेला असतां, यानें अर्जुनाशीं युद्ध करून सख्य केलें. भारतीयुद्धांत हा दुर्योधनाकडे होता. गजयुद्धांत हा कुशल असून याचे जवळ पुष्कळ हत्ती असत. भारतीयुद्धांत यानें अर्जुनावर वैष्णवास्त्र सोडिलें असतां, त्याचा नाश करून अर्जुनानें यास मारिलें याला कृतघ्न आणि वज्रदत्त असे दोन पुत्र होते. श्रीकृष्णानें

भौमासुराचा वध केल्यावर भूमीनें श्रीकृष्णाजवळ याचे करितां अभय दान मागितलें. [ १०,५९,३१ ]

( २ ) दुर्योधनपक्षीय दुसरा एक राजा.

**भगपाद्**–अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**भगवत्पदी**–( भागीरथी )वामनानें आपल्या उजव्या पायानें सर्व भूमण्डल व्याप्त करून डाव्या पायानें स्वर्गादि लोक व्यापिले, त्यावेळीं त्याच्या नखानें ब्रह्मांडकटाहावरची कवची फुटून ब्रह्मांडाबाहेर असलेल्या आवरणोदकाची धारा त्या छिद्रानें आंत प्रविष्ट झाली, व विष्णूच्या चरणस्पर्शानें पावन होऊन सर्व जगास पावन करूं लागली. नंतर हजारों वर्षांनीं ती स्वर्गाच्या मस्तकावर उतरली, तें विष्णुपद होय [ ५,१७, १ ].

**भगवद्रात**–परीक्षित राजा.[१२,१३,१९].

**भगवान्**–षड्गुणैश्वर्यपरमात्मा [१,२,११].

**भंगास्वन**–एक राजा. हा मृगयेकरितां अरण्यांत गेला असता एका सरोवरांत स्नान केल्यानें स्त्रीत्व पावला (भा अ.)

**भगीरथ**–सूर्यवंशीय इक्ष्वाकु कुलांतील सगरवंशीय दिलीपाचा पुत्र. सगरपुत्रांच्या उद्धाराकरितां यानें पूर्वजांप्रमाणेंच हिमालयावरील गोकर्णक्षेत्रीं सहस्र वर्षे तप करून गंगेस प्रसन्न केलें; आणि शंकरास प्रसन्न करून त्याजकडून गंगेचा वेग धरविला, आणि आपल्या मागून यानें गंगेस भरतखंडांतून पाताळांत नेलें आणि आपल्या पूर्वजांचा उद्धार केला. भगीरथानें दीर्घप्रयत्नानें गंगा मृत्युलोकीं आणिली म्हणून तिला 'भागीरथी' हे नांव प्राप्त झालें. याचे पुत्र श्रुत व नाभ [९,९.२-१६] [ १२,३,१० ]. हा मोठा दाता असे. यानें आपली कन्या हंसी कौत्सऋषीस दिली होती. (भा अनु.)

( २ ) द्रौपदीस्वयंवरास आलेला एक राजा. ( भा. आदि. )

**भगविसु**–वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**भजमान्**–सोमवंशीय ज्यामघ कुलांतील सात्वताच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ. याला सृंजया आणि बाह्यका अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांतून पहिलीला निम्लोचि, किंकिण आणि धृष्टि व दुसरीला शतजित् सहस्र असे पुत्र होते. [ ९,२४,६ ].

( २ ) यदुकुलांतील सात्वतपुत्र अंधकाच्या चार पुत्रांतील दुसरा.

( ३ ) सोमवंशीय वृष्णिकुलांतील शूराचा पुत्र. याचा पुत्र शिनि. [ ९,२४,६ ].

**भजि**–ज्यामघकुलांतील सात्वताच्या सात पुत्रांतील दुसरा. [ ९.२४,६ ].

**भत्स्य**–कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**भद्र**–यज्ञ व दक्षिणा यांचा एक पुत्र. ( तुषित शब्द पहा ) [ ४,१,७ ].

( २ ) तिसऱ्या उत्तम मन्वंतरांतील देव विशेष. [ ८,१,२४ ].

( ३ ) वसुदेव व पौरवी यांचा एक पुत्र. [ ९,२४,४७ ].

( ४ ) वसुदेव व देवकी यांचा एक पुत्र. [ ९, २४, ५४ ]

( ५ ) श्रीकृष्ण व कालिन्दी यांचा एक पुत्र. [ १०, ६१, १४ ]

**भद्र**-वसिष्ठ कुळांतील इंद्रप्रमादि ऋषीचा पुत्र. याचा पुत्र उपमन्यु.

( ७ ) रामसभेंतील एक हास्यकार.

( ८ ) कर्णानें मारिलेला पाण्डवपक्षीय एक राजा.

( ९ ) भारतवर्षीय एक देश.

( १० ) भारतवर्षीय एक तीर्थ.

**भद्रक**-कलियुगांत मौर्यकुलानंतर झालेला एक राजा. [ १२, १ १७ ]

**भद्रकर्णेश्व** भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**भद्रकाली**-( पार्वती ) एक देवी. या देवीस बळी देण्याकरितां जडभरत भरतास नेलें होतें. [ ५, ९, १२ ]

( २ ) योगमाया. [ १०, २, ११ ]

**भद्रकालेश्वर**-एक क्षेत्र व तीर्थ.

**भद्रचारु**-श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा एक पुत्र. [ १०, ६१, ८ ]

**भद्रतुंग**-भारतवर्षी क तीर्थ.

**भद्रमना**-कश्यप व क्रोधा यांची एक कन्या

**भद्रवट**-भारतवर्षीय तीर्थ.

**भद्रवाह**-वसुदेव व पौरवी यांचा एक पुत्र. [ ९, २४, ४७ ]

**भद्रश्रवा**-भद्राश्वखण्डांतील धर्मपुत्र हा तथील आपल्या लोकांसह हयग्रीव मूर्तीची उपासना करितो. [५,१८,१]

**भद्रसाल**-भद्राश्ववर्षांतील वनविशेष.

**भद्रसेन**-ऋषभदेवाच्या नऊ खण्डाधिपतिं पुत्रांपैकी एक [ ५,४,१० ].

( २ ) भारतवर्षाच्या नऊ खण्डांपैकीं एक

**भद्रसेनक**-सोमवंशीय यदुकुलांतील महिमान राजाचा पुत्र. याचे पुत्र दुमद आणि धनक. [ ९,२३,२३ ]

**भद्रा**—मेरूची कन्या व आग्नीध्रपुत्र भद्राश्वाची पत्नी. [ ५,२,२३ ]

( २ ) भगवत्पदीचा उत्तरेकडील प्रवाह. हा कुरुदेशांतून जाऊन समुद्रास मिळतो. [ ५,१७,५-८ ]

( ३ ) वसुदेवाची एक पत्नी.[९,२४,२५]

( ४ ) केकय देशाचा राजा धृष्टकेतु व वसुदेव भगिनी श्रुतकीर्ति यांची कन्या व श्रीकृष्णाची एक पत्नी. ही कृष्णाची आतेबहीण होती. हिला संग्रामजित आदि पुत्र होते [१०,५८,५६ व १०,६११ ]

( ५ ) अत्रिपुत्र सोम न्या व उतथ्य ऋषीची स्त्री.

**भद्रायु**-एक राजपुत्र. यास ऋषभयोगी ऋषीनें शिवकवच दिलें होतें.

**भद्रावती**- यौवनाश्व राजाची स्त्री.

( २ ) वृषकेतूपत्नी प्रभद्रेचें नामांतर.

**भद्राश्व**-प्रियव्रत पुत्र आग्नीध्र व पूर्वचित्ति अप्सरा यांचा पुत्र, व याचा वर्ष. याची स्त्री भद्रा. [५,२,१९ ].

( २ ) सूर्यवंशीय कुवलयाश्वाचा तिसरा पुत्र. याला चंद्राश्व, चंडाश्व, दण्ड असीं नामांतरें होतीं.[९,६,२४]

( ३ ) सोमवंशीय पूरुकुळांतील भर्म्याश्व राजाचे नामांतर.

**भद्राश्ववर्ष**-जंबुद्वीपांतील नऊ वर्षपैकी भागापैकी एक. हा वर्ष गंधमादन पर्वत आणि क्षीरसमुद्र यांचे मध्यें आहे. येथील अधिपति आग्नीध्रपुत्र भद्राश्व. [ ५,१८,१ ].

**भय**-कलि व दुरुक्ति यांचा पुत्र [४,८,४].

( २ ) द्रोणवसू व अभिमती यांचा पुत्र. [ ६,६,११ ].

**भयंकर**-एक राजा. जयद्रथाचा मित्र.

**भया**–हेति राक्षसाची स्त्री. हिचा पुत्र विद्युत्केशी ( वा. रा. उत्तर. )

**भरणी**–एक नक्षत्र. प्राचेतस दक्षाची कन्या व सोमाची स्त्री.

**भरत**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेव व जयंती यांच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ [५,४,९]. याच्या भार्येचें नांव पंचजनी आणि पुत्रांचीं नांवें सुमति, राष्ट्रभृत, सुदर्शन आवरण आणि धूम्रकेतु अशीं होतीं. [ ५,७,१,३ ] हा मोठा पराक्रमी राजा असल्यामुळें अजनाभवर्षाला भारत असे नांव मिळाल. यानें एक कोटी वर्षे राज्य केल्यावर सर्वसंगपरित्याग करून चक्रनदीतीरावरील पुलहाश्रमांत गेला. [ ५,७,८ ]. येथें मृगशावकाचे संगतीनें यास दुसरें जन्म मृगाचें आले, व तिसऱ्या जन्मीं जडभरत या नांवानें ब्राह्मणकुलांत जन्म घेऊन मुक्त झाला.

( २ ) सूर्यवंशीय दशरथ व कैकयी यांचा पुत्र. रामचंद्राचा सावत्र भाऊ. हा आकृतीनें रामासारखा असे. सीरध्वज जनकाचा बंधु कुशाध्वजाची कन्या माण्डवी ती याची पत्नी. याचे पुत्र तक्ष व पुष्कल. रामचंद्र वनवासाला गेला असतां रामाच्या पादुका सिंहासनावर स्थापून रामाचा प्रतिनिधि म्हणून यानें राज्यकारभार केला; व स्वतः वल्कलें परिधान करून, जटा वाढवून, सर्व सुखोपभोगाचा त्याग करून राम परत येईपर्यंत नंदग्रामीं वास केला. आणि भ्रातृभावाचें भरत हें उत्कृष्ट उदाहरण जगास दाखविलें. राम परत आल्यानंतर त्यांनीं यास युवराजपद दिलें. यानें गांधारदेशांतील गंधर्वांचा पराभव करून त्याठिकाणीं आपल्या दोन पुत्रांच्या नांवानें दोन नगरें स्थापिलीं, व कारुपथ देशांत लक्ष्मणपुत्र चंद्रकेतूची स्थापना केली. हा रामचंद्राबरोबरच स्वर्लोकीं गेला. [ ९,१०,३–३५ व ९, ११, १२ ]

( ३ ) सोमवंशीय पुरुकुलांतील दुष्यंत व शकुंतला यांचा पुत्र. यास दमन अथवा सर्वदमन असेंहि नांव होतें. यानें दीर्घतमा ऋषीला पुरोहित करून एकशेतीस अश्वमेध यज्ञ केले. आणि मष्णार नांवाचें कर्म करून त्यांत काळ्या वर्णाचे चौदा लक्ष हत्ती अलंकारासहित दान दिले. दिग्विजय करून दानवांचा नाश केला, व देवस्त्रियांना त्यांच्या बंदींतून सोडविलें. यानें सत्तावीस हजार वर्षें राज्य केलें. यास विदर्भकुलांतील तीन स्त्रिया होत्या, व त्यांना पुत्रही झाले होते, पण ते अनुरूप न निघाल्यास भरत आपला त्याग करील या भीतीनें त्या स्त्रियांनीं ते सर्व मारून टाकले होते. शेवटीं यानें पुत्रप्राप्तीस्तव मरुत्स्तोम यज्ञ केला, व मरुतांनीं यास भरद्वाज नांवाचा पुत्र दिला. त्यास वितथ नांव होतें. तोच पुढें राज्याधिकारी झाला. [ ९,२०,२४ ]

( ४ ) शंयु नामक अग्नीचा पुत्र.

( ५ ) नाट्यशास्त्र प्रणेता एक ऋषि.

**भरतखण्ड**—ऋषभ—देवाच्या ब्रह्मावर्त नामक तिसऱ्या पुत्राचा ब्रह्मावर्त खण्ड. येथें भरत रहात असे. याची उत्तरेकडील पूर्वपश्चिम लांबी सुमारें नऊ हजार योजनें असून पश्चिमेकडील समुद्राशीं संलग्न झालेल्या हिमालय पर्वताच्या टाकापासून तिर्कस रुंदी कुमारीपर्यंत सुमारें दहा हजार योजनें आहे. ( मत्स्य. )

**भरतवर्ष**—आग्नीध्रपुत्र नाभीच्या अजनाभ वर्षास संज्ञा. हा वर्ष जम्बुद्वीपाचा नववा भाग आहे. याच्या उत्तरेस हिमालय पर्वत व इतर तीन दिशांकडे क्षार समुद्र आहे. याची उत्तरेकडे पूर्वपश्चिम लांबी ऐशीं हजार योजनें व दक्षिणोत्तर रुंदी बाराशें योजनें आहे. ( लिंग. अ. ४७ ) याचा आकार धनुष्याप्रमाणें आहे. ऋषभदेवानें याचे नऊ भाग करून आपल्या नऊ पुत्रांस दिले, तेच नऊ खण्ड कुशावर्त इत्यादि नांवानें प्रसिद्ध आहेत. यांत हिमालय, महेंद्र, मलय, सह्याद्रि विंध्याद्रि, शुक्तिमान, ऋष्यवान आणि पारियात्र असे आठ मुख्य उपपर्वत असून, महानद्या व इतर देश सहा हजार तीनशें आहेत. हा वर्ष कर्मभूमि व इतर वर्ष भोग्यभूमि होत.

**भरती**—भरत नामक अग्नीची स्त्री.

**भरद्वसु**—एक ब्रह्मर्षि.

**भरद्वाज**—एक ऋषि. हा भीष्माकडे आला होता. [ १,९,६ ]

( २ ) चालू वैवस्वतमन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक. [ ९, १३, ५ ] हाच शंयुनामक अग्नीचा पुत्र. याची स्त्री वीरा व पुत्र वीर.

( ३ ) दुष्यंतपुत्र भरतास मरुद्गणांनी दिलेला पुत्र. बृहस्पतीबंधु उतथ्याची पत्नी ममता गरोदर असतां बृहस्पति तिच्याशीं मैथुन करण्यास सिद्ध झाला म्हणून आंतील गर्भानें त्याचा निषेध केला. बृहस्पतीनें त्या गर्भास 'अंधळा होशील' असा शाप देऊन मैथुन केलें. तेव्हां त्याचें वीर्य आंतील गर्भानें पायानें लोटून दिलें. त्यापासून पुत्र उत्पन्न झाला; परंतु त्याचा स्वीकार बृहस्पति किंवा ममता कोणीच करीना. तेव्हां देवांनीं 'मूढे भरद्वाजमिमं भरद्वाजं बृहस्पते । यौ तौ यदुक्त्वा पितरौ भरद्वाज स्तत स्त्वयम्' असा श्लोक म्हटला. ( या दोघांपासून झालेल्या पुत्राचें पोषण कर असें बृहस्पति व ममता यांनी परस्परास म्हटलें, म्हणून यास भरद्वाज नांव मिळालें.) याचें वितथ असें नांव होतें. हाच दुष्यंताचा राज्याधिकारी झाला [ ९,२०.३५,ते३८]

( ४ ) अंगिरस कुलांतील एक ब्रम्हर्षि. रैभ्य ऋषीचा पुत्र.

( ५ ) वाल्मीकीचा शिष्य. हा प्रयागांत रहात असे. दाशरथीराम वनवासांत असतां यानें त्यास चित्रकूटपर्वतीं राहण्यास सांगितलें होतें ( वा. रा.)

**भरा**—विशालपुरीची राजकन्या. करुषदेशाधिपतीची पत्नी. ही शिशुपालाची मामेबहीण होती. शिशुपालानें हिच्या पतीचें रूप घेऊन हिचें हरण केलें होतें

(हा शिशुपालाचा सावत्र मामा असावा कारण शिशुपालाचा प्रत्यक्ष मामा वसुदेव होता.)

**भरुक**-सूर्यवंशीय इक्ष्वाकु कुलांतील हरिश्चंद्रवंशीय विजयराजाचा पुत्र. यास रुचक असें नामांतर होतें. याचा पुत्र वृक. [ ९, ८, २, ]

**भर्ग**-काश्यपकुलांतील वीतिहोत्राचा पुत्र. याचा पुत्र भागभूमि. [ ९, १७,९ ]

( २ ) तुर्वसुकुलांतील वन्हिराजाचा पुत्र. याचा पुत्र भानुमान्. [ ९,२३,१६ ]

( ३ ) शंकराचे नांव. रुद्रापैकीं एक.

( ४ ) भारतवर्षीय पूर्वानिषाद देश.

**भर्तृस्थान**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**भर्म्याश्व**-अजमीढपुत्र नीलकुलांतील अर्क राजाचा पुत्र. यास भद्राश्व असेंहि नांव आहे. याला मुद्गल, यवीनर. बृहदिषु, कांपिल्य, आणि संजय असे पांच पुत्र होते. देशाचे संरक्षण करण्यास हे पांच पुत्र 'अलं' (पुरेत) असे हा म्हणत असे, म्हणून यांस 'पंचाल' व यांच्या देशास पांचाल असें नांव पडलें. [ ९, २१, ३१ ते ३३ ]

**भलंदक**-वैश्यजातीय एक मंत्रद्रष्टा ऋषि.

**भलंदन**-सूर्यवंशीय दिष्टपुत्रनाभागाचा पुत्र. याचा पुत्र वत्सप्रीति [९,२,२३].

( २ ) अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**भल्लाट**-भारतवर्षीय एक देश.

**भल्लाद**-अजमीढपुत्र बृहदिषूच्या कुलांतील उदक्स्वनाचा पुत्र. [ ९,२१,२६ ].

**भव**-शंकराचें नांव [ ५,२४,१७ ].

( २ ) एकादश रुद्रांपैकीं एक.

( ३ ) वसुदेव व रथराजि यांचा पुत्र.

**भवनंदि**-कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षी.

**भवानी**-शंकराची पत्नी. वितलांत शंकराची भवानीसह क्रीडा. [ ५,२४,१७ ].

**भविष्य**-अठरा महापुराणापैकीं एक. याची श्लोकसंख्या चौदा हजार पांचशें आहे.

**भस्म**-अथर्वण वेदोपानिषत्.

**भस्मासुर**-शंकराच्या भस्मापासून उत्पन्न झालेला एक असुर. ज्याच्या मस्तकीं हात ठेवशील तो मृत होईल, असा यास शंकराचा वर होता. हा त्रैलोक्यास पाडा देऊं लागला असतां, विष्णूनें स्त्रीरूपानें यास मोह पाडून युक्तीन याचा वध केला.

**भागवत**-भक्तिमार्ग प्रमाण एक ग्रंथ. हा नारदाच्या उपदेशावरून व्यासानें रचिला. याच्या दोन परंपरा आहेत, एक शेष परंपरा व दुसरी ब्रह्मदेवाची परंपरा. हें अठरा महापुराणांपैकीं एक असून याची श्लोकसंख्या अठरा हजार आहे. [१,१,३-१२,१३,५].

( २ ) शुंगवंशीय राजा. [१२,१,१८].

**भागवित्तायन**-वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**भागवित्ति**-भृगु कुलांतील एक ऋषि.

**भागिल**—" "

**भागीरथी**-गंगेचें नामांतर

**भागुरि**-युधिष्ठिराच्या अश्वमेधांतील सदस्य

**भांगासुरि**-ऋतुपर्ण राजास नामांतर.

**भाण्डायनि**-एक ऋषि.

**भाण्डीरक**-वृंदावनासमीपच्या अरण्यांतील एक वटवृक्ष. [ १०,१८,२२ ]

**भानु**—दक्षकन्या व धर्मपत्नी. हिचा पुत्र देवऋषभ. [ ६,६,४-५ ]

**भानु**—सूर्यवंशीय ध्रुवसंधि कुलांतील प्रतिव्योम राजाचा पुत्र. याचा पुत्र दिवाक. [ ९,१२,१० ]

( ३ ) श्रीकृष्ण व सत्यभामा यांचा पुत्र हा महारथी होता. [ १०,६१,१० ]

( ४ ) सूर्यवंशीय चंद्रगिरीचा पुत्र. याचा पुत्र चंद्र.

( ५ ) स्वारोचिष मनूचा एक पुत्र.

( ६ ) प्राधापुत्र गंधर्वांतील एक.

**भानुदत्त**-शकुनीचा एक भाऊ.

**भानुदेव**-कर्णानें मारिलेला पाण्डवपक्षीय राजा.

**भानुनीथ**-एक बलाढ्य यादव.

**भानुमती**-सूर्यवंशीय सगराची पत्नी. हिला केशिनी असें नांव होतें.

( २ ) दुर्योधनाची पत्नी.

( ३ ) बृहस्पतीची पत्नी शुभा तिच्या सात कन्यांतील ज्येष्ठ.

**भानुमान्**-सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील बृहदश्व राजाचा पुत्र. याचा पुत्र प्रतीकाश्व. [ ९, १२, ११ ]

( २ ) विदेहवंशीय केशिध्वजाचा पुत्र. याचा पुत्र शतद्युम्न. [ ९, १३ २१]

( ३ ) तुर्वसुकुलांतील भर्ग राजाचा पुत्र. याचा पुत्र त्रिभानु [९,२३,१६]

( ४ ) श्रीकृष्ण व सत्यभामा यांचा एक पुत्र. [ १०, ६१, १० ]

**भानुविंद**-एक यादव. [ १०, ८६, १४ ]

**भानुसेन**-भीमानें मारिलेला एक कर्णपुत्र.

**भार**-( वजन , आठ हजार तोळे म्हणजे एक भार [ १०, ५६, ११ ]

**भारत**-कृष्णद्वैपायन व्यासानें लिहिलेला इतिहास. याची श्लोकसंख्या एक लक्ष आहे हा पूर्ण होण्यास तीन वर्षे लागलीं. [ १, ४, २५ ]

( २ ) देश. ( भरतवर्ष शब्द पहा. )

**भारतीयुद्ध**-कौरव पांडवांचें कुरुक्षेत्रांत झालेले युद्ध. यांच्या सेनेनें वीस कोस चौरसचौरस जागा व्यापिली होती. या युद्धांत पाण्डवांकडे सात अक्षौहिणी व कौरवांकडे अकरा अक्षौहिणी सैन्य होतें. एका अक्षौहिणीची संख्या दोन लक्ष अठरा हजार सातशें होते, परंतु महाभारतांत असें म्हटलें आहे कीं, ' दशायुतानामयुतं सहस्राणिच विंशतिः । कोटयः षष्टिश्च षट्चैव ह्यस्मिन राजन् मृधे हताः॥९॥ ( भा. स्त्री. अ. २६ ) यावरून एका अक्षौहिणीत तीन कोटीच्यावर सैन्य असावें असें दिसतें. हें युद्ध १८ दिवस झालें. ह्या मुदतींत पाण्डवांकडे धृष्टद्युम्न हा एकच सेनापति होता. पण कौरवांकडे दहा दिवस भीष्म, पांच दिवस द्रोण, दोन दिवस कर्ण, व एक दिवस शल्य, असे चार सेनापति झाले. या युद्धांत पांच पांडव, कृष्ण, सात्यकि, असे सात पांडवांकडे व अश्वत्थामा, कृप आणि कृतवर्मा, असे तीन कौरवांकडे मिळून दहाच वीर जिवंत राहिले होते.

**भारद्वाज**—परिक्षिताकडे आलेला एक ऋषि. [ १,१९,१० ].

( २ ) अंगिराकुलांतील एक ऋषि. हा चालू मन्वंतरांतील बारावा व्यास.

( ३ ) द्युमत्सेन राजाचा अरण्यांतील मित्र. एक ऋषि. ( भा. वन. )

**भारद्वाज**-द्रोणाचार्याचें नामांतर.
( ५ ) दक्षिणसमुद्रावरील एक तीर्थ. ( नारीतीर्थ शब्द पहा. )
**भारद्वाजि**-भारद्वाज ऋषीचा पुत्र.
**भारद्वाजी**-भारतवर्षीय नदी.
**भारुण्डवन**-केकय देशांतून अयोध्येकडे येतांना लागणारें वन.
**भर्गभूमि**-सोमवंशीय काश्यकुलांतील भर्ग राजाचा पुत्र. [ ९, १७, ९ ]
**भार्गव**-भृगुकुलांतील पुरुष, विशेषतः परशुराम. [ १०, ७४, ९ ]
(२) चालूमन्वंतरांतील पंचवासावा व्यास.
(३) भारतवर्षीय देश
**भार्गवत**-अंगिरा कुलांतील ब्रह्मर्षि.
**भार्गेय**-भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.
**भालुकि**-पाण्डवांबरोबर द्वैतवनांत असलेला एक ऋषि.
**भावन**—उत्तममन्वंतरांतील देव विशेष.
**भावना**-अथर्वण वेदोपनिषत्
**भावास्यायनि**-अंगिरा कुलांतील एक ऋषि.
**भासकर्ण**-मारुतीनें मारिलेला रावणाचा सेनापति. ( वा. रा. सुंदर. )
**भासी**-कश्यप व ताम्रा यांची एक कन्या.
( २ ) कश्यप व प्राधा यांच्यापासून झालेली एक अप्सरा
**भास्करी**-एक ब्रह्मर्षि. ( भा. शांति. )
**भिक्षु**-( संन्यासी ) [ १, ६, २ ]
( २ ) यजुर्वेदोपनिषत्
**भीम**-एकादश रुद्रांपैकीं एक. [ ६,६,१७ ]
( २ ) पुरूरवापुत्र विजयाचा पुत्र. याचा मुलगा कांचन [ ९, १५, ३ ].
( ३ ) पाण्डवांपैकीं दुसरा. ( भीमसेन शब्द पहा. ) [ १, ७, ५१ ]



**भीम**-मुनीस झालेला एक देवगंधर्व.
( ५ ) शंकरानें मारिलेला एक दैत्य.
( ६ ) रावणपक्षीय एक राक्षस.
( ७ ) विदर्भ देशाचा राजा. यास दमन ऋषीच्या प्रसादानें दम, दांत, व दमन असे तीन पुत्र व दमयन्ती कन्या होती. तीच नलपत्नी दमयंति.
**भीमक**-भीष्मकाचें नामांतर.
**भीमकी**-रुक्मिणीचें नामांतर.
**भीमजानु**-एक राजर्षि
**भीमनद**-प्रलय मेघांतील दुसरा.
**भीमबल**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.
**भीमरथ**-सोमवंशीय काश्यकुलांतील केतुमान राजाचा पुत्र. याचा पुत्र दिवोदास [ ९, १७, ५ ] यास भीमसेन असेंहि नांव होतें.
( २ ) सोमवंशीय ज्यामघ कुलांतील क्रथवंशीय विकृतीचा पुत्र, याचा पुत्र नवरथ [ ९, २४, ४ ].
( ३ ) दुर्योधनपक्षीय एक राजा.
( ४ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र
**भीमरथी**-एक नदी. हिला भीमा, भीमरथा अशीं नांव आहेत, ही सह्याद्रिपर्वतांत भीमाशंकराजवळ उगम पावून रायचुरापासून सोळा मैलावर कृष्णेस मिळते हिला मुळा, मुठा, निरा, माण व मिना या नद्या मिळतात. हिचे कांठीं पंढरपूर क्षेत्र आहे येथें बलराम तीर्थयात्रेचे वेळीं आला होता. [५,१९,१८व१०,७९,१२
**भीमसेन**-पण्डु राजाची पत्नी कुंतीला वायूच्या मंत्रप्रभावानें झालेला पुत्र

याला भीम, वायुपुत्र, वृकोदर, इत्यादि नांवें आहेत. यास दहा हजार हत्तींचे बळ असे. याला द्रौपदीपासून श्रुतसेन, हिडिंबेपासून घटोत्कच, कालीपासून सर्वगत असे पुत्र झाले [ ९,२२,२७-३१ ]. यानें हिडिंब, बकासुर, कीचक इत्यादि दैत्यांचा वध केला. अज्ञातवासांत असतां यानें बल्लव हें नाव धारण केलें होतें. हा धनुर्वेदांत द्रोणाचार्यांचा आणि गदायुद्धांत बलरामाचा शिष्य होता. जरासंधाचा वध [ १०,७५,४ ] हा पूर्वदिशेला दिग्विजयाला गेला होता. राजसूय यज्ञात हा पाकशाळेचा प्रमुख होता [ १०,७२,४४ ] याचें शरीर भव्य असून अंगकांति तप्तसुवर्णासारखी दिव्य होती, याच्या ध्वजावर सिंह असून रथाचे घोडे अस्वली रंगाचे असत, याच्या धनुष्याचें नांव वायव्य व शंख पौण्ड्र, याचें मुख्य आयुध गदा. भारतीयुद्धांत यानें दुर्योधनादि शंभर धृतराष्ट्रपुत्र व अनेक अन्य वीर मारिले, युधिष्ठिर राजा असतां हा युवराज होता, हा युधिष्ठिराबरोबरच महाप्रस्थानाला गेला. [ १, १५, १५ ]

( २ ) पांडवकुलांतील जनमेजयाच्या चार पुत्रांपैकीं एक. [९,२२,३५]

**भीमा**–( भीमरथी शब्द पहा. )

**भीमाशंकर**–द्वादशज्योतिर्लिंगांपैकीं एक, येथंच भीमानदीचा उगम आहे.

**भीषण**–अष्टभैरवांतलि एक.

**भीषज**–बकासुराचा पुत्र. पांडवांचा अश्वमेधाचा अश्व मेदोहा नामक पुरोहिताच्या अनुमतीनें यानें धरिला, त्यावेळीं अर्जुनाशीं याचें युद्ध होऊन त्यांत हा मारला गेला. ( जै. अश्व. )

**भीष्म**–सोमवंशीय पूरुकुळांतलि शंतनु व गंगा यांचा आठवा पुत्र. हा द्यु नामक वसूच्या अंशानें झाला होता, हा वेदविद्या वसिष्ठाजवळ व धनुर्विद्या परशुरामाजवळ शिकला. यानें एकदां युद्धांत परशुरामाचाहि पराभव केला. आपल्या पित्याकरिता यानें आजन्म ब्रह्मचर्य व्रत धारण केलें होतें. काशीराजाच्या तीन कन्या स्वयंवरांत हरण करून त्यापैकीं अंबा व अंबालिका यांचा विवाह यानें विचित्रवीर्याशीं लावून दिला. भारतीयुद्धांत हा दुर्योधनाचा सेनापति असतां दहा दिवस यानें अपूर्व युद्ध केलें. शेवटीं अर्जुनानें शिखंडीस पुढें करून यास शरपंजरीं निजविलें. हा इच्छामरणी होता. भारतीयुद्धानंतर यानें धर्मराजास अनेक धर्मांचा उपदेश केला. [ १, ९, २७ व ९, २२, १९ ], भीष्मकृत श्रीकृष्णस्तुति, व श्रीकृष्णचरणीं देह समर्पण [१,९,३२-४३] याचें मूळचें नांव देवव्रत होतें. [ १,९,१ ] याचें वय द्रोणाचार्यांहून दुप्पटीपेक्षांही अधिक होतें. हा सत्यप्रतिज्ञ, मूर्तिमंत ब्रह्मचर्य, उत्तम वक्ता, चांगला विद्वान, महापराक्रमी आणि भगवद्भक्त होता.

**भीष्मक**-विदर्भदेशाचा राजा. याची राजधानी कुण्डिनपुर. यास रुक्मि, रुक्मरथ, रुक्मबाहु, रुक्मकेश, रुक्ममाली, असे पांच पुत्र व रुक्मिणी कन्या होती. ती श्रीकृष्णाची पत्नी. [ ३,३,३, व १०,५२,१६ ] याला हिरण्यरोमा, भीमक, अशीं नामांतरें होतीं.

( २ ) भोजकट नगरीचा राजा. सहदेव दक्षिणदिग्विजयाला निघाला असतां यानें त्याच्याशीं दोन दिवस युद्ध केलें.

**भीष्मसू**-गंगेचें नांव.

## भु

**भुज पुर**-कश्यपकुळांतील एक ब्रह्मर्षि.

**भुज्यु**-एक ऋषि. यास लाह्यायनि म्हणत.

**भुंजकेश**-दुर्योधनपक्षीय एक राजा.

**भुमन्यु**-एक गंधर्व.

**भुवन**-एक ऋषि.

( २ ) बारा भार्गव देव पैकीं एक.

**भुवमन्यु**-मन्यूचें नामांतर.

**भुशुंडी**-( गोफण ) [ ६,१०,२३ ]

## भू

**भूत**-वसुदेव व पौरवी यांचा पुत्र [९,२४,४७]

( २ ) भृगुपुत्र एक ब्रह्मर्षि.

**भूतकर्मा**-सभापतिनामक कौरवपक्षीय राजा.

**भूतकेतु**-दक्षसावर्णि मनूचा पुत्र [८,१३,१८]

**भूतज्योति**-सूर्यवंशीय नृगपुत्र सुमतीचा मुलगा. याचा मुलगा वसु [९,२,१७]

**भूतधामा**-एक इंद्र,

**भूतनन्द**-कलियुगांतील किलकिलानगरींत झालेला एक राजा [ १२,१,३२ ]

**भूतपती**-पिशाचाधिपति रुद्र. [१,२,२६]

**भूतपती**-विवर्तोपादान रूपानें पंचमहाभूतांस आधार असलेला शिव.

**भूतरय**-पांचव्या रैवत मन्वंतरांतील देव. [ ८,५,३ ]

**भूतशर्मा**-दुर्योधनपक्षीय राजा.

**भूतसंतापन**-हिरण्याक्षाचा पुत्र. [७,२,१८]

**भूति**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**भूमा**-प्रियव्रतवंशीय प्रतिहर्ता व स्तुति यांचा कनिष्ठपुत्र. याची पत्नी ऋषिकुल्या व पुत्र प्रस्ताव [ ५,१५,५ ].

**भूमिंजय**-विराटपुत्र उत्तराचें नामांतर.

( २ ) दुर्योधनपक्षीय राजा.

**भूमित्र**-कलियुगांत झालेल्या कण्वपरंपरेंतील वसुदेवाचा पुत्र. याचा पुत्र नारायण [ १२,१,२० ]

**भूमिनी**-अजमीढाच्या चार स्त्रियांपैकीं एक

**भूमिपाल**-दुर्योधनपक्षीय एक राजा .

( २ ) पाण्डवपक्षीय एक राजा

**भूयसि**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**भूरि**-सोमवंशीय जन्हुकुलांत जन्मलेल्या बाल्हीकपुत्र सोमदत्ताचा पुत्र. भारतीयुद्धांत हा दुर्योधनाकडे होता. यास रात्रियुद्धांत सात्यकीनें मारिलें. [ ९,२२,१८ ], ( भा. द्रोण. )

**भूरितेजा**-पाण्डवपक्षीय राजा. (भा. उद्योग)

**भूरिद्युम्न**-एक राजा. (कृशतनु शब्द पहा)

**भूरिश्रवा**-सोमवंशीय जन्हुकुलांतील सोमदत्ताचा पुत्र. हा दुर्योधनाचा परममित्र होता. यानें भारतीयुद्धांत सात्यकीचे दहा पुत्र मारिले, शेवटीं अर्जुनानें यास घायाळ केलें असतां सात्यकीनें यास मारिलें. [ ९,२२,१८ ] ( भा. द्रोण. )

( २ ) शुकाचार्य व पीवरी यांचा पुत्र.

**भूरिश्रुत**–शुकपुत्र भूरिश्रव्यास नामांतर.

**भूरिषेण**–दहाव्या ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतील पुत्र [ ८,१३,२१ ],

( २ ) वैवस्वत मनुपुत्र शर्यातीच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ [ ९,३,२७ ]

## भृ

**भृगु**–स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवाच्या त्वचेपासून झालेला मानसपुत्र. [ ४, १२,२८ ] याची पत्नी कर्दम कन्या ख्याति. व धाता, विधाता असे दोन मुलगे, आणि श्री नांवाची कन्या, ती विष्णूला दिली होती. [ ३,२४,२३ व ४,१,४३ ] सोमप नांवाचे पितर याचे पुत्र होत यानें दक्षयज्ञांत नंदीला शाप दिला, [४,२, २७ ] वीरभद्रानें याची श्मश्रु उपटली मेषाची श्मश्रु याला मिळो, असा शंकराचा वर.[४,५,१९ व ४,७,५]

( २ ) ब्रह्मदेवाच्या शापानें ब्रह्ममानस-पुत्र दग्ध झाल्यावर हा वरुणाच्या यज्ञांत अग्नीतून उत्पन्न झाला, व वरुणानें याचा स्वीकार केला. यास वारुणि भृगु म्हणतात. यास पुलोमा स्त्री व बारा देव आणि सात ऋषि पुत्र होते. त्यांचीं नांवें–भुवन, भौवन, सुजन, सुजन्य, शुचि, क्रतु, मूर्द्धा, त्याज्य, वसुद, प्रभव, अव्यय, आणि दक्ष. ऋषींचीं नांवें च्यवन, वज्र-शीर्ष, शुचि, और्व, शुक्र, वरेण्य अथवा विभु व सवन. ( भा. अनु. अ. ८५ ) भृगुनामक ऋषीस ऋषींनीं तीन देवांत श्रेष्ठ कोण हें पाहण्यास पाठविलें होतें. [ १०,८९,२ ]

**भृगु**–एक ऋषि. [ १,१९,९, ]

( ४ ) भाद्रपदमहिन्यांत विवस्वान सूर्या-बरोबर असणारा ऋषि[१२,११,३८]

(५) चाक्षुषमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

( ६ ) वारुणि कवीचा एक पुत्र.

( ७ ) भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( ८ ) कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**भृगुकच्छ**–(भडोच) बलीनें येथ यज्ञ केला.

**भृगुतुंग**–एक पर्वत. यावर ययाति राजानें तप केलें.

**भृगुदास**–भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**भृगुप्रस्रवण**–हिमालयाचें शिखर, येथें सगर राजानें तप केलें.

**भृंगी**—शिवगणांपैकीं एक.

**भृत**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**भृनकील**–विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**भृशाश्व**–एक ऋषि. देवप्रहरणाचा पिता.

## भे

**भेरी**—( वाद्य ) नगारा [ १,१०,१५ ]

**भेरुण्ड**—जटायूचा एक पुत्र

## भै

**भैमसनि**–भीमपुत्र घटोत्कच.

**भैम्य**—घटोत्कचाचें नांव.

**भैरव**–( अष्टभैरव शब्द पहा. )

## भो

**भोगवती**–पातालांतील नागांची नगरी. येथें शेष, वासुकि, तक्षक, कर्कोटक इत्यादि अनेक नागांचीं कुलें आहेत, हिला पूतकारीहि म्हणतात [१ ११,११]

( २ ) पातालांतील एक नदी, हा स्वर्धु-नीचा तिसरा ओघ.

**भोगावती**-सरस्वती नदीस नांव.

**भोज**—सोमवंशीय यदुकुलांतील महाभोज राजाचे वंशज. या नांवाचें एक राष्ट्रहि होतें [ ९,२४,११ व १,११,११ ]

( २ ) कश्यपकुलांतील एक ऋषि.

( ३ ) हैहय कुलांतील एक कुल.

**भोजकट**–भोजदेशांत ( वऱ्हाडांत एलिचपूरच्या जवळ ) रुक्मीनें भोजकट नांवाचें शहर वसविलें, सध्यांही तेथें या नांवाचें एक खेडें आहे अनिरुद्धाचें जन्म येथ झालें [१०,६१,१९]

**भोजन** कौंचद्वीपांतील पर्वत, [५,२०,२१]

**भोजनगर**–उशीनर राजाची राजधानी. मध्यहिंदुस्थान, भोपाळसंस्थानांत हें एक खेडें आहे.

**भोजपायन**–कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**भोजा**–ऋषभदेववंशीय वीरव्रत राजाची स्त्री, मंथु आणि प्रमंथु यांची माता. [५,१५,१५]

( २ ) आर्यक नागाची कन्या, हिला मारिषा असें नांव होतें. शूराची स्त्री व वसुदेव इत्यादिकांची माता.

( ३ ) ज्यामघानें हरण करून आणलेली कन्या, त्याच्या विदर्भ पुत्राची स्त्री.

भौ

**भौत्य**–ब्रह्मसावर्णि मनूचें नामांतर.

**भौम**–मंगळ ग्रह.

( २ ) नरकासुराचें नांव. [१०,५८,५८]

**भौमतापन**–गौरपराशर कुलोत्पन्न ऋषि.

**भौमन**–विश्वकर्म्यास नामांतर.

**भौवन**–ऋषभदेववंशीय मंथु व सत्या यांचा पुत्र. याची पत्नी दूषणा व पुत्र त्वष्टा. [५,१५,१५]

( २ ) बारा भार्गदेवांतील एक.

**भ्रमर**–एक राजपुत्र, जयद्रथाचा मित्र.

**भ्रमि**–शिशुमार प्रजापतीची कन्या व ध्रुवाची पत्नी [४,१०,१].

**भ्राजिष्ठ**–प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठाच्या सात पुत्रांतील पांचवा [५,२०,२१]

( २ ) कौंचद्वीपांतील पांचवा वर्ष,

**भ्राष्ट्रकायन**–भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**भ्राष्ट्रकृत**–अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

म

**मकर**–मेरूच्या परिस्तरणगिरींतील उत्तरेकडील पर्वत. [५,१६,२७]

( २ ) कुबेराच्या नऊ निधींपैकीं एक.

**मकरध्वज**–मदनाचें नामांतर.

( २ ) मारुतीच्या श्लेष्म्यापासून मगरीला झालेला पुत्र.

( ३ ) चंद्रहास राजाचा ज्येष्ठ पुत्र.

**मकराक्ष**–खर राक्षसाचा पुत्र, यास रामानें लंकेंत मारिलें.

**मकरा**–भारतवर्षीय एक नदी.

**मखापेत**–कार्तिकमहिन्यांत विष्णुनाम सूर्याबरोबर फिरणारा दैत्य [१२,११,४४]

**मगध**–एक देश. गंगा नदीच्या दक्षिणेस व गंगा व शोण या नद्यांच्या संगमाच्या पूर्वेस बिहार प्रांतातील गया, पाटणा व शहाबाद या जिल्ह्यांचा मगधांत समावेश होतो. या देशाला वराह, वृषभ, ऋषिगिरि आणि चैत्यक, असे पांच सामान्य पर्वत मर्यादा आहेत. याची प्राचीन राजधानी गिरिव्रज. येथें दशरथाच्या वेळीं शूरसेन ( सुमित्रेचा पिता ) व पाण्डवाच्या वेळीं जरासंध राजा होता. [१०,५०,२] ( भा. सभा. )

**मघवा**–इंद्राचें नांव. चालू मन्वंतरांतील सातवा व्यास.

**मघा**-एक नक्षत्र, सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक हें शिशुमारचक्राच्या डाव्या बरगडीवर आहे. [५,२३,६]

**मंकणक**-वायुपत्नी सुकन्येचा पुत्र सारस्वत तीर्थावर तपसमाप्तीनंतर याच्याबोटास दर्भ लागला असतां त्यांतून उसाच्या रसाप्रमाणे रक्त वाहूं लागलें. त्यामुळें यास आपल्या तपाचा अभिमान उत्पन्न झाला, पण शंकरांनीं याचा अभिमान नाहींसा केला. याला वायुवेग, वायुबल, वायुहा, वायुमण्डल, वायुज्वाल, वायुरेता आणि वायुचक्र, असे सात पुत्र होते ( भा.वन. )

**मंकि**-एक शेतकरी. आपल्या बैलांच्या मानेवर जूं ठेऊन शेतावर जात असतां, एका उंटानें तें जूं बैलांसह मानेनें उचलले; व मान झटकतांच ते बैल खालीं पडून मृत्यु पावले. हें पाहून या शेतकऱ्यास दैवयोगाचा चमत्कार वाटून वैराग्य उत्पन्न झालें.

**मंगल**-आदिवराहापासून भूदेवीस झालेला पुत्र. हा कल्पारंभीचा मंगलमंडलाधिपति होय. सध्यां त्या ठिकाणीं वीरभद्र नामक शिवगण मंगल झाला आहे यास अंगारक असेंहि नांव आहे. नवग्रहांपैकीं एक. सूर्यमालेंतील एक ग्रह. हा गुरु आणि पृथ्वी यांच्यामध्यें आहे. हा दिसण्यांत तांबूस वर्णाचा असल्यामुळें याला, अग्नि, लोहितांग, अंगारक, अशीं नांवें मिळालीं आहेत मंगळ हा क्रूर ग्रह मानिला आहे. सूर्यापासून मंगलाचें मध्यम अंतर १४१० लक्ष मैल आहे; व पृथ्वीचें ९२३ लक्ष मैल आहे. मंगळाला दोन उपग्रह आहेत. बुधाखेरीज सर्व ग्रहांत मंगळ लहान आहे. संशोधकास याची माहिती इतर ग्रहांपेक्षां विशेष मिळालेली आहे.

( २ ) रामसभेंतील एक हास्यकार.

**मंगलप्रस्थ**-भारतवर्षीय पर्वत [५,१९,१६]

**मचक्रुक** कुरुक्षेत्रांतील एक स्थान व तीर्थ.

**मंजुला**-वंजुलानदीचें नामांतर.

**मणिकंधर**-कुबेर सेनापतींतील एक.

**मणिकर्णिका** भागीरथीसंबंधी तीर्थ विशेष.

**मणिकार्मुकधर**-कुबेराचा एक सेनापति.

**मणिकूट**-प्लक्षद्वीपांतील पर्वत [ ५,२०,४ ]

**मणिग्रीव** कुबेराचा पुत्र, व नलकूबेराचा भाऊ हा नारदाच्या शापानें अर्जुनवृक्ष झाला होता. श्रीकृष्णानें याचा उद्धार केला [१०,९,२३].

**मणिद्वीप**-एक सामान्य द्वीप. येथें महिषासुर रहात होता.

**मणिधर**-लोहितपर्वतावर राहणारा यक्ष.

**मणिनाग** एक नाग व भारतवर्षीय तीर्थ.

**मणिपूर**-चित्रवाहन राजाची नगरी बभ्रुवाहन राजा होता [९,२२.३२ ]

( २ ) निवातकवचाचें नगर (वा.रा.)

**मणिपुष्पक**-सहदेवाचा शंख.

**मणिभद्र**-शिवगण.

( २ ) कुबेराचा एक सेनापति. हा चंद्रप्रभा पर्वतावर रहात असे.

**मणिभूष** कुबेराचा एक सेनापति.

**मणिमता**-भारतवर्षीय नदी व वातापि व इल्वल यांची नगरी. हिला दुर्जया असेंहि म्हटलें आहे.

**मणिमान्**--शंकराचा एक गण [ ४,४,४ ].
( २ ) पाताल लोकांतील नाग.
( ३ ) कुबेराचा सेनापति, एक राक्षस. यास अगस्त्याचा शाप झाला होता. पाण्डव हिमवान् पर्वतावर असतां, एकदां कमळें आणण्याकरितां भीम कुबेरवनांत गेला असतां, भीमाचे हातून हा मरण पावला. (भा.वन )
( ४ ) दुर्योधनपक्षीय एक राजा.
( ५ ) द्रोणाचार्यानें मारिलेला पाण्डवपक्षीय राजा.हा पूर्वेकडील राजा होता.

**मणिवक्र**-आप नामक वसूचा पुत्र.

**मणिवाहन**-सोमवंशीय उपरिचरवसु व गिरिका यांचा एक पुत्र.

**मणिस्रग्वि**-कुबेराचा एक सेनापति यक्ष.

**मण्ड**-भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**मतंग**-दाशरथि रामास फळें देणाऱ्या शबरीचा गुरु ( वा. रा. अरण्य. )
( २ ) एक ऋषिपुत्र. हा रथाला गर्दभ जोडून जात असता त्यांतील रासभी म्हणाली, प्राणिमात्रांस पाडा देणें हा चाण्डालांचा धर्मच आहे हे ऐकून या भाषणाचा अर्थ काय, म्हणून त्या रासभीला यानें प्रश्न केला. तेव्हां ती म्हणाली, तुझा जन्म शूद्रसमागमापासून झाले असल्यामुळें तुझी कृति चांडालाप्रमाणें आहे. हें ऐकून यास पश्चात्ताप झाला आणि तपाचरण करून हा छन्दोदेव झाला ( भा अनु. )

**मतंगपर्वत** ऋष्यमूक आणि मलय या दोन पर्वताचा आधार पर्वत.

**मतंगसर**-पंपासरोवराजवळील एक सरोवर

**मतंगाश्रम**-क्रौंचारण्याच्या पूर्वकडे असणारा मतंग ऋषीचा आश्रम.

**मतिनार**-( २ ) अंतिभार राजास नामांतर.

**मत**-लंकेंतील एक राक्षस.
( २ ) महापार्श्वाचें नामांतर.

**मत्तमयूरक**-लोहितकपुरींतील लोकविशेष.

**मत्स्यगंध**-भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**मत्स्यगंधा**--कृष्णद्वैपायनमाता सत्यवती.

**मत्स्यदग्ध**-अंगिरा कुलांतील ऋषि.

**मत्स्यदेश**-विराट राजाचा देश. जयपूरच्या उत्तरेस व यमुनेच्या पश्चिमेस. [ ९, १०, ३४ व ३, १, २४ ]

**मत्स्यनदी**-भारतवर्षीय एक नदी.

**मत्स्यपुराण** चवदा हजार श्लोकात्मक अठरा पुराणांपैकीं एक पुराण. [१२,१३,८]

**मत्स्यराज**-उपरिचरवसु राजास मत्स्यीच्या उदरीं झालेल्या मिथुनांतील पुत्र. मत्स्यगंधेचा भ्राता.

**मत्स्यवाहन**-वरुणास नांव.

**मत्स्यावतार**-विष्णूचा दहावा अवतार. [ १, ३, ५ ] यानें वैवस्वत मनूचें नैमित्तिक प्रलयाचे वेळी रक्षण केलें. एके दिवशीं द्राविडदेशाधिपति सत्यव्रत राजा कृतमाला नदीचे तीरीं जलानें तर्पण करीत असतां त्याच्या हातांत एक शफरी ( लहान मासा ) आली. तिला तो जलांत सोडीत असतां, मला या जलांत सोडूं नको, असें ती म्हणाली. तेव्हां राजानें तिला कमण्डलूंत ठाविलं. परंतु ती क्रमानें वाढत असतां, राजा तिला निरनिराळया जलाशयांत सोडीत असे. शेवटीं समुद्रांत सोडण्याला तो

राजा तयार झाला, पण मत्स्यानें तसें करूं नको म्हणून सांगितलें. हा मत्स्यरूप भगवान आहे, असें समजून राजानें त्याची स्तुति केली. तेव्हां मत्स्यानें सांगितलें, आतां प्रलय होणार आहे, रितां एक नौका करून त्यांत वेद, बीजें, ऋषि यांसह तूं बस, व प्रलयांत ती नौका हलूं लागली कीं, मी तेथें येईन. मग ती नौका तूं माझ्या शिंगाला वासुकी सर्पानें बांध असें सांगून भगवान अंतर्धान पावले. पुढें सातव्या दिवशीं प्रलयाला सुरवात झाली. त्या नौकेंत ऋषी इत्यादिकांसह बसलेल्या राजानें भगवंताचें ध्यान केलें, त्याक्षणीं सोनरी रंगाचा लक्ष योजनें विस्तीर्ण, एक शिंगाचा असा मत्स्य प्रगट झाला, त्याच्या शिंगाला वासुकीनें ती नौका बांधिली. त्यावेळीं मत्स्यरूपी भगवंतानें ज्ञान सांगितलें तें मत्स्यपुराण होय. हा अवतार रम्यक खण्डांतील लोकांची उपास्यदेवता आहे. [ ८,२४,७-५८ व ५, १८, २४]

**मथन**–विष्णूनें मारिलेला तारकासुरपक्षीय असुर. ( मत्स्य. अ. १५१ )

**मथित**-भृगुकुलांतील असुर.

**मथुरा**–संयुक्त प्रांतातील एक शहर. हें यमुना नदीच्या पश्चिमतीरावर आहे. पूर्वी रावणभगिनी कुंभीनसीचा पति मधु नामक राक्षस येथें तप करीत असल्यामुळें या प्रांतास मधुवन असें नाव पडलें. त्यानें मधुरा नांवाची नगरी स्थापिली. पुढें त्याचा पुत्र लावणासुर हा राजा असतां त्याचा नाश करून शत्रुघ्न येथें राहूं लागला. [९,११,१४] हिलाच पुढें मथुरा नांव मिळालें, व देश शूरसेन नांवानें प्रसिद्ध झाला. श्रीकृष्णाचें जन्म येथें झालें. मोक्षदायक सप्तपुऱ्यांपैकीं एक. [ १, १५, ३९ व १०, १, २७ ] हिला मधुपुरी असेंहि नांव आहे.

**मद**–रुद्रगणांपैकीं एक. [ ४, ४, ४ ].

( २ ) ब्रह्मदेवाचा एक पुत्र.

( ३ ) इंद्राचा पराभव करण्याकरितां च्यवनभार्गवानें अग्नींतून उत्पन्न केलेला राक्षस.

( ४ ) श्रीरामचंद्राच्या सुज्ञ नामक मंत्र्याचा पुत्र.

**मदन**-ब्रह्मपुत्र काम. हा दुसरे जन्मीं प्रद्युम्न झाला होता [ ३, १, २८ ].

( २ ) धृष्टबुद्धि प्रधानाचा ज्येष्ठ पुत्र. ( चंद्रहास शब्द पहा. )

**मदनमंजरी**-नीलध्वजपुत्र प्रवीराची स्त्री.

**मदनालसा**-चंपकगंधर्वाची स्त्री.

**मदयंती**–कल्माषपाद राजाची पत्नी. राजाला शाप असल्यामुळें हिला वसिष्ठापासून गर्भ धारणा झाली. पण तो गर्भ सात वर्षे झालीं असतांही बाहेर येईना, म्हणून वसिष्ठानें हिचें उदर दगडानें फाडून गर्भ बाहेर काढिला, त्यास अश्मक नांव मिळालें. [ ९, ९, ३८ ].

**मदालसा**–एक राजपत्नी. अलर्क राजाची माता ही ब्रह्मनिष्ठ होती.

**मदिरा** वसुदेवाची एक पत्नी. हिला नन्दादि पुत्र झाले [९,२४,४५–४८]

**मदिराश्व**-सूर्यवंशीय दशाश्वाचा पुत्र. याची राजधानी महिष्मती. यानें आपली कन्या हिरण्यहस्त ऋषीस दिली होती. याचा पुत्र द्युतिमान् ( भा. अनु. शांति. )
( २ ) विराट राजाचा भाऊ यास द्रोणाचार्यानें मारिलें. ( भा. विराट ) यास मदिराक्ष असेंहि नांव होतें.

**मदोत्कट**-एक रुद्रगण.

**मद्र**-सोमवंशीय अनुपुत्र सभानराचे कुलांतील शिबीच्या चार पुत्रांपैकी एक.

**मद्रक**-मद्र देशाचे राजे. हे दिग्विजयाच्या वेळीं भीमाबरोबर होते [१० ७२,१३]
( २ ) कलियुगांतील राज. १२,१,३६].

**मद्रदेश**-भारतवर्षीय एक देश. हा पश्चिम आनर्ताच्या पश्चिमेस असून याची राजधानी शाकल. हा द बियास नदीपासून चिनाबपर्यंत किंवा झेलम नदीपर्यंत पसरला होता. येथें दशरथाच्या वेळीं चारुदेष्ण व पांडवाच्या वेळीं शल्य राजा होता.

**मधु**-एक देश. ( मथुरा प्रांत [९,११,९]
( २ ) यादववंशीय कुल. [१ १ ,११]
( ३ ) ऋषभ देववंशीय विदुनान व सरघा यांचा पुत्र. याचा पुत्र वीरव्रत व पत्नी सुमना [ ५, ५, १५ ].
( ४ ) एक राक्षस. यानें रावणाची मावस बहीण कुंभीनसी, हिला हरण करून तिच्याशीं विवाह केला याची माता लोलाराक्षसी यानें तप करून शंकराला प्रसन्न केलें. व शंकराकडून अजेय शूल मिळविला, व मधुपुरी स्थापिली. याचा पुत्र लवणासुर. [ ९,११,१४ वा. रा. )

**मधु**-सोमवंशीय यदुकुलांतील कार्तवीर्याच्या पांच पुत्रांतील चौथा. याचा पुत्र वृष्णि [ ९,२३ २९ ]
( ६ ) ऋथकुलांतील देवक्षेत्राचा पुत्र. याचा पुत्र कुरुवश. [ ९,२४,५ ]
( ७ ) कृष्णाचा एक पौत्र. हा महारथी होता. [ १०,९०,३३ ]
( ८ ) द्वादशमासांपैकीं पहिला मास. [ १२,११,३३ ]
( ९ ) तिसऱ्या उत्तम मनूचा एक पुत्र.
(१०) कैटभ असुराचा धाकटा भाऊ.

**मधुकुल्या**-कुशद्वीपातील नदी [५,२०,१५]

**मधुकैटभ**-विष्णूच्या कर्णमलापासून झालेले दोन असुर ( दे. भा. ) विष्णूनें यांस वर मागण्यास सांगितलें असतां यांनींच त्यास वर मागण्यास सांगितलें. तेव्हां विष्णूनें माझ्या हातून तुमचा नाश व्हावा असा वर मागितला. यांच्या शरीरमेदानें पृथ्वी भरली म्हणून तिला मेदिनी नांव मिळालें. यांचा पुत्र धुंधु. ( भा. वन. )

**मधुच्छंदस्**-विश्वामित्राचा एक पुत्र. [ ९,१६,२९ ]

**मधुपुरी**-( २ ) मथुरा. [ १०,३८,१ ]

**मधुमत्त**-राम सभेंतील हास्यकार.

**मधुमंत**-दण्डकदेशाधिपतीची राजधानी.
( २ ) भारतवर्षीय एक देश.

**मधुरुह**-प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठाचा दुसरा पुत्र व याचा वर्ष [ ५,२०,२१ ]
( २ ) क्रौंचद्वीपातील एक वर्ष.

**मधुवटी**-भारतवर्षीय तीर्थ.

**मधुवन**-यमुनेच्या तीरावरील एक वन. येथें मधुराक्षसानें तप केल्यामुळ या वनास

हें नांव पडलें. ध्रुवानें येथें तप केलें [ ४,८,४२ व ९,११,१४ ]

( २ ) किष्किंधेजवळील वालीचें वन.

**मधुविला**–समंगानदीचें पहिलें नांव.

**मधुष्पंद**–विश्वामित्राचा एक पुत्र.

**मधुस्रव**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**मध्यदेश**–या देशाची मर्यादा सरस्वतीनदी गुप्त होते तेथून, म्हणजे भटनेरपासून प्रयागपर्यंत होती. ही पूर्वपश्चिम मर्यादा असून उत्तरेस हिमालय व दक्षिणेस विंध्यपर्वत होता. सांप्रत गंगा व यमुना या दोन नद्यांमधील प्रदेशास मध्यदेश म्हणतात.

**मध्यंदिन**-उत्तानपादवंशीय पुष्पार्ण व प्रभा यांचा द्वितीय पुत्र [ ४,१३,१३ ]

**मन**–बारा साध्यदेवांपैकीं एक.

**मनसा**–कश्यपऋषीची कन्या व वासुकीची बहीण. हिला बंगाल्यांत सर्पांची अधिष्टात्री देवता समजतात. सर्पांपासून रक्षण व्हावें म्हणून हिची आराधना करितात. हिला विषहारी असे नांव आहे. (आस्तिक शब्द पहा)

**मनस्विनी**-ऋतेयुपुत्र रंतिभाराची स्त्री.

**मनोषी** प्रत्यूष वसूचा पुत्र देवल. त्याच्या दोन पुत्रांतील एक.

**मनु**–हें साधारण नांव आहे. एका ब्रह्मकल्पांत चवदा मनु होतात. प्रत्येक मनूच्या कालसत्तेस मन्वंतर, एकाहात्तर महाचवदांश युगें इतकें असतें. प्रस्तुतचा श्वेतवाराह कल्प चालू झाल्यापासून स्वायंभू, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत आणि चक्षुष. इतके मनु व त्यांचीं मन्वंतरें होऊन गेलीं असून सांप्रत वैवस्वत मनूचे सत्तावीस पर्याय व अठ्ठाविसाव्या पर्ययांतील कृत त्रेता, द्वापर पुरे होऊन कलीचीं चार हजार नऊशें सत्त्याहत्तर वर्षें गत झालीं आहेत. शेष कलियुग व त्रेचाळस पर्ययासहित वरील काळ गेला म्हणजे हें मन्वंतर पूर्ण होऊन, सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, धर्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि आणि इंद्रसावर्णि, हे मनु होतील व चवदाव्या मनूची कालसत्ता पुरी झाली म्हणजे हा कल्प संपून ब्रह्मदेवाची रात्र होईल, तेव्हां नित्य प्रलय होईल ती रात्र संपताच वैराज नामक सत्ताविसावा कल्प सुरू होईल. प्रत्येक मन्वंतरात मनु, सप्तर्षि, देव, इंद्र व त्यांचे गंधर्वादि अनुयायी होतात. मनुवंशांतील राजे क्रमानें येतात, पण ऋषि, देव, आदि कायम असतात. [ ३,११,२३ ]

( २ ) सरस्वतीच्या उगमाजवळील पर्वतांत असलेले तीर्थ. [ ३,१,२२ ]

( ३ ) एकादशरुद्रांपैकीं एक. [ ३,१२,१२ ]

( ४ ) कृशाश्व व धिषणा यांचा पुत्र. [ ६,६,२० ]

**मनुज**–दहा विश्वेदेवांपैकीं एक.

**मनोजव**-प्रियव्रतपुत्र मेधातिथीचा दुसरा पुत्र व याचा वर्ष [ ५,२०,२५ ]

( २ ) शाकद्वीपांतील एक वर्ष.

**मनोरमा**–एक अप्सरा. प्राधेची कन्या.

( २ ) सूर्यवंशीय ध्रुवसंधि राजाची पत्नी.

( ३ ) सरस्वतीच्या सप्त प्रवाहांतील एक प्रवाहरूप नदी.

**मनोहरा** एक अप्सरा.

**मन्त्रद्रुम**-चाक्षुषमन्वंतरांतील इंद्र [८,५,८]

**मन्त्रमाला**-कुशद्वीपांतील नदी. [५,२०,१५]

**मान्त्रिका**-यजुर्वेदोपनिषत्.

**मन्त्रेश्वर**-नर्मदेवरील एक तीर्थ.

**मन्त्रोपनिषद्**-एक उपासना. ही नारदानें चित्रकेतूला सांगितली. [६,१५,२७].

**मन्थरा**-विरोचन दैत्याची कन्या. ही सर्व पृथ्वीचा नाश करण्यास उद्युक्त झाली असतां, हिला इंद्रानें मारिलें. (वा.रा.)

( १ ) दशरथपत्नि कैकयीची दासी. ही पूर्वीची दुन्दुभि गंधर्वी. रामचंद्रास यौवराज्याभिषेक होत असतां हिनें कैकयीचे मन वळवून दशरथाकडून रामाला वनवासास पाठविलें. ही तीन ठिकाणीं वक्र होती, म्हणून हिला त्रिवक्रा असें म्हणत (वा.रा.)

**मन्थु**-ऋषभदेववंशीय वीरव्रताचा ज्येष्ठपुत्र. याचा पुत्र भौवन. [५,१५,१५].

**मन्द**-रावणपक्षीय एक राक्षस.

**मन्दक**-भारतवर्षीय एक देश.

**मन्दगा**-नदी. उगम-शुक्तिमान पर्वत.

**मन्दधार**-भीमानें दिग्विजयाचे वेळीं जिंकलेला एक राजा.

**मन्दपाल**-एक ऋषि. खाण्डववन दग्ध होत असतां जे चार पक्षी वांचले, त्यांचा हा पक्षिदेहानें पिता होता

**मन्दर**-मेरूच्या पूर्वेकडील पर्वत. शंकराचें एक निवासस्थान [५,१६,११]. या पर्वतावर हिरण्यकशिपूनें तप केलें. [७,३,२]

( २ ) समुद्रमंथनाच्या वेळीं याची रवी केली होती [८,५,१०]. हा पर्वत भागलपूर जिल्ह्यांतील बोसीजवळच्या मोठ्या मैदानांत आहे. याचेजवळ एक शहर होतें तें चोल देशाची राजधानी होतें.

**मन्दरहरिण**—अष्टउपद्वीपांतील पांचवें. [५,१९,३०].

**मन्दराचल**—मन्दर पर्वत.

**मन्दवाहिनी**-शुक्तिमान पर्वतापासून निघालेली एक नदी.

**मन्दाकिनी**-भागीरथीचें नांव [५,१९,१८]

( २ ) नदी. उगम-ऋष्यवान् पर्वत.

**मन्दाकिन्य**—कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**मन्दार**-मन्दरपर्वत. [२,७ १३]

( २ ) वनस्पतिविशेष. हें एक सरळ पसरणारें व पुष्कळ वर्षे टिकणारें झुडुप असून उष्णकटिबंधांत ओलसर ठिकाणीं सांपडतें. दुसरी जात रूक्षप्रदेशांत वाढते [४,६,१४].

( ३ ) हिरण्यकशिपूचा एक पुत्र. यानें इंद्राशीं दीर्घकाळ युद्ध केलें. (भा अनु.)

**मन्दोदरी**-मयासुर व हेमा अप्सरा यांच्या तीन कन्यांपैकीं एक. रावणाची पत्नी. (वा. रा.) ही महापतिव्रता होती.

( २ ) हिंहलद्वीपाचा चंद्रसेन राजा व गुणवती राणी यांची कन्या. ही अति सुंदर होती हिचा विवाह इंद्रदेशाधिपति सुधन्वा राजाचा पुत्र कंबुग्रीव याच्याशीं ठरविला होता, परंतु पुरुष परस्त्रियासक्त होउन स्वपत्नीचा त्याग करतात, म्हणून मला विवाहच कर्तव्य नाहीं, असें हिनें सांगितलें. होतें. कांहीं काळानें हिची कनिष्ठ भगिनी इंदुमतिच्या विवाहप्रसंगीं अनेक राजे आले असतां मद्रदेशाच्या

चारुदेष्ण राजपुत्राचें सौंदर्य पाहून हिचा निश्चय बदलला, व त्याचेबरोबर हिचा विवाह झाला. पण कल्पनेप्रमाणेंच अनुभव येऊन हिला दुःख झालें. ( दे. भा. )

**मन्यु**-सोमवंशीय दुष्यंतपुत्र भरताच्या कुळांतील भरद्वाजाचा पुत्र. यास बृहत्क्षत्र, जय, माहावीर्य, नर, गर्ग, असे पांच पुत्र झाले [ ९,२१,१ ].

**मन्वंतर**-पुराणाच्या दशलक्षणापैकीं एक. सदाचरणीं पुरुषांनीं घालून दिलेला आचार [ २,१०,१-४ ].

**ममता**-बृहस्पती बंधु उतथ्याची पत्नी हिचा पुत्र दिर्घतमा [ ९,२०,३७ ].

**मय**-त्रिपुरांतील एक मायावी असुर. देवांकडून पराजित झालेले असुर याला शरण गेले असतां, यानें त्रिपुर तयार करून त्यांत सर्वांनां ठेविलें होतें. रुद्रानें असुरांचा नाश करण्यास सुरवात केली असतां यानें त्या मृत असुराना अमृतकूपात टाकून सवास सजीव केलें, हा प्रकार पहाताच विष्णूनें गाईचे व ब्रह्मदेवानें वत्साचें रूप घेऊन सव अमृत प्राशन केलें. आाण धम, ज्ञान, वैराग्य, तप, विद्या आणि कृपा इत्यादि शक्तीसामर्थ्यानें रथ, सारथी, ध्वज, अश्व, धनुष्य, कवच आणि बाण, अशा सर्व युद्धसामग्री तयार करून ती शंकराला दिली. नंतर शंकरानें रथारूढ होऊन मध्यान्हकाळीं तीं दुर्भेद्य तीनही पुरें दुग्ध कलीं. [७,१०,५३-६६]

(१) असुरांचा शिल्पी. हा दिल्ली जवळ देवगिरि पर्वतावर रहात असे. हा चालू मन्वंतरांतील विप्रचित्ति दानवाचा पुत्र. यास उपदानवी व कुहू अशा दोन कन्या होत्या. शिवाय हेमा अप्सरेपासून दुन्दुभि आणि मायावी असे दोन पुत्र व मन्दोदरी ही कन्या होती (वा. रा.) खाण्डववन अग्नीस भक्षावयास दिलें, त्यांत हा सांपडला असतां अर्जुनानें याचें रक्षण केलें, म्हणून यानें पाण्डवांस एक अपूर्व मयसभा करून दिली. अर्जुनास देवदत्तशंख दिला आणि भीमास वृषपर्व्याच्या वेळची एक नामांकित गदा दिली [ १०,५८,२७ ]. यानें पाताळांत अनेक सुंदर नगऱ्या रचिल्या होत्या [ ५, ४, ९ ].

**मयसभा**-इंद्रप्रस्थांत असलेली. पाण्डवांची एक सभा. ही मयासुरानें निर्माण केली. ही सभा औरस चौरस सव्वा कोस होती. मयासुरानें ती चौदा महिन्यात पूर्ण केली होती, व या अपूर्व सभेच्या रक्षणाकरितां मयासुरानें आठ हजार राक्षस ठेविलें होते. दुर्योधनाला जलस्थल भ्रम येथेंच झाला [ १०,५८,२७ ].

**मयूर**-एक दानव.

**मयूरध्वज**-रत्नपूरचा बलाढ्य व भगवद्भक्त राजा. युधिष्ठिराचा यज्ञीय अश्व मणिपुराहून निघाल्यावर याच्या रत्ननामक नगराजवळ गेला, त्यावेळीं यानें नर्मदातीरीं आठव्या अश्वमेधास

सुरुवात केलेली होती. आणि याचा पुत्र सुचित्र अथवा ताम्रध्वज, बहुलध्वज प्रधानासह अश्वाबरोबर दिग्विजयार्थ गेला होता. तो विजयी होऊन नगराकडे परत येत असतां त्यानें पाण्डवांचा अश्व धरिला, व युद्ध करून कृष्णार्जुनास मूर्च्छित केलें. आणि अश्वास घेऊन स्वनगरांत गेला. कांहीं वेळानें कृष्ण सावध झाल्यावर त्यांनीं विचार केला कीं, हे पितापुत्र विष्णुभक्त असून बलाढ्य असल्यामुळें, यांजबरोबर युद्ध करण्यांत आपला निभाव लागणार नाहीं. तेव्हां युक्तीनें कार्यभाग साधला पाहिजे. असें कृष्णानें ठरविलें, व आपण ब्राम्हणाचा वेष घेऊन अर्जुनास शिष्य केलें. अशा प्रकारें वेषांतर केल्यावर ते राजाच्या यज्ञमंडपांत गेले. याचकांची इच्छा तृप्त करणें हें राजाचें व्रत असल्यामुळें त्यानें वेषधारी या गुरुशिष्यास 'काय इच्छा' म्हणून प्रश्न केला असतां वेषधारी भगवंतानें त्याच्या शरीराच्या दक्षिणांगाची मागणी केली. त्याप्रमाणें चक्रवर्तीनें आपलें शरीर कापून दक्षिणांग ब्राह्मणास देण्याविषयीं त्यानें आपल्या पुत्रास आज्ञा केली. राजाचें शरीर कापीत असतां त्याच्या डाव्या डोळ्यांत अश्रु आले. डोळ्यास पाणी आलेलें पहातांच, 'अशा दुःखिताचें दान मला नको' असें म्हणून ब्राम्हण जाऊं लागला तेव्हां राजा म्हणाला, 'महाराज अश्रूचें कारण इतकेंच कीं, दक्षिणांगाचें जसें सार्थक झालें तसें सव्यांगाचें झालें नाहीं म्हणून त्याच्या नेत्रास पाणी आलें. दुःखामुळें आलेलें नाहीं' राजाचें सत्व पाहून देवानें आपलें खरें स्वरूप प्रगट केलें, आणि राजास आलिंगन देऊन त्याचें शरीर दिव्य केलें. नंतर राजानें कृष्णार्जुनाचा सत्कार केला, व यज्ञाची समाप्ती करून युधिष्ठिराच्या साहाय्यार्थ गेला. यास शिखिध्वज, बर्हिकेतु, मयूरकेतु अशींहि नांवें होतीं. ( जै. अ. )

**मयोभुव**–अगस्त्य कुलांतील एक ऋषि.

**मरीचि**–स्वायंभु मन्वतरांतील ब्रह्ममानसपुत्र. हा ब्रह्मदवाचे मनापासून झाला. [ ३, १२, २४ ] याची पत्नी कला व पुत्र कश्यप व पूर्णिमान. [ ३,२४, २२ व ४,१,१३]. याची दुसरी स्त्री ऊर्णा तिला सहा पुत्र होते. [१०,८५, ४७–५१ ] अग्निष्वात्त जे पितर ते याचेच पुत्र होत.

( २ ) ऋषभदेववंशीय सम्राट व उत्कला यांचा पुत्र याची स्त्री बिंदुमती व पुत्र बिंदुमान् [५,१५,१५].

( ३ ) चालू मन्वंतरांत सर्व ब्रह्ममानस पुत्र पुनः यज्ञाग्नीतून उत्पन्न झाले, तेव्हां यास कश्यप पुत्र झाला. [ ९, १, १० ] याची सुरूपा कन्या अंगिरा ऋषीस दिली होती. याच्या वंशांत हा स्वतः व कश्यप, अवत्सार, नैध्रुव, नित्य, असित, दवल हे मंत्रद्रष्टे ऋषि होते ( मत्स्य. अ. १४४ )

**मरीचिगर्भ**–दक्षसावर्णि मन्वतरांतील देव. [ ८, १३, १९ ].

( २ ) हविष्मंत पितरांचा लोक.

**मरीची**-एक अप्सरा.

**मरु**-सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील शीघ्र राजाचा पुत्र. यानें योगसिद्धीच्या द्वारें चिरंजीवित्व प्राप्त करून घेतलें. हा कलाप ( काल्पी ) गांवीं रहात आहे. हा कलियुगाच्या शेवटीं सूर्यवंशाचें पुनरुज्जीवन करील. याचा पुत्र प्रसुश्रुत. [ ९, १२, ५–७ ]

( २ ) विदेहवंशीय हर्यश्वाचा पुत्र. याचा पुत्र प्रतीपक. [ ९,१३,१५ ].

( ३ ) मरुधन्व. ( मारवाड देश. )

**मरुत्**-मरुद्गण, दितीचे पुत्र. हे एकूण पन्नास आहेत. यांचा दैत्यत्व दोष काढून इंद्रानें यांना सोमपानाचे अधिकारी केलें. [ ६,१८,१९ ते ६७ ] ( दिती शब्द पहा. ) त्रेतायुगांत झालेल्या इंद्रवृत्रासूर युद्धांत हे इंद्राबरोबर होते. [ ६,१०,१७ ].

( २ ) वैवस्वत मन्वंतरांतील देव. [ ८,१३,४ ].

**मरुत्त**-सोमवंशीय तुर्वसु कुलांतील करंधमाचा पुत्र. हा अनपत्य होता. यानें पौरववंशांतील रैभ्यपुत्र दुष्यन्ताला पुत्र मानून घेतलें होतें. [ ९,२३,१७

**मरुत्त**-( आविक्षित शब्द पहा. ) [ ९,२,२६ ते २९ ].

**मरुत्वती**-प्राचेतस दक्षाची कन्या व धर्माची पत्नी. हिचे पुत्र मरुत्वान व जयंत. [ ६, ६,४–८ ].

**मरुत्वान्**-धर्म मरुत्वती यांचा पुत्र.[ ६,६,८]

**मरुदेव**-सूर्यवंशीय कुशकुलांतील कलियुगांत झालेला सुप्रतीक राजाचा पुत्र. याचा पुत्र सुनक्षत्र. [ ९,१२,१२ ].

**मरुद्गण**-( मरुत् शब्द पहा. ) [ ८,१३,४]

**मरुद्वृधा**-एक नदी. [ ५, १९,१८ ].

**मरुधन्व**-( मारवाड. ) सारस्वत व बहुधान्यक देश, यांच्यामध्यें असणारा देश [ १,१०,३५ ].

**मरुभूमि**-मरुधन्व.

**मर्कटप**-अंगिराकुलांतील एक ऋषि.

**मर्कोट**-भारतवर्षीय क्षेत्र.

**मलज**-द-अयोध्या व मिथिला यांमधील देश. यास्थलीं इंद्रास वृत्रवधानें आलेलें मालिन्य जाऊन क्षुद्बाधा दूर झाली. ताटका राक्षसी येथें रहात असे शहाबाद जिल्ह्याचा पूर्वभाग.(वा.रा.)

**मलंदरा**-भारतवर्षीय नदी.

**मलय**-ऋषदेवाचा एक पुत्र व याचा खण्ड. [ ५,४,१० ]

( २ ) भारतवर्षाच्या नखण्डांतील चौथा.

( ३ ) एकपर्वत. सह्याद्रीचे दक्षिणेस व केरल देशाच्या उत्तरेस. याच्यावर चंदनवृक्ष असतात. हें पुण्यस्थान आहे. [ ५,१९,१६ व ७,१४,३२ ] यापासून कृतमाला, ताम्रा, पुष्पजा, उत्पलावती इत्यादि नद्या निघतात.

( ४ ) मतंग पर्वताचें श्रृंग.

**मल्ल**-दाशरथिरामाच्या सुज्ञ प्रधानाचा पुत्र.

( २ ) एक देश.

**मल्लिकार्जुन**—द्वादज्योतिर्लिंगापैकीं एक. हें स्थान श्रीशैलपर्वतावर आहे.

**मसृण**-कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**महत्**-सामवेदोपनिषत्

**महती**-नदी. उगम–पारियात्र पर्वत.

**महर्लोक**-भूमीच्यावर असणाऱ्या सप्तलोकांतील चौथा [ ११,२४,१४ ].

**महर्षि**-ब्रह्ममानसपुत्र. मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, भृगु, वसिष्ठ, दक्ष, नारद [ ३,१२,२२ ]. मनुस्मृतींत दक्षाच्या स्थलीं प्रचेता आहे. हे स्वायंभुव मन्वंतरात महादेवाच्या शापानें मृत झाल्यावर चालु मन्वंतरांत ब्रह्मदेवानें पुन्हा यांस उत्पन्न केलें. ( मत्स्य. ) यांत भृगु, अंगिरा आणि कवि, हे वरुणरूपधारी महादेवाच्या यज्ञांत ब्रह्मदेव ऋत्विज असतां निर्माण झाले, व इतरांस त्यांनें स्वतः उत्पन्न केले.

**महस्वान्**-सूर्यवंशीय ध्रुवसंधीच्या कुलांतलि अमर्षण राजाचा पुत्र. याचा पुत्र विश्वसाव्ह [ ९,१२,७ ].

**महाकपाल**-दूषण राक्षसाचा अमात्य.

**महाकर्ण**-वसिष्ठकुलांतील ऋषि.

**महाकपि**-अंगिराकुलांतील ऋषि.

**महाकाय**—रुद्रगणांतील एक.
( २ ) रावण पक्षीय राक्षस.

**महाकाल**—रुद्रगणातील एक.
( २ ) अवंतिदेशांतील एक वन व क्षेत्र.
( ३ ) उज्जनींतील द्वादशज्योतिर्लिंगापैकीं एक.
( ४ ) बाणसुरास नांव.

**महाकाली**-महादेवाची शक्ति. ( दे. भा )

**महागिरि**—एक पर्वत.

**महागौरी**-विंध्याचलापासून निघणारी नदी.

**महाचक्री**—कश्यपकुलांतील ब्रह्मर्षि.

**महाजानु**- ,, ,,

**महातल**-सप्तपातालपैकीं पांचवें. यांत कद्रूपुत्र नाग राहतात. हें विराट् स्वरूपाच्या गुल्फाच्या ठिकाणी आहे. [ ५,२४,२९ व २,१,२६ ]

**महादंष्ट्र**-रावणपक्षीय राक्षस.

**महाद्युति**-एकादशरुद्रांपैकीं एक.

**महाधृति**--विदेहवंशीय विसृताचा पुत्र. याचा पुत्र कृतिरात [ ९,१३,१६ ]

**महान्**-एकादशरुद्रांपैकीं एक [ ६,६,१८ ]

**महानदी**-मध्यप्रांत व बिहार-ओरिसामधील नदी. ही रायपूर जिल्ह्याच्या आग्नेयीस सिहाव गांवाजवळून एका लहानशा कुण्डींतून उगम पावून कटकजवळ अनेक मुखांनीं बंगालच्या उपसागरास मिळते. [ ५,१,१८ ]
( २ ) अलकनंदेस नामांतर.

**महानन्दि**-कलियुगातील शिशुनागवंशीय नन्दिवर्धनाचा पुत्र. हा या कुलांतील शेवटचा राजा [ १२, १, ७ ].

**महानस**-पाकशाला [ ४, ५, १४ ].
( २ ) शाकद्वीपांतील एक पर्वत. [ ५, २०, २६ ]

**महानाद**-भारतवर्षीय तीर्थ व क्षेत्र.
( २ ) प्रहस्ताच्या अमात्यांपैकीं एक.

**महानाभ**-हिरण्याक्ष व उपदानवी यांचा एक पुत्र [ ७, २, १८ ].

**महानारायण**-अथर्वण वेदोपनिषत्.

**महानील**-कद्रूपुत्र एक नाग.

**महापक्ष**-अक्रूराचा एक पुत्र.

**महापद्म**-कद्रूपुत्र एक नाग.
( २ ) कुबेराच्या नवनिधींतील एक.

**महापार्श्व**-विश्रवा ऋषि व पुष्पोत्कटा यांचा एक पुत्र. हा रावणाच्या अमात्यांत असे. अंगदानें यास मारिलें.

**महाबल**-शंकराचा एक पार्षद.

**महाबल**–विष्णूचा एक पार्षद.

( ३ ) दनूपुत्र एक दानव.

( ४ ) सोमवंशीय हृदीकाचा एक पुत्र.

( ५ दुर्योधनपक्षीय राजा.

**महाबलेश्वर**–सह्याद्रि पर्वतावरील एक क्षेत्र. येथें ब्रम्हदेवानें यज्ञ केला होता. कृष्णेचा उगम येथें आहे. सातारा जिल्ह्यांतील जावळी तालुक्यांत समुद्र सपाटीपासून याची उंची ४५०० फूट आहे. हें महाबलेश्वराचें देवालय ४३८५ फूट उंचीवर आहे.

**महाबाहु**–दनुपुत्र एक दानव.

( २ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**महाभय**–अधर्म व निऋति स्त्री यांचा पुत्र.

**महाभागा**–भारतवर्षीय नदी.

**महाभिष**–सूर्यवंशीय एक राजा. यानें एक हजार अश्वमेध व शंभर राजसूय यज्ञ केले होते. एकदां हा सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे गेला असतां, देव, ऋषि, वेद, पर्वत नद्या इत्यादि मूर्तिमंत पाहून जवळच असलेल्या गंगेविषयीं यास कामबुद्धि उत्पन्न झाली. त्यावरून मृत्युलोकीं जन्म घडेल असा दोघांसहि शाप झाला. तोच हा पुढें शंतनु राजा होऊन गंगा त्याची पत्नी झाली. [ ९,२२,१३, ]

**महाभोज**–सोमवंशीय यदुपुत्र कोष्टा याच्या कुलांतील शशबिन्दु राजाचा पुत्र. हा महायोगी होता. याच्या जवळ चौदा रत्नें असून हा सार्वभौम होता याचा पराभव केव्हांच झाला नाहीं. याला दहा लक्ष स्त्रिया होत्या व त्या प्रत्येकीस एक एक लक्ष अस एक कोटी पुत्र होते. त्यांतील सहा मुख्य होते. ज्येष्ठ पुत्र पृथुश्रवा [ ९,२३,३१ ].

( २ ) सोमवंशीय सात्वतराजाच्या सात पुत्रांतील कनिष्ठ. हा धर्मशील होता. याच्यामुळें याच्या कुलास भोज असें नांव मिळालें. [ ९,२४,७–११ ].

**महामख**–सावितानामक पांचवा आदित्य व पृश्नि यांचा एक पुत्र. (पंच महायज्ञ) [ ६,१८,१ ]

**महामती**-बृहस्पतीच्या सातकन्यांतील एक.

**महामना**–सोमवंशीय अनुकुलांतील महाशीलाचा पुत्र. याचे पुत्र उशीनर आणि तितिक्षु. [ ९,२३,२ ]

( २ ) एक गंधर्व.

**महामात्र**–कंसाच्या कुवलयापीड हत्तीचा महात. [ १०,३६,२५ ]

**महामाली** खरराक्षसाच्या बारा अमात्यांपैकीं एक.

( २ ) रावणपक्षीय एक राक्षस.

**महामेघ**–याज्ञवल्क्यऋषीचा पुत्र हा दुसरे जन्मी दूषण झाला.(चंद्रकांत श.पहा)

**महामोह** एक अज्ञान वृत्ति. [ ३,१२,२ ]

**महारथ** – विश्वामित्राचा एक पुत्र.

( २ )उपरिचर वसुपुत्र बृहद्रथाचें नामांतर.

**महारव**–एकयादव.

**महारोमा**-विदेहवंशीय कृतिराताचा पुत्र. याचा पुत्र स्वर्णरोमा. [९,१३,१७]

**महारौरव**-प्राण्यांशीं द्रोह करून स्वार्थ साधणाऱ्यास प्राप्त होणारा नरक. [५,२६,१२]

**महाऱ्हाद**–रावणपक्षीय एक राक्षस.

**महालय**–भारतवर्षीय एक देश.

**महालक्ष्मी**-विष्णूची शक्ति ( दे. भा. )
**महालिंग**-भारतवर्षीय एक क्षेत्र.
**महावशी**-विदेहवंशीय कृतिराजाचा पुत्र. [ ९,१३,२६ ]
**महावाक्य**- अथर्वण वेदोपनिषत्.
**महावीर**-प्रियव्रताच्या दहापुत्रांपैकीं चौथा. हा विरक्त होता. [ ५,१,२५ ]
(२) भारतीयुद्धांतील कौरवपक्षीय राजा.
**महावीर्य**-विदेहवंशीय बृहद्रथाचा पुत्र याचा पुत्र सुधृति. [ ९, १३, १५ ]
( २ ) सोमवंशीय पुरुकुलांतील मन्यू च्या पांच पुत्रांतील तिसरा. याचा पुत्र दुरितक्षय [ ९, २१, १-१९ ]
**महाव्रत**-विश्वामित्राचा एक पुत्र.
**महाश**- मित्रविंदेचा पुत्र [१०,६१,१६].
**महाशक्ति**-श्रीकृष्ण व लक्ष्मणा यांचा पुत्र. [ १०, ६१, १५]
**महाशंख**-कद्रूपुत्र नाग. हे पातालांत असतात [ ५, २४, ३१ ].
( २ ) मार्गशीर्षमहिन्यांत अंशुनामक सूर्यासह फिरणारा नाग[१२,११,४१]
**महाशन**-कंसपक्षाय राक्षस [ १०,२ १ ].
**महाशाल**-हिमालयाच्या दक्षिणेकडील वन.
**महाशिरा**-वरुण लोकांतील एक नाग.
( २ ) एक ऋषि.
**महाशील**-सोमवंशीय अनुकुलांतील जनमेजयाचा पुत्र [ ९,२३,२ ].
**महाश्मशान**-काशी क्षेत्र.
**महाश्व**-एक राजर्षि.
**महासरस्वती**-ब्रम्हदेवाची शक्ति (दे.भा.)
**महासेन**-कार्तिकेयास नांव.
**महाहय**-सोमवंशीय यदुकुलांतील शतजिताचा ज्येष्ठ पुत्र. [ ९,२३,२१ ].

**महिता**-भारतवर्षीय नदी.
**महिमान**-भगनामक सहावा आदित्य व सिद्धि यांचा पुत्र. [ ६,१८,२ ].
**महिष**-एक असुर. अनुन्हाद व सूर्मि यांचा पुत्र. तारकासुराच्या दहा सेनापतींतील एक यास कार्तिकेयानें मारिलें. [ ६,१८,१६ ]. ( भा. द्रोण. )
( २ ) रंभदानव व महिषी यांचा पुत्र. यानें हेमगिरीवर वायु भक्षण करून तप केलें, व ' पुरुषांपासून मृत्यु येऊं नये ' असा ब्रम्हदेवापासून वर मिळविला. नंतर युद्ध करून इंद्राचा पराभव केला; व देवाना पीडा देऊं लागला तव्हां लक्ष्मीनें अष्टभुजादेवीचा अवतार घेऊन याचा नाश केला. ( दे. भा. ) ( मत्य. )
**महिष्मती**-बृहस्पति व शुभा यांच्या सात कन्येतील एक.
**महिष्मान्**-हैहयकुलांतील सोहंजीचा पुत्र याचा पुत्र भद्रसेन [९,२३,२२
**मही**—पृथ्वी [ ११०,४ ].
**महीधृक**-महाधृतिजनकाम नामांतर.
**महीनदी**-ही नदी ग्वाल्हेर संस्थानांत अमझेरा प्रांतांत उगम पावून खंबायतच्या आखातास मिळते.
**महीनस्**-एकादशरुद्रांपैकीं एक.[३,१२,१२
**महत्थदेश** शैशिरदेशाच्या पश्चिमेकडील देश. पाण्डवांच्या वेळीं येथें आक्रोश राजा होता. ( भा सभा. )
**महेंद्र**-सप्तकुलाचलापैकीं एक पर्वत. हा कलिंगदेशांत आहे. हल्लींचा महेंद्रमाल. [ ५,१९,१६ व ७,१४,३२ ]

यापासून त्रिभागा, ऋषिकुल्या, इक्षु. त्रिदिवा, इत्यादि नद्या निघाल्या.

( २ ) कालंजर पर्वताचें शिखर. हें गंजम जिल्ह्यांत आहे. येथें परशुराम राहतो. यापासून महेंद्रतनय नांवाच्या दोन प्रवाहांचा उगम आहे.

( ३ ) अगस्त्यकुळांतील एक ब्रह्मर्षि.

**महेन्द्रा** भारत वर्षीय एक नदी.

**महेश्वर**–शंकर व त्याचा एक पार्षद.

**महोदय**–विश्वामित्राच्या शापानें निषाद झालेला वसिष्ठपुत्र. वा. रा बाल. )

( २ ) सोमवंशीय कुशनाभानें स्थापिलेलें नगर. कान्यकुब्ज देशाची राजधानी ( वा रा. बाल. )

( ३ ) पर्वतशिखर. लक्ष्मणास शक्ती लागली असतां, मारुती औषधी आणण्याकरितां येथें गला होता.

**महोदर**–एक रुद्रगण.

( २ ) एक ब्रह्मर्षि.

( ३ ) सुमाली राक्षसाचा एक पुत्र रावणाचा मामा. यास अशोकवनिकेंत मारुतीनें मारिलें (वा रा.)

( ४ ) विश्रवा ऋषि व पुष्पोत्कोटा यांचा एक पुत्र रावणाचा सावत्र भाऊ व एक अमात्य यास युद्धोन्मत्त असेंहि नांव होतें. यास नील वानरानें मारिल. ( वा. रा. यु )

( ५ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**महोदर्य**–एक राजर्षि.

**महौजा**–भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा.

**महौदवाह**–एक ब्रह्मर्षि.

## मा

**माकन्दी**–पांचालदेशांत गंगेच्या कांठीं द्रुपदानें स्थापन केलेली नगरी.

**मागध**–स्तुतिपाठकांतील भेद [१,११,२०]

(२) जरासंधास नामाभिधान [३,३,१०]

(३) इंद्रसावर्णिमन्वन्तरांतील देव विशेष. [८,१३,३४].

**माठर**–सूर्याचा एक पार्षद ( वा. रा.

( २ ) कश्यपकुळांतील ब्रह्मर्षि.

( ३ ) भृगुकुळांतील ब्रह्मर्षि.

( ४ ) काम्य वनाच्या दक्षिणेकडील वन.

( ५ ) एक देश. ( भा. कर्ण. )

**माणिचर**–कुबेराचा अमात्य एक यक्ष. हा मंदराचलाच्या शिखरावर राहात असे. कुबेररावण युद्धांत यानें रावणाशीं युद्ध केलें. भा वन.)( वा. रा.)

**मांडवी**–सीरध्वज जनकाच्या धाकट्या भावाची-कुशध्वजाची मुलगी, व दशरथपुत्र भरताची पत्नी.

**मांडव्य**–एक ब्रह्मर्षि. पूर्वजन्मीं बाल्यावस्थेंत एका किड्याला यानें कांट्यानें टोंचिलें होतें, त्या दोषामुळें याच्यावर चोराचा आरोप येऊन राजानें यास शूळावर चढविलें. तेव्हां हा यातनारूप देहानें यमाकडे गेला, व याचें कारण विचारिलें. यमानें पूर्वजन्मींच्या दोषाचें कारण सांगितलें. तेव्हां बालकास शुभाशुभ कर्माचें फल नसतां, तूं हें शासन करविलेस म्हणून शंभर वर्षें शूद्र योनींत जन्म घे, असा यानें यमास शाप दिला. त्या शापानुरूप यम पुढें विदुर झाला. पुढें राजानें यास शूळावरून उतरून याचा सन्मान केला. पण थोडें शूळ राहिल्यानें यास अणिमाण्डव्य असें नांव पडलें. [ ३,५,२०] ( भा. आदि. )

**माण्डकर्णि**–एक ऋषि. यानें दहा हजार वर्षें तप केल्यावर इंद्रानें याच्या तपोनाशाकरितां पांच अप्सरा पाठविल्या त्यांच्यावर लुब्ध होऊन त्यांच्यासह हा एका सरोवरांत राहिला. तें पंचाप्सर सरोवर. ( वा. रा. अरण्य. )

**माण्डुक**–भृगुकुलांतील एक ब्रम्हर्षि.

**माण्डुक्य**- अथर्वण वेदोपनिषत्.

**माण्डूकेय**-इंद्रप्रमिति ऋषीचा शिष्य. याचा शिष्य देवमित्र. [१२,६,५६]

**मातंग**–मतंग ऋषीचा पुत्र.

( २ ) चांडालत्वामुळें त्रिशंकूचें नांव.

**मातंगिन**–कश्यपकुलांतील ब्रह्मर्षि.

**मातंगी**–कश्यप व क्रोधा यांची कन्या.

**मातली**–इंद्राचा सारथी. यास सुधर्मा स्त्री व गोमुख पुत्र आणि गुणवती कन्या, अशीं मुलें होतीं. [ ८,११,२२ ]

**मातृका**-अर्यमाआदित्याची पत्नी[ ६,६,४२]

**मातेय**–वसिष्ठकुलांतील ब्रम्हर्षि.

**माथुर**–मथुरेच्या भोंवतालचा प्रदेश व त्यांतील लोक. [ १०,१,२७ ].

**माद्रि**–अंगिराकुलांतील ब्रम्हर्षि.

**माद्री**-मद्रदेशाच्या राजकन्यांस साधारण नांव. शल्य राजाची बहीण पाण्डूची दुसरी पत्नी. ही कुन्तीहून सुंदर होती. हिला अश्विनीकुमारांच्या मंत्रप्रभावानें झालेले पुत्र नकुल व सहदेव. पाण्डु राजा मृत झाल्यावर हिनें सहगमन केलें. [ ९,२२,२८ ]

( २ ) श्रीकृष्णपत्नी लक्ष्मणेचें नांव. [ १०,६१,१५ ]

( ३ ) यदुकुलांतील वृष्णाची पत्नी.

**माधव**–मधु यादवाचे वंशज. विशेषतः सात्यकी, श्रीकृष्ण. [ १,८,३ ]

( २ ) ( वैशाख ) वर्षांतील दुसरा महिना. [ १२,११,३४ ]

( ३ ) विष्णूचें नांव.

( ४ ) उत्तमनूचा एक पुत्र.

**माधवी**–मायेचें नांव. [ १०,२,१२ ]

( २ ) ययाति राजाची कन्या. गालवाचें कार्य झाल्यावर हिनें आपलें आयुष्य तप करण्यांत घालविलें. ( मत्स्य. ( गालव शब्द पहा )

( ३ ) धर्मध्वज राजाची स्त्री व तुलसीची माता.

( ४ ) पुरुपुत्र जनमेजयाची पत्नी.

**माधुच्छंदस** विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**माध्यंदिन**–वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**माध्यमा**–एक ऋषि.

**मानव**–एक ऋषि.

**मानवकल्प**–ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील विसावा कल्प.

**मानवी**–भारतवर्षीय नदी.

**मानस**–ज्योतिर्भास लोकांत राहणारे पितर.

( २ ) स्वर्गांतील देवांचे एक वन.

( ३ ) हिमालयावर वैद्युत शिखराच्या पायथ्याशीं असणारें सरोवर. हें ब्रह्मदेवानें मनानें निर्माण केलें. यांतून सरयु नदी निघाली आहे. हें त्रिकोनी आहे. याच्या वायव्येस कैलास पर्वत आहे.

( ४ ) प्रयागांतील एक तीर्थ.

**मानसोत्तरपर्वत**–हा पर्वत पुष्करद्वीपाच्या रमणक आणि धातकी या दोन भागांच्यामध्यें असून, वलयाकार आहे.

मेरूपासून याचें अंतर एक कोटि सत्तावन लक्ष पन्नास हजार योजनें असून याची उंची व विस्तार दहा हजार योजनें आहे. मेरूच्या भोंवतीं फिरणाऱ्या सूर्याच्या रथाचें एक चक्र यावर फिरत असतें. देवधानी, संयमिनी, निम्लोचिनी आणि विभावरी, अशा इंद्रादि देवतांच्या चार नगऱ्या या पर्वतावर चार दिशांस आहेत. [ ५,२०,३० ]

**मानारि**–अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**मान्धाता**––इक्ष्वाकुकुलांतील सेनजित पुत्र युवनाश्वाचा पुत्र. युवनाश्वाला शंभर स्त्रिया होत्या, परंतु संतति नव्हती. ह्मणून तो सर्व स्त्रियांसह अरण्यांत गेला. तेथें ऋषींनी पुत्रकामेष्टि यज्ञ केला, त्यांत राजपत्न्यांकरितां अभिमंत्रित केलेलें जल चुकून युवनाश्वानें प्राशन केलें, त्यापासून युवनाश्वाला गर्भ राहिला आणि तो योग्यवेळी कूस फोडून बाहेर आला. तेव्हां ऋषींनीं 'कं धास्यति' कोणाला हा मुलगा पिणार ? असें विचारिलें. त्यावेळीं इंद्र–' मां धाता ' ' मला पिईल '–असें ह्मणाला, व याच्या तोंडांत अंगठ्याजवळचें बोट दिलें. याला त्रसद्दस्यु असेंहि नांव होतें. तपोबलानें अजगव धनुष्य व दिव्यास्त्रें यानें मिळविलीं व एका दिवसांत सर्व पृथ्वी जिंकली, आणि शंभर अश्वमेध व शंभर राजसूय यज्ञ केले. (भा. शांति.) याला शशबिंदु व बिंदुमती अशा दोन पत्न्या व पुरुकुत्स, मुचकुंद, अंबरीष असे तीन पुत्र होते. याशिवाय यास पन्नास कन्या होत्या. त्या सर्व यानें सौभरिऋषीस दिल्या होत्या [ ९,६,२५, ते ३८]. एकदां याच्या राज्यांत बारा वर्षे अवर्षण पडलें असतां यानें आपल्या तपोबलानें पर्जन्यवृष्टि केली. हा एकदां देवलोक जिंकावयास गेला असतां, इंद्रानें यास प्रथम लवणासुरास जिंकावयास सांगितलें. त्याप्रमाणें लवणासुराबरोबर लढत असतां लवणासुरानें इंद्रदत्त शूलानें याचा नाश केला. (वा. रा. उत्तर.)

(२) अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**मांबुधि**–विश्वामित्रकुलांतील ऋषि.

**माया**–परमेश्वराची त्रिगुणात्मक लीलारूप शक्ति. [ १,३,३० ]

(२) अधर्म व मृषा यांची कन्या. [४,८,२]

**मायापुरी**–एक नगरी.

**मायावती**–मदनपत्नी रति. शंकरानें मदनास दहन केल्यानंतर तो प्रद्युम्न नांवानें रुक्मिणीचे ठायीं जन्मास येणार होता, म्हणून हें नांव धारण करून रति शंबरासुराकडे राहिली होती. तेथें प्रद्युम्नाची भेट होतांच त्याच्या हस्तें शंबरासुराचा वध करवून ही पतीबरोबर द्वारकेंत गेली. ( प्रद्युम्न शब्द पहा ) [ १०,५५,१६ ]

**मायावि**–मायासुर व हेमा यांचा ज्येष्ठ पुत्र. याला वालीनें मारिलें. (वा. रा. उत्तर)

**मारिष**–पुरुषश्रेष्ठ. [ ६,५,३२ ]

**मारीच**–मरीचिपुत्र कश्यपाचें नामांतर.

(२) कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**मारीच**–दनूपुत्र एक दानव. वैश्वानर दानव कन्या पुलोमा व कालका ह्या याच्या पत्न्या आणि पौलोम व कालकेय हे पुत्र होते.

( ४ ) सुंद व ताटका यांचा पुत्र. ताटका व सुबाहु यांचा रामचंद्रानें वध केल्यावर हा रावणाकडे राहिला, व पुढें रावणाचे सांगण्यावरून सुवर्ण मृगाचें रूप घेऊन रामास फसविण्याकरितां दंडकारण्यांत गेला असतां रामचंद्राच्या बाणानें मृत झाला.

**मारीषा**—वृक्षांनीं वाढविलेल्या दश प्रचेत्यांची पत्नी. हिला वार्क्षी असें नामांतर होतें. हिचा पुत्र प्राचेतस दक्ष. [ ६,३०,४८ ]

( २ ) आर्यक नागाची कन्या व यदुकुलांतील शूर राजाची पत्नी. हिला भोजा असें नामांतर होतें.

**मारुत**–भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

( २ ) अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

(३) पाण्डवाकडील मरुभूमिदेशीय राजे.

( ४ ) वायूचें नांव.

**मारुततनय**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**मारुति**–वायुप्रसादानें झालेला अंजनेचा पुत्र हनुमान.

**मार्कटि**–आंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**मार्केड**–एक ऋषि.

**मार्कंडेय**–स्वायंभुव मन्वतरांतील मृकण्ड ऋषीचा पुत्र हा अल्पायुषी होता. मृत्यु समीप आला असतां यानें शंकराची उपासना करून चौदा कल्प आयुष्य मिळविलें. [ ४,१,४५ ].

( २ ) चालू मन्वंतरातील भृगुकुलातील एक ऋषि. याच्या तपोनाशाकरितां इंद्रानें अप्सरा पाठविल्या होत्या तथापि हा कामवश झाला नाहीं. हा चिरंजीव आहे. [१२,८,२ ते ३१]. यानें पुष्कळ वर्षे तप केल्यावर भगवान प्रसन्न झाले, त्यावेळीं यानें माया पहाण्याची इच्छा दर्शविली. भगवंतानें ' तथास्तु ' म्हटलें. पुढें एकदां हा ध्यानस्थ बसला असतां सर्व पृथ्वी जलमय झाली असून एका वटवृक्षाच्या पत्रावर एक बालक पहुडलें आहे, आणि त्या बालकाच्या श्वासाबरोबर आपण त्याच्या उदरांत प्रवेश केला आहे, आणि त्या उदरांत सर्व विश्व भरलें आहे, व शेवटीं आपण आपल्या आश्रमांतच आहों, असें पाहिलें त्यानंतर त्या बालकाच्या उच्छ्वासाबरोबर आपण बाहेर आलों, असें दिसलें तों खरोखरच आपण आपल्या आश्रमांतच आसनस्थ आहोत. भगवंताची ही अपूर्व माया पाहून हा आश्चर्ययुक्त होत्साता भगवंतास शरण गेला; व याची भक्ति पाहून भगवंतानें यास पुन्हां दर्शन दिलें. [ १२,८,३५ ]

( ३ ) अठरामहापुराणापैकीं एक. याची श्लोकसंख्या नऊ हजार आहे. [ १२.१३,५ ]

( ४ ) दशरथराजाच्या यज्ञांतील उपऋत्विजापैकीं एक ऋत्विज.

( ५ ) दाशरथिरामाच्या सभेंतील आठ धर्मशास्त्र्यांपैकीं एक.

**मार्गणप्रिया**-राधेच्या अप्सरा कन्येंतील एक.

**मार्गशीर्ष**- ( महिना ) भगवंताची एक विभूति [ ११,१६,२७ ]

**मार्जारि**-सोमवंशीय जरासंधपुत्र सहदेवाचा मुलगा. याचा मुलगा श्रुतश्रव. [ ९,२२,४६ ]

**मार्तण्ड**-मृतअण्डा-ब्रह्माण्डा-पासून झालेला सूर्य. [ ५,२०.४४ ].

**मार्तिकावत**-एक नगर.

**मार्तिकावतक**-भारतवर्षीय देश. येथें रेणुकस जमदग्नीचा शाप झाला, त्यावेळीं चित्ररथराजा होता व पांडवांच्या वेळीं शाल्वराजा होता.

**मार्देमर्षि**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**मार्ष्टेपिंगलि**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**माल**-भारतवर्षीय एक देश.

**मालती**-शत्रुघ्नि राजाची ज्येष्ठ स्त्री.

**मालव**-( मालवा ) मध्य हिंदुस्थानांतील एक मोठा प्रांत. याचे पूव व पश्चिम असे दोन भेद होते. यातून चंबळा, क्षिप्रा, काली, सींद, पार्वती, या नद्या वाहतात. अवंति याच प्रांतांत आहे [ १२,१,३६ ].

**मालवी** मद्रदेशाधिपति अश्वपतीची स्त्री व सावित्रीची माता.

**मालायनि**-भृगुकुलांतील ब्रह्मर्षि,

**मालावती**-कुशध्वजराजाची पत्नी व वेदवतीची माता.

**मालिना**-चंपानगरीचें मूळ नांव.

( २ ) एक अप्सरा.

( ३ ) पश्चिम रोहिलखण्डांतील एक नदी. येथें कण्वाचा आश्रम होता.

( ४ ) वीरवर्मा राजाची कन्या.

**मालि**-वृत्रासुरानुयायी असुर [६,१०,२१].

**माली**-सुकेशराक्षस व देववती यांच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. यास वसुदा गंधर्वीपासून अनल, अनिल, संपाति, हर, पनस आणि प्रमति असे सहा पुत्र होते. हा विष्णूकडून मृत्यु पावला.

**मालेय**-माली राक्षसाचे पुत्र.

**माल्यवान्**-इलावृताच्या पश्चिमेकडील एक पर्वत. याच्या शिखरापासून चक्षु-नामक गंगा केतुमाल खंडांत उतरते. [ ५, १६, १० व ५, १७, ७ ].

( २ ) किष्किंधेजवळचा एक पर्वत. वालिवधानंतर वर्षाकाल संपेपर्यंत राम-लक्ष्मण येथें राहिले होते. यास प्रवर्षणगिरि असेंहि म्हटलें आहे.

( ३ ) सुकेश राक्षस व देववती यांचा पुत्र. माली आणि सुमाली यांचा भाऊ. यानें तप करून ब्रह्मदेवास प्रसन्न केलें, व विश्वकर्म्याकडून त्रिकूट पर्वतावर शंभर योजनें लांब व तीस योजनें रुंद अशी लंका नगरी वसवून घेतली नर्मदा गंधर्वीनें आपल्या सुंदरी, वसुदा, केतुमती, अशा तीन कन्या या तिघां बंधूंस दिल्या होत्या. सुंदरीपासून याला वज्रमुष्टि, विरूपाक्ष दुर्मुख, सुप्तघ्न इत्यादि पुत्र व अनला नामक कन्या झाली. ती यानें विश्वावसूला दिली होती पुढे देवांशीं यांचें युद्ध झालें त्यांत माली विष्णूकडून मरण पावला, व हा सुमालीसह लंका सोडून पाताळांत गेला. एकदां सुमाली गुप्तरूपानें पृथ्वीवर येऊन पाहूं लागला तों वैश्रवण लंकेंत मोठ्या ऐश्वर्यानें नांदत आहे, असें त्यास दिसलें आपलाही कदाचित याप्रमाणें भाग्योदय होईल या आशेनें यानें

आपली कन्या कैकसी, विश्रवाऋषीस दिली. तिला रावण आदि पुत्र झाले. ते तपानें समर्थ झाल्यावर सुमालीनें आपले पुत्र त्यांच्या सहाय्यास दिले, व राका, पुष्पोत्कटा, बलका आणि कुंभीनसी या चार कन्या आणखी विश्रवा ऋषीस च दिल्या. पुढें रावणानें लंका घेतल्यावर सर्व राक्षस तेथे राहण्यास आले. देवांशीं झालेल्या एका युद्धांत सुमाली मरण पावला. माल्यवाननें सीताहरणानंतर रावणास उपदेश केला होता. ( वा. रा. )

**मावेल्ल**–हरिवाहन राजाचें नामांतर.

**माषशरावय**–वसिष्ठकुलांतील ब्रह्मर्षि.

**माहिष्मती**–सहस्रार्जुनाची अनूप देशांतील राजधानी. [ ९,१५,२२ ]

( २ ) सूर्यवंशीय दशाश्वाची राजधानी.

( ३ ) किष्किंधेच्या दक्षिणकडील नील-राजाची मेकलदेशाची राजधानी.

( ४ ) नर्मदा काठचें शहर. हल्लींचें माळव्यांतील मंडला.

( ५ ) नर्मदा काठचें शहर. हल्लींचें नेमाड-प्रांतांतील महेश्वर.

**माहीक**–भारतवर्षीय एक देश.

**माहेंद्री**–देवधानी नगरी.

**माहेय**–भारतवर्षीय एक देश.

**माहेश्वरकल्प**–ब्रह्मदेवाच्या चालू मासांत पुढें येणारा एकुणतिसावा दिवस.

**माहेश्वरज्वर**–शंकराचें अस्त्र [ १०,६३,२३ ]

## मि

**मितध्वज**–विदेहवंशीय धर्मध्वजाचा पुत्र. याचा पुत्र खाण्डिक्य. [ ९,१३,१९ ].

**मित्र**–वसिष्ठ व ऊर्जा यांचा एक पुत्र. [ ४,१,४१ ].

( २ ) द्वादशादित्यांपैकीं एक. याला रेवती पासून उत्सर्ग, अरिष्ट व पिप्पल असे पुत्र झाले. [ ६,६,३९ ]

( ३ ) ज्येष्ठ महिन्यांत अत्रि ऋषि, पौरुषेय राक्षस, तक्षक नाग, मेनका अप्सरा, हाहा गंधर्व व रथस्वन यक्ष, यांसह फिरणारा सूर्य. [ १२,११,३५ ]

**मित्रघ्न**–रामानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस.

**मित्रदेव**–दुर्योधन पक्षीय एक राजा.

**मित्रनंदन**–वृष्णिकुलांतील एक यादव.

**मित्रपद**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**मित्रभानु**–एक राजर्षि.

**मित्रवर्मा**–द्रोणाचार्यानें मारिलेला पांचाल.

( २ ) दुर्योधनपक्षीय एक राजा.

**मित्रविंदा**–कुशद्वीपस्थ नदी. [ ५,२०,१५ ]

( २ ) अवन्तिदेशीय जयसेन व वसुदेव भगिनी राजाधिदेवी यांची कन्या. विन्द व अनुविन्द यांची बहीण. स्वयंवराचे वेळीं कृष्णानें हिचें हरण केलें. ही कृष्णाची आतेबहीण होती. हिला वृक आदि दहा पुत्र होते. [ १०,५८,३१ ].

**मित्रसह**–सूर्यवंशीय सुदासाचा पुत्र. याचें कल्माषपाद नांव होतें. [ ९,९,१८ ]

**मित्रसेन**–अर्जुनानें मारलेला दुर्योधनपक्षीय एक राजा.

**मित्रावर**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**मित्रावरुण**–मित्र व वरुण उर्वशी सांनिध्यानें यांचे रेतस्खलन झालें, तें यांनें कुंभांत धारण केलें असतां, त्यापासून अगस्त्य व वसिष्ठ असे जे दोन पुत्र झाले तें. [ ६,१८,५-६ ]

**मित्रावरुणेष्टि**–( यज्ञ ) मनूला पुत्र होण्यासाठीं हा यज्ञ वसिष्ठानें केला होता. [ ९,१,१३ ]

**मित्रेयु**–सोमवंशीय दिवोदासाचा पुत्र. याचा पुत्र च्यवन [ ९,२२,१ ]

( २ ) भृगुकुलांतील एक ऋषि. याची कन्या मैत्रेयी.

**मिथिल**–निमिदेहाच्या मंथनापासून झालेला पुत्र. विदेह वंशाचा मूळ पुरुष. यानें मिथिलानगरी स्थापिली. याचा पुत्र उदावसु [ ९,१३,१३ ]

**मिथिला**–विदेहदेशाची मिथिलानें स्थापिलेली नगरी [ ९,१३,१३ ]

**मिश्रक**–भारतवर्षीय तीर्थ.

**मिश्रकेशि**—राधा कन्या एक अप्सरा. व सुदेवाचा भाऊ वत्सक याची पत्नी. हिला वृकादि पुत्र झाले [ ९,२४,४३ ]

**मिहिराक्ष**–महिषासुराचा एक प्रधान.

मी

**मीढुष**-इंद्र व पौलोमी यांचा एक पुत्र.

**मीढ्वान्**—नरिष्यंत कुलांतील दक्षाचा पुत्र. याचा पुत्र कूर्च. [ ९,२,१९ ]

**मीन**-( मासा ) अवधूतानें केलेला एक गुरु. [ ११,७,३४ ]

( २ ) बारा राशींपैकीं एक.

मु

**मुकुट**—भारतवर्षीय एक तीर्थ.

**मुकुटा**–नदी. उगम-ऋष्यवान् पर्वत.

**मुकुंद**--शाल्मली द्वीपांतील एक पर्वत. [ ५,२०,१० ]

( २ ) विष्णूस नांव. [ १०,५०,३६ ]

( ३ ) कुबेराच्या नवनिधींतील सहावा.

**मुक्ति**-पुराणाच्या दशविध लक्षणांपैकीं एक. ( मोक्ष ) [ २,१०,१ ]

**मुक्तिक**–यजुर्वेदोपनिषत.

**मुचुकुन्द**-सूर्यवंशाय मान्धाता व बिंदुमति यांचा कनिष्ठ पुत्र. यानें देवांना सहाय्य केल्यावर विश्रांतीकारितां निद्रा घेण्यास निवांत स्थल असावें, व कोणी निद्राभंग केल्यास तो भस्म व्हावा, आणि लागलेच आपणास भगवंताचें दर्शन व्हावें, असें मागितलें होतें. हा दाशरथिरामाच्या पूर्वीचा एकेचाळीसावा पुरुष होय. अठ्ठाविसाव्या पर्यंयांत द्वापरयुगाच्या अन्तीं श्रीकृष्णानें कालयवनाकडून याचा निद्राभंग करवून त्याचा नाश केला. आणि पूर्ववरानुरूप यास दर्शन दिलें. भगवंतानें दर्शन दिल्यानंतर सृष्टींत झालेलें अपूर्व स्थित्यंतर पाहून हा तप करण्याकरिता बदरिकाश्रमाला गेला. [ ९,६,३८ व १०,५१,१४ ].

**मुंजकेतु**-पाण्डवांचा मित्र. एक राजा.

**मुंजवट**–द्वैतवनातील तीर्थ.

**मुंजाटवी**–वृंदावनाजवळील एक अरण्य. याला वनवा लागून गोपबाल यांत सांपडले होते. [१०, १९, ५].

**मुण्ड**–चण्ड दैत्याचा कनिष्ट भ्राता.

( २ ) भारतवर्षीय एक देश.

**मुण्डक** अथर्वण वेदोपनिषत्.

**मुद**--दक्षकन्या तुष्टि व धर्मऋषि यांचा पुत्र [ ४, १, ५१ ].

**मुदित**–रामसभेतील एक सेवक.

**मुद्गल**-सोमवंशीय पूरुकुलांतील भर्म्याश्वाच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ. याला

दोन जुळीं मुलें झालीं होतीं. त्यांतील मुलगा तो दिवोदास व मुलगी अहल्या. याचेपासून मौद्गल्य संज्ञक ब्राह्मणकुल झालें. [ ९, २१, ३१ ]
( २ ) अत्रिकुलांतील एक ऋषि.
( ३ ) अंगिरस कुलांतील कुरु क्षेत्रांत राहणारा एक ऋषि. हा शिलोंच्छ वृत्तीनें रहात असे. दुर्वास ऋषि याचें सत्व पहाण्याकरितां येऊन याचें सर्व अन्न भक्षण करी. असें पांच वेळ झालें, पण यास राग आला नाहीं. तेव्हां दुर्वासऋषि प्रसन्न झाले, व 'उत्तमलोकास गमन कर' असा त्यांनीं यास आशीर्वाद दिला. त्याप्रमाणें यास नेण्याकरितां विमान आलें परंतु स्वर्गादिलोकांतील सुखोपभोग क्षणिक असतात म्हणून यानें स्वर्गी जाण्याचें नाकारलें, आणि ब्रह्मविद्यासंपादन करून हा मोक्षास गला. ( भा. वन. )
( ४ ) ऋग्वेदोपनिषत्.

**मुद्गलायन**—भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**मुनि**—चालू वैवस्वत मन्वंतरांतील दक्षकन्या व धर्मपत्नी. [ ६,६,२६ ] हिचे पुत्र देवगंधर्व. ( भा. आदि )
( २ ) रैवतमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.
( ३ ) दहा विश्वेदेवांपैकीं एक

**मुर**—नरकासुराचा अनुयायी एक असुर. यास कृष्णानें मारिलें. याला ताम्र, अंतरिक्ष, श्रवण, विभवसु, वसु, नभस्वान व अरुण, असे सात पुत्र होते. [ १०,५९,३-१० ]

**मुरचीपत्तन**-किष्किंधेच्या दक्षिणेकडील एक नगरी. ( वा. रा. किष्किंधा. )

**मुष्टिक**—कंससभेंतील एक मल्ल. यास बलरामानें मारिलें [ १०,४४,२४ ]
( २ ) चांडालाम नाव. वसिष्ठपुत्र यज्ञास न जातां त्यांनीं विश्वामित्र आणि त्रिशंकु राजा यांचा उपहास केला, म्हणून विश्वामित्रानें त्यांस 'चाण्डाल व्हाल' असा शाप दिला. ( वा. रा. बाल. )

**मुसल**—बलरामाचें आयुध [ १०,६३,१६ ]
( २ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

**मुहूर्त**-धर्म ऋषि व मुहूर्ता यांचें पुत्र. [ ६,६.९ ]

**मुहूर्ता**-दक्षकन्या, धर्मऋषीची पत्नी. हिचे पुत्र मुहूर्ताभिमानी देव [ ६,६,४-९ ]

## मू

**मूक**-वराहरूप घेऊन किरात व अर्जुन यांच्या युद्धास कारणीभूत झाले. एक असूर.

**मूर्तय**-सोमवंशीय विजयकुलांतील कुशाच्या चार पुत्रांतील दुसरा [ ९,१५,४ ]. याला अमूर्तरजा अथवा असूर्तरजा असेंहि म्हटलें आहे. यानें धर्मारण्य नगरी स्थापन केली. ( वा. रा. बाल. )

**मूर्ति**-स्वायंभुव मन्वंतरांतील दक्षकन्या व धर्मऋषीची कनिष्ठ पत्नी. हिचे पुत्र नरनारायण. [ ४,१,५०,५२ ].
( २ ) वसिष्ठाचा पुत्र. स्वारोचिष मन्वंतरांतील एक प्रजापति.
( ३ ) पुढें होणाऱ्या ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतलि सप्तर्षींपैकीं एक.

**मूर्द्धा**—बारा भार्गवदेवांपैकीं एक.

**मूल**—एक नक्षत्र. दक्षकन्या व सोमपत्नी. हें शिशुमारचक्राच्या डाव्या कानावर आहे. [ ५,२३,६ ].

**मूलक**-सूर्यवंशीय अश्मकाचा पुत्र. परशुरामानें निःक्षत्रिय पृथ्वी केली, त्यावेळीं स्त्रियांनी याचें रक्षण केलें. त्यामुळें यास नारीकवच असें नांव पडलें. पुढील क्षत्रियांचा हा मूळपुरुष म्हणून यास मूलक असेंहि म्हणतात. याचा पुत्र दशरथ. [ ९-९-४० ]

**मूलतापी**-भारतवर्षीय नदी व तीर्थ.

**मूलप**-अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**मूलहर**- ,, ,,

**मूली**-एक नदी. उगम-महेंद्र पर्वत.

**मूषकाद**-एक नाग विशेष.

**मृ.**

**मृकण्ड**-स्वायंभु मन्वंतरांतील धाता नामक ऋषीचा पुत्र याचा पुत्र मार्कंडेय.

**मृग**-एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकी एक [ ५,२३,६ ].

**मृगकांता**-नदी. उगम मानससरोवर.

**मृगकेतु**-वरुणकुलांतील ब्रह्मर्षि.

**मृगधूप**-भारतवर्षीय तीर्थ.

**मृगमन्दा**-कश्यप व प्राधा यांची कन्या.

**मृगव्याध** एकादश रुद्रांपैकीं एक.

**मृगावती**-यमुनातीरावरील सतीचा विभूती

**मृगी**-कश्यप व क्रोधा यांची कन्या.

**मृग्या**-मानससरोवरापासून निघालेली नदी

**मृड**-शंकरास नांव.

**मृडानी**-पार्वतीस नांव.

**मृत**-याचनावृत्ति [ ७,११,१८ ].

**मृतपा**-दनुपुत्र एक दानव.

**मृत्तिकावती** एक नगरी.

**मृत्यु**-कलि व दुरुक्ति यांची कन्या [४,८,४]

( २ ) ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेली एक स्त्री. जगाचा क्षय करण्याच्या कामावर हिला ब्रह्मदेवानें नेमिलें असतां हिनें तें काम नाकारलें व तपश्चर्या केली. परंतु ब्रह्मदेवानें तेंच काम पुनः हिला दिलें; आणि मृत्यूचा आरोप तुझ्यावर न येतां, त्यास रोग कारण होतील असें सांगितलें(भा.द्रो.)

( ३ ) यमास संज्ञा.

( ४ ) चालू मन्वंतरांतील सहावा व्यास.

**मृत्युंजय**-शंकरास नांव.

**मदुर**-श्वफल्क व गांदिनी यांचा एक पुत्र. [ ९,२४,१६ ].

**मृषा**-अधर्माची पत्नी. हिला दंभ व माया हीं अपत्यें होतीं. [ ४,८,२ ].

**मे.**

**मेकल(ख,ल**-किष्किंधेच्या दक्षिणेकडील देश याची राजधानी माहिष्मती (वा.रा).

( २ ) अमरकंटक डोंगर.

**मेकलकन्या**-नर्मदेस नांव.

**मेघ**-जलाची वृष्टि करणारे देव विशेष. यांचे दोन भेद आहेत. प्रतिवर्षी वृष्टि करणारे सामान्य मेघ आणि प्रलयकालीं वृष्टि करणारे प्रलयमेघ. हे सात आहेत. संवर्त भीमनाद, द्रोण, चण्ड, बलाहक, विद्युत्पताक आणि शाण. ( मत्स्य अ. २ ) ब्रह्मदेवाच्या नित्यप्रलयांत केवळ समुद्र वाढून भू, भुव, स्वर, हे तीन लोक बुडतात, आणि महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्य लोक, हे बुडविण्याकरितां महाप्रलयाच्यावेळीं हे प्रलयमेघ वृष्टि करतात.

( २ ) तारकासुरानुयायी एक असुर.

( ३ ) किष्किंधेच्या पश्चिमेकडील पर्वत. यास सौवर्णपर्वत असेंहि म्हणत.

**मेघनाद**—देवगण विशेष.
( २ ) इंद्रजिताचें नांव.
( ३ ) मेघवर्ण राक्षसास नामांतर.
( ४ ) भारतवर्षीय एक तीर्थ.

**मेघनिनाद**—इंद्रजितास नांव.

**मेघपुष्प**—श्रीकृष्णाच्या रथाच्या चार अश्वांपैकीं एक. [ १०, ५३, ५ ]

**मेघपृष्ठ**—प्रियव्रत पुत्र घृतपृष्ठ, त्याच्या सात पुत्रांतील तिसरा. [ ५,२०,२१ ]
( २ ) क्रौंचद्वीपांतील मेघपृष्ठाचा वर्ष.

**मेघमाल**—प्लक्षद्वीपांतील पर्वत [ ५,२०,४ ]

**मेघमाली**-खर राक्षसाच्या अमात्यांपैकीं एक.

**मेघवर्ण**-घटोत्कचपुत्र. पाण्डवाच्या अश्वमेधाचे वेळीं श्यामकर्ण अश्व आण ण्याचीं व त्याचें संरक्षण करण्याची कामागिरी यानें उत्तम केली. यास मेघनाद असेंहि म्हटलें आहे.

**मेघवान्**—दनुपुत्र एक दानव.

**मेघवासा**—वरुणलोकांतील एक असुर.

**मेघवाहन**-इंद्रास नांव.
( २ ) करुषक देशीय एक राजा.

**मेघसन्धि**-मागधवंशीय जरासन्धपुत्र सहदेवाचा मुलगा. पाण्डवांचा अश्वमेधाचा अश्व यानें धरिला होता. परंतु अर्जुनानें याचा पराभव केला भा.अ )

**मेघस्वाति**— कलियुगांतील आन्ध्रवंशीय चिबिलकाचा पुत्र.याचा पुत्र अटमान. [ १२,१,२४ ]

**मेदशिरा**-कलियुगांत बहुसंज्ञक राजानंतर झालेला एक राजा. [ १२,१,२७ ]

**मेदिनी**-मधुकैटभाच्या मेदानें व्याप्त झाल्यामुळें पृथ्वीस पडलेलें नांव.

**मेदोहा**-भीषण राक्षसाचा पुरोहित.

**मेधा** स्वायंभुमन्वंतरांतील दक्षकन्या. धर्मऋषींची पत्नी. हिचा पुत्र स्मृति. [ ४,१,५०-५२ ]

**मेधातिथि**-परीक्षिताकडे आलेला एक ऋषि. [ १,१९,१० ]
( २ ) प्रियव्रताच्या दहा पुत्रांपैकीं आठवा पुत्र हा दधिसमुद्रवेष्टित शाकद्वीपाचा अधिपति होता. यानें आपल्या द्वीपाचे सात भाग करून ते आपल्या पुरोजव, मनोजव. पवमान्, धूम्रानीक, चित्ररफ, बहुरूप आणि विश्वाधार असा सात पुत्रास दिले. [ ५,१,२५ व ५,२०,२५ ]
( ३ ) सोमवंशीय पूरुकुलांतील कण्वराजाचा पुत्र. याचे वंशज ब्राह्मण झाले. [ ९,२०,७ ]
( ४ ) उपागवमूच्या यज्ञांतील ऋत्विज.
( ५ ) चाक्षुमन्वंतरांतील सातरावा व्यास.

**मेधातिथी**-कुलिंदराजाची पत्नी. चंद्रहास्याची माता.

**मेधावी**—पाण्डवकुलांतील सुनयाचा पुत्र. याचा पुत्र नृपंजय. [ ९,२४,४२ ]
( २ ) बालधि ऋषीचा पुत्र. हा पर्वतायु या नांवानें प्रसिद्ध होता.
( ३ ) एक ब्राह्मण ( भा. शांति. )

**मेनका** प्राधाकन्या एक अप्सरा. हिला विश्वामित्रापासून शकुंतला झाली. [ ९,२०,१३ ]
( २ ) ज्येष्ठांत मित्रनांवाच्या सूर्याबरोबर फिरणारी अप्सरा [ १२,११,३५ ].
( ३ ) ऊर्णायु गंधर्वाची पत्नी.
( ४ ) मेनेचें नामांतर.

**मेना**—वैराज नामक पितरांची मानस कन्या. हिमालय पर्वताची पत्नी. हिला,

मैनाक व क्रौंच असे दोन पुत्र, व अपर्णा, पर्णा, एकपर्णा, अशा तीन कन्या होत्या. [४,७,५८]. (मत्स्य.)

(२) भारतवर्षीय एक नदी.

**मेरु**–इलावृताच्या मध्यभागीं असलेला सुवर्णाचा पर्वत. याची उंची एक योजनें असून जमिनीपासून चौऱ्यांयशीं हजार योजन आहे. याच्या मस्तकावर ध्रुवमण्डल असून सूर्यचन्द्रादि मंडलें याच्या भोंवतीं फिरत असतात. हा पृथिवीचा मध्य बिंदु असून याच्या चार दिशांना मंदर, मेरुमन्दर, सुपार्श्व आणि कुमुद हे चार आधार पर्वत आहेत. आणि सप्तमहाद्वीपें, सप्तमहासमुद्र, लोकालोकपर्वत इत्यादि याच्या भोंवतीं वलयाकार असून कर्णिकाकार वीस पर्वत आहेत; त्यांचीं नांवे केसर, कुरंग, कुरर, कुसुंभ, वैकंक, त्रिकूट, शिशिर, पतंग अथवा शिखर, रुचक, निषध, शिनिवास, कपिल, शंख, वैदूर्य, जारुधि, हंस, ऋषभ, नाग, कालंजर आणि नारद. (दे. भा.) याच्या पूर्वेस जठर आणि देवकूट; पश्चिमेस पवन आणि पारियात्र; दक्षिणेस कैलास व करवीर व उत्तरेस त्रिशृंग आणि मकर. याप्रमाणें प्रत्येक दिशेस दोन दोन पर्वत असून त्या प्रत्येक पर्वताची लांबी अठरा हजार योजनें व रुंदी आणि उंची दोन हजार योजनें आहे. याच्या आसमंतात चतुष्कोणाकृति इलावृत असून निषध, गंधमादन, नील आणि माल्यवान हे याचे मर्यादागिरि आहेत. निषधपर्वताच्या दक्षिणेकडे हेमकूट आणि हिमालय हे पर्वत असून त्यांत हरिवर्ष, किंपुरुषवर्ष व भरतवर्ष हे भाग आहेत. गंधमादनापुढें भद्राश्ववर्ष आहे. नीलपर्वतापुढें श्वेत आणि शृंगवान हे पर्वत असून त्यांत रम्यकवर्ष, हिरण्मयवर्ष आणि कुरुवर्ष हे तीन भूभाग आहेत. माल्यवान पर्वतापुढें केतुमालवर्ष आहे. यांच्या आसमंतात् क्षार समुद्र वलयाकार असल्यामुळें आपण राहतों ते भरतवर्ष, आणि मेरूच्या पलीकडील कुरुवर्ष, हीं धनुष्याकार आहेत. [ ५,१६,७ ते २७ ]. (भा. भीष्म.) या मेरुदेवतेस मेरुदेवी, प्रतिरूपा, उग्रदंष्ट्री, लता, रम्या, श्यामा, नारी, भद्रा आणि देववीति या नऊ कन्या होत्या, त्या यानें आग्नीध्राच्या नऊ पुत्रांस दिल्या होत्या. [ ५,२,२३ ]. शिवाय आयति व नियति या दोन कन्या धाता व विधाता यास दिल्या होत्या. [ ४,१,४४ ].

**मेरुदेवी**–मेरूची कन्या व आग्नीध्रपुत्र नाभीची पत्नी. हिचा पुत्र ऋषभदेव. [ १,३,१३ व ५,२,२३ ].

**मेरुमंदर**–मेरूच्या दक्षिणेकडील एक आधार पर्वत. यावर जांभळीचा वृक्ष असून त्याच्या फळापासून जम्बू नदी निघते. या पर्वतावर मधाचा डोह व चित्ररथ उद्यान आहे. [ ५, १६, ११ ].

**मेरुसावर्णि**–धर्मसावर्णि मनूचें नांव.

**मेष**–द्वादश राशींपैकीं एक. [ ५,२१,४ ]

(२) कश्यपकुलांतील ब्रह्मर्षि.

## मै

**मैत्रायण**–सोमवंशीय अजमीढकुलांतील दिवोदासाचा एक पुत्र.

**मैत्रायणि**–सामवेदोपनिषत्.

**मैत्रावरुण**–( णि ) अगस्त्य ऋषि व वसिष्ठ यांस संज्ञा (वा. रा. उत्तर.)

**मैत्री**-स्वायंभुवमन्वंतरांतील दक्षकन्या व धर्मपत्नी. हिचा पुत्र प्रसाद [४,१,४९]

**मैत्रेय**-भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

( २ ) अत्रिकुलांतील ब्रह्मर्षि.

( ३ ) पराशर ऋषीचा शिष्य. यानें दुर्योधनास उपदेश केला असतां, दुर्योधनानें उन्मत्तपणानें आपली मांडी थोपटली.तेव्हां'भीमाच्यागदा प्रहारानें तुझी ही मांडी चूर्ण होईल.' असा यानें त्यास शाप दिला. यानें विदुरास उपदेश केला होता. हा परीक्षिताकडे आला होता.[ ३,१,१व१,१९,१० ].

**मैत्रेयी**-याज्ञवल्क्य ऋषीच्या दोन स्त्रियांपैकीं एक ही ब्रह्मनिष्ठ होती.

( २ ) सामवेदोपनिषत्.

**मैथिल**–विदेहवंशीय राजे. या राजाकडे बलराम व श्रीकृष्ण गेले होते. [ १०,५७,२५ व १०,८२,२५ ]

**मैथिली**-मैथिलांच्या कन्या. ( सीता )

**मैनाक**–हिमालय व मेनका यांचा पुत्र. हा इंद्राच्या भीतीनें समुद्रांत लपला होता मारुती सीताशोधासाठीं लंकेस चालला असतां, समुद्राच्या सांगण्यावरून हा बाहेर आला, व आपल्या शिखरावर विश्रांति घेण्याविषयीं यानें मारुतीस विनंति केली. (वा. रा. सुंदर.)

( २ ) भारतवर्षीय एक पर्वत.

**मैन्द**–सुषेण वानराच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. द्विविदाचा भाऊ. हे बंधु अंगदाचे मातुल होते यानें रामास उत्तम सहाय्य केलें. [ १०,६७,२ ]

## मो

**मोक्ष**-चतुर्विधपुरुषार्थांतील चौथा[३,२८,३]

**मोदागिरि**–अंगदेशाच्या पूर्वेकडील पर्वत.

**मोदापूर**–उलूक देशाच्या उत्तरेकडील नगर पाण्डवांच्या वेळीं येथें वामदेव आणि सुदामा असे दोन राजे होते.(भा.स.)

**मोदोष**—वेददर्शी मुनीचा अथर्ववेदाचा एक शिष्य. [ १२,७,२ ]

**मोह**–ब्रह्मदेवानें छायेपासून उत्पन्न केलेल्या पांच अविद्येपैकीं एक. [ ३,२०,१८ ]

**मोहन**-एक नगर. ( भा वन. )

**मोहिनी**–भगवंताचा तेरावा अवतार. चाक्षुषमन्वंतरांत समुद्रमंथन झाल्यावर भगवंतानें हा अवतार धारण करून देवांना अमृत पाजिलें [ १,३,१७ व ८,८,४१ ] शंकरानां मोहिनीरूपदर्शन व शंकरानें केलेली स्तुति. [ ८,१२,४ ते ४० ]

**मौंज**–भृगुकुलांतील ब्रह्मर्षि

**मौंजकेश**–अत्रिकुलांतील ब्रह्मर्षि.

**मौंजवृष्टि**-अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**मौंजायनि**–विश्वामित्रकुलांतील ब्रह्मर्षि.

**मौद्गल्य**–सोमवंशीय भर्म्याश्वपुत्र. मुद्गलाचे ब्राह्मण झालेले वंशज. [९,२१,३३]

( २ ) दाशरथिरामाच्या सभेंतील आठ धर्मशास्त्र्यांपैकीं एक.

( ३ ) जनमेजयाच्या सत्रांतील सदस्य.

( ४ ) अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**मौन**–कलियुगांत गुरुण्ड राजानंतर झालेले अकरा राजे. यांनीं तीनशें वर्षे राज्य केलें. [ १२,१,३०-३२ ]

**मौर्य**–नन्दवंशानंतर झालेले चंद्रगुप्तादि दहा राजे. यांनीं एकशेंसदतीस वर्षें राज्य केलें. [ १२,१,१२ ते १५ ]

**मौहूर्तिक**–धर्मऋषि व मुहूर्ता यांचे पासून झालेले मुहूर्ताभिमानी देव [६,६,९]

**म्लेच्छ**–स्वच्छंदाचारी, अस्पष्ट भाषणी, व ज्ञानविज्ञान शून्य अशा जाती. कलियुगांतील राजे म्लेंच्छप्राय होतील असें भविष्य. [ १२,१,३९ ]

## य

**यकृल्लोम**–भारतवर्षीय देश. ( भा. भीष्म. )

**यक्ष**–देवयोनींतील एक जात. ब्रह्मदेवांनीं कांहीं प्राणी उत्पन्न केल्यावर त्यांनीं 'किं कुर्मः' [ काय करावें ] असें विचारलें असतां, त्यानें 'रक्षध्वं' [ प्राण्यांचें रक्षण करा ] असें सांगितलें. त्यांत कांहींनीं 'यक्षाम' आणि कांहींनीं 'रक्षाम' असें उत्तर दिलें. ते अनुक्रमें यक्ष व राक्षस झाले. यांचा राजा कुबेर. हे विद्याधरांच्या निवासस्थानाच्याखालीं जेथपर्यंत वायु वाहतो व मेघ फिरतात, तेथपर्यंत पृथ्वीपासून शंभर योजनें अंतरावर मेरूपर्वतावर राहतात [ ५,२४,५ ] ( वा. रा उत्तर. )

**यक्षी**–यक्षस्त्रिया. [ १०,९०,९ ]

**यजुर्वेद**–चार वेदांतील दुसरा. हा ब्रह्मदेवाच्या दक्षिण मुखापासून उत्पन्न झाला याचा उपवेद धनुर्वेद. [ ३,१२,३७ ]. हा व्यासानें वैशंपायनाला शिकविला व वैशंपायन-शिष्य याज्ञवल्क्यानें सूर्यापासून स्वतंत्र मिळविला[१२,६,५२ते७३].

**यज्ञ**–याग [ ३,१४,२४ ].

( २ ) स्वायंभुव मन्वंतरांत रुचिऋषि व आकूती यांचेपासून झालेला भगवंताचा सातवा अवतार. याची पत्नी दक्षिणा व पुत्र तुषित संज्ञक बारा. यास स्वायंभुमनूनें पुत्रिका धर्मानें घेतलें होतें. हा स्वायंभुमन्वंतरांत इंद्र होता. [ १,३,१२; ४,१,८ व ८,१,१८ ].

**यज्ञकेतु**–शतकौरवांपैकीं एक

**यज्ञकोप**–रामानें मारिलेले रावणपक्षीय दोन राक्षस.

**यज्ञपिंडायन**–भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**यज्ञबाहु** –प्रियव्रताच्या दहा पुत्रांतील तिसरा. सुरोदानें वेष्टित शाल्मलीद्वीपाचा अधिपति. यानें आपल्या द्वीपाचे सात भाग करून ते सुरोचन, सौमनस्य, रमणक देववर्ष, पारिभद्र, आप्यायन, अविज्ञात या सात पुत्रांस दिले. [ ५,१,२५ व ५,२०,९ ]

**यज्ञवल्क्य**-याज्ञवल्क्य ऋषीचा पिता.

**यज्ञवराह**-वराह अवतार.

**यज्ञवाह**–अगस्त्य कुलोत्पन्न ऋषि.

**यज्ञशत्रु**-लंकेंतील एक राक्षस.

**यज्ञश्री**–कलियुगांत झालेल्या बहुसंज्ञक राजांपैकीं शिवस्कंदाचा पुत्र. याचा पुत्र विजय. [ १२,१,२७ ]

**यज्ञसेन**–पृषतपुत्र द्रुपदाचें नामांतर.

**यज्ञहोत्र**-तिसऱ्या उत्तम मनूचा एक पुत्र. [ ८,१, २२ ]

**यति**-ब्रह्मदेवाचा एक मानसपुत्र. हा नैष्ठिक ब्रह्मचारी होता. [ ४, ८, १ ]

( २ ) सोमवंशीय आयुपुत्र नहुषाच्या सहा पुत्रांतील ज्येष्ठ हा विरक्त होता [ ९,१८,१-२ ]

( ३ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

**यदु**-सोमवंशीय आयुपुत्र ययाति व देवयानी यांचा ज्येष्ठ पुत्र. हा यादवांचा मूळ पुरुष [ ९, १८, ३३ ]. यानें पित्याची जरा घतली नाहीं. त्याचें कारण, आपलें तारुण्य पित्यास दिल्यास अंशतः तरी मातृगमनाचा दोष आपणास घडेल, म्हणून यानें सार्वभौमत्वाचा त्याग करूनहि पित्याचें म्हणणें नम्रपणें नाकारिलें. याला सहस्रजित्, क्रोष्टा, नल आणि रिपु, असे चार पुत्र होते [ ९,२३,२० ]. अवधूताचा ब्रह्मविद्येसंबंधीं उपदेश [ ११,७, ५ ].

( २ ) विदर्भदेशाचा एक राजा. यानें आपली प्रभा अथवा सुमति नामक कन्या सूर्यवंशीय सगराला दिली होती

( ३ ) उपरिचरवसूच्या पुत्रांतील एक.

( ४ ) वसुदेव व इला यांचा एक पुत्र.

**यम**-कल्पारंभीचा दक्षिण दिग्पाल. याची पत्नी धूमोर्णा. मानसोत्तर पर्वतावरील संयमिनी याची नगरी. याच्यामुळें दक्षिण दिशेस 'याम्या' नांव मिळालें.

( २ ) विवस्वत मनूला झालेल्या जुळ्यांतील मुलगा [ ६,६,४० ]. सांप्रत यांच्याकडे दक्षिणदिशेचें आधिपत्य आहे. यानें नचिकेताला ब्रह्मविद्या सांगितली. माण्डव्यऋषीच्या शापामुळें हा शंभर वर्षें विदूररूपानें शूद्र झाला होता [ १,१३,१५ ]. यास वैवस्वत, दण्डधर, काल, कृतांत, धर्मराज इत्यादि नांवें आहेत. राजस्त्रियांना उपदेश [ ७,२,३६ ].

**यमदूत**-विश्वामित्र ऋषीचा पुत्र.

**यमी**-विवस्वानमनु व संज्ञा यांस झालेल्या जुळ्यांतील मुलगी. [ ६,६,४० व ८,१३,९ ] हिला यमुनाहि म्हणतात.

**यमुना**-एक नदी व तिची देवता. हिला सूर्यकन्या व यमाची बहीण असें म्हटलें आहे. बंदरपुंच नामक हिमालयाच्या शिखराच्या (२०७३१ फूट) पश्चिमेस आठ मैलांवर उगम पावून ही जम्नोत्री नांवाच्या पवित्र तीर्थस्था, नावरून वहात येते. हिला बाणगंगा-चंबळा, इत्यादि नद्या मिळतात. ही उगमापासून ८६० मैल वहात आल्यावर प्रयागाजवळ गंगेला मिळते. [ ५,१९,१८ ] हिच्यातीरावर मथुरा वृंदावन इत्यादि क्षेत्रें असून रामकृष्णांच्या सर्व बाललीला येथें झाल्या.

**ययाति**-सोमवंशीय आयुपुत्र नहुषाच्या सहा पुत्रांपैकीं दुसरा. वडीलबंधु यति विरक्त असल्यामुळें हा राजा झाला. शुक्रकन्या देवयानीशीं याचा विवाह झाला याजपासून देवयानीला यदु व तुर्वसु असे दोन पुत्र झाले. [ ९,१८, १-३३ ] दैत्यराजकन्या शर्मिष्ठा याची द्वितीय पत्नी होती. [ ६,६, ३२ ] याजपासून शर्मिष्ठेस द्रुह्यु, अनु आणि पूरु असे तीन पुत्र झाले. देवयानीच्या इच्छेविरुद्ध यानें शर्मिष्ठेवर

प्रेम केल्यामुळें, देवयानी कोपाविष्ट झाली आणि शुक्राचार्यानें याला 'जरा प्राप्त होवो ' असा शाप दिला. पुढें यानें आपली जरा आपल्या पुरु नामक पुत्रास देऊन त्याचें तारुण्य आपण घेतलें [ ९,१८,३३-४८ ]. तारुण्याचा उपभोग घेतल्यानंतर यानें तें पुरूला परत दिलें, आणि त्यास सार्वभौमत्वाचा अभिषेक केला. नंतर आग्नेयीचा प्रदेश द्रुह्यूला, दक्षिणभाग यदूला, पश्चिमभाग तुर्वसुला व उत्तर-भाग अनूला याप्रमाणें राज्याचे भाग पाडून ते इतर पुत्रांस वाटून दिले व आपण अरण्यांत तपश्चर्येस निघून गेला [ ९,१९, ते २५ ]. हा मोठा धार्मिक होता. [ ९,१२,२४ ] याचीच कन्या माधवी.

**यवक्रीत**—एक ऋषि. याच्या पित्याचें नांव भारद्वाज. या पितापुत्रांस वेदाध्ययनाचा संसर्ग नसल्यामुळें त्यांस ऋषी वर्गांत मान्यता नव्हती. ही अडचण दूर व्हावी, व अध्ययनावाचून आपणांस वेदाचें ज्ञान व्हावें म्हणून यानें तपास आरंभ केला. एकदां इंद्र पृथ्वीवर संचार करीत असतां त्यानें यास पाहिलें व तपाचें कारण विचारलें. यानें त्यास आपला हेतू कळविला तेव्हां इंद्र म्हणाला, गुरुसेवापूर्वक अध्ययन केल्यावांचून नुसत्या तपानें वेदांचें ज्ञान प्राप्त होणार नाहीं. परंतु इंद्राचें भाषण यास रुचलें नाहीं. पुढें इंद्रानें ब्राह्मणाचें रूप घेऊन याच्या आश्रमाशेजारील नदींत मूठमूठ वाळू टाकण्याचा क्रम सुरू केला. तो प्रकार पाहून, हें काय करतोस ? असा यानें त्या ब्राह्मणास प्रश्न केला. ब्राह्मण ह्मणाला, मी या नदीवर सेतू बांधीत आहे. हें उत्तर ऐकून यास हंसूं आलें व ह्मणाला, अशानें सेतू कसा होणार? तेव्हां तो वेषधारी ब्राम्हण म्हणाला, अशानें जर सेतू होणार नाहीं, तर गुरुसेवापूर्वक अध्ययन केल्यावांचून तुला वेदाचें ज्ञान कसें येणार ? हें उत्तर ऐकून हा ओंशाळला, व ब्राह्मणरूपी इंद्रास शरण गेला. इंद्रानें यास आशिर्वाद दिला, व त्यायोगें यास वेदांचें पूर्ण ज्ञान झालें. पुढें ऋषींबरोबर विवाद करून अजिंक्य-पत्र मिळवावें, असें यानें मनांत आणलें, परंतु याचा पिता भारद्वाज ऋषीनें उपदेश करून यास त्या विचारापासून परावृत्त केलें. हा व याचा पिता जेथें आश्रम करून राहिले होते, तेथें जवळच विश्वामित्रऋषीचा पुत्र रैभ्य ऋषि आपले दोन पुत्र व स्नुषा यांसह रहात असे. एकदां हा त्यांच्या आश्रमांत गला असतां आश्रमांत एकटीच ती स्नुषा होती. तिजवर हा मोहित झाला, व तिला यानें आपली इच्छा दर्शविली. शापाच्या भीतीनें तिनें याची इच्छा तृप्त केली, आणि आपले श्वशूर रैभ्य ऋषि घरें आल्यावर त्यांस सर्व वर्तमान विदित केलें. ते ऐकतांच रैभ्य ऋषीनें हवन करून एक स्त्री व एक राक्षस उत्पन्न

केला, व त्यांस याजकडे पाठविले. त्या स्त्रीनें याम वश करून ती याजबरोबर रतिक्रीडा करूं लागली. इतक्यांत तो राक्षस तेथें आला. त्याम पहातांच हा लपण्याकरितां पित्याच्या यज्ञशाळेकडे धांवला. पण द्वाररक्षकानें याम प्रतिबंध केला. तोंच राक्षसानें येऊन याचा वध केला. होमाची वेळा होतांच भारद्वाज ऋषि यज्ञशाळेजवळ आले, तेव्हां एकंदर प्रकार पाहून त्याम फार दुःख झालें; आणि 'ज्यानें माझ्या पुत्राम मारलें त्याचा वध त्याच्या पुत्राच्या हातून व्हावो' असा त्यांनीं शाप दिला, व स्वतः अग्नि प्रवेश केला. या शापाप्रमाणें रैभ्य ऋषीचा वध त्याच्या परावसु नामक पुत्राच्या हातून झाला. परंतु रैभ्य ऋषीचा दुसरा पुत्र अर्वावसु परम ज्ञाता व सुशील होता. त्यानें उग्र तपश्चर्या करून देवांस प्रसन्न केलें आणि सर्वांस जिवंत करवून प्रत्येकास आपापल्या पातकांतून मुक्त करविलें.

**यवक्षा**—भारतवर्षीय एक नदी.

**यवन**—एक देश, व वेदबाह्य लोकविशेष. 'यवन म्हणजे ग्रीक' सगरानें यांस जिंकिलें [ ९,८,५, ].

( २ ) कलियुगात कंक राजानंतर झालेले आठ राजे [ १२, १, ३० ]

**यवयस-व्वया**- प्रियव्रतपुत्र इध्मजिव्हा च्या सात पुत्रांकीं एक [५,२०,३]

( २ ) प्लक्षद्वीपातील दुसरा वर्ष.

**यवस**—आठव्या सावर्णि मनूचा एक पुत्र.

**यवीनर**—पूरुकुलांतील द्विमीढाचा पुत्र. याचा पुत्र कृतिमान [ ९,२१,२७ ]

**यवीनर**-अजमीढपुत्र नील यांच्या कुलांतील भम्याश्वाचा पुत्र. [९,२१,३?]

**यशोदा** नंदपत्नी हिनें बालपणीं श्रीकृष्णाचें पालन केलें. [ १०,?,९ ] ही द्रोण नामक वसूची पत्नी धरा, तिचा अवतार होय. [ १० ८,५० ]

( २ ) हविष्मंत पितरांची मानस कन्या. अंशुमानाची पत्नी दिलीपाची माता.

**यशोधर** दुर्मुख पांचालाचा पुत्र याम दौर्मुख असेंहि म्हणत (भा द्रोण.)

**यशोनंदी** कलियुगांत किलकिला नगरींत झालेल एक राजा. [ १?,१ ३३ ]

**यशोदती** एक चक्रीनामक राजकन्येची सखी

**यस्क** भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

### या

**याज**-एक ऋषि (याजोपयाज शब्द पहा)

**याजोपयाज**- यमुनेच्या तीरीं राहणारे काश्यप गोत्रोत्पन्न दोन ऋषिपुत्र. यांतील उपयाज निस्पृह होता. याजानें द्रव्यलोभामुळें द्रुपदाचा यज्ञ करून द्रोणाच्या वधार्थ धृष्टद्युम्न पुत्र उत्पन्न केला होता.

**याज्ञवल्क्य**- वसिष्ठकुलांतील एक ऋषि. वैशंपायनाचा शिष्य. एकदां वैशंपायनाला ऋषींच्या नियमांचें उल्लंघन केल्यामुळें ब्रह्महत्येचें पातक लागलें होतें तें पातक व्रत करून दूर करावें, असें सर्व शिष्यांस त्यांनी सांगितलें असतां हे शिष्य असमर्थ आहेत, मीच व्रत करून दोष घालवितो ' असें यानें म्हटलें. या भाषणाचा वैशंपायनास राग आला, व ' इतरांची अवज्ञा करणारा तूं माझा शिष्य नव्हेस, माझे वेद

परत दे ' असें त्यानें म्हटलें. यानें लगच त्यांचे वेद त्यांस तप्तांगार रूपानें परत दिले, व आपण सूर्याची उपासना करून दुसरे वेद मिळविले ती वाजसनीय शाखा होय तिचे पंधरा भेद करून यानें त्या आपल्या शिष्यांस पढविल्या [ १२, ६, ६२ ते ७४ ] याला कात्यायनी व मैत्रेयी अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांत कात्यायनीला चंद्रकांत, महामेघ आणि विजय असे तीन पुत्र होते. ते चौदा हजार शिष्यांसह महादेवाच्या शापानें राक्षस योनीस प्राप्त झाले होते. मैत्रेयी ब्रह्मनिष्ठ होती वैशंपायन याचा मातुल होता. त्यानें याच्याशीं संबंध सोडल्यामुळें मातुल गोत्रांशीं शरीर संबंध घडूं नये, असा नियम केला तो अजून सर्व वाजसनीय शाखीय पाळतात. यानेंच दैवराति जनकाला ब्रह्मविद्येचा उपदेश केला.

( २ ) कोसलदेशांतील एक ऋषि. यानें जैमिनिशिष्य हिरण्यनाभापासून अध्यात्मविद्या मिळविली. [९,१२,४]

( ३ ) याज्ञसेनि बाष्कल ऋषीचा एक शिष्य [ १२,६,५५].

**याज्ञसेनि**–द्रौपदीस नामांतर

**याज्ञेय**–भृगुकुलांतील ब्रह्मर्षि

**यातुना**–दम्भ व मृत्यु यांचें अपत्य[४,८,४]

**यातुधान**-राक्षसांचा एक भेद.[२,१०,३९]

**यादव**-यदुकुलांतील पुरुष. श्रीकृष्णाच्या वेळीं यांची संख्या छप्पन्न कोटी होती असें म्हणतात, पण यदुवंशांत जन्मल्या पुरुषांची संख्या करणें कठीण म्हणून यदुकुलांतील कुमारांच्या शिक्षकांची गणती केली, ती तीन कोटी आठ हजार आठशें इतकी भरली. उग्रसेनाबरोबर नेहमीं दहा कोटी यादव असत. यादवांचीं कुळें एकशें एक होतीं. त्यांत श्रीकृष्ण मुख्य होता. [ १०,९०,४१ ते ४५]

**यान**-स्वायंभुवमन्वंतरांतील वसिष्ठाचा पुत्र.

**याम**–स्वायंभुवमन्वंतरांतील देव.[८,१,१८]

**यामी**–जामीचें नामांतर.

**यामिनी**–दक्षकन्या व तार्क्ष्यपत्नी. हिचे पुत्र शलभ. ( टोळ. ) [६,६,२१].

**यामुन**-पूर्वेस शूरसेन व पश्चिमेस ब्रह्मावर्त यांच्या मधील देश. गंगा व यमुना यांच्या मधील अंतर्वेदीला यामुनदेश व तेथील लोकांस यामुनलोक असें म्हणतात [ १,१०,३४ ].

( २ ) गंगा व यमुना यांचे मधील पर्वत. याच्या पायथ्याशीं पूर्वी पर्णशाल नामक गांव होता.

( ३ ) हिमालयाचें एक शिखर. येथें पांडव वनवासांत असतां राहिले होते. अजगररूपी नहुषानें भीमास गिळिलें असतां, त्याच्या प्रश्नाचीं उत्तरें देऊन युधिष्ठिरानें त्याचा उद्धार या ठिकाणीं केला. ( भा. वन. )

**यामुनि**–कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**यायावर**–जरत्कारु ऋषीस नामांतर.

**यास्क**–भृगुकुलांतील यस्क ऋषीचा पुत्र. व त्याचे वंशज.

( २ ) एक ऋषि. निरुक्तकार.

**युक्त**–पांचव्या रैवत मनूचा एक पुत्र.

**युग**-कृत, त्रेता, द्वापर आणि कलि, अशीं चार युगें आहेत. त्यांचीं संध्या व संध्यंश काल अनुक्रमें ४८००, ३६००,२४०० व १२०० वर्षें आहे. ह्या चार युगांमिळून एक महायुग. ही वर्षसंख्या देवमानानें असून मनुष्य मानानें ४३२०००० इतकीं वर्षें होतात. कृतयुगांत धर्म चतुष्पाद असून पुढें प्रत्येक युगांत त्याचा एक एक पाय ऱ्हास पावतो. व्यावहारिक युगगणनेकरितां हीं वर्षें अनुक्रमें ४००, ३००, २००, १०० अशीं घ्यावीं, असें आधुनिक विद्वान म्हणतात [ ३,११,१८ ते २१ ].

**युगंधर**-यदुकुलांतील कुणिचा पुत्र. [ ९,२४ १४ ].

( २ ) भारती युद्धांत मरण पावलेला सात्यकी पुत्र.

( ३ ) भारतवर्षीय एक देश.

**युगप**-देवगंधर्वांतील एक.

**युधाजित्**-सामवंशीय सात्वतपुत्र वृष्णि, त्याच्या दोन पुत्रांतील दुसरा. याचा पुत्र शिनि [ ९,२४,१२ ].

( २ ) केकयदेशाधिपति अश्वपतीचा पुत्र. भरताचा मामा.

( ३ ) अवंतीचा राजा. ध्रुवसन्धीची पत्नी लीलावती ती याची कन्या.

**युधामन्यु**-एक राजा. हा स्यमंतपंचक क्षेत्रीं आला होता. [ १०,८२,२५ ] भारतीयुद्धांत हा पाण्डवांकडे होता. याच्या रथाचे अश्व सारंग्या रंगाचे असत हा पराक्रमी होता, पण पुढें युधिष्ठिराचा चक्ररक्षक झाला होता. युद्ध समाप्तीनंतर शिबिरांत निद्रिस्त असतां अश्वत्थाम्यानें यास मारिलें.

**युधिष्ठिर**-पांडुपत्नी कुंतीला यमाचे मंत्र-प्रभावें करून झालेला पुत्र. हा पांडवांतील ज्येष्ठ होय. याला द्रौपदी पासून प्रतिविन्ध्य व पौरवी पासून देवक असे पुत्र झाले. [ ९,२२,२७-३० ] हा पापभीरु, दयाळु, प्राणिमात्राचा स्नेह संपादणारा असून यास अजातशत्रु म्हणत. हा सत्यवक्ता होता. पाण्डवनाशार्थ केलेले कौरवांचे आरंभींचे प्रयत्न फसल्यावर धृतराष्ट्रानें यास इंद्रप्रस्थाचें अर्धे राज्य दिलें. परंतु दुर्योधनानें शकुनीच्या सहायानें कपटी फांसे करून द्यूतांत याचें राज्य जिंकिलें व पांचही पाण्डवांस वनवासास पाठविलें. अज्ञातवासांत विराटगृहीं यानें कंक नाव धारण केलें होतें. भारती युद्धानंतर भीष्माकडे आगमन व प्रश्न [ १, ९,२५ ]. राजसूय यज्ञाविषयीं श्रीकृष्णाची प्रार्थना [ १०, ७२, ३ ]. युधिष्ठिराचा राजसूय यज्ञ [१०,७४, २ ]. परीक्षिताला राज्याभिषेक व महाप्रस्थान [ १,१५,३७-४० ]. युधिष्ठिर राज्य करीत असतां भीम युवराज व अर्जुन सेनापती होता. यानें पस्तीस वर्षें राज्य केलें. हा शरीरानें कृश असून सुवर्णाप्रमाणें गौर होता नाक मोठें व नेत्र विशाल असून ते आरक्त वर्ण असत. याचें धनुष्याचें नांव माहेंद्र, शंख अनंतविजय,व रथाचे अश्व हस्तीदंती रंगाचे

असत. रथावर नक्षत्रासहित चंद्रयुक्त सुवर्णाचा ध्वज असे याच्या नांवाचा एक स्वतंत्र शक होता.

**युद्धोन्मत्त**-लंकेतील एक राक्षस.

( २ ) महोदराम नामांतर.

**युयुत्सु**-धृतराष्ट्राला वैश्य जातीच्या दासीपासून झालेला पुत्र. हा महारथी अ न पाण्डवांकडे होता. [ ,१ ,९]

**युयुध**-विदेहवंशीय वसनंताचा पुत्र. याचा पुत्र सुभाषण. [ ९,१३,२५ ]

**युयुधान**-सोमवंशीय वृष्णिकुलांतील सत्यकाचा पुत्र. याचा पुत्र जय [ १९, २४,१४ ] यासच सात्यकी, शैनेय असें म्हणतात. हा धनुर्विद्येंत अर्जुनाचा शिष्य होता [ ३,१,३१ ]. याच्या रथाचे अश्व रुपेरी रंगाचे असत. यादव संहारप्रसंगी याचें अनिरुद्धाशीं युद्ध झालें. त्यांत हा मृत्यु पावला [ ११,३०,१६ ]

**युवनाश्व**-इक्ष्वाकुकुलांतील चंद्राचा पुत्र. याचा पुत्र शाबस्त [ ९,६,२० ]

( २ ) सूर्यवंशीय श्येनजिताचा पुत्र. हा अनपत्य असल्यामुळे वानप्रस्थ घेऊन आपल्या शत स्त्रियांसह अरण्यांत गेला. तेथें ऋषींनी पुत्र प्राप्तीस्तव यज्ञ केला. त्या यज्ञांतील अभिमंत्रित जल यानेंच प्राशन केल्यामुळें यास पुत्र झाला, तो मान्धाता. [ ९,६,२५ ते ३० ]

**यूगप**-धूम्रपराशर कुलोत्पन्न ऋषि.

**यूपकेतु**-सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील शत्रुघाती राजास नामांतर.

( २) सोमवंशीय बाल्हीकपुत्र सोमदत्ताचा एक पुत्र. हा दुर्योधनपक्षीय होता.

**यूपध्वज**-भारती युद्धांतील एक राजा.

**यूपाक्ष**-मारुतीनें मारलेला रावणाचा एक सेनापति. ( वा रा. )

( २ ) मैंदवानरानें मारलेला एक राक्षस

**योग**-स्वायंभुव मन्वंतरांतील धर्म व क्रिया यांचा पुत्र. [ ४,१,५१ ].

**योगकुण्डलिनी**-यजुर्वेदोपनिषत्.

**योगचूडामणि**-सामवेदोपनिषत्.

**योगतत्व**-यजुर्वेदोपनिषत्.

**योगमाया** भगवंताची माया. हिनें बलरामाला देवकीच्या उदरांतून रोहिणीच्या उदरांत घातलें. ही यशोदेच्या पोटीं जन्मास आली होती. कंस मारीत असतां ही आकाशांत निघून गेली हिला दुर्गा, भद्रकाली इत्यादि नांवें आहेत [ १०,२,६ ते १२ व १०,३,८ ते १२ ].

**योगशिखा**-यजुर्वेदोपनिषत्.

**योगीन्द्र**-शुक्राचार्य [ १२,१३,१९ ].

**योगेश्वर**-श्रीकृष्ण [ १,१,२३ ].

( २ ) देवसावर्णिमन्वंतरांतील भगवंताचा अवतार [ ८,१३,३२ ].

**योजनगंधा**-सत्यवतीचें नामांतर.

**योधयान**-कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**योधुयान नि**-सात्यकीचा पुत्र. हा यादव संहारांतून वांचला होता. याला युधिष्ठिरानें महाप्रस्थानास जातेवेळीं सरस्वतीतीरीं स्थापिलें. ( भा मौसल. )

**यौवनाश्व**-सूर्यवंशीय अंबरीषाचा पुत्र. याचा पुत्र हारीत. [ ९,७,१ ].

( २ ) मांधात्याचें नामांतर.

( ३ ) भद्रावती नगरीचा राजा. याचा भाऊ सुदेव. या राजाला प्रभावती स्त्री

व सुवेग पुत्र होता. याच्याजवळ श्यामकर्ण अश्व असून त्याचें रक्षण दहा अक्षौहिणी सैन्य करीत असे. पाण्डवांच्या अश्वमेघाच्या वेळीं व्यासाच्या सूचनेवरून याचाच अश्व मेघवर्णानें आणला होता.

र

**रक्तबीज**-एक असुर. याच्या रक्तबिंदूपासून असुर उत्पन्न व्हावे, असा यास रुद्राचा वर होता. शुंभ-निशुंभांच्या मदतीकरितां हा युद्ध करीत असतां कालिकेनें विशालरूप धारण करून जमिनावर रक्तबिंदु पडूं न देता याचा वध केला (दे. भा.)

**रक्षोगण-भोजन** मनुष्यांचे बळी देणारांस व नरमांस भक्षण करणारांस प्राप्त होणारा नरक [५,२६,७-३१]

**रघु**-सूर्यवंशीय दीघबाहूचा पुत्र. याचा पुत्र अज. हा प्रख्यात असल्यामुळें सूर्यवंशास याचे नाव मिळालें. [९,१०,१]

**रघुनंदन-नाथ**-रामचंद्रास नामांतर.

**रचना**-एक दैत्यकन्या. त्वष्टा प्रजापतीची पत्नी. हिचे पुत्र संनिवेश व विश्वरूप. [६,६,४४].

**रजनी**-शाल्मली द्वीपांतील नदी [५,२०,१०

**रजि**-सोमवंशीय आयूच्या पाच पुत्रांतील तिसरा याला पांचशें मुलगे होते. यानें दैत्यांचा नाश करून स्वर्गाचें राज्य इंद्राला परत दिलें. तेव्हां प्रत्युपकारार्थ आपल्या राज्याचा स्वीकार करावा अशी इंद्रानें याची प्रार्थना केली, परंतु ती यानें मान्य केली नाहीं. पुढें हा मृत झाल्यावर याचे पुत्र इंद्राकडे राज्य मागूं लागले, व यज्ञांतील हविर्भागही ग्रहण करूं लागले. शेवटीं बृहस्पतीनें त्यांचा बुद्धिभेद करून संहार केला. [९,१७,१२ ते १५].

**रज्जुबाल**-जटायूच्या पुत्रांतील एक.

**रणक**-इक्ष्वाकुवंशीय क्षुद्रक राजाचा पुत्र. याचा पुत्र सुरथ [९,१२,१५].

**रणंजय**-इक्ष्वाकुवंशीय कृतंजयाचा पुत्र. याचा मुलगा संजय [९,१२,१३].

**रणश्लाघी**-एक रुद्रगण.

**रणाश्व**-बर्हणाश्वाचे नामांतर.

**रति** विभूराजाची पत्नी. [५,१५,१६].

(२) मदन पत्नी [१०,५५,७].

(३) एक अप्सरा,

**रतिगुरु** प्राचेचा एक पुत्र.

**रत्ननगर**-मयूरध्वज राजाचें नगरी.

**रत्ना**-अक्रूराच्या स्त्रियांपैकीं एक

**रथकृत** धातानामक आदित्याबरोबर चैत्र मासीं फिरणारा यक्ष [१२,११,३३].

**रथचित्रा**-भारतवर्षीय एक नदी.

**रथध्वज**-कुशध्वज राजाचा पिता.

**रथप्रभु** वीराचें नामांतर.

**रथराजी** वङ्गदेशाची एक स्त्री.

**रथसेन** पाण्डवपक्षीय राजा. (भा द्रोण.)

**रथस्वन** मित्र सूर्याबरोबर ज्येष्ठ महिन्यांत फिरणारा यक्ष. [१२,११,३५]

**रथाध्यान** वीराचें नामांतर (रथप्रभु)

**रथीतर**-सूर्यवंशीय पृषदश्वाचा पुत्र. हा अनपत्य होता हा मरण पावल्यावर अंगिरस ऋषीपासून ब्रम्हतेजाने युक्त असे पुत्र याच्या स्त्रीला झाले. ते आङ्गिरस. हे श्रेष्ठ होते. [९,६,२].

**रथीतर**—अंगिराकुलांतील एक ऋषि.

**रन्तिभार**-सोमवंशीय पुरुकुलांतील ऋतेयूचा पुत्र याला, सुमति, ध्रुव आणि अप्रतिरथ पुत्र होते. [ ९,२०,६ ]

( २ ) सोमवंशीय दुष्यन्तपुत्र भरतकुलांतील संकृतीचा पुत्र. हा मोठा उदार होता. एकदां यास अठ्ठेचाळीस दिवस उपोषण घडल्यावर याच्या पुढें, खीर, सांजा, पाणी, इत्यादि प्रकारें क्षुधा व तृषा निवारण्याची सामग्री आली हा भोजनास बसणार इतक्यांत एक अतिथि आला. त्यास यानें आपल्या अन्नांतील अर्धे अन्न दिलें, व आपण भोजनास बसणार तांच एक क्षुधेनें पिडलेला असा शूद्र आला. त्यासहि यानें अन्न देऊन तृप्त केलें; आणि शेष राहिलेलें थोडें अन्न भक्षण करणार, इतक्यांत ज्याच्या बरोबर बरींच कुत्रीं आहेत असा चाण्डाळ आला, आणि त्यानें अन्नपाण्याची याचना केली. त्याबरोबर शेष अन्न व पाणी यानें त्या चाण्डाळाच्या स्वाधीन केलें; आणि तीन अतिथींना तृप्त करण्याचा योग जुळून आल्याबद्दल धन्यता मानली. अशा प्रकारें याच्या परोपकार वृत्तीची परिक्षा होतांच ब्रम्हादि तिन्हीं मूर्ति प्रगट झाल्या, व त्यांनीं यास वर मागण्यास सांगितलें. परंतु हा निरिच्छ असल्यामुळें यानें कशाचीहि अपेक्षा न करितां त्या सर्वव्यापी भगवंताला नमस्कार केला. हा मुक्त झाला इतकेंच नव्हे तर याचे सेवकहि याच्याबरोबर मुक्त झाले. [ ९,२१,२ ते १८ ]

**रभस**-सोमवंशीय आयुपुत्र रंभाचा मुलगा. याचा पुत्र गंभीर. [ ९,१७,१० ]

( २ ) रामसेनेंतील एक वानर.

( ३ ) रावणपक्षीय राक्षस.

**रमण**—धरनामक वसूचा एक पुत्र.

**रमणक**—जम्बूद्वीपाच्या अष्ट उपद्वीपांतील एक. श्रीकृष्णानें कालिया सर्पास येथेंच पाठविलें. [ ५,१९,३० व १०,१६,६३ ]

( २ ) प्रियव्रतपुत्र यज्ञबाहूच्या सात पुत्रांतील तिसरा व शाल्मलीद्वीपांतील याचा वर्ष. [ ५,२०,९ ]

( ३ ) प्रियव्रतपुत्र वीतिहोत्राच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ, व याचा पुष्करद्वीपांतील वर्ष [ ५,२०,३१ ]

**रमणचान**—चीनलोकांचा एक देश.

**रमा**—( लक्ष्मी. ) ही केतुमाल वर्षांत कामदेवस्वरूपी भगवंताची उपासना करते [ ५,१८,१७ ]

**रम्भ**-दिष्टकुलांतील विविंशति राजाचा पुत्र. याचा पुत्र खनिनेत्र [ ९,२,२५ ]

( २ ) सोमवंशीय पुरूरवापुत्र आयूच्या पांच पुत्रांपैकीं चौथा याचा पुत्र रभस. [ ९,१७,१-१० ]

( ३ ) करंभाचा ज्येष्ठ भ्राता

( ४ ) रामसेनेंतील एक वानर.

**रम्भकरम्भ**—दोन असुर. हे दोघे बंधु होते. यांनीं उग्र तपास आरंभ केला; त्यामुळें इंद्रास भीति उत्पन्न झाली व तो यांच्या नाशार्थ संधि पाहूं लागला.

एकदां स्नानार्थ करम्भ जलांत उतरला असतां इंद्रानें मगराचें रूप घेऊन त्यास आंत ओढलें व त्याचा नाश केला. नंतर रम्भानें तप करून त्रैलोक्यविजयी पुत्र होईल, असा अग्नीपासून वर मिळाविला. पुढें हा अरण्यांत भटकत असतां एका महिषीस पाहून कामुक झाला, व याच्यापासून तिला गर्भ राहिला. तिचें हा रक्षण करीत असतां एका महिषानें याला मारिलें. तेव्हां ती महिषी मालवट नामक यक्षाच्या आश्रयाला गेली. त्या यक्षानें त्या महिषाचा पराभव केला, आणि रम्भाचें प्रेत आणून दग्ध केलें. त्याच्याबरोबर महिषीनें सहगमन केलें असतां अग्नीनें तिच्या गर्भास वांचविलें. तो महिषासुर. ( दे. भा. )

**रम्भा**–प्राधेचीकन्या एक अप्सरा ही कार्तिक महिन्यात वरुण नामक सूर्याबरोबर फिरते. [ १२,११,३६ ]

**रम्य**–एक राजर्षि. याची कन्या एकावली.
( २ ) गोमतीनदीजवळचा एक पर्वत.

**रम्यक**–प्रियव्रतपुत्र आग्नीध्राच्या नऊ पुत्रांपैकीं पांचवा व याचा वर्ष. याची स्त्री रम्या. [ ५,२,१९ ]
( २ ) एक वर्ष येथे आग्नीध्रपुत्र रम्यक अधिपति आहे. यास श्वेतवर्ष असेंहि म्हणतात. याच्या उत्तरेस नील पर्वत, दक्षिणेस श्वेतपर्वत, व पूर्वेस व पश्चिमेस क्षारसमुद्र आहे. [ ५,१६,८ ]

**रम्या**–रम्यकाची पत्नी. [ ५,२,२३ ]

**रय**–पुरूरवा व उर्वशी यांचा चौथा पुत्र. याचा पुत्र रय [ ९,१५,१–२ ]

**रवि**–आकाशांतील एक मण्डल व तेथील अधिपतींचे सामान्य नांव. अवधूतानें यास गुरु केलें होतें. [ ११,७,३३

**रश्मिकेतु**–रावणपक्षीय राक्षस रामानें यास मारिलें. ( वा. रा. युद्ध. )

**रसकुल्या**–कुशद्वीपस्थ नदी. [५,२०,१५]

**रसा**–पृथ्वीस नांव

**रसातल**–सप्तपातालापैकीं पांचवें. हें विराटपुरुषाच्या पायाच्या पश्चाद्भागीं आहे. यांत पणि, निवातकवच, कालेय, इत्यादि दैत्य राहतात भगवंतांनीं वराहरूपानें पृथ्वी वर आणिली तेव्हां हिरण्याक्ष त्यांच्या शोधाकरित येथें गेला होता. [ २,१,२६; ३,१८, १ व ५,२४,३० ] येथे ब्रह्मदेवाच्या मुखापासून उत्पन्न झालेली सुरभि रहाते तिच्या दुग्धापासून क्षीरनिधि नांवाचा ऱ्हद झाला आहे. येथें फेनप नावाचे मुनि राहतात. या लोकाच्या चार दिशेस सुरूपा, हंसिका, सुभद्रा आणि सर्वकामदुघा अशा चार सुरभिकन्या राहतात. ( भा. उद्योग. )

**रहस्या** भारतवर्षीय एक नदी.

**रहूगण** सिंधुसौवीर देशाचा अधिपति. हा ब्रह्मविद्येच्या इच्छेनें कपिलाश्रमांत जात असतां मार्गांत याच्या सेवकांनी याचें वाहन उचलण्यास जडभरतास वेठीस घेतलें असतां त्याजकडून यास ज्ञानोपदेश झाला, व हा राजा त्यास शरण गेला. [ ५,१०,१ ].

## रा

**राका**-स्वायंभुव मन्वंतरांतील अंगिरा ऋषि व श्रद्धा यांच्या चार कन्यांतील चौथी कन्या. [ ४ १,३४ ].

(२) शाल्मलीद्वीपस्थ नदी [ ५,२ ,१० ]

( ३ ) धातानामक सातव्या आदित्याची एक पत्नी. हिचा पुत्र प्रातःकाळ. [ ६,१८,- ]

( ४ ) सुमालीराक्षस व केतुमतीची कन्या, विश्रवाऋषीची एक पत्नी.

**राक्षस** दैत्य, दानव, इत्यादि पकीं एक भेद. राक्षसाचा राजा रावण होता. राक्षसांची उत्पत्ति पौलस्त्यापासून झाली असे म्हणतात; पण विष्णुपुराणांत कश्यप व दक्षकन्या खसा याचा पुत्र जो राक्षस, त्याचे वंशज असें म्हटलें आहे. ब्रह्मदेवानें उदकाच्या रक्षणाकरितां जे प्राणी निर्माण केले, ते राक्षस असे रामायणांत म्हटलें आहे. रामायणात याचें वर्णन बरेंच सविस्तर दिलें आहे

**राक्षसविधि**-विवाहाच्या अष्टभेदापैकीं एक भेद. श्रीकृष्णानें रुक्मिणीशा जो विवाह केला तो राक्षसविधीचा विवाह होय [ १०,५२,१८ ].

**राका** बृहस्पति व शुभा याची एक कन्या

**राघव**-रघुवंशातील पुरुष विशेषतः राम.

**राजक**-कलियुगांतील प्रद्योतवंशीय विशाखयूपाचा पुत्र. याचा पुत्र नन्दिवर्धन [ १२,१,३ ].

**राजनी**-भारतवर्षीय एक नदी.

**राजपुर**-कलिंगदेशाचा राजधानी. येथील राजा चित्रांगद.

**राजराज**-कुबेर.

**राजवर्नेय**-कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**राजसूय**-सार्वभौमत्व निदर्शक यज्ञविशेष. [ १,९,४१ ].

**राजाधिदेवी**-सोमवंशीय शूर व मारिषा यांची एक कन्या, व अवंतिदशीय जयसेनाची पत्नी. हिची कन्या मित्रविंदा [ ९,२४,३१ व १०,५८,३१ ].

**राजेय**-रजीच्या पांचशे पुत्रांस संज्ञा.

**राज्यवर्धन** सूर्यवंशीय दिष्टकुलांतील मरुत्तपुत्र दमराजाचा मुलगा. याचा मुलगा सुधृति [ ९,२,२९ ].

**राधा**-विष्णूची शक्ति हा गोलोकांत कृष्णाची प्रियसखी आहे. ( दे. भा.)

( २ ) सोमवंशीय अनुकुलांतील अधिरथ सूताची स्त्री.

**राधेक** अजमीढकुलांतील जयसेनाचा पुत्र याचा पुत्र अयुत [ ९,२२,१० ].

**राधाकांत**-विष्णूभक्त रावण नामांतर.

**राधेय**-अधिरथाची राधेने पालन केल्यामुळे कर्णाचें नांव.

( २ ) अधिरथ व राधा यांचा औरस पुत्र. याला अभिमन्यूनें मारलें.

**राम**-जमदग्नि व रेणुका याचा कनिष्ठपुत्र. हाच परशुराम [ ९,१५,१३ ].

( २ ) सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील दशरथ व कौसल्या याचा पुत्र. याचें जन्म चैत्र शुद्ध नवमीस झालें. हा भगवंताचा अठरावा अवतार होता. याची पत्नी सीरध्वज जनकाची कन्या सीता. याचे सापत्न भाऊ लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न. विश्वामित्रानें यज्ञरक्षणाकरितां राम-लक्ष्म-

पाप नेळे असतां, ताटिका व इतर असुर यांचा याने नाश केला. मिथिलेंत धनुर्भंग व सीतास्वयंवर. परशुरामाचा गर्वपरिहार. यौवराज्याभिषक समारंभ व वनवास. वनवासप्रसंगीं खरादि राक्षसांचा वध. सुग्रीवाशीं मैत्री, वालीचा वध, दक्षिण समुद्रावर गमन, रामेश्वराची स्थापना व सेतुबंध. बिभीषणाशीं सख्य, रावणाचा वध, बिभीषणाला राज्याभिषेक, अयोध्येत आगमन, भरतभेट व राज्याभिषेक. या प्रमाणें रामचरित्रांतील महत्वाचे प्रसंग आहेत याने अकरा हजार वर्षे राज्य केलें. हा एकबाणी, एकवचनी, व एकपत्नी होता. याच्या राज्यांत, वैधव्य, चोर, अग्नि दुष्काळ प्रलय, इत्यादि अनर्थ कधींही होत नसत. याने अनेक अश्वमेध केले. याचे पुत्र, लव व कुश. याने सर्व प्रजाजनांसह अयोध्या नगरी निजधामास नेली. राज्याभिषेक प्रसंगीं याचें वय सुमारें चाळीस वर्षांचें होतें. रामाची आकृति भव्य असे. याचे बाहु हत्तीच्या सोंडेप्रमाणें निमूळते असून मुख चंद्राप्रमाणें, नेत्र विस्तृत व आरक्त आणि वर्ण श्याम होता. हा अजानुबाहु असे. हा अध्यात्मज्ञानी असून यानें अगस्त्यऋषीपासून शैवांदीक्षा घेतली होती ( ९, अ. १०-११ ) ( वा रा. ) ( भा. शान्ति. )

( ३ ) बलरामास नांव [ १०, २, १३ ].

**रामकपर्वत**-सुरभी पत्तनाच्या दक्षिणेकडील पर्वत. येथें पाण्डवांच्या वेळीं तिमिंगल राजा होता ( भा. सभा. )

**रामठ** एक देश. ( भा. सभा. )

**रामतापिनी** अथर्वण वेदोपनिषत.

**रामरहस्य** ,, ,,

**रामह्रद**-परशुरामानें मारिलेल्या क्षत्रियांच्या रक्तापासून झालेलें स्यमंतपंचक क्षेत्रांतील तीर्थ.

**रामेश्वर**-सेतूबंधाजवळचें एक प्रसिद्ध क्षेत्र. द्वादशज्योतिर्लिंगांपैकीं एक व चार धाम पैकीं एक धाम.

**रावण**-चालू वैवस्वतमन्वंतरांतील पुलस्त्यपुत्र विश्रवा व केशिनी अथवा कैकसी यांचा पुत्र [ ४, २, ३७ ]. हा जन्मला तेव्हां यास दहा शिरें होतीं; म्हणून यास दशग्रीव असें म्हणत. वैवस्वत मन्वंतराच्या अकराव्या चौकडींत याचें जन्म झालें. ( लिंग पु. ) यानें उग्र तप करून ब्रह्मदेव व शंकर यांपासून अनेक वर मिळविले. त्याचप्रमाणें यास नलकूबेर इत्यादिकांचे शापही पुष्कळ होते. ( भा. वन. ) याची पत्नी मंदोदरी व वडिल पुत्र मेघनाद अथवा इंद्रजित. यानें कुबेरापासून लंका व पुष्पक विमान मिळविलें होतें. त्रैलोक्यांतील अनेक देव व राजे यांचा पराभव यानें केला, पण सहस्रार्जुन व वाली, यांनीं मात्र याचा पराभव केला होता. भिक्षुरूप घेऊन यानें सीतेचें हरण केलें, म्हणून रामानें याचा वध केला. [ ९, १०, २३ ] रावण व

कुंभकर्ण हे पूर्वजन्मींचे हिरण्यकशिपू व हिरण्याक्ष होते. [ ७,१,४३ ]. हा मोठा शिवभक्त होता वेदांचीं खण्डें, संहितेचीं पदें व क्रम, जटा, घन इत्यादि वेदपठणाचे सर्व प्रकार यानें केलें होते. याचा जन्म अकराव्या चौकडींत झाला व चोविसाव्या चौकडींत याचें मरण झालें. म्हणजे यानें चवदा चवकड्या आयुष्याचा उपभोग घेतला यास दहा मुखें व वीस हात होते. हा कामरूपधर असल्यानें स्वेच्छेनें रूप धारण करी. याचा वर्ण काळा व आकृति विशाळ होती. हा भगवंताचा पूर्ण विरोधी भक्त होता.

**रावणि**-रावणाचे पुत्र विशेषत: इंद्राजित.

**राशि**-सव्वादोन नक्षत्रांची एक राशि. सूर्यास सामान्यतः एका राशींतून दुसऱ्या राशीस जाण्यास एक महिना लागतो. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तुळ, वृश्चिक, धन, मकर, कुंभ आणि मीन, याप्रमाणे बारा राशी आहेत. ह्या राशींतून सूर्य जात असतां कमी अधिक मानानें दिवसमानात फरक पडतो [५,२५,५]

**राष्ट्र**-क्षत्रवृद्धकुलांतील काशिराजाचा पुत्र. याचा मुलगा दीर्घतमा [ ९,१७,४ ]

**राष्ट्रपाल**-सोमवंशीय सात्वतकुलांतील उग्रसेनाच्या नऊ पुत्रांतील एक. कंसाचा धाकटा भाऊ. [ ९,२४,२४ ].

**राष्ट्रपालिका**- वसुदेवबंधु सृंजयाची पत्नी. उग्रसेनाची कन्या. हिचे पुत्र वृकदुर्मर्षणादि. [ ९,२४,२५-४२].

**राष्ट्रपाली**-राष्ट्रपालिकेचें नांव.

**राष्ट्रपिण्डी**-अंगिरा कुलांतील ब्रह्मर्षि.

**राष्ट्रभृत्**-प्रियव्रतवंशीय ऋषभदेवपुत्र भरताचा दुसरा पुत्र [ ५, ६, ३ ]

**राष्ट्रवर्धन**-दशरथाच्या अष्टप्रधानांतील अर्थसाधकाचें नामांतर.

**राहु**-प्रल्हादभगिनी सिंहिका व विप्रचित्ति दानव यांचा ज्येष्ठ पुत्र [ ६, ६, ३७ व ६, १८, १३ ]. समुद्रमंथनानंतर देवांचें अमृतपान चाललें असतां, देववेषानें हा सूर्यचंद्र यांच्या मध्यें बसला व अमृतपान केले, इतक्यांत सूर्यचंद्रानीं हा दैत्य आहे, असें विष्णूस सुचविलें. त्यानें चक्रानें याचें शीर तोडिलें, परंतु अमृत स्पर्शामुळें तें अमर राहिलें. म्हणून याला महत्व दिलें. चंद्रसूर्याच्या ग्रहणास हा कारण होतो हा प्रस्तुतच्या मन्वंतरांत आकाशामध्यें सूर्य मण्डळावर व चंद्रमंडळांच्या खालीं अंधकारमय राहुमण्डलाचा अधिपति आहे. याचे मण्डळ सूर्यमण्डलगतीनें फिरतें. हा शिशुमारचक्राच्या गळ्याचे ठिकाणीं आहे. [ ५,२३.७ ].

**राहुकर्णि**- अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**राहुकुल** गौतमांगिसातील एक कुल.

**रिटि** रुद्रगणांतील एक गण.

**रिपु**-सोमवंशीय आयुकुलांतील यदूच्या चार पुत्रांतील कनिष्ठ. [९,२३,२०]

**रिपुंजय**-सोमवंशीय पूरुकुलांतील द्विमीढ वंशांतील सुवीराचा पुत्र याचा पुत्र बहुरथ. [ ९,२१,२९ ]

**रिपुंजय**-सोमवंशीय जरासंध वंशांतील विश्वजिताचा मुलगा. हा या कुलांतील शेवटचा राजा होय. याला याच्या शुनकनामक प्रधानानें मारून प्रद्योत-वंशाची स्थापना केली. [ ९,२२, ४९, व १२,१ २ ]

( २ ) ध्रुवपुत्र शिष्ट व सुच्छाया यांचा एक पुत्र.

रु

**रुक्म**-सोमवंशीय यदुपुत्र क्रोष्टा कुलांतील रुचकाचा पुत्र [ ९,२३,३५ ].

**रुक्मक**-वैश्वदेव कर्मांतील अग्नि.

**रुक्मकवच**-रुचकाचा एक पुत्र.

**रुक्मकेश**-भीष्मकाचा चवथा पुत्र. [ १०,५२,२२ ].

**रुक्मबाहु**-भीष्मकाचा तिसरा पुत्र. [ १०,५२,२२ ].

**रुक्ममाली**-भीष्मकाचा पांचवा पुत्र. [ १०,५२,२२ ].

**रुक्मरथ**-भीष्मकाचा दुसरा पुत्र. [ १०,५२ २२ ]. हा द्रौपदीस्वयंवराचेवेळीं पांचालपुरांत होता.

( २ ) मद्रदेशाधिपति शल्यराजाचा ज्येष्ठ पुत्र. हा आपल्या शंभर भावांसह अभिमन्यूकडून मारिला गेला

**रुक्मवती**-रुक्मीची मुलगी व प्रद्युम्नाची पत्नी. पुत्र अनिरुद्ध. [१०.६१,१८]

**रुक्मांगद**-एक प्राचीन भगवद्भक्त राजा.

( २ ) द्रौपदीस्वयंवरांतील एक राजा.

**रुक्मि**-वैदर्भाधिपति भीष्मकाचा ज्येष्ठ पुत्र यानें रुक्मिणी शिशुपालास देण्याचें ठरविलें होतें. [ १०,५२,२२-२५ ] रुक्मिणीहरणानंतर यानें कृष्णाबरोबर युद्ध केलें, त्यांत याचा कृष्णानें पराभव केला, व अपमान करून सोडून दिलें. अपमानामुळें हा कुण्डिनपुरांत न जातां नगराबाहेर भोजकट नगर स्थापून राहिला. [ १० ५४,१८ ते ५१ ] यानें आपली कन्या रुक्मवती प्रद्युम्नाला दिली होती, आणि रोचना नांवाची नात अनिरुद्धाला दिली होती. त्या विवाहप्रसंगीं यानें बलरामाबरोबर कपटानें द्यूत खेळून बलरामाची निंदा केली, म्हणून त्याचे हातून हा मृत्यु पावला [१०,५९,१८]

**रुक्मिणी**-विदर्भदेशाधिपति भीष्मकाची कन्या व रुक्मीची बहीण. श्रीकृष्णाचे गुणावर हिची भक्ति बसून हिनें कृष्णास मनानें वरिलें होतें. परंतु हिचा ज्येष्ठ बंधु कृष्णाचा द्वेष्टा असल्यामुळें त्यानें हिचा विवाह शिशुपालाबरोबर ठरावला असा बिकट प्रसंग पहातांच हिनें सुदेव नांवाच्या एका ब्राह्मणाबरोबर पत्र देऊन आपला अभिप्राय श्रीकृष्णाला कळविला. श्रीकृष्णानें हिच्या इच्छेप्रमाणें येऊन हिचे हरण केलें. ही लक्ष्मीचा अवतार असून श्रीकृष्णाची पट्टराणी होती. [ १०,५२-२२,२६, व १०, ५३,५५ ]. श्रीकृष्ण रुक्मिणी यांचा प्रेम कलह. [ १ ,६०,१० ते ५७] हिला प्रद्युम्न. चारुदेष्ण, सुदेष्ण, चारुदेह, सुचारु, चारुगुप्त. भद्रचारु, चारुचन्द्र, विचारु, चारु, असे दहा पुत्र व चारुमती नांवाची कन्या होती [ १०,६१,९-२४ ]. स्यमंत-

पंचक क्षेत्रीं आगमन व स्वविवाह वृत्तांत कथन [१०,८३,८]. श्रीकृष्ण निजधामीं गेल्यानंतर अग्निप्रवेश. [१०,३१,२०]

**रुक्मेषु**-यदुपुत्र क्रोष्टा त्याच्या वंशांतील रुक्काचा पुत्र [९,२३,३५].

**रुचक**-मेरूच्या कोणचा पर्वतांतील एक.

(२) सोमवंशीय यदुकुळांतील उशना राजाचा पुत्र. याम रुक्मकवच असेंहि नांव होतें. याचे पुत्र, पुरुजत्, रुक्म, रुक्मेषु, पृथु आणि ज्यामघ. [९,२३,३४]

**रुचि**-एक ब्रह्ममानसपुत्र. स्वायंभू मनुची कन्या आकूती याम पुत्रिकाधर्मानें दिली होती याचा पुत्र यज्ञ व मुलगी दक्षिणा [३,१२,५५ व ४,१,२]

(२) एक अप्सरा.

**रुचिपर्वा**-काशिराजाचा पुत्र. दुर्योधनपक्षीय राजा याम भीमानें मारिलें

**रुचिराश्व** सोमवंशीय अजमीढपुत्र बृहदिषूच्या वंशांतील सेनाजिताचा पुत्र. याचा पुत्र प्राज्ञ [९,२१,२३].

**रुद्र**-ब्रह्मदेव सृष्टि करीत असतां, त्याच्या क्रोधापासून उत्पन्न झालेला मुलगा हा रडूं लागला, म्हणून ब्रह्मदेवानें त्यास रुद्र म्हटलें [३,१२,१०]

(२) भूतऋषि व सरूपा याचे कोट्यावधि पुत्र. त्यांत रैवत, अज, भव, भीम, वाम, उग्र, वृषाकापि, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, बहुरूप आणि महान् हे मुख्य होते रुद्राचे पार्षद भूत ऋषीच्या घोरानामक स्त्रीपासून झाले. [६,६,१७-१८].

(३) अहंकाराची देवता. [३,२६,६१].

(४) वैवस्वतमन्वंतरांतील देव [८,१३,४]

**रुद्रकर्ण**-काशींतील एक स्थान व तीर्थ

**रुद्रकोटी**-अमरकंटक पर्वतावरील एक नर्मदेसंबंधी तीर्थ.

**रुद्रश्रण्य**-भद्रसेन राजाचें नामांतर.

**रुद्रसर** एक सरोवर.

**रुद्रसावर्णि**-पुढें होणारा बारावा मनु. याच्या मन्वंतरांत, देववान, उपदेव, देवश्रेष्ठ इत्यादि पुत्र, आणि हरितादि देव, ऋतधामा इंद्र, तपोमूर्ति तपस्वी, आग्नीध्र इत्यादि ऋषि व स्वधाम संज्ञक अवतार होईल. [८,१३,२७]

**रुद्रसेन** भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय एक राजा.

**रुद्राक्ष**-सामवेदोपनिषत्

**रुद्राणी**-धृतव्रत रुद्रपत्नी. [३,१२,१३] प्रत्येक रुद्रपत्नीस हें सामान्य नांव आहे

**रुद्रावर्त**-भारतवर्षीय तीर्थ व क्षेत्र,

**रुधिराक्ष** लवणासुराचा मामा.

**रुधिराशन**-खर राक्षसाचा एक अमात्य.

**रुमण**-रामसेनेंतील एक श्रेष्ठ वानर.

**रुमण्वान्** जमदग्नि व रेणुका याचा पुत्र. परशुरामाचा ज्येष्ठ भाऊ.

**रुमा**-तार नामक वानराची कन्या व सुग्रीवाची पत्नी.

**रुरु**-मृगजाती विशेष [४,६,२०].

(२ अष्टभैरवांतील दुसरा.

(३) भृगुकुलोत्पन्न प्रमति ऋषि व घृताची अप्सरा यांचा पुत्र. हा तपस्वी व विद्वान होता. स्थूलकेशऋषीनें पाळलेली अप्सराकन्या प्रमद्वरा ही याची पत्नी. ती सर्पदंशानें

मृत झाल्यामुळें सर्पासंबंधानें याचे ठायीं तीव्र द्वेष उत्पन्न झाला होता व जेथें सर्प दिसेल तेथें हा त्यास मारीत असे. एकदां डुंडुभ नामक सर्पास यानें धरिलें असतां, तो म्हणाला, 'आमची जाति निर्विष आहे, याकरितां तूं विचार करून सर्पास मारीत जा.' तेव्हां यानें त्या सर्पास त्याचे पूर्ववृत्त विचारिलें असता, तो म्हणाला, 'मी पूर्वजन्मीचा सहस्रपात् नावाचा ऋषी आहे. एकदा माझ्या मित्रास वस्त्राचा सर्प दाखवून भीति उत्पन्न केल्यामुळें त्यानें मला शाप दिला. व रुरु ऋषीच्या स्पर्शानें उद्धार होईल' असा उःशाप दिला. (भा. आदि.)
( ४ ) हिरण्याक्षाच्या वंशांतील एक असुर. याचा पुत्र दुर्गमासुर.

**रुशाद्रथ**–अनुकुलांतील तितिक्षूचा पुत्र. याचा पुत्र हेम [ ९,२३,४ ].

**रुशंकु**-सोमवंशीय यदुकुलांतील श्वाहि राजाचा पुत्र. याचा पुत्र चित्ररथ. [ ९,२३,३१ ].

**रुषंगु**–एक ऋषि.

**रुषद्रु**–एक राजर्षि.

**रुषाभानु**–हिरण्याक्षाची पत्नी. [७,२,१९]

## रू

**रूपवाहिक**–भारतवर्षीय देश.

**रूपा**–एक नदी. उगम–पारियात्र पर्वत.

**रूपि**-भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

## रे

**रेणु**–यासच प्रसेनजित असें म्हणत. याचीच कन्या रेणुका. [ ९,१५,१२ ].

**रेणुका**–रेणुराजाची कन्या व जमदग्नीची पत्नी. [ ९,१५,१२ ].

**रेभ**-कश्यपकुलांतील ऋषि व त्याचें कुल.

**रेव**-ककुद्मीचें नामांतर.

**रेवत**-सूर्यवंशीय शर्यातिपुत्र आनर्ताचा मुलगा. याला ककुद्मीप्रमुख शंभर पुत्र व रेवती नामक कन्या होती. यानें पश्चिम आनर्तदेशांत कुशस्थली ( द्वारका ) नगरी स्थापिली हा आपल्या रेवती कन्येला बरोबर घेऊन ब्रह्मदेवाकडे स्थल विचारण्याकरितां गेला असतां ब्रह्मसभेत गायन चाललें होतें, म्हणून हा तेथे थांबला. इतक्या अवकाशांत पृथ्वीवर सत्तावीस चौकड्या युगें पूर्ण होऊन अठ्ठाविसाव्या चौकडीतील द्वापारयुग संपत आलें होतें. म्हणून ब्रह्मदेवानें रेवती बलरामास देण्यास सांगितलें. नंतर हा बलरामाला रेवती देऊन तप करण्याकरितां बदरिकाश्रमाला गेला. [ ९,३,२७ ते ३६ ]

**रेवती**-मित्र आदित्याची पत्नी. [६,१८,६]
( २ ) रेवतराजाची कन्या व बलरामाची पत्नी. [ ९,३,२९ व १०,५२,१५ ]
( ३ ) एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक.

**रेवा**–नर्मदा. येथें बलराम तीर्थयात्रेला आला होता. [ ५,१९,१८ व १०,७९,२१ ].

## रै

**रैभ्य**–सोमवंशीय पुरुकुलांतील सुमति राजाचा पुत्र. याचा पुत्र दुष्यन्त. [ ९,२०,७ ].

**रैवत**-प्रियव्रताच्या तीन मनुपुत्रांपैकीं एक [ ५,१,२८ ] यानें कालिन्दी नदीवर उग्र तप केलें ( दे. भा.) हा पांचवा मनु होता याच्या मन्वंतरांत अर्जुन, बलिविन्ध्य इत्यादि पुत्र, विभु इंद्र, भूतरयादि देवगण, हिरण्यरोमा, वेदशिरा, ऊर्ध्वबाहु, देवबाहु, सुधर्मा, पर्जन्य, महामुनि हे सप्तर्षि आणि वैकुंठ नांवाचा अवतार झाला. [ ८,५,२ ते ४ ]. ( मत्स्य )

( २ ) एकादश रुद्रांपैकीं एक [६,६,१७]

**रैवतक**-द्वारकेजवळचा एक पर्वत. येथें बलराम क्रीडा करण्याकरितां आला होता. [ ५,१९,१६ व १०,६७,८]

( २ ) एक तीर्थ.

( ३ ) एक ब्रह्मर्षि.

**रैवस**-भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

## रो

**रोचन**-तुषितसंज्ञक देवांपैकीं एक.[४,१,७]

( २ ) स्वारोचिष मन्वंतरांतील इंद्र. [ ८,१,२० ]

**रोचना**-देवक राजाची कन्या व वसुदेवाची एक पत्नी. हिचे पुत्र हेम व हेमांगद [ ९, २४, ४५ ]

( २ ) रुक्मीची नात व अनिरुद्धाची पत्नी हिचा पुत्र वज्र.[१०,६१,२५] हिच्या विवाहांत द्यूत खेळत असतां बलरामानें कलिंगादि राजांस शासन केलें.

**रोचनामुख**-गरुडानें मारिलेला एक असुर.

**रोचमान्**-दहा विश्वेदेवांपैकीं एक.

( २ ) अश्वमेध पुरीचा राजा. हा पाण्डवांकडे होता.

**रोचमान्**-उरगापुरीचा राजा. यास कर्णानें मारिलें. याच्या रथाचे अश्व निळ्या रंगाचे असत.

(४) भारतीयुद्धांतील कौरवपक्षीय राजा.

**रोचिष्मान्**-दुसऱ्या स्वारोचिष मनूचा एक पुत्र [ ८,१,१९ ].

**रोधस्वती** भारतवर्षीय नदी.[४,१९,१८]

**रोपसेवकी**-कश्यपकुळांतील एक ब्रह्मर्षि.

**रोमपाद**-अनुकुलांतील धर्मरथ पुत्र चित्ररथाचें नामांतर. यास 'लोमपाद असेंहि म्हणतात [ ९,२३,७ ]

( २ ) सोमवंशीय यदुकुलांतील विदर्भाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र बभ्रु [ ९,२४,२,३ ].

**रोमहर्षण**-पुराण प्रवक्ता सूत. हा आपल्या वक्तृत्वशक्तीनें श्रोत्यांच्या अंगावर रोमांच उत्पन्न करी, म्हणून त्यास पडलेलें नांव. यास लोमहर्षण असेंहि नांव आहे. हा व्यासाचा इतिहासपुराणांचा शिष्य [ १,४,२२ ]. हा नैमिषारण्यांत ऋषींनां पुराणें सांगत असतां, ऋषींनीं यास ब्रह्मासन दिलें. बलराम तेथें आला, त्यावेळीं सर्व ऋषींनीं त्यास उत्थापन दिलें, पण यानें दिलें नाहीं, म्हणून बलरामानें याचा वध केला [१०,७८,२२ते२८] याचा पुत्र सौति अथवा रौमहर्षणि.

**रोहिणी**-एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक. सोमाला ही अतिशय प्रिय असे, म्हणून इतर स्त्रियांनीं दक्षाकडे गाऱ्हाणें नेलें, तेव्हां दक्षानें 'तु क्षयी होशील' असा त्यास शाप दिला.

**रोहिणी**–वसुदेवाची एक पत्नी. हिला बलराम आदि पुत्र झाले. [ ९,२४,४५] देवकीच्या उदरांतील गर्भ योगमायेनें हिच्या उदरांत घातला होता ही त्यावेळीं गोकुळांत रहात असे. [ १०,५,७ ].

( ३ ) श्रीकृष्णाची एक पत्नी.

( ४ ) सुरभीच्या दोनकन्यांतील कनिष्ठ. हिला विमला व अनला अशा कन्या होत्या.

**रोहित**–सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील हरिश्चंद्र व तारामती यांचा पुत्र. यास रोहितास्य असेंहि म्हटलें आहे. ( दे.भा. ) याचा पुत्र हरित. [ ९,७,९. व ९,८,१ ] ( शुनःशेपशब्द पहा. )

**रोहितक**–लोहितक देशाचा यवन राजा. यास कर्णानें दिग्विजय प्रसंगीं जिंकिलें.

( २ ) एक देश. दिल्लीच्या वायव्येचें रोहटक. राजपूतन्याच्या सीमेवर अंबाला विभागांतील जिल्हा. याच्या आग्नेयादिशेनें साहिबो व इंदोरी या नद्या वाहतात.

**रोहितकपूर**–कार्तिकेयाचें नगर. येथील रहिवासी मत्तमयूरक. हें नगर हस्तिनापुराच्या पश्चिमेकडे होतें.

**रोहितास्य**–रोहिताचें नामांतर.

**रोही**–भारतवर्षीय एक नदी.

## रौ

**रौक्मिणेय**–रुक्मिणीचे प्रद्युम्नादि पुत्र.

**रौक्षक**-विश्वामित्रकुलांतील एक ऋषि व त्याचें कुळ.

**रौच्य**–दक्षसावर्णि मनूस नामांतर.

**रौद्र**–शुक्राचार्यांच्या चार पुत्रांतील एक.

**रौद्रकर्मा**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**रौद्राश्व** सोमवंशीय पुरुकुलांतील अहंयातीचा पुत्र यास घृताची अप्सरेपासून ऋतेयु अथवा औचेयु, कुक्षेयु अथवा कक्षेयु, स्थंडिलेयु, कृतेयु, जलेयु, संततेयु, धर्मेयु, सत्येयु, व्रतेयु आणि वनयु असे दहा पुत्र झाले [ ९,२०,३–४ ].

**रौप्यनाभ**–एक राक्षस.

**रौमहर्षिणि**–रोमहर्षणसुताचा पुत्र व पुराणांचा शिष्य. बलरामानें रोमहर्षणाचा वध केल्यावर यास त्याच्या जागेवर स्थापिलें होतें. यानें शौनकादिकास अनेक पुराणें सांगितली. [ १,२,१ ].

**रौरव**–कुटुंब पोषणासाठीं हिंसा करणाऱ्यास प्राप्त होणारा नरक [ ५,२६,१० ]

**रौरवकल्प**-चालू ब्राह्म मासांत होऊन गेलेला पांचवा दिवस.

**रौहिण**–विश्वामित्र कुलातील एक ऋषि व त्याचा वंश.

**रौहिणेय**-सोमपुत्र बुध व बलरामास नामांतर.

**रौहिण्यायनि**–अंगिराकुलांतलि ब्रह्मर्षि.

**रौहित्यायनि**–भृगुकुलातील ब्रह्मर्षि.

## ल

**लक्ष्मण**–सूर्यवंशीय दशरथ व सुमित्रा यांचा पुत्र. हा शेषांशानें जन्मला होता. राम वनवासांत असतां यानें व्रतस्थ राहून अनेक प्रकारें रामाची सेवा केली, आणि रामरावण युद्धांत इंद्रजिताचा वध केला. या इंद्रजिताला असा वर होता कीं, ‘जो

पुरुष बारा वर्षे अन्न व निद्रा यावां-चून राहील त्याच्याच हातून तुला मृत्यु येईल.' हा शापांश असल्यामुळे यास वाताशी रहणे शक्य होतें. हा पूर्ण ब्रह्मचारी असे. हा सीतेच्या चरणांचेंच फक्त दर्शन घेत असे याची पत्नी सीरध्वज जनकाची कन्या उर्मिला व पुत्र अंगद व चित्रकेतु. रामानें यास अध्यात्मविद्येचा उपदेश केला राम निजधामास जाण्यापूर्वी यानें योगानें आपल्या देहाचा त्याग केला. [ ९,१०,२ व ९,११,१२ ] ( अध्या रा. )

( २ ) सोमवंशीय कौरवकुलांतील दुर्योधनाचा पुत्र हा भारतीयुद्धांत अभिमन्यूच्या हातून मरण पावला.

( ३ ) अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**लक्ष्मणा**-मद्रदेशाच्या राजाची कन्या व श्रीकृष्णाची पत्नी हिला प्रघोष, गात्रवान, सिंह बल, प्रबल ऊर्ध्वग, महाशक्ति, सह, ओज, अपराजित असे दहा पुत्र होते. [ १०, ५८, ५७ व १०, ६१, १५ ] स्वयंवर वृत्तांत कथन [ १०, ८३, १७ ]

( २ ) दुर्योधनाची मुलगी. स्वयंवरांत हिचें कृष्णपुत्र सांबानें हरण केलें. [ १०,६८,१ ]

**लक्ष्मी**-विष्णूची पत्नी. चतुर्दश रत्नांपैकी एक. ही समुद्रमंथनाचे वेळीं निघाली व निर्दोष अशा विष्णूला हिनें वरिलें. हिचें प्रिय करण्याकरितां केतुमाल वर्षांमध्यें भगवान कामदेव स्वरूपानें राहतात. [ ५,१८,१५ व ८,८,८ ]

**लक्ष्मीकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला विसावा कल्प.

**लघिमा**-अष्टसिद्धींपैकी एक. हिच्या योगानें लहान होतां येतें [ ११,१५,४ ]

**लाघ्वि**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**लंका**-जम्बूद्वीपाच्या भोंवती क्षार समुद्रांत असलेल्या अष्टउपद्वीपांपैकी एक. यांत त्रिकूट अथवा लंबपर्वत आहे. [ ५,१९,३० ]

( २ ) त्रिकूटपर्वतावरील शंभर योजनें लांब व तीस योजनें रुंद अशी एक नगरी. येथें माल्यवान रहात असे, तो विष्णूच्या भयानें पाताळांत गेला तेव्हा विश्रवापुत्र कुबेर येथें राहूं लागला. पुढें त्याचेपासून रावणानें ही घेतली. रावण मृत झाल्यावर बिभीषण येथें राजा झाला, व तो अद्याप राज्य करीत आहे [ ९,१०,३३ ].

( ३ ) लंकानगरीची देवता. हिनें सीताशोधासाठीं जात असलेल्या मारुतीला अडथळा केला होता ( वा रा. )

**लंघती**-भारतवर्षीय एक नदी.

**लज्जावती**-एक नदी. उगम-माल्यवान् पर्वत.

**लता**-मेरूची कन्या व आग्नीध्रपुत्र इलावृताची पत्नी [ ५,२,२३ ].

( २ ) शापानें नगरी झालेली एक अप्सरा. ( नारीतीर्थ शब्द पहा, )

**लपेटिका**-भारतवर्षीय एक नदी.

**लम्ब**-त्रिकूटपर्वताचें नामांतर

**लम्बा**-प्राचेतस दक्षाची कन्या व धर्मऋषीची एक पत्नी. हिचा पुत्र विद्योत [ ६,६,४ ]. शिवाय घोषसंज्ञक असे कांहीं पुत्र होते.

**लम्बायन**-वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**लम्बासुर**-खरदैत्याचा भाऊ. ( मत्स्य. )

**लम्बोदर**-कलियुगांतील कण्वायन संज्ञक राजानंतर झालेला एक राजा. पौर्णमासाचा पुत्र [ १२,१,२४ ].

**ललाटाक्षी**-सीतेच्या संरक्षणार्थ असलेली लंकेंतील एक राक्षसी.

**ललितक**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**ललिता**-पार्वतीला एक नांव.

**ललित्थ**-भारतवर्षीय एक देश.

**लव**-दाशरथी राम व सीता यांचा पुत्र. उत्तर कोसलचा राजा. याची राजधानी शाबस्ती अथवा श्राबस्ती याला सुमती आणि कंजानना अशा दोन स्त्रिया होत्या [ ९,११,११ ]

**लवण**-एक असुर. मधुराक्षस व कुंभीनसी यांचा पुत्र. हा ऋषीस फार पीडा देत असे. मरणसमयीं याच्या पित्यानें यास रुद्रदत्त नामक एक शूल दिला, व कोणास पीडा देऊं नको असे सांगितलें. पण यानें आपला क्रम सोडला नाहीं. तेव्हां ऋषींनीं अनेक राजांकडे याच्या विरुद्ध तक्रार केली; परंतु कोणी याचें पारिपत्य करूं शकले नाहींत. एकदां मांधाता राजा याच्यावर चालून गेला, परंतु यानें शूलानें त्याचाच वध केला. पुढें च्यवनभार्गवादि ऋषी रामाकडे आले, व रामाच्या आज्ञेवरून शत्रुघ्न याच्यावर चालून गेला, आणि एकदां हा शूलविरहित आहे, अशी संधी पाहून याचा नाश केला. याचा मृत्यु होतांच शूल रुद्राकडे परत गेला. ( वा. रा. उत्तर. )

**लवणाश्व**-पांडवांबरोबर अरण्यांत असलेला एक ऋषि.

**लह्य**-भुज्यु ऋषीचा पिता.

### ला

**लांगल**-सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील शुद्धोदाचा पुत्र. याला पुष्कल असेंहि नांव होतें. याचा पुत्र प्रसेनजित. [ ९, १२, १४ ]

( २ ) ( नांगर ) बलरामाचें आयुध. [ १०, ६०, २४

**लांगली**-भारतवर्षीय नदी.

**लालाटि**-भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**लालाभक्ष**-स्त्रियांना रेतप न करविणारास मिळणारा नरक [ ५, २६,२६]

**लावकि**-विश्वामित्रकुलांतील ब्रह्मर्षि.

**लावकृत**-अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**लाह्य**-एक ऋषि.

**लाह्यायनि**-लाह्यऋषीचा पुत्र भुज्युचें नांव.

### लि

**लिखित**-शंखऋषीचा भाऊ.

**लिङ्ग**-अष्टादशमहापुराणांपैकीं एक पुराण. याची श्लोकसंख्या अकरा हजार आहे [ १२, १३, ६ ]

### ली

**लील**-वीरवर्म्याचा एक पुत्र.

**लीलाढ्य**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**लीलावती**-ध्रुवसन्धि राजाची एक स्त्री. हिचा पुत्र शत्रुजित्.

( २ ) मयूरध्वज राजाची पत्नी.

**लुब्ध**-भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**लेख**-चाक्षुषमन्वंतरांतील पंचविध देवांपैकीं देवविशेष.

**लैद्राणि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

## लो

**लोकभावन**–संरक्षक परमात्मा [१,२,३४]

**लोकालोक**–मेरूच्या सभोंवती बारा कोटी पन्नास लक्ष वलयाकार असलेला एक पर्वत. लोकालोक व मेरू यांच्या मध्यें सप्तमहाद्वीपें, सप्तमहासमुद्र, मानसोत्तर पर्वत, आदर्शमय सुवर्णभूमि, इत्यादि आहेत. मेरूपर्वतापासून याची एका अंगाची लांबी दोन कोटी त्रेपन लक्ष आहे. त्यांत मृण्मयभूमि अडीच कोटी व कांचनमय भूमि दहा कोटि आहे. इतकीच लांबी दुसऱ्या अंगाची म्हणून या पर्वताच्या दोहों अंगापर्यंत पंचवीस कोटी भूमि सूर्यप्रकाशित असते. आणि तितकीच याच्या बाहेरील दोन्ही बाजूंची अप्रकाशित असते म्हणून वस्तुतः अनन्त असलेल्या पृथ्वीचा सामान्यतः व्यास पन्नास कोटि योजनें धरिलेला आहे. (स्कं पु) याच्या आंतील बाजूस प्रकाश व बाहेरच्या बाजूस अंधःकार असल्यामुळें यास 'लोकालोक' म्हणतात. ( लिं. अ. ५३ ) लोक म्हणजे प्रकाश व अलोक म्हणजे अंधःकार हा पर्वत, सर्व द्वीपें व समुद्र यांस दक्षिणेस असून मेरुपर्वत याच्या नेहमीं उत्तरेस असतो. 'सर्वेषा मुत्तरे मेरु लोकालोकस्तुदक्षिणे' ( मत्स्य. ) यापर्वतावर ब्रह्मदेवानें ऋषभ, पुष्कर वामन, अपराजित, असे चार दिग्गज स्थापन केले असून ते सर्व लोकांना धारण करतात. आणि सुदर्शनचक्रादिआयुधें, विष्वक्सेनादिपार्षद, धर्म ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, अष्टमहासिद्धि यांनीं युक्त सर्वांतर्यामी परमात्मा याच पर्वतावर रहात असतो. [५,२०,३४ ते ४०].

**लोकोद्धार**–भारतवर्षीय तीर्थ.

**लोपामुद्रा**–विदर्भराजाची कन्या व अगस्त्याची पत्नी. हिला सत्यवती असें नांव होतें. एकदां पितरांनीं अगस्त्य ऋषीस विवाह कर असें सांगितलें, परंतु त्याच्या अनुरूप कन्या कोठें मिळेना ! तेव्हां त्यानें स्वतपोबलानें 'कन्या निर्माण होवो' असा संकल्प केला. त्याच वेळीं विदर्भदेशाधिपति पुत्रार्थ तप करीत होता, त्याच्या स्त्रीला गर्भ राहून एक कन्या झाली. पुत्राच्या इच्छेनें तप करीत असतां कन्या झाली, अशा प्रकारें मुद्रेचा लोप झाला ह्मणून राजानें आश्चर्य पावून मुलीचें नांव लोपामुद्रा ठेविलें. पुढें हिच्या स्वयंवरप्रसंगीं हिच्या तेजामुळें कोणीही राजपुत्र हिला वरण्यास तयार होईना, इतक्यांत तेथें अगस्त्य ऋषि आला व त्यानें हिची याचना केली. तेव्हां कन्येची अनुमती घेऊन राजानें त्यास हिला दिलें. हिचे पुत्र दृढास्य आणि दृढस्यु.

**लोभ**–हा ब्रम्हदेवाच्या अधरोष्ठापासून झाला [३,१२,२६]

(२) दम्भ व माया यांचा पुत्र. [४,८,३].

**लोभ**—ब्रह्मदेवाच्या पृष्ठापासून झालेल्या अधर्माचा पुत्र.

**लोमधि**—कलियुगांतील बहुसंज्ञक वंशांतील विजयाचा पुत्र. हा शेवटचा राजा. [ १२,१,२७ ]

**लोमपाद**—रोमपादाचेंच नांव.

**लोमश**—एक ऋषि. हा इंद्राचा निरोप घेऊन युधिष्ठिराकडे आला होता. हा पाण्डवांबरोबर तीर्थयात्रेस गेला असतां यानें युधिष्ठिरास नीति व अनेक इतिहास ऐकविले. हा पाण्डवांबरोबर वनवासांत ५-६ वर्षें होता (भा.वन.)

( २ ) लंकेंतील रावण पक्षीय एक राक्षस.

( ३ ) पलितमूषकाचा मित्र एक मार्जार

**लोमहर्षण**—रोमहर्षणाचेंच नांव.

**लोमायन**—वसिष्ठ कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**लीला**—मधुराक्षसाची माता.

**लोलाक्षी**—भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**लोकार्क**—काशींतील एक स्थान.

**लोहजंघ**—पाण्डवांस राजसूय यज्ञांत गृहकार्यांत सहाय्य करणारा राजा.

**लोहदण्ड**—भारतवर्षीय एक तीर्थ.

**लोहल**—वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**लोहवैरि**— ,, ,,

**लोहित**—रोहित ऋषीचें नांव.

( २ ) नागविशेष.

( ३ ) सर्वौषधिगिरिजवळचा पर्वत.

( ४ ) लोहित पर्वतावरील सरोवर. यापासून लौहित्य नदी निघाली आहे.

**लोहितक**—काश्मीरच्या उत्तरेकडील देश. यास रोहितक असेंहि नांव असून येथें याच नांवाचा यवन राजा होता.

**लोहिता**—हिमालयापासून निघालेली नदी.

**लोहिताक्ष**—जनमेजयाच्या सर्पसत्रांतील स्थापत्य नामक ऋत्विज. यानें जनमेजयास—' एक ब्राह्मण येऊन हें सत्र बंद करवील '—असें भविष्यकथन केलें होतें ( भा. आदि. )

**लोहितार्ण**—घृतपृष्ठाच्या सात पुत्रांपैकीं एक व याचा वर्ष [ ५,२०,२१ ]

( २ ) क्रौंचद्वीपांतील सहावा वर्ष.

**लोहित्य**—एक गांव.

## लौ

**लौक्षि**—अंगिराकुलांतील एक ऋषि.

**लौक्षिण्य**—भृगुकुलांतील एक ऋषि.

**लौगाक्षि**—पौष्यंजि ऋषीचा सामवेदाचा शिष्य [ १२,६,७९ ].

( २ ) आंगिराकुलांतील ऋषि.

( ३ ) अहर्वसिष्ठकुलांतील ऋषि व कुल.

( ४ ) एक मीमांसक.

**लौमहर्षणि**—रौमहर्षणीचें नांव.

**लौहित्य**—लोहितसरोवरापासून निघालेला एक नद.

**लौहित्यपुर**-कर्वटदेशाच्या पूर्वेकडील नगर.

## व

**वक्र**—वक्रदंताचा भ्राता.

**वक्रदंत**—दंतवक्त्राचें नांव.

**वंग**—सोमवंशीय अनुकुलांतील सुतपापुत्र बलीच्या सहा पुत्रांतील दुसरा. व याचा देश [ ९,२३,५ ] हा बंगाल प्रांतांत पद्मानदीच्या दक्षिणेकडे, भागीरथी नदी व ब्रह्मपुत्रा नदीचा जुना प्रवाह यांच्या मध्यें आहे. पूर्व बंगालचा दक्षिण भाग. याच्या उत्तरेस पुण्ड्रांचें जुनें राज्य होतें. वंग या नांवावरूनच हल्लीच्या

बंगाल प्रांताचें नांव पडलें आहे. येथील राजे भारतीय युद्धांत होते.

( २ ) कौशिकीकच्छ निलय म्हणून जो पाणथळ देश होता, त्याच्या पूर्वेकडील देश. पाण्डवांच्या वेळीं येथें समुद्रसेन आणि चन्द्रसेन असे राजे होते ( भा. सभा. )

**वंगिरि**–कलियुगांतील किलकिला नगरींतील राजांपैकीं एक [ १२, १, ३२ ]

**वचक्नु**–एक ऋषि. गार्गीचा पिता.

**वज्र**–इंद्राचें आयुध. हें दधीचि ऋषीच्या अस्थिपासून विश्वकर्म्यानें केलें होतें. [ ६, १०, १३ ]

( २ ) प्रद्युम्नपुत्र अनिरुद्ध व रोचना यांचा पुत्र. यादवसंहारानंतर अर्जुनानें यास इंद्रप्रस्थांत राज्याभिषेक केला. याचा पुत्र प्रतिबाहु. [ १०, ९०, ३७–३८ व ११, ३१, २५ ] याला वज्रनाभ असेंहि नांव होतें.

( ३ ) रामपुत्र कुशाकुलांतील स्थलाचा पुत्र वज्रनाभ, त्याचें नामांतर.

( ४ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

( ५ ) किष्किंधेच्या पश्चिमेकडील पर्वत.

( ६ ) उपासंगधर यादवाचा पुत्र.

**वज्रकण्टकशाल्मली**–पशुगमन करणारास प्राप्त होणारा नरक [५,२६,२१]

**वज्रकाय**–लंकेंतील एक राक्षस.

**वज्रकूट**–प्लक्षद्वीपांतील पर्वत [५,२०,४].

**वज्रज्वाला**–कुंभकर्णाची स्त्री.

**वज्रदत्त**-प्राग्ज्योतिषपूरच्या भगदत्तराजाचा पुत्र, यानें अश्वमेधाचा अश्व धरून अर्जुनाशीं तीन दिवस युद्ध केलें, व त्याचा पराभव केला ( भा. अश्व )

**वज्रदंष्ट्र**–अंगदानें मारिलेला राक्षस.

**वज्रनाभ**–रामपुत्र कुशकुलांतील स्थलाचा पुत्र. याचा पुत्र खगण. यास वज्र असेंहि म्हणतात हा सूर्यांशानें जन्मला होता [ ९, १२, २ ]

**वज्रबाहु**–कुंभकर्णानें भक्षिलेला रामसेनेंतील एक वानर.

**वज्रमित्र**–कलियुगांतील शुंगवंशीय एक राजा. [ १२, १, १७ ]

**वज्रमुष्टि**–मैद वानरानें मारिलेला राक्षस.

**वज्रवेग**-मारुतीनें मारिलेला एक राक्षस.

**वज्रशीर्ष**–वारुणिभृगूच्या सात पुत्रांतील दुसरा. च्यवनाचा भाऊ.

**वज्रसूचिक**–सामवेदोपनिषत.

**वज्रहनु**–कुंभकर्णाचा एक पुत्र.

**वज्रहस्त**–अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय एक राजा.

**वज्राक्ष**–दनुपुत्र एक दानव.

**वज्रांग**–मरुद्गण देवगणांत गेल्यामुळें दितीनें कश्यपापासून संपादन केलेला पुत्र. हा पराक्रमी होता. यानें इंद्राला बांधून आपल्या आईसमोर आणिलें होतें. ब्रह्मदेवानें यास इच्छित वर देऊन इंद्राची मुक्तता केली. याची पत्नी वरांगा व पुत्र तारकासुर. ( मत्स्य. अ. १४५ )

**वटेश्वर**-नर्मदेसंबंधीं एक तीर्थ.

**वटोदका**–पाण्ड्यदेशांतील नदी. [४,२८,३५]

**वडवा**–विवस्वान आदित्याची पत्नी संज्ञेनें घोडीचें रूप घेतल्यामुळें तिला पडलेलें नांव [ ६,६,४० ]

**वडवाग्नि**-समुद्रांत राहून त्याचें जल शोषण करणारा अग्नि. बृहस्पति व तारा यांच्या सहा पुत्रांपैकीं एक

**वडवानल**- वडवाग्नि शब्द पहा )

**वडवाप्रातिथेयी**-ब्रह्मचर्यव्रतानें राहणारी एक ब्राह्मण कन्या.

**वतण्ड**-विश्वामित्रकुलांतील एक ब्रह्मर्षि

**वत्स**-सोमवंशीय अजमीढकुलांतील सेनजित् राजाचा पुत्र [ ९,२१,२३ ]

( २ ) कंसपक्षीय एक दैत्य. हा वत्स रूपानें कृष्णनाशाकरितां आला असतां कृष्णानें यास कंवठाच्या झाडावर आपटून मारिलें [ १०,११,४२ ]

( ३ ) भृगुकुलांतील एक ऋषि व कुल

( ४ ) कोसलदेशीय एक राजा. हा द्रौपदीस्वयंवरांत होता ( भा आदि. )

**वत्सक**-यदुवंशीय सात्वतकुलांतील शूर व मारिषा यांच्या दहा पुत्रांपैकीं नववा. याला मिश्रकेशी अप्सरेपासून वृकादि पुत्र झाले [ ९,२४,२९-४३ ]

( २ ) वत्सासुर [ १०,४३,३० ]

( ३ ) इक्ष्वाकुवंशीय शावस्ताचा एक पुत्र. यास वंशक असेंहि म्हणतात

**वत्सद्रोह**-वत्सवृद्धाचें नामांतर

**वत्सप्रीति**-दिष्टकुलांतील भलंदनाचा पुत्र. याचा पुत्र प्रांशु [ ९,२,२३ ]

**वत्सभूमि**-भारतवर्षीय एक देश.

( २ ) एक क्षेत्र.

**वत्सर**-उत्तानपादपुत्र ध्रुव व भ्रमि यांचा कनिष्ठ पुत्र. ध्रुवाच्या मागें हा राज्यावर बसला, याची पत्नी स्वर्वीथि, व पुष्पार्ण, तिग्मकेतु, इष, ऊर्ज, वसु, व जय असे सहा पुत्र. [ ४,१०,१ ] व [ ४,१३,११-१२ ]

**वत्सर**-संवत्सरांतील एक भेद [ ५,२२,७ ]

**वत्सला**-बलरामाची कन्या व अभिमन्यूची ज्येष्ठ पत्नी. ही सुभद्रापुत्र अभिमन्यूला द्यावयाची असें कृष्णानें वचन दिलें होतें, परंतु बलरामाचा ओढा दुर्योधनाकडे विशेष असल्यामुळें त्यानें दुर्योधनपुत्र लक्ष्मणाला देण्याचा निश्चय करून लग्नतिथीहि ठरविली. तेव्हां घटोत्कचानें ऐन प्रसंगीं राक्षसी मायेनें लग्नांत घोटाळा उडवून वत्सलेस पळविलें आणि अभिमन्युबरोबर हिचें लग्न लावून दिलें. ( जै. भा. व. )

**वत्सवृद्ध**-सूर्यवंशीय ध्रुवसन्धि कुलांतील उरुक्रियाचा पुत्र. याचा पुत्र प्रतिव्योम [ ९,१२,१०, ] यास वत्सद्रोह असेंहि म्हणतात.

**वत्सदेश**-भागीरथीच्या दक्षिणतीरचा प्रदेश

**वधूसर**-( एक सरोवर ) भृगुपत्नी पुलोमेला दंशनामक राक्षस हरण करून नेत असतां, तिचा गर्भ मार्गांत च्युत झाला ( तो च्यवन ), त्या गर्भाच्या तेजानें राक्षस भस्म झाला. तेव्हां पुलोमेच्या नेत्रांतून जें आनंदाश्रु बाहेर पडले,त्यापासून झालेलें सरोवर.

**वध्रदेश**-एक देश.

**वन**-सोमवंशीय अनुकुलांतील उशीनराच्या चार पुत्रांतील दुसरा [ ९,२३,३ ]

**वनमाला**-तुलसी, कुन्द, पारिजातक, कमळ व मंदार यांचे पासून तयार केलेल्या मालेस वनमाला ही संज्ञा आहे किंवा पायापर्यंत लोंबणाऱ्या माळेसही वनमाळा म्हणतात [ १,११,२७ ]

**वनस्पति**–प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठाचा सातवा पुत्र व त्याचा वर्ष [ ५,२०,२१ ]
( २ ) क्रौंचद्वीपांतील सातवा वर्ष.

**वनायु**–दनुपुत्र एक दानव.
( २ ) एक महा देश, येथें उत्तम घोडे निपजतात. ( अरबस्तान )

**वनेयु**–सोमवंशीय पूरुकुलांतील रौद्राश्वाच्या दहा पुत्रापैकीं दहावा [ ९,२०,५ ]

**वन्हि**–सोमवंशीय ययातिपुत्र तुर्वसूचा मुलगा. याचा पुत्र भर्ग [ ९,२३,१६ ]
( २ ) सात्वतकुलांतील कुकुराचा पुत्र. याचा पुत्र विलोमा [ ९,२४,१९ ]
( ३ ) मित्रविंदेचा पुत्र [ १०,६१,१६ ]
( ४ ) रामसेनेंतील एक वानर.

**वपु**-एक अप्सरा.

**वपुष्टमा**-परीक्षितपुत्र जनमेजयाची पत्नी. सुवर्णवर्म्याची कन्या, हिचा पुत्र शतानीक.

**वय**–वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**वयुन**–कृशाश्व व धिषणा यांचा एक पुत्र. [ ६,६.२० ]

**वयुना**-अग्निष्वात्तादि पितर व स्वधा यांची कन्या. ही ब्रह्मनिष्ठ होती. हिची बहीण धरिणी [ ४,१,६४ ]

**वररुचि**-नाटकशास्त्र प्रणेता एक ऋषि.
( २ ) एक वैय्याकरण. यानें पाणिनि-सूत्रांवर वार्तिकें केलीं.

**वरदा**–भारतवर्षीय एक नदी.

**वररेणुक**-वेलदोडयाचें झाड [ ४,५,१६ ]

**वरा**–भारतवर्षीय एक नदी.

**वरांगा**–( गी ) ब्रह्मदेवानें वज्रांग दैत्याकरितां उत्पन्न केलेली स्त्री. हिनें पतीबरोबर दुर्घट तप केलें (मत्स्य.)

**वराणसी**–भारतवर्षीय एक नदी.

**वराह**–हिरण्याक्ष वधाकरितां झालेला विष्णूचा दुसरा अवतार. हा ब्रह्मदेवाच्या नासिकेंतून वराहरूपानें झाला [ १,३,७ व ३,१३,१८ ], हिरण्याक्षाचा वध व देवकृत वराहस्तुति. [ ३,१९,२६–३० ] यानें रसातलांतून पृथ्वीला वर काढिलें. उत्तरकुरुखण्डांतील लोकांची उपास्य देवता. चालूकल्पाच्या आरंभाला हा अवतार झाला, म्हणून यास वाराहकल्प असें नांव आहे. यास आदिवराह, यज्ञवराह, श्वेतवराह अशीं नामांतरें आहेत.
( २ ) किष्किंधेच्या पश्चिमेकडील पर्वत.
( ३ ) यजुर्वेदोपनिषत.

**वराहकर्ण**–एक किन्नर.

**वराहशैल**–मगधदेशाचा सीमापर्वत.

**वरीयान्**—स्वायंभुवमन्वंतरांतील पुलहऋषीचा एक पुत्र [ ४,१,३८ ]
( २ ) सावर्णिमनूचा एक पुत्र.

**वरुण**-कल्पारंभीचा पश्चिम दिग्पाल. हा जलाधिपति आहे. याची नगरी मानसोत्तर पर्वतावरील निम्लोचिनी अथवा सुषा. याची पत्नी गौरी. ( भा उद्योग. ) यानें चालूमन्वंतरांत ब्रह्मदेवाला ऋषि करून यज्ञ केला, त्या यज्ञांत भृगु, अंगिरा, व कवि असे तीन पुत्र उत्पन्न झाले, ते वरुण, अग्नि व ब्रह्मदेव यांनीं घेतले. क्रौंच पर्वताचें रक्षण [ ५,२०,१९ ] हरिश्चंद्राचा नवस [ ९,७,८ ] ऋचीक ऋषीस हजार शामकर्णांची प्राप्ति [ ९,१५,७ ]

**वरुण**-द्वादशादित्यांपैकीं नववा आदित्य. याची पत्नी चर्षणी व पुत्र भृगु. [ ६,६,३९ व ६,१८,४ ]

(३) सांप्रतचा पश्चिम दिग्पाल. याची स्त्री ज्येष्ठा, व गौ, पुष्कर, अधर्म, बल असे पुत्र, आणि कन्या सुरा. अष्टावक्राशीं संवाद करणारा बन्दी हा याचा पुत्र होय.

(४) आषाढ महिन्यांत वासिष्ठ ऋषि, रंभा अप्सरा, सहजन्य यक्ष, हूहू गंधर्व, शुक्र नाग, व चित्रस्वन राक्षस, या गणांसह फिरणारा सूर्य. [ १२,११,३६ ] याची पत्नी शततोया व पुत्र श्रुतायुध.

(५) कश्यपपत्नी मुनीचा एक गंधर्वपुत्र.

**वरुणस्रोतस**—काम्यक वनाच्या दक्षिणेकडील पर्वत.

**वरुणा**-भारतवर्षीय एक नदी.

**वरूथ**-एक गांव.

(२) भरतपुत्र भरद्वाजास नामांतर.

**वरूथप**-बलरामकृष्णाचा मित्र एक गोप. [ १०,२२,३१ ]

**वरूथी**-एक नदी.

(२) एक ब्रह्मर्षि

**वरेण्य**-वारुणि भृगूचा एक पुत्र. यास विभु असेंहि नांव होतें.

**वर्कु**-वृष्णि ऋषीचा पुत्र वार्ष्णि.

**वर्गा**--शापानें मगरी झालेली अप्सरा. ( नारीतीर्थ शब्द पहा. )

**वर्चा**-फाल्गुन महिन्यांत पर्जन्य सूर्याबरोबर फिरणारा यक्ष [ १२,११,४० ]

(२) सोमनामक वसूचा पुत्र.

(३) सुचेताऋषीचा पुत्र. याचा पुत्र विहव्य.

**वर्धन**-मित्रविंदेचा पुत्र [ १०,६१, १६ ]

**वर्धमान**-क्रौंचद्वीपांतील पर्वत [५,२०,२१]

**वर्मक**-इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील देश व राजा

**वर्मी**-एक ब्रह्मर्षि.

**वर्य**-श्रावण महिन्यांत इंद्र नामक सूर्याबरोबर फिरणारा राक्षस. [१२,११,३७

**वर्ष**—महाद्वीपांतील भूभाग.

( २ ) वसुदेव व उपदेवा यांचा पुत्र. [ ९, २४, ५१

**वल्गुजंघ**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**वंशक**- वत्सकाचें नामांतर.

**वंशगुल्म**—नर्मदा आणि शोणनद यांच्या संगमांतील तीर्थ.

**वंशा**-प्राधा कन्या एक अप्सरा.

**वंशोकसारा**-एक नदी हिच्या तीरावरील सुरभिवनांत हिरण्यशृंग राहतो

**वंशोद्भेद**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**वष्ट**-भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**वसाति**-दुर्योधनपक्षीय राजा अभिमन्यूला मारण्याची प्रतिज्ञा करून हा चक्रव्यूहांत गेला असतां अभिमन्यूनें यास मारलें. ( भा. द्रोण. )

( २ ) वाहीक प्रदेशासंबंधी देश व लोक

**वसामनी**-भारतवर्षीय एक नदी.

**वसिष्ठ**-स्वायंभुमन्वंतरांत ब्रह्मदेवाचे प्राणापासून उत्पन्न झालेला मानसपुत्र. [ ३,१२,२३ ] याला अरुन्धती व उर्जा अशा दोन स्त्रिया होत्या त्यांत चित्रकेतु इत्यादि सात ब्रह्मर्षि ऊर्जेचे पुत्र. व हवींद्र, सुकृत, सुकृत, मूर्ति, आप, ज्योति, अय आणि स्मय असे अरुन्धतीचे पुत्र. या शिवाय सुकाली नामक पितरहि याचे पुत्र होते. [ ३, २४ २३ व ४, १, ४०

**वसिष्ठ**—महादेवाच्या शापानें मृत झाल्यावर चालू मन्वंतरांत ब्रह्मदेवानें पुन्हा उत्पन्न केलेला ऋषि. याची स्त्री अक्षमाला. हा इक्ष्वाकुकुलाचा उपाध्याय होता. निमीच्या शापानें देहपतन [९,१३,६] (निमि शब्द पहा)

( ३ ) उर्वशीच्या दर्शनानें मित्रावरुणांचें रेत स्खलन झालें असतां त्यापासून झालेला ऋषि [६,१८,५] याची पत्नी नारदभगिनी अरुंधति. याला शक्ति आदि शंभर पुत्र होते शक्तिपुत्र पराशर. पराशराचा व्यास. ( मत्स्य अ. २०० ) याजपाशीं कामधेनु होती. तिच्या सहायानें यास सर्व गोष्टींची अनुकूलता होती. एकदां विश्वामित्रराजा ससैन्य याजकडे आला असतां यानें उत्तम आदरातिथ्य केलें. हें ऐवढें ऐश्वर्य कामधेनूचें आहे असें समजतांच विश्वामित्रानें याच्या कामधेनूचें बलात्कारानें हरण केलें. पण कामधेनू संतप्त होतांच तिच्या शरीरांतून म्लेंछ उत्पन्न झाले व त्यांनीं विश्वामित्राचा पराभव करून कामधेनूची मुक्तता केली. ह्या अपमानाची भरपाई करण्यास्तव विश्वामित्रानें उग्र तप केलें, व आपणास ब्रह्मर्षि म्हणवूं लागला, परंतु हा त्यास ब्रह्मर्षि म्हणेना तेव्हां विश्वामित्रानें याच्या शंभर पुत्रांचा नाश केला. पुत्रवियोगदुःखानें यानें स्वतःस बांधून घेऊन नदींत उडी टाकली; परंतु नदीनें यास पाशमुक्त करून वांचविलें. म्हणून त्या नदीस विपाशा असें नांव पडलें. (भा. वन. ) पुन्हां दुसऱ्या एका नदींत यानें उडी टाकिली, पण शंभर प्रवाहरूप होऊन तिनेंही यास वांचविलें, म्हणून तिला शतद्रु नांव मिळालें. पुढें अदृश्यंती नामक याची सून गर्भवती होती तिच्या गर्भांतून वेदध्वनि निघूं लागला. तो ऐकतांच याच्या मनाची शांती झाली. अदृश्यंतीच्या उदरीं जन्मलेला पुत्र तो पराशर.

( ४ ) वैवस्वत मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

( ५ ) आषाढांत वरुण सूर्याबरोबर फिरणारा ऋषि [ १२,११,३६].

( ६ ) विष्णुस्थल क्षेत्रांतील कौशिक ऋषीचा शिष्य.

( ७ ) हिमालयाचें एक शिखर.

**वासिष्ठापवाह**—भारतवर्षाय एक देश.

**वसु**—ध्रुवपुत्र वत्सर व स्वर्वीथी याचा पुत्र. [ ४,१३,१२ ]

( २ ) प्रियव्रतपुत्र हिरण्यरेताचा एक पुत्र व त्याचा वर्ष [ ५,२०,१४ ]

( ३ ) कुशद्वीपांतील एक वर्ष.

( ४ ) प्राचेतस दक्षाची कन्या व धर्मपत्नी [ ६,६,४ ]

( ५ ) (अष्टवसु शब्द पहा) वैवस्वत मन्वंतरांतील देव. [ ६, ६, ११ ] आणि [ ८,१३,४ ]

( ६ ) नृगकुलांतील भूत ज्योतीचा पुत्र, याचा पुत्र प्रतीक [ ९,२,१७ ]

( ७ ) सोमवंशीय विजयकुलांतील कुश राजाचा एक पुत्र [ ९,१५,४ ]

**वसु**--सोमवंशीय पुरुकुलांतील कृति राजाचा पुत्र, यासच उपरिचरवसु असें नांव होतें [ ९,२२५, ]

( ९ ) वसुदेव व श्रीदेवा यांचा पुत्र [ ९,२४,५१ ]

( १० ) मुर दैत्याच्या पुत्रांतील एक [ १०,५९,१२ ]

( ११ ) श्रीकृष्ण व सत्या यांचा एक पुत्र [ १०,६१,१३ ]

( १२ ) दहा विश्वेदेवांतील तिसरा.

( १३ ) पैल ऋषीचा पिता.

( १४ ) वसिष्ठकुलांतील भद्र ऋषीचा पुत्र. याचा पुत्र उपमन्यु.

( १५ ) सावर्णि मनूचा एक पुत्र.

**वसुचंद्र**-पाण्डवपक्षीय राजा ( भा. द्रोण.)

**वसुद**-बारा भार्गवदेवांतील एक

( २ ) सूर्यवंशीय पुरुकुत्साचा एक पुत्र.

**वसुदा**-मालीराक्षसाची पत्नी.

**वसुदान**-हिरण्यरेताचा दुसरा पुत्र, व याचा कुशद्वीपांतील वर्ष [ ५,२०,१४ ]

( २ ) भारतीयुद्धांतील पाण्डव पक्षीय दोन राजे. यांस द्रोणाचार्यानें मारिले

( ३ ) दुर्योधनपक्षीय राजा

**वसुदेव**-सोमवंशीय यदुकुळांतील शूर राजाचा पुत्र. याला धृतदेवा, शांतिदेवा, उपदेवा, देवकी, पौरणी, भद्रा, मदिरा, रोचना, इला, कौशल्या, ताम्रा, वृकदेवी, सुतनु, रथराजी, श्रद्धादेवी व वैश्य जातीय एक अशा वीस स्त्रिया होत्या, यास आनकदुन्दुभि असें नांव होतें [ ९,२४,२८,४५ ]. स्यमंतपंचकक्षेत्रीं ऋषीचा उपदेश व यज्ञ [ १०,८४,३०,४३ ] याचा नारदाबरोबर संवाद [ ११,२,४ ] प्रभास क्षेत्रीं मृत्यु [ ११,३१,१९ ]

**वसुंधर**-शाल्मलीद्वीपांतील लोकविशेष. [ ५,२०,११ ]

**वसुभृद्यान**-वसिष्ठ व ऊर्जा यांचा एक पुत्र. [ ४,१,४१ ]

**वसुमती**-उपरिचर वसूनें स्थापिलेलें नगर. यासच गिरिव्रज असें नांव पडलें.

**वसुमना**-इक्ष्वाकुवंशीय हर्यश्व व माधवी यांचा पुत्र. यानं उत्तरकोसलदेशांत बृहस्पति नीतिप्रमाणें राज्य केलें.

**वसुमान्**-वैवस्वतमनूचा एक पुत्र [ ९,१३,३ ]

( २ ) श्रुतायूचा पुत्र [ ९,१५,२ ]

( ३ ) जमदग्नीचा पुत्र [ ९,१५,१३ ]

( ४ ) जांबवतीचा पुत्र [ १०, .२,१२ ]

( ५ ) विदेहवंशीय एक जनक (भा शांति)

**वसुमित्र**-कलियुगांतील शुंगवंशीय एक राजा [ १२,१,१७ ]

( २ ) भारतीयुद्धांतील कौरवपक्षीय राजा.

**वसुषण**-कर्णाचें मूळचें नाव.

**वसोर्धारा**-अग्नि नामक वसूची पत्नी. [ ६,६,१३ ]

**वस्रा**-भारतवर्षीय एक नदी.

**वस्वनंत**--विदेहवंशीय उपगुप्ताचा पुत्र, याचा पुत्र युयुध [ ९,१३,२५ ]

**वस्त्वेकसारा**—पूर्व दिक्पालाची महेंद्र नगरी ( मत्स्य. अ. १२३ )

**वस्वौकसारा**-स्वर्धुनीच्या सप्तप्रवाहांतील पहिला प्रवाह.

( २ ) उत्तर दिक्पालाच्या विभावरी नगरीचें नामांतर ( वा. रा. )

( ३ ) भारत वर्षीय एक नदी.

**वहीनर**-पाण्डव कुलांतील दुर्दमनाचा पुत्र याचा पुत्र निमि [ ९,२२,४३ ]

**वही र**—अनीह राजाचें नामांतर.

## वा

**वाकय**-वसिष्ठ कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**गायनि**—भृगुकुलांतील एक ब्रम्हर्षि.

**वागींद्र**-प्रकाशऋषोचा पुत्र व प्रमतीचा पिता

**वागीश्वरी**-वाणीची देवता सरस्वति.

**वाग्ग्रंथि**-वसिष्ठकुलांतील ब्रम्हर्षि.

**वाग्दुष्ट**-कौशिक ऋषींचा एक पुत्र, ( पितृवर्ती शब्द पहा )

**वाग्घान**-दुर्योधनपक्षीय एक राजा.

**वाचक्नवी**-वचक्नु ऋषांची कन्या, गार्गी.

**वाजपेय**-ब्रम्हदेवाच्या उत्तर मुखापासून झालेला एक यज्ञ. हा दक्षानें केला होता [ ३,१२,४० व ४,३,३ ]

**वाजश्रवस**-एक ब्रम्हर्षि.

**वाजसनि**-एक ऋषि.

**वाजिरत्न**-एक ऋषि.

**वाजिश्रवा**-अंगिराकुलांतील एक ऋषि.

**वाजी**-एक ब्रम्हर्षि.

**वाटधान**-पंचकर्पट देशाच्या पश्चिमेकडील एक देश.

**वाटनदी**-भारतवर्षीय एक नदी.

**वाडोहली**-अंगिराकुलांतील एक ब्रम्हर्षि.

**वाणी**-भारतवर्षीय एक नदी.

**वात**-माघमहिन्यांत पूषा सूर्याबरोबर फिरणारा राक्षस [ १२,११,३९ ]

**वातघ्न**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**वातवेग**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**वातस्कंध**-एक ब्रह्मर्षि.

**वातापि**-ऱ्हाद व धमनि यांचा एक पुत्र. [ ६,१८,१५ ]

( २ ) तेरा सैंहिकेयांतील एक दैत्य. यास अगस्त्य ऋषीनें मारिलें.

**वानापि**-दनुपुत्र एक दानव.

**वात्यायन**-भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**वात्सातरायण**-अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**वात्स्य**-शाकल्य ऋषीचा शिष्य [१२,६,५७] भृगुकुलांतील वत्स्य ऋषीचा पुत्र. हा जनमेजयाचा सर्पसत्रांत सदस्य होता.

**वात्स्य**-एक देश. प्रयागच्या पश्चिमेस.

**वात्स्यायन**-कश्यप कुलांतील एक ब्रह्मर्षि

**वादुली**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**वाद्भुतक**-अत्रिकुलांतील ऋषि व कुल.

**वानप्रस्थ**-चार आश्रमांपैकें तिसरा. [ ७, १२, १७ ] हा भगवंताच्या वक्षस्थलापासून झाला [११,१७,१४]

**वानीरमालिनी**-गयसीर पर्वताजवळची नदी

**वाम**-एकादश रुद्रांपैकीं एक [ ६,६,१७ ]

( २ ) श्रीकृष्ण व भद्रा यांचा पुत्र. [१०, ६१, १७ ]

**वामदेव**-एकादश रुद्रांपैकीं एक [३,१२,१२]

( २ ) शाल्मलीद्वीपांतील एक पर्वत. [ ५, २०, १० ]

( ३ ) प्रियव्रतपुत्र हिरण्यरेताचा एक पुत्र व याचा वर्ष [ ५,२०,१४ ]

( ४ ) कुशद्वीपांतील सातवा वर्ष.

( ५ ) गौतमांगिरस कुळांतील ऋषि व त्याचें कुल. हा स्यमंतपंचकक्षेत्रीं आला होता [ १०,८४,५ ]

( ६ ) एक जीवनन्मुक्त ऋषि. सनकादिकांच्या उपदेशावरून पूर्वजन्मीं ज्ञानसाधन करीत असता मृत्यु पावला. त्यामुळें पुन्हां गर्भांत आला. तेथेंच यास अपरोक्ष साक्षात्कार होऊन यानें लोकांना उपदेश केला.

( ७ ) दाशरथिरामाच्या सभेंतील एक धर्मशास्त्री.

**वामदेव**-एक ऋषि. शलराजानें याचे अश्व मागून नेले होते. (शल शब्द पहा)
(२) मोदापूर नगराचा राजा.

**वामदेवकल्प**-चालू ब्राह्ममासांत होऊन गेलेला तिसरा दिवस.

**वामन**-चालु मन्वंतरांत सातव्या पर्ययांतील त्रेतायुगांत कश्यप व अदिति यांपासून झालेला विष्णूचा पंधरावा अवतार [ १,३,१९,व८,१८,१२ ] ( बलिशब्द पहा )
( २ )अष्टदिग्गजांतील दक्षिण दिग्गज. [ ५,२०,३९ ]
( ३) अठरा महापुराणांपैकीं एक. याची श्लोकसंख्या दहा हजार [१२,१३,७]
( ४ ) कद्रूपुत्र एक नाग.
( ५ ) रामाच्या यज्ञांतील एक ऋत्विज.

**वामना**-एक अप्सरा.

**वामरथ्य**-अत्रीच्या कन्यावंशांतील ऋषि.

**वायु**-शाकद्वीपांतील लोकाची उपास्यदेवता. [ ५,२०,२७ ]
( २ ) जीवाचा एक साक्षी [६,१,४२]
( ३ ) अवधूतानें केलेला एक गुरू. [ ११,७,३३ ] हा पंचमहाभूतांपैकीं एक व वायव्यदिशेचा अधिपति.
( ४ ) एक ब्रह्मर्षि ( भा. शांति. )

**वायुचक्र**-मंकणक ऋषीच्या पुत्रांपैकीं एक.

**वायुजाल**- ,, ,,

**वायुवेग**- ,, ,,
( २ ) भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय एक राजा.

**वायुहा**-मंकणक ऋषीचा एक पुत्र.

**वारणावत**-ती-येथें पाण्डवनाशार्थ दुर्योधनानें लाक्षागृह बांधलें होतें.

**वारवती**-भारतवर्षीय एक नदी.

**वारवास्य**-भारतवर्षीय एक देश.

**वाराणसी**-( काशी ) वारणा व असी यांच्या संगमावरील क्षेत्र [७,१४,३१]

**वाराह**-वराह अवतार [ ३,११,३६ ]
( २ ) अठरामहापुराणांपैकीं एक. याची श्लोकसंख्या चोवीसहजार [१२,१३,७]
( ३ ) एक असुर ( मत्स्य. अ. १७२ )

**वाराहकल्प**-ब्राह्ममासांतलि चालू कल्प.

**वाराही**-सप्तमातृगणांतील एक देवता.
( २ ) आंगिराकुलांतील दोन ऋषी.

**वारिधार**--भारतवर्षीय पर्वत [५,१९,१६]

**वारिमूल**-चाक्षुष मन्वंतरातील पांचवे देव.

**वारिसार** --चंद्रगुप्ताचा पुत्र [१२,१,१३]

**वारुणतीर्थ**-काम्यकवनाच्या दक्षिणेकडील एक तीर्थ.

**वारुणपाश**-एक अस्त्र [ १०,५०,३२ ]

**वारुणि**-चालु मन्वंतरांतील भृगुऋषि.

**वारुणी**-समुद्रमंथनकालीं उत्पन्न झालेली सुरा. ही बलरामाकरितां वरुणानें पाठविली [८,८,३०व१०,६५,१९]
( २ )अगस्त्य ऋषीचें नामांतर.
( ३ ) कश्यप व विनता यांचा एक पुत्र.

**वार्क्षी**-वृक्षांनीं वाढविलेली कन्या व प्रचेत्यांची पत्नी [ ६,३०,४४ ],

**वार्त**-एक राजर्षि.

**वार्द्धक्षत्रि**-वृद्धक्षत्रपुत्र जयद्रथ यास नांव.

**वार्द्धक्षेमि**-पाण्डवपक्षीय एक राजा.

**वार्ष्णायन**- धूम्रपराशरकुलांतील एक ऋषि.

**वार्ष्णि**-वर्कु ऋषीस नांव.

**वार्ष्णय**-नल राजाचा सारथि.
( २ ) वृष्णिकुलांतील यादव. ( कृष्ण )

**वालखिल्य**—स्वायंभुवमन्वंतरांतील क्रतु ऋषि व क्रिया यांचे साठहजार पुत्र. हे अंगुष्ठप्रमाण असून सूर्यासारखे तेजस्वी आहेत. हे सूर्याची स्तुति करतात [ ४,१,३९ व ५,१९,१७]
( २ ) वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**वालवय**– ,, ,,

**वालिशय**– ,, ,,

**वाली**–किष्किंधेचा राजा ऋक्षरजा वानराचा हा ज्येष्ठ पुत्र. याचा धाकटा भाऊ सुग्रीव. याची पत्नी तारा व पुत्र अंगद. हा महाबलाढ्य होता एकदां रावण याजवर चाल करून आला असतां, त्यास यानें कांखेत दाबलें, व चार समुद्र फिरविलें. याचें गोलभगंधर्वाबरोबर पंधरा वर्षे युद्ध झालें होतें. यानें दुन्दुभिराक्षसास मारून ऋष्यमूकपर्वतावर फेंकिलें होतें, त्या राक्षसाच्या रक्तानें मतंग ऋषीचा आश्रम व तो प्रदेश रक्तमय झाला होता, ह्मणून मतंगऋषीनें वालीस शाप दिला होता, व त्या शापामुळें यास ऋष्यमूक पर्वत अगम्य झाला. पुढें दुन्दुभीचा भाऊ मायावी बंधूचा सूड उगविण्याकारितां याजवर चालून आला. त्याबरोबर याचें भयंकर युद्ध झालें. शेवटीं तो मायावी राक्षस एका गुहेंत शिरला. त्याचे मागोमाग हाही त्या गुहेंत शिरला, व गुहेचें द्वार रक्षण करण्याविषयीं सुग्रीवास सांगितलें. बरेच दिवस झाले तरी वाली गुहेंतून बाहेर न येतां त्या गुहेंतून रक्ताचा मोठा लोट बाहेर आला. तें रक्त पाहून मायावीनें वालीस मारलें अशी सुग्रीवाची समजूत झाली, व गुहेचें द्वार बंद करून सुग्रीव परत राजधानींत आला व वाली मरण पावला असें समजून राज्यारूढ झाला. पुढें कांहीं दिवसांनीं वाली परत आला, त्यानें सुग्रीवाबरोबर युद्ध करून त्यास जर्जर केलें. शेवटीं सुग्रीव जीवाचे भीतीनें पळाला व ऋष्यमूक पर्वतावर लपून राहिला. सुग्रीवास हाकून लावल्यावर वालीनें त्याची स्त्री रुमा हिचें हरण केलें. पुढें सुग्रीवाचें रामाशीं सख्य झाल्यावर रामचंद्रानें एका वृक्षाआड उभें राहून यावर बाण सोडला, व याचा वध केला. या प्रसंगीं क्षत्रियनीतिसंबंधानें याचें रामाबरोबर संभाषण झालें, आणि आपला पुत्र अंगद व पत्नी तारा यांचा सांभाळ करण्याविषयीं रामाची विनंती करून यानें प्राण सोडला. रामानें यास आश्वासन देऊन त्याच्या आत्म्यास मोक्षप्रद दिलें. ( वा. रा. ) हा इंद्रापासून झाला ह्मणून यास इंद्रपुत्र ह्मणत [ ९,१०,१२ ] ( ऋक्षराज शब्द पहा )

**वाल्मीकि**-वल्मीकापासून झालेला पुत्र. [ ६,१८,५ ] हा पूर्वजन्मीं दहा प्रचेत्यांपैकीं दहावा होता. ( अ.रा. उत्तर. ) नंतर एका ब्राम्हणाच्या कुटुंबांत याचें जन्म झालें. पुढें तो ब्राम्हण तपार्थ अरण्यांत गेल्यावर किरातांच्या संगतीनें हा अरण्यांत

राहून चौर्य कर्मे करूं लागला. हा धनुर्विद्येंत निपुण होता. एकदां हा अरण्यांत फिरत असतां एका महर्षीस पाहून त्याच्या जवळील द्रव्याची इच्छा करूं लागला. ऋषि म्हणाला, तूं एवढें पाप करतोस, पण यांत तुझी स्त्रीपुत्र इत्यादि वाटेकरी होणार आहेत काय? हा म्हणाला, होय. मी जर त्यांच्या सुखाकरितांच हीं सर्व कर्में करतों तर ते माझ्या पापाचे वाटेकरी कां होणार नाहींत? ऋषि म्हणाला, तूं घरीं जा व त्यांना विचार. ते जर वाटेकरी होत असतील तर तूं मला खुशाल मार. ऋषीच्या सूचनेप्रमाणें हा घरीं गेला व त्यानें आपली स्त्री पुत्र आदि सर्वांस विचारलें. पण त्यांनीं उत्तर दिलें, आम्ही सर्व सुखाचे वाटेकरी आहोंत, पापाचा वाटेकरी तुझा तूं एकटा आहेस. हें उत्तर ऐकतांच यास कृतकर्माचा पश्चाताप झाला, व झालेल्या पातकांपासून मुक्तता व्हावी म्हणून हा त्या ऋषीस शरण गेला. ऋषीनें रामनामाचा उपदेश केला परंतु 'राम' शब्दाचा उच्चार यास करता येईना. तेव्हां 'मारा मारा' अशा उलट शब्दांचा जप करीत मी परत येईपर्यंत येथें बस, असें सांगून तो ऋषि निघून गेला. त्या उपदेशाप्रमाणें हा जप करीत बसला असतां कित्येक वर्षे निघून गेलीं, याच्या अंगावर वारुळ वाढलें. कांहीं वर्षांनीं तो ऋषि परत आला असतां त्या वारुळांतून 'रामा रामा, असा निघत असलेला ध्वनि त्यास ऐकूं आला. त्यानें सर्व माती बाजूस सारून यास बाहेर काढलें, व मंत्रोपदेश दिला. रामनामाच्या एकाग्र तपश्चर्येनें यास दिव्यज्ञान व दिव्यकांति प्राप्त होऊन वाल्मिकी असें नांव प्राप्त झालें. एकदां हा तमसा नदीवर गेला असतां तेथें क्रौंच मिथुनापैकीं एक मृत झालेलें पाहून याच्या मुखांतून पहिला अनुष्टुप श्लोक बाहेर पडला, व ब्रह्मदेवानें येऊन यास शतकोटिरामायण रचण्यास सांगितलें. त्यांपैकीं चोवीस हजार काव्य वाल्मिकी रामायण म्हणून प्रसिद्ध आहे. यानें सीता त्यागानंतर तिचा सांभाळ करून लवकुशास अध्ययन शिकाविलें. यास आदिकवि असें म्हणतात. प्राचेता, प्राचेतस हीं याचीं पूर्वजन्मसंबंधीं नांवें. (वा. रा.)

**वास**—एक पर्वत. [ ५,१६,२६ ]

**वासना**—अर्कनामक वसूची पत्नी. हिचे पुत्र तर्षादि [ ६,६,१३ ]

**वासव**—इंद्रास एक नांव.

**वासवी**—उपरिचरवसूची कन्या. व्यासमाता सत्यवतीस नांव [ १,४,१४ ]

**वासाश्व**—वैश्यजातीय मंत्रद्रष्टा एक ऋषि. (मत्स्य. अ. १४४)

**वासुकि**—कद्रूचा पुत्र एक नाग. हा संपूर्ण नागांचा अधिपति आहे. समुद्र मंथनाचे वेळीं यास अमृताचा अंश देण्याचें कबूल करून देवदैत्यांनीं याचा दोर केला होता [ ८,७,१ ] सत्यव्रतानें आपली नौका प्रलयाच्या वेळीं यानेंच बांधिली. जनमेजयाच्या सर्प-

सत्रांत याचीं पंधरा कुळें दग्ध झालीं, तीं—कोटिश, मानस, पूर्ण, शल, पाल, हलीमक, पिच्छल, कौणप, चक्र, कालवेग, प्रकालन, हिरण्यबाहु, शरण, कक्षक आणि कालदंतक. हा शंकराच्या अंगावर नेहमीं भूषण रूपानें असतो. याच्या पत्नीचें नांव शतशीर्षा ( भा. उद्योग. )

( २ ) चैत्रमहिन्यांत धातानामक सूर्यासह फिरणारा नाग [१२,११,४३ ]

**वासुदेव**-वसुदेव पुत्र श्रीकृष्ण [१,२,७]

( २ ) भगवंताची चतुर्मूर्ति [१,५,३७]

( ३ ) सामवेदोपनिषत्.

**वास्तु**-विश्वामित्रकुलांतील एक ऋषि.

**वाहनप**-गौरपराशर कुलोत्पन्न ऋषि.

**वाहिनी**-भारतवर्षीय एक नदी.

**वाहिनीपति**-सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील दिवाकाचा पुत्र. याचा पुत्र सहदेव [९,१२,१०]

**वाह्लिक**-( आधुनिक बल्ख ) हिमालय, गंगा, सरस्वति, यमुना, कुरुक्षेत्र, सिंधु यांनीं बहिष्कृत व गमनास वर्ज्य असा प्रदेश ( भा. कर्ण. अ.४४ )

**वाल्यमय**-नील पराशर कुलांतील ऋषि.

## वि

**विटक**-रुद्रगणांतील एक.

( २ ) अंगदानें मारिलेला एक राक्षस.

( ३ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**विकटा**-सीतासंरक्षणार्थ असलेल्या दोन राक्षसी (वा. रा. सुंदर.)

**विकंपन**-रावण पक्षीय राक्षस [९,१०,१८]

( २ ) रुद्रगणांपैकीं एक.

**विकर्ण**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांपैकीं एक. हा महारथी असून न्यायी होता. भीमानें यास मारिलें [१०,७५,६]

**विकर्तन**-सूर्याचें एक नांव.

**विकुक्षि**-इक्ष्वाकूच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ. यास शशाद असें नांव होतें [७,६,४]

**विकुट**-एक पर्वत.

**विकुण्ठा**-रैवत मन्वंतरांतील वैकुण्ठ अवताराची माता [ ८,५,४ ]

**विकृति**-ज्यामधकुलांतील जीमूत राजाचा पुत्र. याचा पुत्र भीमरथ [९,२४,४]

( २ ) रुद्रगणांपैकीं एक.

**विकृत**-वृष्णिकुलांतील एक यादव.

**विख्यात**-तेरा सैंहिकेयांपैकीं एक.

**विघन**-रावणपक्षीय एक राक्षस.

**विचक्षुष**-वासिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**विचख्नु**-एक राजर्षि.

**विचारु**-रुक्मिणीचा एक पुत्र[१०,६१,९]

**विचित्र**-देवसावर्णि मनुपुत्र [८,१३,३० ]

(२) भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा

**विचित्रवीर्य**-सोमवंशीय पुरुकुलांतील शंतनु व सत्यवती यांचा धाकटा पुत्र. याचा वडील भाऊ चित्रांगद गंधर्वयुद्धांत मरण पावल्यामुळें भीष्मानें यास राज्यावर बसविलें. याच्या पत्नी अंबिका व अंबालिका [ ९,२२,२१ ]

**विजय**-अर्जुनास नांव [ १,१५,१ ]

( २ ) विष्णूच्या द्वारपाळांपैकीं एक. यास शाप झाला होता [ ३,१६,२ ]

( ३ ) विष्णूचा पार्षद [ ८,२१,१६ ]

( ४ ) हरिश्चंद्र कुलांतील सुदेवाचा पुत्र. याचा पुत्र भरुक [ ९,८,१ ]

**विजय**—विदेह वंशीय जयाचा पुत्र. याचा पुत्र ऋत [ ९,१३,२५ ]

( ६ ) पुरूरव्याच्या सहापुत्रांतील पांचवा. याचा पुत्र भीम [ ९,१५,१,३ ]

( ७ ) अनुकुलांतील जयद्रथाचा पुत्र, याचा पुत्र धृति [ ९,२३,१२ ]

( ८ ) जाम्बवतीचा पुत्र [१०,६१,१२]

( ९ ) कलियुगांतील बहुसंज्ञक राजापैकीं यज्ञश्रीचा पुत्र. याचे पुत्र चन्द्रविज्ञ व लोमधि [ १२,१,२७ ]

(१०) दशरथाच्या अष्टप्रधानांतील एक.

( ११ ) रामाच्या सभेंतील हास्यकार.

( १२ ) याज्ञवल्क्य ऋषीचा एक पुत्र.

( १३ ) भारतवर्षीय एक तीर्थ.

**विजया**—विष्णूची व शिवाची एक शक्ति [ ८,१८,६ ]

( २ ) केकयराजाची कन्या, व माद्रीपुत्र सहदेवाची पत्नी. हिचा पुत्र सुहोत्र [ ९,२२,३१ ]

( ३ ) भगवंताच्या मायेचें नांव. [ १०,१०,२-११ ]

**विजिताश्व**—उत्तानपादवंशीय पृथु व अर्चि यांचा ज्येष्ठ पुत्र [ ४,२२,५४ ] पृथूच्या यज्ञांतील अश्व इंद्रानें गुप्तरूपानें नेला असता तो यानें परत आणल्यामुळें यास हें नांव मिळालें [ ४, १९, १८ ] यास शिखण्डिनी पत्नीपासून पावक, पवमान व शुचि असे तीन पुत्र, व नभस्वती स्त्रीपासून हविर्धान हा एक पुत्र होता. [ ४,२४,४-५ ]

**विटभूत**—वरुण लोकांतील एक असुर.

**वितत्य**—विहव्य ऋषिपुत्र. याचा पुत्र सत्य.

**वितथ**—सोमवंशीय भरतपुत्र भरद्वाजास नामांतर. याचा पुत्र मन्यु [९,२१,१]

**वितर्दन**—एक राक्षस.

**वितल**—सप्तपातालांतील दुसरें. हाटकेश्वर महादेवाचें स्थान [ ५,२४,१७ ]

**वितस्ता**—( पंजाबांतील झेलम नदी ) ही हिमालयापासून उगम पाऊन पश्चिम समुद्रास मिळते [५,१९,१८]

**विताना**—सत्रायण ऋषीची पत्नी व इंद्रसावर्णि मन्वंतरांतील अवताराची माता. [ ८, १३, १५ ]

**विद**—भृगुकुलांतील ब्रह्मर्षि व त्याचें कुल.

**विदग्ध**—शाकल्य ऋषीचें नांव.

**विदण्ड**—द्रौपदी स्वयंवरांतील राजा. दण्डराजाचा पिता.

**विदर्भ**—एक राजा याच्यापासून पुरंजन, कन्यारूपानें जन्मला [ ४,२८,२८ ]

( २ ) ऋषभ देवाचा एक पुत्र, व याचा खण्ड [ ५, ४, १० ]

( ३ ) भरतवर्षांतील एक खण्ड.

( ४ ) सोमवंशीय यदुकुलांतील ज्यामघ व शैब्या यांचा पुत्र. याची पत्नी भोजा व पुत्र कुश, कृथ व रोमपाद [ ९,२३,३९ व ९,२४,१ ]

( ५ ) ( वऱ्हाडप्रांत ) याची राजधानी कुण्डिनपुर. यांतच रुक्मीची भोजकट नगरी होती [ १०,५२,४१ ]

**विदल**—सूर्यवंशीय ध्रुवसन्धीचा प्रधान.

**विदारण**—सिंधुदेशीय जयद्रथाचा भाऊ.

**विदिशा**—दशार्ण देशाची राजधानी. हल्लींचें भेलसा. हें भोपाळच्या ईशान्येस तीस मैलांवर आहे.

( २ ) नदी. उगम-पारियात्र पर्वत.

**विदुर**—कृष्णद्वैपायन व्यास व विचित्रवीर्याच्या स्त्रियांची दासी यांपासून

झालेला पुत्र. शापामुळें यम विदूर रूपानें आला होता [ ९,२२ २५ व ३,५,२० ] विदुर मैत्रेय संवाद [ ३,१,१ ] तीर्थयात्रेहून आगमन, धृतराष्टाला उपदेश. धृतराष्ट्रासह उत्तरेकडे गमन व तीर्थयात्रेला प्रयाण [ १,१३,१ ते ५८ ]

**विदुरथ**-जरासंध कुलांतलि सुरथाचा पुत्र. याचा पुत्र सार्वभौम [९,२२,१०]

( २ ) वृष्णिकुलांतलि चित्ररथाचा पुत्र याचा पुत्र शूर [९,२४.१८ ]

( ३ ) वक्रदंताचा भाऊ [१०,५३,१७]

( ४ ) हंसध्वज राजाचा भाऊ.

( ५ ) यदुवंशीय निर्वृत्ति राजास नामांतर

( ६ ) सोमवंशांतील एक प्राचीन राजा. परशुरामाच्या भीतीनें यास याच्या आईनें ऋष्यवान् पर्वतावर ऋषींच्या अश्रमांत सोडिलें होतें. यानें पुनः पूरुकुलाची वृद्धि केली.

**विदुला**-सौवीरदेशाच्या राजाची पत्नी. ही तेजस्वी होती. क्षात्रधर्माचें पूर्ण तज हिचे ठायीं होतें. हिने आपल्या संजय-नामक मुलास उपदेश करून सिंधु-राजापासून राज्य परत मिळाविलें

**विदुषा**-एक नदी. उगम-पारियात्र पर्वत.

**विदेह**-सूर्यवंशीय निमिराजा मृत्यु पावल्या-वर त्यानें पुनः देह स्वीकारला नाहीं; म्हणून त्याच्या वंशजास पडलेलें नांव. [९,१३,१३,].

(२ ) विदेहांचा देश. याची राजधानी मिथिला. ( सांप्रतचा तिरहुत किंवा उत्तरविहारप्रांत ) [ १०,२,३ ]

**विद्य**-विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**विद्याचण्ड**-कौशिब्राह्मणाचा पुत्र (पितृ-वर्ती शब्द पहा )

**विद्याधर**-देवाविशेष [ ५,२४,४ ]

**विद्युच्छत्रु**-मार्गशीर्षांत अंशु सूर्याबरोबर फिरणारा ऋषि [ १२,११,३१ ]

**विद्युज्जिव्ह**-शूर्पणखेचा पति.

( २ ) रावणाचा प्रधान. रामाचें शीर व धनुष्य मायेनें उत्पन्न करून यानें रावणाकडून सीतेस दाखविलें होतें.

**विद्युता**-एक अप्सरा.

**विद्युत्केश**-हेतिराक्षस व भयाराक्षसी यांचा पुत्र. याची पत्नी संध्या व कन्या सालंकटंकटा. तिनें आपला गर्भ मंद-राचलावर टाकिला, त्याचें सुकेश नांव ठेऊन शंकरानें रक्षण केलें. ( वा. रा. उत्तर. )

**विद्युत्पताक**-प्रलयमेघांतलि सहावा मेघ

**विद्युत्कर्णा**-प्राधाकन्या एक अप्सरा

**विद्युत्प्रभ**-एक ऋषि.

**विद्युत्प्रभा**-एक अप्सरा.

**विद्युद्द्रंष्ट्र**-रामसेनेंतील एक वानर

**विद्युद्रूप**-लंकेंतील एक राक्षस.

**विद्युन्माली**-तारकासुराचा एक पुत्र. त्रिपु-रांपैकीं एका पुराचा अधिपति

( २ ) तारकासुराचा एक मित्र

( ३ ) रामसेनेंतील एक वानर.

( ४ ) लंकेंतील एक राक्षस.

**विद्योत**- धर्मऋषि व लंबा यांचा पुत्र. याचा पुत्र स्तनयित्नु [ ६,६,५ ]

**विद्योता**-एक अप्सरा.

**विद्रावण** दनु पुत्र एक दानव.

**विधाता**-स्वायंभुव मन्वतरांतील ब्रह्मपुत्र भृगु व कर्दम कन्या ख्याति यांचा

पुत्र. याची पत्नी मेरुकन्या नियती व पुत्र प्राण [४,१,४३]

( २ ) ब्रह्मदेवाचें नांव [५.१.६,५]

( ३ ) द्वादशादित्यांपैकीं एक [६,६,३९]

**विधि**–आज्ञा, दैव, ब्रह्मदेव [ ११,२०,१]

**विधिसार**–कलियुगांतील शिशुनाग वंशीय क्षेत्रज्ञाचा पुत्र व अजात शत्रूचा पिता [ १२,१,६ ]

**विधृति**–तामस मन्वंतरांतील देवांची माता [ ८,१,२९ ]

(२) कुशकुलांतील खगणाचा पुत्र हिरण्यनाभाचा पिता [ ९,१२,३ ]

**विनत**–रामसेनेंतील एक वानर.

( २ ) एक गांव.

**विनता**–ताक्ष्यनामक कश्यपाची एक पत्नी. हिचे पुत्र गरुड व अरुण [ ६,६,२१ ] याशिवाय अरुणि, वारुणि, सुमुख, सुनामा, सुनेत्र, सुवर्चा, सुरुक, सुबल हे पुत्र व सौदामिनी कन्या होती. अरुणाच्या वेळेस ही गर्भवती असतां हिनें बलात्कारानें गर्भ बाहेर काढिला तो पंगु झाला. म्हणून 'सवतीच्या दास्यांत पडशील' असा त्यानें शाप दिला.त्या शापांतून पुढें गरुडानें हिला सोडविलें. ( भा. उद्योग. आदि. )

( २ ) सीतासंरक्षणार्थ असलेली राक्षसी.

**विनशन**–एक तीर्थ. सरहिंद जिल्ह्यांतील मैदान. सरस्वती नदी येथे गुप्त झाली.

( २ ) कुरुक्षेत्राचें नामांतर.

**विनायक**–एक रुद्रगणाधिपति [२,१०,३८]

( २ ) गणपतीचें नामांतर.

( ३ ) गरुडाचें नामांतर.

( ४ ) भारतवर्षीय एक क्षेत्र.



**विनाशन**–कश्यप व काला यांचा पुत्र.

**विन्द**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( २ ) दुर्योधनपक्षीय राजा. केकय देशाधिपति दोन भ्रात्यांतील ज्येष्ठ. यास सात्यकीनें मारिलें (भा. कर्ण. )

( ३ ) दुर्योधनपक्षीय राजा. अवंतिदेशीय दोन भ्रात्यांतील ज्येष्ठ. यास अर्जुनानें मारिलें ( भा. द्रोण. )

**विन्ध्य**- एक पर्वत [ ५, १९, १६ ] य पर्वताचा आरंभ गुजराथेंत होतो; व सागर, दमोह जिल्ह्यांच्या उत्तरेकडून जाऊन वाघेलखण्ड व रेवासंस्थानांतून बहारमध्यें संपतो. विंध्य व सातपुडा हे नर्मदेच्या उगमाजवळ अमरकण्टक येथें मिळाले आहेत. याची उंची समुद्रसपाटीपासून २००० फूटांहून ज्यास्त नाहीं. हिमालय व मेरु या पर्वतांपेक्षां उंच होण्याकरिता हा वाढत असत सूर्याच्या गतीस अडथळा झाला, तेव्हां देवांच्या प्रार्थनेवरून अगस्त्य ऋषि तेथे आले, आपले गुरू आले असें पाहून हा नम्र झाला, तेव्हां मी परत येईपर्यंत असाच रहा, असें सांगून अगस्त्य दक्षिणेत आले. तेव्हा पासून हा तसाच आहे. याची लांबी सातशें मैल आहे ( भा. वन. ) या पर्वतापासून तपती, तापी, पयोष्णी, निर्विंध्या, क्षिप्रा, ऋषभा, वेणा, वैतरणी, विश्वमाला, कुमुद्वती, करतोया, महगौरा, दुर्गमा, शीला, या नद्या निघाल्या आहेत ( मत्स्य.)

( २ ) पांचव्या रैवतमनूचा एक पुत्र. [ ८,५,२

**विन्ध्यचुलिक**–भारतवर्षीय देश.

**विंध्यावली**-बलीदैत्याची पत्नी[८,२०,१७]

**विपाट**–विपाशा नदी.

**विपापा**–भारतवर्षीय एक नदी.

**विपाप्मा**–बृहस्पतिपुत्र निश्चवन नामक अग्नीचा पुत्र. वास्तुकार्यांत याचें प्राधान्य असतें ( मत्स्य. )

**विपाशा**–पंजाबांतील बियास नदी. येथें बलराम तीर्थयात्रेला आला होता [ १०,७९,११ ]

**विपुल**-वसुदेव व रोहिणी यांचा एक पुत्र. [ ९,२४,४६, ]

( २ ) भारतवर्षीय एक क्षेत्र.

( ३ ) अर्जुनानें मारिलेला सौवीर देशांतील एक म्लेंच्छ राजा.

**विपृथु**–एक यादव.

**विपृष्ठ**-वसुदेव-धृतदेवाचा पुत्र[९,२४,५०]

**विप्र**–जरासंधकुलांतील सृतंजयाचा पुत्र. याचा पुत्र शुचि [ ९,२२,४७ ]

**विप्रचित्-त्ति**-कश्यप व दनु यांचा पुत्र. याची पत्नी सिंहिका व पुत्र राहु-ज्येष्ठ शंभर त्यांस केतु संज्ञा होती. [ ६,६,१८,४१ ] हा हिरण्यकशिपूचा व वृत्रासुराचा अनुयायी होता [ ६,१०,१९, व ७,२,४ ]

**विबुध**—विदेहवंशीय विश्रुतजनकास नांव.

**विभाण्ड**–एक ब्रह्मर्षि ( भा. शांति. )

**विभाण्डक**–काश्यप गोत्रीय एक ऋषि. ऋष्यशृंगाचा पिता.

**विभावरी**–उत्तर दिक्पालाची नगरी [ ५,२१,७ ]

**विभावसु**-अष्टवसूंपैकीं एक [ ६,६,११ ]

( २ ) कश्यप व दनु यांचा एक पुत्र. [ ६,६,३० ]

**विभावसु**–मुरदैत्याचा एक पुत्र. यास कृष्णानें मारिलें [१०,५९,१२]

( ४ ) सूर्य व अग्नीस नांव.

( ५ ) एक ऋषि. हा सुप्रतीक भावाच्या शापानें कूर्म झाला होता

( ६ ) पाण्डवाबरोबर वनवासांत असलेला एक ऋषि.

**विभीषण**–( बिभीषण शब्द पहा )

**विभु**–तुषित देवांपैकीं एक [ ४,१,७ ]

( २ ) ऋषभदेववंशीय प्रस्ताव व नियुत्सा यांचा पुत्र. याची पत्नी रति व पुत्र पृथुषेण [ ५,१५,६ ]

( ३ ) भगनामक आदित्य व सिद्धि यांचा पुत्र [ ६,१८,२ ]

( ४ ) स्वारोचिष मन्वंतरांतील अवतार [ ८, १, २१ ]

( ५ ) रैवत मन्वंतरांतील इंद्र [८,५,३]

( ६ ) साध्य देवांपैकीं एक.

( ७ ) वारुणी भृगूचा वरेण्य नामक पुत्र.

( ८ ) भीमानें रात्रियुद्धांत मारिलेला शकुनीचा भाऊ.

**विभूति**–विश्वामित्राचा एक पुत्र.

**विभ्राज**–बर्हिषद पितरांचा लोक.

( २ ) सोमवंशीय पार राजाचें नामांतर

**विमल**–वैवस्वत मनुपुत्र सुद्युम्नाचा पुत्र [ ९, १, ४१ ]

( २ ) यदुवंशीय विकृतीचें नामांतर.

( ३ ) भारतवर्षीय एक तीर्थ.

**विमला**–एक नदी. उगम–ऋष्यवान् पर्वत.

( २ ) एक नदी. उगम–महेंद्र पर्वत.

( ३ ) सुरभी कन्या रोहिणीची कन्या.

**विमलेश्वर**–भारतवर्षीय एक तीर्थ,

**विमलोदका**–सरस्वतीच्या प्रवाहांपैकीं एक.

**विमुख**-एक ब्रह्मर्षि.

**विमोचन**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**वियति**-सोमवंशीय नहुषाच्या सहा पुत्रांपैकीं एक [ ९, १८, १ ]

**विरज**-स्वायंभु मन्वंतरांतील मरीचिपुत्र पूर्णिमाचा मुलगा [ ४, १, १४ ]

( २ ) ऋषभदेववंशीय त्वष्टा व विरोचना यांचा पुत्र. याची पत्नी विषूची व शतजित् प्रमुख शंभर पुत्र आणि एक कन्या. [ ५,१५,१५ ]

(३)सावर्णिमन्वंतरांतील देव[८,१३,१२]

( ४ ) स्वारोचिष मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

( ५ ) भारतवर्षीय एक तीर्थ.

**विरजस्क**-आठव्या सावर्णि मनूचा एक पुत्र [ ८,१३,११ ]

**विरजा**-स्वायंभु मन्वंतरांतील वसिष्ठ व ऊर्जा यांचा एक पुत्र [ ४,१,४१ ]

( २ ) वारुणि कवीचा सहावा पुत्र

( ३ ) सुस्वधा नामक पितरांची कन्या व नहुष राजाची पत्नी.

**विराट**-विराट पुरुष-परमात्मा. भूलोक, याचे पाय, भुवर्लोक नाभि, आणि स्वर्लोक याचें मस्तक होय [२,५,४२]

( २ ) स्वायंभू मनूस नांव ( मत्स्य. )

( ३ ) पूर्वमत्स्य देशाचा राजा. याची राजधानी विराटपूर. हल्लींचें वैरात. जयपूरच्या उत्तरेस ४१ मैलांवर. पाण्डव अज्ञातवासांत असतां याच्याकडे राहिले होते. याला शतानीक, मदिराक्ष, विशालाक्ष, सूर्यदत्त, श्रुतध्वज आणि श्रुतानीक, असे सहा भाऊ होते. केकय राजाची कन्या सुदेष्णा याची पत्नी व शंख, श्वेत, उत्तर, असे तीन पुत्र आणि उत्तरा कन्या होती. हा रात्रियुद्धांत द्रोणाचार्यांचे हातून मरण पावला(भा द्रोण)

**विराडप**-अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**विराध**-क्रौंचावट वनांत राहणारा राक्षस. सीतेला पळवीत असतां रामानें याचा वध केला. हा पूर्वीचा तुंबुरु गंधर्व शापानें राक्षस झाला होता (वा रा.)

**विरावी**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**विरिञ्चि**-ब्रह्मदेवास नांव [ ३,१०,४ ]

**विरुद्ध**—ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतील देव [ ८,१३,२२ ]

**विरूप**-सूर्यवंशीय अंबरीषाचा एक पुत्र. याचा पुत्र बृहदश्व [ ९,६,१ ]

( २ ) कृष्णाचा एक पौत्र. हा महारथी होता [ १०,९०,३४ ]

( ३ ) रुद्रगणांपैकीं एक.

( ४ ) वरुण लोकांतील एक असुर.

( ५ ) वारुणि अंगिरा ऋषीच्या आठ पुत्रांतील सहावा.

**विरूपाक्ष**-कश्यप-दनूचा एक पुत्र [ ६,६,३१ ]

( २ ) एकादशरुद्रांपैकीं एक.

( ३ ) शंकराचें एक नांव.

( ४ ) भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

( ५ ) महिषासुराचा अमात्य (दे. भा.

( ६ ) अशोकवनिकेंत रावणानें पाठविलेल्या पांच सेनापतींपैकीं एक. हा चौघासहित मारुतीच्या हातून मरण पावला. ( वा. रा. सुंदर. )

( ७ ) लक्ष्मणानें युद्धांत मारिलेला एक राक्षस. ( वा. रा युद्ध. )

**विरूपाक्ष**-सुमाली राक्षसाचा अमात्य. यास सुग्रीवानें मारिलें.

(९) भीमपुत्र घटोत्कचाचा सारथि.

**विरोचन**-प्रल्हादाचा पुत्र व बाणासुराचा पिता. हा पाखण्ड मताचा होता. [६,१८.१६]

**विरोचना**-ऋषभदेववंशीय त्वष्ट्याची पत्नी. [५,१५,१५]

**विलोमा**-यदुवंशीय सात्वतकुलांतील वन्हि राजाचा पुत्र. याचा पुत्र कपोतरोमा [९,२४,१९]

**विवस्वान्**-द्वादशादित्यापैकीं एक. कश्यप व अदिति यांचा पुत्र. याला संज्ञानामक स्त्रीपासून श्राद्धदेव मनु, यम यमुना, अशीं तीन आपत्यें झालीं. एकदां संज्ञा घोडीचें रूप घेऊन पृथ्वीवर गेली असतां, यानें अश्वाचें रूप घेऊन तिजबरोबर क्रीडा केली, त्या प्रसंगीं झालेल्या गर्भसंभवापासून अश्विनीकुमार झाले. याची दुसरी पत्नी छाया. तिला शनैश्वर, सावर्णि मनु व तपती कन्या झाली. [६,५,३९ व ९,१,१०] याला संज्ञा, राज्ञी व प्रभा, अशा तीन स्त्रिया होत्या, असा अन्यत्र उल्लेख आहे.

(२) उग्रसेन गंधर्व, व्याघ्रराक्षस, असारणयक्ष, भृगुऋषि, अनुम्लोचा अप्सरा व शंखपाल नाग, यांसह भाद्रपद महिन्यांत फिरणारा सूर्य. [१२,११,३८]

(३) चाक्षुषमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक

(४) गरुडानें मारिलेला एक असुर.

**विविक्त**-प्रियव्रत पुत्र हिरण्यरेताचा सहावा पुत्र व याचा वर्ष. हा कुशद्वीपांत आहे. [५,२०,१८]

**विवित्सु**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**विविंध्य**-चारुदेष्णानें मारिलेला शाल्वपक्षीय असुर.

**विविंशति**-दिष्टकुलांतील चाक्षुष राजाचा पुत्र. याचा पुत्र रंभ [९,२,२४]

(२) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**विशद**-सोमवंशीय अजमीढ पुत्र बृहदिषूच्या वंशांतील जयद्रथाचा पुत्र. याचा पुत्र सेनजित् [९,२१,२३]

**विशल्यकरिणी**-नर्मदेस मिळणारी नदी.

**विशल्या**-भारतवर्षीय महा नदी.

**विशसन**-दांभिकपणानें यज्ञ करणाऱ्यास प्राप्त होणारा नरक [५,२६,२५]

**विशाख**-कार्तिकस्वामि.

(२) एक ऋषि.

**विशाखयूप**-कलियुगांतील प्रद्योतवंशीय पालकाचा पुत्र. याचा पुत्र राजक. [१२,१,३]

(२) यामुनगिरीवरील एक स्थान. वनवासांत असतांना पाण्डव येथें कांहीं दिवस राहिले होते.

**विशाखा**-एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक.

(२) स्कंदाचा पुत्र [६,६,१४]

**विशाल**-सूर्यवंशीय दिष्टकुलांतील तृणबिंदु व अलंबुषा अप्सरा यांचा एक पुत्र. यानें वैशाली नगरी स्थापिली. याचा पुत्र हेमचंद्र [९,२.३३]

(२) कृष्णाचा मित्र गोप [१०,२२,३१]

**विशालकर्ण**-एक किन्नर.

**विशाला**-बदरिकाश्रम [ ५,४,५ ]

( २ ) विशाल राजानें स्थापिलेली नगरी ( वैशाली ) येथें पूर्वी कुशप्लव नांवाचें वन होतें. रामाच्यावेळीं दिष्ट-कुलांतील सुमतिराजा येथें राज्य करीत होता ( हल्लींचें बेसारगांव )

( ३ ) एकनदी. उगम-हिमालय पर्वत.

( ४ ) सरस्वतीच्या सप्तप्रवाहांतील एक.

( ५ ) उज्जयिनीस नांव.

**विशालाक्ष**-स्यमंतपंचकक्षेत्रीं आलेला एक राजा [ १०,८२,२५ ] हा युधिष्ठिराच्या राजसूययज्ञांतहि होता.

( २ ) शंकराचा एक पार्षद.

( ३ ) विराटाचा एक भाऊ. हा कीचकवधानंतर सेनापति होता.

( ४ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**विशालाक्षी**-वाराणसी क्षेत्रांतील सतीची विभूति.

**विशोक**-कर्णानें मारिलेला पाण्डवपक्षीय केकय देशाचा राजा.

( २ ) पाण्डुपुत्र भीमाचा सारथि.

( ३ ) लोहित्यनदीकाठचें अरण्य.

**विश्रवा**-ब्रह्मपुत्र पुलस्त्य व कर्दम कन्या हविर्भुवा यांचा पुत्र. अगस्त्य ऋषीचा भाऊ. तृणबिंदूची कन्या इडविडा ती याची पत्नी, व पुत्र कुबेर. याची दुसरी स्त्री केशिनी. तिला रावण, कुंभकर्ण, बिभीषण, हे पुत्र झाले. [ ४,१,३६; १,४,३ व ९,२,३२ ] या शिवाय याला पुष्पोत्कटा, राका, बलाका, या स्त्रिया होत्या. त्यांपासून खर, दूषण, विद्युज्जिव्ह इत्यादि पुत्र झाले. शूर्पणखा याचीच कन्या.

**विश्रुत**-वसुदेव-सहदेवेचा पुत्र [९,२४,५१]

( २ ) नर्मदेसंबंधी एक तीर्थ

**विश्व**-फाल्गुनांत पर्जन्यसूर्याबरोबर फिरणारा यक्ष [ १२,११,४० ]

( २ ) दुर्योधनपक्षीय एक राजा.

**विश्वकर्मा**-स्वायंभुवमन्वंतरातील प्रजापति. याची कन्या बर्हिष्मती [ ६,६,१५ ]

( २ ) वैवस्वतमन्वंतरांतील प्रभासनामक वसूचा पुत्र. हा देवांचा शिल्पी आहे. यास त्वष्टा असेंहि म्हणतात (मत्स्य.)

**विश्वग**-स्वायंभुवमन्वंतरांतील मरीचि पुत्र पूर्णिमाचा एक पुत्र [ ४,१,१४ ]

( २ ) सूर्यवंशीय विश्वरन्धीचें नामांतर.

**विश्वजित्**-जरासंधाच्या कुलतील सत्यजिताचा पुत्र. याचा पुत्र पुरंजय. [ ९,२२,४९ ]

( २ ) बृहस्पति व तारा यांचा एक पुत्र. याची गणना अग्नामध्यें आहे.

**विश्वपद**-एक क्षेत्र.

**विश्वभुक्**-एक इंद्र. याच्या अंशानें युधिष्ठिर जन्मला.

( २ ) बृहस्पति व तारा यांचा एक पुत्र

**विश्वमाला**-एक नदी उगम विंध्यचल पर्वत

**विश्वरन्धि**-इक्ष्वाकुवंशीय पृथुराजाचा पुत्र यास विश्वग, विष्टराश्व अशीं नामांतरें आहत. याचा पुत्र चंद्र [ ९,६,२० ]

**विश्वरूप**-ऋषभदेवपुत्र भरत, त्याच्या पंचजनी पत्नीचा पिता [ ५,७,१ ]

( २ ) त्वष्टा नामक प्रजापति व दैत्य भगिनी रचना यांचा पुत्र [ ६,६,४४ ] याला सोमपीथ, सुरापीथ, अन्नाद, अशीं तीन शिरें होतीं. हा कांही काळ देवांचा गुरु असतां, हा उघ

स्वरानें देवांना व गुप्त रूपानें असुरांना हविर्भाग देत असे. त्यामुळें इंद्रानें याचा नाश केला. याच्या तीन शिरांपासून अनुक्रमें कवडा, चिमणी व लावा, असे तीन पक्षी उत्पन्न झाले. [ ६,७,२५ व ६,९,१ ते ५ ]

( ३ ) वरुण लोकांतील एक असुर.

**विश्वसह**--सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील ऐडविडाचा पुत्र. याचा पुत्र खट्वांग [ ९,९,४१ ]

**विश्वसाव्ह**- सूर्यवंशीय कुशकुलांतील महस्वानाचा पुत्र. याला विश्वस असें नामांतर आहे. याचा पुत्र प्रसेनजित् [ ९,१२,७ ]

**विश्वसृट्**--एक यज्ञ. हा यज्ञ दक्षानें केला होता [ ४,२,४ ]

( २ ) ब्रम्हसावर्णि मन्वंतरांतील अवताराचा पिता [ ८,१३,२३ ]

( ३ ) सहस्र संवत्सरात्मक यज्ञकर्ता एक ऋषि ( भा. वन. )

**विश्वस्फूर्जि**--कलियुगांतील मगध देशांचा राजा. दुसरा पुरंजय [ १२,१,३४ ]

**विश्वा**- भारतवर्षीय नदी [ ५,१९,१८ ]

( २ ) प्राचेतस दक्षाची कन्या व धर्मऋषीची पत्नी [ ६,६,४ ]

**विश्वाची**--प्राधाकन्या एक अप्सरा.

**विश्वाधार**--प्रियव्रतपुत्र मेधातिथीचा पुत्र व शाकद्वीपांतील वर्ष [ ५,२०,२५ ]

**विश्वामित्र**--सोमवंशीय पुरूरवापुत्र विजयकुलांतील गाधीचा पुत्र. हा तपानें ब्राह्मण झाला. याला शंभर पुत्र होते, त्यांतील मधला मधुच्छंदस असल्यानें सर्वांस मधुच्छन्द हें नांव होतें. याला अष्टक, हारीत इत्यादि आणखीहि पुत्र होते. त्यामुळें याच्या गोत्राच्या अनेक शाखा झाल्या [ ९, १६, २८ ते ३७ ] यानें त्रिशंकूला सदेह स्वर्गास पाठविलें [ ९, ७, ५ ] याला मेनका अप्सरेपासून शकुंतला झाली [ ९,२०,१३ ]

( २ ) चालूमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

( ३ ) कार्तिकमासांत विष्णु सूर्याबरोबर फिरणारा ऋषि [ १२, ११, ४४ ]

(४) जमदग्नि व रेणुका यांचा एक पुत्र.

( ५ ) माल्यवान राक्षसाची कन्या अनला तिचा पति (वा. रा. उत्तर)

**विश्वावसु**--प्राधापुत्र एक गंधर्व. पृथ्वी दोहनाचे वेळी गंधर्व व अप्सरांनीं यास वत्स केलें होतें. हा इंद्राबरोबर युद्धांत होता [ ४,१८,१७ व ८,११,४१ ]

( २ ) श्रावणांत इंद्रनामक सूर्याबरोबर फिरणारा गंधर्व [ १२, ११, ३७ ]

**विश्वे**--( विश्वेदेव ) चाक्षुष मनूचे पुत्र. [ ६, ६, १५ ]

**विश्वेदेव**--धर्म ऋषि व विश्वा यांचे दहा पुत्र. क्रतु, दक्ष, वसु, सत्य, कालकाम, मुनि, कुरज, मनुज, बीज आणि रोचमान् [ ६,६,७ ] ( मत्स्य. ) हे चालू मन्वंतरांत सप्तविध देवांत आहेत [ ८,१३,४ ] हे मरुत्त यज्ञांत सभासद होते [ ९,२,२८ ]

**विषप्रस्थ**--नैमिषारण्यांतील एक तीर्थ.

**विषया**--धृष्टबुद्धि प्रधानाची कन्या, चंद्रहासाची पत्नी.

**विषूची**--ऋषभदेववंशीय विरजाची स्त्री. [ ५,१५,१५ ]

**विषूची**-ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतील अवताराची माता. [ ७,१३,२३ ]

**विष्टराश्व**-विश्वग राजास नामांतर.

**विष्णु**-द्वादशदित्यांपैकीं एक [ ३,४,२५ ]

( २ ) भगवंताचें नांव. हा सत्वगुण विशिष्ट असून सृष्टिपालनाचें कार्य करितो. यानें त्रिपुरासुराच्या वधाच्या वेळीं गोरूपानें अमृत शोषून घेतलें. हा लक्ष्मीसह वैकुण्ठांत राहतो. भृगुऋषीनें याच्या श्रेष्ठतेचा अनुभव घेतला [ ७,१०,६२व१०,८९,१५ ] युगायुगाच्या ठिकाणीं अवतार घेतो.

( ३ ) कार्तिक महिन्यांत अश्वतरनाग, रंभा अप्सरा, सूर्यवर्चसू गंधर्व, सत्यजित यक्ष, विश्वामित्र ऋषि, आणि मखापेत राक्षस यांसह फिरणारा सूर्य. [ १२,११,४४ ]

( ४ ) अष्टादश महापुराणांपैकीं एक. याची श्लोकसंख्या तेवीस हजार आहे [ १२,२३,४ ]

( ५ ) भृगुकुलांतील एक ऋषि.

**विष्णुपद**-ध्रुवमण्डलाचें स्थान [५,१७,१]

( २ ) एक पर्वत.

( ३ ) निषध पर्वतावरील एक सरोवर. यांतून ज्योतिष्मती नदी निघाली.

**विष्णुपदी**- गंगेचें मूळ नांव [ ५,१७,१ ]

**विष्णुयशास्**-कल्की अवताराचा पिता. [ १२,२,१८ व १,३,२५ ]

**विष्णुरथ**-गरुडास नांव.

**विष्णुरात्**-परीक्षितास नांव [ १,१२,१६ ]

**विष्णुलोक**-नित्यमुक्त विष्णु साकारत्वानें जेथें राहतो तो लोक. वैकुंण्ठलोक यापेक्षां निराळा आहे. कारण तो याचे मागून उत्पन्न झाला.

**विष्णुवृद्ध**-( द्वि ) इक्ष्वाकुवंशीय त्रसद्स्यूचा एक पुत्र

**विष्वक्सेन**-भगवंताचें नांव [ १,२,८ ]

( २ ) ब्रह्मसावर्णिमन्वंतरांत होणारा विष्णूचा एक अवतार [ ८,१३,२३ ]

( ३ ) एक विष्णुपार्षद [ ८,२१,२६ ]

( ४ ) सोमवंशीय अजमीढ पुत्र बृहदिषूच्या वंशांतील ब्रह्मदत्त व गौ अथवा सरस्वती यांचा पुत्र. यानें जैगीषव्याला शिकविण्याकरितां योगशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला. याचा पुत्र उदक्स्वन [ ९,२१,२५ ]

( ५ ) एक ब्रह्मर्षि.

**विसर्जन**-यादवांतील एक कुल.

**विसृत**-विदेहवंशीय देवमीढाचा पुत्र, याचा पुत्र महाधृता [ ९,१३,१६ ]

**विहंगम**-धर्मसावर्णि मन्वंतरांतील देव. [८,१३,२५]

( २ ) खर राक्षसाचा एक अमात्य.

**विहव्य**-वर्चा ऋषीचा पुत्र. याचा पुत्र वितत्य

**वीतहव्य**-विदेहवंशीय शुनकाचा पुत्र. याचा पुत्र धृति [ ९,१३,२६ ]

( २ ) सूर्यवंशीय शर्यातिपुत्र हैहय त्याच्या शतपुत्रांतील प्रमुख. यानें काशीचा राजा दिवोदास यास पदच्युत करून आपण काशीस राहूं लागला. पुढें च्यवन ऋषीच्या आश्रयामुळें यास ब्रह्मत्व प्राप्त झालें. ( प्रतर्दन शब्द पहा ; याचा पुत्र गृत्समद ( भा अनु. )

**वीति**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**वीतिहव्य**-भृगुकुलांतील दोन ऋषि

**वीतिहोत्र**-प्रियव्रताचा नववा पुत्र. पुष्कर-द्वीपाचा अधिपति, यानें आपल्या द्वीपाचे दोन भाग करून ते रमणक व धातकि या दोन पुत्रांस दिले [ ५,१,२५ व ५,२०,३१ ]

( २ ) सूर्यवंशीय नरिष्यन्त कुलांतील इंद्रसेनाचा पुत्र [ ९,२,२० ]

( ३ ) सोमवंशीय काश्यकुलांतील सुकुमाराचा पुत्र [ ९,१७,९ ]

( ४ ) सोमवंशीय सहस्रार्जुनाच्या कुलांतील तालजंघाच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ. हा और्वांच्या कोपाग्नींतून वांचला होता [ ९,२३,२९ ]

( ५ ) युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांतील एक ऋषि.

**वीर**-तामस मन्वंतरांतील देव [ ८,१,२८ ]

(२) कृष्णपत्नी सत्येचा पुत्र [१०,६१,१३]

( ३ ) कालिन्दीचा पुत्र [१०,६१,१५]

( ४ ) कश्यप व दनु याचा पुत्र.

( ५ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( ६ ) भरद्वाज अग्नि व वीरा यांचा पुत्र. यास रथप्रभु, रथाध्वान, कुंभरेता इत्यादि नावें होतीं. याची पत्नी शरयू व पुत्र सिद्धि.

**वीरक**-एक शिवगण.

**वीरकरा**-भारतवर्षीय एक नदी.

**वीरकेतु**-द्रोणाचार्यानें मारिलेला पाण्डवपक्षीय पांचाल.

( २ ) हंसध्वज राजाच्या सुमती नामक प्रधानाचा पुत्र.

**वीरण**-सनकादिकांपासून ब्रह्मविद्या संपादन केलेला एक प्रजापति.

**वीरद्युम्न**-भूरिद्युम्न राजर्षीचा पिता.

**वीरधन्वा**-धृष्टकेतूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा.

**वीरप्रमोक्ष**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**वीरबाहु**-रामसेनेंतील एक वानर.

( २ ) प्रवीराचें नामांतर.

( ३ ) चेदिदेशाचा एक राजा.

( ४ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**वीरभद्र**-स्वायंभुव मन्वंतरांतील दक्षयज्ञनाशाकरितां शंकरानें जटेपासून उत्पन्न केलेला गण. यानें दक्षाचा वध केला [ ४, ५, ३ ते २३ ] हा चालू मन्वंतरांत भंगणनामक ग्रह असून भंगणमण्डलाचा अधिपति आहे.

**वीरमत्स्य**-भारतवर्षीय एक देश,

**वीरवती**-भारतवर्षीय एक नदी.

**वीरवर्मा**-सारस्वत नगराचा राजा. याच्या मालिनी नामक कन्येनें तप करून यमास वरिलें होतें, म्हणून तो यास साहाय्य करीत असे. याला सुमाल, सुरभ, लील, कुशल, सरल, असे पांच पुत्र होते. यानें पांडवांच्या अश्वमेधप्रसंगीं युद्ध करून अर्जुनाचा पराभव केला असतां कृष्णानें याच्याशीं अर्जुनाचें सख्य केलें ( जै. अश्व. )

**वीरव्रत**-ऋषभदेववंशीय मधु व सुमना याचा पुत्र. याची पत्नी भोजा, व पुत्र मन्थु आणि प्रमन्थु [ ५,१५,१५ ]

**वीरसेन**-नलराजाचा पिता.

( २ ) कलिंगदेशाचा राजा. याची कन्या मनोरमा, ती इक्ष्वाकुवंशीय ध्रुवसन्धीची पत्नी.

**वीरसेन**-कोसल देशीय एक राजा.
( ४ ) युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांतील एक ऋषि.

**वीरा**-भरद्वाज नामक अग्नीची पत्नी.
( २ ) भारतवर्षीय एक नदी.

**वीरिणी**-वीरणप्रजापतीची कन्या नड्वलेचें नामांतर.
( २ ) प्राचेतस दक्षाची दुसरी स्त्री.
( ३ ) पीवरीचें नामांतर.

**वीर्य**-अक्रूराचा एक पुत्र.

**वीर्यधर**-शाल्मली द्वीपांतील लोकविशेष. [ ५, २०, ११ ]

**वीर्यवान**-बारा साध्य देवांपैकीं एक.

**वीर्यसह**-कल्माषपाद राजास नामांतर.

## वृ

**वृक**-पृथु व अर्चि यांचा कनिष्ठ पुत्र [ ४, २२, ५४ ]
( २ ) हिरण्यकशिपूचा अनुयायी एक असुर [ ७, २, १८ ]
( ३ ) सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलांतील भरुक राजाचा पुत्र. याचा पुत्र बाहुक [ ९,८,२ ]
( ४ ) यदुवंशीय शूर व मारिषा यांचा पुत्र. यास दुर्वाक्षीपासून तक्ष, पुष्कर हे पुत्र झाले [ ९,२४ २९ ]
( ५ ) मित्र विंदेचा पुत्र [१०,६१,१६]
( ६ ) वत्सक यादव व मिश्रकेशिनामक अप्सरा यांचा पुत्र.
( ७ ) अग्नीस नांव.
( ८ ) ध्रुवपुत्र शिष्ट व सुच्छायेचा पुत्र.
( ९ ) द्रौपदीस्वयंवरांत आलेला राजा.
( १० ) द्रोणाचार्यानें मारिलेला पाण्डवपक्षीय पांचाल.

**वृक**—हरितराजास नामांतर.

**वृकदेवी**-वसुदेवाची एक स्त्री.

**वृकरथ**-अधिरथसूताचा एक पुत्र. यास रात्रियुद्धांत भीमानें मारिलें.

**वृकल**-अक्रूराचा एक पुत्र.

**वृकस्थल**-कुरुदेशांतील एक गांव.

**वृकासुर**-शकुनिनामक असुराचा पुत्र. ज्याच्या मस्तकावर हात ठेवशील तो मृत्यु पावेल, असा शंकराकडून यास वर मिळाला होता. शेवटीं विष्णूच्या लीलेनें हा स्वतःच्या हस्तानें मृत झाला [ १०,८८,१३ ते ३५ ]

**वृकोदर**-भीमास नांव [ १०,७२,१३ ]

**वृजिनवान्**-यदुपुत्र क्रोष्टा त्याचा पुत्र. याचा पुत्र श्वाहि [ ९,२३,३० ]

**वृत्त**-ध्रुवपुत्र शिष्ट, याचा तिसरा पुत्र.

**वृत्ति**-मनुनामक रुद्राची पत्नी [ ३,१२,१३ ]

**वृतिरूपवती**-क्रौंचद्वीपांतील एक नदी [ ५,२०,२१ ]

**वृत्रघ्नी**-एक नदी. उगम-पारियात्र पर्वत.

**वृत्रज्वाला**-कुम्भकर्णपत्नी वज्रज्वालेचें नांव.

**वृत्रहा**- इंद्रास नांव.

**वृत्रासुर**-एक असुर. विश्वरूपाच्या वधानंतर त्वष्टा प्रजापतीनें इंद्रनाशाकरितां यास यज्ञांतून उत्पन्न केलें [ ६, १९,१२ ] इंद्राबरोबर याचें अनेकवेळां युद्ध झालें, आणि त्या सर्व प्रसंगीं यानें इंद्राचा पराभव केला. शेवटीं भगवंताच्या सूचनेवरून इंद्रानें दधीचि ऋषीकडे अस्थींची मागणी केली. देशकार्य व देवावरील दुर्धर प्रसंग लक्षांत घेऊन दधीची ऋषींनीं

आपल्या अस्थि काढून देवांच्या स्वाधीन केल्या. विश्वकर्म्यानें त्या अस्थीपासून वज्र नांवाचें शस्त्र तयार केलें, आणि त्या वज्रानें इंद्रानें याचा वध केला. हा महापराक्रमी होता. युद्धप्रसंगीं याचे बाहु इंद्रानें तोडले असतांहि ऐरावतासह यानें इंद्रास गिळिलें होतें, पण इंद्र सुरक्षित याच्या पोटांतून बाहेर आला [ ६, १२, ६ ते ३३ ] हा वृत्रासुर पूर्वीचा चित्रकेतु होता. ( चित्रकेतु शब्द पहा. ) [ ६, १४, १० ] चालु मन्वंतराच्या प्रथम पर्यायांतील त्रेतायुगांत नर्मदेच्या तीरीं एक वर्षपर्यंत हें युद्ध झालें [ ६, १०, १६ व ६, १२, ३३ ]

**वृद्धक्षत्र**-सिंधु देशाचा राजा. याचा पुत्र जयद्रथ यास वृद्धशर्मा असेंहि म्हणतात

**वृद्धगार्ग्य**-एक ब्रह्मर्षि.

**वृद्धशर्मा**-करुष देशाचा राजा. याची पत्नी वसुदेवभगिनी श्रुतदेवा व पुत्र दन्तवक्त्र [ ९, २४, ३७ ]

( २ ) वृद्धक्षत्राचें नामांतर.

**वृद्धसेना**-ऋषभवंशीय सुमतीची पत्नी [ ५, १५, २ ]

**वृन्दारक**-अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय एक राजा.

**वृन्दावन**-यमुनेच्या तीरावरील वन [ १०, ११, ३५ ] संयुक्तप्रांताच्या मथुराजिल्ह्यांतील मथुरेच्या उत्तरेस ९ मैलांवर असलेलें गांव. याचें प्राचीन नांव काल्यावर्त होतें. श्रीकृष्णाच्या बाल लीला येथें झाल्यामुळें हें एक क्षेत्र मानण्यांत येतें.

**वृश्चिक**-बाराराशींपैकीं आठवी [ ५, २१, ४ ]

**वृष**-यदुवंशीय सात्वतकुलांतील सृंजय व राष्ट्रपाली यांचा पुत्र [ ९, २४, ४२ ]

( २ ) श्रीकृष्ण व सत्या यांचा पुत्र [ १०, ६१, १३ ]

( ३ ) श्रीकृष्ण व कालिन्दी यांचा पुत्र [ १०, ६१, १४ ]

**वृषक**-गांधारदेशीय सुबलाचा एक पुत्र, शकुनीचा भाऊ. यास अर्जुनानें मारिलें ( भा. द्रोण. )

( २ ) कलिंगदेशीय भानुमंताचा भाऊ.

**वृषकण्ड**-कश्यपकुलांतील एक ऋषि.

**वृषका**-भारतवर्षीय एक नदी.

**वृषकेतु**-कर्णाचा पुत्र. याची स्त्री भद्रावती व पुत्र वृषध्वज.

**वृषक्राथ**-शकुनीचा भाऊ.

**वृषदर्भ**-सेदुक राजाचा मित्र. यास सेदुकानें एकदां सहज सांगितलें होतें कीं, ' ब्राम्हणास सुवर्ण, अथवा रौप्य यांशिवाय दान देऊं नये ' त्यानंतर एकदां एक ब्राह्मण याच्याकडे सहस्र अश्व मागण्यास आला असतां यानें अश्व न देतां राज्याचें एका दिवसाचें उत्पन्न दिलें.

( २ ) अनुवंशीय औशीनर शिबीचा पुत्र. हा मोठा धार्मिक, सत्यनिष्ठ व एकवचनी होता. याची कीर्ति ऐकून याचें सत्व पहाण्याकरितां इंद्र व अग्नि असे दोघे कपोत व ससाणा अशीं पक्षांचीं रूपें घेऊन, याजकडे आले, व ' ससाण्यापासून माझें रक्षण कर, असें कपोतपक्षी म्हणाला. मागोमाग ससाणा आला,

व हा माझें भक्ष्य आहे तो मला दे ' अशी त्यानें राजाजवळ कपोताची मागणी केली. राजा म्हणाला, तो मला शरण आला आहे, तेव्हां त्याच्यावाचून दुसरें हवें तें माग मी देतों. तेव्हां त्या ससाण्यानें कपोताच्या भारंभार राजाच्या शरीराच्या मांसाची मागणी केली. वचनास अनुसरून राजानें मांडी, पाय, हात, इत्यादि शरीराचे भाग कापून त्यांतील मांस तराजूंत घातलें तथापि कपोताची तुला होईना. शेवटीं राजा स्वतःचे मस्तक देऊं लागला. तेव्हां राजाचें सत्व पाहून ते देव प्रसन्न झाले व त्यांनीं राजास वर देऊन त्याचा जयजयकार केला. (भा. अनु)

**वृषदंश**–एक पर्वत.

**वृषध्वज**–शंकरास नांव [ ८, १२, ४ ]

( २ ) एक राजर्षि ( दे. भा. )

**वृषपर्वा**–कश्यप व दनु यांचा एक पुत्र. दैत्यांचा राजा [ ६,६,३१ ] हा वृत्रासुर युद्धांत होता [ ६,१०,१९ ] ययातिराजाच्यावेळीं हा असुरांचा अधिपति होता. याच्या कन्या शर्मिष्ठा व चंद्रा [ ९,१८,२६ ]

( २ ) बदरिकाश्रमीं राहणारा राजर्षि.

**वृषभ**–बाराराशींपैकीं दुसरी [ ५,२१,४ ]

( २ ) कार्तवीर्याचा पुत्र [ ९,२३,२७ ]

(३) कृष्णमित्र एक गोप [१०,१८,२३]

( ४ ) रामसेनेंतील एक वानर (वा.रा.) हा सीताशोधासाठीं गेला होता.

(५) अर्जुनानें मारिलेला शकुनीचा भाऊ

( ६ ) मगध देशाचा सीमा पर्वत.

**वृषभा**–भारतवर्षीय एक नदी.

**वृषसा**– ,, ,,

**वृषसेन**–कर्णाचा एक पुत्र. यास अर्जुनानें मारिलें [ ९;२३,१४ ]

**वृषाकपि**–एकादशरुद्रांपैकीं एक [६,६,१७]

**वृषादर्भ–र्भि**–( वृषदर्भ शब्द पहा. )

**वृषामित्र**–पाण्डवांबरोबर द्वैतवनांत असणारा ऋषि.

**वृष्टि**–सावर्णि मनूचा एक पुत्र.

**वृष्टिनेमि**–अक्रूराचा एक पुत्र.

**वृष्टिमान्**–पाण्डवकुलांतील कविरथाचा पुत्र याचा पुत्र सुषेण [ ९.२२,४१ ]

**वृष्णि**-सहस्रार्जुनपुत्र मधूचा मुलगा. याच्या नांवावरून याच्या कुलास वृष्णिकुल असें नांव मिळालें [ ९, २३, २९ ]

( २ ) यदुवंशीय सात्वताच्या सात पुत्रांपैकीं चवथा. याची पत्नी माद्री व पुत्र सुमित्र आणि युधाजित [ ९, २४, ६–१२ ]

( ३ ) यदुवंशीय सात्वतपुत्र वृष्णिकुलांतील अनमित्राचा पुत्र. याचे पुत्र श्वफल्क व चित्ररथ [ ९,२४,१४ ]

( ४ ) सात्वत पुत्र भजमानाचा पुत्र.

(५) यादववंशांतील एक कुल [३,३,१५]

( ६ ) वर्कु ऋषीचा पिता.

**वेगवान्**–दिष्टकुलांतील बंधुमानाचा पुत्र याचा पुत्र बंधु [ ९, २, ३० ]

( २ ) श्रीकृष्ण व सत्या यांचा पुत्र [ १०,६१,१३ ]

( ३ ) कश्यप व दनु यांचा पुत्र, एक दानव. हा शाल्वयुद्धांत सांबाचे हातून मरण पावला.

**वेंक**–एक देश [ ५,६,९ ]

**वेंकट**-मद्रासइलाख्यांतील पर्वत [५,१९,१६]

**वेणा**-( वैनगंगा ) नदी. उगम-विंध्यपर्वत

**वेणी**-एक नदी [ ५,१९,१८ ]

**वेणीमाधव**-प्रयागक्षेत्रातील विष्णूची विभूति

**वेणुदारि**-कर्णानें दिग्विजयाचेवेळीं जिंकलेला राजा.

**वेणुमती**-नदी. उगम-पारियात्र पर्वत.

**वेणुहय**-यदुवंशीय शतजिताचा एक पुत्र.

**वेण्या**-महाराष्ट्रांतील नदी. कृष्णेस मिळते.

**वेतसिका**-एक नदी.

**वेताल**-एक रुद्रगण. पिशाचांचा अधिपति [ १०, ६३, १० ]

**वेत्रवती**-नदी. उगम-पारियात्र पर्वत.

( २ ) नदी. उगम-विंध्यपर्वत हल्लींची माळव्यांतील बिटवा.

**वेद**-जगांतील प्राचीन वाङ्मय. यांत संहिता ब्राह्मणें व आरण्यकें, हे तीन भाग येतात. याचे मुख्य चार भेद आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद. यांस अनुक्रमानें आयुर्वेद, धनुर्वेद, गान्धर्ववेद आणि स्थापत्यवेद, असे उपवेद आहेत. हे ब्रह्मदेवापासून उत्पन्न झाले. इतिहास व पुराण हा पांचवा वेद आहे [ ३, १२, ३७ ते ३९ ] याची व्यवस्थित मांडणी करून व्यासानें ते पैलादि शिष्यांस उपदेशिले [ १२, ६, ३७ ते ५३ ] याच्या पुढें अनेक शाखा झाल्या. याचीं छन्द, कल्प, ज्योतिष, निरुक्त, शिक्षा, व्याकरण अशीं सहा अंगें असून तीं अनुक्रमें पाय, हात, चक्षु, कर्ण, नासिका व मुख या वेदपुरुषाच्या अवयवांच्या ठिकाणीं कल्पिला आहेत.

( २ ) भृगुकुलांतील एक ऋषि.

( ३ ) धौम्यऋषीचा शिष्य. याचा उत्तंक.

**वेददर्श**-सुमन्तूचा अथर्ववेदाचा शिष्य [ १२,७,१ ]

**वेदबाहु**-श्रीकृष्णाचा पौत्र [ १०,९०,३४

**वेदवती**-विदेहवंशीय कुशध्वज व मालावती यांस लक्ष्मीच्या अंशानें झालेली कन्या. जन्मतांच हिनें वेदध्वनि केला म्हणून हिचें नाव वेदवती असें ठेविलें. ही रूपसंपन्न होती. ही विष्णूस द्यावी अशी हिच्या पित्याची इच्छा होती. ही उपवर होताच शंभु नामक दैत्यानें हिची मागणी केली, परंतु कुशध्वजानें ती नाकारली म्हणून दैत्यानें त्याचा नाश केला. याप्रमाणें हिच्या पित्याचा वध होतांच हिची आई पतीबरोबर सती गेली व ही एकटी राहिली. पुढें हिनें पुष्करतीर्थीं विष्णूच्या प्राप्तीस्तव उग्र तप केलें. त्यावेळीं आकाशवाणी होऊन पुढील जन्मीं तुला विष्णु पति मिळेल-असें सुचविलें ती भविष्यवाणी ऐकून संतुष्ट मनानें ही गंधमादन पर्वतावर कालक्रमण करीत असतां एकदां रावण तेथें आला व आपणास वरण्याविषयीं हिची विनवणी करूं लागला, पण ही कबूल होईना, तेव्हां तो बलात्कारानें ओढूं लागला, परंतु तपोबलानें हिनें त्याचें स्तंभन केलें. आणि माझ्याच अभिलाषानें तूं पुत्रपौत्रांसह मरण पावशील असा शाप दिला. ही दुसरे जन्मीं रामपत्नी सीता झाली ( वा. रा. उत्तर. ) ( दे. भा. )

**वेदशिर**—कृशाश्व व धिषणा यांचा पुत्र. [ ६,६,२० ]
( २ ) भारतवर्षीय एक तीर्थ.

**वेदशिरा**-स्वायंभुव मन्वंतरांतील विधाता पुत्र प्राणाचा मुलगा [ ४,१,४५ ]
( २ ) स्वारोचिष मन्वंतरांतील विभु-नामक अवताराचा पिता. याची पत्नी तुषिता [ ८,१,२१ ]
( ३ ) रैवत मन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक [ ८,५,३ ]

**वेदशेरक**-वसिष्ठ कुलांतील एक ऋषि.

**वेदश्रुत**—उत्तममन्वंतरातील देव [ ८,१,२४ ]

**वेदश्रुती**-तमसानदीच्या दक्षिणेकडील नदी

**वेदस्मृति**—एक नदी. उगम पारियात्र पर्वत [ ५,१९,१८ ]

**वेदाश्वा**- ,, ,,

**वेदी**- ,, ,,

**वेदी**-ब्रह्मदेवाची शक्ति ( भा. उद्योग. )

**वेधा**-ब्रह्मदेवास नांव.

**वेन**-दुसऱ्या चक्षुमनुच्या वंशांतील अंग व सुनीथा यांचा पुत्र [ ४,१३,१८ ] हा फार दुष्ट होता. याचेपासून सर्वांना अत्यंत पीडा होऊं लागल्या-मुळे, ऋषींनीं याचा नाश केला, व पृथ्वीवर राजा असावा ह्मणून ऋषींनीं याच्या माण्डीच मंथन केलें, त्यापासून निषाद नामक पुत्र झाला [ ४,१४,३४-४५ ] या पुरुषरूपानें वेनाच्या शरीरांतील पाप नाहींसें झाल्यावर पुन्हां याच्या बाहूचें मंथन केलें, त्यापासून पृथु व अर्चि हीं उत्पन्न झालीं [ ४,१५,१ ]

**वेनवाजस्रजाक्ष**—चालूमन्वतरांतील होऊन गेलेला बाविसावा व्यास.

## वै

**वैकंक**-मेरूच्या कर्णिका पर्वतांतील एक [ ५,१६,२६ ]

**वैकर्णिनि**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**वैकर्णेय**-कश्यपकुलांतील एक ऋषि.

**वैकर्तन**-सूर्यसंभवत्वामुळें कर्णास नांव.

**वैकर्ता**-कार्तवीर्याचा एक पुत्र.

**वैकुण्ठ**-शुभ्र ऋषि व विकुंठा यांचा पुत्र. रैवत मन्वंतरांतील अवतार. यानें वैकुण्ठ लोक स्थापन केला [ ८,५,४-५ ]
( २ ) भगवंताचें नांव [ ६,२,१४ ]
( ३ ) विष्णूचा लोक [ ९,४,६० ]

**वैकुण्ठकल्प**-चालु ब्राह्ममासांतील बाविसावा दिवस.

**वैकृतिगालव**-विश्वामित्र कुलोत्पन्न ऋषि.

**वैक्लव**-वसिष्ठ कुलांतील एक ऋषि.

**वैखानस**-जमीन न नांगरता उत्पन्न होणाऱ्या धान्यावर निर्वाह करणारे वानप्रस्थ ऋषि.

**वैगायन**-भृगु कुलांतील एक ऋषि.

**वैचित्रवीर्य**-धृतराष्ट्र, पाण्डु, यांस संज्ञा.

**वैजभृत**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**वैजयंत**-क्षीर समुद्रांत असलेला एक पर्वत.
( २ ) इंद्राचा प्रासाद.
( ३ ) निमिराजाची नगरी.
( ४ ) तिमिध्वज राजाची नगरी. ही दक्षिणेमध्यें दण्डकाच्या देशांत होती.

**वैजयन्ती**-विष्णूच्या गळ्यांतील माळा [ ९,१५,२० ]

**वैणव**-विश्वामित्रकुलांतील ऋषि.

**वैतरणी**-धर्ममर्यादा उल्लंघिणाऱ्यास प्राप्त होणारा नरक [ ५,२६,२२ ]

**वैतरणी**–एक नदी. उगम–विंध्यपर्वत. ओरिसांतून वाहत्ये.

**वैत्रकीयवन**–एकचक्रानगरी जवळचें वन. यांत बकासुर रहात असे.

**वैदर्भा**–भारतवर्षीय एक नदी.

**वैदर्भी**–विदर्भराजाच्या कन्या [४,२८,२९] विशेषतः रुक्मिणी [ १०,५३,१ ]

**वैदिश**–शत्रुघाति राजाचें नगर.

**वैदूर्य**–मेरूच्या कर्णिका पर्वतांतील एक [ ५,१६,२६ ]

**वैदेह**–निमिराजाचे वंशज [ ९,१३, ३ ]
(२) वैश्यापासून ब्राह्मणीला झालेला पुत्र.

**वैदेहरात**–विश्वामित्र कुलांतील ऋषि.

**वैदेही**–विदेहराजांच्या कन्या विशेषतः सीता

**वैद्यनाथ**–एक क्षेत्र.

**वैद्युत**- हिमालयावरील कैलास शिखराच्या वायव्येकडील शिखर.
( २) भरतखण्डाच्या दक्षिणेकडील पर्वत

**वधृत**—धर्म सावर्णि मन्वंतरांतील इंद्र. [ ८,१३,२५ ]

**वैधृता**-धर्म सावर्णिमन्वंतरांतील आर्यकपत्नी व धर्मसेतूची माता [ ८,१३,२६ ]

**वैधृति**–तामस मन्वंतरांतलि देव[८,१२,९]

**वैन्य**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**वैभ्राज**–कुमुद पर्वतावरील देवांचें वन [ ५,१६,१४ ]
( २ ) शरयू नदीच्या तीरावरील वन.
( ३ ) विभ्राज पुत्र नीपाचें नामांतर.

**वैमृगेय**–कश्यप कुलांतील ऋषि.

**वैय्याघ्रपद्य**–व्याघ्रपाद ऋषीचे वंशज.
( २ ) युधिष्ठिरानें अज्ञान वासांत असतां धारण केलेलें एक नांव.

**वैयासकि**–शुकाचार्य.

**वैरपरायण**–अंगिरा कुलांतील एक ऋषि.

**वैरा**–भारतवर्षीय एक नदी.

**वैराज**–चाक्षुष मन्वंतरांतील अजक अवताराचा पिता. पत्नी संभूति[८,५,९]
( २ ) पितर विशेष. यांची कन्या मेना, ती हिमालयाची स्त्री.

**वैराजकल्प**–चालु श्वेतवाराह कल्पानंतर येणारा सत्ताविसावा कल्प.

**वैराट**–विराटाचे पुत्र. विशेषतः उत्तर.

**वैराटी**–विराट कन्या उत्तरा [ १,८,१० ]

**वैरोचन**-(नि) विरोचन पुत्र बलि[८,१९,१]

**वैलेय**-अत्रिकुलांतील एक ऋषि.

**वैवशप**–कश्यपकुलांतील एक ऋषि.

**वैवस**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**वैवस्वत**–विवस्वान आदित्याचे पुत्र श्राद्धदेव, यम, शनि, यांस संज्ञा.

**वैवस्वतमनु**–विवस्वान् आदित्याचा श्राद्धदेव संज्ञक पुत्र. हा पूर्वजन्मींचा सत्यव्रत होय. यानें बदरीवनांत दहा हजार वर्षे तप केलें (भा. वन.) याची पत्नी श्रद्धा. प्रथम यास संतति नसल्यानें वसिष्ठानें मित्रावरुणेष्टि केली. त्यांत श्रद्धेच्या विनंतीवरून कन्या होईल असा होत्यानें मंत्रांचा ऊह केला, त्यामुळें जी कन्या झाली ती इला [ ९, १,१६ ] त्यानंतर यानें पुत्रप्राप्तीस्तव यमुनेच्या जलांत शंभर वर्षे तप केलें त्यायागानें यास इक्ष्वाकु, नृग, शर्याति, दिष्ट, धृष्ट, करूषक, नरिष्यंत, पृषध्र, नभग, कवि असे दहा पुत्र झाले. हा चालू सातवा मनु होय ! याच्या मन्वंतरांत वसु, रुद्र,

आदित्य, विश्वेदेव, मरुद्गण, अश्विनी कुमार, ऋभु हे देव, पुरंदर, इंद्र, कश्यप, आत्रि, वसिष्ठ, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, भरद्वाज, हे ऋषि आणि वामन अवतार झाला [ ८, १३, १ ते ६ व ९, २, १ ]

**वैशंपायन**–चालू मन्वंतरांतील प्रथमपर्यायाच्या द्वापार युगांत असलेला व्यासाचा यजुर्वेदाचा शिष्य याज्ञवल्क्याचा मामा. यानें याज्ञवल्क्यापासून वेद परत घतले [१२,६,५२]

( २ ) चालू मन्वंतरांतील अठ्ठाविसाव्या पर्यायाच्या द्वापारयुगांत झालेल्या कृष्ण द्वैपायन व्यासाचा शिष्य.

**वैशाल**–( वैशालिक शब्द पहा. )

**वैशालि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**वैशालिक**–सूर्यवंशीय विशाल राजाच्या कुलांत उत्पन्न होऊन विशाला नगरींत राज्य करणारे राजे.

**वैश्य**–कौशिकऋषीचा शिष्य.

**वैश्रंभक**–देवांचे एक वन.

**वैश्रवण**–कुबेराचें नामांतर.

**वैश्वानर**–कश्यप व दनु यांचा एक पुत्र [ ६,६,३३ ]

( २ ) शांडिल्य गोत्रांतील ऋषि.

**वैश्वानरि**–भृगुकुलांतील ब्रह्मर्षि.

**वैष्णवज्वर**–विष्णूचे अस्त्र [१०,६३,२३ ]

**वैष्णवपद**–विष्णुपद [ १२,६,३५ ]

**वैष्णवी**–विष्णूची शक्ति. सप्त मातृगणांतील एक [ १०,२,११ ]

**वैहायसी**–भारतवर्षीय एक नदी.

**वैहार**–मगधदेशाचा एक सीमापर्वत.

**वैहीनरि**–भृगुकुलांतील ऋषि.

## वो

**वोहलि**–एक ऋषि. ( दे. भा. )

## वौ

**वौलि**–वसिष्ठकुलांतील ऋषि.

**वौषडि**–अंगिराकुलांतील ऋषि.

**व्यघाद्य**–भृगुकुलांतील ऋषि.

**व्यद्र्यश्व**–एक राजर्षि.

**व्यश्व**– ,, ,,

**व्यंस**–तेरा सैंहिकेयांतील एक.

**व्याघ्र**–भाद्रपदांत विवस्वान सूर्याबरोबर फिरणारा यक्ष [ १२,११,३८ ]

**व्याघ्रकेतु**–पांडवपक्षीय एक राजा.

**व्याघ्रदत्त**–द्रोणाचार्यानें मारिलेला पांडवपक्षीय पांचाल.

( २ ) कौरवपक्षीय मगधदेशीय राजपुत्र यास सात्यकीनें मारिलें.

**व्याघ्रपाद**–वसिष्ठकुलांतील ऋषि. याचे पुत्र उपमन्यु आणि धौम्य (भा द्रोण.)

**व्यान**–शरीरांतील पंच प्राणांपैकीं एक.

**व्यास**–पराशर ऋषिपासून सत्यवतीस कौमार्यावस्थेंत झालेला पुत्र. [ १,३,२१ व १,७;२४ ] (कृष्णद्वैपायन शब्द पहा.) चालू मन्वंतरांत प्रत्येक पर्यायाच्या द्वापरयुगांत एक व्यास झाला, त्यांचीं नांवें:–१ स्वयंभू, २ प्रजापति, ३ उशना, ४ बृहस्पति, ५ सविता, ६ मृत्यु, ७ मघवा, ८ वसिष्ठ, ९ सारस्वत, १० त्रिधामा, ११ त्रिवृष, १२ भारद्वाज १३ अंतरिक्ष, १४ धर्मा, १५ त्र्यारुण, १६ धनंजय, १७ मेधातिथि, १८ व्रती, १९ अत्रि, २० गौतम, २१ हर्यात्मा अथवा उत्तमा, २२ वेनवाजश्रवा,

२३ सोमन्यूषायण, २४ तृणबिंदु, २५ भार्गव, २६ शक्ति, २७ जातुकर्ण, २८ ( प्रस्तुतचा ) कृष्णद्वैपायन, २९ ( पुढें होणारा ) द्रौणि अथवा अश्वत्थामा ( दे. भा. ) व्यास म्हणजे वेद विस्तार करणारा.

**व्याहृति**–सविता व पृश्नि यांची कन्या [ ६ १८,१ ]

**व्युषिताश्व**–सोमवंशीय एक राजा. यास भद्रा स्त्री व शाल्व, भद्र, इत्यादि सात पुत्र होते.

**व्युष्ट**–उत्तानपादवंशीय पुष्पार्ण व दोषा यांचा पुत्र. याची पत्नी पुष्करिणी व पुत्र सर्व तेजस [ ४,१३,१४ ]

( २ ) विभावसु व उषा यांचा पुत्र [ ६,६,१६ ]

**व्यूक**–भारत वर्षीय एक देश.

**व्यूढोर**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**व्योम**–यदुवंशीय क्रथ कुलांतील दशार्हाचा पुत्र. यास दाशार्ह असेंहि म्हणतात. याचा पुत्र जीमूत [ ९,२४,३ ]

**व्योमासुर**–मयासुराच्या वंशांतील एक असुर. यास कृष्णानें मारिलें [ २,७,३१, व १०,३७,२८ ]

**व्रज**–मथुरेजवळील नंदाचे खेडें [१०,१,१ ]

**व्रत**–चक्षु व नड्वला यांचा पुत्र[४,१३,१६]

**व्रती**–चाक्षुमन्वंतरांत झालेला अठरावा व्यास

**व्रतयु**–पुरुकुलांतील रौद्राश्वाचा नववा पुत्र [ ९,२०,४]

## श

**शक**–हिंदुस्थानच्या वायव्येकडील एक देश व त्यांतील लोक हे मूळचे अनार्य होते, ते सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी हिंदुस्थानाकडे वळले व प्रथम शकस्थानांत ( हल्लींचा सीस्तान ) राहिले. नंतर सुराष्ट्र ( काठेवाड ) इत्यादि प्रांतांत यांनी आपलीं राज्यें स्थापिलीं सगर राजानें यांस जिंकिलें होतें [ ९,८,५ ]

**शकटासुर**–कंसाचा अनुयायी एक असुर. हा शकटरूपानें कृष्णनाशाकरितां आला असतां कृष्णानें यास मारिलें. [ १०,७,८ ]

**शकुन–नि**-हिरण्याक्षाच्या चार पुत्रांतील दुसरा [ ७,२,५ ]

**शकुनि**–क्रथकुलांतील दशरथाचा पुत्र. याचा पुत्र करम्भि [ ९,२४,५ ]

( २ ) दनुपुत्र एक दानव. याचा पुत्र वृकासुर [ १०,८८,१४ ]

( ३ ) गांधारदेशाधिपति सुबलाचा पुत्र दुर्योधनादिकांचा मामा. हा कपटद्यूतांत प्रवीण होता. यानें कपटीफांसे तयार करून दुर्योधनास दिले व द्यूतांत त्याजकडून पाण्डवांची संपत्ति हरण करून त्यांस वनवासास पाठविलें. हा भारतीयुद्धांत सहदेवाच्या हातून मरण पावला. ( भा.शल्य. )

**शकुन्त**–विश्वामित्राचा एक पुत्र.

**शकुन्तला**–विश्वामित्र व मेनका यांची कन्या. मेनकेनें त्याग केल्यावर शकुन्तानीं ( पक्ष्यांनी ) हिचें रक्षण केलें म्हणून हिला शकुन्तला नांव पडलें. हिचें संगोपन कण्वऋषीनें केलें; व दुष्यंत राजानें प्रेमबद्ध होऊन गंधर्वविधीनें हिच्याशीं विवाह केला होता. हिचा पुत्र भरत, तो पुढें सार्वभौमराजा झाला. [ ९,२०,१३]

**शक्ति**-वसिष्ठाचा ज्येष्ठपुत्र. हा मंत्रद्रष्टा असे. कल्माषपाद राजानें वसिष्ठाचे शंभर पुत्र मारिले, त्यांत हा मृत झाला. त्यावेळीं याची पत्नी अदृश्यंती गर्भवती होती तिचा पुत्र पराशर [ ४,१,४१ ]
( २ ) अंगिराकुलांतील ऋषि. हा चालु मन्वंतरांतील सत्ताविसावा व्यास.

**शक्र**-द्वादशादित्यांपैकीं अकरावा आदित्य. यासच इंद्र नांव आहे. याची पत्नी असुरकन्या पौलोमी; व पुत्र जयंत, ऋषभ आणि मीढुष [ ६,६,३९ व ६,१८,७ ]
( २ ) इंद्रास एक नांव [ १०,२७,१ ]

**शक्रजित्**-इंद्रजिताचें नांव.
( २ ) शोणाश्व नामक राजर्षीचा पुत्र.

**शक्रदेव**--कलिंग देशाधिपति भानुमंत राजाचा पुत्र. यास भारतीयुद्धांत भीमानें मारिलें ( भा. भीष्म. )

**शक्रप्रस्थ**-इंद्रप्रस्थाचें नांव.

**शंकर**-कल्याण करणारा म्हणून शिवास नांव [ ४,४,१ ] शंकर व श्रीकृष्ण युद्ध [ १०,६३,७ ]

**शंकु**-यदुवंशीय उग्रसेनाच्या नऊ पुत्रांपैकीं पांचवा [ ९,२४,२४ ]
२ कृष्णपत्नी सत्येचा पुत्र[१०,६१,१३]
( ३ ) एक यादव.

**शंकुकर्ण**-शंकराचा एक पार्षद.
२ ) काशींतील एक स्थान.
( ३ ) लंकेंतील अशोकवनिकेचा रक्षक.

**शंकुकर्णेश्वर**-भारतवर्षीय एक तीर्थ

**शंकुशिरा**-कश्यप व दनु यांचा पुत्र. हा इंद्रवृत्र युद्धांत होता [ ६,६,३० व ६,१०,१९ ]

**शंख**-भगवंताच्या हातांतील एक वाद्य. [ ३,२८,२७ ] हा विष्णूनें शंखासुरास मारून आपल्या हातांत घेतला.
( २ ) मेरूच्या कर्णिका पर्वतांतील एक. [ ५,१६.२६ ]
( ३ ) पातालांत राहणारे नाग विशेष [ ५,२४,३१
( ४ ) उत्तममन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.
( ५ ) लिखित ऋषीचा भाऊ.
( ६ ) कुबेराच्या नवनिधींतील एक.
(७) मत्स्यदेशाधिपति विराटाचा ज्येष्ठ पुत्र याम द्रोणाचार्यांनें मारिलें.

**शंखचूड** पातालांतील नाग [५,२४,३१
( २ ) कुबराचा अनुचर. हा शापानें राक्षस झाला होता, कृष्णानें यास मारिलें [ १०, ३४, २५ ]
( ३ ) रामसेनेंतील एक वानर (वा.रा.)
( ४ ) विप्रचित्ति दानवाचा पौत्र व दम्भासुराचा पुत्र. यानें पुष्करतीर्थी व बदरिकाश्रमीं तप केलें. धर्मध्वज व माधवी यांची कन्या तुलसी, ही याची पत्नी. यानें सर्व देवांस जिंकिलें होतें. परंतु तुलसीच्या पातिव्रत्यप्रभावामुळें यास कोणी जिंकू शकत नव्हतें. विष्णूनें कपटानें तिच्या पातिव्रत्याचा भंग केल्यावर हा मरण पावला.

**शंखपद**-दुसऱ्या स्वारोचिष मनूचा पुत्र. यास स्वारोचिष मनूनें विद्या शिकविली होती. पृथ्वीवर मनुष्यजातीय असलेल्या चार दिक्पालांपैकीं एक दक्षिण दिक्पाल.

**शंखपाल**-माघ्रमासांत विवस्वान सूर्याबरोबर फिरणारा कद्रूपुत्र नाग[१२,११,३८]

**शंखमेखल**–एक ब्रह्मर्षि.

**शंखलिखित**–दोन भाऊ. हे बाहुदानदीवर आश्रम करून रहात होते. एकदां लिखितानें शंखाच्या बागेंतील फळें तोडिलीं असतां, तुला चौर्यकर्माचा दोष लागला, असें शंख म्हणाला. ह्या पातकाच्या परिहारार्थ लिखित सुद्युम्न राजाकडे गेला व मला शिक्षा करा, असें म्हणाला. लिखितानें अपराध कबूल केल्यामुळें राजा शिक्षा करण्यास तयार होईना. पण लिखिताच्या अत्याग्रहावरून राजानें चौर्यकर्माचें शासन म्हणून त्याचे हात तोडिले. नंतर हा शंखाकडे आला, व आपण घेतलेल्या प्रायश्चित्ताचें वृत्त त्यानें त्यास सांगितलें. पापाचें प्रायश्चित भोगलें गेलें, असें पाहून शंखानें त्याला जवळील नदींत स्नान करण्यास सांगितलें. स्नान करतांच लिखिताचे हात पूर्ववत झाले ( भा. शांति. )

**शंखिनीतीर्थ**–एक तीर्थ.

**शंखोद्धार**-भारतवर्षीय एक क्षेत्र व द्वारकेजवळचें तीर्थ. यादव संहारापूर्वी यादवांचीं बायकामुलें येथें पाठविलीं होतीं [ ११, ३०, ६ ]

**शची**-पुरंदर इंद्राची पत्नी.

**शठ**–दनुपुत्र एक दानव.

( २ ) रावणाचा अनुचर एक राक्षस.

( ३ ) एक यादव ( जै अश्व. )

**शण्डामर्क**–उशना ऋषीचे पुत्र. हे हिरण्यकशिपूचे पुरोहित; प्रल्हादादिकांस शिकवीत असत [ ७, ५, १ ]

**शण्डिल**-कश्यप कुलांतील एक ऋषि.

**शतकुंभा**-भारतवर्षीय एक नदी.

**शतकेसर**–शाकद्वीपांतील पर्वत[५,२०२६]

**शतक्रतु**-इंद्राचे नांव.

**शतगामि**–जटायूचा एक पुत्र.

**शतघ्नी**–(तोफ) अस्त्र विशेष[१०,५९,२६]

**शतचंद्र**-रात्रियुद्धांत भीमानें मारिलेला राजा

**शतजित्**–ऋषभदेववंशीय विरजा व विषूची यांच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ[५,१५,१५

( २ ) यदुवंशीय सहस्रजिताचा पुत्र. यास महाहय, वेणुहय व हैहय, असे तीन पुत्र होते [ ९, २३, २१ ]

( ३ ) जाम्बवतीचा पुत्र [१०,६१,११]

( ४ ) आश्विनांत त्वष्टा सूर्याबरोबर असणारा यक्ष [ १२, ११, ४३ ]

**शतज्योति**–चंद्रास संज्ञा.

**शततारका**–एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक.

**शतद्युम्न**–विदेहवंशीय भानुमानाचा पुत्र. याचा पुत्र शुचि [ ९,२३,२१ ]

( २ ) चक्षुमनूच्या पुत्रांतील एक.

( ३ ) एक राजर्षि. हा दानशूर होता. मौद्गल्य ऋषीच्या प्रसादानें हा स्वर्गास गेला. ( भा. शांति. अनु. )

**शतद्रु**-हैमवती नदीस मिळालेलें नांव. ( वसिष्ठ शब्द पहा. ) [ ५,१९,१८] पंजाबांतील सतलज नदी.

**शतद्रुति**-समुद्राची कन्या व प्राचीनबर्हीची पत्नी. ही अतिशय सुंदर होती. हिला सवर्णा असें नांव होतें [४,२४,११]

**शतधनु**–एक भगवद्भक्त राजर्षि [२,७,४३]

( २ ) यदुवंशीय हृदीकाच्या पांच पुत्रांतील एक [ ९,२४,२७ ] यानें

अक्रूरादिकांच्या सांगण्यावरून सत्राजिताचा वध केला, व मणि अक्रूराजवळ ठेऊन कृष्णभयानें पळत असतां कृष्णानें याचा नाश केला [ १०,५७,५-२० ] यास शतधन्वा असें ह्मटलें आहे.

**शतधन्वा**-मौर्यवंशीय सोमशर्म्याचा पुत्र. याचा पुत्र बृहद्रथ [ १२,१,१५ ]

( २ ) सुमतीचा पुत्र.(हंसध्वज श.पहा)

**शतधृति**-ब्रह्मदेवास एक नांव.

**शतपर्वा**-शुक्राचार्यांची स्त्री.

**शतबल**-रामसेनेंतील एक वानराधिपति.

**शतबला**-भारतवर्षीय एक नदी.

**शतबली**-शतबल वानराचें नांव.

**शतबाहु**-हिरण्यकशिपूचा अनुयायी एक असुर [ ७,२,४ ]

**शतभिषा**-शततारका नक्षत्र [ ५,२३,६ ]

**शतमुख**-एक असुर.

**शतयात**-भारतवर्षीय एक नदी.

**शतयूप**-केकयदेशाचा एक राजा. हा वानप्रस्थाश्रम घेऊन हिमालयावर रहात असे, धृतराष्ट्र गांधारीसह याच वेळीं या पर्वतावर गेला होता(भा.आ.)

**शतरथ**-सूर्यवंशीय दशरथपुत्र ऐडविडाचें नामांतर.

**शतरुद्रा**-भारतवर्षीय एक नदी.

**शतरूप**-स्वायंभुव मनूस संज्ञा.

**शतरूपा**-स्वायंभुव मनूची पत्नी हीं ब्रह्मदेवाच्या शरीरापासून उत्पन्न झाली. हिला सरस्वति म्हणतात[३,१२,५२]

**शतर्चन**-एक ऋषि.

**शतशीर्षा**-वासुकी नागाची पत्नी.

**शतवल्श**-कुमुद पर्वतावरील एक वटवृक्ष हा कल्पवृक्षासारखा आहे[५,१६,२४]

**शतशृंग**-शाल्मली द्वीपांतील एक पर्वत [ ५,२०,१० ]

( २ ) हिमालयाचें एक शिखर. येथें पाण्डवांचें जन्म झालें.

**शतह्रद**-दनुपुत्र एक दानव.

**शतह्रदा**-जवराक्षसाची पत्नी. विराधमाता

**शताक्षी**-दुर्गेचें नांव.

**शताजित्**-यदुवंशीय सात्वतपुत्र भजमान व बाहुका यांच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ [ ९,२४,८ ]

**शतानन्द**-गौतम व अहल्या यांचा पुत्र. विदेहवंशाचा पुरोहित [९,२१,३४]

( २ ) विंध्याश्व नामक पांचालाची कन्या अहल्या व गौतम ऋषि यांचा पुत्र. चिरकारीचा भाऊ. याचा पुत्र सत्यधृति. हा कृपाचार्यांचा मूळ पुरुष.

( ३ ) सावर्णिमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक

**शतानीक**-नकुल व द्रौपदीचा पुत्र. [ ९,२२,२९ ]

( २ ) पाण्डवकुलांतील जनमेजय व वपुष्टमा याचा एक पुत्र. याचा पुत्र सहस्रानीक [ ९,२४,३९ ]

( ३ ) पाण्डव कुलांतील सुदास राजाचा पुत्र. याचा पुत्र दुर्दमन[९,२२,४३]

( ४ ) द्रोणाचार्याकडून मारला गेलेला विराटाचा एक भाऊ ( भा. द्रोण. )

**शताह्वा**-भारतवर्षीय एक नदी.

**शत्रुघाती**-इक्ष्वाकुवंशीय श्रुतसेनाचें नांव.

**शत्रुघ्न**-इक्ष्वाकुवंशीय दशरथ व सुमित्रा यांचा पुत्र, याची पत्नी श्रुतकीर्ति व पुत्र सुबाहु आणि श्रुतसेन. यानें लवणासुराचा नाश करून शूरसेन देश व मथुरा स्थापिली [९,१०,३] व ९,११,१३-१४]

**शत्रुघ्न**-यदुवंशीय श्वफल्क व गांदिनी यांचा एक पुत्र [ ९,२४,१७ ]

( ३ ) अक्रूराचा एक पुत्र.

( ४ ) लंकेतील रावणपक्षीय एक राक्षस.

( ५ ) सूर्यवंशीय एक प्राचीन राजा.

**शत्रुजित्**-सोमवंशीय कुवलयाश्वाचें नामांतर [ ९,१७,६ ]

( २ ) इक्ष्वाकुवंशीय ध्रुवसन्धि व लीलावती यांचा पुत्र.

( ३ ) शोणाश्व राजर्षीचा एक पुत्र.

**शत्रुंजय**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( २ ) अर्जुनानें मारिलेला कर्णपुत्र

( ३ ) अश्वत्थाम्यानें मारिलेला द्रुपदपुत्र.

( ४ ) अभिमन्यूनें मारिलेला राजपुत्र.

( ५ ) रामाचा आरोहण करण्याचा हत्ती. याच नावाचा रामसेनेंत आणखीही एक हत्ती होता (वा. रा.)

**शत्रुत ( ता पन**-दनुपुत्र एक दानव.

**शत्रुसह**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**शत्रुसूदन**-दाशरथि रामाच्या सुज्ञ नामक प्रधानाचा एक पुत्र.

**शनि-शनैश्चर**-मंगळाच्या वर दोन लक्ष योजनें व सूर्यमालेतील गुरूच्या पलीकडे असलेला ग्रह. हा मंदगति असून अशुभ मानिला आहे [५,२२ १६] हा पहिल्या प्रतीच्या तारेहून किंचित मोठा व रंगानें पिंगट काळसर आहे. शनीला सूर्याभोंवतीं आपल्या कक्षेत प्रदक्षिणा करण्यास सुमारें साडे एकूणतीस वर्षें लागतात. म्हणजे प्रत्येक राशींत हा सुमारें अडीच वर्षें असतो हा वक्री झाला असतां एकाच ठिकाणीं फार काळ असतो. यास दैनंदिन प्रदक्षिणेस दहा तास व चौदा मिनिटें लागतात. हा अगदीं चापट आहे. यास आठ उपग्रह आहेत. दुर्बिणींतून याचें चित्र विलक्षण दिसतें.

( २ ) विवस्वान् आदित्य व छाया यांचा पुत्र [ ६,६,४१ ]

**शन्तनु**-सोमवंशीय अजमीढ कुलांतील प्रतीपाच्या तीन पुत्रांतील मध्यम. हा पूर्वजन्मींचा महाभिष नामक राजा होता. हा ज्याला स्पर्श करी तो पुन्हा सतेज होत असे. याचा ज्येष्ठ भ्राता देवापि कुष्ठी असल्यामुळें पित्याच्या मागून हा राज्यावर बसला हा राज्य करीत असतां एकदां बारा वर्षें अवर्षण पडलें. त्यावेळीं ऋषींनीं सागितलें, ज्येष्ठ बंधूचें राज्य त्यास परत दे, म्हणजे पाऊस पडेल. परंतु यानें ब्राह्मण पाठवून देवापीस पाखण्डी मताचा आश्रय करावयास लाविल्यावर याच्या राज्यांत पाऊस पडला. याला आठ पुत्र झाले. त्यापैकीं सात पुत्र उपजतांच गंगेनें पाण्यांत सोडले व आठवा पुत्र भीष्म याच्या विनंतीवरून याचे स्वाधीन केला व गंगा गुप्त झाली. यास गंगा व सत्यवती अशा दोन स्त्रिया होत्या, त्यापैकीं सत्यवतीपासून चित्रांगद व विचित्रवीर्य असे दोन पुत्र झाले [ ९,२२,१२ ते २१ ]

**शबरी**-एक भिल्लीण. पंपासरावरोवरांवर राहणाऱ्या मतंग ऋषीची दासी. ही रामभक्तीनें मुक्त झाली (वा. रा.)

**शबलाश**-एक ऋषि.

**शबलाश्व**–प्राचेतस दक्ष व असिक्नी यांस हर्यश्व संज्ञक पुत्रानंतर झालेले पुत्र. यांस नारदानें उपदेश करून विरक्त केलें होतें [ ६,५,२४ ]

**शम**–जरासंधकुलांतील धर्मसूत्राचा पुत्र. याचा पुत्र द्युमत्सेन [९,२२,४८]

( २ ) स्वायंभुव मन्वतरांतील धर्मऋषीच्या एका पुत्राचें नांव.

**शमठ**-गयशिर पर्वतावर ब्रह्मसरसरोवराजवळ राहणारा ऋषि. यानें लोमश ऋषींसह पांडव तेथें आले असतां, त्यांस गयराजाचा वृत्तांत सांगितला.

**शमन**–यमधर्मास नांव.

**शमी**-सोमवंशीय अनुकुलांतील उशीनराचा पुत्र [ ९, २३, ३ ]

( २ ) कुरुकुलांतील शोणाश्वाचा पुत्र.

**शमीक**–आंगिरस कुलांतील ऋषि. याची स्त्री गौ व पुत्र शृंगी. परीक्षित राजा अरण्यांत मृगयेस गेला असतां तृषाकांत होत्साता जलपानाच्या इच्छेनें याच्या आश्रमांत आला, परंतु हा ध्यानस्थ असल्यामुळें याजकडून राजाचें स्वागत झालें नाहीं. राजास या गोष्टीचा राग आला, व एक मृत सर्प याच्या गळ्यांत अडकवून राजा निघून गेला आपल्या पित्याचा राजानें केलेला हा अपमान याच्या पुत्रास सहन झाला नाहीं. त्यानें लगेच राजास–' सातव्या दिवशीं मरण पावशील '–असा शाप दिला. हें वर्तमान यास समजतांच यानें पुत्राच्या कृतीचा निषेध करून राजास हें वृत्त कळविलें. [१,१८,३९ ]

**शमीक**-यदुवंशीय सात्वत कुलांतील शूर व मारिषा यांचा आठवा पुत्र. याची पत्नी सुदामिनी व पुत्र सुमित्र आणि अर्जुनपाल [ ९, २४, २९–४४ ]

**शंपाक** हस्तिनापुरांत राहणारा ब्राह्मण. हा हर्षशोकातीत होता. भीष्माची याच्यावर भक्ति असे (भा. शांति.)

**शंबर**–तिमिध्वज राजास नामांतर.

**शंबरासुर**–दनुपुत्र एक दानव [ ६,६,३० ] हा हिरण्यकशिपूचा व वृत्रासुराचा अनुयायी होता [ ६,१०,१९ व ७,२,१८ ] यास प्रद्युम्नानें मारिलें [१०,५५,२४] ( प्रद्युम्न शब्द पहा)

**शंबसादन**-केसरीवानरानें मारिलेला असुर.

**शम्भल**–एक गांव, येथें कल्कि अवतार होणार [ १२,२,१८ ]

**शम्भु**-ब्रह्मसावर्णिमन्वंतरांतील इंद्र [ ८,१३,१२ ]

( २ ) अंबरीषाचा कनिष्ठ पुत्र [९,६,१]

( ३ ) शुक्राचार्य व पीवरीचा पुत्र.

( ४ ) कुशध्वजराजास मारणारा असुर ( वेदवती शब्द पहा. )

**शम्याप्रास**—सरस्वतीचे तीरावरील एक आश्रम [ १,७,२ ]

**शंयु**–बृहस्पति व तारा यांच्या सहा पुत्रांतील प्रमुख व एक अग्नि. यास सत्या नामक पत्नी पासून भरत व भरद्वाज हे दोन पुत्र आणि तीन कन्या झाल्या होत्या.

**शरगुल्म**–रामसेनेंतील एक वानर.

**शरजन्मा** कार्तिकेयाचें नांव.

**शरदण्डा**-कुरुजांगल देशांतील एक नदी.

**शरद्वान्**—आंगिराकुलांतील एक ऋषि [ १,१९,९ ]

(२) गौतमकुलांतील सत्य धृतीचा पुत्र. हा धनुर्वेद प्रवीण होता म्हणून यास हें नांव प्राप्त झालें. याचा पुत्र कृपाचार्य. याच्या अन्य वंशजास शारद्वत आणि गौतम अशी साधारण नांवें होतीं, उर्वशी दर्शनानें याचें वीर्य एका दर्भाच्या बेटावर पतन पावलें, त्यापासून जें जुळें झालें, तें कृपाचार्य व कृपी [९,२१,३५-३६]

**शरभ**-रामसेनेंतील एक प्रख्यात वानर.

(२) साल्वेयपर्वतावर राहणारा वानर.

(३) दनुपुत्र एक दानव.

(४) रात्रियुद्धांत भीमानें मारिलेला शकुनीचा एक भाऊ.

(५) शिशुपालाचा एक पुत्र.

(६) एक राजर्षि.

(७) अथर्वण वेदोपनिषत्.

**शरभंग**-दण्डकारण्यांत राहणारा गौतमकुलांतील एक ऋषि. हा महातपस्वी होता. यास स्वर्गी नेण्याकरितां इंद्र आला असतां, दंण्डकारण्यांत आलेल्या रामाचें दर्शन घेतल्यावांचून आपण स्वर्गी येत नाहीं, असें सांगून यानें इंद्रास परत पाठविलें. आणि श्रीरामाचें दर्शन झाल्यावर अग्नींत प्रवेश करून दिव्यलोकीं गेला (वा.रा.)

**शरयू**- वीरनामक अग्नीची स्त्री.

(२) आयोध्येजवळची नदी.

**शरवण**-शंकर पार्वतीचें क्रीडास्थान.

**शरवा**-एक नदी. उगम-महेंद्रपर्वत.

**शरारि**-मारुतीबरोबर सीताशोधासाठीं गेलेल्या वानरांपैकीं एक.

**शरावती**-भारतवर्षीय एक नदी.

**शरु**-एक गंधर्व.

**शर्कराक्षी**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**शर्करावर्ता**-भारतवर्षीय नदी [५,१९,१८]

**शर्मक**-इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील एक देश व त्याचा राजा.

**शर्मिष्ठा**-दैत्याधिपति वृषपर्वा दानवाची कन्या व ययातिराजाची पत्नी. हिनें आपल्या सर्व कुलाच्या हिताकरितां अपमान सहन करून देवयानीचें दासीपण स्वीकारिलें होतें [६,६,३२] [९,१८,२९] (देवयानी शब्द पहा)

**शर्याति**-वैवस्वत मनूचा एक पुत्र. हा शूर असून विद्वान होता. यानें अंगिराऋषीच्या सत्रांत दुसऱ्या दिवसाचें कर्म स्वतः केलें. यास उत्तानबर्हि, आनर्त, भूरिषेण आणि हैहय व तालजंघ, असें पांच पुत्र आणि सुकन्या नामक कन्या होती. च्यवनभार्गवाची पत्नी. [९,३,१ते९]

(२) अक्रूराचा एक पुत्र.

**शर्व**-महादेवास एक नांव

**शर्वरी**-दोषनामक वसूचीपत्नी [६,६,१४]

**शल**-सोमवंशीय जन्हुकुलांतील सोमदत्ताचा तिसरा पुत्र. हा भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता [९,२२,१९]

(२) कंससभेंतील एक मल्ल. यास कृष्णानें मारिलें [१०,४४,२७]

(३) सुयज्ञ प्रधानाचा एक पुत्र.

(४) इक्ष्वाकुवंशीय परीक्षितपुत्र, एक प्राचीन राजा. आयुनामक मण्डूकाधिपतीची कन्या सुशोभना ती याची माता. हा एकदां मृगयेकरितां अरण्यांत गेला असतां याच्या रथाचे

अश्व दमल्यामुळें चांगले चालतना. म्हणून हा आपल्या सारथ्यास दोष देऊं लागला. तेव्हां सारथि म्हणाला, हे अश्व दमले आहेत. कधीं श्रम न पावणारे व सदोदित वायूप्रमाणें चालणारे हे वामदेवाचे अश्व नव्हत. हें ऐकून राजानें त्या अश्वांची माहिती विचारली व सारथ्यास वामदेवाच्या आश्रमांत रथ नेण्यास सांगितलें. आश्रमांत गेल्यावर यानें वामदेवास नमस्कार केला, व आगमनाचें कारण सांगून त्यांचे अश्व मागितले, एक महिन्याच्या आंत हे अश्व परत आणून दे, असें सांगून यास त्यानें अश्व दिले. परंतु कराराप्रमाणें यानें अश्व परत केले नाहीं, तेव्हां ऋषीनें आपला आत्रेय नामक शिष्य अश्व आणण्यास पाठविला. 'ब्राह्मणांना असे अश्व काय करावयाचे ?' असें सांगून त्यास यानें परत पाठविलें. तेव्हां वामदेव स्वतः राजाकडे आला, परंतु अश्व न देतां, चार बैल किंवा गर्दभ घेऊन जा, असें यानें त्यास सांगितले. राजा वचनभ्रष्ट झालेला पाहून वामदेवास क्रोध आला, तथापि त्यानें यास उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या; परंतु हा ऐकेना. तेव्हां त्यानें चार राक्षस उत्पन्न करून याजवर सोडले व आपण आश्रमांत निघून गेला. त्या राक्षसांनीं राजास बांधिलें व अश्व देतोस कीं नाहीं, म्हणून विचारलें. परंतु हा लोभिष्ट मोठ्यानें ओरडून म्हणाला, 'हे इक्ष्वाकुकुलोत्पन्न हो, कुलाचा नाश झाला तरी हरकत नाहीं, परंतु अश्व देऊं नका.' इतकें बोलतांच राक्षसांनीं यास ठार मारिलें व ते गुप्त झाले. पुढें याच भाऊ दल राज्यावर बसला, पण त्यानेंहि अश्व परत केले नाहीत, म्हणून पुन्हां वामदेव अश्व मागण्यास आला. त्यावेळीं दल एक बाण घेऊन वामदेवास मारण्यास प्रवृत्त झाला. हें पाहून 'या बाणानें तुझाच पुत्र श्येनजित् नष्ट होवो' असें वामदेवानें म्हटलें. त्याबरोबर त्याचा पुत्र नाश पावला. परंतु राजा हट्ट सोडीना त्यानें दुसरा बाण हातांत घेतला. तेव्हां वामदेवानें राजाचें शरीरच स्तंभित केलें. हा एकंदर प्रकार पाहून दलाची पत्नी वामदेवास शरण आली, व त्याचे अश्व त्याच्या स्वाधीन केले तेव्हां वामदेवानें प्रसन्न होऊन श्येनजितास जिवंत केलें व दलास पूर्ववत करून अश्वासह स्वाश्रमीं गेला (भा. वन.)

**शरभ**–( टोळ ) तार्क्ष्य व यामिनी यांचे पुत्र [ ६,६,२१ ]

( २ ) कर्णानें मारिलेला पाण्डवपक्षीय एक राजा ( भा. कर्ण. )

**शल्य**–मद्रदेशाचा राजा. माद्रीचा भाऊ व पाण्डवाचा मामा. हा भारतीयुद्धांत पाण्डवांकडे येण्यास निघाला असत दुर्योधनानें मार्गांत याची अति उत्तम व्यवस्था ठेऊन आपणाकडे येण्याचें वचन घेतलें. तेव्हां झालेली हकि-

गत युधिष्ठिरास सांगून व ' जय-प्राप्त होवो ' असा त्यास आशिर्वाद देऊन हा कौरवांकडे आला; परंतु याचा ओढा पाण्डवांकडे होता. युद्धाच्या सतराव्या दिवशीं यानें कर्णाचें सारथ्य केलें; पण तें करीत असतां, हा त्याचा तेजोभंग करीत असे. कर्ण मृत झाल्यावर अठराव्या दिवशीं अश्वत्थाम्याचे सांगण्यावरून दुर्योधनानें यास सेनापतित्व दिलें. पण त्याचदिवशीं दुपारीं हा युधिष्ठिराचे हातून मृत्यु पावला याला रुक्मरथादि शंभर पुत्र होते, ते सर्व अभिमन्यूच्या हातून मरण पावले. [ १०,८३,२४ ] ( भा. शल्य. )

**शल्यकर्त** ( र्ष ) न-शिलानदीच्या तीरावरील एक नगर. (वा. रा. अयो.)

**शशबिंदु**-सहस्रार्जुनाच्या कुळांतील चित्ररथाचा पुत्र. याचा पुत्र महाभोज [ ९,२३,३१ ] यास एकंदर दहा हजार पुत्र होते ( भा. शांति. )

( २ ) एक राजर्षि ( भा. द्रोण. )

**शशलोमा**-एक राजर्षि ( भा. आश्रम. )

**शशाद**-सूर्यवंशीय इक्ष्वाकुच्या शत पुत्रांतील ज्येष्ठ. यास विकुक्षि असें नांव होतें. एकदां इक्ष्वाकूनें यास अष्टका श्राद्धाकरितां पशु घेऊन ये, म्हणून सांगितलें असतां यानें अरण्यांत जाऊन अनेक पशु मारिले, पण स्वतः थकून गेल्यामुळें त्यांतील एक ससा भाजून खाल्ला व शेष पशु पित्यास आणून दिले परंतु नैवेद्यापूर्वी ससा खाल्यामुळें मांस उच्छिष्ट झालें असें वसिष्ठानें इक्ष्वाकूस सांगितलें. त्यानें यास अरण्यांत घालवून दिलें. पुढें पिता मृत झाल्यावर हा राज्यावर बसला, पण यानें ससा खाल्यामुळें यास शशाद असें नांव मिळालें. याचा पुत्र पुरंजय [ ९, ६, ४ ते १२ ]

**शशिकदेश**-भारतवर्षीय एक देश.

**शशिकला**-काशीराजा सुबाहूची कन्या व सूर्यवंशीय सुदर्शनाची पत्नी.

**शंशपि**-अंगिराकुळांतील एक ऋषि.

## शा

**शाकटाक्ष**-भृगु कुळांतील एक ऋषि.

**शाकटायन**-अंगिरा कुळांतील एक ऋषि.

**शाकटायनि**-भृगु कुळांतील एक ऋषि.

**शाकद्वीप**-पृथ्वीच्या सप्त महाद्वीपांतील सहावें. हें क्षीरसमुद्राबाहेर वलयाकार असून याची रुंदी बत्तीस लक्ष योजनें आहे व तितक्याच रुंदीच्या दधिमण्डोदाचें यास वेष्टन आहे. प्रियव्रत पुत्र मेधातिथि येथें अधिपति आहे. यानें याचे सात भाग करून ते आपल्या सात पुत्रांस दिले. या द्वीपांत ईशान उरुशृंग, बलभद्र, शतकेसर, सहस्रस्रोत, देवपाल आणि महानस, हे सात पर्वत व अनघा, आयुर्दा, उभयस्पृष्टी, अपराजिता, पंचपदी, सहस्रस्रुती आणि निजधृती, अशा सात नद्या आहेत. या द्वीपांत शाक नांवाचा एक मोठा वृक्ष असल्यामुळें या द्वीपास शाकद्वीप असें नांव मिळालें. यांतील ऋतव्रत, सत्यव्रत, दानव्रत आणि अनुव्रत, या चार

नांवाचे पुरुष वायुरूप देवतेची उपासना करितात [ ५,२०,२४ ते २८ ]

**शाकधि**-वसिष्ठ कुळांतील एक ऋषि.

**शाकंभरि**-दुर्गेचें एक नांव.

**शाकल**-एक ब्रह्मर्षि.

( २ ) एक देश. हा इंद्रप्रस्थाच्या उत्तरेस असून पाण्डवांच्या वेळीं येथें प्रतिविंध्य राजा होता ( भा. सभा.)

( ३ ) मद्रदेशाची राजधानी व शल्याची नगरी ( भा. स. भा.)

**शाकलायनि**-अत्रिकुलांतील एक ऋषि.

**शाकल्य**-सौभरि ऋषीचा पुत्र. यानें आपली संहिता पांच शिष्यांस शिकविली [ १२, ६, ५७ ]

( २ ) एक ब्रह्मर्षि. यानें ९०० शें वर्षें शंकराची उपासना केली होती. हा मोठा ग्रंथकार व सूत्रकार होता. ज्ञानवल्क्याशीं याचा मोठा वाद झाला त्या वादांत याज्ञवल्क्याच्या कोपानें हा दग्ध झाला ( भा. अनु. )

(३) पाणिनी पूर्वीचा एक व्याकरणकार.

**शाकायन**-वासिष्ठ कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**शाकाहार्य**-,, ,,

**शाकुनेय**-शकुनि नामक असुराचा अथवा दुर्योधनमातुल शकुनीचा पुत्र.

**शाकुंतलेय**-शकुन्तलापुत्र भरतास नांव.

**शाक्य**-इक्ष्वाकुवंशीय संजय राजाचा पुत्र. याचा पुत्र शुद्धोद [ ९, १२, १४ ]

( २ ) गौतमबुद्धाचें नामांतर.

**शाक्रयाण**-कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**शाख**-अनलनामक वसूचा पुत्र.

**शाट्यायनि**-विश्वामित्र कुलांतील एक ऋषि

( २ ) यजुर्वेदोपनिषत.

**शाण्डिली**-वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

( २ ) शाण्डिल्यऋषीची कन्या. ही महातपस्विनी पूर्वसमुद्राच्या तीरीं ऋषभ पर्वतावर रहात असे. एकदां गालवऋषीला घेऊन गरुड येथें आला असतां हिनें त्यांचा उत्तम सत्कार केला. रात्रभर ते तेथें राहिले. सकाळीं पाहतात तों गरुडाचे सर्व पंख गळून गेलेले दृष्टीस पडले. गालवानें असें होण्याचें कारण काय म्हणून विचारलें. गरुड म्हणाला, ‘श्रीविष्णूच्या लोकांत न राहतां ही येथें व्यर्थ कां राहते?’ अशी कल्पना माझ्या मनांत आली होती, त्यामुळें कदाचित असें झालें असेल. या निंदेच्या पापक्षालनार्थ ते दोघे हिला शरण आले, त्याबरोबर गरुड पुन्हां सपक्ष झाला. केकय देशाची राजकन्या सुमना तिच्या बरोबर हिचा संवाद झाला होता. ( भा. उद्योग. अनु. )

**शाण्डिल्य**-कश्यप कुलांतील एक ऋषि. याच्या कुळांतील एक ऋषि वैश्वानर अग्नीच देवतात्व पावल्यामुळें त्यास वैश्वानर नांव मिळालें.

( २ ) एक ऋषि. भक्तिसूत्रांचा कर्ता.

( ३ ) अथर्वणवेदोपनिषत.

**शातकौम्भी**-मेरुपर्वतावर असलेली ब्रह्मदेवाची नगरी. ही दहा हजार योजनें समचतुष्कोण सुवर्णाची आहे [ ५,१६,२८ ]

**शान्त**-प्रियव्रतपुत्र इध्मजिव्हाच्या सात पुत्रांपैकीं चौथा, व याचा लक्षद्वीपांतील वर्ष [ ५,२०,३ ]

( २ )आपनामक वसूचा पुत्र.

**शांतनव**–भीष्माचें एक नांव.

**शान्तरय**–आयुपुत्र अनेनावंशांतील धर्मसारथीचा पुत्र [९,१७,१२]

**शान्ता**–दशरथाची कन्या व ऋष्य शृंगाची पत्नी. ही रोमपादानें दत्तक घेतली होती [ ९,२३,८ ]

**शान्ति**–कर्दमऋषींची कन्या व अथर्वाची पत्नी [ ३,२४,२४ ]

( २ ) तुषित देवांपैकीं एक [ ४,१,७ ]

( ३ ) दक्ष कन्या व धर्मपत्नी. हिचा पुत्र सुख [ ४,१,४९ ]

( ४ ) पुरुवंशीय अजमीढपुत्र नीलाचा पुत्र. याचा पुत्र सुशांति[९,२१,३०]

( ५ ) श्रीकृष्ण व कालिन्दी यांचा पुत्र [१०,६१,१४ ]

( ६ ) वारुणि अंगिरा ऋषींचा एक पुत्र

( ७ ) पूर्वेद्रांतील एक इंद्र.

**शान्तिदेवा**–वसुदेवाची पत्नी. हिचे पुत्र श्रम, प्रतिश्रुत इत्यादि [९,२४,२३]

**शाद्वलायन**–वसिष्ठ कुलांतील एक ऋषि.

**शाबस्त**-सूर्यवंशीय युवनाश्वाचा पुत्र. यानें शाबस्ती पुरी स्थापिली [९,६,२१]

**शाबस्ती**–शाबस्तानें स्थापिलेली नगरी. उत्तर कोसलची राजधानी. रामपुत्र लव येथें रहात असे. ( अयोध्येच्या उत्तरेस ५६ मैलावर साहेट माहेट. ) [ ९,६,२१ ]

**शामित्र**-एक यज्ञ [ १,१६,७ ]

**शारदा**–मायेचें नांव [ १०,२,१२ ]

( २ ) सरस्वती.

( ३ ) भारतवर्षीय एक तीर्थ.

**शारद्वत**-कृपाचार्य [ १,१३,३व१,१६,३]

( २ ) गौतमांगिरस कुलांतील एक कुल

**शारद्वतिक**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**शारद्वती**-कृपाचार्यांची भगिनी कृपी.

( २ ) एक अप्सरा.

**शारीरक**–यजुर्वेदोपनिषत्.

**शार्कराक्षि**–भृगुकुलांतील शर्कराक्षऋषीचा पुत्र.

**शार्ङ्ग**-कृष्णाचें धनुष्य [ १०,५०,२३ ]

**शार्दूली**–क्रोधेची एक कन्या.

**शार्याति**-शर्यातिकुलांतील हैहयांपैकीं एककुल.

**शाल**–वृकयादव व दुर्वाक्षी यांचा एक पुत्र. [ ९,२४,४३ ]

**शालकी**–एक यज्ञ.

**शालंकायन**-विश्वामित्रकुलांतील ऋषि व त्या नांवाचें एक कुल.

**शालंकायनि**–अंगिराकुलांतील ऋषि.

( २ ) विश्वामित्रकुलातील एक ऋषि.

**शालायनि**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**शालाहलेय**–कश्यपकुलांतील एक ऋषि.

**शालि**-अंगिराकुलांतील एक ऋषि.

**शालिग्राम**–भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**शालिवाहन**-शककर्ता एक राजा. सांप्रत याचें १८५१ वें वर्ष सुरू आहे.

**शालिशिरा**–मुनिपुत्र एक गंधर्व.

**शालिशूक**–मौर्यवंशीय संगताचा पुत्र. याचा पुत्र सोमशर्मा [ १२,१,१४ ]

**शालिसूर्य**–शालिहोत्राच्या आश्रमास नांव.

**शालिहोत्र**-कपिलऋषींचा पुत्र. अश्वशास्त्र प्रणेता. याचा ग्रंथ शाल्यहोत्र.

**शालूकिनी**–भारतवर्षीय एक नदी.

**शाल्मलिद्वीप**-पृथ्वीच्या सप्तमहाद्वीपांतील तिसरें. हें इक्षुरसोदाच्या बाहेर असून

चार लक्ष योजनें रुंद आहे, व यास तितक्याच प्रमाणाचें सुरासमुद्राचें वेष्टन आहे. प्रियव्रतपुत्र यज्ञबाहु येथील अधिपति. यानें या द्वीपाचे सात भाग करून ते आपल्या सात पुत्रांस दिले. यांत स्वरस, शतशृंग, वामदेव, कुंद, मुकुंद, पुष्पवर्ष, सहस्रश्रुति, हे सात महापर्वत व अनुमती, सिनीवाली, सरस्वती कुहू, रजनी नंदा आणि राका, अशा सात महानद्या आहेत या द्वीपांत शाल्मली ( सांवर ) वृक्ष फार मोठा आहे. यांत श्रुतधर, वीर्यधर, वसुंधर व इषंधर असे चार प्रकारचे लोक सोमात्मक भगवंताची उपासना करितात [ ५,२०,७ ते ११ ]

**शाल्मली**-केकय देशांतील एक नदी.

**शाल्यहोत्र**-अश्वशास्त्रावरील एक ग्रंथ.

**शाल्व**-शाल्वदेशीय एक राजा. हा रुक्मिणी विवाहाच्या वेळीं यादवांकडून पराभव पावला होता. यानें रुद्राला प्रसन्न करून त्याचेपासून मयासुर निर्मित एक विमान मिळविलें, आणि त्या विमानांतून हा द्वारकेवर चालून आला त्यावेळीं बलराम व कृष्ण दोघेही तेथें नव्हते. यावेळीं प्रद्युम्नादि यादववीरांशीं याचें २७ दिवस निकराचें युद्ध झालें. त्या युद्धांत यानें प्रद्युम्नास मूर्छित केलें होतें. इंद्रप्रस्थांत श्रीकृष्णाला हें वर्तमान समजतांच तो संग्रामस्थानीं आला. उभयतांचें निकराचें युद्ध झालें. कृष्णाला मोह पाडण्याकरितां यानें मायावी वसुदेव करून त्याचा कृष्णासमोर वध केला, परंतु ही सर्व राक्षसी माया आहे हें श्रीकृष्णानें जाणलें. शेवटीं कृष्णानें आपल्या गदेनें याच्या सौभ विमानाचा नाश करून यास ठार मारिलें [स्कं. १०,अ.७६-७७] याचा भाऊ अनुशाल्व.

( २ ) असुरांशानें जन्मलेला शाल्व देशाचा एक राजा. काशी राजाच्या तीन कन्यांच्या स्वयंवरांत याचें भीष्माशीं युद्ध होऊन त्यांत याचा पराभव झाला. यास अंबेनें मनानें वरिलें होतें, पण तिचा ह्यानें अंगिकार केला नाहीं. हा भारतीयुद्धांत दुर्योधनाकडून लढत असतां सात्यकीचे हातून मरण पावला ( भा. शल्य. )

( ३ ) हस्तिनापुराच्या पूर्वेस असलेल एक देश.

( ४ ) भीमानें मारिलेला एक राजा.

**शाल्वसेन**-भारतवर्षीय एक देश.

**शिखण्डिनी**-उत्तानपादवंशीय विजिताश्वाची पत्नी [ ४, २४. ३ ]

( २ ) द्रुपद राजाची कन्या. ही पूर्वजन्मांतील काशी राजाची कन्या अंबा होय. हीच पुढें पुरुषत्व पावून शिखंडी नांवानें प्रसिद्ध झाली.

**शिखण्डी**-द्रुपद राजाचा वरद पुत्र. द्रुपदराजा तप करीत असतां तुला कन्या होईल, व तीच पुरुषत्व पाऊन भीष्म वधास कारण होईल असा वर त्यास मिळाला होता. त्या वराप्रमाणें त्याला कन्या झाली, पण त्यानें पुत्र झाला असेंच प्रसिद्ध करून याचे सर्व

संस्कार पुत्राप्रमाणें केले, आणि पश्चिमदशार्ण देशाच्या हिरण्यवर्मा नामक राजाच्या मुलीशी याचा विवाह केला. पुढें त्या मुलीला याचें स्त्रीत्व कळून आलें, व तिनें ही गोष्ट आपल्या पित्यास कळविली. तेव्हां तो संतापला आणि आपल्या मुलीचें अशा प्रकारें जन्माचें नुकसान केलें याबद्दल तुझें पारिपत्य करणार, असा द्रुपदास निरोप पाठविला. हा कठीण प्रसंग पडतांच शिखंडी अरण्यांत गेला, व तेथें उग्र तपास आरंभ केला. त्या अरण्याचा स्वामी स्थूणाकर्ण नामक एक यक्ष होता. त्यानें याची हकीकत ऐकून यास आपलें पुरुषत्व दिलें व याचें स्त्रीत्व आपण घतलें; व कार्य होतांच परत येण्यास सांगितलें. नंतर हा नगरांत परत आला; व सर्व हकिगत आपल्या पित्यास सांगितली. पुढें हिरण्यवर्मा युद्धास आला असतां द्रुपदानें याच्या पुरुषत्वाची परीक्षा करून युद्धास सिद्ध व्हावें, असा निरोप पाठविला. तेव्हां हिरण्यवर्म्यानें स्त्रियांकडून याच्या पुरुषत्वाची परीक्षा करविली. त्यांत याचें पुरुषत्व आढळून आलें तेव्हां हिरण्यवर्मा लज्जीत होऊन त्यानें द्रुपदाची क्षमा मागितली. पुढें हा स्त्रीसह सुखानें उपभोग घेऊं लागला, व अल्प काळांतच यास क्षत्रदेव, ऋक्षदेव इत्यादि पुत्र झाले. नंतर हा स्थूणाकर्णाचें पुरुषत्व त्यास परत देण्यास अरण्यांत गेला. परंतु तिकडे असा प्रकार झाला कीं, एकदां कुबेर अकस्मात फिरत त्या ठिकाणीं आला. त्यावेळीं स्थूणाकर्ण स्त्रीच्या परिस्थितीत असल्यामुळें कुबेरासमोर गेला नाहीं. तेव्हां कुबेरानें त्याची हकीगत ऐकून घेऊन त्यास शाप दिला कीं, शिखंडीच्या आयुष्यापर्यंत तूं स्त्रीत्व स्थितींतच रहा. स्थूणाकर्णाला झालेला कुबेराचा हा शाप ऐकून आपणास मृत्युपर्यंत पुरुषत्व मिळाल्याबद्दल यास समाधान वाटलें आणि यानें पुरुषत्वाचा उपभोग घेतला. हा राजकार्य व युद्धकला यांत निपुण होता. तुंबरुगंधर्वानें दिलेले अश्व हा रथास जोडीत असे. भारतीयुद्धांत अर्जुनानें यास पुढें करून याच्या आडून भीष्मावर शरसंधान केलें होतें. युद्धसमाप्तिनंतर हा शिबिरांत निद्रिस्त असतां अश्वत्थाम्यानें यास मारिलें. शिखंडी मरण पावतांच स्थूणाकर्ण यक्ष पूर्ववत पुरुष झाला. ( भा. उद्योग. सौप्तिक. )

**शिखाग्रीवी**–अंगिरा कुलांतील एक ऋषि.

**शिखावर्ण**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**शिखावर्त**-एक गंधर्व.

**शिखिध्वज**–एक राजा. चूडालेचा पति. ( २ ) मयूरध्वजाचें नांव.

**शिखिवाहन**-कार्तिकेयाचें नांव.

**शित**—विश्वामित्राचा एक पुत्र.

**शितिकण्ठ**-नीलकण्ठ महादेवास नांव.

**शिनि**–सोमवंशीय दुष्यंतकुलांतील गर्गाचा पुत्र. याचा पुत्र गार्ग्य [९,२१,१९]

( २ ) यदुवंशीय सात्वतकुलांतील युधाजिताचा पुत्र. याचा पुत्र अनमित्र [ ९,२४,१२ ]

( ३ ) यदुवंशीय सात्वतकुलांतील अनमित्राचा पुत्र. याचा पुत्र सात्यक [ ९,२४,१३ ] हा मोठा शूर असे. वसुदेव देवकीच्या विवाहाचे वेळीं अनेक राजे विघ्न करण्यास आले असतां, त्यांचा यानें पराभव केला. व सोमदत्तास दयाळुपणानें सोडून दिलें. ( भा द्रोण. )

( ४ ) यदुवंशीय सात्वतकुलांतील शूर पुत्र भजमानाचा मुलगा. याचा पुत्र स्वयंभोज. [ ९,२४,२६ ]

**शिनी**-मेरूच्या कर्णिका पर्वतांतील एक पर्वत. [ ५,१६,२६]

**शिपिविष्ट**-विष्णूचें नांव [ ४,१३,३५ ]

( २ ) महादेवाचें नांव.

**शिप्रा**-एक नदी. उगम-पारियात्र पर्वत.

**शिबि**-चक्षु व नड्वलाचा पुत्र [४,१३,१६]

( २ ) सोमवंशीय अनुकुलांतील उशीनराच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. यास वृषादर्भ, सुवीर, मद्र, केकय व बृहद्र्भ असे पांच पुत्र होते. हा राजा मोठा उदार होता. एकदां ब्रह्मदेव याचें सत्व पाहण्याकरितां याजकडे ब्राह्मणरूपानें आला आणि पुत्राचें मांस भक्षणास मागितलें. याचकास विन्मुख जाऊं द्यावयाचें नाहीं, या नियमानुसार यानें आपल्या बृहद्र्भ पुत्राचा वध करून त्याचें मांस शिजविलें; पण ब्राह्मण कोठें दिसेना. तेव्हां मांसपात्र मस्तकावर घेऊन हा त्याच्या शोधार्थ बाहेर पडला. इतक्यांत आपल्या अश्वागार, कोशागार इत्यादिकांस आग लावून राजमंदिरास आग लावतांना त्या ब्राह्मणास राजानें पाहिलें. तथापि रागाच्या स्वाधीन न होतां हा शांतचित्तानें त्या ब्राह्मणास म्हणाला,-महाराज आपल्या आज्ञेप्रमाणें पुत्राचें मांस शिजवून आणलें आहे, याचा स्वीकार करावा. ब्राह्मण म्हणाला, तें मांस तूंच खा, मी खात नाहीं. ब्राह्मणाच्या इच्छेप्रमाणें हा स्वपुत्राचें मांस खाण्यास सिद्ध झाला. अशाप्रकारें याच्या सत्वाची पूर्ण कसोटी होतांच ब्रह्मदेव प्रगट झाले, आणि यास पूर्ण ऐश्वर्यासह याचा मृत पुत्र देऊन अनेक वर देते झाले (भा.वन)

( ३ ) हिरण्यकशिपूचा एक पुत्र.

( ४ ) प्रह्लादाचा एक पुत्र.

( ५ ) गोपति नामक राजाचा पिता.

( ६ ) भारतीयुद्धांतील पाण्डव पक्षीय राजा. यास द्रोणाचार्यांनीं मारिलें.

( ७ ) पूर्वद्रांतील एक इंद्र. याच्याच अंशानें अर्जुन जन्मला होता.

( ८ ) भोजनगरींतील उशीनरास माधवीपासून झालेला पुत्र. यास औशीनर असें नांव असून हा मोठा पराक्रमी होता. (गालवशब्द पहा.) (भा.सा.)

( ९ ) एक देश. हा पश्चिमदशार्ण देशाच्या पश्चिमेस असून पांडवांच्या वेळेस येथें सुरथ राजा होता. येथील राजास शैब्य असें म्हणतात.

**शिरीष**-अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**शिरीषी**–विश्वामित्राच्या पुत्रांतील एक.
**शिलायूप**- ,, ,,
**शिलार्दनि**–अत्रिकुलांतील एक ऋषि.
**शिलास्थलि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.
**शिलीन**–जित्वाऋषीचा पिता.
**शिव**-एकादशरुद्रांपैकीं एक [ २,२२,१२ ]
( २ ) इध्मजिव्हाच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ व याचा वर्ष [ ५, २०, ३ ]
( ३ ) प्लक्षद्वीपांतील एक वर्ष.
( ४ ) अष्टादश महापुराणांपैकीं एक. याची श्लोकसंख्या चोवीस हजार आहे [ १२, १३, ४ ]
( ५ ) अंगिरा कुलांतील एक ऋषि.
**शिवकर्ण**-वसिष्ठ कुलांतील एक ऋषि.
**शिवकारिणी**–अच्छोद क्षेत्रांतील सतीची विभूती.
**शिवकुण्ड**–भारतवर्षीय एक तीर्थ.
**शिवदूती**–पार्वतीची एक शक्ति.
**शिवधारा**–भारतवर्षीय एक तीर्थ.
**शिवमती**–अंगिराकुलांतील एक ऋषि.
**शिवलिंग**-भारतवर्षीय एक क्षेत्र.
**शिवलोक**–नित्यमुक्त शिव साकार रूपानें जेथें राहतो तो लोक.
**शिवस्कंद**–कलियुगांतील बहुसंज्ञक राजा पैकीं एक [ १२,१,२७ ]
**शिवस्वाति**- " " [ १२,१,२६ ]
**शिवा**–शिवाची शक्ति.
( २ ) अनल वसूची पत्नी.
( ३ ) भारतवर्षीय एक नदी.
**शिवोद्भेद**–भारतवर्षीय एक तीर्थ.
**शिशिर**-मेरूच्या कर्णिका पर्वतांतील एक शिखर [ ५,१६,२६ ]
( २ ) धरनामक वसूची पत्नी.
( ३ ) विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.
**शिशिरगिरि**-हिमालय पर्वतास नांव.
**शिशु**–कौशिक ऋषीचा एक शिष्य.
**शिशुनन्दि**–कलियुगांत किलकिला नगरींत झालेला एक राजा [ १२,१,३३ ]
**शिशुनाग**–कलियुगांतील शिशुनाग वंशांतील पहिला राजा [ १२,१,५ ]
( २ ) कलियुगांतील प्रद्योत कुलानंतर झालेला राजवंशीय या वंशांत दहा राजे झाले व त्यांनीं तीनशें साठ वर्षे राज्य केलें [ १२,१,७ ]
**शिशुपाल**–चेदि देशाचा राजा, दमघोष व वसुदेव भगिनी श्रुतश्रवा यांचा पुत्र. हा हिरण्याक्षाच्या अंशानें जन्मला होता. यास चैद्य असेंहि म्हणतात [ ९,२४,४० ] हा जन्मला तेव्हां यास चार हात व तीन डोळे होते. यानें जन्मताच गर्दभासारखा शब्द केला. हा अशुभ प्रकार पहातांच याचे आई-बाप याचा त्याग करण्यास सिद्ध झाले, इतक्यांत आकाश वाणीनें ' असें करूं नका हा मुलगा पराक्रमी होईल. व हा ज्याच्या माण्डीवर असतां याचे दोन हात व तृतीयनेत्र गळून पडेल तो यास शत्रु होईल' असें सांगितलें. याच्या वडिलानें अनेकांच्या मांडीवर यास ठेवून पाहिलें, परंतु श्रीकृष्णाच्या माण्डीवर ठेवतांच याचे दोन हात व तृतीय नेत्र गळून पडला. अर्थात् आकाशवाणी प्रमाणें याचा मृत्यु श्रीकृष्णाच्या हस्तें होणार असें समजून आलें. तेव्हां याची माता म्हणजे श्रीकृष्णाची आत्या, हिनें श्रीकृष्णाची

विनंती करून याचे शंभर अपराध सहन करावे अशी मागणी केली. ही विनंती कृष्णानें मान्य केली. हा श्रीकृष्णाचा नेहमीं द्वेष करीत असे व अनेक प्रकारें त्यास पीडा देत असे परंतु पितृभगिनीस दिलेल्या वचनानुसार श्रीकृष्ण याचे सर्व अपराध पोटांत ठेवीत असे. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांत श्रीकृष्णास मिळालेला अग्रपूजेचा मान यास सहन झाला नाहीं, व यानें श्रीकृष्णाची निंदा करण्यास सुरुवात केली, त्यावेळी याचे शंभर अपराध पुरे होताच श्रीकृष्णानें सुदर्शनानें याचा शिरच्छेद केला. [ १०,७४,४३ ] यास धृष्टकेतु, सुकेतु, करकर्ण, शरभ इत्यादि पुत्र व करेणुमति कन्या होती ती धृष्टकेतूनें नकुलास दिली होती.

**शिशुमार**-स्वायंभुव मन्वंतरांतील प्रजापति. याची कन्या भ्रमि, ती ध्रुवाची पत्नी [४,१०,१]

( २ ) आकाशांतील तारकामय असलेला भगवंताचा दक्षिणावर्त कुंडलाकार देह. [ ५,२३,४ ]

( ३ ) दोष नामक वसु व शर्वरी यांचा भगवदंशानें झालेला पुत्र [६,६,१४]

**शिष्ट**-उत्तानपादपुत्र ध्रुव व धन्या यांचा पुत्र. याची पत्नी सुच्छाया व पुत्र कृप, रिपुंजय, वृत्त, वृक ( मत्स्य )

## शी

**शीघ्र**-सूर्यवंशीय रामपुत्र कुशकुलांतील अग्निवर्णाचा पुत्र. याचा पुत्र मरु [ ९,१२,१६ ]

**शीघ्रग**-संपातीच्या पुत्रांतील एक.

**शीततोया**-एक नदी. ही पुत्र होण्याकरितां स्त्रीरूपानें वरुणाची पत्नी झाली होती. हिचा पुत्र श्रुतायुध.

**शीतवृत्त**-वसिष्ठ कुलांतील ब्रह्मर्षि.

**शीला**-एक नदी उगम-विंध्याचल.

## शु

**शुक**-कृष्णद्वैपायन व्यासाचा पुत्र. दिव्य रूप धारण केलेली घृताची नामक अप्सरा शुकीच्या रूपानें पृथ्वीवर संचार करीत असतां ती व्यासाच्या दृष्टीस पडली. तिला पहातांच व्यासाचें रेत पतन पावलें. त्यापासून याची उत्पत्ति झाली, व त्यामुळें यास शुक हें नांव पडलें. व्यासास हा पुत्र शिवप्रसादानें झाला होता. जन्मतःच हा योगी होता. यास थोडा वैराग्याचा, अभिमान झाला होता परंतु बहुलाश्व जनकाच्या उपदेशानें तो नाहींसा झाला. व्यासानें यास भागवत शिकविलें [ १, ७, ८ ] ( दे. भा.) परीक्षिताकडे आगमन व भागवताचा उपदेश [ १,१९,२५ व २,१,१० ] हा तेजस्वी तरुण व अजानुबाहु होता [ १, १९, २६ ते २८ ] बर्हिषद पितरांची कन्या जी पीवरी ती याची पत्नी होती, व कृष्ण, गौरप्रभ शंभु, भूरिश्रुत आणि जय, असे पुत्र होते. याची कृत्वी नामक कन्या नीपराजास दिली होती [९,२१,२५]

( २ ) ऋषभ पर्वतावरील एक गंधर्व.

( ३ ) इरावाननें मारिलेला शकुनीचा एक भाऊ.

( ४ ) रावणपक्षीय दोन राक्षस. यांतील एक अमात्य होता, व दुसरा हेर होता

( ५ ) एक यादव.

**शुकनाभ**-रावणपक्षीय एक राक्षस.

**शुकरहस्य**-यजुर्वेदोपनिषत्.

**शुकी**-कश्यप व ताम्रा यांची एक कन्या.

( २ ) अनलेची कन्या.

**शुक्तिमती**-ओरिसाप्रांतांतील सुवर्णरेखानदी

( २ ) वेत्रवती.

( ३ ) चेदि देशाची राजधानी.

**शुक्तिमान**-एक उपपर्वत. हा भल्लाट देशाच्या पूर्वेस असून या पासून काशिका, सुकुमारी, मंदगा, मंदवाहिनी कृपा पाशिनी इत्यादि नद्या निघाल्या आहेत[५,१९,१६](मत्स्य)

**शुक्र**-यास उशना, काव्य, इत्यादि नांवें आहेत. भृगुऋषीचा कावनामक पुत्राचा पुत्र [ ४,१,४५ ] प्रियव्रताची कन्या ऊर्जस्वती ती याची पत्नी व कन्या देवयानी [ ५,१,३४] बृहस्पती बरोबर वैर आणि चंद्राला सहाय्य [ ९,१४,६ ] शुक्राचा बलीला उपदेश व शाप [ ८,१९,३० व ९,२०,१४ ] हा दैत्यांचा गुरू होता. यास संजीवनी विद्या अवगत होती. बृहस्पतीपुत्र कचानें याजपासूनच संजीवनीविद्या संपादन केली होता.

( २ ) ध्रुवमण्डलाभोंवतीं फिरणारी एक तारका. ही शिशुमारचक्राच्या नाभिस्थानीं आहे [ ४,९,२१व५,२३,७ ]

( ३ ) बुधग्रहावर असलेला एक ग्रह. हा नेहमीं शुभ असतो [५,२२,१३] सूर्यमालेंतील ग्रह. हा सर्वांपेक्षां तेजस्वी आहे. चंद्रापेक्षांही शुक्राचें तेज ज्यास्त आहे; पण आकारानें मंगळ व बुध या दोघांवांचून बाकी सर्वांहून हा लहान आहे. गुरू याच्या १३०० पट मोठा आहे. शुक्राचा प्रदक्षिणा काल २२४ दिवस १६ तास, ४९ मिनिटें, ७ सेकंद इतका आहे. शुक्राच्या गोलाचा व्यास ७५१० मैल आहे. याची बुधाप्रमाणें आंदोलनात्मक गति असते. शुक्र जेव्हां सूर्य व पृथ्वी यांच्यामध्यें येतो, त्यावेळीं याचें अंतर २॥ कोटी मैल असते, व त्यास अंतर्योग किंवा अंतर्युति म्हणतात. शुक्र व पृथ्वी यांच्या मध्यें सूर्य येतो त्यावेळीं १६ कोटी मैल अंतर असतें, व त्यास बहिर्योग किंवा बहिर्युति म्हणतात. शुक्र सूर्यबिंबाचें अधिक्रमण २४३ वर्षांत फक्त चार वेळां करितो. प्रथम अधिक्रमण झाल्यापासून १०५॥ वर्षांनीं पुन्हां अधिक्रमण होतें. नंतर आठ वर्षांनीं होतें, पुढें १२१॥ वर्षांनी होतें, पुन्हां ८ वर्षांनीं होतें. हें अधिक्रमण नुसत्या डोळ्यांनीं दिसतें.

( ४ ) ज्येष्ठ महिना. [ १२,११,३५ ]

( ५ ) आषाढ महिन्यांत वरुण सूर्याबरोबर फिरणारा नाग [१२,११,३६]

( ६ ) उत्तम मनूचा एक पुत्र.

( ७ ) वैश्रवणाचा एक धनाध्यक्ष.

( ८ ) वारुणिकवीच्या आठ पुत्रांतील चौथा पुत्र.

( ९ ) विष्णुपद पर्वतावर धर्मरथ राजासह सोमपान करणारा एक राजा.

**शुक्र**–भगवंताचें एक नांव [ ३, २४, ४ ]
( २ ) उत्तानपादवंशीय हविर्धान व हविर्धानी यांच्या सहा पुत्रांतील तिसरा [ ४, २४, ८ ]
( ३ ) क्रौंच द्वीपांतील पर्वत[५,२०,२१]
( ४ ) पाण्डवपक्षीय एक राजा.

**शुक्रा**–क्रौंचद्वीपांतील नदी [ ५,२०,२० ]

**शुंग**–कलियुगांत मौर्यानंतर झालेले दहा राजे. यांनीं ११२ वर्षे राज्य केलें. [ १२, १, १७ ]

**शुचि**–अग्नि व स्वाहा यांचा एक पुत्र. सूर्योद्देशानें यांत हवन करतात, म्हणून यास सौर असेंहि नांव आहे. वानप्रस्थांचा उपास्य [ ४, १, ६० ]
( २ ) उत्तानपादवंशीय विजिताश्व व शिखंडिनी यांचा पुत्र. हा पूर्वीचा अग्निपुत्र होय. [ ४, २४, ४ ]
( ३ ) इंद्रसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं एक [ ८,१३, ३४ ]
( ४ ) इंद्रसावर्णि मन्वंतरांतील इंद्र [८,१३,३४]
( ५ ) विदेहवंशीय शतद्युम्नाचा पुत्र. याचा पुत्र सनद्वाज[९, १३, २२ ]
( ६ ) आयुकुलांतील शुद्धाचा पुत्र. याचा पुत्र त्रिककुत् [ ९,१७,११ ]
( ७ ) मागध कुलांतील विप्र राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षेम [९,२२,४७]
( ८ ) यदुवंशीय सात्वत पुत्र अंधकाच्या चार पुत्रांतील तिसरा [९,२४,१९]
( ९ ) ( आषाढ मास )[१२,११,४७]
( १० ) उत्तम मनूचा एक पुत्र.
( ११ ) वारुणिभृगूचा तिसरा पुत्र.
( १२ ) बारा भार्गव देवांतील पांचवा.
( १३ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

**शुचिका**–एक अप्सरा.

**शुचिस्मिता**–प्राधाकन्या एक अप्सरा.

**शुची**–कश्यप व ताम्रा यांची कन्या.

**शुण्डिक**–कर्णानें दिग्विजयाच्या वेळीं जिंकलेला देश ( भा. वन. )

**शुद्ध**–इंद्रसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक [ ८,१३,३४ ]
( २ ) आयुपुत्र अनेनाचा पुत्र. याचा पुत्र शुचि [ ९,१७,११ ]

**शुद्धोद**–पुष्करद्वीपाच्या सभोवार असलेला गोडया पाण्याचा समुद्र. हा ६४ लक्ष योजनें रुंद असून याच्या भोंवतीं दहा लक्ष योजनें रुंद सुवर्ण भूमि आहे [५,१,३३व५,२०,२९
( २ ) सूर्यवंशीय अंतरिक्ष कुलांतील शाक्य राजाचा पुत्र. याचा पुत्र लांगल [ ९,१२,१४ ]

**शुनक**–विदेहवंशीय ऋत राजाचा पुत्र. याचा पुत्र वीतहव्य [ ९,१३,२६
( २ ) सोमवंशीय आयुकुलांतील गृत्समदाचा पुत्र. याचा पुत्र शौनक. [ ९,१७,३ ]
( ३ ) मागधवंशीय पुरंजयाचा अमात्य. यानें पुरंजयाला मारून प्रद्योताला सिंहासनावर बसविलें [ १२,१,२ ]
( ४ ) भृगुकुलांतील रुरु ऋषि व प्रमद्वरा अप्सरा यांचा पुत्र व कुल. याचा पुत्र शौनक.

**शुनःपुच्छ**- भृगुकुलांतील अजीगर्ताच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

**शुनःशेप**-भृगुकुलांतील अजीगर्त ऋषीचा मध्यम पुत्र. हरिश्चंद्राला पुत्र नसल्या-

मुळें,-पुत्रानें तुझें यजन करीन, मला पराक्रमी पुत्र होऊं दे,-अशी त्यानें वरुणाची प्रार्थना केली. पुढें राजास रोहित नांवाचा पुत्र झाला. पुत्र झाल्यावर कराराप्रमाणें वरुणानें राजाकडे पुत्राची मागणी केली पण राजानें प्रत्येकवेळीं कांहींनाकांहीं निमित्त सांगून त्यास परत पाठविलें. आपल्या जीवावरील हा प्रसंग पाहून रोहित अरण्यांत पळून गेला. राजा कराराप्रमाणें पुत्र देत नाहीं, असें पाहून वरुणानें त्यास जलोदराचा व्याधि उत्पन्न केला. राजाची ही स्थिति ऐकून वरुणाला दिलेलें वचन पुरें करण्याच्या हेतूनें रोहितानें अजीगर्त ऋषीचा मध्यमपुत्र शुनःशेप यास बळी देण्याकरितां त्याजपासून विकत घेतला, व त्यास घेऊन तो घरीं आला. हरिश्चंद्रानें यज्ञास आरंभ केला. या यज्ञांत विश्वामित्र होता, जमदग्नि अध्वर्यु, वसिष्ठ ब्रह्मा, अयास्य उद्गाता असे ऋत्विज होते, व इंद्रानें सुवर्णाचा रथ दिला होता. पशुहनन प्रसंगीं शामित्रनामक ऋत्विज याचा वध करण्यास सिद्ध होतांच हा करुण स्वरानें रडूं लागला. त्यामुळें त्याच्याच्यानें याचा वध करवेना. तेव्हां याचा लोभी पिता अजीगर्त वध करण्यास प्रवृत्त झाला. ऋषींनीं त्याचा निषेध केला. विश्वामित्रास या ऋषिपुत्राची दया आली, व त्यानें यास वरुणमंत्राचा उपदेश करून याजकडून जप करविला. त्याबरोबर वरुण तेथे प्रगट झाला, व त्यानें हरिश्चंद्र राजास व्याधिमुक्त करून वचनमुक्तहि केलें. अशा प्रकारें विश्वामित्रानें याचें संरक्षण केलें. वरुणानें याचें रक्षण केलें म्हणून यास देवरात, असें नांव मिळालें आणि विश्वामित्रानें मंत्रोपदेश करुन मृत्युपासून सोडविलें म्हणून विश्वामित्र जीवनदाता पिता झाला. आणि तेव्हांपासून हा कौशिक गोत्री झाला. पुढें विश्वामित्रकुलांतील हा एक प्रख्यात मन्त्रद्रष्टा ऋषि झाला [ ९,७,२१ व ९,१६,३० ] ( दे. भा.)(भा.अनु.)

**शुनी**-नदी. उगम-ऋष्यवान्पर्वत.

**शुनोलांगूल**-अजीगर्ताचा कनिष्ठ पुत्र.

**शुभ**-स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषि व श्रद्धा यांचा पुत्र [ ४,१,५० ]

**शुभा**-बृहस्पतीची एक पत्नी.

**शुभांगद**-द्रौपदीस्वयंवरांतील एक राजा.

**शुभानन**-कद्रूपुत्र नागांतील एक.

**शुभ्र**-रैवत मन्वंतरांतील वैकुंठअवताराचा पिता. याची पत्नी विकुंठा [८,५,४]

**शुम्भ**-निशुम्भाचा ज्येष्ठ भ्राता.

( २ ) तारकासुराचा सेनापति. (मत्स्य)

( ३ ) रामसेनंतील एक वानर.

**शुम्भनिशुम्भ**-हे दोघे असुरबंधु शिवोपासक असून यांच्या पासून देवांना पिडा होऊं लागली असतां देवांच्या प्रार्थनेवरून दुर्गेनें यांस मारिलें. चंड व मुंड हे यांचे सेनापति.

**शुल्ब**-उर्दक ऋषीचा पिता.

**शुष्करेवती**-एक देवता.

## शू

**शून्यबन्धु**–सूर्यवंशीय दिष्ट कुलांतील तृणबिन्दूचा मध्यम पुत्र [ ९,२,३३ ]

**शूर**–सोमवंशीय वृष्णिकुलांतील विदूरथाचा पुत्र. याचा पुत्र भजमान[९,२४,२६]

( २ ) सोमवंशीय सात्वतकुलांतील वृष्णिवंशीय देवमीढाचा पुत्र. यास शूरसेन असेंहि नांव होतें. याची पत्नी आर्यक नागाची कन्या भोजा अथवा मारीषा. याला वसुदेव, देवभाग, देवश्रवा, आनक, सृंजय, श्यामक, कंक, शामीक, वत्सक, वृक, असे दहा पुत्र आणि पृथा, श्रुतदेवा, श्रुतकीर्ति, श्रुतश्रवा आणि राजाधिदेवी अशा पांच कन्या होत्या. यांपैकीं पृथा कुन्तिराजास दत्तक दिली होती. [ ९, २४, २७ ते ३१ ]

( ३ ) वसुदेव व मदिरा यांचा एक पुत्र [ ९,२४, ४८ ]

( ४ ) श्रीकृष्ण व भद्रा यांचा एक पुत्र [ १०, ६१, १६ ]

( ५ ) कार्तवीर्यपुत्र शूरसेनास नांव.

( ६ ) मगध देशाचा प्राचीन राजा. हा दशरथ पत्नी सुमित्रेचा पिता.

( ७ ) जयद्रथाचा एक मित्र राजा.

**शूरतर**-एक बलाढ्य राजा. यानें पटच्चर राक्षसास मारिलें. हा पांडवपक्षीय होता. याच्या रथाचे अश्व हिरव्या वर्णाचे असत ( भा. द्रोण. )

**शूरभू**–( भि ) उग्रसेनाची कन्या. वसुदेवाचा भाऊ श्यामकाची पत्नी. [ ९, २४, २५ ]

**शूरसेन**–मथुरेजवळचा एक देश, याची राजधानी मथुरा [ ९,१०,३४ ]

( २ ) कार्तवीर्याच्या अवशिष्ट पांच पुत्रांपैकीं एक [ ९,२३,२७ ]

३ देवमीढपुत्र शूराचें नांव [१०,१,२६]

( ४ ) पाण्डवपक्षीय एक राजा.

**शूर्पणखा**-विश्रवाऋषि व कैकसी यांची कन्या. रावणाची बहीण. विद्युज्जिव्ह राक्षसाची पत्नी. रावणाचे हातून विद्युज्जिव्ह मरण पावल्यावर रावणानें हिला दण्डकारण्याचें राज्य दिलें होतें. रामचंद्र दण्डकारण्यांत आला असतां, ही त्यावर मोहित झाली, व वेषांतर करून त्याच्याकडे गेली असतां, रामाज्ञेवरून लक्ष्मणानें हिला विरूप केलें. [ ९,१०,४ ]

**शूर्पणखी**–सीतासंरक्षणार्थ असलेली राक्षसी

**शूर्पारक**-भारतवर्षीय देश. सहदेवाच्या दिग्विजयांत याचें नांव आहे. निःक्षत्रिय पृथ्वी केल्यावर ती कश्यपास दान दिली असतां परशुरामानें समुद्रापासून राहण्यास घेतलेला देश. ( सोपारें, वसईजवळ ) येथें बलराम तीर्थयात्रेस आला [ १०,७९,२० ]

( २ ) भारत वर्षीय एक तीर्थ.

**शूलप्रोत**–एक नरक [५,२६,७ ]

## शृं

**शृंगवान्**–कुरुवर्ष अथवा ऐरावतवर्ष यांच्या उत्तरेकडे असलेला पर्वत. हा पूर्वपश्चिम समुद्रास स्पर्शून आहे.

( २ ) एक पर्वत. याच्या पायथ्याशीं शैलोद सरोवर आहे.

**शृंगवेरपुर**–गंगेच्या उत्तर तीरावर मिर्झापुराजवळचें एक वन. येथें निषादाधिपति गुह रहात असे.

**शृंगी**–अंगिरस्कुलांतील शमीक ऋषीचा पुत्र. यानें परीक्षितास शाप दिला

## शे

**शेष**–कश्यप व कद्रू यांपासून झालेल्या नागांतील प्रमुख. यास अनंत असेंहि नाव आहे. हा पातालांत असतो. याची एक कला क्षीरसमुद्रांत असून त्यावर विष्णु शयन करितो. याचा अंश बलराम. वसुदेव श्रीकृष्णाला गोकुलांत नेत असतां यानें आपल्या फणा त्यावर धरिल्या होत्या. हा कामरूपधर आहे. [ १०,३,४९ ]

**शेषशायी**–शेषावर शयन करणारा विष्णु. [ ३,८,१० ]

## शै

**शैखावत्य**–भीष्माकडून व शाल्वाकडून परत आल्यावर अंबा या ऋषीच्या आश्रमांत राहिली होती.

**शैनेय**–सात्यकीस नामांतर.

**शैब्य**–श्रीकृष्णाच्या रथाच्या चार अश्वांपैकीं एक [ १०,५३,५ ]

( २ ) शिबिदेशांतील राजे व लोक. भारतीयुद्धांत पाण्डवाकडे या नांवाचा एक राजा होता.

**शैब्या**–शिबिदेशांतील राजांच्या कन्यांस सामान्य नांव. जसें:–ज्यामघाची पत्नी, कृष्णपत्नी मित्रविंदा, इत्यादि [ ९,२३,३७ व १०,५१,४२ ]

**शैब्या**–भारतवर्षीय एक नदी.

**शैरीषक**–नकुलाच्या दिग्विजयांतील एक पश्चिम देश ( भा. सभा. )

**शैलालय**- वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( २ ) भगदत्त राजाचा पितामह

**शैलिन**–शिलीनपुत्र जित्वाऋषीचें नामांतर.

**शैलूष**–बिभीषणपत्नी सरमेचा पिता. हा पर्वतावर रहात असे.

**शैलोद**–शृंगवान पर्वताच्या पायथ्याजवळचें सरोवर. यांतून शैलोदका अथवा शैलोदा नदी निघते.

**शैलोदका**–( शैलोद शब्द पहा. )

**शैवल**–विंध्याद्रीच्या दक्षिणेकडील पर्वत.

**शैशिर**–अंगिरा कुलांतील एक ब्रह्मर्षि.

( २ ) कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

( ३ ) विश्वामित्र कुलांतील ब्रह्मर्षि.

**शैशुपाली**–शिशुपालाच्या शुक्तिमती नगरीचें नामांतर.

## शो

**शोक**–द्रोणवसु व अभिमती यांचा एक पुत्र. [ ६,६,११ ]

**शोण**–एक नद. याला रामायणादि पुराणांत सुवर्ण नदी म्हटले आहे. हिचा उगम नर्मदा नदीजवळ अमरकण्टकांत असून ही दिनापूरच्या पलीकडे दहा मैलावर मिळते. हिची लांबी ४८७ मैल आहे, पाटलीपुत्र शहर हिच्या कांठीं होतें. याला हिरण्यवाह असें म्हणतात [ ५,१९,१८ ]

( २ ) अत्रि कुलांतलि एक ब्रह्मर्षि

( ३ ) प्रलयमेघांतील सातवा मेघ.

**शोणा**–अयोध्या व मिथिला यांच्या मार्गांत असणारी एक नदी.

**शोणाश्व**–कुरुकुलांतील एक राजा.

( २ ) एक यादव.

**शोणितपूर**-बाणासुराची नगरी [ १०,६२,४ ]

**शोणिताक्ष**-रावणपक्षीय एक राक्षस.

**शोणितोद**-एक गंधर्व.

### शौ

**शौक्रतु**-अत्रिकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**शौक्रायनि**-वेददर्श ऋषीचा अथर्ववेदाचा शिष्य [ १२, ७, २ ]

**शौंग**-भारद्वाजांगिरस कुलांतील शुंग ऋषीचा पुत्र. यास विश्वामित्र कुलांतील शैशिर ऋषीनें आपला पुत्र मानिलें, म्हणून हा द्व्यामुष्यायण म्हणजे द्विगोत्रीय आहे.

**शौनक**-भृगुकुलांतील शुनक ऋषीचा पुत्र. हा नैमिषारण्यांतील कुलपति असून ऋग्वेदी होता. यास सूतानें पुराणें सांगितलीं [ १,४,१ ]

( २ ) सोमवंशीय आयुकुलांतील शुनकाचा पुत्र [ ९, १७,३ ]

**शौनकायन**-भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**शौरि**-शूरकुलांत उत्पन्न झाल्यामुळें श्रीकृष्णाचें नांव [ ३,१,२७ ]

**श्याकार**-कश्यप कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**श्यामक**-यदुवंशीय शूराचा पुत्र. याची पत्नी शूरभु अथवा शूरभूमि व पुत्र हरिकेश व हिरण्याक्ष. [९,२४,२९]

**श्यामपराशर**-वसिष्ठकुलांतील पराशर ऋषीचा वंशज व कुल.

**श्यामवय**-वसिष्ठ कुलांतील ऋषि.

**श्यामा**-मेरुकन्या व आग्नीध्र पुत्र हिरण्मयाची पत्नी [ ५,२,२३ ]

**श्यामायन**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**श्यामायनि**-अंगिराकुलांतील एक ऋषि

**श्यामोदर**-कश्यपकुलांतील एक ऋषि.

**श्येन**-एक ऋषि.

**श्येनगामि**-खरराक्षसाचा एक अमात्य.

**श्येनजित्**-दलराजाचा पुत्र. ( शलशब्द)

( २ ) सूर्यवंशीय प्रसन्न राजास नांव

**श्येनी**-कश्यप व ताम्रा यांची एक कन्या.

( २ ) विनतापुत्र अरुणाची पत्नी. हिचे पुत्र जटायु व संपाती.

( ३ ) एक नदी. उगम-ऋष्यवान् पर्वत.

**श्रद्धा**-स्वायंभुव मन्वंतरांतील कर्दम प्रजापति व देवहूति यांची कन्या, अंगिरापत्नी. हिला सिनीवाली, राका, कुहू, व अनुमति अशा चार कन्या होत्या [ २,२४,२२ व ४,१,३४ ]

(२) स्वायंभुवमन्वंतरांतील दक्षकन्या व धर्मपत्नी हिचा पुत्र शुभ [४,१,४९]

( ३ ) वैवस्वत मनूची पत्नी. पुत्रकामेष्टि यज्ञ चालू असतां हिनें कन्येची याचना केल्यामुळें पुत्र न होतां इला नामक कन्या झाली. हिला दुसरे दहा पुत्र होते [ ९,१,११-१४ ]

**श्रद्धादेवी**-वसुदेवाची एक पत्नी.

**श्रद्धालु**-हंसध्वज राजाचा एक प्रधान.

**श्रम**—वसुदेव व शान्तिदेवेचा एक पुत्र [ ९,२४,५० ]

**श्रमदागोपि**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**श्रमण**-व्रतस्थ [११,६,४७ व १२,३,१९]

**श्रविष्ठ**-अक्रूराचा एक पुत्र.

**श्रवण**-एक नक्षत्र. सोमाच्या सत्तावीस स्त्रियांपैकीं एक [ ५,२३,६ ]

(२) नवविधाभक्तीपैकीं एक [७,५,२३]

( ३ ) अक्रूराचा एक पुत्र.

( ४ ) मुरदैत्याचा एक पुत्र. यास कृष्णानें मारिलें.

**श्रवस**-वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**श्रवा**- संतऋषीचा पुत्र. याचे पुत्र अर्चि आणि तम.

**श्राद्धदेव**-सरस्वतीपात्रांतील तीर्थ [३,१,२२
( २ ) वैवस्वतमनूस नांव [ ६,६,४० ] हा पूर्वजन्मींचा सत्यव्रत होय. [ ८,२४,११ व ९,१,२ ]

**श्रावण**-एक वैश्य, हा परम मातृपितृभक्त असे. आपल्या वृद्ध व अंध माता पितरांस कावडींत बसवून हा तीर्थ-यात्रेकरितां जात असतां, वाटेंत रात्रीच्यावेळीं याच्या वडिलांस तहान लागली, ह्मणून पाणी आणण्याकरितां हातांत कमंडलु घेऊन हा तळयावर गेला. त्याचवेळीं दशरथ राजा मृगयेकरिता त्या अरण्यांत आला होता, व सावजाची मार्गप्रतीक्षा करीत एका झाडावर बसला होता. याच्या कमंडलूंतील पाण्याचा ध्वनि ऐकतांच, कोणी श्वापद पाणी पीत आहे, अशा भ्रांतीनें त्यानें याजवर बाण सोडिला. त्या बाणानें हा मृत झाला. त्याप्रसंगीं याच्या मातापित्यांनीं अत्यंत शोक केला, आणि अग्नींत देह अर्पण केले. मरतेवळीं त्यांनीं दशरथराजास-'आह्माप्रमाणेंच तूं पुत्र पुत्र ह्मणत मरशील '-असा शाप दिला.

**श्री**-स्वायंभुवमन्वंतरांतील भृगुऋषि व ख्याती यांची कन्या आणि श्रीविष्णूची पत्नी [ ४,१,४३ ]
( २ ) चतुर्दशरत्नांपैकीं एक [८,८,८]
( ३ ) संपत्ति [ ११,१९,४१ ]

**श्रीकंठ**-महादेवास नांव.

**श्रीकुंज**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**श्रीदामा**-श्रीकृष्णाचा मित्र [१०,१५,२०]

**श्रीदेवा**-वसुदेवाची एक पत्नी. हिचे पुत्र वसु, हंस, सुवंश, वगैरे सहा [ ९,२४,२३-५१ ]

**श्रीनगर**-देवीचें एक स्थान. ( दे. भ. )

**श्रीनिवास**-विष्णूचें नांव [ ९,४,६० ]

**श्रीपर्णी**-भारतवर्षीय एक नदी.

**श्रीपर्वत**-श्री शैलपर्वतास नांव.

**श्रीभानु**-सत्यभामेचा पुत्र [१०, ६१ ११]

**श्रीमती**-अंबरीष राजाची कन्या. हिच्या प्राप्तीची इच्छा नारद आणि पर्वत ऋषि करीत असतां विष्णूला हिनें वरिलें. हा विष्णु वैकुंठवासी विष्णूहून भिन्न होय.

**श्रीमान्**-आपनामक वसूचा पुत्र.
( २ )पुरुकुलांतील नीपराजाच्या दुसऱ्या शतपुत्रांतील ज्येष्ठ.

**श्रीरंग**-भारतवर्षीय तीर्थ [ १०,७९,१४ ]

**श्रीवत्स**-विष्णूच्या वक्षस्थलावरील चिन्ह [ ११,२७,२७ ]

**श्रीशैल**-कृष्णाजिल्ह्यांत कृष्णानदीच्या कांठीं असलेला एक पर्वत. यावर मल्लिकार्जुन ज्योतिर्लिंग आहे [ ५,१९,१६ ]

**श्रुत**-इक्ष्वाकुकुलांतील भगीरथाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ [ ९,९,१३ ]
( २ ) विदेहवंशीय सुभाषणाचा पुत्र. याचा पुत्र जय [ ९,१३,२५ ]
( ३ ) श्रीकृष्ण व कालिन्दी यांचा पुत्र [ १०,६१,१४ ]
( ४ ) द्रुपदराजाचा एक पुत्र. यास रात्रि युद्धांत अश्वत्थाम्यानें मारिलें.

**श्रुतकर्मा**-पाण्डुपुत्र सहदेव व द्रौपदी यांचा पुत्र [ ९,२२,३० ] हा महारथी

होता. हा शिबिरांत निद्रिस्त असतां यास अश्वत्थाम्यानें मारिलें.

( २ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**श्रुतकीर्ति**-पाण्डुपुत्र अर्जुन व द्रौपदी यांचा पुत्र. यास निद्रिस्त असतां अश्वत्थाम्यानें मारिलें [ ९,२२,२९ ]

( २ ) शूराची कन्या व केकय राजा धृष्टकेतूची पत्नी [ ९, २४, ३० ]

( ३ ) विदेहवंशीय कुशध्वजाची कन्या व दशरथपुत्र शत्रुघ्नाची पत्नी

**श्रुतंजय**-पुरूरवापुत्र सत्यायूचा पुत्र [ ९,१५,२ ]

**श्रुतदेव**-श्रीकृष्णाचा अनुयायी एक यादव [ १, १४, ३२ ]

( २ ) विष्णूचा एक पार्षद[८,२१,१७ ]

( ३ ) मिथिला नगरींत राहणारा एक आत्मनिष्ठ ब्राह्मण. श्रीकृष्ण यास भेटण्याकरितां गेला होता [१०,८६,१३]

( २ ) कृष्णाचा एक पौत्र. हा महारथी होता [ १०,९०,३३ ]

**श्रुतदेवा**-यदुवंशीय शूराची कन्या व वृद्धशर्म्याची पत्नी [ ९,२४,३० ]

**श्रुतधर**-शाल्मली द्वीपांतील लोकविशेष [ ५,२०,११ ]

**श्रुतध्वज**-विराटराजाचा एक भाऊ.

**श्रुतधर्मा**-भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय एक राजा. ( भा. कर्ण. )

**श्रुतर्वा**-एक राजा. याच्याकडे द्रव्ययाचनेकरितां अगस्त्यऋषि गेला होता.

**श्रुतविंदा**-कुशद्वीपांतील नदी [५,२०,२५]

**श्रुतश्रवा**-यदुवंशीय शूराची कन्या व चेदिदेशीय दमघोषाची पत्नी. हिचा पुत्र शिशुपाल [ ९,२४,३० ]

( २ ) जरासन्ध वंशांतील सोमापीचा पुत्र [ ९, २२, ९ ]

( ३ ) कलियुगांतील मागधवंशीय मार्जारीचा पुत्र याचा पुत्र आयु [ ९,२२,४६

( ४ ) गरुडानें मारिलेला एक असुर.

( ५ ) जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य. सर्पिणीपासून उत्पन्न झालेल्या सोमश्रव्याचा पिता.

**श्रुतश्री** गरुडानें मारिलेला एक असुर.

**श्रुतसेन**-शत्रुघ्नाचा पुत्र [ ९,११,१३ ]

( २ ) पांडुपुत्र भीम व द्रौपदी यांचा पुत्र. हा निद्रिस्त असतां अश्वत्थाम्यानें मारिलें [ ९, २२, २९ यास सुतसोम असेंहि म्हटलें आहे.

( ३ ) अभिमन्युपुत्र परीक्षिताचा एक पुत्र [ ९, २२, ३५ ]

( ४ ) भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय एक राजा ( भा. कर्ण. )

( ५ ) शत्रुघाती राजास नामांतर.

**श्रुतानीक**-विराटराजाचा कनिष्ठ भ्राता.

**श्रुतायु**-सोमवंशीय पुरूरव्याचा एक पुत्र. याचा पुत्र वसुमान [ ९, ५,२ ]

( २ ) विदेहवंशीय अरिष्टनेमीचा पुत्र. याचा पुत्र सुपार्श्वक [ ९,१३,२३ ]

( ३ ) इक्ष्वाकुवंशीय चंद्रराजाचा पुत्र.

( ४ ) अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय एक राजा ( भा. द्रोण. )

**श्रुतायुध**-वरुण व शीततोया ( नदीची देवता ) यांचा पुत्र. यास वरुणानें अभिमंत्रित करून एक गदा दिली होती, आणि जो समोर युद्धास आला नाहीं, अशावर ही गदा टाकल्यास

तुझाच नाश होईल असें सांगितलें. भारती युद्धांत हा दुर्योधनातर्फे लढत असतां यानें श्रीकृष्णावर गदा टाकिली त्यामुळें याचा नाश झाला.

**श्रुतावती**-पूर्व मन्वंतरांतील भरद्वाज ऋषीची कन्या. हिनें बदरीपाचन तीर्थी मोठें तप केलें. सांप्रत ही शची नांवानें इंद्राची पत्नी आहे (भा.शल्य)

**श्रुति**-वेद [ १०, ८७, १ ]

( २ ) कश्यप कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**श्रेणिमान्**-गोशृंग पर्वतशिखरावरील राजा, हा भारतीयुद्धांत पांडवांकडे होता.

( २ ) दिग्विजयाच्या वेळीं भीमानें जिंकलेला कुमार देशचा राजा.

**श्रोता**-श्रावणांत इंद्रसूर्याबरोबर फिरणारा यक्ष [ १२, ११, ३७ ]

**श्रौतश्रवस**-शिशुपालाचें नामांतर.

**श्लेष्मातक**-नर्मदाकांठचें तपोवन. येथें विश्रवा ऋषि रहात असे.

**श्वफल्क**-यदुवंशीय वृष्णीचा पुत्र. याची पत्नी गांदिनी. याला अक्रूर, आसंग, सारमेय, मृदुर, मृदुवित, गिरि, धर्मवृद्ध, सुकर्मा, क्षत्रोपेक्ष, अरिमर्दन शत्रुघ्न, गंधमादन, प्रतिबाहु असे पुत्र व सुचारा कन्या होती [ ९, २४, १५-१७ ] काशीस एकदां अवर्षण पडलें असतां, तेथील राजानें याचा सत्कार करून यास गांदिनी कन्या दिली त्याबरोबर सुवृष्टि झाली [ १०,५७,३२ ]

**श्ववृत्ति**-सेवावृत्ति [ ७,११,८ ]

**श्वसृप**-तेरा सैंहिकेयांतील एक.

**श्वाफल्कि**-श्वफल्काचे पुत्र. विशेषतःअक्रूर [ ११,१२,१० ]

**श्वाविल्लोमापनयन**-एक तीर्थ.

**श्वाहि**-यदुवंशीय वृजिन्वानाचा पुत्र रुशेकु [ ९, २३, ३१ ]

**श्वेत**-पाताळांत राहणाऱ्या नागांपैकीं एक [ ५, २४, ३१ ]

( २ ) एक ऋषि.

( ३ ) विप्रचित्ति दानवाचा पुत्र.

( ४ ) प्राचीन काळचा विदर्भपति सुदेवाचा पुत्र. एक राजा. याचा कनिष्ठ बन्धु सुरथ युवराज होता. यानें राज्य उत्तम केलें, पण अन्नदान योग्य न घडल्यानें याला स्वर्गांत अन्न मिळेना. तेव्हां भूलोकीं येऊन अगस्त्य ऋषीच्या प्रसादानें याची ही अडचण दूर झाली ( वा. रा. )

( ५ ) रामसेनेंतील एक वानर.

( ६ ) विराट राजा एक पुत्र.

**श्वेतकल्प**-चालू ब्राह्ममासांतील होऊन गेलेला पहिला दिवस.

**श्वेतकी**-एक राजा. यानें इतके अपरिमित यज्ञ केले कीं, ब्राह्मणांस विश्रांति मिळेना, व धुरानें त्यांचे नेत्रही वाईट झाले. इतक्यांत आणखी एक शतसंवत्सरात्मक सत्र करण्याचें यानें ठरविलें, पण कोणीही ब्राह्मण यज्ञास येईना. 'रुद्रास प्रसन्न करून त्यांस यज्ञाकरितां आण' असें ब्राह्मणांनीं यांस सांगितलें. त्याप्रमाणें यानें रुद्रास प्रसन्न केलें, त्या वेळीं रुद्रानें बारा वर्षे अखण्ड घृतधारा अग्नींत धरून माझ्याकडे ये, असें सांगितलें. हा

त्याप्रमाणें करून रुद्राकडे गेला असतां रुद्र म्हणाला, माझा अंश जो दुर्वास ऋषि तो तुझें आर्त्विज्य करील. नंतर दुर्वासानें याचें शतसंवत्सरात्मक सत्र सिद्धीस नेलें. परंतु या यज्ञामुळें अग्नीस जाड्य झालें, आणि अनेक औषधींनीं युक्त असें खांडववन अर्जुनाची याचना करून भक्षण करावें लागलें.

**श्वेतकेतु**-गौतमकुलांतील अरुणिपुत्र उद्दालकाचा पुत्र. हा लहानपणीं अगदीं उन्मार्गवर्ती असल्यामुळें बारा वर्षेंपर्यंत याचें उपनयन झालें नव्हतें. पुढें एकदां हा शांतवृत्तीनें बसलेला पाहून याच्या पित्यानें यास नीतीचा उपदेश केला. तो याच्या मनावर ठसला व यानें उन्मार्गवृत्तीचा त्याग केला. पुत्राची वृत्ती सुधारलेली पाहून उद्दालक ऋषीस समाधान वाटलें. त्यानें याचें उपनयन केलें, पुढें गुरुगृहीं जाऊन यानें अध्ययन केलें आणि मोठा विद्वान झाला. यास विद्वत्तेचा अभिमान झालेला पाहून याच्या पित्यानें 'एकाच्या विज्ञानानें सर्वांचें विज्ञान' असें गुरूनें सांगितलें आहे काय ? असा याला प्रश्न केला. या प्रश्नाचा भावार्थ यास समजेना. तेव्हां गलिताभिमान होऊन हा आपल्या पित्यास शरण गेला. हा अभिमान रहित झालेला पाहून उद्दालकानें यास ब्रह्मविद्येचा उपदेश केला. त्यायोगें हा एक उत्तम ब्रह्मनिष्ठ झाला. यानेंच स्त्रीपुरुष मैथुन नियम प्रथम केले. ( भा. आदि. )

(२) जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य.

**श्वेतद्वीप**-एक द्वीप. येथील राजाला भेटण्यासाठीं नारद गेला होता [ १०, ८७,१० ]

**श्वेतपराशर**-पराशर वंशांतील कुल. यांत अविष्ठायन, वालेय, स्वायष्ट, उपयव, इषिकहस्त, हे ऋषि प्रसिद्ध आहेत.

**श्वेतपर्वत**-रम्यक वर्ष आणि हिरण्मय वर्ष यांच्या मध्यें असलेला महापर्वत. हा पूर्वपश्चिम समुद्रास स्पर्शून आहे, यावर प्रायःदैत्य राहतात [५,१६,८]

( २ ) हिमालयाचें एक शिखर.

**श्वेतभद्र**-एक यक्ष.

**श्वेतवराह**-वराह अवतार श्वेत वर्णाचा असल्यामुळें त्यास नांव.

**श्वेतवर्ष**-रम्यक वर्षास नामांतर.

**श्वेतवाराह**-श्वेतवराह झालेल्या प्रस्तुत कल्पास नांव.

**श्वेतवाहन**-अर्जुनाचें एक नांव.

**श्वेता**-कश्यप व क्रोधा यांची कन्या.

**श्वेतारण्य**-कावेरी नदीचे तीरावरील वन. येथें शंकरानें मार्कण्डेयास यमापासून सोडविलें. ( वा. रा. अरण्य. )

**श्वेताश्वतर**-स्वायंभूमनुपासून ब्रह्मविद्या संपादन केलेला एक ऋषि.

( २ ) यजुर्वेदोपनिषत्.

**श्वेतोग्रह**-धूमकेतूस संज्ञा (भा. उद्योग.)

## ष.

**षठ**-वसिष्ठकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**षडानन**-कार्तिकेयास नांव.

**षड्गुणेश**-( परमात्मा ) पांच इंद्रियें व मन यांचा स्वामी [ १,३,२६ ]

**षाड्वर्गिक**-पंचेंद्रियांचे विषय व वासना.

**षाडशकल**-एकादशेंद्रियें व पंचमहाभूतें यांनीं उत्पन्न केलेलें स्वरूप [१,३,१]

**षोडशी**-ब्रह्मदेवाच्या पूर्वेकडील मुखापासून झालेला एक यज्ञविशेष [३,१२,४०]

**स**

**सकौवाक्षि**-भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**सख्य**-नवविधा भक्तीपैकीं एक. उदा० अर्जुन [ ७, ५, २३ ]

**सगर**-इक्ष्वाकुवंशीय बाहुकाचा पुत्र. हा विषासहित जन्मला म्हणून यास सगर नांव ठेविलें. यास विदर्भ देशाधिपति यदूची कन्या सुमति अथवा प्रभा, व शिबिदेशाधिपतीची कन्या केशिनी अथवा भानुमती अशा दोन स्त्रिया होत्या यानें स्त्रियांसहित तप केल्यावर रुद्रप्रसादानें पहिल्या स्त्रीस एक भोपळा होऊन त्यांतून साठ हजार पुत्र झाले, व दुसरीस असमंजसा नांवाचा एक पुत्र झाला यानें हैहय, तालजंघ, यवन इत्यादि राजांस जिंकिलें होतें यानें अनेक यज्ञ केले, त्यांतील एका अश्वमेधाचा अश्व इंद्रानें हरण केला, त्याच्या शोधाकरितां याचे साठ हजार पुत्र फिरत असतां, तो कपिलाश्रमांत दिसला, व हा कपिलानेंच येथें आणिला असेल, अशा कल्पनेनें त्यांनीं कपिलाचा अपमान केला. त्यामुळें कपिलाच्या क्रोधाग्नीनें ते सर्व साठ हजार सगरपुत्र दग्ध झाले. नंतर असंमजसाचा पुत्र अंशुमान तेथें जाऊन त्यानें कपिलास प्रसन्न करून तो अश्व आणिला आणि सगराचा यज्ञ शेवटास नेला. यज्ञ समाप्त होतांच अंशुमानास राज्यावर बसवून सगर तपार्थ अरण्यांत गेला. तेथें और्वऋषीच्या उपदेशानें उत्तम गति पावला. [ ९, ८, ५ ते ३१ ]

**संकट**-चालू मन्वंतरांतील धर्मऋषि व ककुब् स्त्री यांचा पुत्र [ ६,६,६ ]

**संकर्षण**-भगवंताच्या चतुर्मूर्तिपैकीं एका मूर्तीचें नांव [ १,५,३७ ]

( २ ) बलरामाचें नामांतर [९,२४,५४]

**संकल्प**-धर्मऋषि व दक्षकन्या संकल्पा यांचा पुत्र [ ६,६,१० ]

**संकल्पा**-संकल्पाची माता [ ६,६,४ ]

**सांकिल**-वैश्यजातीय एक मंत्रद्रष्टा (मत्स्य.)

**संकृति**-सोमवंशीय आयुपुत्र क्षत्रवृद्धकुलांतील जयसेनाचा पुत्र. याचा पुत्र जय [ ९,१७,१८ ]

( २ ) सोमवंशीय दुष्यन्तकुलांतील नराचा पुत्र. याचे पुत्र गुरू आणि रन्तिदेव [ ९,२१,१–२ ]

( ३ ) अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**संगत**-मौर्यवंशीय सुयशाचा पुत्र. याचा पुत्र शालिशूक [ १२,१,१४ ]

**संग्रामजित्**-श्रीकृष्ण व भद्रा यांचा पुत्र [ १०,६१,१७ ]

( २ ) एक यादव [ ११,३०,१६ ]

( ३ ) पाण्डवांचा मित्र एक राजा.

**सजातंबि**-कश्यपकुलांतील एक ऋषि.

**संजीवि**-अंगिराकुलांतील एक ऋषि.

**संजय**-गवल्गण नामक सूताचा पुत्र. यास गावल्गणि असेंहि नांव आहे. हा धृतराष्ट्राचा सारथि होता. हा सत्यवक्ता व निस्पृह असे. व्यासकृपेनें

यास दिव्य दृष्टि प्राप्त झाली होती, व तिच्या सहायानें यास जगांतील सर्व प्रकार दिसत असत. भारती-युद्धांत घरीं बसून धृतराष्ट्रास हा युद्धांतील सर्व वर्तमान निवेदन करीत असे [ १,१३,३१ ]

( २ ) इक्ष्वाकुवंशीय रणंजयाचा पुत्र. याचा पुत्र शाक्य [ ९,१२,१३ ]

( ३ ) सोमवंशीय आयुपुत्र क्षत्रवृद्धकुलांतील प्रतिराजाचा पुत्र. याचा पुत्र जय [ ९,१७,१६ ]

( ४ ) सोमवंशीय अजमीढ कुलांतील भर्म्याश्वाचा पांचवा पुत्र [९,२१,३२]

(५) सौवीरदेशचा राजा. विदुलेचा पुत्र.

( ६ ) जयद्रथाचा एक मित्र.

**संजयंतीपुरी**-केरलदेशाच्या दक्षिणेकडील नगरी ( भा. सभा. )

**संज्ञा**-त्वष्टा प्रजापतीची कन्या व विवस्वान आदित्याची पत्नी [ ६,६,४० ]

**सती**-दक्ष कन्या व शंकराची पत्नी. हिनें दक्ष यज्ञांत आपला देह विसर्जन केला. हीच पुढें पार्वती रूपानें जन्मास आली[४,१,६५-४,४,२७]

( २ ) अंगिरा प्रजापतीची पत्नी. हिनें अथर्वांगिरस वेदाला पुत्र मानिलें होतें [ ६,६,१९ ]

**सत्कर्मा**-अनुवंशीय अंगकुलांतील धृतव्रताचा पुत्र. यानें ब्राह्मण स्त्रीशीं शास्त्रविधीनें विवाह केला होता याचा पुत्र अधिरथ. तो सूतपणाची वृत्ति करीत असे.

**सत्कृति**-सत्कृति राजाची पत्नी व रंतिदेवाची माता.

**सत्य**-धर्माचा चौथा चरण. हा ब्रह्मदेवाच्या उत्तरमुखापासून झाला [३,१२,४१]

( २ ) उत्तानपादवंशीय हविर्धान व हविर्धानी यांचा एक पुत्र [४,२४,८]

( ३ ) उत्तममन्वंतरांतील देव विशेष [ ८,१,२४ ]

( ४ ) ब्रह्मसावर्णिमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक [ ८,१३,२२ ]

( ५ ) दहा विश्वेदेवांतील चौथा.

( ६ ) वितत्य ऋषीचा पुत्र. याचा पुत्र संतऋषि.

( ७ ) भीमानें मारिलेला कलिंगराजाच्या दोन चक्ररक्षकांतील एक.

**सत्यक**-तामसमन्वंतरांतील देव विशेष. [ ८,१,२८ ]

( २ ) श्रीकृष्ण व भद्रा यांचा पुत्र. [ १०,६१,१७ ]

**सत्यकर्मा**-सत्कर्मा राजाचें नामांतर.

( २ ) दुर्योधनपक्षीय त्रिगर्त राजांपैकीं एक. यास अर्जुनानें मारिलें. ( भा.)

**सत्यकाम**-जाबालाचें नामांतर.

**सत्यकेतु**-सोमवंशीय काश्यकुलांतील धर्मकेतुचा पुत्र. याचा पुत्र धृष्टकेतु [ ९,१७,८ ]

**सत्यजित्**-सोमवंशीय जरासंध कुलांतलि सुनीथाचा पुत्र. त्याचा पुत्र विश्वजित् [ ९, २२, ४९ ]

( २ ) यदुवंशीय आनक व कंका यांचा पुत्र [ ९, २४, ४१ ]

( ३ ) कार्तिकांत विष्णु सूर्याबरोबर असणारा यक्ष [ १६, ११, ४५ ]

( ४ ) तामस मन्वंतरांतील चौथा इंद्र.

( ५ ) द्रोणाचार्यानें मारिलेला द्रुपदपुत्र.

**सत्यतपा**–एक ब्रह्मर्षि. हा एकदां आपल्या आश्रमापुढें उभा असतां, जवळून विद्ध झालेलें एक श्वापद पळत गेलें. पाठीमागून श्वापदास विद्ध करणारा व्याध तेथें आला, व यास म्हणाला आपण येथून एखादें श्वापद जातांना पाहिलें काय ? परंतु यानें उत्तर दिलें नाहीं त्यामुळें व्याधानें पुन्हां पुन्हां विचारलें असतां, हा म्हणाला, 'या पश्यति न सा ब्रूते या ब्रूते सा न पश्यति । अहो व्याध स्वकार्यार्थी किं पृच्छसि पुनः पुनः ॥ ' ( जी दृष्टी पाहत्ये ती बोलत नाहीं, आणि जी वाणी बोलत्ये ती पहात नाहीं. मग पुन्हां कां बरें विचारतोस ? ) हें ऐकून व्याध मुकाट्यानें निघून गेला.

**सत्यदेव**–भीमानें मारिलेला कलिंग राजाच्या दोन चक्ररक्षकांतील दुसरा.

**सत्यधर्म**-धर्मसावर्णिमनूचा पुत्र [८,१३,२४]

**सत्यधृति**–सोमवंशीय द्विमीढ कुलांतील कृतिमानाचा पुत्र. याचा पुत्र दृढनेमि [९, २१, २७ ]

( २ ) गौतम पुत्र शतानंदाचा पुत्र याचा पुत्र शरद्वान् [ ९,२१, ३५ ]

( ३ ) द्रौपदी स्वयंवरांतील एक राजा.

( ४ ) द्रोणाचार्यानें मारिलेला द्रुपदपुत्र.

**सत्यनामा**–अयोध्येंतील एक स्थल. येथें दशरथाचा प्रासाद होता.

**सत्यभामा**–सत्राजिताची कन्या, कृष्णाची पत्नी [ १०, ५६, ४४ ] हिचे भानु, सुभानु, स्वर्भानु, प्रतिभानु, भानुमान, चंद्रभानु, बृहद्भानु, अतिभानु, श्रीभानु, प्रतिभानु असे दहा पुत्र [ १०,६१,१० ] सत्राजिताच्या वधाचें वृत्त श्रीकृष्णाला सांगण्याकरितां हस्तिनापुरीं गमन [ १०,५७,७ ] स्यमंतपंचकक्षेत्रीं द्रौपदीस विवाहवृत्त कथन [ १०,८३,९ ]

**सत्यम्भरा**–प्लक्षद्वीपांतील नदी [५,२०,४]

**सत्ययुग**–( कृत शब्द पहा )

**सत्यरथ**–विदेह वंशीय समरथाचा पुत्र. याचा पुत्र उपगुरु [ ९,१३,२४ ]

( २ ) दुर्योधनपक्षीय जे संशप्त त्रिगत पांच बंधू त्यापैकीं एक. यास अर्जुनानें मारिलें. ( भा. उद्योग. शल्य. ]

**सत्यलोक**–ब्रह्मदेव ज्या ठिकाणीं राहतो, तो भूमीच्या ऊर्ध्व भागीं असलल्या लोकांतील सर्वांत वरचा लोक. वैकुण्ठ, कैलास हे लोक यांतच अंतर्भूत आहेत. हा विराटपुरुषाच्या मस्तकाच्या ठिकाणीं आहे [२,५,३६]

**सत्यवती**-गाधिराजाची कन्या व ऋचीक ऋषीची पत्नी. जमदग्नीची माता. ही कौशिकी नांवाची नदी झाली [९,१५,५–१२]

( २ ) ही पूर्वीची पितरांची अच्छोदा नामक कन्या. हिचा जन्म उपरिचरवसु राजापासून झाला. म्हणून हिला मत्स्यगंधा हें नांव प्राप्त झालें. हिचें संगोपन धीवरानें केलें. ही कौमार्य अवस्थेंत असतां पराशरापासून हिला पुत्र झाला, तो व्यास. पुढें हिचा विवाह शंतनुराजाबरोबर झाला. त्यापासून हिला दोन पुत्र झाले, ते चित्रांगद आणि विचित्रवीर्य [९,२२,२०–२,व १,३,११]

**सत्यवर्मा**-संशप्तकत्रिगर्त पांचबंधूपैकीं एक.

**सत्यवाक्**-एक ब्रह्मर्षि.

( २ ) मुनीस झालेल्या सोळा गंधर्वांपैकीं एक. यास युगप असेंहि म्हणतात.

**सत्यवान्**-चक्षु व नड्वला यांचा पुत्र. यास सत्यवाक् असेंहि नांव होतें. [ ४,१३,१६ ]

( २ ) शाल्वाधिपति द्युमत्सेनाचा पुत्र. यास अश्वांचा फारच नाद असल्या मुळें चित्राश्व म्हणत हा मातीचीं अश्वांचींच चित्रें करी व भिंतीवरहि अश्वांचींच चित्रें काढी. हा अल्पायु होता. परंतु याची पत्नी सावित्री महान् पतिव्रता होती, तिनें आपल्या पातिव्रताच्या प्रभावानें यास यमाच्या हातांतून सोडविलें व दीर्घायु केलें. ( सावित्री शब्द पहा )

**सत्यव्रत**-शाकद्वीपांतील लोक विशेष [५,२०,२७]

( २ ) सत्यसेन अवताराचा एक अनुचर [ ८,५,२५ ]

( ३ ) एक प्राचीन राजा. याचें प्रलयाच्यावेळीं मत्स्यावतारानें रक्षण केलें. हाच या मन्वंतरांतील वैवस्वत मनु [ ८,२४,१० व ९,१,२ ]

( ४ ) त्रिशंकूचें नामांतर [ ९,७,४ ]

( ५ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र. याला सत्यसंध असें नांव होतें.

( ६ ) संशप्त त्रिगर्तांपैकीं एक.

**सत्यश्रवा**-सूर्यवंशीय नरिष्यन्त कुलांतील वीतिहोत्राचा पुत्र याचा पुत्र उरुश्रवा [ ९,२,२० ]

( २ ) उपरिचर वसुपुत्र प्रत्यग्राचें नांव

( ३ ) एक ब्रह्मर्षि.

( ४ ) अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय एक राजा.

**सत्यसंध**-धृतराष्ट्र पुत्र सत्यव्रताचें नांव

**सत्यसहा**-( स्वधाम पहा ) [८,१३,२९]

**सत्यसेन**-उत्तममन्वंतरांतील धर्म व सूनृता यांपासून झालेला अवतार [८,१,२५]

( २ ) अर्जुनानें मारिलेला दुर्योधन पक्षीय एक राजा.

( ३ ) नकुलानें मारिलेला एक कर्ण पुत्र

**सत्यहित**-सोमवंशीय उपरिचर वसूच्या कुलांतील ऋषभाचा पुत्र. याचा पुत्र पुष्पवान् [ ९,२२,७ ]

**सत्या**-ऋषभ देववंशीय मन्थूची पत्नी. भौवनाची माता [ ५, १५, १५ ]

( २ ) कोसल देशीय नग्नजिताची कन्या. हिला नाग्नजितीही म्हणतात. हिच्या स्वयंवर प्रसंगीं सात मस्त वृषभांस एकाच वेळीं जिंकावें असा पण लावला होता, तो पण जिंकून श्रीकृष्णानें हिला वरिलें [ १०,५८,३२-४७ ] वीर, चंद्र, अश्वसेन, चित्रगु, वेगवान,वृष,आम,शंकु, वसु, कुन्ति हे हिचे पुत्र [ १०, ६१, १३ ] स्वविवाह वृत्तांत कथन. [ १७, ८३,१३]

( ३ ) सत्यभामेस संज्ञा.

( ४ ) शंयु नामक अग्नीची स्त्री.

( ५ ) जरासंधाची माता.

( ६ ) अयोध्येंतील एक स्थान.

**सत्यांग**-प्लक्षद्वीपांतील लोक [ ५,२०,४ ]

**सत्यानृत**-वाणिज्यवृत्ति [ ७, ११, १८ ]

**सत्यायु**-सोमवंशीय पुरुरव्याच्या सहा पुत्रांतील तिसरा [ ९, १५, १ ]

**सत्याषाढ**—एक ब्रह्मर्षि.

**सत्येयु**—सोमवंशीय पुरुकुलांतील रौद्राश्वाचा पुत्र [ ९,२०,४ ]

**सत्येषु**—संशप्तक त्रिगर्त बंधुपैकीं एक.

**सत्र**—यज्ञ विशेष [ १,१, ४ ]

**सत्राजित्**—यदुवंशीय सात्वतकुलांतील निम्नाचा पुत्र. याचा भाऊ प्रसेन व कन्या सत्यभामा यास सूर्यानें स्यमंतकमणि दिला होता. यास शतधन्व्यानें मारिलें [९,२४,१३,व१०,५५,३ ] [ १०,५७,५ ]

**सत्रायण**—( बृहद्भानु पहा ) [८,१३,१५]

**सत्व**—रैवत मनूच्या दहा पुत्रांपैकीं एक.

**सत्ववत्**—एक ऋषि.

**सत्ववती**—भारतवर्षीय एक नदी.

**सद्**—यज्ञमण्डपाचा एक भाग [ ४,५,१४ ]
( २ ) आंगिरस देशांतील एक.

**सदश्व**—एक ब्रह्मर्षि.

**सदस्य**—ऋत्विज विशेष [ १०,७५,२२ ]

**सदस्यवान्**—अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**सदस्योर्मि**—एक राजर्षि.

**सदाकांता**—भारतवर्षीय एक नदी.

**सदानीरा**—करतोया नदीस नामांतर.

**सदाशिव**—शंकरास नांव. [ ८,७,१९ ]

**सद्यकल्प**—ब्रह्मदेवाच्या चालु कल्पांतील. होऊन गेलेला नववा दिवस.

**सद्योजात**—शंकराचें नांव अथवा अवतार.

**सनक**—ब्रह्मदेवाच्या चार मानस पुत्रांपैकीं एक. [ ३,१२,४ ]

**सनत्कुमार**—सनकाचा भाऊ यानें सांख्यायनाला भागवत सांगितलें [३,८,७]

**सनत्सुजात**—यानें धृतराष्ट्राला ब्रह्मविद्येचा उपदेश केला ( भा. उद्योग.)

**सनद्वाज**—विदेहवंशीय शुचिराजाचा पुत्र. याचा पुत्र ऊर्ध्वकेतु [ ९,१३,२२]

**सनन्दन**—ब्रह्मदेवाच्या चार मानस पुत्रांपैकीं एक. [ ३,१२,४ ]

**सनकादि**—ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र त्यांची नावें, सनक, सनन्द, सनातन, व सनत्कुमार [ ३,१२,४ व ४,८,१ ] हे नेहमीं पांच सहा वर्षांच्या बालकाप्रमाणेंच दिसतात. हे एकदां वैकुण्ठाला गेले असतां द्वारपालांनीं यांस प्रतिबंध केला. म्हणून यानीं त्यांस शाप दिला [ ७,१,३५ ]

**सनातन**—ब्रह्मदेवाच्या चार मानस पुत्रांपैकीं एक [ ३,१२,४ ]

**सन्त**—सत्य ऋषीचा पुत्र. श्रवाऋषिचा पिता

**सन्तति**—सोमवंशीय काश्यकुलांतील अलर्काचा पुत्र. याचा पुत्र सुनाथ. [ ९,१७,८ ]

**सन्ततेयु**—सोमवंशीय रौद्राश्वाच्या दहा पुत्रांतील सहावा [ ९,२०,४ ]

**संतर्दन**—केकयदेशाधिपति धृष्टकेतु व श्रुतकीर्ति यांचा पुत्र [ ९,२४,३८ ]

**सन्तान**—भारतवर्षीय एक क्षेत्र.

**सन्तानक**—एक पर्वत. ( भा. उद्योग. )

**सन्तोष**—तुषित देवांपैकीं एक.
( २ ) स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीचा पुत्र हर्ष, त्याचें नांव.

**सन्दंश**—सुवर्णादि धातु चोरणारास मिळणारा नरक [ ५,२६,१९ ]

**सन्धि**—इक्ष्वाकुवंशीय कुशकुलांतील प्रसुश्रुताचा पुत्र. याचा पुत्र अमर्षण [ ९,१२,७ ]

**संध्या**—भारतवर्षीय एक नदी.
( २ ) सालंकटंकटेची माता.

**सन्नातमान्**–द्विमीढकुलांतील सुमतीचा पुत्र याचा पुत्र कृति [ ९,२१,२८ ]

**सन्नती**–ब्रह्मदत्त राजाची पत्नी. हिला गौ, सरस्वति अशीं नांवें होतीं.

**सन्नादन**–रामसेनेंतील एक वानर.

**संनिवेश**-त्वष्टाप्रजापति व रचना यांचा एक पुत्र [ ६,६,१४ ]

**संनिहान्**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**संन्यास** चतुर्थ आश्रम. हा भगवंताच्या मस्तकापासून झाला [११,१७,१४]

( २ ) सामवेदोपनिषत.

**सप्तगोदावरी**-गोदावरी नदी सप्तप्रवाहरूपानें समुद्रास मिळते, तिचें नांव. [ १० ७९,१२ ]

**सप्तचरु**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**सप्तजनाश्रम** – पंपासरोवर व किष्किंधा नगरी यांच्यामध्यें सात ऋषि तप करीत असल्यामुळें त्या स्थानास मिळालेलें नांव ( वा. रा. किष्किंधा)

**सप्तजित्**-दनु-पुत्र एक दानव.

**सप्तजिव्ह**–अग्नीस नांव [ ५,२०,२ ]

**सप्तपाताल**-( पाताल शब्द पहा. )

**सप्तपुरी**-अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंती आणि द्वारका.

**सप्तमहाद्वीपें**-( द्वीप शब्द पहा. )

**सप्तमहाद्वीपाधिपति**-प्रियव्रताच्या दहा पुत्रांपैकीं तीन विरक्त झाले, बाकी राहिलेले सात. आग्नीध्र, इध्मीजिव्ह, यज्ञबाहु, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, मेधातिथि, आणि वीतिहोत्र यांस नांव

**सप्तमहासागर**–क्षारसमुद्र, इक्षुरसोद, सुरा समुद्र, घृतोद, क्षीर समुद्र, दधिमण्डोद आणि शुद्धोद.

**सप्तमातृका**-ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी, चामुंडा.

**सप्तवती**–भारतवर्षीय नदी [ ५,१९,१८ ]

**सप्तशृंग**–नाशिक जिल्ह्यांत असलेलें सह्याद्रि पर्वतांतील एक शिखर. हें समुद्रसपाटी पासून ४६५९ फूट उंच असून येथें देवीचें स्थान आहे.

**सप्तसप्ती**-सूर्यास एक नांव.

**सप्तसागरतीर्थ**-मतंग ऋषीच्या आश्रमाजवळचें तीर्थ.

**सप्तसारस्वत**–सुप्रभा, कांचनाक्षी, विशाल मनोरमा, ओघवती, सुरेणु आणि विमलावती असे सरस्वती नदीचे सात प्रवाह ज्या ठिकाणीं झाले आहेत, त्याचें नांव. येथें मंकणक ऋषींचा आश्रम होता.

**सप्तस्रोत**-सप्तर्षींच्या संतोषार्थ जेथें अलकनंदा सप्तप्रवाहरूप झाली तें ठिकाण [ १, १३, ५१ ]

**सप्तस्वर्ग**-भूलोक ( मृत्युलोक ), भुवर्लोक ( अंतरिक्षलोक ), स्वर्गलोक ( इंद्राचा लोक ), महर्लोक ( भृग्वादि ऋषींचा लोक ), जनो लोक ( सनकादिकांचा लोक ), तपो लोक ( तपस्वी व सिद्ध त्यांचा लोक ) आणि सत्यलोक ( ब्रह्मदेवाचा लोक ), हे पृथिवीच्या ऊर्ध्वभागीं आहेत.

**सप्ताश्व**–सूर्यास नांव.

( २ ) रैवत मन्वंतरांतील सप्तर्षिंपैकीं एक

**सभानर**–सोमवंशीय अनूचा पुत्र. याचा पुत्र कालानल [ ९.२३,१ ]

**सभापति**-दुर्योधनपक्षीय एक राजा. याला नकुलपुत्र शतानीकानें मारिलें. याला भूतकर्मा नांव होतें ( भा. द्रोण. )

**सभ्य**-पवमानअग्नि व संशति यांचा पुत्र.

**सम**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

(२) हंसध्वज राजाचा एक पुत्र.

**समंग**—सरळ झाल्यावर अष्टावक्रास मिळालेलें नांव (भा. शांति.)

(२) दुर्योधनाचा आचारी (भा.वन.)

**समंगा**-मधुविला नदी. अष्टावक्रानें स्नान करून तो सरळ झाल्यामुळें या नदीस हें नांव मिळालें. (भा. वन.)

**समन्तर**-भारतवर्षीय एक देश.

**समन्थ**- ,, ,,

**समरथ**-विदेहवंशीय क्षेमधीचा पुत्र. याचा पुत्र सत्यरथ [ ९,१३,२४ ]

**समसौरभ**-जनमेजयाच्या सर्पसत्रांतील एक सभासद ऋषि.

**समाधि**-एक वैश्य ( सुरथ शब्द पहा )

**समान**-शरीरांतील पंचप्राणांपैकीं नाभीचे ठिकाणीं असणारा प्राण

**समानकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांत होऊन गेलेला सतरावा दिवस.

**समितिंजय**-भारती युद्धांतील दुर्योधन पक्षीय एक राजा.

**समीक**-एक ऋषि.

**समीची**-शापानें मगरी झालेली अप्सरा. ( नारीतीर्थ शब्द पहा. )

**समुद्रसेन**-पांडवपक्षीय एक राजा. याचा पुत्र चंद्रसेन.

**संपाति**-कश्यपपुत्र अरुणाचा ज्येष्ठ पुत्र, व जटायूचा भाऊ. एकदां हे दोघे भाऊ सूर्यमण्डलास आधीं कोण पोंचतो, अशा प्रतिज्ञेनें निघाले असतां, सूर्याच्या प्रखर तापानें दोघांसही पीडा होऊं लागली. तेव्हां त्या तापापासून रक्षण करण्याकरता यानें आपले पंख जटायूवर पसरले, पण त्यामुळें याचे पंख दग्ध होऊन हा महेंद्र पर्वतावर पडला. तेथें चंद्रमा मुनीचें यास दर्शन होऊन त्याच्या उपदेशानें याचें समाधान झालें. पुढें अंगदादि वानर दक्षिणसमुद्रतीरीं सीताशोधासाठीं येऊन प्रायोपवेशन करीत असतां, याची व त्यांची भेट झाली, आणि त्यांच्याकडून जटायूच्या मरणाचा वृत्तांत ऐकून यानें बंधूचें उत्तर कार्य केलें व स्वतःचा देह सोडिला. याला सुपार्श्व, बभ्रु, शीघ्रग इत्यादि अनेक पुत्र होते. (अध्या. रा.)

(२) किष्किंधेंत राहणारा एक वानर.

(३) बिभीषणाचा एक अमात्य.

(४) लंकेंतील रावण पक्षीय एक राक्षस

(५) दुर्योधन पक्षीय एक राजा.

**संभूति**-चाक्षुष मन्वंतरांतील अजित अवताराची माता [ ८.५,९ ]

(२) इक्ष्वाकुवंशीय वसुदाचा पुत्र याचा पुत्र त्रिधन्वा

(३) अनुवंशीय जयद्रथाची पत्नी, विजयाची माता

**सम्भेद**-सिंधुसागर संगमाजवळील तीर्थ.

**संमर्दन**-यदुवंशीय वसुदेव व देवकी यांचा एक पुत्र [ ९, २४, ५४ ]

**संयम**-सूर्यवंशीय दिष्टकुलांतील धूम्राक्षाचा पुत्र. याला सृंजय असेंही नांव आहे. याचे पुत्र कृशाश्व आणि देवज [ ९,२,३४ ]

**संयमन**-शल राजास नामांतर.

**संयमन**–मानसोत्तर पर्वतावरील दक्षिणेकडील यमाची नगरी [ ५,२१,७ ] सांदिपनीचा मृतपुत्र आणण्याकरितां श्रीकृष्ण येथें गेला होता [ १०,४५,४२ ]

**संयाति**–नहुषाचा एक पुत्र [ ९,१८, १ ]
( २ ) पुरुकुलांतील बहुगवाचा पुत्र. याचा पुत्र अहंयाति [ ९, २०, ३ ]
( ३ ) कश्यपकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**संयोधकण्टक**–वश्रवणाचा एक सेवक.

**सरक**–भारत वर्षीय एक तीर्थ.

**सरघा**–ऋषभदेववंशीय बिंदुमानाची पत्नी. [ ५, १५, १५ ]

**सरद्वत**–आंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**सरमा**–दक्षकन्या, व कश्यपाची एक पत्नी [ ६, ६, २६ ]
( २ ) बिभीषणाची पत्नी. शैलूष गंधर्वाची कन्या ही सीतेला रामाचें कुशल वृत्त कळवीत असे. हिची माता मानससरोवरासमीप प्रसूत झाली असतां, त्या सरोवराचें पाणी पावसामुळें इतकें वाढलें कीं, ते या बालकापर्यंत आलें. तेव्हां हिची आई-'भो सर, मा वर्धस्व' ( हे सरोवरा वाढू नको) असें म्हणाली म्हणून हिला सरमा असें नांव मिळालें.

**सरमाण**–सिंहिकेचा एक पुत्र.

**सरयू**–एक नदी. उगम–हिमालय. ही आग्नेय कोशल, अंग, या देशांतुन वहात जाऊन गंगेस मिळते. हिच्या कांठीं अयोध्या शहर आहे. हिला शरयू असेंहि म्हणतात [५,१९,१८]

**सरल**–( सुरू ) एक वृक्ष [ ४,६,१४ ]

**सरल**–वीरवर्म्याचा पुत्र.

**सरस्वती**-ब्रह्मदेवाची शक्ती. हिला गायत्री, सावित्री, हीं नांवें असून ही वाणीची देवता होय ! [ १,२,४ ]
( २ ) एक नदी. ही अंबाला जिल्ह्याच्या सरहद्दीवरील सिरमूर संस्थानांत उगम पावून पतियाळ संस्थानांत घग्गर नदीस मिळते. हिला भोगावती असेंहि नांव आहे सरस्वती नदीचे सात प्रवाह असून त्यांतील देशास सप्तसारस्वत नांव आहे. हिचा ओघवती नामक प्रवाह भारतीयुद्धाच्या वेळीं कुरुक्षेत्राजवळ वहात असत त्याला अरुणा नदी मिळाली होती. अरवली पर्वतांत उगम पावून कच्छच्या रणांत याच नांवाची एक नदी उतरते. प्रयागास गंगा–यमुनास गुप्तरूपाने मिळणारी या नांवाची एक नदी आहे [ ५, ९,१८ ] व्यासाचा आश्रम या नदीवर होता [१,४,१५ बलराम तीर्थयात्रेकरितां आला होता [ १०,७८,१८ ] यानदींत त्रित उशना, मनु, पृथु, अग्नि, असित वायु, सुदास, गाइ, कार्तिकेय, श्राद्धदेव इत्यादि तीर्थें आहेत. विदुर येथें यात्रेस आला होता [ ३,१,२२ ]
( ३ ) शाल्मलीद्वीपांतील एक नदी [ ५,२०,१० ]
( ४ ) सावर्णिमन्वंतरांतील सार्वभौम अवताराची माता [ ८,१३,१७ ]
( ५ ) स्वायंभुमनूची पत्नी शतरूपेचें नामांतर. ही दण्डनीति इत्यादि शास्त्रांची कर्त्री आहे ( भा. शांति. )

**सरस्वती**–सप्तर्षींकरितां झालेल्या भागी-रथीच्या सप्तप्रवाहांतील एक.

( ७ ) यजुर्वेदोपनिषत्.

( ८ ) ब्रह्मदत्ताची पत्नी गौ अथवा सन्नति तिचें नामांतर.

**सरूपा**–भूतनामक ऋषीची पत्नी[६,६,१७]

**सर्ग**–( उत्पत्ति ) महापुराणाच्या दशलक्ष-णांपैकीं एक [ २,१०,१ ]

**सर्प**–( प्राणिविशेष ) अवधूताचा एक गुरु [ ११,७,३४ ]

( २ ) एका रुद्राचें नाव.

**सर्पदेवी**–भारत वर्षीय एक तीर्थ.

**सर्पमाली**–एक ऋषि.

**सर्पसत्र**–जनमेजयानें केलेलें एक सत्र [ १२,६,१७ ]

**सर्वकर्मा**–सर्वकामाचें नामांतर.

**सर्वकाम**–सूर्यवंशीय ऋतुपर्ण राजाचा पुत्र. यास नल, व सर्वकर्मा हीं नांवें होतीं. हा शूद्राप्रमाणें वागला होता [ ९,९,१६ ] ( भा. शांति. )

**सर्वगत**–पाण्डुपुत्र भीम व काली यांचा पुत्र [ ९,२२,२३ ]

**सर्वतेजस**–उत्तानपादवंशीय व्युष्ट व पुष्करिणी यांचा पुत्र. याची पत्नी आकूती व पुत्र चक्षु [ ४,१३,१४ ]

**सर्वतोभद्र**–सुपार्श्व पर्वतावरील देवांचें उद्यान [ ५,१६,१४ ]

( २ ) क्रौंचद्वीपांतील पर्वत[५,२०,२१]

**सर्वदमन**–दुष्यंत पुत्र भरतास नांव.

**सर्वमंगला**–पार्वतीस नांव.

**सर्वसार**–यजुर्वेदोपनिषत.

**सर्वहर**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**सर्वौषधि**–कैलास पर्वताच्या आग्नेयीकडील एक शिखर.

**सलंक**–विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**सवन**–प्रियव्रताच्या दहा पुत्रांतील एक. हा विरक्त होता [ ५,१,२६ ]

**सविता**–द्वादशादित्यांपैकीं पांचवा.

**सवर्णा**–दहा प्रचेत्यांची माता. शतद्रुतीचें नामांतर. याची पत्नी पृश्नि; यास सावित्री, व्याहृती, त्रयी, अग्निहोत्र, पशु,सोम, चातुर्मास्य,पंचमहायज्ञ हीं अपत्यें होतीं [ ६,६,२९व६,१८,१ ]

( २ ) चालूमन्वंतरांत होऊन गेलेला पांचवा व्यास.

**सव्यसाची**–अर्जुनास नांव [१०,७२,१३]

**सवेधस**-भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**संवत्सर**–( वर्ष ) पंचसंवरांतील एक भेद [ ५,२२,७ ]

**संवरण**–सोमवंशीय अजमीढ पुत्र ऋक्षाचा मुलगा. याची पत्नी तपती व पुत्र कुरु [ ६,६,४१ व ९,२२,३ ]

**संवर्त**–चालू मन्वंतरांतील अंगिराऋषीचा पुत्र. याला मरुत्त राजानें आपल्या यज्ञांत पुरोहित केलें होतें [९,२,२९]

( २ ) स्वायंभुव मन्वंतरांतील अंगिरा-ऋषीचा पुत्र. यानें जेथें तप केलें त्यास संवर्तवापी हें नांव मिळालें.

( ३ ) प्रलय मेघांतील पहिला.

**संवर्तक**–प्रलयकालचा अग्नि [ १२,४.९ ]

**संवर्तवापी**–भारतवर्षीय तीर्थ. येथें संवर्त ऋषीनें तप केलें.

**संवेद्य**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**संशाति**–पवमानअग्नीची पत्नी.

**संशप्तक**–युद्धांत प्रतिज्ञा करून एखाद्या योध्याशीं युद्ध करणारा. भारती-युद्धांत अर्जुनाबरोबर युद्ध करणारे

दोन संशप्तक होते. एक त्रिगर्तराजाचे सुशर्मा, सुरथ, सुधनु, सुबाहु, आणि सुधन्वा असे पांच पुत्र, आणि सत्यवर्मा, सत्यरथ, सत्यव्रत, सत्येषु व सत्यकर्मा हे पांच राजे. यांनी क्रमाक्रमाने अर्जुनास युद्धास बोलाविलें, पण त्या सर्वास अर्जुनानें मारिलें. ( भा. द्रोण. )

( २ ) वनवासांत असतां अर्जुनानें मारिलेला एक दैत्य.

**संश्रुत्**-विश्वामित्रकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**संश्रुत्य**- ,, ,,

**सस्मित्**-उत्तममन्वंतरांतील सप्तर्षीपैकीं.

**संसारमोचन**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**संसृति**-संसार [ १,७,२२ ]

**सह**-प्राणनामक वसूचा पुत्र [ ६,६,१२ ]

( २ ) श्रीकृष्ण व लक्ष्मणा यांचा एक पुत्र [ १०,६१,१५ ]

( ३ ) ( मार्गशीर्ष ) एक महिना [ १२,११,४१ ]

( ४ ) उत्तम मनूचा एक पुत्र.

**सहजन्य**-आषाढ महिन्यांत वरुण नामकसूर्याबरोबर फिरणारा यक्ष [ १२,११,३६ ]

**सहजन्या**-प्राधाकन्या एक अप्सरा.

**सहदेव**-इक्ष्वाकुवंशीय संयमाचा पुत्र. याचा पुत्र कृशाश्व [ ९,२,३४ ]

( २ ) इक्ष्वाकुवंशिय कुशकुलांतील दिवाकाचा पुत्र. याचे पुत्र बृहदश्व व भानुमान् [ ९,१२,११ ]

( ३ ) क्षत्रवृद्धकुलांतील हर्यवनाचा पुत्र. याचा पुत्र हीन [ ९,१७,१७ ]

( ४ ) पुरुकुलांतील सुदासाचा पुत्र. याचा पुत्र सोमक [ ९,२२,१ ]

( ५ ) पुरुकुलांतील जरासंधाचा पुत्र. यास सोमापि, मार्जारि आणि मेघसंधी, असे तीन पुत्र होते. हा भारतीयुद्धांत पाण्डवांकडे होता. याच्या रथाचे अश्व कबऱ्या रंगाचे असत. हा द्रोणाचार्याकडून मारिला गेला [ ९,२२,९,व१०,७२,४८ ]

( ६ ) पांडुराजाची पत्नी माद्रीला अश्विनीकुमारांच्या मंत्रप्रभावामुळें झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याला द्रौपदीपासून श्रुतकर्मा व विजयेपासून सुहोत्र असे दोन पुत्र झाले [९,२२, २८-३०-३१ ] हा धनुर्वेदांत द्रोणाचार्याचा शिष्य होता. हा खड्ग युद्धांत निपुण होता. यास अश्वशास्त्राचें उत्तम ज्ञान होतें. राजसूय यज्ञाच्या वेळीं दक्षिणदिग्विजय [१०,७२,१३ ] राजसूय यज्ञांत हा पूजेच्या कार्यावर होता, श्रीकृष्णाची अग्रपूजा करण्यास यानेंच सुचविलें होतें [ १०, ७५, ४ व १०, ७४, १८ ] अज्ञात वासांत तंतिपाल हे नांव धारण करून विराटाच्या अश्वशालेवर हा राहिला होता (भा. विराट.) याच्या रथाचे अश्व तित्तिरी पक्ष्याच्या रंगाचे असत, व ध्वजावर हंस असे. याचा शंख मणिपुष्पक. (भा. द्रोण.) धर्मराजाबरोबर महाप्रस्थानाला जातांना हा पतन पावला [१,१५,४५]

( ७ ) वसुदेव व ताम्रा यांचा एक पुत्र.

**सहदेवा**-देवकाची कन्या व वसुदेवाची पत्नी. हिचे पुत्र पुरु, विश्रुत इत्यादि [ ९,२४,२३-५२ ]

**सहरक्ष**–पावक नामक अग्नीचा पुत्र. याचा पुत्र क्रव्याद.

**सहस्**-( मार्गशीर्ष ) एक महिना [ १२,११,४१ ]

**सहस्य**-( पौष ) एक महिना.

**सहस्राचित्य**-केकय राजा शतयूप, त्याचा पितामह. यानें आपल्या प्राणांचेंहि दान केलें होतें. ( भा. अश्व. अनु. )

**सहस्रजित्**-यदूचा एक पुत्र. याचा पुत्र शतजित् [ ९,२३,२० ]
( २ ) श्रीकृष्ण व जांबवती यांचा पुत्र [ १०,६१,११ ]

**सहस्रज्योति**-सूर्यास संज्ञा.

**सहस्रपात्**-एक ऋषि. हा शापानें डुंडुभ नामक सर्प झाला होता. रुरुशीं संवाद झाल्यावर यास मोक्ष मिळाला
( २ )पाण्डवांबरोबर द्वैत वनांत असलेला एक ऋषि.

**सहस्रमुख**-शेषाचें नांव.

**सहस्रमुखरावण**-पुष्करद्वीपांतील सहस्र मुखांचा एक राक्षस. ( वा. रा. )

**सहस्रवाक्**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**सहस्रश्रुति**-शाल्मलीद्वीपांतील एक पर्वत [ ५,२०,१० ]

**सहस्रस्रुति**-शाकद्वीपांतील एक नदी [ ५,२०,२६ ]

**सहस्रस्रोत**-शाकद्वीपांतील एक पर्वत [ ५,२०,२६ ]

**सहस्राजित्**-यदुवंशीय भजमानाच्या दुसऱ्या पत्नीचा एक पुत्र [ ९,२४,८ ]

**सहस्रानीक**-पाण्डवकुलांतील शतानीकाचा पुत्र. अश्वमेधाचा पिता [९,२२,३९]

**सहस्रार्जुन**-हैहय कुलांतील कृतवीर्याचा पुत्र [९,१५,१७] (कार्तवीर्य पहा )

**सहस्राश्व**-कुशकुलांतील अहीनराचा पुत्र याचा पुत्र चंद्रावलोक.

**सहानीक**-पाण्डवपक्षीय एक राजा.

**संहार**-अष्टभैरवांतील एक.

**सहिष्णु**-स्वायंभुवमन्वंतरांतील पुलहऋषीच्या तीन पुत्रांपैकीं एक [४,१,३८ ]
(२) चाक्षुष मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक

**सह्य**-एक पर्वत. हा दक्षिण हिंदुस्थानाच्या पश्चिमकिनाऱ्यानें मुंबई इलाखा, म्हैसुर, कुर्ग, मद्रासइलाखा यांतून थेट केपकामोरिनपर्यंत गेला आहे. याची उंची प्रायः चार हजार फूट आहे. पण मलबारांत याची उंची तीन हजार फुटांपासून नऊ हजार फुटांपर्यंत आहे. याचें सर्वांत उंच शिखर जें अनई तें ८८३७ फूट उंच आहे. याचेपासून गोदावरी, भीमरथी, कृष्णा, कृष्णवेर्णा, वेण्या, मंजुळा, तुंगभद्रा, सुप्रयोगा, बाह्या, कावेरी इत्यादि नद्या निघाल्या आहेत [ ५,१९,१६ ] ( मत्स्य. )

**संऱ्हाद**-हिरण्यकशिपू व कयाधु यांचा एक पुत्र. याची पत्नी कृति व पुत्र पंचजन [ ६,१८,१३ ]

**संऱ्हादि**-एक राक्षस.

## सा

**सागर**-सगराचे वैदर्भीपासून झालेले ६०००० पुत्र. हे कपिलाच्या कोपाग्नीनें दग्ध झाले ( भा. वन. )
( २ ) सगर पुत्रांमुळें समुद्रास नांव.

**सागरध्वज**-पांड्य देशाधिपति राजा. हा भारती युद्धांत पांडवाकडे होता. ( भा. द्रोण. ) याचा पिता व बंधु यांस कृष्णानें मारिलें होतें.

**साग्नि**-पितरांतील एक भेद [ ४, १, ६३]

**सांकर्षण**-प्रलयकालीं भीषण स्वरूप धारण करणारा रुद्र [ ५, २५, ३ ]

**सांकृति**-रंतिदेवास नांव.

**सांकृत्य**-भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**सांख्य**-कपिलाकृत पंचवीस तत्वांच्या विचारांचे एक शास्त्र [ १, ३, १० ]

**सांख्यायन**-वसिष्ठ कुलांतील ब्रह्मर्षि. शेष परंपरेंतील भागवताचा सनत्कुमाराचा शिष्य. हा परमहंस होता [३,८,७]
( २ ) एक ऋषि. गायत्रीमंत्राचे गोत्र.

**सात्यक**-सात्वत कुलांतील शिनीचा पुत्र. याचा पुत्र युयुधान [ ९,२४,१३ ]

**सात्यकि**-सात्यकपुत्र युयुधानाचें नांव [१,१०,१८] (युयुधान शब्द पहा)

**सत्राजिती**-सत्राजिताची कन्या सत्यभामा.

**सात्वत** विष्णूचा एक पार्षद [८,२१,१६]
( २ ) यदुवंशीय आयूचा पुत्र. यास सात पुत्र होते. याच्या नांवावरून याच्या कुलास हें नांव मिळालें [ ९, २४, ६, व ३, १, २९ ]

**सात्वतांपति**-भक्तांचा संरक्षक.

**साधित**-विश्वामित्रकुलांतील एक ब्रह्मर्षि.

**साध्य**-चाक्षुमन्वंतरांतील धर्मऋषि व साध्या यांचे पुत्र. हे सप्तविध देवांपैकीं देव होत [ ६,६,७ ] त्यांचीं नांवें-मन, उर्मनु, प्राण, नर, उषान, वीर्यवान्, चित्तहार्य, अयन, हंस, नारायण, विभु आणि प्रभु (मत्स्य.)
( २ ) चाक्षुष मनूचा पुत्र [६,६,१५]
( ३ ) तामसमन्वंतरांतील देवविशेष.

**साध्या**-प्राचेतस दक्षाची कन्या व धर्मऋषीची पत्नी. [ ६,६,४ ]

**सानुप्रस्थ**-रामसेनेंतील एक वानर.

**सान्दीपनि**-काश्यकुलांतील उज्जनीस राहणारा एक ऋषि. याचेकडे बलराम व श्रीकृष्ण अध्ययनार्थ आले होते. गुरुदक्षणार्थ श्रीकृष्णानें याचा मृत पुत्र यास परत आणून दिला होता [ १०,५५,३१ व ३,३,२ ]

**साम**-चारवेदांपैकीं तिसरा. हा ब्रह्मदेवाच्या पश्चिममुखापासून उत्पन्न झाला. याचा उपवेद गांधर्व. हा व्यासानें जैमिनीस शिकविला [ ३,१२,३७; १,४,२० व १२,६,५३ ] याच्यापासून छंदःशास्त्राची उत्पती झाली.

**सामग**-सामवेदाचें गायन करणारे ब्राह्मण.

**सामलोमकी**-आंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.

**साम्ब**-श्रीकृष्ण व जाम्बवती यांचा पुत्र [ १०, ६१, ११ ] स्वयंवरप्रसंगीं दुर्योधनकन्या लक्ष्मणेचें हरण व कौरवांकडून बंधन [ १०,६८,१ ] हा महारथी होता [ १०,९०,३४ ] याला यादवांनी स्त्रीवेष देऊन ऋषींची थट्टा करण्याच्या उद्देशानें त्यास प्रश्न केला. ऋषींनीं हिच्या पोटीं मुसळ होईल व त्या मुसळानें यादवांचा संहार होईल असा शाप दिला [११,१,१४] प्रद्युम्नाबरोबर युद्ध व मृत्यु [ ११, ३०, १६ ] ( स्त्रीवेष घेणारा जाम्बवतीचा पुत्र सांब नसून दुसरा एखादा यादव असावा असें प्रा. पै. कोशकार म्हणतात. कारण त्यावेळीं जाम्बवतीचा पुत्र लहान नव्हता. )
(२) अंबेसहित असलेल्या शंकरास नांव.
( ३ ) एक ब्रह्मर्षि. ( भा. आश्रम. )

**सांभवाह**–अगस्त्य गोत्रांतील एक कुल.
**सायकायनि**–अंगिराकुलांतील ब्रह्मर्षि.
**सायं**–( सायंकाल ) [ १,३,२९ ]
( २ ) उत्तानपादवंशीय पुष्पार्ण व प्रभा यांचा पुत्र [ ४,१३,१३ ]
( ३ ) धाता नामक सातवा आदित्य व कुहू यांचा पुत्र [ ६,१८,३ ]
**सायंमनि**–दुर्योधनपक्षीय शल राजाचा पुत्र. यास धृष्टद्युम्नानें मारिलें.
**सारण**–वसुदेव व रोहिणी यांचा एक पुत्र [ ९,२४,४६ ]
( २ ) एक यादव [ १०,७६,१४ ]
( ३ ) लंकेंतील एक राक्षस.
( ४ ) रावणाचा एक अमात्य.
**सारमेय**–श्वफल्क व गांदिनी यांचा एक पुत्र [ ९,२४,१६ ]
**सारमेयादन**–पांथस्थास लुटणारास प्राप्त होणारा एक नरक [ ५,२६,२७ ]
**सारवाह**–अगस्त्य गोत्रांतील ऋषि व कुल.
**सारस**–एक पक्षी [३,२१,२३ ]
( २ ) जटायूचा पुत्र.
**सारस्वत**–एक देश. इंद्रप्रस्थाच्या पश्चिमेस सरस्वतीकांठचा प्रदेश [१,१०,३४]
( २ ) ब्रह्मकन्या सरस्वतीचा पुत्र. यास अपांतरतम, प्राचीनगर्भ, अशीं नामांतरें होतीं. हा स्वायंभुव मन्वंतरांतील वेदाचार्य होता.
( ३ ) एका अत्रिऋषीचा पुत्र.
( ४ ) भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.
( ५ ) अलंबुषा अप्सरेच्या दर्शनानें दधीचि ऋषीस झालेला पुत्र. याचें पालन सरस्वती नदीनें केलें. चालू मन्वंतराच्या नवव्या पर्ययांतील हा व्यास असावा. एकदां बारा वर्षे अवर्षण पडलें असतां, वेदाध्ययन केलेले सर्व ब्राह्मण प्रायः नष्ट झाले. त्यावेळीं सरस्वतीनें यास मत्स्याहार देऊन वांचविलें होतें. यानें अध्ययनार्थ आलेल्या साठ हजार ऋषींस चारी वेद शिकविले. ( भा. शांति.)
( ६ ) कौशिक ऋषीच्या सात शिष्यांपैकीं एक. ( वा. रा. अद्भुत. )
( ७ ) भारतवर्षीय एक तीर्थ.
**सारस्वतकल्प**–ब्रह्मदेवाच्या चालु मासांत होऊन गेलेला बारावा दिवस.
**सारस्वतपूर**–वीरवर्माराजाचें नगर,
**सारिमेजय**–वृष्णिकुलांतील एक यादव.
**सार्द्धनेमि**–अंगिराकुलांतील एक ब्रह्मर्षि.
**सार्द्धसुग्रीवि**– ,, ,,
**सार्पि**–भृगुकुलांतील एक ब्रह्मर्षि.
**सार्वभौम**–देवगुह्य व सरस्वती यांपासून झालेला सावर्णिमन्वंतरांतील अवतार. [ ८,१३,१७ ]
( २ ) कुरुकुलांतील विदूरथाचा पुत्र. याचा पुत्र जयसेन [ ९,२२,१० ]
**सालंकटंकटा**–विद्युत्केशराक्षसाची पत्नी, व संध्यानामक स्त्रीची कन्या.
**सालंकायन**–विश्वामित्रकुलांतील एक ऋषि
**सालीड**–अंगिराकुलांतील एक ऋषि.
**साल्वेय**–एक पर्वत. ( वा. रा. )
**सावर्णि**–विवस्वान् आदित्य व छाया यांचा पुत्र. चाक्षुष मन्वंतरांत सुरथ नामक एक देवीउपासक राजा होता, तोच ह्याच्या रूपानें जन्मास आला. हा पुढें होणारा आठवा मनु [ ६,६,४१ ] ( दे. भा. ) याच्या मन्वंत-

रांत निर्मोक, विरजस्क इत्यादि नांवानीं धृति, वरीयान्, यवस, सुवर्ण, वृष्टि, चरिष्णु, ईड्य, सुमति, वसु आणि शुक्र हे पुत्र, व सुतपस, विरज, अमृतप्रभ हे देव, बलि इंद्र, गालव, दीप्तिमान्, परशुराम, अश्वत्थामा, कृपाचार्य, ऋष्यशृंग आणि कृष्ण द्वैपायनव्यास हे सप्तर्षि आणि सार्वभौमनामक अवतार होईल. [ ८, १३, ११ ते १७ ]

(२) साठहजार वर्षे तप केलेला एक ऋषि

**सावर्णिक**–भृगु कुलांतील एक ब्रह्मर्षि.

**सांवर्तक**–प्रलय मेघांतील एक मेघ १,७,३१ व १०,२५,२ ]

**सावित्र**–एक रुद्र.

( २ ) अष्ट वसुंपैकीं एकाचें नांव. यानें रावणाचा मातामह सुमालीस मारिलें होतें. ( वा. रा. उत्तर. )

( ३ ) कर्णास नांव.

**सावित्री**–प्लक्षद्वीपांतील नदी [ ५,२०,४ ]

( २ ) सविता व पृश्नि यांची कन्या [ ६,१८,१ ]

( ३ ) ब्रह्मदेवाची पत्नी.

( ४ ) मद्रदेशाधिपति अश्वपतीची कन्या. ही महापतिव्रता होती. केवळ पातिव्रत्याच्या जोरावर हिनें मृतपतीस जिवंत करून जगांतील सर्व ऐश्वर्याचा उपभोग घेतला होता. य संबंधानें महाभारतांत अशी कथा आहे कीं, संततीच्या प्राप्तीस्तव अश्वपतीनें अठरा वर्षें सावित्रीची उपासना केली असतां यज्ञ कुंडांतून सावित्री प्रत्यक्ष प्रगट झाली, व तिनें ' कन्या होईल' असा वर दिला त्या वरानुरूप हिचा जन्म झाला हीं उपवर झाल्यावर आपल्या वडिलांच्या वृद्ध मंत्र्यास बरोबर घेऊन वरशोधार्थ प्रवासास निघाली. देशोदेश व वनोपवनें फिरत असतां ज्या वनांत द्युमत्सेन राजा राज्यरहित होत्सातां अंधस्थितींत राहात होता त्या तपोवनांत गेली. त्याचा पुत्र सत्यवान दरिद्रावस्थेंत अरण्यांतील कष्ट सोसून मातापित्याची सेवा करीत असलेला हिनें पाहिला, व त्यास मनानें वरिलें आणि स्वगृहीं येऊन हें वर्तमान वडिलांस विदित केलें. राज्यहीन झालेल्या व अंधत्व पावलेल्या अशा दरिद्री राजाच्या पुत्रास आपली कन्या देणें अश्वपतीस आवडलें नाहीं. त्यानें दुसऱ्या एखाद्या वराची निवड करण्याविषयीं हिला सांगितलें. या वेळीं नारद ऋषींचें आगमन तेथें झालें. त्यांनीं सत्यवानाच्या गुणाचें वर्णन केले, पण तो अल्पायु असल्याचें सांगितलें. परंतु सावित्रीचा निश्चय ढळला नाहीं. हिनें स्पष्ट सांगितलें कीं, ज्यास मी एकवार मनानें वरिलें त्या व्यतिरिक्त इतर सर्व पुरुष मला बंधुसमान होत. मुलीचा निश्चय पाहून अश्वपतीनें हिचा विवाह सत्यवानाबरोबर लावून दिला. ही पतीबरोबर त्या तपोवनांत राहून सासू, सासरा व पति यांची सेवा करून आनंदानें कालक्रमण करीत असतां नारदांनीं भविष्य कथन केलेला सत्य-

वानाचा मृतदिन येऊन ठेपला. त्या दिवशी पतिसांनिध्यावाचून किंचितहि दूर रहावयाचें नाहीं असा हिनें निश्चय केला आणि नको नको म्हणत असतांही ही पतीबरोबर लांकडें आणण्याकरितां अरण्यात गेली अरण्यांतील फुलें व कंदमुळें एकत्र केल्यावर सत्यवान झाडाचें लांकूड तोडीत असतां मस्तक तशूळ उत्पन्न होऊन तो खाली बसला. हीच ती मृत्यूची वेळ, हें सावित्रीच्या ध्यानात आलें, तिनें चटकन पतीचें शीर मांडीवर घेतलें, मन एकाग्र केलें व अंतःकरणात परमेश्वराचें ध्यान आरंभिलें. सावित्रीची अपूर्व पतिभक्ति पाहून प्रत्यक्ष यमराज तेथें प्राप्त झाले त्यांस पाहताच सावित्रीनें साष्टांग नमस्कार केला, यम प्रसन्न झाले व म्हणाले,–सत्यवानाच्या प्राणावांचून अन्य वर वाटल तो मागून घे. हिनें सासऱ्यास पुन्हां दिव्य दृष्टि मागितली. यम तथास्तु म्हणाले, परंतु यमराजाचे चरण ही सोडीना, तेव्हां आणखी काय पाहिजे म्हणून यम म्हणाले; आपल्या श्वशुराचें गेलेलें राज्य त्यांस परत मिळाव अशी हिनें दुसरी मागणी केली, तीही यमानें मान्य केली तथापि सावित्री चरण सोडीना तेव्हां यमराज म्हणाले, ह्या सत्यवानाच्या आत्म्याशिवाय आणखी हवें तें माग. सावित्री म्हणाली –'देवा मी आपली कन्या आहे, सतती विरहित मी आपलें आयुष्य कसें कंठूं ? मला व माझ्या मातेला शंभर पुत्र व्हावे अशी इच्छा आहे.' सावित्रीच्या पातिव्रत्यप्रभावानें मूढबुद्धि झालेल्या यमराजानें ह्याही वरास 'तथास्तु' म्हटलें, व तो जाऊं लागला. तेव्हां सावित्री हात जोडून विनीत भावानें म्हणाली,–'महाराज, आपण माझ्या पतीच्या आत्म्याला घेऊन जाणार तर मला आपल्या आशिर्वादाप्रमाणें शंभर पुत्र कसे होणार ?' हे शब्द ऐकतांच यमराज स्तंभित झाले ! सावित्रीनें पातिव्रत्य बळावर आपणास चकविलें हे जाणलें त्यांनीं तिच्या चातुर्याची वाहवा केली, व सत्यवानाच्या आत्म्यास मुक्त करून ते स्वस्थानीं निघून गेले. सावित्री आनंदानें पतीसह स्वगृहीं येतांच यमराजाच्या वराप्रमाणें हिच्या श्वशुरास दिव्य दृष्टि व स्वराज्याचा प्राप्ती झाली आणि वडिलास व स्वतःस शंभर पुत्राची प्राप्ति होऊन दीर्घकाल संतति, संपत्ती व ऐश्वर्य यांचा उपभोग घेतला (भा.व.)

**सावित्रीकल्प**–चालू ब्राह्ममासांतील होऊन गेलेला चोविसावा दिवस.

**साश्व**–एक राजर्षि.

**सासीस**–कश्यप कुलांतील ऋषि,

**सहादेवी**-सहदेवाचा पुत्र. विशेषतः पांचाल कुलांतील सहदेव पुत्र सोमक.

**साहरि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**साहुल**–विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

## सि

**सिकताक्ष**-सिंधुदेशसंबंधि सैंधवारण्यांतील तीर्थ.

**सिद्ध**–प्राधेचा पुत्र एक गंधर्व.

**सिद्धदेश**–भारतवर्षीय एक नदी.

**सिद्धपद**–एक क्षेत्र. येथें देवहूतीला सिद्धि मिळाली [ ३,३३,३१ ]

**सिद्धपूर**–मातृगयेचें स्थान. बडोदें संस्थानात राजपुताना माळवा रेल्वेचें एक स्टेशन. हें ठिकाण मातृगया म्हणून प्रसिद्ध आहे. येथें सरस्वती पूर्वाभिमुख होते. येथें बिंदुसरोवर, अल्पासरोवर व ज्ञानवापी हीं तीन तीर्थें आहेत. हिंदुस्थानच्या पवित्र सरोवरांपैकीं बिंदुसरोवर हें एक आहे

**सिद्धारण्य**–सिद्ध देशांतील एक अरण्य.

**सिद्धार्थ**–भारतीयुद्धातील कौरवपक्षीय राजा

**सिद्धाश्रम**–हा आश्रम मलद आणि करूषक या दोन देशांच्यामध्ये आहे. वामनावतार येथचें झाला. रामलक्ष्मणानीं येथेंच ताटकेचा नाश करून विश्वामित्राच्या यज्ञाचें संरक्षण केलें. ( वा. रा. )

**सिद्धि**–भग नामक सहाव्या आदित्याची पत्नी [ ६,१८,२ ]

(२) वीरनामक अग्नि व शरयू यांचा पुत्र.

**सिद्धिदा**–देवहूती नदीरूप झाल्यावर तिला मिळालेलें नांव [ ३,३३,३२ ]

**सिनीवाली**–स्वायंभुव मन्वंतरांतील अंगिरा ऋषि व श्रद्धा यांची कन्या [४,१,३४]

(२) शाल्मलीद्वीपांतील नदी [५,२०,१०]

( ३ ) धातानामक आदित्याची एक पत्नी. हिचा पुत्र दर्श [ ६,१८,३ ]

( ४ ) कर्दमपत्नी देवहूतीचें नामांतर

( ५ ) चालु मन्वंतरांतील बृहस्पति व शुभा यांची एक कन्या.

**सिन्धु**–एक नद [ ५,१९,१८ ] हा तिबेटांत उगम पावून काश्मीर, वायव्यसरहद्दप्रांत, पंजाब, सिंध या भागांतून अरबीसमुद्रास मिळतो. याची लांबी १८०० मैल आहे. हा कैलास पर्वताच्या उत्तरेकडून निघतो. याच्या उगमाजवळ मानस सरोवर आहे. याचा उगम समुद्र सपाटीपासून सतरा हजार फूट उंच आहे. अटकेपर्यंत ८६० मैल आल्यावर याला काबूल नदी मिळते. याला मिथ कोटच्या वरच्या बाजूस झेलम, चिनाब, रावी, बिआस, व सतलज या नद्या मिळतात

( २ ) सप्तर्षींच्या संतोषार्थ झालेल्या भागीरथीच्या सात प्रवाहापैकीं एक

( ३ ) एक देश ( हल्लींचा सिंधप्रांत ) हा मरुधन्व देशाच्या पश्चिमेस असून याचे जवळ सौवीर देश आहे. पाण्डवांच्या वेळीं येथें जयद्रथ राजा होता.

( ४ ) नदी. उगम–पारियात्र पर्वत.

**सिंधुद्वीप**–सूर्यवंशीय भगीरथ पुत्र नाभाचा मुलगा. याचा पुत्र अयुतायु [९,९,१६]

**सिंधुसौवीर**–सिंधु देशास सौवीर देशामुळें प्राप्त झालेलें नांव [ ५,१०,१ ]

**सिंह**–श्रीकृष्ण व लक्ष्मणा यांचा एक पुत्र [ १०,६१,१५ ]

(२) रामाच्या सुज्ञनामक मंत्र्याचा पुत्र.

**सिंहकेतु**–एक राक्षस.

( २ ) कर्णानें मारिलेला चेदि पुत्र. पाण्डव पक्षीय एक राजा.

**सिंहचंद्र**–भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा.

**सिंहपूर**-चित्रायुध राजाचें नगर (भा. सभा)

**सिंहल**-जंबूद्वीपाच्या आसमंतात असणाऱ्या अष्टउपद्वीपांपैकीं दक्षिणेकडील असणारें द्वीप. दशरथाच्या वेळीं येथें चंद्रसेन राजा होता [ ५,१९,३० ]

**सिंहसेन**- द्रोणाचार्यांनें मारिलेला पाण्डव पक्षीय गोपति नामक पांचालाचा पुत्र. याच्या रथाचे अश्व श्वेत रक्त वर्णाचे असत.

( २ ) कर्णानें मारिलेला पाण्डवपक्षीय एक राजा.

**सिंहिका**-हिरण्य कशिपूची कन्या व विप्रचित्ति दानवाची पत्नी [ ६,६,३७ व ६,१८,१३ ]

( २ ) कश्यपाची एक स्त्री.

**सीतवन**-भारत वर्षीय एक वन.

**सीता**-स्वर्धुनीच्या चार प्रवाहांतील पूर्वेकडील प्रवाह. हा गंधमादन पर्वतावरून भद्राश्व वर्षांतून वहात जाऊन क्षीर समुद्रास मिळतो [५,१७,५-६ ]

( २ ) लक्ष्मीचा अवतार, जनक कन्या व रामपत्नी. विदेह वंशीय सीरध्वज जनक राजा यज्ञार्थ भूमि नांगरीत असतां, त्यास ही सांपडली- [ ९, १३, १८ व ९, १०, ६ ] जनक राजानें कन्येप्रमाणें हिचें संगोपन केलें. हिच्या स्वयंवर प्रसंगीं जनकानें धनुर्भंगाचा पण लावला होता. तो पण रामानें जिंकल्यामुळें हिनें रामाला वरिलें आणि पतिबरोबर अरण्यवास स्वीकारिला. अरण्यांत असतां रावणानें हिचे मायावी स्वरूपानें हरण केलें आणि आपणास वश व्हावें म्हणून अनेक प्रयत्न केले पण ते सर्व निष्फळ झाले. रामावर हिची पूर्ण भक्ति होती. रावणाच्या बंदिवासांत असतांना केवळ रामनामावर हिनें शरीराचें व पातिव्रत्याचें रक्षण केलें पुढें रामानें रावणाचा वध करून हिची मुक्तता केली त्यावेळीं रामाज्ञेनें अग्नीत प्रवेश करून पुन्हां दिव्य देहानें ही प्रगट झाली व रामाबरोबर अयोध्येंत आली, आणि दीर्घ काल पतीबरोबर संसारसुखाचा उपभोग घेतला एकदां एका रजकानें हिच्या पातिव्रत्यासंबंधानें घेतलेला अपवाद रामाच्या कानावर गेला; व लोकापवादाच्या निरसनार्थ रामानें हिला लक्ष्मणाच्या हस्तें वाल्मिकीच्या आश्रमाजवळ सोडलें. ह्या वेळीं ही गरोदर होती. येथें असतांना ही प्रसूत झाली हिचीं मुलें कुश व लव या नांवानें प्रसिद्धीस येऊन रामाच्या अश्वमेधप्रसंगीं त्यांनीं रामलक्ष्मणासह सर्वांचा पराभव केला. शेवटीं वाल्मीकि ऋषीनें त्यांची ओळख पटवून त्यांस रामाच्या स्वाधीन केलें. या प्रसंगीं ही भूमिकन्या भूमींत अदृश्य झाली (वा.रा.)

( ३ ) सप्तऋषींच्या संतोषार्थ भागीरथीचे जे सात प्रवाह झाले त्यापैकीं एक प्रवाह.

( ४ ) अथर्वण वेदोपनिषत्.

**सीरध्वज**-विदेहवंशीय ह्रस्वरोमाचा पुत्र. हा यज्ञासाठीं भूमि नांगरीत असतां त्याच्या नांगराच्या फाळाला एक

पेटी सांपडली. त्या पेटींत एक सुंदर कन्या होती. तीच सीता होय. याप्रमाणें सीर म्हणजे नांगर हा याच्या कीर्तीचा ध्वज झाल्यामुळें यास सीरध्वज हें नांव पडलें [९,१३,१८] ही सीता, रामाची पत्नी. याची कन्या ऊर्मिला ती लक्ष्मणास दिली होती.

**सुकंदक**–भारतवर्षीय देश (भा. भीष्म.)

**सुकन्या**—सूर्यवंशीय शर्यातीची कन्या [ ९,३,२ ] ( च्यवन शब्द पहा )

( २ ) मंकणक ऋषीची माता.

**सुकर्मा**—देवसावर्णि मन्वंतरांतील देव [ ८,१३,३१ ]

( २ ) यदुकुलांतील श्वफल्क व गांदिनी यांचा पुत्र [ ९,२४,१६ ]

( ३ ) जैमिनीचा सामवेदाचा शिष्य. यानें सामवेदाच्या सहस्र शाखा केल्या [ १२,६,७६ ]

**सुकाली**–पितृगणांतील एक भेद. हे वसिष्ठ-ऋषीचे पुत्र असून शूद्र जातीचे पितर होत.

**सुकुण्डल**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**सुकुमार**–सोमवंशीय काश्यकुलांतील धृष्ट-केतूचा पुत्र. याचा पुत्र वीतिहोत्र [ ९, १७, ९ ]

( २ ) पूर्वदिग्विजयांत भीमानें जिंक-लेल्या दोन पुलिंद राजापैकीं एक.

**सुकुमारा**–नदी. उगम–शुक्तिमान पर्वत.

**सुकृत्**–चाक्षुष मन्वंतरांतील एक प्रजापति.

( २ ) उत्तानपादवंशीय पृथुराजाच्या एका पुत्राचें नामांतर.

( ३ ) ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतील सप्तर्षी पैकीं एक.

**सुकेतन**–काश्यकुलांतील सुनीथाचा पुत्र. याचा पुत्र धर्मसेतु [ ९, १७, ८ ]

**सुकेतु**-विदेहवंशीय नंदिवर्धनाचा पुत्र. याचा पुत्र देवरात [ ९, १३, १४ ]

( २ ) एक यक्ष. ताटकेचा पिता.

( ३ ) रामाच्या सुज्ञ प्रधानाचा पुत्र.

( ४ ) भारती युद्धांतील पाण्डवपक्षीय चित्रकेतूचा पुत्र. यास कृपाचार्यांनें मारिलें. ( भा. कर्ण. )

( ५ ) द्रोणाचार्यांनें मारिलेला पाण्डव-पक्षीय शिशुपालाच्या पुत्रांतील एक.

**सुकेश**–विद्युत्केश राक्षस व सालंकटंकटा यांचा पुत्र. हा रुद्रगण झाला (वा.रा.)

**सुकेशी**–एक अप्सरा.

**सुक्षत्र**-भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा

**सुख**–स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषि व शांति यांचा पुत्र [ ४, १, ५१ ]

**सुखनिल**–पाण्डववंशीय नृचक्षूचा पुत्र. यास सुखीबल असेंहि नांव आहे. याचा पुत्र परिप्लव [ ९,२२,४१ ]

**सुगत**–बौद्ध किंवा त्याचे अनुयायी.

**सुगति**–ऋषभदेव वंशीय गय व गयंती यांचा पुत्र [ ५,१५,१४ ]

( २ ) हंसध्वज राजाचा प्रधान.

**सुग्रीव**-ऋक्षराज वानराचा कनिष्ठ पुत्र व वालीचा भाऊ. हा सूर्यापासून जन्मला होता. वालीनें यास हांकून दिल्यावर हनुमान इत्यादि अमात्यांसह हा ऋष्यमूक पर्वतावर राहिला होता. राम–लक्ष्मण तेथें आले असतां यानें मारुतीच्या सहाय्यानें त्यांच्याशीं सख्य केलें आणि रामाच्या सहाय्यानें वाला-चा वध करून किष्किंधेचें राज्य संपा-

दन केलें आणि वालीचा पुत्र अंगद यास युवराज पद दिलें. सीतेचा शोध करण्याचे कामीं आणि राम-रावण युद्धांत यानें आपल्या सर्व वानर-सेनेसह रामाला पूर्ण साह्य दिलें. याची पत्नी रुमा, हा रामाबरोबरच निजधामास गेला [ ९,१०,१६ ] द्विविद नांवाचा वानर याचा अमात्य होता [ १०,६७,२ ]

( २ ) श्रीकृष्णाच्या रथाच्या चार अश्वांपैकीं एक [ १०,८९,४९ ]

**सुग्रीवी**-कश्यप व ताम्रा यांची एक कन्या.

**सुघोष**-पाण्डुपुत्र नकुलाचा शंख.

**सुचक्षु**--भागीरथीच्या सप्तप्रवाहांतील एक प्रवाह यास जंबुनदी असेंहि नांव आहे.

**सुचंद्र**--एक यादव [ १०,८२,६ ]

( २ ) प्राधा पुत्र एक गंधर्व.

( ३ ) चार सैंहिकेयांतील एक.

( ४ ) सूर्यवंशीय हेमचंद्राच्या पुत्राचें नांव

**सुचारु**-श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा पुत्र [ १०,६१,८ ]

**सुचित्ति**-अंगिरा कुलांतील एक ऋषि.

**सुचित्त**-द्रोणाचार्यानें मारिलेला पाण्डवपक्षीय चित्रवर्मा राजाचा पिता.

( २ ) ताम्रध्वज राजास नामांतर.

**सुचीरा**-श्वफल्क यादव व गांदिनी यांची कन्या [ ९,२४,१७ ]

**सुचता**-गृत्समदाचा पुत्र. याचा पुत्र वर्चा

**सुच्छत्री**-पंजाबांतील सतलज नदी.

**सुच्छाया**-ध्रुवपुत्र शिष्टाची पत्नी. हिला कृप, रिपुंजय, वृत वृक पुत्र होते.

**सुजन**-बारा भार्गव देवांतील एक.

**सुजन्य** " "

**सुजय**-अश्वमेध प्रसंगीं पाण्डवांस सहाय्य करणारा राजा. ( जै. अ. )

**सुजातवक्र**-एक ऋषि.

**सुजाता**-उद्दालक ऋषीची कन्या. कहोडाची पत्नी व अष्टावक्राची माता.

**सुजातेय**-विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**सुज्येष्ठ**- मौर्यकुलानंतर झालेल्या अभिमित्राचा पुत्र [ १२ १,१६ ]

**सुनंजय**-भारतीयुद्धांतील कौरवपक्षीय राजा

**सुतनु**-वसुदेवाची एक स्त्री.

( २ ) अक्रूराची एक स्त्री.

**सुतपा**-सावर्णि मन्वतरांतील देव [८,१३,१२]

( २ ) सूर्यवंशीय अंतरिक्ष राजाचा पुत्र. अमित्रजिताचा पिता [ ९,१२,१२ ]

( ३ ) अनुकुलांतील हेम राजाचा पुत्र याचा पुत्र बलि [ ९,२३,४ ]

(४) एक प्रजापति. हाच वसुदेव रूपानें जन्माला आला होता [१०,३,३२]

**सुतल**-सप्तपातालांतील एक बलीचें स्थान [ ५,२४,७ व ८,२३,९ ]

**सुतश्रवा**-एक ब्रह्मर्षि.

**सुतसोम**-भीमपुत्र श्रुतसेनाचें नांव.

**सुतार**-अनुशाल्व राजाचा प्रधान.

**सुतीक्ष्ण**-अगस्त्य ऋषीचा शिष्य. याच्या आश्रमांत राम राहिला होता.

**सुतीर्थ**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**सुतेजन**-पाण्डवपक्षीय राजा ( भा. द्रोण.)

**सुतेजा**-इक्ष्वाकुवंशीय सुदेवाचा एक पुत्र.

**सुत्रामा**-देवसावर्णि मन्वंतरांतील देव [ ८, १३, ३१ ]

**सुदक्षिण**-पौण्ड्रक वासुदेवाचा मित्र जो काशीचा राजा, त्याचा पुत्र. याच्या पितयास श्रीकृष्णानें मारिल्यामुळें

त्याचा सूड उगविण्याकरितां यानें रुद्रास प्रसन्न करून त्याजकडून प्रथम नामस्मरणासह [illegible] विलें व त्यास द्वारका नगरीवर सोडलें. त्यानें द्वारका नगरी जाळण्यास सुरुवात केली. हा प्रसंग पहातांच श्रीकृष्णानें त्यावर सुदर्शन चक्र सोडलें. सुदर्शनचक्र येतांच अग्नि मागें परतला व त्यानें सुदक्षिण राजासह काशी नगरीचा नाश केला.

( २ ) अर्जुनानें मारिलेला दुर्योधन. पक्षीय कांबोज देशाचा राजा

**सुदक्षिणा**—इक्ष्वाकु वंशीय अंशुमान पुत्र दिलीपाची पत्नी.

**सुदर्शन**—विष्णूचें आयुध [ १, ८, १३ ]

( २ ) भीष्माकडे आलेला एक ऋषि [ १, ९, ७ ]

( ३ ) ऋषभदेव पुत्र भरत व पंचजनी यांचा एक पुत्र [ ५,७,३ ]

( ४ ) एक राजा. याची पत्नी ओघवती [ ९,२,१८ ] हा अतिथि सत्कारांत अत्यंत दक्ष असे. एकदां हा अरण्यांत गेला असतां, याच्या अपरोक्ष मृत्यु ब्राह्मण स्वरूपानें याचें सत्व पाहण्याकरितां आला. त्यावेळीं याची पत्नी ओघवती, त्याचा सत्कार करून काय इच्छा म्हणून तिनें विचारिलें असतां ब्राह्मणानें रतिसंभोगाची इच्छा प्रगट केला. अतिथीस विन्मूख जाऊं द्यावयाचें नाहीं, असा राजाचा नियम असल्यामुळें तिनें त्याचें म्हणणें मान्य करून त्याची इच्छा पूर्ण करण्यास ही सिद्ध झाली. उभयतां एकांतांत रममाण झालीं आहे, तोंच हा बाहेरून आला, व हीस हांक मारूं लागला. अतिथीच्या रतिसुखांत व्यत्यय येऊं नये म्हणून तिनें पतीच्या हाकेस उत्तर दिलें नाहीं. कार्य होतांच तिनें दार उघडलें तों तीं उभयतां याच्या दृष्टीस पडलीं. ब्राह्मणानें यास पहातांच क्षमेची याचना केली. व आपल्या हातून अनुचित कर्म घडलें त्याबद्दल आपणास शिक्षा करण्यास सांगितलें. हा म्हणाला—अतिथींची इच्छा पूर्ण करणें हा आमचा धर्म आहे. माझ्या येण्यानें कांहीं व्यत्यय आला असल्यास आपणच मला क्षमा करावी. याप्रमाणें याचें औदार्यपूर्ण भाषण ऐकतांच मृत्यु प्रत्यक्ष रूपानें प्रकट झाला, आणि ' राजा तूं मला जिंकलेंस ' असें म्हणून त्यानें याचा जयजयकार केला आणि ओघवतीला अर्धस्वरूपानें जगदोद्धारार्थ नदीचें रूप दिलें आणि अर्धस्वरूपानें तिच्यासह यास स्वर्गाला घेऊन गेला.

( ५ ) इक्ष्वाकु वंशीय ध्रुव संधीचा पुत्र याचा पुत्र अग्निवर्ण. [ ९,१२,१५ ] याची पत्नी काशीच्या सुबाहु राजाची कन्या शशिकला. यास लहानपणीं भरद्वाजाश्रमांत रहावें लागलें होतें. हा मोठा पराक्रमी व देवीभक्त होता ( दे. भा. )

( ६ ) एक विद्याधर. हा अंगिरा ऋषीच्या शापामुळें सर्प झाला होता. अंबिकावनांत कृष्णाच्या हातून याचा उद्धार झाला [ १०,३४,१२ ]

**सुदर्शन**–जम्बूद्वीपास नामांतर (भा. भीष्म)
( ८ ) भारतवर्षीय एक सरोवर (वा.रा)
( ९ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र
( १० ) सात्यकीनें मारिलेला दुर्योधनपक्षीय एक राजा ( भा. द्रोण. )
( ११ ) हंसध्वज राजाचा एक पुत्र.

**सुदर्शना**-सूर्यवंशीय दुर्योधन राजाची कन्या सुदर्शनाची माता.

**सुदंष्ट्र**–रामसेनेंतील एक बलाढ्य वानर.

**सुदामा**–श्रीकृष्णाचा मित्र एक गोप. [ १०, २२, ३१ ]
( २ ) मथुरेंतील एक माळी. हा कृष्णभक्त होता. यानें श्रीकृष्णाचा सत्कार केला. [ १०, ४१, ४३ ]
( ३ ) गुरुकुलांतील श्रीकृष्णाचा मित्र, हा अत्यंत दरिद्रि होता, परंतु निरिच्छ असल्यामुळें ईशभक्तींत समाधान वृत्तीनें कालक्रमणा करीत असे. श्रीकृष्णाची भेट घेतल्यास तो आपलें दारिद्र्य दूर करील अशा भावनेनें याच्या पत्नीनें कृष्णास देण्याकरितां मूठभर पोहे एका फाटक्या चिंधींत बांधून देऊन याची रवानगी कृष्णाकडे केली. या निमित्तानें तरी श्रीकृष्णाचें दर्शन आपणास होणार अशा हेतूनें हा ती मुठभर पोह्यांची पुरचुंडी घेऊन द्वारकेस आला. आपला बालमित्र व गुरुबंधु आलेला पहातांच कृष्णानें आपल्या अनेक राण्यांसह याचें अपूर्व स्वागत केलें आणि यानें नेलेल्या मूठभर पोह्यांचा सर्वांनीं प्रेमानें स्वीकार केला. श्रीकृष्णाचें तें अपूर्व प्रेम पाहून यास धन्यता वाटली. दोन दिवस पाहुणचार झाल्यानंतर हा कृष्णाचा निरोप घेऊन घरीं जावयास निघाला. कृष्णानें निरोप दिला, पण कांहीं द्रव्य वगैरे दिलें नाहीं. घरीं गेल्यावर बायकोस काय उत्तर द्यावें, हा प्रश्न याच्या मनास जाचूं लागला, पण कृष्णाच्या भेटीचा आणि त्याच्या अपूर्व स्वागताचा आपणास लाभ झाला ह्या आनंदांत मग्न होत्साता हा आपल्या गांवाजवळ आला. परंतु तेथें येतांच यास आपलें तें मूळचें गाव इंद्रपुरी प्रमाणें सुवर्णमय झालेलें दिसलें. आश्चर्यानें चकित होऊन हा विचार करीत आहे, तों वस्त्रालंकारांनीं व दासदासींनीं भूषित झालेली याची स्त्री पंचारती घेऊन यास सामोरी आली. श्रीकृष्णाच्या कृपेचा हा अघटीत प्रकार पाहून हा ब्राह्मण श्रीकृष्णचरणीं लीन होत्साता निरिच्छ भावनेनें सर्व ऐश्वर्याचा उपभोग घेता झाला (स्कंध१० अध्याय ८०ते८१)
(४) भारतवर्षीय देश. याची राजधानी मोदापुर.
( ५ ) याच देशाचा राजा. हा भारतीयुद्धांत पाण्डवांकडे होता,
( ६ ) एक पर्वत.
( ७ ) सीरध्वज जनकाचा मंत्री.

**सुदामिनी**–वसुदेवाचा भाऊ शमीक त्याची पत्नी. हिचे पुत्र सुमित्र व अर्जुनपाल [ ९,२४,४४ ]

**सुदास**–सरस्वतीच्यापात्रांतील एक तीर्थ [ ३,१,२२ ]

**सुदास**-सूर्यवंशीय ऋतुपर्ण पुत्र सर्वकाम राजाचा पुत्र [ ९,९,१८ ]

( ३ ) सोमवंशीय मुद्गल पांचाल कुळां-तील च्यवनाचा पुत्र याचा पुत्र सहदेव [ ९,२२,१ ]

( ४ ) सोमवंशीय पाण्डव कुलांतील तिमि राजाचा पुत्र. याचा पुत्र शतानीक [ ९,२२,४३ ]

( ५ ) एक यवन जातीय राजा

**सुदिन**-भारत वर्षीय एक तीर्थ.

**सुदृष्ट**-भारत वर्षीय एक देश.

**सुदेव**-तुषित देवांपैकीं एक [ ४, ,७ ]

( २ ) इक्ष्वाकुवंशीय चम्प राजाचा पुत्र. याचा पुत्र विजय [ ९,८,१ ]

( ३ ) यदुवंशीय देवकाच्या चार पुत्रां-पैकीं तिसरा [ ९,२४,२२ ]

( ४ ) दाशरथि रामाच्या वेळचा विदर्भ देशाचा राजा. याचे पुत्र श्वेत व सुरथ ( वा. रा. )

( ५ ) काशीपति हर्यश्वाचें नामांतर.

( ६ ) नलदमयंतीच्या शोधास भाम-कानें पाठविलेला ब्राह्मण.

( ७ ) अम्बरीष राजाचा सेनापति. अंबरीष स्वर्गांत गेला असतां तेथें त्यानें याला पाहिलें. तेव्हां अंबरीष इंद्राला म्हणाला, 'यानें यज्ञ केल्यावांचून यास स्वर्ग कसा मिळाला' तेव्हां इंद्र म्हणाला, धर्मयुद्धांत मृत्यु पावणाऱ्यासहि स्वर्ग मिळतो ( भा. शांति. )

( ८ ) यौवनाश्व राजाचा भाऊ.

**सुदेवि**-नाभि राजाची पत्नी. व मेरुदेवीचें एक नांव [ २,७,१० ]

**सुदेष्ण**-श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा पुत्र [ १०,६१,८ ]

( २ ) भारतवर्षीय देश ( भा. भीष्म. )

**सुदेष्णा**-सोमवंशीय अनुकुलांतील बलीची पत्नी.

( २ ) पूर्वे मत्स्याधिपति विराटाची पत्नी

**सुद्यु**-सोमवंशीय पूरुकुलांतील चारुपदाचा पुत्र. याचा पुत्र बहुगव [९,२०,३]

**सुद्युम्न**-चक्षु व नड्वला यांचा एक पुत्र [ ८,५,७ ] शंखाचा भाऊ लिखित चौर्यकर्माची शिक्षा भोगण्यास याच्याकडे आला होता.

**सुद्युम्न**-वैवस्वत मनूनें पुत्र प्राप्तीस्तव केलेल्या यज्ञात त्याच्या पत्नीच्या इच्छेमुळें होत्यानें मंत्रांत बदल केला त्यामुळें त्यास पुत्र न होतां कन्या झाली. हें पाहून मनूनें वसिष्ठाला याचें कारण विचारिलें. वसिष्ठानें होत्याचा व्यतिक्रम जाणून त्या कन्येलाच पुरुषत्व येण्याकरितां पर-मेश्वराची स्तुति केली. त्यानें भग-वान संतुष्ट होऊन त्या इलेलाच पुरु-षत्व दिलें, व त्याचें नांव सुद्युम्न ठेविलें. यास इल असेंहि म्हणतात. हा एकदां मेरूपर्वताजवळच्या भागांत मृगयेला गेला असतां शंकराच्या क्रीडावनांत गेला, व तेथें आपल्या अनुययांसह स्त्रीत्व पावला. नंतर तो इकडे तिकडे फिरत असतां सोमपुत्र बुधाचें दर्शन झालें, व परस्परांचें प्रेम जडून त्यांचा विवाह झाला. त्यावेळीं झालेला पुत्र पुरूरवा. पुढें वसि-ष्ठाला ही हकीगत कळली, व त्यानें

पुन्हां इला पुरुषत्व मिळवें म्हणून शंकराची उपासना केली. शंकर प्रसन्न होऊन त्यांनीं एक महिना पुरुषत्व व एक महिना स्त्रीत्व प्राप्त होईल असा वर दिला. पुरुषत्व मिळाल्यावर सुद्युम्न परत नगरीला आला. त्याला उत्कल, गय आणि विमल असे तीन पुत्र झाले. हा प्रतिष्ठान पुरींत (प्रयागाजवळ) राज्य करीत असे. यानें आपलें राज्य पुरूरव्याला दिलें, व हा अरण्यांत निघून गेला [ ९,१,२२ ते ४३ ]

**सुधनु**-सोमवंशीय पूरुकुलांतील कुरूचा एक पुत्र. यास सुधन्वा असेंहि नांव होतें. याचा पुत्र सुहोत्र [ ९,२२,४ ]

( २ ) संशप्तकांतील एक राजा.

**सुधन्वा**-अंगिराऋषीचा एक पुत्र. केशिनी राजकन्येच्या येथें बालिपुत्र विरोचनाशीं याचा आपल्या श्रेष्ठत्वाबद्दल वाद झाला होता. त्यांत यानें त्यास जिंकिलें.

( २ ) दशरथपुत्र राम-लक्ष्मणादिकांस धनुर्वेद शिकविणारा ब्राह्मण (वा.रा.)

( ३ ) इंद्रदेशाचा एक राजा. यानें सीरध्वजजनकाजवळ सीतेची मागणी केली, परंतु यास शिवधनुष्याचा पण पुरा करितां न आल्यामुळें यानें त्याच्याशीं युद्ध केलें. त्यांत हा मृत्यु पावला, व याच्या सांकाश्या नगरींत सीरध्वजानें आपला भाऊ कुशध्वज यास राजा केलें. याचा पुत्र कंबुग्रीव. (वा.रा.बाल.)

( ४ ) दुर्योधन पक्षीय संशप्तक राजांतील एक.

( ५ ) कुरुपुत्र सुधनूचें नामांतर.

( ६ ) द्रोणाचार्यानें मारिलेला पाण्डवपक्षीय राजा. (भा.द्रोण.)

( ७ ) हंसध्वज राजाचा एक पुत्र.

**सुधर्मा**-द्वारकेतील श्रीकृष्णाच्या सभेचें नांव [ १,१४,३४ व १०,६८,३५ ]

( २ ) पृथुराजाच्या वेळचा मनुष्यजातीय दिक्पाल. ( मत्स्य )

( ३ ) इंद्रसारथि मातलीची स्त्री.

(४) पूर्व दशार्ण देशाचा राजा ( भा. )

( ५ ) अक्रूराचा एक पुत्र.

( ६ )दुर्योधनपक्षीय संशप्तकांतील एक.

( ७ ) दुर्योधनाचा एक पुरोहित.

**सुधा**-काल नामक रुद्राची स्त्री[३,१२,१३]

**सुधामा**-प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठाच्या सात पुत्रांतील चौथा व याचा क्रौंचद्वीपांतील वर्ष [ ५,२०,२१ ]

(२) चाक्षुष मन्वंतरांतीलसप्तर्षींपैकीं एक.

**सुधार्मिक**-केरल देशाचा अधिपति चंद्रहास राजाचा पिता.

( २ ) विदेहवंशीय महावीर्याचा पुत्र याचा पुत्र धृष्टकेतु [ ९,१३,१५, ]

**सुधृति**-दिष्टकुलांतील राज्यवर्धनाचा पुत्र. याचा पुत्र नर [ ९,२,२९ ]

**सुनक्षत्र**-दाशरथि रामाच्या वंशांतील मरुदेवाचा पुत्र. याचा पुत्र पुष्कर अथवा किंनराश्व [ ९,१२,१२ ]

( २ ) सोमवंशीय जरासंध कुलांतील निरमित्राचा पुत्र याचा पुत्र. बृहत्सेन [ ९,२२,४७ ]

**सुनन्द**–विष्णूचा एक पार्षद [ २,९,१४ ]

**सुनन्दन**—आंध्रसंज्ञक राजांपैकीं एक [ १२,१,२५ ]

( २ ) श्रीकृष्णाचा एक पुत्र.

**सुनन्दा**–एक नदी [ ८,१,८ ]

(२) चेदिदेशाचा राजा वीरबाहूची कन्या

( ३ ) नीलध्वज राजाची स्त्री (जै.अ.)

**सुनय**–पांडवकुलांतील पारिप्लवाचा पुत्र. याचा पुत्र मेघावि [ ९,२२, ४२ ]

**सुनसा**–भारतवर्षीय एक नदी.

**सुनाभ**–विष्णूच्या चक्राचें नांव [३,१९,५]

( २ ) लंकेंतील एक पर्वत.

**सुनामा**-कंसाचा भाऊ. यास बलरामानें मारिलें [ ९, २४, २४ ]

**सुनीति**-उत्तानपादाच्या दोन स्त्रियांतील ज्येष्ठ. हिला सूनृता असेंहि नांव होतें. हिचे पुत्र ध्रुव आणि कीर्तिमान् [ ४, ८, ८ ]

**सुनीथ**–कश्यपकुलांतील संततीचा पुत्र. याचा पुत्र सुकेतन [ ९,१७,८ ]

( २ ) जरासंधकुलांतील सुबलाचा पुत्र. याचा पुत्र सत्यजित् [ ९,२२,४१ ]

( ३ ) पांडव कुलांतील सुषेणाचा पुत्र. याचा पुत्र नृचक्षु [ ९, २२, ४९ ]

**सुनीथा**–मृत्यूची कन्या व अंगराजाची पत्नी. हिचा पुत्र वेन [ ४,१३,१८]

**सुनेत्र**–किष्किंधेंतील एक वानर.

**सुन्द**–उपसुंदाचा ज्येष्ठ भ्राता.

( २ ) ताटका राक्षसीचा पति. याचे पुत्र सुबाहु व मारीच.

**सुन्दरिका**–भारतवर्षीय एक तीर्थ.

**सुन्दरी**-नर्मदा गंधर्वीच्या तीन कन्यांतील एक. माल्यवान राक्षसाची पत्नी.

**सुन्दोपसुन्द**–हिरण्यकशिपूच्या वंशांतील निकुम्भ दैत्याचे पुत्र. यांनीं विंध्यपर्वतावर तप करून ब्रह्मदेवास प्रसन्न केलें, व आह्मां परस्परांवाचून इतर कोणाकडूनही आपणांस मृत्यु नसावा असा वर मिळविला. पुढें हे उन्मत्त होऊन सर्वांना त्रास देऊं लागले, तेव्हां इंद्रानें विश्वकर्म्याकडून तिलोत्तमा नांवाची एक अति लावण्यवती अप्सरा निर्माण करविली व ती यांच्याकडे पाठविली. तिच्या अभिलाषामुळे या दोघांचें आपसांत युद्ध होऊन हे मृत झाले.(भा.आ.दि.)

**सुन्वान्**–जैमिनिपुत्र सुमन्तूचा पुत्र यास जैमिनीनें सामवेदाची एक संहिता शिकविली [ १२,६,७५ ]

**सुपर्ण**–प्लक्षद्वीपांतील एक पर्वत [५,२०,४]

( २ ) गरुड. याची माता विनता दास्यांत असतां, तिच्या मुक्ततेकरितां अमृतकलश आणण्याकरितां हा स्वर्गलोकाला गेला. तेथें इंद्राचें व याचें युद्ध होऊन त्यांत इंद्रानें आपलें वज्र याच्यावर टाकिलें. त्याच्या सन्मानार्थ यानें आपलें एक पीस खालीं टाकलें, व अमृतकलश परत आणून देतो, असें सांगून निघून गेला. त्या पडलेल्या पर्णा ( पीसा ) चें सौंदर्य पाहून देवांनीं यास सुपर्ण नांव ठेविलें.

( ३ ) मुनिपुत्र एक गंधर्व.

( ४ ) प्राधापुत्र एक गंधर्व.

( ५ ) एक ऋषि.

**सुपर्णध्वज**–विष्णूचें नांव [ १०,५०,२२

**सुपर्णा**–ताक्ष्यर्नामक कश्यपपत्नी [६,६,२२

**सुपर्वा**-पाण्डवपक्षीय राजा. यानें रुचिपर्वा नामक दुर्योधनपक्षीय राजास मारिलें.

**सुपाटल**-रामसेनेंतील एक वानर.

**सुपार्श्व**-मेरूचा एक आधारपर्वत [५,१६,११

(२) देवमीढकुलांतील दृढनेमीचा पुत्र. याचा पुत्र सुमति [ ९,२१,२८ ]

( ३ ) दुर्योधनपक्षीय एक राजा.

( ४ ) रावणाचा एक अमात्य.

**सुपार्श्वक**-विदेहवंशीय श्रुतायूचा पुत्र. याचा पुत्र चित्ररथ [ ९, १३,२३ ]

( २ ) अक्रूर यादवाचा एक पुत्र.

**सुपुष्पित**-सूर्यवंशीय सुभवाचा पुत्र हा पाडवांच्या वेळीं कुलिंद देशाचा राजा होता.

**सुपेशकृत**-( पेशस्कृत ) ( भिंगुरटी ) [ ११, ७, ३४ व ११, ९, २३ ]

**सुप्तघ्न**-रावणपक्षीय राक्षस ( वा. रा. )

**सुप्रतीक**-कुशकुलांतील प्रतीकाश्वाचा पुत्र. याचा पुत्र मरुदेव [ ९,१२, ११ ]

( २ ) एक ऋषि. हा भावाच्या शापानें गज झाला होता (सुभद्र शब्द पहा)

**सुप्रतीप**-सूर्यवंशीय सुप्रतीकाचें नामांतर.

**सुप्रभ**-अग्नीपासून उत्पन्न झालेला एक ऋषि

**सुप्रभा**-सरस्वतीच्या सप्तप्रवाहांतील एक.

( २ ) स्वर्भानु दानवाची कन्या व नमुचि असुराची पत्नी.

( ३ ) अष्टावक्र ऋषीची पत्नी.

( ४ ) कृशाश्व प्रजापतीच्या दोन कन्यें-तील एक. जयेची भगिनी.

**सुप्रभाता**-प्लक्षद्वीपांतील एक नदी.

**सुप्रयोगा**-एक नदी. उगम-सह्याद्रि पर्वत.

**सुप्रवृद्ध**-सौवीर देशीय एक राजा.

**सुप्रिया**-प्राधाकन्या एक अप्सरा.

**सुबल**-गांधार देशाचा अधिपति. याची कन्या गांधारी, व पुत्र शकुनि, वृषक, बृहद्बल इत्यादि. [ १,१३,२९ ]

( २ ) जरासंधकुलांतील सुमतीचा पुत्र. याचा पुत्र सुनीथ [ ९,२२,४८ ]

( ३ ) बलराम-कृष्णाचा मित्र, एक गोप [१०,१५,२०,व१०,२२,३१]

( ४ ) हंसध्वज राजाचा पुत्र.

**सुबालक**-ब्रह्मदत्त राजाच्या मंत्र्याचा पुत्र.

**सुबाहु**-इक्ष्वाकुवंशीय दशरथपुत्र शत्रुघ्नाचा ज्येष्ठ पुत्र [ ९,११,१३ ]

( २ ) श्रीकृष्ण-कालिन्दीचा पुत्र [ १०,६१,१४ ]

( ३ ) प्राधाकन्या एक अप्सरा.

(४) नलाच्या वेळचा चेदिदेशाचा राजा.

( ५ ) काशीचा राजा. यानें आपली कन्या शशिकला, ध्रुवसन्धीचा पुत्र सुदर्शन यास दिली होती.

( ६ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( ७ ) रैवतमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक.

( ८ ) अक्रूराचा एक पुत्र.

( ९ ) दुर्योधनपक्षीय संशप्तक राजा-पैकीं एक.

(१०) हिमालयाच्या पायथ्याशीं अस-णारा एक किराताधिपति. पाण्डव गंधमादन पर्वतावर जात असतां, यानें त्यांचें उत्तम स्वागत केलें.

( ११ ) ताटका राक्षसीचा पुत्र. मारी-चाचा भाऊ.

( १२ ) रामसेनेंतील एक वानर.

**सुबुद्धि**-बभ्रुवाहनाचा मंत्री.

**सुभग**-सुबलराजाचा एक पुत्र. यास रात्रि-युद्धांत भीमानें मारिलें ( भा. द्रो. )

**सुभगा**-प्राधाकन्या एक अप्सरा.

**सुभद्र**-प्रियव्रतपुत्र इध्माजिव्हाचा तिसरापुत्र व याचा प्लक्षद्वीपांतील वर्ष [५,२०,३]

(२) वसुदेव व पौरवी यांचा एक पुत्र. [९,२४,४७]

(३) श्रीकृष्ण व भद्रा यांचा एक पुत्र. [१०,६१,-१७,]

(४) दक्षिणसमुद्रतीरावरील एक विशाल वट. सुप्रतीक व विभावसु हे दोघे भाऊ, परस्परांच्या शापानें कूर्म व गज झाले असतां, या दोघांस धरून खाण्याच्या इच्छेनें या वृक्षावर गरुड बसला होता. (वा.रा.अरण्य.)

**सुभद्रक**-रुद्रगणांपैकी एक गण.

**सुभद्रा**-यदुवंशीय वसुदेव व देवकी यांची कन्या, श्रीकृष्णाची भगिनी [९,२४,४५] ही श्रीकृष्णाची फार आवडती होती, आणि हिचा विवाह अर्जुनाबरोबर करावा असें त्यानें ठरविलें होतें. परंतु वडील बंधु बळराम याचा ओढा दुर्योधनाकडे असल्यामुळें त्यानें हिचा विवाह दुर्योधनाशीं निश्चित केला व त्याप्रमाणें लग्नाची सिद्धता केली. यावेळीं पांडव इंद्रप्रस्थांत होते, व अर्जुन तीर्थयात्रेस गेला होता. बलरामानें केलेला सुभद्रेच्या लग्नाचा निश्चय श्रीकृष्णास मोडता येईना, तेव्हां त्यानें अशी युक्ति काढिली कीं, नारदाकडून हें वर्तमान अर्जुनास कळविलें आणि त्यास त्रिदंडी संन्यासी होऊन रैवतक पर्वतावर येऊन बसण्यास सुचविलें. त्याप्रमाणें नारदानें अर्जुनाची भेट घेऊन श्रीकृष्णाचा हेतु त्यास कळविला. त्याप्रमाणें यतिवेश घेऊन अर्जुन रैवतक पर्वतावर ध्यानस्थ बसला. इकडे हें वर्तमान गर्गमुनीच्या द्वारें बलरामाच्या कानीं जातांच तो सपरिवार यतीच्या दर्शनास गेला, आणि यतीची ती ध्यानस्थ मूर्ति पाहून त्याची भक्ति दृढ झाली; व यतीस घेऊन तो राजवाड्यांत आला आणि त्याच्या सुश्रूषेकडे सुभद्रेची योजना केली. आपणास अर्जुन पती मिळावा या भावनेनें ती त्या यतीची मनोभावानें सेवा करूं लागली. श्रीकृष्णानें एकांतीं अर्जुनाची गांठ घेऊन सुभद्रेचें हरण कसें करावयाचें तें त्यास सांगून ठेवलें. दुसरे दिवशीं महोदय पर्वानिमित्त सर्व यादव रैवतक पर्वतावर निघाले असता हे यति महाराजहि एका स्वतंत्र रथात बसून निघाले. सुभद्रा सेवेला जवळ होती. ही संधी साधून यति महाराज कृष्णाज्ञेप्रमाणें पलायन करते झाले. यति सुभद्रेस घेऊन पळाला, हें वर्तमान बलरामास समजतांच त्यास पकडण्याकरितां त्यानें हजारों यादव पाठविले; परंतु अर्जुनानें मूळ स्वरूपांत प्रगट होऊन सर्वांचा पराभव केला, आणि त्यांस परत पाठविलें. अर्जुनानें यतीचा कपटवेष घेऊन सुभद्रेचें हरण केलें, या गोष्टीचा बलरामास अत्यंत राग आला, आणि त्यानें युद्धाची तयारी करण्याची आज्ञा दिली. परंतु श्रीकृष्णानीं त्याची

समजूत घालून सन्मानानें अर्जुनास परत आणवून त्याबरोबर सुभद्रेचा विवाह केला. हिचा पुत्र अभिमन्यु. भारतीयुद्धांत त्यानें चक्रव्यूहाचा भेद केला असतां कौरव वीरांनीं अनीतीनें त्याचा वध केला. ह्या अभिमन्यूची पत्नी उत्तरा व तिचा पुत्र परीक्षिति पांडवांचा कुलदीपक [ ९,२२,३३ ]

**सुभव**- सुपुष्पित राजाचा पिता.

**सुभानु**-सत्यभामेचा पुत्र [ १०,६१,१० ]

**सुभाल**- वीरवर्म्याचा एक पुत्र.

**सुभाषण**-विदेह वंशीय युयुधाचा पुत्र. याचा पुत्र श्रुत [ ९,१३,२५ ]

**सुभूमिक**-सरस्वती तीरावरील एक तीर्थ.

**सुभू**-वसुदेव व रोहिणी यांचा एक पुत्र.

**सुमंगल**-अत्रिकुलांतील एक ऋषि व कुल

**सुमण्डल**-अर्जुनानें दिग्विजयाच्या वेळीं जिंकलेला एक देश.

**सुमति**-ऋषभदेवपुत्र भरत व पंचजनी यांचा पुत्र. हा अवधूत मार्गानें मुक्त झाला. पाखण्डी लोक यास अवतार मानतात. याला वृद्धसेना व आसुरी अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांपासून अनुक्रमें देवताजित् व देवद्युम्न हे पुत्र झाले [ ५,१५,१ ते ३ ]

( २ ) सूर्यवंशीय नृगराजाचा पुत्र.याचा पुत्र भूतज्योति [ ९,२,१७ ]

( ३ ) सूर्यवंशीय दिष्टकुलांतील विशाल-वंशीय सोमदत्ताचा पुत्र. याचा पुत्र जनमेजय. हा दशरथाच्या वेळीं विशाला नगरींत राज्य करीत होता [ ९,२,३६ ]

( ४ ) सूर्यवंशीय सगर राजाची पत्नी हिला साठ हजार पुत्र होते. हिचें दुसरें नांव प्रभा [ ९,८,९ ]

( ५ ) पूरुकुलांतील रंतिभाराचा एक पुत्र. याचा पुत्र रैभ्य [ ९,२०,६-७ ]

( ६ ) सोमवंशीय द्विमीढ कुलांतील सुपार्श्व राजाचा पुत्र. याचा पुत्र सन्नतिमान् [ ९,२१,२८ ]

( ७ ) जरासंधकुलांतील द्युमत्सेनाचा पुत्र. याचा पुत्र सुबल [ ९,२२,४८ ]

( ८ ) युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांतील एक ऋषि [ १०,७४,८ ]

( ९ ) दाशरथि रामपुत्र लवाची ज्येष्ठ स्त्री.

( १० ) हंसध्वज राजाचा मुख्य प्रधान

( ११ ) बभ्रुवाहनाचा सेनापति.

( १२ ) आठव्या सावर्णिमनूचा एक पुत्र.

( १३ ) वरुण लोकांतील एक असुर.

**सुमध्यमा**-मदिराश्व राजाची कन्या व हिरण्यहस्त ऋषीची पत्नी.

**सुमनस**-चक्षुर्मनुवंशीय उल्मुक व पुष्करिणी यांचा एक पुत्र. [ ४,१३,१७ ]

( २ ) देवांचें साधारण नांव.

**सुमना**-ऋषभदेववंशीय मधुराजाची पत्नी, वीरव्रताची माता. [ ५,१५,१५ ]

( २ ) वरुणलोकांतील एक असुर-

( ३ ) वसिष्ठकुलांतील एक ऋषि

( ४ ) एक ऋषि.

( ५ ) केकय देशाच्या राजाची कन्या

**सुमनु** शाण्डिल्य ऋषीचा शिष्य, एक राजा

**सुमन्तु**-व्यासाचा अथर्ववेदाचा एक शिष्य [ १,४,२२ व १२,१६,५३ ]

**सुमन्त्र**-दशरथाच्या अष्टप्रधानांपैकीं एक. हा रामचंद्रास अरण्यवासाचे वेळीं भागीरथीपर्यंत पोंचविण्यास गेला होता.

**सुमल्लिक**–भारतवर्षीय एक देश.

**सुमागध**-रामाच्या सभेंतील एक हास्यकार

**सुमालि**-वृत्रासुराचा अनुयायी एक असुर [ ६,१०,२१ ]

**सुमाली**–रावणाचा मातामह एक राक्षस. याची पत्नी केतुमती, व कन्या कैकसी अथवा केशिनी (माल्यवान् शब्द पहा)

**सुमाल्य**–नंदकुलांतील दुसरा राजा [ १२,२,११ ]

**सुमित्र**–इक्ष्वाकुवंशीय सुरथाचा पुत्र. या कुलांतील शेवटचा राजा [९,१२,१५]

( २ ) सोमवंशीय यदुकुलांतील सात्वत पुत्र वृष्णीचा ज्येष्ठ पुत्र [९,२४,१५]

( ३ ) सोमवंशीय वसुदेवबंधु शमीक व सुदामिनी यांचा पुत्र [९,२४,४०]

( ४ ) श्रीकृष्ण व जाम्बवती यांचा एक पुत्र. हा यादव संहारांत मरण पावला [१०,६१,११-११,३०,१६]

( ५ ) इक्ष्वाकुवंशीय अन्तरिक्षाचा पुत्र.

( ६ ) एक राजा. याचा ऋषभऋषी-बरोबर 'आशा' या विषयावर संवाद झाला होता ( भा.शांति. )

( ७ ) पुलिंद नगराच्या राजाच्या दुसऱ्या बंधूचें नांव.

( ८ ) अर्जुनानें मारिलेला पूर्व दिशे-कडील एक राजा.

( ९ ) अर्जुनपुत्र अभिमन्यूचा सारथि

**सुमित्रा**–मगध देशाधिपति शूराची कन्या व दशरथाची एक पत्नी हिचे पुत्र लक्ष्मण व शत्रुघ्न.

**सुमुख**–नारदाबरोबर मयसभा पाहण्या-करितां आलेला एक ऋषि.

( २ ) रामसेनेंतील एक वानर.

**सुमुख**–गरुडाचा एक पुत्र ( भा. भीष्म. )

( ४ ) उन्मत्तपणामुळें नाश पावलेला एक प्राचीन राजा.

**सुमुखी**–एक अप्सरा.

**सुमेधस**–अगस्त्य कुलांतील एक ऋषि. यास सुमेधा असेंहि नांव आहे.

**सुमेधा**– एक ब्रह्मर्षि ( सुरथ शब्द पहा )

( २ ) विदेहवंशीय सीरध्वजाची पत्नी

**सुयज्ञ**-रुचि ऋषि व आकूती यांपासून झालेला भगवंताचा अवतार [२,७,२]

( २ ) उशीनर देशाचा एक प्राचीन राजा [ ७,२,२८ ]

( ३ ) वसिष्ठाचा एक पुत्र. हा दशरथाचें कधीं कधीं पौरोहित्य करीत असे.

( ४ ) रामाच्या सभेंतील एक मंत्री.

**सुयशा**–मौर्यवंशीय अशोकवर्धनाचा पुत्र याचा पुत्र संगत [ १२,१,१४ ]

**सुयोधन**–दुर्योधनास नांव [ ३,३,१३ ]

**सुरक्रन्**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**सुरजा**–प्राधा कन्या, एक अप्सरा.

**सुरता**– ,, ,,

**सुरथ**-इक्ष्वाकुवंशीय रणकाचा पुत्र. याचा पुत्र सुमित्र [ ९,१२,१५ ]

( २ ) सोमवंशीय पूरुकुलांतील कुरुपुत्र विदूरथ [ ९,२२,९ ]

( ३ ) विदर्भ देशाधिपति सुदेवाचा पुत्र

( ४ ) अश्वत्थाम्यानें मारिलेला द्रुपदपुत्र.

( ५ ) सिंधुदेशाधिपति जयद्रथ व दुःशला यांचा पुत्र. पांडवांच्या अश्वमेधाचा अश्व याच्या नगराजवळ आला, तेव्हां यानें भीतीनेंच प्राण सोडिला होता. पण श्रीकृष्णानें यास पुन्हा सजीव करून दुःशलेसह हस्तिनापुरीं यज्ञाकरितां आणिलें ( भा. )

**सुरथ**-दुर्योधनपक्षीय एक संशप्तक राजा.

( ७ ) जयद्रथाचा एक मित्र. शिबि देशाचा राजा.

( ८ ) भारतीयुद्धांतील कौरवपक्षीय राजा.

( ९ ) हंसध्वज राजाचा एक पुत्र.

( १० ) दाशरथि रामाच्या अश्वमेधाचा अश्व बांधून ठेवणारा चेदि देशाचा राजा. हा शुक्तिमति नगरींत रहात असे. यानें मारुति इत्यादि वीरांस बांधून ठेविल्यामुळें रामानें स्वतः तेथें जाऊन यास जिंकिलें, व अश्व आणि मारुति इत्यादिकांस सोडविलें.

( ११ ) स्वारोचिष मन्वंतरांतील एक राजा. याचें म्लेंच्छांशीं युद्ध झालें, त्यांत पराभव पावून हा एका घोर अरण्यांत असलेल्या सुमेधा ऋषीच्या आश्रमांत गेला. ऋषीनें याचा सत्कार करून ठेवून घेतलें. पुढें समाधि नांवाचा एक वैश्य संसारांत बायका पोरांनीं धनाचें हरण केल्यामुळें अनाथ स्थितींत त्याच आश्रमांत येऊन राहिला. ऋषीनीं दोघांची परिस्थिति लक्षांत घेऊन त्यांस देवीची आराधना करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं एकनिष्ठपणें देवीची आराधना केली असतां देवी प्रसन्न झाली व उभयतांस वर मागण्यांस सांगितलें. त्यांत वैश्यानें स्वर्गाची व यानें पृथ्वीच्या ऐश्वर्याची इच्छा दर्शविली त्यामुळें यास आपलें राज्य परत मिळालें, व वैश्य स्वर्गांत गेला. हाच पुढें आठवा सावर्णि मनु होणार आहे

**सुरथा**-अनुकुलांतील उशीनराची पत्नी हिचा पुत्र शिबि.

**सुरभ**-वीरवर्म्याचा एक पुत्र.

**सुरभि**-दक्षाची कन्या व कश्यपाची पत्नी [ ६, ६, २६ ]

( २ ) कामधेनूचें नांव [ १०,२७,१९ ]

( ३ ) कश्यपपत्नी क्रोधेची एक कन्या. हिला रोहिणी आणि गंधर्वी अशा दोन कन्या होत्या.

(४) वंशौकसारानदीच्या तीरावरील वन.

**सुरभिपत्तन**-सहदेवानें दिग्विजयाचे वेळीं जिंकलेलें एक दक्षिणेकडील नगर.

**सुरसन**-स्वर्गांतील एक वन.

**सुरसा**-भारतवर्षीय नदी. [ ५,१९, १८ ]

( २ ) दक्षकन्या-कश्यपपत्नी [ ६,६,२५ ]

( ३ ) कश्यपपत्नी कलेची एक कन्या.

( ४ ) मारुती समुद्रोल्लंघन करून लंकेस जात असतां, त्याची परीक्षा पाहण्या-करितां देवांनीं पाठविलेली एक देवता ही राक्षसीचें रूप घेऊन मार्गांत आली, व तोंडाचा जबडा पसरून मारुतीस आपल्या तोंडांत शिर असें म्हणाली. रामकार्य झाल्यावर मी तुझ्या मुखांत प्रवेश करीन, असें मारुती म्हणाला, पण ही ऐकेना. हिनें आपलें मुख दहा योजनें विस्तृत केलें तेव्हां मारुतीनेंहि आपलें शरीर तिच्या दुप्पट वाढविलें. राक्षसीनें आपलें शरीर त्याच्या दसपट वाढ-विलें. इतक्यांत मारुती चटकन अंगुष्ठ प्रमाण होऊन तिच्या मुखांत शिरला व बाहेर पडून हिला नमस्कार केला. मारुतीचें चातुर्य पाहून ही संतुष्ट झाली, व रामकार्यांत तूं यशस्वी होशील, असा हिनें मारुतीस वर दिला. ( वा. रा. )

**सुरा**–वरुण व ज्येष्ठा यांची कन्या.

( २ ) समुद्रमंथनकालीं निघालेली मद्याची देवता. सुरानीं प्रथम अमृत समजून स्पर्श केला म्हणून मद्याला हें नांव मिळालें. ( मत्स्य. )

**सुराजि**–रामसभेंतील एक हास्यकार.

**सुरापीथ**–विश्वरूपाच्या तीन मस्तकांपैकीं एक [ ६,९ १ ]

**सुरायण**–वासिष्ठकुलांतील एक ऋषि.

**सुरारि**–भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजा.

**सुराष्ट्र**–( काठेवाड. ) हिंदुस्थानच्या नैर्ऋत्य विभागांतील प्राचीन देश. सहदेवानें दक्षिणादिग्विजयांत जिंकला होता. याच्या नैर्ऋत्येकडे शूर्पारक देश आहे. येथील लोक संकरजातीचे म्हणून भारतांत सांगितलें आहे

**सुरुचि**–उत्तानपादाची दुसरी स्त्री. हिचा पुत्र उत्तम [ ४,८,८ ]

( २ ) माघमहिन्यांत पूषा सूर्याबरोबर असणारी अप्सरा [ १२,११,३९ ]

**सुरेणु**–सरस्वतीच्या सप्तप्रवाहांपैकीं एक.

**सुरैषि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**सुरोचन**–प्रियव्रतपुत्र इध्मबाहूच्या सात पुत्रांतलि पहिला, व याचा शाल्मली-द्वीपांतील वर्ष [ ५,२०,९ ]

**सुरोचि**–स्वायंभुव मन्वंतरांतील वासिष्ठ व ऊर्जा यांचा एक पुत्र [ ४,१,४१ ]

**सुराद**–सप्तमहासागरांतील तिसरा. याचे वेष्टण शाल्मली द्वीपाला आहे. याच्या पलीकडे वलयाकार कुशद्वीप आहे. याची रुंदी चार लक्ष योजनें आहे [ ५,१,३३ व ५,२०,७ ]

**सुलभा**–प्रधाननामक राजर्षीची कन्या. ही ब्रह्मनिष्ठ होती. जनकाबरोबर हिचा ब्रह्मज्ञानपर संवाद झाला होता.

**सुलभामैत्रेयी**–कुणिगर्गाची कन्या.

**सुलोचन**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**सुलोचना**–इंद्रजिताची स्त्री. रावणाची स्नुषा. ही महापतिव्रता होती. लक्ष्मणाचें हातें हिच्या पतीचा वध झाला असतां, पतीचें शीर मागण्याकरितां ही रामसेनेंत गेली; त्यावेळीं हिच्या पातिव्रत्याचें परीक्षण करण्याकरितां पतीचें मृतशीर हंसवून दाखवावें असे हिला सांगण्यांत आले. हिनें प्रार्थना करतांच शीर हंसलें. रामादिकांनीं हिच्या पातिव्रत्याची प्रशंसा करून शीर हिच्या स्वाधीन केलें, व आपल्या पतीच्या शिरासह हिनें अग्निप्रवेश करून आपली कीर्ति अजरामर केली.

**सुवर्चला**–ऋषभदेववंशीय परमेष्ठीची पत्नी [ ५,१५,३ ]

( २ ) ऋषभदेववंशीय प्रतीहाची स्त्री [ ५,१५,५ ]

( ३ ) आदित्याची पत्नी (भा. अनु.)

( ४ ) एक देवकन्या. ही ब्रह्मविद्या संपन्न होती. हिच्या प्रश्नांचीं उत्तरें उद्दालक पुत्र श्वेतकेतूनें दिल्यामुळें त्याला हिनें वरिलें होतें.

**सुवर्चा**–एक ब्रह्मर्षि. ( भा. वन. )

( २ ) सूर्यवंशीय करंधमाचें नांव.

( ३ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( ४ ) अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय एक राजा.

**सुवर्चा**-रामाच्या प्रधानाचा नातु.

**सुवर्ण**-एक तपस्वी.

( २ ) एक गंधर्व.

( ३ ) आठव्या सावर्णि मनूचा एक पुत्र

**सुवर्णरेतस**-विश्वामित्र कुलांतील एक ऋषि व त्याचें कुल.

**सुवर्णवर्मा**-एक राजा. याची कन्या वपुष्टमा, ती पांडववंशीय परीक्षितपुत्र जनमेजयाची स्त्री.

**सुवर्णष्ठीवि**-शैब्य पुत्र जो सृंजय त्याचा पुत्र. याची भगिनी दमयंति, ही नारदाची पत्नी. हा रोज पुष्कळ सुवर्ण प्रसवत असे याचें मल मूत्र सुद्धां सुवर्ण असे. त्यायोगें सृंजयानें सर्व प्रजेस सुखी केलें होतें. हा एकदां अरण्यांत गेला असतां, चोरांनीं यास सुवर्णलोभानें मारिलें. तेव्हां सृंजय शोक करीत असतां, नारद तेथें आला व त्यानें यास सजीव केलें (भा.द्रोण)

**सुवर्णशिरा**-वरुणलोकांतील एक गायक.

**सुवर्णाक्ष**-काशींतील एक स्थान.

**सुवर्णाख्यतीर्थ**-विष्णुऋषीच्या तपाचें स्थल.

**सुवर्णाभ**-स्वारोचिषमनूपुत्र शंखपदाचापुत्र.

**सुवर्मा**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**सुवंश**-वसुदेव व श्रीदेवचा पुत्र[९,२४,५१]

**सुवा**-भारत वर्षीय एक नदी.

**सुवाक**-पाण्डवाबरोबर द्वैतवनांत असेलला एक ऋषि.

**सुवामा**-भारतवर्षीय एक नदी.

**सुवासन**-ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतील देव [ ८,१३,२२ ]

**सुवीर**-पूरु कुलांतील क्षेम्य राजाचा पुत्र याचा पुत्र रिपुंजय [ ९,२१,२९ ]

( २ )सामवंशीय अनुकुलांतील शिबीचा दुसरा पुत्र [ ९,२३,३ ]

( ३ ) वसुदेवभ्राता देवश्रवा व कंसावती यांचा ज्येष्ठ पुत्र [ ९,२४,४१ ]

( ४ ) इक्ष्वाकुवंशीय द्युतिमानाचा पुत्र. याचा पुत्र दुर्जय. ( भा. अनु. )

**सुवेग**-यौवनाश्व राजाचा पुत्र.

**सुवेल**-कैलास शिखराच्या ईशान्येकडील हिमालयाचें शिखर.

**सुवेलाचल**-लंकेंतील एक पर्वत.

**सुव्रत**-जरासंध कुलांतील क्षेम राजाचा पुत्र. याचा पुत्र धर्मसूत्र [ ९,२२,४८ ]

**सुशर्मा**-त्रिगर्त देशाचा राजा [१,१५,१६] हाच दुर्योधनपक्षीय संशप्तक राजा; हा विराट नगरावर गेला होता. भारती युद्धांत अर्जुनानें यास मारिलें

( २ ) स्यमंतपंचकीं आलेला एक राजा कर्णाचे हातून मरण पावला [ १०,८२,२५ ]

( ३ ) कण्ववंशीय शेवटचा राजा. यास याच्या बली नामक अमात्यानें ठार करून आन्ध्र वंशाची स्थापना केली [ १२,१,२२ ]

**सुशान्ति**-सोमवंशीय अजमीढ कुलांतील शान्तीचा पुत्र. याचा पुत्र पुरुज [ ९,२१,३१ ]

**सुशोभना**-आयुनामक मण्डूकाधिपतीची कन्या. सूर्यवंशीय परीक्षित् नामक राजाची पत्नी. शलाची माता.

**सुश्रवा**-एक ऋषि.

**सुश्रुत**-विश्वामित्राचा एक पुत्र.

**सुषेण**-स्वारोचिषमनूचा एक पुत्र[८,१,१९]

( २ ) सोमवंशीय पाण्डव कुलांतील

धृष्टिमान् राजाचा पुत्र. याचा पुत्र सुनीथ [ ९,२२,४१ ]

( ३ ) कंसानें मारिलेला देवकीचा एक पुत्र [ ९,२४,५४]

( ४ ) माघ महिन्यांत पूषा सूर्याबरोबर फिरणारा गंधर्व [ १२,११,३९ ]

( ५ ) जमदग्नि व रेणुका याचा एक पुत्र

( ६ ) एक वानर. यास मैंद आणि द्विविद असे दोन पुत्र व तारा नामक कन्या होती. ती वालीची स्त्री.

( ७ ) रामसेनेंतील एक वानर.

( ८ ) इक्ष्वाकुवंशीय अन्तरिक्षाच्या तीन पुत्रांपैकीं एक.

( ९ ) धृतराष्ट्राचा एक पुत्र.

( १० ) उत्तमौजानें मारिलेला दुर्योधन पक्षीय राजा ( भा. कर्ण )

( ११ ) नकुलानें मारिलेला कर्णाचा पुत्र

**सुषोमा**–भारतवर्षीय नदी [ ५ १९, १८ ]

**सुसंवृत्त**–दुर्योधन पक्षीय राजा (भा. उद्योग)

**सुसामा**–युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांतील उद्गाता. हा धनंजय गोत्रोत्पन्न होता.

**सुस्वधा**–आज्यप नामक पितरांचें नांव. हे कामदुघ लोकांत राहतात.

**सुहनु**–वरुण लोकांतील एक असुर.

**सुहस्त**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**सुहू**–उग्रसेनाचा पुत्र. कंसाचा भाऊ. [ ९,२४,२४ ]

**सुहोत्र**–सोमवंशीय आयुपुत्र क्षत्रवृद्धाचा पुत्र. याचे पुत्र काश्य, कुश व गृत्समद [ ९, १७, २ ]

( २ ) कुरुपुत्र सुधनुष राजाचा पुत्र याचा पुत्र च्यवन [ ९, २२, ५ ]

( ३ ) पाण्डुपुत्र सहदेव व पर्वतकन्या विजया, यांचा पुत्र [ ९,२२,३१ ]

( ४ ) पाण्डवांबरोबर द्वैतवनांत असलेला एक ऋषि.

( ५ ) एक राजा. हा दानशूर होता, म्हणून इंद्रानें याच्या राष्ट्रांत एक वर्ष सुवर्णाची वृष्टि केली (भा. द्रोण.)

( ६ ) रामसेनेंतील एक वानर.

**सुह्म**–सोमवंशीय अनुकुलांतील बलीची पत्नी सुदेष्णा तिला दीर्घतम्यापासून झालेला एक पुत्र [ ९,२३,५ ]

( २ ) एक देश.

## सू

**सूकरमुख**–निरपराध्यांना शासन करणारास प्राप्त होणारा नरक [ ५,२६,१६ ]

**सूक्ष्म**–दनुपुत्र एक दानव.

**सूचीमुख**–धनाचा अपव्यय करणारास प्राप्त होणारा नरक [ ५,२६,३६ ]

**सूत**–व्यासाचा पुराणांचा शिष्य जो रोमहर्षण त्याचें नांव [ १,१,५ ]

( २ ) स्तुतिपाठकांपैकीं भेद [ १,११,२० ]

( ३ ) सारथ्यास संज्ञा.

( ४ ) कीचकास नांव. ( भा. विराट. )

**सूतपुत्र**–उग्रश्रव्यास नांव.

( २ ) कर्णास संज्ञा.

( ३ ) विश्वामित्राचा एक पुत्र.

**सूनृता**–रुद्रसावर्णिमन्वंतरांतील स्वधामअंवताराची आई. सत्यसहाची पत्नी [ ८,१३,२९ ]

**सूर्म्या**–अनुन्हादाची पत्नी [ ६,१८,१६ ]

**सूर्य**–सूर्यमण्डलाची देवता. बारा आदित्यांस सूर्य हें सामान्य नांव असून

प्रत्येक महिन्यास एकएका नांवाचा सूर्य असतो. याचा रथ तीनवेदात्मक आहे. त्याला एक चाक आहे, आणि तें मानसोत्तर पर्वतावर असून त्याच्या भोंवती फिरतें. या चक्राच्या आसाला एक छिद्र असून त्यांत दुसरा आंस बसविला आहे. रथांतील सूर्याची बसण्याची जागा छत्तीस लक्ष योजनें लांब व नऊ लक्ष योजनें रुंद आहे. याचा सारथि अरुण. हा सूर्याकडे मुखकरून पश्चिमाभिमुख बसतो. याच्या रथाच्या चाकाला बारा आरा, सहा धांवा, व तीन नाभि आहेत. रथाचे जोखड नऊ लक्ष योजनें आहे. रथाचे अश्व सात असून वेदमय आहेत. या रथाची गति एका क्षणाला दोन हजार योजने दोन कोस इतकी आहे. आंगठ्याच्या पेराइतके असलेले साठ हजार ऋषी याची स्तुति करितात. प्रतिमासीं ऋषि, गंधर्व, अप्सरा, नाग, यक्ष, राक्षस हे भिन्नभिन्न नांवानें याच्या बरोबर असतात. हा मध्यभागीं आला असतां, याच्या एका बाजूस सूर्योदय व दुसऱ्या बाजूस अस्ताची वेळ असते. जसें-इंद्राच्या अमरावती नगरींत ज्यावेळीं मध्यान्ह असतो, त्यावेळीं यमाच्या संयामनी नगरींत सूर्योदय व वरुणाच्या प्रम्लोचिनी नगरींत मध्यरात्र आणि कुबेराच्या विभावरी नगरींत सूर्यास्त होतो [ ५, २१, ३ ते १९ ] आकाशस्थ ज्योतींपैकीं पृथ्वीला विशेष महत्वाची एक ज्योति. पृथ्वीवर प्रत्येक सजीव प्राण्याच्या जीवनास सूर्य कारण आहे. हा आपल्या विलक्षण प्रभावानें पृथ्वीला आकाशांत अधांत्री फिरावयास लावतो. सूर्याचें लहानसे जरी वीतभर बिंब दिसले, तरी तो पृथ्वीपेक्षां तेरा लक्षपट मोठा आहे. सर्व पृथ्वीच्या जीवनास लागणारी उष्णता जी आपणास याच्याकडून मिळते, ती सूर्यापासून निघणाऱ्या एकंदर उष्णतेचा दोन अब्जांश आहे. दर तासीं ३० मैल चालणाऱ्या वाहनास सूर्याभोंवती प्रदक्षिणा करण्यास सवा नऊ वर्षे लागतील. सूर्यापासून पृथ्वीचें अंतर ९ कोटी २३ लक्ष मैल आहे. यंत्राच्या सहाय्यानें सूर्यावर कांहीं डाग दिसतात व ते कोट्यवधि मैल मोठे असतात. सूर्य हा ग्रहमालेंतील एक मुख्य ग्रह असून याच्या भोंवतीं अनेक ग्रह व उपग्रह फिरतात.

**सूर्यदत्त**-द्रोणाचार्यानें मारिलेला विराटाचा एक भाऊ

**सूर्यध्वज**-द्रौपदी स्वयंवरांतील एक राजा.

**सूर्यभानु**-रामसेनेंतील एक वानर.

**सूर्यभास**-अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भा, द्रोण. )

**सूर्यवर्चा**—कश्यप पत्नी मुनीचा पुत्र एक गंधर्व हा कार्तिक महिन्यांत विष्णु सूर्य बरोबर असतो [ १२,११,४४ ]

**सूर्यवर्मा**—अर्जुनानें मारिलेला त्रिगर्त.

**सूर्यवान्**-एक पर्वत.

**सूर्यशत्रु**-लंकेतील एक राक्षस.

**सूर्याक्ष**–रामसेनेंतील एक वानर

**सूर्यात्म**–अथर्वणवेदोपनिषत्

**सूर्यानन**–रामसेनेंतील एक वानर

**सूषा**–वरुणाच्या निम्लोचिनी नगरीचें नांव

**सृंगाल**–एक राजा

**सृंजय**–तिसऱ्या उत्तममनूचा पुत्र[८,१,२३]

(२) अनुकुलांतील कालनराचा पुत्र. याचा पुत्र जनमेजय [९,२३,१]

(३) यदुवंशीय सात्वतकुलांतील शूराचा पांचवा पुत्र. याची पत्नी कंसभगिनी राष्ट्रपाली व पुत्र वृष आणि दुर्मर्षण [९,२४,२९]

(४) धूम्राक्षपुत्र संयमाचें नामांतर.

(५) पांच पांचाल भावांपैकीं संजयाचें नामांतर.

(६) अंबा, अंबिका, अंबालिका, यांचा मातामह होत्रवाहन त्यास नामांतर.

(८) शिबिदेशाचा राजा. याची पत्नी कैकयी. नारद व पर्वत हे दोघ ऋषी याचे मित्र होते. ते दोघे याच्याकडे कांहीं दिवस राहण्यास आले असतां याची कन्या दमयंती, ती त्याची सेवा करीत असे तिला पाहून नारदानें ही कोण म्हणून राजास विचारिलें असतां, ही माझी उपवर कन्या आहे, असें राजानें त्यांस सांगितलें. तें ऐकून दोघांच्याही मनांत ती आपणास असावी अशी इच्छा उत्पन्न झाली. परंतु परस्परांचें मनोगत परस्परांना सांगावें, असा जो नियम त्यांनीं आपसांत ठरविला होता, त्याचा भंग केल्यामुळें पर्वतानें नारदास 'तूं विकृत मुख होशील' असा शाप दिला. तेव्हा नारदानेंही पर्वतास 'देवलोकीं तुझा संचार होणार नाहीं' असा शाप दिला. त्या शापाप्रमाणें नारद विकृत मुख होऊन तेथेंच राहिला, व पर्वत पृथ्वी पर्यटणाकरितां निघून गेला आपल्यामुळेंच नारदास अशी स्थिति प्राप्त झाली हें लक्षांत आणून दमयंती पतिभावानें नारदाची सेवा करूं लागली व नारदाबरोबर विवाह करण्याची इच्छा तिनें व्यक्त केली. परंतु शापामुळें नारदाचें मुख वानरासारखें झालें असल्यामुळे राजा कबूल होईना. इतक्यांत पर्वत ऋषि तेथे आला, व दमयंतीची एक निष्ठा पाहून त्यानें नारदास शापमुक्त केलें. नारदानेंही पर्वत ऋषीस शापमुक्त केलें. नंतर राजानें नारदाबरोबर दमयंतीचा विवाह लावून दिला. याचा पुत्र सुवर्णष्ठीवि (भा. शांति.)

**सृंजया**–सृंजय राजाची कन्या व सात्वतपुत्र भजमानाची स्त्री.

**सृतंजय**–जरासंधकुलांतील कर्मजिताचा पुत्र. याचा पुत्र विप्र [९,२२,४७]

**सृष्टि**–उग्रसेनाचा आठवा पुत्र [९,२४,२४]

## से.

**सेक**–एक देश. हा चंबळा नदीच्या दक्षिणेस व अवंतीच्या उत्तरेस आहे. याचा अपरसेक असाहि एक भेद आहे.

**सेतु**–लंकेस जाण्याकरितां रामचंद्रानें नलवानराकडून दहा योजनें रुंद व शंभर योजनें लांब असा समुद्रावर बांधलेला

मार्ग. येथें ज्योतिर्लिंगापैकीं रामेश्वराचें स्थान आहे [ ७,१४,३१ ]

( २ ) सोमवंशीय अनुकुलांतील ब्रूचा पुत्र. याचा पुत्र आरब्ध[९,२३,१४]

**सेदुक**-एक राजा ( वृषदर्भ शब्द पहा )

**सेन**-सोमवंशीय हेमराजास नामांतर.

**सेनजित्**-इक्ष्वाकुवंशीय कृशाश्वाचा पुत्र. याचा पुत्र युवनाश्व [ ९, ६, २५ ]

( २ ) सोमवंशीय अजमीढपुत्र बृहदिषूच्या कुलांतील विशदाचा पुत्र. याला रुचिराश्व, दृढहनु, काश्य आणि वत्स असे चार पुत्र होते [९,२१,२३]

( ३ ) फाल्गुनांत पर्जन्य सूर्याबरोबर फिरणारी अप्सरा [ १२,११,४० ]

**सेनानि**-कार्तिकेयास नांव.

**सेनापति**-धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**सेनाबिन्दु**-कर्णानें मारिलेला पाण्डवपक्षीय राजा ( भा. कर्ण )

( २ ) अर्जुनानें दिग्विजयाच्या वेळीं जिंकलेला देवप्रस्थ नगरचा राजा

**सेन्द्रफेना**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**सेयन**-विश्वामित्राचा एक पुत्र.

## सै

**सैतावहिनी**-बाहुदानदीस पूर्वीचें नांव.

**सैन्धव**-सिंधुदेशासंबंधी राजे वगैरे. विशेषतः जयद्रथ [ ९,१,२३ ]

**सैंधवायन**-विश्वामित्राचा पुत्र. आंगिरस कुलांतील शुनकाचा अथर्ववेदाचा एक शिष्य [ १२,७,३ ]

**सैंधवारण्य**-सिंधुदेश संबंधी अरण्य.

**सैन्य**-अंगिराकुलांतील एक ऋषि.

**सैरन्धि**-कश्यपकुलांतील एक ऋषि.

**सैरन्ध्री**-कंसदासी कुब्जेचें नांव [१०,४२,२

( २ ) अज्ञातवासांत असतां द्रौपदीनें धारण केलेलें नांव.

**सैवल्क**-वसिष्ठकुलांतील एक ऋषि.

**सैंहिकेय**-कश्यपऋषि व सिंहिका यांचे राहु, सुचंद्र, चंद्रहर्ता आणि चंद्रप्रमर्दन, अशा चार पुत्रांस नांव

( २ ) विप्रचित्ति दानव व सिंहिका यांचे व्यंस, कल्प, नल, वातापि, इल्वल, नमुचि, श्वसृप, अजन, नरक, कालनाभ, सरमाण, कालवीर्य आणि विख्यात अशा तेरा पुत्रांस संज्ञा

## सो

**सोम**-स्वायंभुवमन्वंतरांतील अत्रि व अनुसूया यांचा पुत्र. हा ओषधि वनस्पतींचा व नक्षत्रांचा राजा आहे [ ४,१,१५ व ६,४,६ ]

( २ ) एक यज्ञ [ ५,७,५ ]

( ३ ) शाल्मलीद्वीपांतील लोकांची उपास्य देवता [ ५,२०,११ ]

( ४ ) सविता व पृश्नि यांचा पुत्र [ ६,१८,१ ]

( ५ ) चालू मन्वंतरांतील अत्रिऋषीचा पुत्र, त्यास भद्रा आणि ज्योत्स्ना अशा दोन कन्या होत्या, त्यापैकीं पहिली उतथ्य ऋषीची पत्नी व दुसरी वरुणपुत्र पुष्कराची पत्नी. हाच सोमवंशाचा मूळ पुरुष [ ९,१४,३ ]

( ६ ) समुद्र मंथनाचे वेळीं निघालेल्या चतुर्दशरत्नांपैकीं एक.

( ७ ) शंकरास नांव.

( ८ ) वैश्रवणाचें नांव.

( ९ ) एक वल्ली. ही सोमयज्ञांत लागते.

**सोमक**–सोमवंशीय पूरुकुलांतील पांचालवंशीय सहदेवाचा पुत्र. याचा पुत्र जन्तु [ ९,२२,१ ] एकदां जन्तुस मुंगी चावून तो कासावीस झाल्यामुळें या राजास एकपुत्रिकाची स्थिति निपुत्रिका सारखीच वाटली. इतक्यांत तेथें एक ब्राह्मण येऊन तो राजा शोक करीत आहे. असें पाहून म्हणाला, ' जर तुं या पुत्राच्या योगानें यज्ञ करशील तर तुला अनेक पुत्र होतील. राजानें त्याच्याकडून आपल्या पुत्राचा होम करविला, त्या होमाचा धूर राजाच्या शंभर स्त्रियांच्या उदरांत जातांच त्या सर्वहि गर्भिणी राहिल्या व त्यास शंभर पुत्र झाले. कांहीं काळानें राजा व ब्राह्मण मृत्यु पावल्यावर राजा स्वर्गास गेला, व ब्राह्मण नरकांत पडला. हें राजास सम तांच तो यमाकडे आला. व माझ्यामुळें या ब्राह्मणास हें दुःख भोगावें लागत असल्यामुळें त्याचें दुःख मीं भोगतों, असें म्हणाला. तेव्हां यम म्हणाला ज्याच पाप त्यासच भोगलें पाहिजे, पण तुला आपल्या कर्माचा अभिमान आहे, म्हणून याच्या पातकाचा अंश तूं भोग. नंतर या राजानें ब्राह्मणाबराबर अर्ध्या यातना भोगून हा त्याच्यासह स्वर्गास गेला

( २ ) श्रीकृष्ण व कालिन्दी यांचा पुत्र [ १०,६१,१४ ]

( ३ ) भारतीयुद्धांतील पाण्डवपक्षीय राजांचा एक समुदाय.

( ४ ) पाण्डव वंशीय सुदासपुत्र शतानीकाचें नामांतर.

**सोमकल्प**–ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला एकोणिसावा दिवस.

**सोमकीर्ति**–धृतराष्ट्राचा एक पुत्र.

**सोमगिरि**–भारतवर्षीय एक पर्वत.

**सोमतन्वि**–अंगिराकुलांतील एक ऋषि.

**सोमदत्त**–सूर्यवंशीय दिष्टकुलांतील कृशाश्वाचा पुत्र. यानें अश्वमेधानें उत्तम गति मिळविली. याचा पुत्र सुमति. [ ९,२,३५ ]

( २ ) सोमवंशीय कुरुकुलांतील बाल्हीकाचा पुत्र. याला भूरि, भूरिश्रवा, शल आणि यूपकेतु असे पुत्र होते. वसुदेव देवकीच्या विवाहाचे वेळीं शिनी नामक यादवानें याचे केस धरून यास पाडिलें व लताप्रहार केला, त्या अपमानामुळें यानें तप करून रुद्रास प्रसन्न केलें व शिनीचा सूड घेणारा पुत्र मागितला तो भूरिश्रवा. पुढें भारतीयुद्धांत भूरिश्रव्यानें शिनीचा पौत्र सात्यकी त्याची अवस्था अशीच केली. हा भारती युद्धांतच मृत झाला. [ ९, २२, १८ ]( भा. द्रोण )

**सोमदा**–उर्मिला गंधर्वीची कन्या. ही चूलिसूनु ब्रह्मदत्त राजाची माता.

**सोमधेय**–भीमानें पूर्व दिग्विजयाचे वेळीं जिंकलेला देश ( भा. सभा. )

**सोमनाथ**–द्वादशज्योतिर्लिंगापैकीं एक. हें काठेवाडांत जुनागड संस्थानांत आहे. या देवळाचें मागें भाटकुण्ड म्हणून एक तीर्थ असून तेथेंच श्रीकृष्ण निजधामाला गेले असें म्हणतात.

**सामन्यूषायण**-चालू मन्वंतरांत होऊन गेलेला तेविसावा व्यास.

**सोमप**—मानस लोकांत राहणारे पितर. यांची मानसकन्या नर्मदा. हे भृगु ऋषीचे पुत्र ब्राह्मणांस पूज्य

**सोमपथ**-चंद्रलोकच्या मार्गावरील एक लोक.

**सोमपान**—एक तीर्थ.

**सोमपीथ**—विश्वरूपाच्या तीन मस्तकांपैकी एक [ ६,९,१ ]

**सोमराजक**—गौतमांगिरसांतील एक कुल.

**सोमवाह**—अगस्त्य कुलोत्पन्न एक ऋषि.

**सोमवित्**-एक राजा.

**सोमशर्मा**-मौर्यवंशीय शालिशूकाचा पुत्र [ १२,१,१४ ]

**सोमश्रवा**-श्रुतश्रवा ऋषीस नागिणीपासून झालेला पुत्र.

**सोमा**—एक अप्सरा.

**सोमापि**-सोमवंशीय जरासंध कुलांतील सहदेवाचा पुत्र [ ९,२२,९ ]

**सोमोत्रायनि**-आंगिराकुलांतील एक ऋषि.

**सोमोद्भवा**—सोमप पितरांची कन्या.

**सोहंजि** -हैहयकुलांतील कुन्तिराजाचा पुत्र. याचा पुत्र महिष्मान [ ९,२३,२२ ]

## सौ

**सौगंधिक**—कुबेराच्या अलका नगरीजवळचें एक वन [ ४,६,२३ ]

( २ ) कैलास शिखरा या ईशान्येकडील हिमालयाचें एक शिखर.

**सौचाकि**- भृगुकुलांतील एक ऋषि.

**सौचित्ति**- पाण्डवपक्षीय एक राजा.

**सौजामि**—एक ऋषि.

**सौति**—सूतपुत्र उग्रश्रव्याचें नांव.

**सौत्रामणि**-यज्ञ विशेष [ १०,२३,८ ]

**सौदामिनी**—कश्यप व विनता यांची कन्या

**सौदास**- सुदास पुत्र कल्माषपादास नांव.

**सौदेव**- सुदेव पुत्र दिवोदासाचें नांव.

**सौद्युम्नि**- वैवस्वतमनु पुत्र सुद्युम्नाचा पुत्र.

( २ ) युवनाश्व राजास नामांतर.

**सौधिक** भृगुकुलांतील एक ऋषि.

**सौधृतेय**-सुधतिपुत्र नराचें नांव [ ९,२,३० ]

**सौपुरि**- अंगिराकुलांतील एक ऋषि.

**सौपुष्पि** अत्रिकुलांतील एक ऋषि.

**सौबल**- सुबलपुत्र शकुनीचें नांव [ ३,३,१३

**सौबुधि**- अंगिरकुलांतील एक ऋषि.

**सौभ** शाल्व राजाचें विमान [ १०,७६,७ ]

**सौभग**- वामनपुत्र बृहच्छलोकाचा पुत्र [ ६,१८,८ ]

**सौभद्र**—वसुदेव व रथराजि यांचा एक पुत्र.

( २ ) सुभद्रा पुत्र अभिमन्यूस नांव.

( ३ ) एक तीर्थ.

**सौभपति**—शाल्व राजा [ १०,७६,१ ]

**सौभरि**—एक ऋषि. यास एकदां विवाह करण्याची इच्छा झाली, आणि हा मान्धाता राजाकडे कन्या मागण्यास गेला. म्हातारा झालेला ऋषि लग्नाची इच्छा करतो म्हणून राजानें आपल्या पन्नास कन्यांपैकीं जी तुला वरील ती घेऊन जा, असें यास सांगितलें. आपण वृद्ध असल्यामुळें राजानें असें उत्तर दिलें, हें लक्षांत आणून यानें तपःसामर्थ्यानें असें सुस्वरूप व मुसमुसीत तारुण्य धारण केलें कीं, याला पाहतांच त्या पन्नासहि कन्यांनीं याला वरिलें. नंतर त्या स्त्रियांसह अनेक भोग भोगिल्यावर हा विरक्त झाला, व स्त्रियांसह अरण्यात जाऊन

मुक्त झाला [ ९,६, ३८ ते ५५ ] याचा आश्रम नर्मदातीरीं होता, तेथें अश्वमेधाच्या अश्वाबरोबर अर्जुन आला असतां, त्यास यानें उद्दालक व चंडी यांची कथा सांगितली

( २ ) एक ऋषि. यानें गरुडाला शाप देऊन यमुनेच्या डोहांत येण्याचा प्रतिबंध केला होता [ १०,१७,१० ]

**सौभाग्य** ऋग्वेदोपनिषत्.

**सौमदत्ति**-सोमदत्तपुत्र भूरिश्रवास नांव

**सौमदेय**-सोमदा गंधर्वीचा पुत्र ब्रह्मदत्त.

**सौमनस**-एक पर्वत.

**सौमनस्य**-प्रियव्रतपुत्र यज्ञबाहुचा दुसरा पुत्र व याचा शाल्मलद्वीपांतील वर्ष [ ५, २०, ९ ]

**सौमित्रि**-सुमित्रा पुत्र लक्ष्मण.

**सौम्य**-पितर विशेष [ ४,१, ६३ ]

( २ ) सोमपुत्र बुध.

( ३ ) मयसभा पाहण्याकरितां पांडवांकडे आलेला एक ऋषि.

**सौर**-शुचिनामक अग्नीस नामांतर.

( २ ) भृगुकुलांतील एक ऋषि.

( ३ ) सूर्यासंबंधी सूक्त.

**सौरथ**-भारतवर्षीय एक देश.

( २ ) सुरथाचा वंशज.

**सौरभेयी**-शापानें मगरी झालेली अप्सरा.

**सौराष्ट्र**-( काठेवाड ) एक देश व त्यांतील राजे [ ३,१,२४ व १२,१,३८ ]

**सौरि**-सूर्यपुत्र शनीस नांव.

**सौवर्ण**-भारतवर्षीय एक तीर्थ.

**सौवीर**-सिंधु व झेलम यांमधील देश. [ १,१०,३५ व ३,१,२४ ]

( २ ) यवनांचा अधिपति ( स्वतः यवन नव्हे ) यानें त्रिसंवत्सरात्मक यज्ञ केला होता. हा अर्जुनाच्या हातून मरण पावला.

**सौशल्य**-भारतवर्षीय एक देश.

**सौश्रुति**-अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय एक राजा.

**सौसुक**-विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**सौहसोक्ति**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**स्कंद**-कार्तिक स्वामीस नांव [ ६,६,१४ ]

( २ ) अठरा महापुराणांपैकीं एक. याची श्लोकसंख्या एक्यायशीं हजार एकशें आहे [ १२,१३,७ ]

( ३ ) यजुर्वेदोपनिषत्.

**स्कंदस**-अंगिराकुलांतील एक ऋषि

**स्तनकुण्ड**-गौरीशिखरावरील एक तीर्थ.

**स्तनयित्नु**-दक्षकन्या लम्बा-पुत्र विद्योताचा पुत्र [ ६,६,५ ]

**स्तनित**-भृगुकुलांतील एक ऋषि.

**स्तंब**-श्याम पराशरकुलांतील ऋषि.

**स्तंभ**-स्वारोचिषमन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं.

**स्तुति**-ऋषभदेव वंशीय प्रतिहर्त्याची पत्नी. हिचे पुत्र अज आणि भूमा.

**स्तुतिस्तोम**-गायन करीत ऋचा म्हणणें म्हणजे स्तुतिस्तोम [ ३,१२,३७ ]

**स्तुत्यव्रत**-प्रियव्रत पुत्र हिरण्यरेताचा पुत्र व याचा वर्ष [ ५,२०,१४ ]

**स्तोम**-श्रीकृष्णामित्र एक गोप [ १०,१५,२० ]

**स्त्रीराज्य**-( भूतान ) पाण्डवांचा अश्वमेधाचा अश्व येथील प्रमीला राणीनें धरिला होता.

**स्थाण्डिलेयु**--सोमवंशीय पूरुकुलांतील रौद्राश्व व घृताची अप्सरा यांचा तिसरा पुत्र [ ९,२०,४ ]

**स्थल**–रामपुत्र कुशकुलांतील बलाचा पुत्र याचा पुत्र वज्रनाभ [ ९,१२,२ ]

**स्थलपिण्ड**–भृगुकुलांतील एक ऋषि.

**स्थाणु**–ब्रह्ममानस पुत्र, एक प्रजापति. यानें जरामरणरहित प्रजा निर्मिल्या. त्यामुळें सर्व पृथ्वी भरून गेली म्हणून ब्रह्मदेवानें यास थांब म्हणून सांगितल्यामुळें यास हें नांव मिळालें.

( २ ) शंकरास एक नांव.

**स्थाणुमती**–भारतवर्षीय एक नदी.

**स्थाणुवट**–कुरूनें जेथे तप केलें तें सरोवर.

**स्थान**–महापुराणाच्या दशलक्षणांपैकीं एक. ( संरक्षण ) [ २, १०, १ ]

**स्थानेश्वर**-एक तीर्थ व क्षेत्र. कुरुक्षेत्राजवळील एक स्थल. सरस्वती नदी याच्या पश्चिमेकडून वाहते. याच्याजवळ एक मोठें स्थाणुवट नामक तीर्थ आहे. कुरुनें येथें तप केलें.

**स्थापत्य**–( शिल्पशास्त्र ) अथर्ववेदाचा उपवेद. हा ब्रह्मदेवाच्या उत्तरमुखापासून उत्पन्न झाला [ ३,१२,३८ ]

**स्थूण**–विश्वामित्र कुलांतील एक ऋषि.

**स्थूणकर्ण**–पांडवांबरोबर द्वैतवनांत असलेला एक ऋषि.

**स्थूणाकर्ण**–शिखंडीस पुरुषत्व देणारा यक्ष.

**स्थूलकेश**–प्रमद्वरा कन्येचें पालन करणारा ऋषि.

**स्थूलगिरा**- एक ऋषि.

**स्थूलशिरा**–विश्वावसुगंधर्वास कबंधरूपानें त्रास दिल्यामुळें त्याच्या शापानें कबंध राक्षस झालेला ऋषि (भा.व.)

**स्थूलाक्ष**–एक ऋषि.

( २ ) दूषण राक्षसाचा एक अमात्य.

**स्नात** । कश्यपकुलांतील एक ऋषि.

**स्फूर्ज** पौषांत भगसूर्याबरोबर असणारा राक्षस [ १२,११,४२ ]

**स्मय**-धर्मऋषि व पुष्टीचा पुत्र [ ४,१,५१ ]

( २ ) गर्व [ ४ ३,२ ]

( ३ ) वसिष्ठाच्या प्रजापति पुत्रांतील एक

**स्मर**–मदनाचें नांव.

(२) मरीचिऋषि व ऊर्णा यांचा एक पुत्र.

**स्मृति**-धर्मशास्त्र [ ३,२६,३० ]

( २ ) स्वायंभु मन्वंतरांतील धर्मऋषि व मेधा यांचा पुत्र [ ४,१,५२ ]

**स्यंदिका** भारतवर्षीय एक नदी.

**स्यंदिनी** गोमतीला मिळणारी एक नदी.

**स्यमंतक**–सत्राजिताने सूर्यापासून मिळविलेला एक मणि. हा मणि रोज आठ भार सुवर्ण प्रसवे. व रोग, दुर्भिक्ष इत्यादिकांचे निवारण करी. सत्राजिताचा भाऊ प्रसेन हा मणि गळ्यांत घालून मृगयेस गेला असतां, तेथें सिंहानें त्यास मारिलें, आणि जांबवान अस्वलान सिंहास मारून तो मणि आपल्या गुहेत नेला. ह्या मण्यासंबंधानें एकदां कृष्णानें सत्राजिताकडे मागणी केली होती, त्यावरून सत्राजितास कृष्णाचा संशय आला त्या संशयाच्या निरसनार्थ श्रीकृष्णानें मण्याचा शोध लावून जांबवंताबरोबर मल्लयुद्ध करून त्याजकडून तो परत आणला, व सत्राजितास परत दिला. याप्रसंगीं कृष्णाचा पराक्रम पाहून जांबवंतानें आपली कन्या जाम्बवती कृष्णास अर्पण केली आणि सत्राजितानें उपकाराची फेड म्हणून आपली

